॥ श्रीरामसमर्थ ॥

# श्रीसमर्थग्रंथभांडार.



## ( उत्तरार्ध. )



नाना साधनांचें मूळ । कवि नाना प्रेत्नांचें फळ ।
नाना कार्य सिद्धि केवळ । कवींचेनि प्रसादें ॥
नस्ता कवींचा व्यापार । तरी कैंचा अस्ता जगोद्धार ?
म्हणोनि कवि हे आधार । सकळसृष्टीसी ॥

—श्रीदासबोध.



संग्राहक,

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.**



प्रकाशक,

**केशव भिकाजी ढवळे,** गिरगांव, मुंबई.



श्रीदासनवमी, शके १८४८ सन १९२७.



किंमत २॥ रुपये.

॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ॥

# प्रस्तावना.

**रामदासीं ब्रह्मज्ञान सारासारविचारणा ।**
**धर्मसंस्थापनेसाठीं कर्मकांड उपासना ॥**

—मानपंचक.

१ श्रीसमर्थ रामदासस्वामी यांचा जन्म मौजे जांब परगणे अंबड ( गोदातीरीं ) येथें शके १५३० मध्यें **श्रीरामनवमीस** मध्यान्हकाळीं झाला. पैठणास श्रीएकनाथमहाराजांची अवतारसमाप्ति शके १५२० मध्यें झाल्यावर दहाच वर्षांनीं पुणेप्रांतीं देहू येथें श्रीतुकोबाराय व गोदातीरीं श्रीसमर्थ ह्या दोन महाविभूति अवतरल्या. तुकोबारायांनीं आपलें अवतारकृत्य अवघ्या ४२ वर्षांत उरकून घेतलें व समर्थ त्यांच्या पश्चात् ३० वर्षें राहिले. समर्थांचे वडील सूर्याजीपंत, माता रेणुबाई व वडील बंधु श्रेष्ठ. घराण्यांत रामोपासना २१ पिढ्या चालत आलेली. रामभक्तांच्या घराण्यांत रामजन्मकाळीं समर्थांचा जन्म ! श्रेष्ठ ही रामभक्त. श्रेष्ठांनीं गृहस्थाश्रम चालवून रामसेवा केली, समर्थ ब्रह्मचारीच राहिले. समर्थांचें पाळण्यांतलें नांव नारायण. वयाच्या बाराव्या वर्षींच लग्नांत द्विजांनीं ' सावधान ' म्हणतांच नारायण लग्न टाकून पळाले, व पंचवटीस गेले ( शक १५४२ ). पंचवटीपासून दोन मैलांवर टाकळी येथें संगमाजवळ राहून समर्थांनीं बारावर्षें अनुष्ठान केलें म्ह० तीन गायत्री पुरश्चरणें व तेरा कोटी रामनामाचा जप केला. त्यांनीं रामप्रसाद जोडला व बारावर्षें भरतखंडभर तीर्थयात्रा करून शके १५६६ मध्य श्रीरामाच्या अनुज्ञेनें ते कृष्णातीरीं आले. तेथून पुढें ३६ वर्षें त्यांनीं जगदुद्धार केला. अर्थात समर्थांची जन्मभूमि जांब, तपोभूमि टाकळी व कर्मभूमि कृष्णातीर अथवा खरें म्हटलें तर सारें भरतखंड !

२ कृष्णातीरीं येतांच त्यांनीं श्रीरामोपासनेचा सांप्रदाय सुरू केला. ते शरण आलेल्यांस दीक्षा देऊं लागले व शके १५७० पासून चाफळीं श्रीरामनवमीच्या उत्सवास सुरवात केली. शके १५६७–७१ ह्या पांच वर्षांत त्यांनीं स्वहस्तें अकरा मारुतींची प्राणप्रतिष्ठा केलीः—शहापूर, मसूर, चाफळास दोन ( एक सन्मुख व एक श्रीरघुपतीचे मागें ) उंब्रज, शिरोळ, पाडळी, पारगांव ( महाबळेश्वरचे पायथ्यासी ), मानगांव, सिंघणवाडीचे गुहेंत असे दहा व अकरावा वाळवे प्रांतीं बाहे येथें. समर्थांचा संचार सर्व ठिकाणीं होता. ते नेपाळ, काबूलकंदाहार येथपर्यंत जाऊन आले. राहायचें म्हणजे कधीं चाफळास, कधीं गडावर व कधीं शिवथरचे घळींत. शके १५७१ मध्यें सिंघणवाडीचे बागेंत वैशाखमासीं शिवाजीमहाराजांवर त्यांनीं अनुग्रह केला. याच सालीं जेष्ठांत तुकोबांची त्यांची भेट झाली, आषाढीला ते पंढरीस गेले होते, व

फाल्गुनांत तुकोबांचें महाप्रयाण झालें. शके १५६७ ते १५७१ ह्या पांच वर्षांतच त्यांनीं आपला रामदासीसंप्रदाय दृढमूल केला, बहुतेक प्रमुख शिष्य याच काळांत श्रीसमर्थांस शरण आले. पुढें क्रमानें शिष्यप्रशिष्य वाढत जाऊन सांप्रदाय सर्वंभर पसरला. मठस्थापना व शिष्य-शाखा यांची वटवृक्षासारखी छाया सर्व भरतखंडभर पसरली. टाकळीचे उद्धवगोसावी ( दश-पुत्रे ), कण्हेरीचे वासुदेवबोवा, कल्याणस्वामी व त्यांचे बंधु दत्तात्रेयबोवा, गिरिधर, दिवाकर गोसावी, दिनकर गोसांवी, देवदास, भोळाराम, वऱ्हाडचे महारुद्र, बाळकराम, इ० अनेक शिष्य व अक्का, वेणाबाई, अंबिकाबाई वगैरे शिष्यिणी; असा मोठा संप्रदाय वाढत चालला. शिवाजीमहाराजांप्रमाणें प्रल्हाद निराजी, रामचंद्र निळकंठ अमात्य, सचिव इ०त्यांचे मंत्री व कार्यकर्ते पुरुषही समर्थांचे शिष्य झाले. केशवस्वामी, रंगनाथस्वामी, जयरामस्वामी, आनंदमूर्ति हे सत्पुरुष समर्थांस आत्माधिक मानीत. या पांचजणांस मिळून ' रामदासीपंचायतन ' म्हणतात. समर्थांची शिस्त कडक होती. त्यांना गवाळेपणा खपत नसे. शिस्तीनें, व्यवस्थेनें, मर्यादेनें वागण्याचा त्यांनीं सर्वांस कित्ता घालून दिला. साऱ्या राष्ट्रांत त्यांनीं उपासनेचें चैतन्य ओतलें, सारें राष्ट्र उत्साहयशप्रतापानें भरलें, महाराष्ट्रांत कर्तृत्वाची प्रचंड ज्योत पेटविली व उपासना-बळावर महत्कार्य केलें.

३ ह्या महापुरुषाच्या आयुष्यांतला प्रत्येक क्षण लोकोद्धारांत खर्च झाला. ' धर्मवृद्धीनें राज्यवृद्धि आहे ' ' धर्मस्थापनेची कीर्ति ! सांभाळली पाहिजे ' अशी त्यांची कर्त्या पुरुषांस आज्ञा होती. दैववादाचा पांगळेपणा मोडून यांनीं प्रयत्न प्रतिष्ठिला, शब्दावडंबर मोडून प्रत्ययाची महती वाढविली व प्रबोध ( जागृति ) हा लोकोद्धाराचा मार्ग दाखविला. **प्रयत्न, प्रत्यय व प्रबोध ह्या तीन शब्दांत समर्थांच्या चरित्राचें व ग्रंथांचें सार आहे.** समर्थांनीं जनप्रबोधार्थ ग्रंथरचनाही अफाट केली. ग्रंथराज श्रीदासबोध, मनोबोध, आत्मारामादि अध्यात्मग्रंथ, दोन कांडांचें रामायण, हजारों आरत्या, पदें, अभंग, सवाया, विविधवृत्तात्मक श्लोक वगैरे ग्रंथरचना किती तरी केली आहे. त्यांची वाणी प्रासादिक आहे हें कांहीं सांगायला नको, ती महाप्रभावशालिनी आहे. समर्थांनीं विश्वोद्धाराची चिंता केली व महाराष्ट्राचा उद्धार केला. स्वतः लग्न केलें नाहीं, पण महाराष्ट्राचा प्रपंच केला, राजकारण अचूक व यशस्वी कसें करावें हें शिकविलें, धर्मस्थापना केली व करविली, दोन तपाच्या आंत शिष्यांकरवीं स्वराज्यसुख प्रजेच्या हातीं दिलें, वंडपाखांडें मोडून शुद्ध अध्यात्म पिकविलें व श्रीरामनामगर्जनेनें सारा ब्रह्मगोळ दणाणून सोडला. याप्रमाणें महाराष्ट्रीय जनतेच्या उद्धारार्थ यशस्वी कार्य करून सज्जनगडावर आपल्या वयाच्या ७३ व्या वर्षीं शके १६०३ सालीं माघ वद्य ९ स शनिवारीं देह ठेवला. श्रीसमर्थचरणीं माझे अनंतानंत प्रणाम असोत.

४ श्रीसमर्थांची समग्र कविता ह्या ग्रंथांत आली आहे, किंबहुना कोणत्याही एका ग्रंथांत आली आहे असें म्हणणें धाडसाचें होईल. समर्थांचा कवितासमुद्र अफाट आहे. तोफेचा गोळा गुटावा किंवा मारुतिरायानें बालपणींच सूर्यबिंबावर झांप टाकावी त्या जातीची स्फूर्ति (पृ.४६६) त्यांनीं रामरायापाशीं मागून घेतली होती. त्यांची वाणी सहजस्फूर्तीची महाप्रासादिक

आहे, तिचा ओघ स्वतंत्र आहे. तिचा थांग कोणास लागावा ? ज्याचें चित्त जेथें लगटलें, ज्याच्या जें हातीं आलें अगर ज्यानें जें प्रयासानें लिहून घेतलें, तेवढ्यावरच तो डुलत राहिला. श्रीसमर्थांच्या हयातींत अनेक शिष्यांनीं त्यांची कविता लिहून घेतली होती. तिच्या प्रति उपप्रती महाराष्ट्रांत पसरल्या होत्या. आमच्या लोकांनीं स्वतंत्र छापखाने काढून साधुसंतांचे ग्रंथ प्रसिद्ध करण्यास खरा आरंभ केला इ. स. १८५४ नंतर ! श्रीदासबोधग्रंथ प्रथम इ. स. १८६० च्या सुमारास प्रसिद्ध झाला. त्यानंतर मनाचे श्लोक, आत्माराम, पंचसमासी, रामायणें इत्यादि त्यांचे लहान मोठे ग्रंथ प्रसिद्ध होऊन लोकांच्या हातीं पडूं लागले. ज्याच्या हातीं ज्या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती आल्या त्या कोणाच्या, त्यांचा लेखक कोण, त्या कधीं नकला केल्या गेल्या, त्यांना प्रामाण्य कितपत द्यावयाचें, याचा कांहीं शोध किंवा विचार त्यावेळीं झाला नाहीं. ४०।४५ वर्षें हा क्रम चालला. या काळांत ' रामदास स्वामींचे समग्र ग्रंथ ' ही छापून लोकांच्या हातीं पडले. सांप्रदायिकांत किंवा इतर वाचकांत छापील ग्रंथ वाचण्याचा प्रघात जारीनें झाला. पुढें चिकित्सकबुद्धीचा देशांत उदय होऊन धुळ्याचे रा. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं कल्याणस्वामींच्या डोमगांव येथील मठांतून स्वामींच्या हातची अस्सल प्रत मिळविली व छापील प्रतीशीं ती ताडून पाहतां छापील प्रतींतील शेंकडों पाठ चुकीचे आहेत असें त्यांस आढळून आलें, तेव्हां मूळाप्रमाणें दासबोधाची प्रत शुद्ध करून घेऊन इ. स. १९०५ मध्यें त्यांनीं दासबोधाची शुद्ध प्रत छापून सटीप वाचकांचे हातीं दिली. या प्रतीच्या गेल्या २० वर्षांत पांच आवृत्त्या निघाल्या. कल्याणस्वामींचे बंधु दत्तात्रय महाराज यांच्या हातची अशीच एक शुद्ध प्रत ग्वाल्हेरीस त्यांच्या वंशजांच्या मठांत आहे हें कळल्यावरून इ. स. १९२२ मध्यें मी ग्वाल्हेरीस गेलों. कल्याणस्वामींच्या मूळ प्रतीशीं ती ताडून पाहिली, तेव्हां दोनी प्रती सारख्याच शुद्ध आहेत, मात्र दोहींत कांहीं पाठभेद व लेखनभेद आहेत, असें आढळून आलें. डोमगांवची कल्याण स्वामींची प्रत व ग्वाल्हेरची दत्तात्रय महाराजांची प्रत ह्या दोन्ही प्रती अत्यंत शुद्ध आहेत. दोन्ही प्रती नीट पाहून इ. स. १९२३ सालीं मी ' **सार्थ श्रीदासबोध** ' प्रसिद्ध केला इ. १९२४ सालीं ' **सार्थ व सटीप मनोबोध** ' उर्फ मनोबोधाचे श्लोक व ' **समर्थसंजीवनी** ' उर्फ रामदासी वेंचे ही दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं. हे तीनही ग्रंथ चांगले लोकप्रिय झाले आहेत. इ. स. १९२७ सालीं प्रस्तुतचा ' **श्रीसमर्थग्रंथभांडार** ' हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे. श्रीसमर्थांचें चरित्र व त्यांच्या एकंदर बोधाचें तात्पर्य किंवा तत्वज्ञानाचा अर्क काढून तो वाचकांच्या हातीं देऊन ह्या ग्रंथपंचकानें श्रीसमर्थसेवा करण्याचा बहुत वर्षांचा माझा मनोरथ आहे तो सफल करणार श्रीसमर्थ समर्थ आहेत.

५ आतां प्रस्तुत ग्रंथाचें प्रयोजन थोडक्यांत सांगतों. ह्या ग्रंथांतलीं सारीं दिव्य सुमनें समर्थांच्या ज्ञानभक्तिप्रतापानें पावन झालेल्या मनोभूमींत उगवलीं आहेत. त्यांचा परिमळ आज तीनशें वर्षें महाराष्ट्रांत दरवळून राहिला आहे. तीं त्यांनीं जनीजनार्दनाला समर्पिलीं आहेत व जनीजनार्दनानें वंदून शिरोधार्य केलीं आहेत. मी येथें केवळ माळ्याचें काम करीत

आहे. हीं मी नवीन शोधून काढिलीं नाहींत. अनेक माळ्यांनीं आजवर आपापल्या बागांत तीं लाविलीं आहेत. अनेक बागवानांच्या बागांत स्वानंदानें हिंडत फिरत त्यांचा परिमळ मी तीन तपें घेतला आहे. त्या सर्व बागवानांचे फार उपकार आहेत. ह्या माळीदादांनीं आपापल्या बागांतून मला यथेच्छ हिंडूं फिरूं दिलें याबद्दल त्यांचा मी अत्यंत ऋणी आहें. सर्वांत विशेष आभार धुळ्याचे शंकरमाळी यांचे मानले पाहिजेत. मोठे कष्टसायास घेऊन त्यांनीं मूलस्थानांतून कित्येक सुंदर रोपें आपल्या बागेंत लावून आपल्या बागेचें ऐश्वर्य वाढविलें आहे. पूर्वींच्या बागांतलीं कित्येक रोपें त्यांच्या बागेंत लावलीं गेलीं नाहींत व त्यांच्या बागेंतलीं कित्येक रोपें जुन्या बागेंत आढळत नाहींत. मी सर्वांच्याच बागा धुंडल्या व त्या सर्वांतील बहुतेक सर्व सुंदर रोपें आणून येथें व्यवस्थितपणें हारीनें लावलीं आहेत. हीं रोपें सतरा रांगांत लाविलीं असून हीं नित्य विकासलेलीं आहेत, सदाफुलीच म्हणांना ! कोणत्याही रांगेंत जा, सुमनांचा परिमळ दाही दिशा पसरलेला आहे. कोठें ज्ञानाचा पारिजात आढळेल, कोठें भक्तीचा मकरंद ओसंडतांना दिसेल, कोठें कर्तृत्वाचा हिरवा चांफा फुललेला सांपडेल! संसारी, व्यवहारी, व त्यागी सर्वांचेंच मन आकृष्ट होईल असा या श्रीसमर्थांच्या पुष्पवाटिकेचा थाट आहे. या वाटिकेंत विवेक-वैराग्याचे गगनचुंबित वटवृक्ष आहेत, भक्तिप्रेमरसानें ओथंबलेले आम्र आहेत, प्रयत्नपुरुषार्थाचे पनस आहेत. सर्व वृक्षवल्लींना उपासनेच्या कालव्याचें पाणी पुरवलें आहे. ह्या वृक्षवल्लींच्या सुखकर शीतल छायेंतून फिरणाऱ्यांच्या अंगीं भगवत्प्रेम, ज्ञानवैराग्य हे संचरूं लागतात. ह्यांत नाहीं असें कांहीं नाहीं, सर्व कांहीं आहे. ह्या वाटिकेंत फिरणाऱ्या रोग्यांना आरोग्य मिळतें, उत्साहबल अंगीं येतें, कर्तृत्व स्फुरतें, भक्तिज्ञानवैराग्यानें अंतरात्मा प्रसन्न होतो, तात्पर्य ' चढे ज्ञान, वैराग्य सामर्थ्य अंगीं । म्हणे दास विश्वासतां मुक्ति भोगी ! '

६ आतां प्रस्तुत ग्रंथाचें स्वरूप संक्षेपानें पाहूं. प्रथम (१) **एकवीस समासी जुना दासबोध** दिला आहे. त्यांतील चारपांच समास दासबोधांत आले असले तरी बाकीचे समास अत्यंत सरस आहेत. दुसऱ्या व चौथ्या समासांत सगुणप्रेमाचें गोड वर्णन आहे:—

**रामचंद्रा ! तुझा वियोग । नको नको रे तो प्रसंग ।**
**तुजकारणें सर्व संग । त्यक्त केला ॥**
**रामा ! तुझिये स्वामीपणें । मी हें ब्रह्मांड मानीं ठेंगणें ।**
**स्वामी ! तुजविण कोण जाणे । अंतर आमुचें ॥**

* * * *

**एका भावार्थासाठीं । देव लागे भक्तांपाठीं ।**
**भाव नसतां जगजेठी । प्राप्त नाहीं ॥**

तिसऱ्या समासांत श्रोत्यावक्त्यांचे गुणावगुण सुरेख सांगितले आहेत. निरभिमान शांति, संतस्तवन, मीपणानिरसन सर्वच समास बहारीचे आहेत

**श्रीराम जयराम जयजयराम । ऐसा कांहीं एक करूनियां नेम ।**
**जप-कीजे तेणें आत्माराम । जोडेल नियमें ॥ ३८ ॥** ( स० १५ )

**रामासि इतुकें मागावें । जे आपण रामचि व्हावें ।**
**कां रामासी दास करावें । आपणाऐसें ॥ १ ॥** ( स० १६ )

**जें शास्त्रमुखें ऐकिलें । तेंचि गुरुमुखें दृढ जालें ।**
**आणि आपुल्याही आलें । अनुभवासी ॥ ३२ ॥**

**तिहींची खूण बाणली । विचारितां एकचि जाली ।**
**तयासीच फावली । शाश्वत सद्गुरुकृपा ॥ ३३ ॥**

**आपण करून दाखवावें । तरीच दुसऱ्यासी सांगावें ।**
**ठाकेना तरी राहावें । भलेसें आपुले ठायीं ॥ ६८ ॥**

**म्हणोनी आपण क्रिया करावी । मग पुढिलांसी नलगे सांगावी ।**
**तुझी क्रिया देखोनि जीवीं । तेही तैसी करितील ॥ ७१ ॥**(स० १७)

**सांडोनि प्रपंच सोहळा । परमार्थ दाखवावा आगळा ।**
**दीन देखोनि कळवळा । आला पाहिजे ॥ ४८ ॥** ( स० १८ )

**एवं शुद्धक्रिया ते प्रमाण । नसतां सर्वही अप्रमाण ।**
**जैसें युद्ध केलियाविण । शूरत्व नाहीं ॥ १९ ॥** ( स० २० )

**जेणें जिवावरी उठावें । तेणें आनंदासी लुटावें ।**
**आनंदभोग लुटोनि असावें । कल्पकोटी ॥ ४७ ॥** ( स० २१ )

अशीं असंख्य विचाररत्नें दासबोधासारखींच ह्या जुन्या दासबोधांतही इतस्ततः विखुरलेलीं आहेत. दासबोध व जुना दासबोध हे ग्रंथ पाहिल्यावर यांतीलच विचार अत्यंत सुलभ वाणीनें सांगितलेले ( ३ ) **अकरा ' लघु अध्यात्मप्रकरणांत '** पहावेंत. हीं प्रकरणें किती गोड आहेत म्हणून सांगावें ? अंतर्भाव, पंचसमासी, पंचीकरणयोग, चतुर्थमान, मानपंचक, पंचमान, आत्माराम व मनोबोध हीं प्रकरणें पुनः पुन्हा पाहत असतांही तृप्ति होत नाहीं. ' अंतर्भाव ' प्रकरणांत नित्यनेमाची, व पंचसमासींत साधनाची महती यथायोग्य वर्णिली आहेः—

**जें शास्त्र बाह्य घडलें । संतांमहंतांसी बिघडलें ।**
**तें ज्ञानचि-परी पडलें । पाषांडमतीं ! ॥** पंच० १–२२ ॥

**साधनेंविण ब्रह्मज्ञान । तेणें उडे समाधान ।**
**अंगी जडे देहाभिमान । वाचाळपणें ॥** पंच० ३–१३ ॥

**भक्तीवीण जें ज्ञान । तेंचि सोलीव अज्ञान ।**
**तेणें कांहीं समाधान । होणार नाहीं ॥ १७ ॥**

**श्रवण करावे तेचि ग्रंथ । जेथें बोलिला परमार्थ ।**
**शृंगारश्रवणीं अनर्थ । नेमस्त आहे ॥ ४–८ ॥**
**नाना कथाचमत्कार । नवरसिक अपार ।**
**तें त्यजूनियां सार । अद्वैत ध्यावें ॥ पंच० ४–९ ॥**

अज्ञलोक साधूंच्या नुस्त्या चमत्कारांवर लुब्ध होतात व खरें साधुत्व पाहत नाहींत हें ' जनस्वभावगोसावी ' म्ह० अज्ञानजनांच्या दृष्टीचे साधु ह्या प्रकरणांत सांगितलें असून शेवटीं ' पदार्थज्ञानाचा वडिवार त्याहून थोर ईश्वर ' असा सिद्धांत केला आहे. ' पंचीकरण योगांत ' संक्षेपानें पंचीकरण सांगितलें असून देवालयें सांडून त्यांतला देव ( अंतरात्मा ) पहा; गृह सांडून गृहस्वामीस ओळखा, असा उपदेश केला आहे. चतुर्थमानांत अंतरात्मादेव व निर्गुण ब्रह्म यांची ओळखण दिली असून जाणतेपणावांचून, अर्थरूप होऊन गेल्यावांचून, गायनीं विद्या, वक्तृत्व व श्रवण व्यर्थ आहे असें सुंदर दृष्टांतांनीं सांगितलें आहेः—

**अभ्यास वाढवावा रे । इहलोकपरत्रिचा ।**
**जाणते नेणते राजी । राखावे बहुतापरी ॥ २–७ ॥**
**कर्कशें भुंकती श्वानें । तैसें वाक्य करूं नये ।**
**सर्वांशीं मृदु बोलावें । चालावें सर्वमान्यसें ॥ ३–८ ॥**
**गुण देखोनि लोधावें । वेधावें उत्तमा गुणा ।**
**जयाचे त्या रिती जाणें । धन्य तो जाणता गुणी ॥ ९ ॥**
**अर्थपुष्ट बरें गाणें । नाचणें समजोनियां ।**
**उगेंचि भुंकणें खोटें । गधडे भुंकती जसे ॥ ११ ॥**
**प्रेमप्रबंदही नाहीं । ज्ञान ध्यान असेचिना ।**
**कळाही पुरती नाहीं । तें गाणें श्रम वाढवी ॥ १२ ॥**
**मापटें मोजितें दाणे । तैसे शीकोन गातसे ।**
**अत्यंजें वाहती द्रव्यें । अर्थसंबंध नाढळे ॥ ११ ॥**
**उमजणें समजणें आधीं । प्रवृत्ति निवृत्तीकडे ।**
**भाग्यश्री मोक्षश्री होते । विवरतां विवरतां पुढें ॥ २५ ॥**
**अर्थ सर्वत्र शोधावा । रोधावा आपुला मनु ।**
**लोक सर्वत्र बोधावा । यथातथ्य प्रचीतिनें ॥ ४–६ ॥**

**मानपंचक** सर्वच बहारीचें असून पंचमानही तसेंच सुंदर आहे. मानपंचकाच्या पहिल्या मानांत रामराज्याचें मनोहर वर्णन आहे व असें रामराज्य पाहिजे तर आचारधर्म व उपासना वाढवून धर्मस्थापना केली पाहिजे असें ' धर्मस्थापनेसाठीं कर्मकांड उपासना ' या शेवटल्या चरणांत म्हटलें आहे. आचारधर्म आणि उपासना वाढविण्यासाठींच साधुसंत एवढा कां अट्टहास करितात तें यावरून समजेल.

**आधीं तें करावें कर्म । कर्ममार्गें उपासना ।**
**उपासकां सांपडे ज्ञान । ज्ञानें मोक्षचि पावणें ॥**

अभेदभक्ति सांगतांना ‘ जना आणि सज्जनाला ’ म्ह० संसारी व संत हे एकाच हारींत वसवूं नयेत; देवदैत्य, वंद्य निंद्य, असा भेद चालायचाच—मात्र भेदांत अभेद आत्मा पहावा असें म्हटलें आहे. अद्वैतज्ञानाच्या जोरावर एकंकार करूं नये असें समर्थांनीं अनेक ठिकाणीं सांगितलें आहे.

**भेदाभेद क्रिया देहीं । लागली हे सुटेचिना ।**
**जेथील विषयो तेथें । विपरीत करितां नये ॥**
**समान देखणें आत्मा । समान करणें दया ।**
**वंद्य निंद्य विचारावे । हे मुख्य जाणती कळा ॥**

मानपंचकांतील चवथें आणि पांचवें मान ( प्रमाण, समास ) हे नित्य जिव्हाग्रीं ठेवून त्यांतील बोध आचरणांत उतरावा. रामाच्या उपासनेनें मी कृतार्थ झालों असें म्हणून उपासनेचें वर्म समर्थ सांगतातः—

**कास या रघुनाथाची । धरितां सुख पावलों ।**
**इतर कष्टती प्राणी । थोर संसार सांकडीं ॥ १ ॥**
**सांकडीं तोडिलीं माझीं । राघवें करुणालयें ।**
**पूर्वींच तुटली माया । दुःखशोक विसंचला ॥ २ ॥**
**सेवकू मानवीयांचे । कष्टती बहुतांपरी ।**
**सेविला देव देवांचा । तेणें मी धन्य जाहलों ॥ ३ ॥**
**कुळ या जगदीशाचें । धन्य वंश भुमंडळीं ।**
**आपली वाटती सर्वें । धन्य तूं गा रघूत्तमा ॥ ७ ॥**
**राम उपासना ऐसी । ब्रह्मांडव्यापिनी पहा ।**
**राम कर्ता राम भोक्ता । रामरूप वसुंधरा ॥ १७ ॥**

उपासनेचें रहस्य उमगलें कीं ‘ शत्रु मित्र देव जाला ’ ‘ नित्यदर्शन देवाचें । चालतां बोलतां घडे ’ हा अनुभव येतो. मानपंचकाच्या शेवटल्या समासांत उपासनेनें कृतार्थ झालेला पुरुष लोकांत कसा वागतो किंवा त्यानें कसें वागावें हें फार उत्तम प्रकारें सांगितलें आहे. ‘ दुःख जाणे पराव्याचें ’ ‘ दुःख वाटून तें घ्यावें ’ ‘ न्याय अन्याय सोसावा । सोशितांही विटों नये ’—तात्पर्य ‘ क्षमून हितकर्ता जो । तोचि गंभीर जाणता ! ’ लोकसंग्रह त्यालाच होतोः—

**सांगणें नीतिन्यायाचें । मानावें बहुतापरी ।**
**सर्वत्र मान्य तो ज्ञाता । प्रत्ययें बोलतो खरें ॥ १० ॥**
**न्यायअन्याय तो जाणे । अन्याय न करी कदा ।**
**नीतिन्यायें मिळों जाणे । तोचि तो लोकसंग्रही ॥ ११ ॥**

**मनेंचि पारखी लोकां । परंतु नोबले कदा ।**
**जाणते मिळती तेथें । नेणते वास पाहती ॥ ११ ॥**
**जाणत्या नेणत्या लोकां । प्रसंगें वर्तवी जगीं ।**
**सामान्य तो नव्हे कांहीं । सर्वांसी पाहिजे सदा ॥ १४ ॥**
**प्रबोध जाणिजे ऐसा । आधीं प्रपंच शोधणें ।**
**अरत्र मानतां लोकां । परत्र सहजीं घडे ॥ १५ ॥**
**अंतरें निवऊं जाणे । जाणे जयातयापरी ।**
**धरावें अंतरें लोकां । बाह्यात्कारीं धरेतिना ॥ १६ ॥**
**कर्म ऊपासना राखे । राखे वैराग्य आदरें ।**
**ज्ञान तें प्रत्ययें राखे । नित्यानित्यविचारणा ॥ २१ ॥**
**प्रबोध लागतां लोकीं । नेमस्त सुटिका घडे ।**
**पावनु तोचि तो एकु । बद्ध लोकांसि सोडवी ॥ २३ ॥**

लोककल्याणकारी महंत किंवा पुढारी कसा असावा याचें हें उत्कृष्ट चित्र आहे. हा उपदेश समर्थांनीं अनेक ठिकाणीं केला आहे. ह्या अतीत सुंदर मानपंचकाप्रमाणेंच ‘ पंचमान ’ हेंही पाहावें. याच्या चौथ्या मानांत भाविक व विवेकी यांची तुलना मोठ्या मौजेनें केली आहे, पांचव्यांत ‘ ज्ञानें त्रैलोक्य चालतें ’ हें सांगून प्रचीत–प्रत्ययानें ज्ञान घ्यावें असें उपदेशिलें आहे. मनोबोधाचे श्लोक शेवटीं दिले असून हा लघु अध्यात्मप्रकरणांचा तिसरा भाग पुरा केला आहे. ‘ सार्थ व सटीक मनोबोध ’ ह्या स्वतंत्र ग्रंथांत मी सर्व विचार सांगितला असल्यामुळें वाचकांनीं तो ग्रंथ अवश्य पाहावा. त्यांत मनाचें स्वरूप काय, मनालाच बोध कां केला, याचा विचार केला असून मनोबोधांतील श्लोकांची संगति लावली आहे व श्लोकांचें वर्गीकरण करून त्रिवेकवैराग्य ( १–२७ ), राघवाचा पंथ–सगुणोपासना ( २८–१३५ ), राघवाचा पंथ–निर्गुणबोध ( १३६–१७४ ), सगुणनिर्गुणातीत शुद्धस्वरूप ( १७५–२०१ ) व उपसंहार ( २०२–२०५ ) अशा क्रमानें श्लोकांचा सविस्तर अर्थ दिला आहे. ‘ हे श्लोक म्हणायला गोड, पाठ करायला सोपे, ऐकायला मधुर, मननाला सुखशांतिदायक असे आहेत. हे श्लोक सहज गुणगुणतां गुणगुणतां पाठकाला पूर्ण बोधाच्या महानंदांत अचानक नेऊन सोडतात. मनोबोध हें मराठी भाषेंतलें एक उपनिषदच आहे. हे श्लोक आत्मनिष्ठ महापुरुषाचे स्वैरालाप असून यांत साराश्रुत्यर्थ उमटला आहे. उपासनेची ज्ञानाशीं मिठी पडल्याचा जो अनिर्वाच्य स्वसुखानुभव यांत उमटला आहे त्यामुळें ह्या श्लोकानां अवीटपणा आला आहे ’ असें मी त्याच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. असो. दासबोध, जुना दासबोध, व हीं अकरा लघु अध्यात्मपर प्रकरणें यानंतर ( ४ ) **समर्थांचें रामायण** दिलें आहे. समर्थांनीं संपूर्ण रामायण मराठींत गायिलें नाहीं तर उपासनेच्यादृष्टीनें त्यांना विशेष प्रिय असलेलीं, मारुतिरायाच्या पराक्रमांनीं भरलेलीं, अशीं सुंदरकांड व युद्धकांड अशीं दोनच कांडें घेतलीं आहेत. वाल्मीकिरामायण त्यांना अत्यंत प्रिय होतेंच, तेव्हां त्यानीं स्वतंत्ररामायण न रचितां

मारुतिरायाचें चरित्र गाण्याच्या उद्देशानें उपयुक्त दोनच कांडें घ्यावींत हें साहजिक आहे. देवादैत्यांच्या युद्धांत भगवान् देवांचा पक्ष घेतात, देवांचा बंद सोडतात, दैत्यांचा संहार करितात व धर्मसंस्थापना करितात असें त्यांनीं आपलें विरुद्ध भगवद्गीतेंत सांगितलें आहे. या बिरुदाप्रमाणें त्यांनीं रामावतारीं विबुधांचा पक्ष घेऊन दैत्यांस मारून काढलें हा प्रोत्साहक कथा भाग महाराष्ट्रीय जनते पुढें ठेवण्यांत समर्थांचा दुसरा ही हेतु असेल, नाहीं कोणी म्हणावें ? समर्थकृत ह्या रामायणाची भाषा मारुतिरायांच्या पराक्रमाला साजेशी खणखणित व ओजोगुणविशिष्ट आहे. हें रामायण वीररसात्मक आहे. सुष्टांच्या कैवारानें खवळलेला प्रभु रिसामर्कटांतही आपलें तेजोबळ ओतून त्यांजकरवीं दुष्टांचा संहार करितो व दीन हतबल व हताश झालेल्यांना संकटमुक्त करितो, मात्र सुष्टांनीं मारुतिरायांसारखे रामाला एकनिष्ठभक्तीनें शरण गेलें पाहिजे असा ह्या दोन कांडांचा इत्यर्थ दिसतो. दुर्बळांतही बलोत्साहशक्ति उत्पन्न करणारी ही वीरभक्तिरसप्रधान कथा समर्थांनीं वीररसोचित वाणीनेंच गायिली आहे. सुंदर-कांडांतील लंकेचें वर्णन, मारुतीनें वनविध्वंस व त्रिकूटनाश केला तो भाग, व पुढील युद्ध-कांडांतील एकंदर रणवर्णनें, भरतभेटीचा प्रसंग, अयोध्यापुरीचें भाग्य व रामाची सर्वसंग्राहकता हे सर्व भाग फार रमणीय आहेत. डोंगर, दरीखोरीं, घोरवनें, प्रचंड नद्या इत्यादिकांचीं वर्णनें समर्थांनीं स्वतःच्या नित्यसंचारांत पाहिलेल्या सृष्टिप्रदेशाचींच केलेलींशीं वाटतात. असो. रामायणाचे श्लोक सुमारें १४६० आहेत. रामायणापुढें (५) **करुणास्तोत्रें** दिलीं आहेत. करुणाष्टकें यांतच अनुप्रविष्ट केलीं आहेत. ह्या सर्वांना अष्टकें म्हणवत नाहीं म्हणून व्यापक असें '**स्तोत्रें**' हें नांव दिलें आहे. ह्यांत रामभक्तीचा मधुररस ओतप्रोत भरला आहे. समर्थांची रामपायीं अत्यंत भक्तिः—

**चमत्कारलें चित्त हें रामगूणीं । उठे कीर्ति वाखाणितां प्रीति दूणी ।**
**रघूनायकासारिखा देव नाहीं । क्रिया पाहतां चोखडी सर्व कांहीं ॥**

समर्थांचीं करुणाष्टकें लोकप्रिय आहेत. 'रघूनायका मागणें हेंचि आतां' 'समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें' 'उदासीन हा काळ कोठें न कंठे' 'तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों' 'रघुनायका काय कैसें करावें' 'सर्वोत्तमा कैं मज भेटि देसी ?' 'उदासीन हे वृत्ति कोठें न लागे' 'तुजवीण रामा मज कंठवेना' इ० स्तोत्रें व 'अनुदिनि अनुतापें तापलों रामराया' आणि 'बुद्धि दे रघुनायका' हीं स्तोत्रें भाविकाच्या नित्यपाठातलींच आहेत. उपासनेनें चित्त कोमळ होतें, शुद्ध व हळुवार होतें. हीं स्तोत्रें म्हणजे मूर्त करुणरस आहे. देवाला आळवावें कसें हें समर्थांनीं ह्या स्तोत्रांच्या द्वारें लोकांस शिकविलें आहे. त्यांच्याच हृदयकपाटांतला रामभक्तीचा आनंद अनावर होऊन ह्या स्तोत्रांच्या द्वारें बाहेर पडला आहे. रामस्तोत्रानंतर (६) **भीमरूपी स्तोत्रें** घेतलीं आहेत. मारुति उपासाकांना हीं ज्ञात आहेतच.

**भीमरूपी महारुद्रा वज्र हनुमान मारुती ।**
**वनारी अंजनीसूता रामदूता प्रभंजना ॥ १ ॥**

हें सुंदर स्तोत्र कोणाला माहीत नाहीं ? हीं सर्वत्र स्तोत्रें गोड आहेत. निदान हें पहिलें व साहावें तरी सर्वांच्या पाठांत असावींत. ह्या स्तोत्रांत मारुतिरायांच्या रूपाचें, पराक्रमाचें व करुणेचें गोड वर्णन आहे. रामराय व मारुतिराय यांच्या स्तोत्रानंतर ( ७ ) **बारा ओव्या शतकें** दिलीं आहेत. तीं एकांतांत निवांतपणीं बसून आपला भक्तिभाव वाढविण्याच्या कामीं फार उपयोगी आहेत. प्रत्येक शतकांतील प्रतिपाद्य विषयाचें नांव तेथेंच दिलें असल्यामुळें हवें तेव्हां पाहिजे तें शतक काढून गुणगुणत बसावें. ह्यांतील तिसरें व चवथें शतक हीं दोन फार गोड आहेत. ज्ञानी सद्भक्त कसे वागतात हें तिसऱ्यांत सांगून चौथ्यांत उपदेश केला आहे:—

**संतसंग धरी धन्य तो संसारीं । बोलिले श्रीहरि भागवतीं ॥ १२ ॥**
**भागवत–गीतासार निरूपण । त्याचें विवरण संतसंगें ॥ ॥ १३ ॥**
**संतसंगें कळे सर्व शास्त्रभाग । आणि ज्ञानयोग अप्रयासें ॥ १४ ॥**
**आहे येक देव परी तो कळेना । जयासी मिळेना संतसंग ॥ १७ ॥**
**सर्वकाळ होय सार्थक श्रवणें । ब्रह्मनिरूपणें संतसंगें ॥ २३ ॥**
**संतांची वोळखी साधु वोळखेल । येर भांबावेल मायाधारी ॥ ५० ॥**
**सारिखाचि दिसे जनाचिये परी । परी तो अंतरीं वेगळाचि ॥ ५६ ॥**
**वेगळाचि ज्ञान पूर्णसमाधानें । स्वस्वरूपीं मनें वस्ती केली ॥ ५७ ॥**
**तया नाहीं काम तया नाहीं क्रोध । तया नाहीं खेद स्वार्थबुद्धी ॥५९॥**
**बुद्धि निश्चयाची स्वरूपीं जयाची । कल्पना ठाईंची निर्विकल्प ॥ ६० ॥**
**निरंतर भाव सगुण भजन । येणें बहुजन उद्धरती ॥ ७४ ॥**
**भक्तिभावें देवप्रतिष्ठा पूजन । कथानिरूपण महोत्साव ॥ ७७ ॥**
**लोकाचार करी तो जना उद्धरी । ज्ञाता अनाचारी कामा नये ॥८१॥**
**निंदूं नको शास्त्र निंदूं नको वेद । तरीच स्वानंद पावसील ॥ ९७ ॥**
**पावशील राम जीवांचा विश्राम । अहंतेचा श्रम सांडितांची ॥९८॥**

\+ \+ \+ \+

**स्वरूपीं आसक्ती याचि नांव भक्ति । पाहतां विभक्ति जेथें नाहीं ॥४८॥**
**जेथें नाहीं देहेबुद्धीचें अज्ञान । तया नांव ज्ञान बोलिजेतें ॥ ४९ ॥**
**येकरूप जालें भक्ति आणि ज्ञान । वैराग्यही जाण येकरूप ॥ ५५ ॥**
**बोलोनीयां मुखें तैसी क्रिया करी । धन्य तो संसारीं ब्रह्मज्ञानी ॥ ५९ ॥**
**ब्रह्मज्ञानी भला वर्तणुकेपासीं । कोरड्या शब्दासी कोण पुसे ? ॥ ६० ॥**
**कोण पुसे बापा ज्ञान हें शाब्दिक । क्रिया अमोलीक सत्य जाण ॥६१॥**
**सगुणीं आदरें देह झिजवावें । भजन करावें नवविधा ॥ ६३ ॥**
**उच्छेदित आहे भक्ति सगुणाची । वाट साधनाची मोडतसे ॥ ७४ ॥**
**मोडतो आचार कर्मकुळाचार । करी भ्रष्टाकार पापरूपी ॥ ७५ ॥**

**पापरूपी नर जाणावा साचार । करी एकंकार शब्दज्ञानें ॥ ७६ ॥**
**साधन सोडितां सिद्धपण गेलें । साधनेसीं भलें सिद्धपण ॥ ८४ ॥**
**सगुणाची सोय सांडूं नये कदा । तीर्थ क्षेत्रें सदाआवडावीं ॥ ९५ ॥**
**आचरावें कर्म ज्याचा जो स्वधर्म । आणि नित्यनेम साधनाचा ॥१००॥**

असा हा गंगेचा ओघ अस्खलित, सरळ व प्रसन्नपणें बारा शतकें सारखा चालला आहे. वाणी फार प्रसन्न व मधुर आहे. पांचव्या शतकांत नवविधा भक्ति व चतुर्विधा मुक्ति सांगितल्या आहेत. साहव्यांत आत्मज्ञानाची महती वाखाणली आहे.

**सांडूनीयां दृश्य आणि मनोभास । मग जगदीश वोळखावा ॥**
**ज्ञानमार्ग सर्व मार्गामधें श्रेष्ठ । वोलिले वरिष्ठ ठाईं ठाईं ॥**
**किंकराचा दास भूषण मिरवी । सृष्टीचा गोसावी वोळखेना ॥**

आठव्यांत सगुणनिर्गुण विवेक सांगितला आहे. ' ज्ञानेंवीण सर्व व्यर्थचि जाणावें ' पण ' ज्ञानदाता हरी मनीं दृढ धरी ! '

**सांडूं नये भक्ती स्वधर्म विरक्ती । ब्रम्हज्ञानप्राप्ती रामदासीं ॥ १०० ॥**

अकराव्याच्या शेवटीं प्रयत्नवादाचा पुरस्कार करून बाराव्यांत दैव श्रेष्ठ कां प्रयत्न श्रेष्ठ याचा निर्णय केला आहे. समर्थांनीं दैवाला थारा दिलाच नाहीं. प्रयत्न–पुरुषार्थ सर्वत्र प्रतिष्ठिला आहे.

**पाहिजे तो यत्न आदरेंसी केला । मग प्राप्तव्याला शब्द घडे ॥ ८९ ॥**

बाराव्याच्या ७५ चरणांत प्रारब्ध–प्रयत्न हे दोनी नागमोडी पद्धतीनें स्पष्ट पुढें मांडले आहेत व शेवटच्या २७ चरणांत ' आधीं जें निर्माण तेंचि थोर ' या न्यायाचा आश्रय करून प्रयत्नाचें श्रेष्ठत्व स्थापिलें आहे. ( ८ ) **अभंगांचीं पंचकें, अष्टकें, दशकें** वगैरे यापुढें दिलीं असून ३९ निरनिराळ्या विषयांवर समर्थांचे हे स्फुट अभंग झाले आहेत. हे अभंग अतिशय सोपे व मुद्देसूद आहेत. कलियुग, मूर्खपण, भ्रांति, आळस, वंधन, विवेक, वैराग्य, नीति, उपासना, भक्ति, निष्ठा, ज्ञान, ध्यान, होळी इ० विषयांवर हे स्फुट अभंग आहेत. यापुढें ( ९ ) **लघु रामकृष्णचरित्रें** व ( १० ) **रामकृष्णचरित्रशतकें** दिलीं आहेत. समर्थांची उपासना व आवड रामाची पण कृष्णाची अनावड त्यांना नव्हती. कित्येक अर्वाचीन विद्वान् राम व कृष्ण यांत भेद काढतात पण आपल्या पूर्व परंपरतें असा भेद कोणीच काढला नाहीं. 'रामकृष्ण एकरूप' हें समर्थांचेंच प्रकरण पहावें म्हणजे कोणाच्या मनांत संशय असल्यास तो दूर होईल. ह्या पुढील दोन भाग ( ११ ) **राजकारण, व राजकारणी पुरुष आणि प्रसंग** व ( १२ ) **शिवराय व त्यांचे मंत्री यांस उपदेश** ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्वाचे आहेत व तरुणांना मार्गदर्शक आहेत. प्रथम कुळदेवी तुळजाभवानीचीं आठ स्तोत्रें दिलीं आहेत. तुळजापूरची ( आणि नंतर प्रतापगडची ) भवानी देवीही समर्थांची तशीच शिवाजीमहाराजांची कुलस्वामिनी होती. भवानी देवी म्ह० मूळमाया

परमेश्वराची शक्ति. शक्तीची उपासना उद्योन्मुख राष्ट्रांनीं अवश्य केली पाहिजे. सहाव्या स्तोत्रांत समर्थ म्हणतातः--

**दुःखदारिद्र्यउद्वेगें लोक सर्वत्र पीडिले।**
**मुळीची कुळदेव्या हे संकटीं रक्षिते बळें ॥ १ ॥**
**उन्मत्त रावणें येणें त्रैलोक्य पीडिलें बळें।**
**देव ते घातले बंदीं। कै पक्षी राम पावला ॥ ४ ॥**

रावणानें सीता चोरून नेल्यावर सीताशोधार्थ रामलक्ष्मण वनांत हिंडत असतांना त्यांना आदिशक्तीनें दर्शन दिलें. यांनीं तिला वंदन केलें व माता म्हणून त्या तरुण सुंदरीच्या पायांवर मस्तक ठेवलें. ते सूर्यवंशीचे राजपुत्रः--

**नेमस्त न्यायनीतीचे करिती धर्मस्थापना।**
**परस्त्री नाणिती दृष्टी ब्रह्मचारी फणीवरु ॥ १३ ॥**

असे ते न्यायनीतिवंत राजपुत्र पाहून देवी प्रसन्न झाली. रामानें तिला 'कोण तूं काई?' म्हणून प्रश्न विचारला, तिनें 'सर्व मीच तूं काई?' असें उत्तर दिलें. 'तुकाई' प्रसन्न झाली व 'तुम्ही रावणास मारून विजयी व्हाल' असा वर दिला, म्हणून तिला समर्थांनीं 'रामवरदायिनी' म्हटलें आहे. न्यायनीतीनें चालणारा व धर्मस्थापनेसाठीं दुष्टांसीं युद्ध करणारा जो असेल त्यावर आदिशक्ति प्रसन्न होते असें या कथेचें तात्पर्य आहे. कीर्तिप्रतापयश सर्व कांहीं शक्तीवांचून नाहीं, सर्व सामर्थ्य तिचें आहे:--

**शक्तीनें पावती सुखें शक्ति नस्तां विटंबना।**
**कळा नाहीं कांति नाहीं युक्तिबुद्धी दुरावली ॥ २७ ॥**
**साजिरी शक्ति तों काया काया मायाचि वाढवी।**
**शक्ती तों सर्वहि सुखें शक्ती आनंद भोगवी ॥ २८ ॥**
**सार संसार शक्तीनें शक्तीनें शक्ति भोगिजे।**
**शक्ती तो सर्वही भोगी शक्तीवीण दरिद्रता ॥ २९ ॥**
**शक्तीनें मिळती राज्यें युक्तीनें यत्न होतसे।**
**शक्तियुक्ति जये ठायीं तेथें श्रीमंत धांवती! ॥ ३० ॥**
**युक्तीनें चालती सेना युक्तीनें युक्ति वाढवी।**
**अचूक चुकेना कोठें त्याचीं राज्यें समस्तही ॥ ३१ ॥**
**उदंड खस्तिचीं कामें मर्द मारूनि जातसे।**
**नामर्द काय ते लंडी सदा दुश्चित्त लालची ॥ ३३ ॥**
**फित्व्यानें बुडती राज्यें खबर्दारी असेचिना।**
**युक्ति ना शक्ति ना वेगीं लोक राजी असेचिना ॥ ३४ ॥**
**मूर्खांचें राज्य राहेना कोणाचें कोण ऐकतो।**
**लोकांसी राखणें राजी तें राज्य प्रबळें बळें ॥ ३८ ॥**
**बोळतां भवानी माता महींद्र दास्य इच्छिती।**
**बोलणें हें प्रचीतीचें अन्यथा वाउगें नव्हे ॥ ५१ ॥**

धर्मप्रधान राजकारणाचें मुख्य बीज ह्यांत समर्थांनीं सांगितलें आहे. शक्तीची खरी उपासना ही आहे, ही समर्थांनीं व शिवबांनीं केली. मद्यमांसपरस्त्रीसक्तता वाढविणारा घाणेरडा शाक्तपंथ कोणीकडे व हा शक्तिउपासकांचा हा शुद्ध पंथ कोणीकडे ? स्वर्ग आणि नरक यांच्याइतकें या दोहींत महदंतर आहे. सातवें स्तोत्रही असेंच बहारीचें आहे. प्रतापगडीं नवस फेडण्याकरितां समर्थ गेले होते त्यावेळीं हें स्तोत्र केलें आहे. देवीच्या कृपेनें जन्मसाफल्य झाल्याबद्दलचा आनंद त्यांत व्यक्त केला आहे:—

**वैराग्य घेतलें पोटीं सर्व संसार सांडिला ।**
**तुझिया दर्शना आलों कृपादृष्टी नवाजिलों ॥ ४ ॥**
**संसारीं मोकळें केलें आनंदीं ठाव दीधला ।**
**तोडिली सर्वही चिंता तूं माता सत्य जाहलें ॥ ६ ॥**
**सदानंदीं उदो जाला सुखसंतोष फावला ।**
**पराधीनता गेली सत्ता उदंड चालिली ॥ ८ ॥**
**तुझेंचि तुजला दिल्हें म्यां हें कोठोनि आणिलें ।**
**संकटें वारिलीं नाना रक्षिलें बहुतापरी ॥ १५ ॥**
**येकची मागणें आतां द्यावें तें मज कारणें ।**
**तुझा तूं वाढवी राजा सीघ्र आह्मांचि देखतां ! ॥ १७ ॥**
**दुष्ट संहारिले मागें ऐसें ऊदंड ऐकतों ।**
**परंतु रोकडें कांहीं मूळ सामर्थ्य दाखवी ! ! ॥ १८ ॥**

शिवरायाविषयींचें समर्थांचें अंतस्थ प्रेम १७ व्या पद्यांत किती हृद्यपणानें प्रगट झालें आहे ! असो. बाकीच्या स्तोत्रांतून भगवतीच्या आध्यात्मिक मूळस्वरूपाचें वर्णन व स्तवन आहे. पुढील २८ प्रकरणांत राष्ट्रकार्य करणाऱ्यांना धीर उत्साह देऊन निश्चित मार्ग दाखविला आहे.

**भाग्यासी काय उणे रे यत्नावांचूनि राहिलें ।**

यत्न न करितां–' करंटे मिळाले सर्वे जो तो बुद्धीच सांगतो ! '

**सांगावें तें आपणाला आपणु करितां बरें !**

आधी एकांतीं बसून विचार करावा. नीतिन्यायानें व सत्यानें वागण्याचा निश्चय करावा. परोपकारांत कायावाचामन राबवावें.

**नित्य नूतन हिंडावे धुंडावे भक्त प्रेमळ ।**
**सवत्र लोक शोधावे बोधावे भक्तिच्या गुणें ॥**

' वादवेवाद तो खोटा ' त्यांत सांपडूं नये.

**भक्तीस लोक लावावे पावावे परपार ते ।**

देवाचें कार्य समजून निस्पृह व निर्लोभ होऊन लोक राजी राखून वागावें. देवाचें वैभव वाढवावें, दास्य तेवढें आपणांकडे घ्यावें. कामी निकामी सर्व लोकांस ओळखून ज्याचे त्यापरी कामास लावावे. शहाणपणाचा अभ्यास करावा. जाणत्याचे गुण घेऊन ते जगांत पसरावेत. आळस दवडून लोकांस कर्तृत्वस्फूर्ति द्यावी. प्रयत्नपुरुषार्थ वाढवावा:—

**वन्ही तो चेतवावा रे चेतवीतांचि चेततो ।**
**विवेक जाणिजे तैसा वाढवीतांचि वाढतो ॥**

**केल्यानें होत आहे रे आधीं केलेंचि पाहिजे ।**
**यत्न तो देव जाणावा अंतरीं धरितां बरें ॥**

अचूक यत्न तो देव. लोक राजी राखावे. निंदा घातक आहे. जग जगदीशाचें आहे. जन बोळले कीं अंतरात्माच प्रसन्न झाला.

**स्तवावे बहुतां लोकां मानावे बहुतापरी ।**
**विध्युक्त विश्व वंदावे निंदा हे आत्मघातकी ॥**

जाणत्यानेणत्यांमध्यें नेणतेपण धरावें. 'शिकले शब्द ते थोडे' चालतील पण 'जिव्हाळा पाहिजे बहु.' जिव्हाळा—कळवळा हवा.

**जीवांत जीव घालावा चालावा भक्तिमार्ग हा ।**
**सर्वही पेरणें विद्या लोकांमध्यें हळुहळु ।**
**नेणते जाणते करणें कथानीरूपणें सदा ॥**

प्रेमानें लोकांना आपलेसें करावें म्हणजे मग ते आपलें ऐकतात. प्रसंग तुफान आहे म्हणून सावध व्हा. प्रयत्न कराल तेवढा लाभ होईल. लोकांस रामोपासनेला लावा, सर्व कांहीं होईल.

**करील व्याप तो भला बहुत भाग्य लाधला ।**
**नसेल व्याप तो हळू पडेलरे पळुपळु ॥**

'कठिण काळाला भिऊं नका' ( १७ ) कां कीं 'काळ कोणाचाही एक रूप राहत नाहीं' ( २७ ) तुह्मी मात्र आपसांतले 'कलह व पक्ष भेद मोडून अनन्य भक्त व्हा' ( १८ ) हीं ३ प्रकरणें सांप्रतकाळींही बोधप्रद आहेत. भाग्य व दारिद्र्य यांचें रहाटगाडगें सारखें फिरत आहे:—

**सभाग्य रावणादिकां बहु कठीण काळ कां ? ।**
**महीवरी परोपरी उदंड हे भरोवरी ॥**
**भरे सवेंचि मागुतें उगेंचि होतसे रितें ।**
**कदापि नावरे जना बरी करा विवंचना ॥**
**नदी भरोन वोहटे तळें भरोन तें फुटे ।**
**तयापरीच संपदा जनीं न निश्चळे कदा ॥**

* * * *

**धरून पक्ष काय रे उपाय तो अपाय रे ।**
**तुह्मी तुह्मांस वीवरा स्वहित तें मनीं धरा ॥**
**प्रकृतिमूळ भांडणें कळहो उदंड मीपणें ।**
**अहंमती विरेचिना तरी कळहो सरेचिना ॥**
**जनीं उदंड पाहिले कळहो करीत राहिले ।**
**अनन्य देव भेटला कळहो तयासि तूटला ! ॥**

सगळेच शाहणे झाले म्हणजे एखादा महात्मा मार्गदर्शक भेटला तरी त्याचें ते चालूं देत नाहींत ! तो सत्य सांगेल तें ते असत्य ठरवितात, तो स्वधर्म सांगेल तो अधर्म मानतात, त्यानें अमृतचषक हातीं ठेविला तरी तो या अहंकारी कावळ्यांस काय होय ? म्हणून 'अनेक पक्षांध लोकांत एक जाणता काय करील ?' ( १९ )

**बहुत लोक नेणता करील काय जाणता ?**
**करील कार्य तो भला बहू चकीत येकला ? ॥**

तात्पर्य अहंकारानें उत्पन्न होणारे पक्षभेद टाकून अंतरांतून एक व्हा. बाह्यात्काराचें ऐक्य काय कामाचें ? ( २० )

**तनासि भेटली तनें मनास चूकलीं मनें ।**
**चुकी चुकी बहू चुकी परस्परें चुकामुकी ॥**
**मढ्यास भेटलें मढें करील काय बापुडें ! ।**
**मनें मनाचिया खुणा बुझेल लोभ त्याहुणा ॥**
**उगेंच वेचलें वयें मनास भेटतां नये ।**
**मनें मनास राखणें सुखें सुखास चालणें ॥**

ह्याच भावार्थाचीं ' परांतरासि राखणें ' ( २२ ), ' मनें मनासि मीळणी ' ( २४ ), ' जिवीं जिवाचिया खुणा ' ( २५ ), ' परांतरासि जाणणें ' ( २८ ) हींही प्रकरणें आहेत. समर्थांनीं राजकारणाचें अचूक महासूत्र येथें सांगितलें आहे. 'मनोगतेंचि बोलणें मनोगतेंचि चालणें' हें सर्वांचें मनोगत हातीं घेण्याचें सूत्र राजकारणाचा केवळ प्राण आहे. शिवराय व मंत्री यांस प्रासंगिक उपदेश—या सदराखालीं १० प्रकरणें येतात. क्षात्रधर्म, राजधर्म, सेवकधर्म, सावधानता प्रकरण, शिवरायांच्या गौरवाचीं दोन प्रकरणें, संभाजीस पत्र व अत्यंत बहारीचें ' आनंदवनभुवन ' हें शेवटचें प्रकरण हीं सर्व महत्वाचीं प्रकरणें मूळांतच वाचलीं पाहिजेत. येथें त्यांचा विस्तारपूर्वक विचार करावयास सवड नाहीं. **आनंदवनभुवन हें महाराष्ट्रीयांचें राष्ट्रीय स्तोत्र आहे.** राष्ट्र कार्य करणाऱ्या महापुरुषानें कार्य यशस्वी झाल्यावर स्वमुखानें हें गायिलें आहे. **( १३ ) तेरावा भाग प्रासंगिक प्रकरणांचा** आहे. त्यांतील बागप्रकरण व कारखानेंप्रकरण पाहून समर्थांच्या व्यापकबुद्धीचें कौतुक वाटतें, बाकी ज्या बुद्धीनें परमात्मपद गांठलें व सगळा महाराष्ट्र एकवटला त्याबुद्धीला या व्यावहारिक बाबी म्हणजे कांहीं विशेष आहेत असें नाहीं. **( १४ ) श्लोकबद्ध विविध प्रकरणें** हीं नांवाप्रमाणेंच विविध आहेत. हीं एकंदर ४८ आहेत. ' व्यर्थ संसार जातसे ' ( २ ). व धन्य संसार होतसे ' ( ३ ) ही जोडी पहावी. तशीच ' रडक्यांचा रडका संसार ' ( २१ ) व ' जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ' ( ३४ ) यांतला सभाग्यांचा आनंदरूप संसार ही ही जोडी पहावी ! देवासाठीं संसार सोडावा हें तर ठीकच, पण संसार सुटत नाहीं तोंवर तो रडकेपणानें करावा हेंही त्यांना मान्य नाहीं. कोणत्याच कामांत गबाळेपणा समर्थांना नको होता. त्यांनीं करंट्यांचा निषेध करून सभाग्यांना धन्यवाद दिला आहे. पांचवें प्रकरण ' देहदेवालयांतला ' देव ' सुरेख आहे. ' देहदेवालयांमध्यें पाहणें देव तो बरा ' ही त्यांत मुख्य शिकवण आहे. देव सांडून देवालयें पाहूं नका. ' देवालयें अनेक पण देव एकच आहे, देवालयें पूजिलीं कीं देव संतोष पावतो, तात्पर्य बाह्य स्थूलापेक्षां आंत लक्ष पोंचवा, अंतरात्म्याची प्रसन्नता जोडा, असा यांत मुख्य उपदेश आहे. ' अनुतापयुक्त प्रार्थना ' ( ६ ) व ' देवाभक्तांची अन्योन्य-प्रीति ' ( ७ ) हीं दोन्ही प्रकरणें फार गोड आहेत, हीं प्रेमळांच्या हृदयांस हालवतील—' निरंजन देव ' ( ११ ) व ' कर्ता देव ' ( १२ ) हीं विचारास प्रेरणा देणारीं आहेत. समर्थांना गायनकलेची

उत्कृष्ट माहिती होती व स्वाभाविक आवडही होती असें त्यांच्या अनेक उल्लेखांवरून व पदपदांतरांवरून दिसतें. ह्या दृष्टीनें ' गायनी विद्येचें ' ( १३ ) त्यांनीं गौरव केलेलें पहावें. लौकिकांतली ' मत्री कशी स्वार्थी असते हें १५ प्रकरणांत पहाः—

**माझें माझें तुझें माझें ऐसी हे मैत्रिकी जनीं।**
**माझें तुझें तुझें तूझें ऐसें हें न घडे कदा ! ॥ १ ॥**
**आशेची मैत्रिकी खोटी दुराशा विटंबी पुढें।**
**परोपकारिणी मैत्री ते मैत्री न विटे कदा ॥ २ ॥**

तात्पर्य ' विकल्पेंवीण जें सख्य तें सख्य सुख दाखवी ! ' अहंकारामुळें वादविवाद होतात व ' कोणाचें कोणाशीं पटत नाहीं ( २० ). पंडितांत, ज्ञात्यांत, योग्यांत, तापसांत, यतींत—पाहाल तेथें तंटें ! ' स्वजातीविजातींमध्यें सख्य नाहीं ! महंतामहंतामध्यें सख्य नाहीं ! ' सर्वच शास्त्रमतानें बोलतात व भांडतात. समर्थ १९२६ मध्यें भरतखंडाची स्थिती पाहते तरी वरील यादींत त्यांनीं देशभक्तांना पहिलें स्थान दिलें असतें ! लोक नानागुणांचे व नानास्वभावांचे आहेत, भले आहेत व बुरे आहेत ( २७ ). स्त्रीपुरुष कसला गर्व वाहतात हें प्रकरण २८ मध्यें पहावें. ' परनिंदा ' ( ३६ ) ह्या प्रकरणांत आईचे उपकार आठवून तरी स्त्रीजातीला निंदूं नका असें पहिल्या पांच श्लोकांत कळवळ्यानें सांगितलें आहे.

**म्हणे वंद्य मी, निंद्य सर्वै परावे**
**तया कश्मळालागिं रे काय ठावें।**
**भल्यानें जनीं आपनिंदा करावी**
**नको रे नको व्यर्थ निंदा परावी ॥ ८ ॥**

' निरूपणें मानस आवरावें ' ( ३७ ) म्हणजे ' परमसुंदर तें पद पावसी ' ( ३८ ). ' भवाचा वीट ' ( ३९ ) हें प्रकरण फार गोड आहे; सातच श्लोकांत वैराग्याचा उठाव नामी झाला आहे. रचनाही भावानुरूप आहे. ह्यापुढें तीनच प्रकरणें आहेत. ( १५ ) **स्फुट ओव्या उर्फ अभंग.** पंचीकरणादि अभंग धरून हे एकंदर अभंग ३८८ आहेत. आठवें प्रकरण व हें पंधरावें मिळून दोन्ही प्रकरणांत समर्थांचे बहुतेक सर्व अभंग आले आहेत. ( **१६** ) **पद-संग्रह**—ह्यांत समर्थांचीं १०८ पदें दिलीं आहेत. ( **१७** ) **सांप्रदायिक पद्धती**. हा शेवटला भाग होय. ह्यांत समर्थसांप्रदायांतील नित्यनैमित्तिक भजनें, आरत्या, सगुण—निर्गुण ध्यानें, मानसपूजा, निरनिराळ्या वारीं म्हणावयाचीं गीतें, सवाया, रामनवमीची उत्सवपद्धति, व राममंत्राचे श्लोक वगैरे सांप्रदायिकांचा आचारधर्म सर्व आला आहे. ह्याप्रमाणें ह्या भांडाराच्या सतराही भागांत कोणकोणते विषय कोणत्या क्रमानें दिले आहेत तें थोडक्यांत सांगितलें आहे. वाचकांनीं आवडीसवडीप्रमाणें ह्यांतील भाग नित्यनेमानें वाचीत जावें व श्री-समर्थदर्शित मार्गानें जाऊन आपलें व समाजाचें हित करून इहपरलोक साधावें.

**श्रीक्षेत्र नाशीक-पंचवटी**
**श्रीदासनवमी शके १८४८**

**साधुसंतांचा दासानुदास.**
**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

# ( उत्तरार्ध )

## २ जुनादासबोध ( एकवीस समासी ) १–५४



## ३ लघु अध्यात्म प्रकरणें ५५-१३६



## *१३ रामायण १३७–२३५



## १४ करुणास्तोत्रें ( बत्तीस ) २३६–२५६

## १५ भीमरूपीस्तोत्रें ( तेरा ) २५६–२६९

## १६ बारा ओव्या शतकें २७०–३०९



*टीपः—हे भाग एकंदर १७ आहेत. ४ था भाग रामायणाचा, पण ग्रंथांत त्याच्यामागें १३ हा आंकडा चुकीनें पडला गेला व शेवटपर्यंत ही चूक कायम राहिल्यामुळें पुढील भागा-भागाचे आंकडे याप्रमाणें दुरुस्त करून घ्यावेत. ह्या चुकीबद्दल वाचकांनीं आम्हांस क्षमा करावी.

## २२ प्रासंगिक प्रकरणें ४२६–४३६



## २३ श्लोकबद्ध विविध प्रकरणें ४३७–४७०

## २४ स्फुट ओव्या उर्फ अभंग ४७१–५१७

## पंचीकरणादि अभंग ५१८–५७१

## पदसंग्रह ५७२–५९५

## २५ सांप्रदायिक पद्धति ५९६–६४७





# श्रीसमर्थांचें स्तोत्र.

( रघुनाथपंडितकृत )

आम्हां तुम्हांस भववारिधिमाजि तारूं ।
जे वाचितां परिसितां मग होय तारू ॥
ते दासबोध-रचना घडली जयाला ।
वंदूं निरंतर तया गुरुराजयाला ॥ १ ॥

वैराग्य-भाग्य भरलें असतां अनन्या ।
आल्या जयाप्रति चतुर्विध मुक्ति कन्या ॥
चौथी तयांत वरिली, उरल्या न पाहे ।
तो आमुचा गुरू-समर्थ समर्थ आहे ॥ २ ॥

श्रीरामदास-गुरु शांति-वधूस अंगीं ।
अंगीकरूनि मिरवे स्वसुखांतरंगीं ॥
रंगीं उभा कर उभारुनि वंदनाचे ।
नाचे मुखीं गुण वदे रघुनंदनाचे ॥ ३ ॥

खेळावयास हनुमंत गडी जयाचा ।
जो या महीवरि वसंत जितेंद्रियांचा ॥
ज्याचीं पदं प्रणमितात्ति कवींद्र राजे ।
श्रीरामदास गुरु तो आमुचा विराजे ॥ ४ ॥

जो डोंगरीं गिरिदरीं फिरतां न भागे ।
ज्याची पवित्र घन कीर्ति जनीं विभागे ॥
जो तत्वबोधकविता करितां न मोजी ।
तो रामदास गुरुवर्य नमो नमो जी ॥ ५ ॥

शोभे शतद्वय समास समास-भारी ।
जो दासबोध निजबोधसुखा उभारी ॥

त्या शेवटीं दशक जोडित जो विसावा।
श्रीरामदास-गुरु तो अमुचा विसावा ॥ ६ ॥

चिद्बोध सेज अरुवार नव्या फुलांची।
सायुज्यमुक्ति ललना असतां जयाची ॥
तो रामदास 'अकलत्र' कसें गणावें?।
अज्ञान होत जन, काय तयां म्हणावें ॥ ७ ॥

जो लेखणीसहित कागद दौती वाहे।
तो दंड सद्गुण उदंड जयांत आहे ॥
हस्तीं तयासि मिरवी फिरवी विनोदें।
श्रीरामदासगुरु तो नमिला प्रमोदें ॥ ८ ॥

जो भर्जरी सरस पाटलवर्ण चैलें।
शोभे जयास लघुसें निटळीं अवाळें ॥
बोले 'समर्थ रघुवीर समर्थ' ऐसें।
तो मी स्तवीन निजसद्गुरु वाग्विलासें ॥ ९ ॥

जेणें प्रशिष्य निजशिष्य अनेक केले।
देतां प्रसाद कफनी कफ नीट जाले ॥
लोकाभिरामगुण बोलत 'राम कर्ता'।
साष्टांग वंदन करीन तया समर्था ॥ १० ॥

श्रीरामदास-गुरुवर्णन-रूप पद्यें।
वृत्तें 'वसंततिलका' सुजनैकहृद्यें ॥
संख्या करूनि दशकावरि एकतेनें।
केली अपूर्व रघुनायकपंडितानें ॥ ११ ॥



गो. के. कोळे
जमखंडी

# (२) जुना दासबोध.

## १. मंगलाचरण.

॥ श्रीराम ॥ मन मीपणें निर्बुजलें[1]। स्वामींच्या पदीं मिसळलें। ऐक्यरूपें स्वयेंचि जाहलें। पद आपण ॥ १ ॥ स्वामीसेवकपण वावो। जाणावा तो स्वामीरावो। ऐसा निजपदीं ठावो। भाग्यानुसार ॥ २ ॥ शब्दीं निःशब्द जाहले। उच्छिष्ट श्रवणें खादलें। ते अभ्यंतरीं बैसले। स्वयंभु बोधरूप ॥ ३ ॥ सुष्टु साराचेंही सार। फावलें[2] अक्षय अपार। तया सुखाचे उद्गार। येती स्वानुभवें ॥ ४ ॥ वायूचेनी बळें शब्दासी। सामर्थ्य होय निश्चयेंसी। तैसी सद्गुरुकृपा मानसीं। उद्गार काढी ॥ ५ ॥ सद्गुरुकृपेचेनी हांवे। विवेक मुळाकडे[3] धांवे। तेणें ऐक्यसिंधु हेलावे। स्वानंदसुखें ॥ ६ ॥ तया सिंधूच्या आनंदलहरी। शब्दीं निःशब्द भरोवरी। तेणें प्रतापें वैखरी। वदोंचि लागे ॥ ७ ॥ वेष्टित शिष्यतारांगणीं। सद्गुरु पूर्णचंद्र गगनीं। प्रगट जाला निजकिरणीं। दिशा धवळल्या ॥ ८ ॥ मिरवत जातां अंतराळीं। प्रभा फांकली ध्रुवमंडळीं। तेणें सुखें निजकल्लोळीं। सिंधु उचंबळूं पाहे ॥ ९ ॥ भरितें दाटलें सागरीं। उचंबळोनि फुटल्या तरी[4]। महानदीसि माघारी। दाटी जाहली ॥ १० ॥ उदक चढलें अळुमाळ। फुटलें वाहती खळाळ। तेणें बळें सरिताजळ। उफराटे वाहे ॥ ११ ॥ तैसी वृत्ति स्वरूपीं मिळाली। मिथ्यात्वें माघारी मुरडली। सिंधूचेनि लोटें आली। जेथील तेथें ॥ १२ ॥ आनंदसिंधु उचंबळला। तेणें ब्रह्मगोळ बुडाला। उडुगणेंसी[5] मयंक[6] जाहला। सिंधुचि अवघा ॥ १३ ॥ स्वर्ग मृत्यु आणि पाताळ। अवघें भरलें अक्षोभ्य जळ। मंगळमातेचें ढेंकुळ। विरोनि गेलें ॥ १४ ॥ कैंचे देव कैंचे दानव। कैंचे जीवपणें मानव। आकार विरोनियां सर्व। निर्विकार जाहला ॥ १५ ॥ बुडविला सिंधूनें सागर। प्राणी पावले पैलपार। गुरुभक्तांसी उतार। पायवाट जाहली ॥ १६ ॥ जे समूळ बुडाले[7]। तेचि साचार तरले। जे बुडतबुडतां वांचले। ते बुडाले कल्पकोटी ॥ १७ ॥ येथ जो जीवेंसि मेला[8]। तो कल्पकोटी जाहला। जीवित्वासी भ्याला। तो मरतचि गेला

---

१ बावरलें, व्यापलें. २ प्राप्त झालें, लाभलें. ३ उगमाकडे, ब्रह्माकडे. ४ नौका. ५ नक्षत्रासह. ६ चंद्र. ७ आनंदसमुद्रीं. ८ जीवभावासगट नाहीं झाला.

पुन्हा पुन्हा ॥ १८ ॥ येथ जे सांकडीं पडिले। तेचि निश्चितार्थें बुडाले। स्वानंदसिंधूंत बुडोन मेले। तयांसी भय नाहीं ॥ १९ ॥ मी सिंधु ऐसें जडलें। तेव्हांचि खंडपण आलें। सिंधु सोडूनि बाहेर पडिलें। कठिण-पणें लवण ॥ २० ॥ सिंधूचाचि अंश लवण। परी एकदेशी पावे शीण। पुन्हा त्यासी सिंधूविण। विश्रांति नाहीं ॥ २१ ॥ सिंधूमाजि जळचरें। जिताति तेणेंचि आधारें। परंतु बापुडीं अविचारें। सिंधू होऊं नेणती ॥ २२ ॥ होतों खंडपणें[1] फुटलों। सद्गुरूनें जीवन केलों। आलों गेलों आणि बोलिलों। तो मी नव्हे सर्वथा ॥ २३ ॥ ऐसा माझा सद्गुरुस्वामी। तोडूनि टाकिली माझी मी मीं[2]। आपुलिया निजपदयुग्मीं[3]। ऐक्यता केली ॥२४॥ आतां पुढिल समासीं निरूपण। जो भास्करवंशभूषण[4]। तो सर्वात्मा सगुण। वंदीन कोदंडधारी[5] ॥ २५ ॥ स्तवन होतां न धरवे धीर। आठवे रामचंद्र उदार। रघुनाथध्यानीं तत्पर। श्रोते होत आतां ॥ २६ ॥ इति श्रीरामदासें राम। पुढें वर्णिला पूर्णकाम। मानसपूजेचें वर्म। प्राप्त होय जेणें ॥ २७ ॥ इति प्रथमः समासः ॥ १ ॥ श्रीराम.

---

## २. रघुनाथध्यान.

॥ श्रीराम ॥ ऐसा सर्वात्मा राजाधीश। सकळ पाहती सावकाश। तेथें पिसाट रामदास। उभा असे दीनरूप ॥ १ ॥ रामचंद्रा तुझा वियोग। ऐसा नको रे प्रसंग। तुजकारणें सर्व संग। त्यक्त[6] केला ॥ २ ॥ रामा तुझिये स्वामीपणें। मी हें ब्रह्मांड मानीं ठेंगणें। स्वामी तुजवीण कोण जाणे। अंतर आमुचें ॥ ३ ॥ तुजवीण मज माया। कांहीं नाहीं रे राम-राया। आम्हां अनाथां कासया। उपेक्षिसी? ॥ ४ ॥ तुज समुदाय दासांचा। आम्हांसि स्वामी आणिक कैंचा। तुजकारणें जिवलगांचा। संग सोडिला ॥ ५ ॥ सगुण रघुनाथ मुद्दल। माझे इतुकेंचि भांडवल। कास धरूनि टाकीन पैल। पार भवाचा ॥ ६ ॥ आतां वंदीन सकळ श्रोते। ज्यांपासाव जाहले वक्ते। जे ब्रह्मसुखाचे वोविते। आदरें करूनी ॥ ७ ॥ जे विवेकरत्नाचे आगर। जे साहित्यसिंधूचे जलधर। जे वृत्तिकिरणाचे दिनकर। सर्वांग श्रोते ॥ ८ ॥ जे तार्किकविषयीं वरिष्ठ। जयांचें सर्वही उच्छिष्ट। तयांपुढें मी कनिष्ठ। काय बोलों ॥ ९ ॥ जें कांहीं म्यां आठवावें। तें जयांस पूर्वींच ठावें। तेथें ज्ञातेपणें

१ एकदेशीपणामुळें वेगळा झालों होतों. २ मीपण. ३ चरणकमलीं. ४ रविकुलाचें मंडण. ५ धनुर्धारी रामचंद्र. ६ सोडला.

बोलावें। काय हो आगळें ॥ १० ॥ जैसा विधी[1]प्रति मुका। करी बोलायाची आशंका। तैसी मज आठविली रंका। बुद्धी वक्तृत्वाची ॥ ११ ॥ परी मज एक आठवलें। जें सर्व सज्जनांचें केलें। तरी माझें काय हो गेलें। पूर्वींच आहे ॥ १२ ॥ आतां धीट अथवा पाठ[2]। आपुलें जाणोनि करिती नीट। माझी चुकली खटपट। मीपणाची ॥ १३ ॥ जें बोलिलें वेदपुराणीं। तें म्यां ऐकिलें सांगणोवांगणीं। एक सांगतों काहाणी। संसाराची ॥ १४ ॥ भोजनकर्ते[4] हो ऐका। हे या प्राकृताची टीका। अन्नाची चाड तरी नका। शब्दीं गुंतों ॥ १५ ॥ आज्य म्हणतां प्राप्त जालें। तूप म्हणतां तेंचि आलें। तैसें अर्थ इच्छितां लाधलें। श्रोतयां ब्रह्म ॥ १६ ॥ अहो प्राकृत बोली। परी संस्कृताची एकता आली। जाणोनि कथा श्रवण केली। पाहिजे श्रोतीं ॥ १७ ॥ म्हणोनि श्रोतीं सावधान। करावें श्रवणमनन। प्रयत्नेंवीण लाधे निधान। अवश्य घ्यावें ॥ १८ ॥ कांहीं एक गुजगाढें। प्राणियांसी लाभे घडफुडें[5]। जरी घडे निवाडें। श्रवणमनन ॥ १९ ॥ तया श्रवणाची खूण। वक्ते श्रोते यांचें लक्षण। पुढिले समासीं निरूपण। हेंचि आहे ॥ २० ॥ इति श्रीरामीरामदास म्हणे। श्रोतीं अवधान देणें। तुमचीं उभयतांचीं लक्षणें। सांगिजेतील ॥ २१ ॥ इति द्वितीयः समासः ॥ २ ॥ श्रीराम.

---

## ३. वक्तृश्रोतृलक्षण.

॥ श्रीराम ॥ वंदीन सद्गुरु समर्थ। जो अर्थाचाही अर्थ। जयाचेनि परमार्थ। प्राप्त जाहला ॥ १ ॥ जयाचेनिं स्वरूपप्राप्ती। होऊनि फिटे जीवित्वभ्रांती। जयाचेनि पूर्ण होती। सर्व मनोरथ ॥ २ ॥ जो पूर्णप्राप्तीचा दाता। जो भवसिंधूचा त्राता। तयाचे प्रसादें आतां। करूं वक्तृत्व ॥ ३ ॥ जे वक्त्याचें लक्षण। अत्युत्तम सुलक्षण। क्रिया पालटे निरूपणें। श्रोतयांची ॥ ४ ॥ ऐसें सांगिजेती वक्ते। तेणेंचि प्रसंगें श्रोते। जे कासेसि लावूनि तारिते। भाविकजनां ॥ ५ ॥ भक्त विरक्त आणि प्रेमळ। शुद्ध ज्ञाते दीनवत्सल। हृदय शुद्ध गंगाजळ। निर्मळ जैसें ॥ ६ ॥ परोपकारी धार्मिक। क्रिया न घडतां साशंक। जयांच्या संनिध विवेक। सिद्धचि आहे ॥ ७ ॥ जैसें बोलणें तैसीच क्रिया। ऐसा वक्ता जोडलिया। तत्काळ बाणे श्रोतया-। अंगीं निरूपण ॥ ८ ॥ वक्ता तोचि जो

---

१ ब्रह्मदेवापुढें. २ धिंवसा, धाडस, उत्कंठा. ३ धीट व पाठ या शब्दांचें स्पष्टीकरण द. १४ स. ३ येथें पहा. ४ ज्ञानभोजन करणारे. ५ खरें, यथार्थ.

शांत । आणि असे पूर्णप्राप्त[1] । सर्वकाळ क्रोधें संतप्त । तो वक्ता नको ॥ ९ ॥ वक्ता पाहिजे उदास । जयाचें बोलणें नैराश्य[2] । जयाचे हृदयीं वसे आस । तो वक्ता नको ॥ १० ॥ आशा धरूनि बोले जीवीं । तो तैसेंचि निरूपण लावी । सिद्धी उठावले[3] गोवी । युक्तिजाळ टाकोनी ॥ ११ ॥ एक शिष्याची आस । शिष्याकारणें कासावीस । होऊनियां सावकाश । पसारा सोडिती ॥ १२ ॥ ते समाधानबुडवण । आणि शिष्या चाळवण । शिष्यसमुदाय वणवण । वरपडे[4] जाहले ॥ १३ ॥ तीं लुलु[5] बराडीं बापुडीं । शिष्याकारणें कुडकुडीं । सर्वकाळ होताति वेडीं । त्यांचें वक्तृत्व नको ॥ १४ ॥ जो गुरु विश्वासाचा । जेथें अंकुर नाहीं भेदाचा । तोचि वक्ता अफाडाचा[6] । सकळांसि बोधी ॥ १५ ॥ जो आशंका फेडूं जाणे । जाणपणें हंबरू नेणे । श्रोतयांचे शब्दगुणें । साहे[7] विवेक ॥ १६ ॥ सर्वकाळ क्रोधें संतप्त । आशंका घेतां करी घात । वक्तृत्वाचा अर्थ जात । भलतीकडे ॥ १७ ॥ अयुक्तचि प्रतिपाद्य करी । उच्छेद होतांचि गुर्गुरी । बोलिला शब्द थावरी[8] । बोलेचि अप्रमाण ॥ १८ ॥ बोलतां येती बळीं । हात पाय कांपती चळचळां । क्रोधें उकाविती[9] वेळोवेळां । शीघ्रकोपी ॥ १९ ॥ एक विश्वासें बोलतांचि राहे । नेत्र भोवंडोनी क्रोधें पाहे । दुसऱ्याचें वक्तृत्व न साहे । आपणापुढें ॥ २० ॥ होय नव्हे आरंभिली । क्रोधें देहशुद्धि विराली । बहुसाल वृष्टि केली । सन्मुखं[10] माधव ॥ २१ ॥ क्रोधें काळवंडली मुखवटी । ऐकतां वक्रता पावली भ्रुकुटी । शिरा कंठीं आणि ललाटीं । प्रकट जाहल्या बळें ॥ २२ ॥ बोलतां बोलतां नीच उत्तरें । ताडित उठले परस्परें । श्रोते वक्ते रुधिरें[11] । उभे नाहले ॥ २३ ॥ कोल्हाळ उठिला एकसरा । केला पुस्तकांचा घुसमारा । थोर तवकें[12] राजद्वारा । महापुरुष निघाले ॥ २४ ॥ ऐसे क्रोधी अनावर । देहबुद्धीचे पामर । ऐशियांचें वक्तृत्व चतुरें । वमनप्राय त्यजावें ॥ २५ ॥ आपण क्रियेसी अंतरले । आणि वक्तृत्वाचे भरीं भरले । तया श्रवणें श्रोते जाहले । वक्त्या ऐसे ॥ २६ ॥ आशा धरूनि वक्ता बोले । तेथें श्रोते नागवले । शृंगारिकश्रवणें चेवले । साधक जैसे ॥ २७ ॥ बहुश्रवण घडलें ज्याला । ताडेतोडे शिकोनि आला । तया वक्तृत्वें श्रोतयाला । स्वहित न घडे ॥ २८ ॥ वक्ता पाहिजे अनु-

---

१ पूर्ण झालेला. २ आशारहित. ३ सिद्धी उठवून म्ह० सिद्धीचे चमत्कार दाखवून युक्तीचें जाळें पसरून गुंतवितो. ४ शिष्यांना ( वणवण म्ह० तळमळ ) मिळाली. ५ मऊ, आशाळभूत. ६ अभेदाचा वक्ता. ७ संभाळी. ८ आवेशास चढे. ९ उसळतात. १० देवासमोर. ११ रक्तानें १२ ताणाताणानें, आवेगानें.

भवाचा। ज्ञाता नसावा पुस्तकींचा । पुस्तकज्ञानें श्रोतयांचा । भ्रम तुटेना सर्वथा ॥ २९ ॥ कां वक्ता वक्तृत्वाचे भरीं । भरोनि श्रोतियां निरोध करी। तेणें श्रोता धाक धरी। पुन्हा न ये श्रवणीं ॥ ३० ॥ अति-निरोधें उपजे आस । कां मोडे श्रोवयांचा हव्यास । ऐसा वक्ता जो कर्कश । तोही नको ॥ ३१ ॥ कां जो वर्म लक्षूनि बोले । तेणें श्रोते क्रोधासि आले। आपणही लक्षूं निघाले । वर्म वक्त्याचें ॥ ३२ ॥ कां जें रुचेना श्रोतयांचे मनीं। तें दाटूनी लावी लावणीं। तेणें उपजे अत्यंत कांणी[1]। श्रोते उठोनि पळती ॥ ३३ ॥ कां आपण वर्ते जयापरी । तेचि क्रिया प्रतिपाद्य करी । आपणापरती दुसरी । मांडोंचि नेदी ॥ ३४ ॥ कां वक्ता जाणिवेनें जिंकिला । उणीव येतां तगमगिला । जाणिवेचा ताठा भरला। तो वक्ता नव्हे ॥ ३५ ॥ जो सकळ जाणोनि नेणता। जो श्रोतयांचाही श्रोता। जेथें अहंतेची वार्ता । निःशेष नाहीं ॥ ३६ ॥ वक्ता भीडसारु[2] जोडे। तरी श्रोतयांसी अंधार पडे । म्हणोनि वक्त्या-कडे। भीड तेही नसावी ॥ ३७ ॥ भीड सांडूनि वर्म चुकावी । हितार्थ पोटस्थ[3] शिकवी। कुशल वक्ता तोचि उगवी[4]। श्रोतयांसी ॥ ३८ ॥ वक्ता निरभिमानी भेटे । तरी श्रोतियांचा अभिमान तुटे । उभय अभिमान विटे। प्रांजळ निरूपणीं ॥ ३९ ॥ आलें निरूपण अभ्यंतरीं । गुज म्ह-णोनि चोरी करी । तो वक्ता नव्हे भिकारी । कृपण वेषें ॥ ४० ॥ जो समाधानी वक्ता। तयासि निरूपणीं समता। आपुली पारखी विभक्ता। नाहींच जयासी ॥ ४१ ॥ असो वक्ता आशारहित । तयाचेंचि वक्तृत्व विहित। दुराशा धरी जयाचें चित्त । तो वक्ता नको ॥ ४२ ॥ आतां असो सद्गुरूवीण । पोटस्थ शिकवील कोण । समदृष्टि जयाची पूर्ण। ऐसा तो विरळा ॥ ४३ ॥ आतां श्रोतयाचा विचार । श्रोता पाहिजे सादर। मननशीळ सारासार-। विवेक निवडी ॥ ४४ ॥ श्रोता आदरें श्रवण करी। तेणें उचंबळे आनंदलहरी। श्रोते वक्ते अर्थांतरीं। मिळोनि जाती ॥ ४५ ॥ अर्थभूत[5] श्रोता मिळे । आणि आदरें श्रवणीं निवळे। तेणें सकळिकांचा गळे । देहाभिमान ॥ ४६ ॥ सादरें सर्वांगें सामोरा। आदरें होतसे पुढारां । श्रवणीं पडतांचि उत्तरा । परीक्षोनि सांडी ॥ ४७ ॥ सांडोनि सर्वेचि सादर । पाहे वक्त्यासमोर । ऐसा मनाचा व्यापार। मनें आरंभिला ॥ ४८ ॥ मुखाकडे लक्षी आदरें। बाहेर निघ-तांचि उत्तरें । प्राशन करी कर्णद्वारें । विवरी स्वयें ॥ ४९ ॥ भिक्षुक

१ कंटाळा, दुःख. २ भीडखाऊ, भिडस्थ. ३ पोटांतील, रहस्य. ४ समजवी. ५ अर्थाशीं तन्मय झालेला.

देशावरी सादर । कां व्यापारी मिळतां व्यापार । कां भुसारी करितां भुसार । मापासमयीं ॥ ५० ॥ कां जिवलगाची ऐकतांचि वार्ता । अत्यंत श्रवणीं सादरता । कां न्यून बोलत असतां । सादरें ऐके ॥ ५१ ॥ कां शूद्र शेतीं सांचळ पाहे । कान देऊनि उभा राहे । श्वासोच्छ्वास दीर्घ वाहे । म्हणोनि कोंडी बळें ॥ ५२ ॥ असो संसारीं सादरता । तैसीच करी श्रवण होतां । तोचि एक धन्य श्रोता । होय निरूपणीं ॥ ५३ ॥ संसारविषयीं तत्पर । आणि श्रवण होतां अनादर । तो श्रोता नव्हे खर । मनुष्यवेषें ॥ ५४ ॥ मिथ्यावादी अमंगळ । हरिकीर्तनीं उठे कपाळ । ऐसा जो खळ चांडाळ । त्यासि भगवंत कैंचा ॥ ५५ ॥ अविद्या आणि फुगारा । धरितां जाणिवेचा गारा । बाष्कळ बोलोनि मातेरा । करी निरूपणाचा ॥ ५६ ॥ वक्ता बहुभाष्य वाचाळ । तैसाचि श्रोताही तोंडाळ । दोही मिळोनि खळखळ । उदंड करिती ॥ ५७ ॥ वक्तृत्व श्रोता ऐकेना । बोलों बैसला आटोपेना । युक्तिजाळ पसरूनियां जना । जाणीव दावी ॥ ५८ ॥ उभयतां एकचि गलबला । निरूपणीं हाट भरला । एक शब्दांचा ढुमाला । बैसला घेऊनी ॥ ५९ ॥ एकापुढें एक बोले । अवघेचि वक्ते जाहले । जैसे ते जंबूक मिळाले । कोल्हाळ करिती ॥ ६० ॥ जाणीव भरली अभ्यंतरीं । भुलों लागले भलतेचि परी । तेथें कोणासी कोण विचारी । वृथा बोलती सर्वांग ॥ ६१ ॥ श्रोता श्रवणीं जाणीव धरी । वक्त्याचा उच्छेद करी । ऐसा श्रोता मिळे तरी । समाधान कैंचें ॥ ६२ ॥ जें जें निरूपणें ऐकती । तें तें पुढिलांसी सांगती । बहुतेक सांगणें, चित्तीं । विरळा धरी ! ॥ ६३ ॥ आपण स्वयें क्रिया करी । तेंचि निरूपण थावरी । ऐसा श्रोता दुराचारी । अवश्य त्यजावा ॥ ६४ ॥ कोरडा खणखणीत पाषाण । तैसें हृदय कठीण । कदाचित आला सत्वगुण । तरी फोडी बळें ॥ ६५ ॥ अंतरीं काळकूट भरलें । गुल्म अभिमानाचें वाढलें । तें निरूपण वितुळलें । परी वितळोंचि नेदी ॥ ६६ ॥ निरूपणीं सावकाश । पाहावे वक्त्याचे गुणदोष । जैसे मिळाले वायस । विष्ठा धुंडिती ॥ ६७ ॥ बैसूनि निरूपण ऐके । वृत्ति गुणदोषीं फांके । अविवेकें गुणदोष देखे । सर्वत्रांचे ॥ ६८ ॥ बैसला दिसे अतिविरुद्ध । मनें करी नाना व्यापार । आवरेना अनावर । उठोनि पळे ॥ ६९ ॥ बैसतां निरूपणीं । नेत्रीं भरली घोंतघणी । अत्यंत जाकाळिला प्राणी । सुषुप्तीनें ॥ ७० ॥ कडकडां जांभया येती । डकडका डुकल्या देती । घाबरे होऊनि पाहती । क्षणक्षणां दुश्चित ॥ ७१ ॥ नेत्रीं झांपडी

१ चोराची चाहूल. २ भार. ३ बाजार, हाट. ४ जाळें. ५ दुर्वासना.

पडली । विमल मुखीं विकसली । नावरे सर्वांगीं भरली । निद्रा भरें वळें ॥ ७२ ॥ निःशेष देहभाव गळे । अवचितीं नेत्र उडाविले । एक ते कलथोनि पडले । एकीं फोडिली ब्रह्मवीणा ॥ ७३ ॥ जागृतीस नाहीं ठाव । जैसे डुलती महानुभाव । मनें मांडिला उत्सव । सुखनिद्रेचा ॥ ७४ ॥ निद्रा प्रवेशे अभ्यंतरीं । तेव्हां विवेकासी कैंची उरी । धारिष्ट पळे दुराचारीं । जागृती विषयीं ॥ ७५ ॥ आला निरूपणीं कंटाळा । प्रबळ निद्रेचा उमाळा । निद्रा लोळवी सकळां । बळें श्रोतयांसी ॥७६॥ निद्रा अज्ञानाची सावली । निद्रा भ्रांतीची माउली । निद्रा निरूपणीं केली । विवशी ईश्वरें ॥ ७७ ॥ निद्रेकरितां विस्मृति पडे । निद्रेकरितां भ्रांति पडे । निद्रेकरितां मूर्ति मोडे । निद्रा हृदयशून्य ॥ ७८ ॥ निद्रा अविद्येचें फळ । निद्रा जन्माचें मूळ । निद्रा सकळांसी व्याकुळ । करून पाडी ॥ ७९ ॥ निद्रा उदास नागवणी । निद्रा आयुष्यबुडवणी । निद्रा अगत्य निरूपणीं । घाला घाली ॥ ८० ॥ निद्रा आळसाची पेटी । निद्रा भ्रमाची कोटी । निद्रा हे परम वोखटी । साधका बाधी ॥ ८१ ॥ निद्रा प्रकाशासी झांपडी । निद्रा विवेकासी विघडी । निद्रा[1] नागवण उघडी । साधकासी होय ॥ ८२ ॥ सांडूनि निरूपण गोड । पुरविती निद्रेचें कोड । ते साधक जाणावे झोंड । संतनिजधन नेणती ॥ ८३ ॥ जो सादर अर्थांतरीं । तयासी निद्रा काय करी । जनीं निःसंग दरिद्री । तयासी बाधी ॥ ८४ ॥ ऐसी निद्रा महाविघ्न । बळेंचि श्रोतया करी भग्न । ते न येतां संलग्न । श्रवण फावे ॥ ८५ ॥ निरूपणाचे आधारें । फिटे निद्रेचें काविरें[2] । तेंचि श्रोते येर पामरें । जितांचि मेलीं ॥ ८६ ॥ जे अत्यंत विषयासक्त । जे कुटुंबाचे निजभक्त । जयांपाशीं पाषांड मत । निरंतर वसे ॥ ८७ ॥ जे वैराग्यें कनिष्ठ । जे शब्दज्ञानें वरिष्ठ । ऐसे श्रोते परम नष्ट । सर्वथा नकोत ॥ ८८ ॥ जो संसारें तापला । जो स्वहितासी प्रवर्तला । तोचि श्रोता लाधला । परम गुह्य ॥ ८९ ॥ असो ऐसे श्रोते वक्ते । सादर सर्वांग जाणते । जाणीव आणि क्रोधातें । आवरूं जाणती ॥ ९० ॥ निरभिमानी जे समर्थ । तयांसी साजे हा परमार्थ । अभिमान वाहे तो पदार्थ[3] । भूमिभार जाह्ला ॥ ९१ ॥ श्रोते ऐकती आदरें । तरी बोलेन बोबडीं उत्तरें । स्वामी तुमचेनि आधारें । होईन निरभिमान ॥ ९२ ॥ जैसे मायबाप वर्तती । तैसीच क्रिया लेंकुरें धरिती । म्हणोनि श्रोतीं वक्तीं । निरभिमान असावें ॥ ९३ ॥ तुम्हीं स्वयें निरभिमान । परी माझे ठायीं अभिमान । असेल म्हणोनि हें साधन ।

१ दासबोध द. १८ स. ९ मधील निद्रावर्णन याशीं ताडून पहा. २ वेड, भ्रम. ३ प्राणी.

पाय तुमचे ॥ १४ ॥ माझ्या अंगीं अभिमान जडे । तरी गोष्टी येईल स्वामीकडे । जैसा परिवार पळतां मोडे । महत्व नृपतीचें ॥ १५ ॥ तुम्हां सज्जनांची कृपा मज । आणि उरले अभिमान-फुंज[1] । तरी हे माझी लाज । तुम्हांसच कीं ॥ १६ ॥ स्वामी तुमचेनि प्रतापें । कृतांत काळ तोही कांपे । तुमचेनि वचनमात्रें सोपें । होय परब्रह्म ॥ १७ ॥ तुमची कृपा जेथें घडे । तयासीच परब्रह्म जोडे । प्राणी सुटती रोकडे । दुःखापासोनि सर्वदा ॥ १८ ॥ तुम्हांसी शरण अनन्यभावें । जातां लुटी आनंद फावे[2] । तया सुखाची मिरवे । ते शांति अंगीं ॥ १९ ॥ एका भावार्थासाठीं । उघडे शब्दरत्नपेटी । अनर्घ्य[3]-रत्नांची गोमटी । माळा वसे हृदयीं ॥ १०० ॥ तुमचेनि उच्छिष्टलेशें । आणि गुरुशिष्यांचेनि मिसें । सांगिजेल जेणें पिसें । झडे जीवपणाचें ॥ १०१ ॥ इति श्रीरामीरामदास । विनवी संतसज्जनास । व्युत्पत्ति आणि पदत्रास । क्षमा केली पाहिजे ॥ १०२ ॥ इति तृतीयः समासः ॥ ३ ॥ श्रीराम.

---

## ४ सद्गुरुलक्षण ( दास० द० ५ स० २ )

---

## ५ सच्छिष्यलक्षण ( दास० द० ५ स० ३ )

---

## ६ वैराग्यनिरूपण ( दास० द० ३ स० १० )

---

## ७. सगुणध्यान.

॥ श्रीराम ॥ ऐकोनि भाविकाचे प्रश्न । स्वामी देती प्रतिवचन । तेंचि आतां श्रोतेजन । परिसोत कां ॥ १ ॥ देव घननीळ सांवळा । मुकुट कुंडलें मेखळा । रुळे वैजयंती माळा । आणि पीतांबरु ॥ २ ॥ ऐसा शेषशयनावरी । क्षीरसागरीं निद्रा करी । शंख चक्र गदाधारी । लक्ष्मीसहित ॥ ३ ॥ तोचि मूळपुरुष एक । त्यापासूनि अवतारादिक । दश अवतार अनेक । अंशमात्रें होती ॥ ४ ॥ ऐसा हा बोलिला विष्णु । आणि कैलासीं त्रिनयनु[4] । उभयतां एकचि तनु[5] । भिन्नत्व नाहीं ॥ ५ ॥ असो हरि मिळोनि हर । कीं तो सिंधुजेचा[6] वर । हे मुख्य देव इतर । अंश

---

१ गर्वाचा फुगारा. २ लाधे. ३ अमूल्य. ४ शंकर. ५ देह. ६ समुद्रकन्या लक्ष्मी तिचा पति.

यांचे ॥ ६ ॥ एक सागरीं एक कैलासीं । यांची भेटी होईल कैसी । भेटी जाहलिया जीवासी । कोण गति आहे ॥ ७ ॥ एका भावार्था-साठीं । देव लागे भक्तांपाठीं । भाव नसतां जगजेठी । प्राप्त नाहीं ॥ ८ ॥ शिष्य म्हणे गुरुदेवा । भाव तरी कोठें धरावा । कोण उपाय करावा । भाव धरुनी ॥ ९ ॥ भावें ध्यावें हरीचें नाम । हृदयीं धरावें प्रेम । मानस-पूजा नित्य नियम । केले पाहिजेती ॥ १० ॥ धरोनियां सत्त्वगुण । भावें करावें कीर्तन । अथवा करावें श्रवण । अत्यारेंकरुनी ॥ ११ ॥ सगुण-मूर्तींचीं चरित्रें । श्रवण करावीं पवित्रें । ध्यानें विविधें विचित्रें । अंतरीं धरावीं ॥ १२ ॥ निग्रह-नेमाचें बळ । असतां प्राप्ति तत्काळ । दुराशा करी तळमळ । निग्रहभ्रष्ट ॥ १३ ॥ जेथें निग्रहेंसी धार्ष्ट्य वसे । तेथें देव सन्निधचि असे । सोडीं संशयाचें पिसें । एतद्विषयीं ॥ १४ ॥ तरी निग्रह धारिष्ट जडे । हें वैराग्याविण न घडे । दृढ वैराग्य होतां उडे । पांग[1] देहाचा ॥ १५ ॥ देहपांग अनादरें बळें । तेथें धारिष्ट उठोनि पळे । सद्भावपूर्वक ढांसळे । पूर्ण धारिष्ट नसतां ॥ १६ ॥ देह पडे कां देव जोडे । ऐशी हांव आंगीं जडे । तेणें गुणें वैराग्य चढे महाप्रबळ ॥ १७ ॥ देहपांग निःशेष भंगे । तेव्हां प्राप्तीसी वेळ न लागे । देव भक्तांपाठी लागे । 'नाभी[2] नाभी' म्हणोनी ॥ १८ ॥ बाळक आपणा रक्षूं नेणे । म्हणोनि मातेसि लागे रक्षणें । तेंचि बाळक शहाणें । होतां माता विसंबे ॥ १९ ॥ तैसा भक्त भगवंतीं प्रेमा । लावूनि उल्लंघी देहसीमा । तयाचा सांभाळ आत्मयारामा । करणें घडे नेमस्त[3] ॥ २० ॥ सर्वस्वाची आस तुटे । तरीच सगुणमूर्ति प्रगटे । दुःख संसारींचें फिटे । एकसरा ॥ २१ ॥ परतु आशा सोडवेना । म्हणोनि प्राप्ति घडेना । आशा धरितां सुटेना । प्राणी दुःखापासोनी ॥ २२ ॥ आशा दुराशा दोघी बहिणी । वेढा[4] लाविले सकळ प्राणी । दुःखरूप तिया पापिणी । जन्म दाविती मागुता ॥ २३ ॥ आशादुराशांचीं जाळीं । काळें पसरिलीं भूमंडळीं । घडला प्राणिमात्र आंदोळी । संसारदुःखीं ॥ २४ ॥ आशा वासनेचें बंधन । वासना जन्मासी कारण । वासनेसी आशेविण । थारा नाहीं ॥ २५ ॥ आशा वासनेची पापिणी । आशा दुःखाची खाणी । आशा वासनेची घातघेणी । बळेंचि जन्म दावी ॥ २६ ॥ जयासी ज्याची आस । तयासा त्याचाचि ध्यास । निदिध्यासें प्राणियास । तेंचि प्राप्ति ॥ २७ ॥ बहुतेक ध्यास मनीं । पूर्वाभ्यासेंकरूनी । कांता पुत्र आणि धनीं । नेमस्त आहे ॥ २८ ॥ अखंड प्रपंचाचें ध्यान । दृढ लागलें अनुसंधान । तेणें घडे-

१ आसक्ति. २ भिऊं नकोस. ३ निश्चित. ४ गुंतविले.

चिना साधनें। परत्रींचें[1] ॥ २९ ॥ उपजतांचि लागवेगें। प्राणी प्रपंच करूं लागे। तयासी सांगणेंचि नलगे। प्रपंच करावा ऐसें ॥ ३० ॥ सकळ सृष्टि प्रपंचाकडे। सकळांसी प्रपंच आवडे। जाणतेचि ठकले बापुडे। युगधर्ममतत्वें[2] ॥ ३१ ॥ आहे प्रपंचीं आसक्ती। म्हणोनि नाना आधार घेती। सेखीं सर्व सांडोनि जाती। बापुडे मूर्ख ॥ ३२ ॥ चिंतीत असतां प्रपंचजय। एकाएकीं विपरीत समय। आंगीं आदळतां लय। पावती प्राणी ॥ ३३ ॥ अंतीं मति तेचि गती। स्त्रीपुत्र आक्रंदती। प्रपंचलोभें यातायाती। पुनःपुन्हा जन्म ॥ ३४ ॥ ऐसाच करी येरझारा। प्रपंचलोभें आत्महत्यारा। यमयातना निलाजरा। साहिल्याचि साहे ॥ ३५ ॥ ऐसा सृष्टीचा दंडक[3]। लोभें वेष्टिला एक एक। जाणत असतांही कौतुक। माया खेळ खेळे हा ॥ ३६ ॥ देखतां दिवसां नागवण। ठकले आपणासी आपण। होतांही परम शीण। आनंदचि मानी ॥ ३७ ॥ मंहावर्तीं[4] बुडतां। दृढ केली देहाहंता। देहासी येईल न्यूनता। म्हणोनि सांगे ॥ ३८ ॥ जंव होय देहावसान। तंव न सोडी अभिमान। ऐसा अभिमानी जन। सर्वत्र वर्ते ॥ ३९ ॥ एवं महत्त्वाची आशा। महत्त्व नसतांही दुराशा। तेणें गुणें जगदीशा। अंतरती प्राणी ॥ ४० ॥ एवं देहाचें थोरपण। तेंचि उदास नागवण। देहाचेनि लोभें खूण। चुके परमार्थाची ॥ ४१ ॥ देहासी थोरपण आणितां। शीणचि उरे तत्त्वतां। रासभाचा अश्व होतां। परम संकट ॥ ४२ ॥ देहमात्र तितुका निंद्य। एकें मानिला परमवंद्य। तरी तो वंदितांचि खेद। पावेल तेणें ॥ ४३ ॥ देह विटाळाचें मूळ। देह अशुद्धाचा गाळ। देह नाना अनर्गळ। दुर्गंधीचा वोतिला ॥ ४४ ॥ देह कृमींचें कोठार। देह अस्थिचा पंजर। जंव जिंकिला आहे जर्जर। खंगतां भंगे ॥ ४५ ॥ विष्ठा मूत्र वात पित्त। येणेंचि देह चालत। नाना दुःखें आदिअंतीं। ऐसेंचि आहे ॥ ४६ ॥ देह कुश्चिळ[5] अमंगळ। देह अत्यंत अनर्गळ। देह वोहळा वोगळ। वाहती नव नाळी ॥ ४७ ॥ देहीं असे नाना विकार। देह अत्यंत असारीं असार। ऐसा तोही क्षणभंगुर। अवचिता नासे ॥ ४८ ॥ ऐशा मोधळ्याचा[6] अभिमान। माथां वाहती मूढ जन। वस्त्रभूषणें शृंगारून। मी थोर म्हणती ॥ ४९ ॥ चर्चितां नाना सुगंध। तरी तो नव्हे कदा शुद्ध। अवचितीं सुटे दुर्गंध। उपढर[7] पडे ॥ ५० ॥ माझीं माझीं ऐसें म्हणतां। मरोनि गेले मातापिता। तें जाणतचि असतां। पुन्हा म्हणे स्त्री माझी

---

१ परलोकीचें. २ कलियुगाचा धर्म जो ममता, माया तिच्यामुळें. ३ राहाटी. ४ मोठ्या भोंवऱ्यांत. ५ घाणेरा. ६ अस्थिमांसाचा गोळा अशा देहाचा. ७ अव्यवस्था.

॥ ५१ ॥ ऐसें म्हणतां म्हणतां तेही मेली । कन्या पुत्र राम[1] झालीं । तरी दुराशा धरिली । आपुल्या शरीराची ॥ ५२ ॥ वय वेंचलें जाहला उतार । म्हणे माझें पिकलें शरीर । भ्रमें मूर्ख अविचार । खंगला अंतीं ॥ ५३ ॥ तारुण्य वैभव निघोनि गेलें । मग मानस पस्तावलें । हातींचें रत्न गळोनि पडलें । मग चरफडूं लागे ॥ ५४ ॥ येथें स्वहित तेंचि रत्न । गेलें न करितां प्रयत्न । म्हणूनि चतुरीं यत्न । केला पाहिजे ॥ ५५ ॥ तों शिष्य म्हणे स्वामी । सांगा कोण प्रयत्न करूं मी । जेणें प्रयत्नें आत्मयारामीं । पावन होइजे ॥ ५६ ॥ देहादि प्रपंच नश्वर । पूर्ण कळला हा विचार । तेणेंकरितां अंतर । चंचळ जाहलें ॥ ५७ ॥ वाटे सकळही त्यजावें । कांहीं सार्थक करावें । तरी मज देवाधिदेवें । मार्गीं लाविजे ॥ ५८ ॥ ऐसें शिष्याचें अंतर । जाणोनि देती प्रत्युत्तर । पुढील समासीं चतुर । परिसोत कां ॥ ५९ ॥ इति श्रीरामीरामदास । म्हणे धरूनियां विश्वास । साधकें अति सावकाश । श्रवण करावें ॥ ६० ॥ इति सप्तमः समासः ॥ ७ ॥ श्रीराम.

---

## ८. आत्मनिवेदन ( दास० द० १२ स० ५ ).

---

## ९. निरभिमान शांति.

॥ श्रीराम ॥ वंदीन सद्गुरूचीं पाउलें । मज आपणाऐसें केलें । उदार नाम दिधलें । रामदास ऐसें ॥ १ ॥ रामदास ऐसें नांव । तरी मज कैंचा ठाव । मीपणाचा अभाव । सहजचि जाहला ॥ २ ॥ आतां कर्ता अकर्ता रामदास । इच्छा उद्भवली तयास । नांव दिधलें ग्रंथास । आपण नामरूपावेगळा ॥ ३ ॥ ॐनमोजी रघुनायका । तुमची स्तुति करितां वाटे शंका । श्रुति शिणल्या मज रंका । पाड काय तेथें ॥ ४ ॥ स्तुति करूं धांवे हर्षें मोठ्या । जैशीं लेंकुरें मांडिती गारगोट्या । परी देवपण न ये त्यांच्या वाट्या । खेळ खेळती अज्ञान ॥ ५ ॥ कां लेंकुरें म्हणती आमुच्या घरीं । सूर्य सांठविला रे दारीं । डोकावूनियां घटाभीतरीं । म्हणती आहे रे आहे ॥ ६ ॥ कां पिसाटु[2] म्हणे सांगे गोष्टी । धांवोनियां धरी आकाश मुष्टीं । सुदृढ गिंवसोनियां[3] कंठीं । म्हणे हिंगं[4] रे हिंग ॥ ७ ॥ तैसा मी एक पिसाट । उगाचि करितों वटवट । स्वरूप सांगणें हे खट-

---

१ मृत. २ वेडा. ३ पकडून. ४ येथें रे येथें.

गो. के. कोळे



पट । व्यर्थचि जाय ॥ ८॥ जैसा द्रोणागिरीचे पाठारीं । औषधी आणितां रुद्रावतारीं[1] । हात पसरूनि पाहे भीतरीं । कांहींच नाहीं ॥ ९ ॥ तैसा आत्मा जपोनि सांगणें । सांगतां जाणिवेसी आणी उणें । बोलणें आणि बुरकावणें । हें तयासी चालेना ॥ १० ॥ जरी अंधाराचा गडद पडे । आकाश जाऊं नेदी आडे । तरी स्वसुख सांगणें घडे । ज्ञातेपणें करूनी ॥ ११ ॥ तेथें उपमा मात्र चालेना । तर्क भुली पडे उमजेना । उमजलें तरी सांगवेना । पार तया स्वरूपाचा ॥ १२ ॥ म्हणाल इतुकें तरी मी बोलिलों । तरी माझा अन्याय जाहला मी चुकलों । परी यथार्थ जाण मुकलों । जाणिवेपासुनी ॥ १३ ॥ मी जें बोलतों कांहीं । तें माझें प्रमाण नाहीं । मज सकळ लोक कोणीही । न मानिती ज्ञातृत्वें ॥ १४ ॥ म्हणोयियां मी ब्रह्मपिसा । बडबड करितों भलतैसा । मज बरें म्हणेल तो पिसा । माणुसकी त्यासि नाहीं ॥ १५ ॥ माझे पोटीं होती हांव । जे जाणोनि घ्यावें वस्तूचें नांव । तंव विचारितां शुद्ध उपाव । खुंटोनि गेला ॥ १६ ॥ म्हणोनि हें मज बोलवेना । न बोलतां सुख वाटेना । स्वानुभवोद्गार आवरेना । यासी काय करूं ॥ १७ ॥ मी मी बोलणें हाचि अभिमान । सदा सर्वदा मीपणीं मग्न । तें मीपण असतां संलग्न । सर्वही बाधी ॥ १८ ॥ तंव शिष्यें विनविलें । म्हणे स्वामी हें न वचे टाकिलें । हें ऐकतां मानस क्रमलें । आशंकेचें बिऱ्हाड ॥ १९ ॥ टाकावेसें माझिये मनीं । हे ढळेना जवळोनी[2] । तरी यासी करावें काय लागूनी । सांगिजे जी स्वामी ॥ २० ॥ ऐक गा ये शिष्यराया । सावध होईं प्राणसखया । तुझा सर्व संदेह विलया । दवडूं आतां ॥ २१ ॥ अरे तूं भावार्थाचा मेरु । प्रेमळ शांतीचा सागरु । यथार्थ सर्वस्वें उदारु । जळधरासारिखा[3] ॥२२॥ तरी मी मागतों तें मज द्यावें । कृपणपणें निष्ठुर न व्हावें । चित्त देऊनि ऐकावें । मी काय मागतों ॥ २३ ॥ मागणें इतुकेंच आतां । श्रवणीं बैसों नको दुश्चिता । समय टळोनि गेला तो मागता । येणार नाहीं ॥ २४ ॥ आतां सांगतों एक करीं । श्रवण होतां मन हें आवरीं । वणवण करीत दारोदारीं । हिंडूं देऊं नको ॥ २५ ॥ श्रवणाविषयीं आळस नसावा । बहु बोलणियाचा वीट न मानावा । यावा[4] क्रोधाचा आवरावा । विवेकबळें करूनी ॥ २६ ॥ मी जें सांगत कांहीं । येथें कुतर्क घेतां बरें नाहीं । औव्हाटा[5] विचारूनि पाहीं । ज्या दुःखदायका ॥ २७ ॥ म्हणसी कुतर्क काय येतो । तरी ऐक तेंही सांगतों । आणीक एक मागतों । शांतीसी अंतरूं नको ॥ २८ ॥ शांति म्हणों नये सुलभ । अरे हे ब्रह्मादिकांसी

१ मारुतीराय. २ जवळ. ३ मेघासारखा. ४ वेग. ५ आडवाटा.

दुर्लभ । शांतीसारिखा लाभ । आणीक कांहींच नाहीं ॥ २९ ॥ शांतीआड विघ्नें आहेती । ते मी सांगतों तुजप्रती । शांति केलिया आंगावरी येती । लहानथोर जन ॥ ३० ॥ तितुकेंही जरी साहिलें । तरी म्हणती मोठें वायां गेले । बोलतां बोलतां हिंपुटी[1] जाहलें । यासी लाजचि नाहीं ॥ ३१ ॥ तितुकेंही साहून शांति केली । तरी म्हणती कानकोंडा[2] घोणघाली[3] । ते समयीं यत्नें केली । पाहिजे शांति ॥ ३२ ॥ आतां कुतर्काचें लक्षण । तें तूं जाण आधार घेणें । सकळ ईश्वरअर्पणें । मन हें आवरावें ॥ ३३ ॥ सकळ इंद्रियांचा चालक । तो हा ईश्वर एक । मी काय बापुडा रंक । मन आवरूं जाणें ॥ ३४ ॥ ऐसा ग्रंथाचा आधार घेसी । आणि मना आलें तेंचि करिसी । तरी पुन्हा मागुता दुःख भोगिसी । मी काय करूं ॥ ३५ ॥ ईश्वर इंद्रियसुखदेता । आणि तोचि देत परमव्यथा । इतुकेंही करून अकर्ता । अलिप्तपणें ॥ ३६ ॥ कां ईश्वर चोरी करवितो । आणि मागुता तोचि सुळीं देववितो । परी जो दुःखें आक्रंदतो । तो ईश्वर म्हणूं नये ॥ ३७ ॥ तें दुःख प्राणियातें । अगत्य भोगणें लागतें । मग दुःखें दुखावतें । बापुडें अविवेकी ॥ ३८ ॥ इश्वरेंचि केलें सुख । आणि तेणेंचि निर्मिलें दुःख । परी दुःख होतां शोक । करी तो ईश्वर नव्हे ॥ ३९ ॥ तरी साधन कासया करावें । यमपुरींच सुख म्हणावें । जाऊनि रौरवीं पचावें । ईश्वर कर्ता म्हणोनी ॥ ४० ॥ आतां असो हें बोलणें । लालुची[4] करूनि आधार घेणें । तें आपुलेंच मन काय नेणे । परी डोळेझांकी करावी ॥ ४१ ॥ ऐसा कुतर्क आधार । तूं घेसील हो साचार । आळकेपणाचा विचार । करूं नको सर्वथा ॥ ४२ ॥ श्रवणाविषयीं सादर असावें । अभिमान-त्रिपुटी वेगळें व्हावें । सत्पुरुषासी शरण जावें । भावार्थबळेंकरूनि ॥ ४३ ॥ म्हणसी अभिमानत्रिपुटी कैसी । तरी ऐक सांगतों तुज ऐसी । सकळ सृष्टीमध्यें आपणासी । तुळे ऐसा ज्ञानी नाहीं ॥ ४४ ॥ मी एक ज्ञाता मोठा । ऐसा अभिमान खोटा । संतांसी पुसतां अंतरीं तोटा । येईल माझे ज्ञानासी ॥ ४५ ॥ मजपाशीं काय उणें । म्यां आणि दुसऱ्यासी पुसणें । संतमंडळींत लाजिरवाणें । नव्हे मज ॥ ४६ ॥ कां हो आमचे वोळीचें ज्ञान । वरकड सकळही अज्ञान । ऐसें बोलतां समाधान । सहसा नव्हे तुज ॥ ४७ ॥ थोर वोळी[5] ते आमुची । बहुत लांब पाहतां मुळींची । वरकड आंखुड वोळींचीं । अवतारी जाहलीं ॥ ४८ ॥ कां आमुचे वोळीचे समुदाव । बहुत आहे वैभव । बहुसाल आणि विश्व । कीर्ति जाणे आमुची ॥ ४९ ॥ झणीं

१ कष्टी. २ लाजिरवाणा. ३ दांभिक. ४ लोभाचा. ५ ओळ, रांग, सांप्रदाय.

भरिसी ऐशिये भरीं। भरतां समाधानाची बोहरी[1]। होऊनि जाईल क्षणाभातरा। अभिमान जडेल आंगीं ॥ ५० ॥ अभिमानास्तव जन्म घेणें। लागती पुनरावृत्ति भोगणें। तयांसी आणि थारा देणें। हें केवळ मूर्खपण ॥ ५१ ॥ बोली विचारितां ठावचि नाहीं । ज्ञान विचारितां नुरेचि कांहीं। देह विचारितां विदेही। होऊनि ठेला ॥ ५२ ॥ आभास तितका नासून जाईल। तेथें वैभवास कोण खाईल। ब्रह्मादिकेंसी सृष्टि होईल। नव्हतीच जैसी ॥ ५३ ॥ तेथें आम्ही तुम्ही संप्रदाव। हें बोलणेंचि अवघें वाव। एकपणाचाही भाव । शांत जाहला तेथें ॥ ५४ ॥ राम आणि रामदास। भजन भाव आणि विश्वास । ज्ञान वैराग्य आणि उदास। इतुकेंही संपलें तेथें ॥ ५५ ॥ शब्दीं तेथें म्हणों जातां। वोस तेथें विचारितां। म्हणोनि स्वरूप बोलतां । शंका वाटे ॥ ५६ ॥ शंका तितुकी निःशंका जाहली। सत्यचि पाहतां अनुभवा आली । म्हणोनी इतुकी बडबड केली। वाचाळपण करूनियां ॥ ५७ ॥ वाचाळ म्हणों तरी वाचा नाहीं। नाहीं म्हणों तरी उपजे कांहीं। नाहीं कांहीं हें सर्वही। आत्माराम ॥ ५८ ॥ आतां पाहे रामराणा । ना रे बा हें मज कळेना । मज कोणी जरी लेखीना[3]। तरी जनाची चाड नाहीं ॥ ५९ ॥ इति श्रीरामदास। विनवी आपण आपणियास। पुढें होऊनि सावकाश । श्रवणीं सादर असावें॥ ६० ॥ इति नवमः समासः ॥ ९ ॥ श्रीराम.

---

## १०. विविध शिकवण.

॥ श्रीराम ॥ रामदास येणें नामें । ग्रंथ केला आत्मारामें । श्रवण जालिया नेमें । धोके मात्र तुटती ॥ १ ॥ ऐक गा शिरोमणी । जेणें बैसावें निरूपणीं। तेणें बाष्कळ चावटीची काहणी । सांडिली पाहिजे ॥ २ ॥ अरे हें गर्भवास परम खोटें । ऐकोनि जयासी दुःख वाटे। तेणें श्रवणीं विषयवटवटे-। वेगळें व्हावें ॥ ३ ॥ जे जे आशंका उद्भवली। ते ते पाहिजे पुसिली। शब्दार्थीं वृत्ति गोंविली । पाहिजे धनावरी कृपण जैसे ॥ ४ ॥ मान अथवा अपमान । श्रवणीं बैसावें सावधान । एकाग्र याचा अभिमान । फुंजों नये ॥ ५ ॥ अरे श्रवणीं अभिमान केला। आणि उच्छेदिलें वक्तेपणाला। तेणें अगत्यरूप घाला। पडे स्वहितावरी ॥ ६ ॥ वक्ता बोलिला अप्रमाण भलतें। ऐकतांचि तत्काळ जाणावें तें। प्रगट न करूनि वक्ते। शरण जाऊनि पुसावें ॥ ७ ॥ पुसतांही अव्यक्त[4]

---

१ राखरांगोळी. २ जन्ममृत्यु. ३ मानीना. ४ स्पष्ट नव्हे असें.

बोलिला । तरी तो बुद्धिमंद न पुसावें तयाला । सत्त्वगुणी वक्ता असिला । तरी लीनतेनें पुसावें ॥ ८ ॥ लीनतेसारिखें रत्न । उदंड केला जरी प्रयत्न । तरी न जोडे यत्न । केला पाहिजे ॥ ९ ॥ लीनता अखड जयापाशीं । तेथें ठाव नाहीं क्रोधासी । लीनतेनें अभिमानासी । देशधडी केलें ॥ १० ॥ अतिलीनता जिहीं धरिली । त्यांची देहबुद्धि खंगोनि गेली । दिवसेंदिवस गृहासि आली । न [1]पाचारितां शांति ॥ ११ ॥ लीनता महत्त्वाचा थारा । लीनता पाषांडाचा मातेरा । करूनि टाकी एकसरा । नव्हतेंचि जैसें ॥ १२ ॥ कलह अत्यंत मांडिला । ऐसें जाणविलें लीनतेला । तेणें जरी प्राणी सांभाळिला । तरी कलह कैंचा तेथें ॥ १३ ॥ लीनता अंगीं धरावी । देहबुद्धि जीवेंचि मारावी । मग ये शांतीची करावी । न लगे चिंता ॥ १४ ॥ पद प्रास आणि व्युत्पत्ति । क्षराक्षरज्ञातीची संपत्ति । यदर्थीं वृत्ति फांकती । त्या फांकों नेदाव्या ॥ १५ ॥ व्युत्पत्ति असली तरी आपणासी काय । आपण धरावी अर्थाची सोय । अर्थ टाकूनि येर न्याय । करूं नये सर्वथा ॥ १६ ॥ लाधल्या त्वचाचि खावी । किंवा वस्तुचि टाकूनि द्यावी । कीं तयाची शोधावी । अंतरकळा ॥ १७ ॥ तरी बाह्यत्वचा ते व्युत्पत्ति । मग ते शब्दज्ञानस्फूर्ति । आणि बीजांतरीं ते अहंमति । तितुकीही त्यजावी ॥ १८ ॥ ज्ञान-रसायन सेविलें । जाणिवेनें बोलतां वमन केलें । हें इतुकें जरी चुकलें । तरीच बाणे तेज आंगीं ॥ १९ ॥ तुवां पूर्वींचे समासीं प्रश्न केला । त्याचें स्मरण आहे मजला । तरी तो आतां तुजला । सांगेन सावध होईं ॥ २० ॥ परी जें तुज मागीतलें । त्याचें उत्तर नाहीं आलें । तरी तुज मागतां कैसें वाटलें । तें यथार्थचि सांग आतां ॥ २१ ॥ देववेल कीं देववेना । किंवा लालूच वाटते मना । ऐसें यथार्थ सांगवेना । त्याशी बापाची आण ॥ २२ ॥ जरी तूं भिडेनें दाटसी । आणि तोंडीं प्रचीती हो म्हणशी । तरी उभय अर्थीं नाडसी । मग माझेंही कांहीं चालेना ॥ २३ ॥ इतुका आग्रह याचि कारणें । जें तूं वैराग्यें उणें । आणि तुज मुक्त करणें । हे प्रतिज्ञा आपली ॥ २४ ॥ एथें श्रोते आशंका घेती । बद्धताचि नाहीं मुक्ती । ऐसें जरी आक्षेपिती । तरी ऐक सांगतों ॥ २५ ॥ अज्ञान बापुडें काई । त्याची वार्ताही एथें नाहीं । परी जे शब्दज्ञानें [2]विदेही । त्यांची देहबुद्धि निंद्य ॥ २६ ॥ विदेही म्हणिजे देहातीत । तैसाचि तो जीवन्मुक्त । देहाशीं युक्त आणि अयुक्त । द्वंद्वीं सहिष्णुता जयाशी ॥ २७ ॥ आपणासी विदेही म्हणावें । म्हणोनि [3]दान्तिं करूनि

१ न बोलविता. २ शब्दज्ञानानें स्वतःस मुक्त समजणारे. ३ बाह्य इंद्रियांचें दमन.

सोसावें । ऐसे नव्हती ते स्वभावें । गुण त्यांचे ॥ २८ ॥ आतां दान्तिही होणार नाहीं । मा शांति कैंची असेल देहीं । ऐसें ऐकोनि तुवांही । तैसेंचि न व्हावें ॥ २९ ॥ शब्दीं देहातीत म्हणावें । आणि अपमान होतां चिणचिणावें । प्रतिष्ठेकारणें झुरावें । दुराशा धरुनी ॥ ३० ॥ जो या देहाचा पांगिला । आणि देहबुद्धि आंखिला[१] । तो बापुडा चेवला । समाधानापासूनी ॥ ३१ ॥ वेदशास्त्र सकळही पाहिलें । मन वैभवीं मग्न झालें । शब्दज्ञान पारंगत आलें । करतळामळकवत्[२] ॥ ३२ ॥ प्रपंच लटिका म्हणावा । आणि हव्यास वाटे देखोनि वैभवा । म्हणावें हा प्रारब्धठेवा । आम्हांसीं सोडिना ॥ ३३ ॥ नाना कुशलतेचीं वचनें । सांगोनि लुलु प्रतिपादणें । तयावरी घातलें घालणें । वैभवें पुढें ॥ ३४ ॥ पंडित आणि ब्रह्मज्ञानी । विभव आणि सकळ मानी । थोर थोर शिष्य जनीं । तेही वैभवाचे ॥ ३५ ॥ ऐसे वैभवें भुलले । आणि आधार घेऊं लागले । तयांप्रति कांहीं न चाले । ब्रह्मादिकांचेंही ॥ ३६ ॥ जैसा मैंदांचा[३] मेळा । ब्रह्मवर्चस्वाची कळा । अंतरीं पैशाचा जिःहाळा । उदर भरायालागीं ॥ ३७ ॥ परी आपुलें नेणतीच अधःपतन । देहलोभें नागविले पूर्ण । दुष्कर्म अति कठिण । त्यांचें त्यांसीच न कळे ॥ ३८ ॥ ब्रह्मादिकांचें न चले जेथें । सज्जनीं काय करावें तेथें । आप आपणा जाले हंते[४] । त्यांसी कोणें पां निवारावें ॥ ३९ ॥ काव्य कुशलतेचें केलें । आणि मन वैभवीं गुंतलें । तयांसी प्रत्यक्ष चाळविलें । ज्ञान देऊनि ईश्वरें ॥ ४० ॥ जंववरी विषयासक्त मन । तंववरी रामानुसंधान । न घडे सर्वथा जाण । म्हणोनि ईश्वर वंचिला[५] ॥ ४१ ॥ जैसें षड्रस अन्न पचविलें । आणि क्षुधितासी जेऊं घातलें । आपण शब्दींच भोजन केलें । तेणें काय तृप्ति घडे ॥ ४२ ॥ कां पिंडते अंधार पडला । शब्दीं दीपामागें दीप आणिला । परी किंचित् तत्त्वीं जाला । उजेड तेणें ॥ ४३ ॥ तैसे शब्दज्ञानें लटिके धाले । परी मूर्ख नेणतीच चुकले । आधार घेऊं लागले । म्हणोनियां ॥ ४४ ॥ आधार घेतां बरें वाटे । परी अंतीं दुःखें जाण फुटे । धोका येऊनि आपटे । क्रिया केली तयेची ॥ ४५ ॥ मग धोका आवरेना । परती केला तरी होईना । तेव्हां कांहींच चालेना । प्राणी भांबावों लागे ॥ ४६ ॥ ते काळीं पस्तावा घडे । आपुलेंचि मन फिरूनि पडे । समाधान समूळ उडे । नव्हतेंचि जैसें ॥ ४७ ॥ या कारणें महानुभावीं । पूर्वींच लालूच न करावी । विवेकबळें तोडावी । आधारबेडी ॥ ४८ ॥ श्रोतीं सावध ऐकावें । मजला अभिमानी म्हणावें । तरी आपुलें करूनि

१ अंकित. २ तळहातावरील आवळ्याप्रमाणें स्पष्ट. ३ फासेगारांचा. ४ मारक. ५ दुरावला.

घ्यावें । समाधान तुम्हीं ॥ ४९ ॥ राज्यपदवी टाकिली । आणि भिकेची लालूच केली । तेणें राज्यपदवी गेली । झोळी धरितांचि करीं ॥ ५० ॥ जेणें राज्य सांडोनि झोळी घ्यावी । तेणें घरोघरीं फेरी घालावी । तैसें स्वसुखें सोडोनि धरावी । लालूच विषयीं ॥ ५१ ॥ जैसा शब्दवृत्तीचा । राजा म्हणती सकळ वाचा । विचार पाहतां तयाचा । तों भिक्षेसीच संबंध ॥ ५२ ॥ कां कुबेर नांव ठेविलें । बापुडें मोळ्या वाहतचि मेलें । विचारितां तें नागवलें । व्यर्थचि पाहीं ॥ ५३ ॥ कां लक्ष्मीच्या नांवाचा सोहळा । मायबापाशीं लोभाचा कळवळा । भीक मागती वेळोवेळां । ते अवकळा नव्हे ? ॥ ५४ ॥ तैसें विदेही म्हणावें । आणि वैभवाकारणें हळहळावें । राजहंसें शेण खावें । हे विटंबना ॥ ५५ ॥ अमर म्हणवी त्यासी मरणें । सकळकळा ओनामा नेणे । बत्तीसलक्षणी लाजीरवाणें । नाकेंविण नव्हे ? ॥ ५६ ॥ आचार्य नांव जयासी । आचमन करितां न ये त्यासी । सुंदर म्हणावें तयासी । असे कपाळीं कुष्टता[1] ॥ ५७ ॥ ईश्वर अभिधानाचा गौरव[2] । ज्ञान विचारितां शून्य स्वयमेव । तैसा विदेही म्हणवी त्यासी हांव । दृढ देहबुद्धीची ॥ ५८ ॥ व्याघ्र[3] नामाचा आळ आला । आणि तो पालीनेंचि भक्षिला । तैसा विदेही म्हणवी तयाला । देहबुद्धीनें मारिलें ॥ ५९ ॥ तैसेपरी मुक्त आणि बद्ध । हें बोलणेंचि अबद्ध । परी जे कोणी स्वयें सिद्ध । तयांसी साजे ॥ ६० ॥ साजे परी बोलों नेणती । बोलण्याची कोणी एक व्युत्पत्ती । आहे नाहीं म्हणावें काय चित्तीं । समजूं नये ॥ ६१ ॥ आतां असो हें बोलणें । आहे आशंका सांगणें । यदर्थीं तुवां चित्त देणें । शिष्यराया ॥ ६२ ॥ इति श्रीरामी-रामदास म्हणे । पुढें सावध होऊनि परिसणें । अर्थ जीवीं घेतलिया होणें । संदेहा वेगळें ॥ ६३ ॥ इति दशमः समासः ॥ १० ॥ श्रीराम.

---

## ११. प्रारब्ध-प्रयत्न.

॥ श्रीराम ॥ जैशा दशावतारीं माधवी । एक सांगतां एकचि भावी । आणि उफराटें वेडा लावी । मुख्य नायकासी ॥ १ ॥ तैसें तुवां न करावें । मी बोलतों कवण्या भावें । ते विषयीं मन घालावें । आधार[4] सोडूनी ॥ २ ॥ मी बोलतों परी शंका वाटे । कां जे तुज आधार न तुटे । आधार घेतां सुख वाटे । परी तो दुःखदायक ॥ ३ ॥ वैद्यें औषध दिधलें । आणि पथ्यही सांगितलें । पथ्य सोडूनि कुपथ्य केलें । तरी काय बोल वैद्यासी

१ कोड. २ मोठेपणा. ३ एक किडा. ४ आपलीं थोरवी विसरून.

॥ ४ ॥ कुलाकुल वांया गेलें । झक माराया पथ्य मोडिलें । तें औषध मारक जालें । कुपथ्य करितां ॥ ५ ॥ तैसे भवरोगी बहुत खंगले । त्यांसी सज्जन वैद्यें आपंगिलें । ज्ञानरसायन दिधलें । जेणें तत्काल पालटे ॥ ६ ॥ अरे पथ्य चालवावें । विधियुक्त चुकों नेदावें । लालचेनें कुपथ्य न घ्यावें । आधारबळें भलतेंचि ॥ ७ ॥ जरी जीव धाविन्नला । तरी पाहिजे आवारिला । ऐसें करितां तुजला । अमरचि करीन ॥ ८ ॥ ऐसें वैद्यें सांगीतलें । चित्त देऊनि ऐकिलें । बरें बरें म्हणोनि दिधलें । आश्वासन ॥ ९ ॥ वैद्य जवळूनि गेला । आणि जीव कुपथ्या धाविन्नला । आवरी असतांही जाला । आधार एक ॥ १० ॥ माय धांवूनि कळवळा करी । म्हणे जीव धाविन्नला जयावरी । तें जरी खादलें तरी । दुरी होईल व्यथा ॥ ११ ॥ विषयी म्हणती बरें बरें । तेव्हांचि नाडिलें आधारें । वैद्य सांगूनि गेला तें खरें । न मानितीच कोणी ॥ १२ ॥ तयासि मंदबुद्धीस्तव । वैद्याचा उपजला[3] अभाव । देखोनि कुपथ्याचें वैभव । तेथें निमग्न जाले ॥ १३ ॥ तेणें भवव्यथा जडावली । उफराटी सुजी धाविन्नली । सकळ म्हणती कां केली । क्रिया ऐसी ॥ १४ ॥ आंग अवघें सुजोन फुटलें । दुर्गंधीनें गळों लागलें । ते समयीं जाणवलें । तो आधार खोटा ॥ १५ ॥ नाना विकल्पाचे किडे । चुळबुळ करिती मागें पुढें । मग भोंवतें पाहे पुढें । केवीलवाणं ॥ १६ ॥ हात ठणठण फुटती । सर्वांगीं तिडका उठती । स्वजन देखोनि पळती । दुर्गंधी घेववेना ॥ १७ ॥ प्राणी कष्टला थोर । हा कुपथ्याचा विचार । काळजीं बैसले बाहेर । धोके आदळती ॥ १८ ॥ तुज सांगतों या कारणें । आधार तुवां न घेणें । पुनःपुन्हा हेंचि बोलणें । तुजनिमित्त घडलें ॥ १९ ॥ ये कलियुगीं आत्मबोध । तयाचा मांडिलासि विनोद । चवढ जाली उदंड खेद । वर्णसंकर आरंभिला ॥ २० ॥ सत्वगुण निःशेष बुडाला । आणि अभिमान प्रकट जाला । शांति क्षमा सद्वृत्ती यांला । कोणीच आपंगीना ॥ २१ ॥ दुकाळ पडला भावार्थाचा । विश्वास दृढ कैंचा । विवेक आणि वैराग्याचा । फड मोडोनि गेला ॥ २२ ॥ स्वधर्माचा लोप जाला । अधर्मी जन प्रवर्तला । स्वइच्छा गोंधळ घातला । कलीनें सावकाश ॥ २३ ॥ सत्य सांगतां अविश्वास । असत्याचा वाटे विश्वास । जैसे राजहंस सांडोनि वायस । आचारशीळ म्हणती ॥ २४ ॥ भक्ति अवघी बुडाली । आणि अभक्ति ठाकिली । अनीति येतां निघोनि गेली । नीतिमर्यादा ॥ २५ ॥ निराशचा अवगम[4] जाला । आशापाशीं प्राणी गुंतला । विषय

१ पाळिलें. २ मन. ३ अविश्वास. ४ उद्भव.

न वचे टाकिला । आळकेपणेंकरुनी ॥ २६ ॥ शब्दज्ञान उद्दंड जालें । कवित्व घरोघरीं केलें । समाधान निःशेष गेलें । हरपोनियां ॥ २७ ॥ हरिदासंसाहित्य वोढवलें । हरिदास्य सांडोनि कळावंत जाले । देव सांडोनि फिरों लागले । मनुष्यांभोंवते ! ॥ २८ ॥ ज्ञानियासि जाली वादशक्ति । राहिली सप्रेम भक्ति । भक्तिच नाहीं मा मुक्ति । कैंची असेल तेथें ॥ २९ ॥ करूनि नाना उपाव । केला संस्कृतीं रिघाव । तेथें जडला अहंभाव । जाणिवेचा ॥ ३० ॥ भक्त भाविक तितुके निमाले । सत्त्वाचे सज्जन विश्रांती पावले । ईश्वरेंही डोळे झांकिले । बौद्ध होऊनि बैसला ॥ ३१ ॥ स्त्रिया भ्रतारासि सदा । सेवा न करितां पेटती द्वंदा । पुत्रीं टाकिली मर्यादा । मायबापांची ॥ ३२ ॥ अरे मनुष्यें तीं लोपलीं । आणि कातरें तितुकीं उरलीं । समस्यां होती ते निघोनि गेली । नव्हतीच जैसी ॥ ३३ ॥ ऐसें अवघेंचि पालटलें । पूर्व वर्तमान तितुकें राहिलें । पुढें याहूनि होईल जालें । नाहींच अद्यापि ॥ ३४ ॥ इतुकें सांगणें याचि कामा । जे तुवां उल्लंघावी आधारसीमा । आणि आपुलिया निजधामा । मार्गस्थ व्हावें ॥ ३५ ॥ आहे विष आणि अमृत । आहे शीतळ आणि संतप्त । आहे मोक्ष आणि बद्धत्व । अज्ञान जें ॥ ३६ ॥ आहे मूर्खत्व आणि विवेक । आहे स्वर्ग आणि नरक । राजपदवी आणि रंक । उंच नीच जे ॥ ३७ ॥ आहे पाषाण आणि पेठे । आहेत मनुष्य आणि रानटें । श्वापदें जीं अति उद्धटें । जीं भक्षिती तत्काळ ॥ ३८ ॥ आहे वाट आणि अव्हाट । आहे वैराग्य आणि विषयचट । आहे समाधान आणि खटपट । पाखांडमत जें ॥ ३९ ॥ आहे महातीव्र जाळ । आहे चंदन सुशीतळ । आहे पवित्र आणि अमंगळ । अनाचार जो ॥ ४० ॥ आहेति सुपति आणि सऱ्हाटे । रंभाफळें आणि कांटे । आहे वस्त्र आणि शस्त्रें तुटे । आंग जेणें ॥ ४१ ॥ असो ऐसें उदंड आहे । एक साहे एक न साहे । हें तूं विचारूनि पाहे । शिष्यराया ॥ ४२ ॥ क्षीरनीरा निवाड करी । राजहंस जीवन अव्हेरी । चंचुवा दुग्धचि भरी । चातुर्यनिधि जो ॥ ४३ ॥ कां परीक्षवंतें परीक्षावें । खरें घेऊनि खोटें टाकावें । कां कवंठ त्यजूनि खावें । नारिकेळ जैसें ॥ ४४ ॥ कां ईक्षुदंड भक्षावा । रस तितुका शोधून घ्यावा । बार्कस टाकूनि द्यावा । अप्रयोजनी जो ॥ ४५ ॥ कावाडा होती सिद्ध होते । तयाची त्वचा काढितां भाते । लोभें कां तया पावकातें ।

१ हरिदासाला लागणारी अवांतर व्यवस्था लावली. २ सरली. ३ भेकड प्राणी. ४ शक्ति ( हंसकोश ); शंका ( कुंटे ज्ञानेश्वरी ११–९२ ). ५ आडवाट. ६ नारळ. ७ ऊंस. ८ साली. ९ निरर्थक.

सेवूं नये सर्वथा ॥ ४६ ॥ पावकेंविण कार्य चालेना । भग्न होतां देह वांचेना । पतंगासी जैसें पतना । दीपा संघटणी होतां ॥ ४७ ॥ ऐसें हें किती सांगावें । परी घेववे तेंचि घ्यावें । हें काय आपुल्या जीवें । जाणिजेत नाहीं ॥ ४८ ॥ येथ मोठा आधार प्रारब्धाचा । हाचि थारा प्राणिमात्राचा । धरूनियां प्रयत्नाचा । आळस केला ॥ ४९ ॥ प्रपंचीं प्रयत्न करावा । आणि परमार्थी आधार घ्यावा । तरमूळपणें[1] प्रयत्न न करावा । हें काय बरें ॥ ५० ॥ प्रारब्धें घडला उत्तम भोग । प्रारब्धेंचि जडला रोग । रोग जडलिया औषधप्रयोग । करणें नलगे ॥ ५१ ॥ व्यथेसी देखोनि कुसमुस वाटे । प्रयत्नाकारणें प्राण फुटे । तेव्हां जरी प्रयत्न करणें सुटे । तरी आधार घ्यावा ॥ ५२ ॥ कां परचक्र आलें गाढें । सकलराष्ट्राचें जालें गुढें । तेव्हां लागवेग नेतां पुढें । कां पां जावें ॥ ५३ ॥ कां गृहासी आग लागली । देखोनि कां बोंब केली । लोकांची मांदी मेळविली । आगी विझवाया कारणें ॥ ५४ ॥ तैसी परमार्थी बोंब मारावी । कांहीं काढाकाढी करावी । हळू हळू सोडवावी । मिठी प्रपंचाची ॥ ५५ ॥ प्रपंच घडका पेटला । मध्यें परमार्थ जळूनि गेला । ऐसें देखोनि तुम्हांला । कैसें बरें वाटतें ॥ ५६ ॥ मुक्ताफळ आणि दिव्यांबर । नाना वस्तूंचें भांडार । भस्म करूनि वैश्वानर । विझोनि जाई जेंवी ॥ ५७ ॥ तैसा प्रपंच हा परमार्थासी । जाळोनि भोगूं नेदी आपणासी । आयुष्य गेलिया प्राणियासी । विमुख होय ॥ ५८ ॥ जरी हा प्रपंच शाश्वत जाणतों । तरी आम्ही यासीच धरितों । हा अशाश्वत म्हणोनि रडतों । तुम्हांभोंवतीं ! ॥ ५९ ॥ तुम्ही कैसे रे परमार्थी । परघात आणि अपस्वार्थी । डोळे झांकूनि दोहीं अर्थी । नागवलेत कीं रे ॥ ६० ॥ परमार्थाचा आळ आला । प्रपंच गळां पडला । वास[2] कोट जाला । जनक विदेही ![3] ॥ ६१ ॥ क्रिया असो भलतैसी । आड करिती तयासी । क्रिया नसतां मानसीं । शंका धरा ॥ ६२ ॥ विदेहाचा आधार घ्यावा । आणि देह आपुला मानावा । स्तुति बरी वाटे जीवा । देहाची होतां ॥ ६३ ॥ स्तुति होतां आनंदला । तो निंदा होतां रडला । या दोहींमध्यें न सांपडला । तोचि धन्य ! ॥ ६४ ॥ प्रपंच अवघा करावा । परी क्रोध तरी आवरावा । क्रोधाचा नावरे यावा[4] । तरी मी काय सांगों ॥ ६५ ॥ माझ्या देहासी मान व्हावा । मज अवघींच नमस्कार करावा । नमस्कार न करीतां यावा । क्रोधाचा आवरेना ॥ ६६ ॥ कासया सांगतां परमार्थगोष्टी । व्यर्थ

१ डोळेझांक करून. २ मार्ग, आधार. ३ जनक राजाचा म्हणजे त्यानें राजोपभोग भोगल्याचा दाखला पुढें करितात. ४ आवेश.

करितां कपाळकुटी । वृन्दावनफळासारखें पोटीं । कालकूट भरलें असे ! ॥ ६७ ॥ पूर्वीं संतसमुदाय होता । त्याची क्रियाही ऐकतां । परी कांहीं तरी वर्ततां । तयासारिखे तुम्ही ॥ ६८ ॥ अरे बा परमार्थ घालमेली । बरें वाटे जरी स्तुति केली । निंदा करितां हानि आली । आपुले महंतीसी ॥ ६९ ॥ येरयेरांची स्तुति करावी । आणि आंगावरी बळेंचि ओढूनि घ्यावी । जैसी विष्ठेसि लावावी । उटी चंदनाची ॥ ७० ॥ देहाची स्तुति करी कीं । तरी तुम्ही देह धारक प्राणी व्हाल कीं । लटकाचि परमार्थ लौकिकीं । महत्त्वाकारणें ॥ ७१ ॥ उरी देह हा निंदिला । तरी काय परमार्थ बुडाला । जवळूनि विवेकाला । देशधडी केलें ॥ ७२ ॥ तुम्ही शिष्य नव्हे रे परमार्थबुडवणें । झुरतां प्रतिष्ठेकारणें । शेवटीं प्रतिष्ठा ठाकून जाणें । न घडे नेणवे तुम्हांसी ॥ ७३ ॥ आतां कांहीं सार्थक करावें । देहबुद्धीपासोनि सुटावें । देहबुद्धि न जातां स्वभावें । परमार्थी कानकोंडे ॥ ७४ ॥ कठिण ऐकुनि जो चिणचिणिला । तयावरी लंगडा जुलूम जाला । काय करूं मी तयाला । कांहींच न चले ॥ ७५ ॥ बोलणें कठीण ऐकिलें । कीं वाईट लागलें । मुखश्रीचें चिन्ह पालटलें । ते देहबुद्धि नव्हे ? ॥ ७६ ॥ बोलत असो लक्षी अदेखणेपणें । तरी हें आत्माराम जाणे । मानवी उत्तरें कठिणें । तितुकेंचि जाणती ॥ ७७ ॥ हित सांगतां दुःख वाटे । तयाचें जाणावें प्रारब्ध खोटें । कांहीं केल्या न सुटे । देहबुद्धि बेडी ॥ ७८ ॥ तूं तरी चौं देहां वेगळा । तरी कां[1]रे स्थूळाचा कळवळा । धांवूनि येतो वेळोवेळां । मैंद[2] माउसीसारिखा ॥ ७९ ॥ मागें पदार्थ जाला तो बरा । परी आतां तरी विचार धरा । यदर्थीं तटावला[3] तोचि खरा । रामीरामदास म्हणे ॥ ८० ॥ डगमगले तिहीं उठूनि जावें । उरले तिहीं सावध ऐकावें । आतां येथूनि लुटावें । मोक्षाचें भांडार ॥ ८१ ॥ इति श्रीरामीरामदास आतां । सांगेल आशंका श्रोतां । एकचित्त होऊनि ऐकतां । सुखदुःखावेगळे ॥ ८२ ॥ इति एकादशः समासः ॥ ११ ॥ श्रीराम.

---

## १२. संतस्तवन.

॥ श्रीराम ॥ स्वामी बोलले तें बरवें । परी मज एक आठवलें स्वभावें । तें मज आठवतां बोलावें । परी आज्ञा स्वामींची पाहिजे ॥ १ ॥ अरे शिष्या आशंका उद्भवली । ते अगत्य पाहिजे पुसिली । हे आज्ञा आम्हीं

---

१ लबाड. २ प्रेमाच्या माणसासारखा. ३ टिकून राहिला.

दीधली । पंहिलींचि[1] तुज ॥ २ ॥ जरी माझी मर्यादा धरिसी । तरी तूं स्वहिता अंतरसी । या कारणें मानसीं । शंका धरूं नको ॥ ३ ॥ आधींच कायसी मर्यादा । सदीस[2] बैसलों संवादा । निरसिलें नाहीं तुझिया भेदा । तोचि मी स्वामी कैसा रे ॥ ४ ॥ तुज समाधान नव्हेल । तुज बरें न वाटेल । कीं जेथें समाधान होईल । तोचि स्वामी तुझा ॥ ५ ॥ परमार्थीं विचारितां कांहीं । सर्वथा बळात्कार नाहीं । पाडिलें बळात्कारप्रवाहीं । तरी तो परमार्थ नव्हे ॥ ६ ॥ हें बोलणें एतन्निमित्त घडलें । जें तुज शिष्यपण आलें । जेधवां तुज समाधान जालें । तेव्हांचि शिष्य आपुला ॥ ७ ॥ ऐक आमुची आज्ञा ऐशी । मर्यादा टाकावी आम्हांसी । काय आठवलें तुझ्या मानसीं । ते आशंका घेई आतां ॥ ८ ॥ स्वामींची आज्ञा प्रमाण । परी माझे ठायीं मूर्खपण । आज्ञाप्रमाण विज्ञापन । करीन चरणांपुढें ॥ ९ ॥ स्वामी मजकारण बोलती । परी येथें संतांचे गुण क्षुद्र दिसती । इतुकीच आशंका होती । ते बोलिलों स्वामी ॥ १० ॥ अरे संतांसी गुण कैंचे । ते निर्गुण ठायींचे । गुणागुण हे मायेचे । संत निराळे मायेहूनि ॥ ११ ॥ आळ आला संतनामाचा । पार नेणवे त्यांच्या स्वरूपाचा । जेथ खुंटल्या चारी वाचा । तेथ मी रंक कोणी-कडे ॥ १२ ॥ स्तवन करी वेदश्रुती । परी न वर्णवे स्वरूपस्थिती । तेथ क्षुद्र मी कैंची दीसती । मज मानवियाचे[3] बोलें ॥ १३ ॥ संत विश्वाचे मायबाप । संतांसी नाहीं पारखे आप[4] । रूप आणि अरूप । यांही वेगळे जे ॥ १४ ॥ संतांसी गर्व नाहीं । संत निंदा न करिती कांहीं । निष्ठुर कधींही । प्राकृतासारखे नव्हेती ॥ १५ ॥ संत वेदशास्त्रसंपन्न । तयांपुढें बोलतां अज्ञान । श्रवण होतां धरिती मौन । आदरें सादरें ऐकती ॥ १६ ॥ संत दोष आच्छादिती । आपण स्वयें न करिती । मर्यादा उल्लंघितां न येती । देहबुद्धि सर्वथा ॥ १७ ॥ संत शांतीचे सागर । संत सर्वस्वीं उदार । ज्ञान वरुषते जलधर । सर्वस्वावरी ॥ १८ ॥ संत अभावाचे[5] काळ । संत वैराग्याचे वडवानळ । संतांसी हा भवमळ । स्वप्नींही लागूं न शके ॥ १९ ॥ अहंकारगज डुल्लती । जंववरी संतसिंहाचे चपेटे न येती । थापा मारूनि विदारिती । गंडस्थळें तयांचीं ॥ २० ॥ स्तुति अथवा निंदा केली । तये मायेसीच लागली । ते ऐकतां देहबुद्धि आली । तरी तो देहधारक प्राणी ॥ २१ ॥ देहमात्र तितुका निंदिला । तेथ स्थूळ[6] लोभी कैंचा वांचला । लंडीच्या युद्धासि गेला । तो मोडतां

१ पूर्वींच. २ सद म्ह० सभा. ३ मनुष्यांचे. ४ आपपरभाव. ५ अभाव म्ह० भाव (पदार्थ) नव्हे तें, असत्. ६ देहाचा लोभ.

वेळ नाहीं ॥ २२ ॥ विष्ठा तितुकी दुर्गंध । नृपतीचे विष्ठे सुगंध । ऐसें ऐकता सुबुद्ध । मानीतना सर्वथा ॥ २३ ॥ वाईट म्हणतां क्रोधासि यावें । तरी त्याचें रूप तें जाणावें । मग त्यासी काय भिऊनि म्हणावें । तुम्ही सत्पुरुष म्हणोनि ॥ २४ ॥ मोठें भय स्थूळासी । तरी स्थूळ कैंचें आम्हांसी । हें जायाचें[1] म्हणोनि रामासी । अनन्य शरण गेलों ॥ २५ ॥ स्थूळाआंगीं शब्द आदळ । संत त्याहूनि निराळे । त्यांचा अंत मायेसी न कळे । बापुडी लटकीच हे ॥ २६ ॥ आपुलें नव्हे आणि लालुच केली । तरी प्रारब्धें नव्हती पालटलीं[2] । ऐसेंही जाणोनी स्थूळाशा धरिली । ते पढतमूर्ख जाणावे ॥ २७ ॥ स्थूळाचें पांगिलें नसावें । होईल तसें कौतुक पहावें । आपण निंदेसि न प्रवर्तावें । आदरें करूनी ॥ २८ ॥ अरे शिष्या परमार्थ बुडाला । परमार्थवेषें प्रपंच जाला । स्थूळ हें निंदिता बहुसालां । विषाद येतो ॥ २९ ॥ विषाद अभिमानाचें मूळ । विषाद अविवेकाचें स्थळ । विषाद येतो तेंचि केवळ । अज्ञान जाणावें ॥ ३० ॥ विषाद आला रावणाला । म्हणोनि सहपरिवारें निमाला । विषादें तयां कौरवांला । वेढा[3] लावूनि मारिलें ॥ ३१ ॥ विषाद प्राणी आवरूं नेणती । विषादेंचि देशधडी होती । विषादें जीवें मारिजेती । परस्परें जिवलग ॥ ३२ ॥ विषाद परमार्थबुडवणा । विषाद आडताळा निरूपणा । विषादें संवादींच्या खुणा । हिरोनि नेल्या ॥ ३३ ॥ शिष्या देह हें लटिकें वाटतें । परी हें बहुत रे वेढा लावितें । आणि अंतीं जातें । रांडिचें अमंगळ ॥ ३४ ॥ तूं जरी विवेकी होसी । तरी देहपांगीहुनि सुटसी । जरी विवेका दुव्हावसी । तरी नाटोपे देहपांग ॥ ३५ ॥ जैसा अंकुशोंविण दंती[4] । कां प्रधानाविण भूपाति । तैसी विवेकाविण शांती । होणार नाहीं ॥ ३६ ॥ ज्याचा क्रोध अति लाडका । तेथ उरी[5] नाहीं विवेका । जैसें बकवायसउलूकां[6] । मध्यें हंस एकटां ॥ ३७ ॥ तैसे काम क्रोध मद मत्सर । अभिमान तिरस्कार । ऐसीं अमंगळें मिळतां अपार । विवेकस्थान भ्रष्ट होय ॥ ३८ ॥ जेणें हा देह निंदावा । तो आपुला आप्त जाणावा । तो निंदक वानावा । विवेकबळें करूनियां ॥ ३९ ॥ आम्ही देहासी निंदितों । आणि आम्हांसि जो साहाय्य होतो । आपणासी जो उपेगा येतो । तो आपला परम सखा ॥४०॥ विवेंक सांगतां तुज मानलें । परी तैसेंचि पाहिजे वर्तलें । आपुलिया गुणदोषा जाणीतलें । पाहिजे

१ नाशवंत. २ स्थूळ आपलें नसून त्याचा लोभ धरिला तरी प्रारब्ध कांहीं त्याच्यांत भेद करूं शकत नाहीं. ३ गोंवून, ममत्वांत गुंतवून. ४ हत्ती. ५ बाकी. ६ बगळे, कावळे, घुबडें यांत.

तुवां ॥४१॥ गुण देखोनि अंगीकारावे। अवगुण देखोनि आपुले त्यजावे। अध्यात्मग्रंथ श्रवण करावे । आदरेंकरूनि ॥ ४२ ॥ ग्रंथ ऐकतां ऐकतां। निश्चयो पाविजे तत्वतां। हेंही एक साधन आतां। सांगतों तुजलागीं ॥४३॥ श्रवणीं बैसतां दिवसेंदिवस। परमार्थी उपजे हव्यास। परी श्रवण मनन निदिध्यास। केले तरी हो ॥ ४४ ॥ देखोवेखीं[1] नित्यकर्म। करूनि निरूपण चुकसी वर्म। प्रतिदिनीं आमुचा नियम। जें निरूपण करावें ॥४५॥ तें वर्म जाण दुणावलें। ईश्वरें ओझें घातलें। कां तें शब्दज्ञान आलें। वाचाळपण करावया ॥ ४६ ॥ श्रवण केलिया क्रिया पालटे । दिवसेंदिवस देहबुद्धि सुटे। तरीच हें भवमूळ तुटे। अनंतजन्मांतरींचें ॥ ४७॥ भक्ति ज्ञान वैराग्यज्ञान। तोचि ग्रंथ समाधान । शृंगारिक ऐकतांचि मन। घालूं नको सर्वथा ॥ ४८ ॥ शृंगारिक ऐकतांचि कांहीं। समाधान होणार नाहीं। हें तूं विचारूनि पाहीं। खरें कीं खोटें ॥ ४९ ॥ शृंगारिक श्रवण करावें । तेथ साधकें काय ध्यावें । सिद्ध समाधानापासूनि चेवावें। रसवृद्धि[2] लाधलिया ॥ ५० ॥ जन्ममृत्यूची यातना। परमदुःख भोगवेना । म्हणोनि शरण जावें सज्जना । सार्थक करावया ॥ ५१ ॥ तेथ शृंगारिक आर्त[3] पोटीं। कां वादविषयक कपाळकुटी। जैसी दिव्यां[4]-बरांस बोरांटी[5]। वरबडूनि गोवी ॥ ५२ ॥ तैसा परमार्थ पोटास आला। उपाय तोचि अपाय आला। तैसें तया साधकाला । रसवृत्तीनें केलें ॥ ५३ ॥ आतां तुजा प्रपंच जे क्षुद्र दिसती। तरी क्षुद्र आभासीं झोंबूनी पडती। आभास निराभास दोहींच्या अंतीं । क्षुद्रासी ठावचि नाहीं ॥ ५४ ॥ क्षुद्रा ऐकतां दुश्चित मन। तेथें कैंचें समाधान। प्रतिष्ठा वैभव आणि मान। तेथचि वृत्ति गुंतली ॥ ५५ ॥ सकळ सृष्टीसी सोसणी[6]। कायसी करावी बैसोनी । परी तितुकें तुजलागूनी । बोलणें घडलें ॥ ५६ ॥ इति श्रीरामीरामदास । हाका मारितो उदास । विवेकी असती तेंही विशेष। सहसा मानूं नये ॥ ५७ ॥ इति द्वादश समासः ॥ १२ ॥ श्रीराम.

---

## १३. मीपणनिरसन.

॥ श्रीराम ॥ शिष्या ऐक रे मीपण। पुसिलें तयाची सांगतों खूण। वृत्ति फांकों नेदी, तीक्ष्ण। अतिशयेंसी करीं ॥ १ ॥ जेणें मीपणाचें मूळ

१ एकमेकांचे पाहून लोकाचारासाठीं. २ शृंगाररसाची वाढ झाली कीं. ३ आवड. ४ उंची वस्त्रांस. ५ कांट्याची फांदी. ६ विचार.

छेदिलें। तयासीच स्वसुख लाधलें । मीपणाचें तुटोनि गेलें । अनु-संधान ॥ २ ॥ जैसें रत्न मोलें घ्यावें। आणि बांधोनि उगेंचि ठेवावें। परीक्षा न करितां रडावें। लागेल पुढें ॥३॥ तेंचि रत्न जरी परीक्षविलें। तरी खोटें जाऊनि खरें जालें । खोटें ऐकतांचि टाकिलें । उभाउभीं हातींचें ॥ ४ ॥ कां जैसें आपुलेंचि ठेवणें। पुरिलें असोनि भीक मागणें। उकरायाचा आळस करणें। कोणीं उकरावें ॥ ५ ॥ कां धैर्य धरूनि उकरूं जाय। परी अव्हासाव्हांच[1] उकरूनि पाहे । तरी ते कैसें पां या लाहे। भूमि चाळल्यावांचोनी ॥ ६ ॥ कां आळशी जेऊं बैसला । जरी कोणीं तोंडांत घांस घातला । तेथ जरी आळस केला । तरी चावावें कोणीं ॥ ७ ॥ त्यासी अन्न असतांचि दुकाळ । उपवासी मेला असोनि सुकाळ। तैसा तो अविवेकी केवळ । समाधान असोनि नाहीं ॥ ८ ॥ तैसें आळसें नागविलें। नाहीं मीपणाचें मूळ शोधिलें। आहाच दृष्टीनें[2] पाहिलें। झांकाथापा करूनी ॥ ९ ॥ थिल्लरोदकाचे[3] उत्पतीचा । कोण जाणे शोध तयाचा। तैसा अंत मीपणाचा। कृत[4] असोनि नाहीं ॥ १० ॥ तैसें लटकेंचि मी रे मानिलें। परी त्याचें मूळ नाहीं शोधिलें। परीक्षा न करितांचि धरिलें । मानसीं सुदृढ ॥ ११ ॥ ज्यासी मीपण खोटें वाटलें। तेहीं पाहोनि सुख घेतलें । त्याचें बदलूनि दिधलें । मीपण ईश्वरें ॥ १२ ॥ आतां तुम्ही आम्ही विचार धरूं । मीपणाची चालना करूं। मीपण तारू अथवा मारू। फडफडल्यासारिखा ॥ १३ ॥ पात्रासी जैसा आकार । आकाश जाहलें तदाकार । उंच नीच लहान थोर। आपणही भासे ॥ १४ ॥ कां पाषाण पाथरें घडिला। देव आणि वरवंटा केला। परी त्याच्या पाषाणपणाला। तोटा न ये कीं ॥ १५ ॥ कां लेंकरें खळ खेळती। मृत्तिकेच्या नाना व्यक्ती[5]। केल्या तरी अंतीं। मृत्तिकाचि आहे ॥ १६ ॥ ऐसें बोलतां उदंड आहे। परी मातीपण सारिसेंचि पाहे। उंच नीच केलिया न साहे। वियोग तयाचा मीपणाशीं ॥ १७ ॥ तैसें मीपण हें एकलें। अवघ्या विश्वाच्या वांट्यास आलें । परी घोटे तरी पालटलें। आहे मा ते ॥ १८ ॥ मोळीविक्याही मीच भावी। तयासीच राज्यपदवी। तऱ्ही मीपणाची उठाठेवा। टाकूंच नेणे ॥ १९ ॥ मी काबाडी मी राजा। मी भिकारी मी प्रजा। मी अनाचारी मी पूजा-। आचारशील ॥ २० ॥ मी वोवळा मी सोंवळा। मी प्रपंची मी निराळा। मज भारीच सोहळा । घेतों नाना उपभोग ॥ २१ ॥ मी अमंगळ मा निर्मळ। मी संपन्न मी दुर्बळ। मी मूर्ख आणि सकळ। कळा जाणता

१ उगीच वरवर. २ वरवर नजर देऊन. ३ डबक्यांतील पाण्याचे. ४ ठाऊक. ५ मूर्ति.

मी ॥ २२ ॥ स्थूळ लिंग कारण । महाकारण मन अंतःकरण । पंचभूत आणि त्रिगुण । माया ब्रह्म तो मी ॥ २३ ॥ परा पश्यंती मध्यमा वैखरी । अवस्था त्याही मीच चारी । सबाह्य आणि अंतरीं । अवघा मीच आहें ॥ २४ ॥ मी बलाढ्य मी लंडी मरगळे । मी अभक्त मी प्रेमळ । मी जीव शिव आणि केवळ । आत्मा तोही मी ॥ २५ ॥ मी बद्ध मी मुमुक्षु । मी भक्त मी मोक्ष । मी लक्ष मी अलक्ष । यांही वेगळा तो मी ॥ २६ ॥ मी पाहतां बहु लांबली । मी नेणों मुळींहून आली । विचारितां नेऊनि घाली । जेथील तेथें ॥ २७ ॥ मी बद्धत्वासी आधार । मी या मोक्षाचें द्वार । मी पाववी पैलपार । विचार केला तरी हो ॥ २८ ॥ जैसी ये ग्रंथींची एखादी ओंवी । लांबवोनि वाचितां अगत्य गोंवी । आखूड वाचितां प्रकट दावी । अर्थ येथांचा ॥ २९ ॥ विवेकबळें धांव घ्यावी । मी हे मागें टाकूनि द्यावी । हे मी राहिल्यां निज ठेवी । आपणाचि होइजे स्वयें ॥ ३० ॥ जैसी जलधरें धांव घेतली । आणि शर्करेचे युद्धाची हांव केली । देह ही टाकितां मिळाली । जाती जेथल्या तेथ ॥ ३१ ॥ ऐक गा शिष्या प्रेमळा । जें कांहीं जाणशी तूं त्या वेगळा । आगळा हा शब्द-सोहळा । ऐथें गुंतूं नको ॥ ३२ ॥ अर्थांतरीं मन घालावें । उगेंचि स्तब्ध न व्हावें । तुज मी सांगेन तें परिसावें । चित्त देऊनियां ॥ ३३ ॥ आतां तुज वाटतें शिष्य तो मी । आणि मज वाटतें गुरु तो मी । तरी गुरु-शिष्य मिळोन मी । एकचि कीं ॥ ३४ ॥ तरी आतां तुझी तूं उडाली । आणि माझी थोडीसी थांबली । तेही पाहिजे उडविली । येचि क्षणीं ॥ ३५ ॥ स्वामी बोलिले जे तूं उडाली । आणि पाहिजे उडविली । माझी आशंका राहिली । ते कोणासी पुसों आतां ॥ ३६ ॥ अरे तूं कैंचा तुज-पाशीं । विचारूनि पाहे मानसीं । मी मी म्हणतोसी आपणासी । तरी तूंचि मी नव्हेसि रे ॥ ३७ ॥ अरे विचारितां स्त्रीराजा जाले । तरी पुरु-षासि काय बायको केलें । तरी विचार पाहतां आलें । अवयवांचे मस्तकीं ॥ ३८ ॥ अरे पुरुष जयासि म्हणावें । त्यास कासया पुरुषत्व लागावें । जैसें आकाश भिजवावें । बळात्कारेंकरूनि ॥ ३९ ॥ पुरुषशब्द हेचि प्रकृती । परी कला व्याकरणनाम असती । तरी पुरुषव्यक्ति अवघी प्रकृती । सहसा चुकेना ॥ ४० ॥ अवघें शक्तीचें जाणावें । तरी काय पुरुषासी योग्य म्हणावें । हें बोलणें उपाधिस्वभावें । पुरुष तेचि प्रकृति ॥ ४१ ॥ म्हणोनि जें कांहीं बोलावें लागे । तें सहसा पालटावें नलगे ।

१ पिंडाचे चार देह. २ दुर्बळ, अशक्त. ३ दृश्य, अदृश्य. ४ मूळमायेपासून. ५ निरसल्यावर आत्मधन स्वतःच व्हावें. ६ मेघानें.

तुज आशंका उद्भवली ते भंगे। ऐसें करूं नको ॥ ४१ ॥ तुवां आशंका राखिली। तरी काय सृष्टि बोलों राहिली। हे कुबुद्धि तुज कां आठवली। टाकी परती ॥ ४३ ॥ आठवेल तैसें बोलावें। तुवां संकुचित न व्हावें। जरी येथेंही बोलतां भ्यावें। तरी समाधान कैचें ॥ ४४ ॥ आतां असो हें बोलणें जालें। मीपण पाहिजे उडविलें। या मीपणासीच एकलें। ठेवूनि कोण काज ॥ ४५ ॥ उडविलें बुडविलें यतोव्युत्पत्ती[1]। परी निरासिली पाहिजे तुझी भ्रांती। यालागीं बोलतों चित्तीं। सावध होई ॥ ४६ ॥ तुवां जाणसी त्यावेगळें असिजे। ऐसें बोलिलों आम्ही सहजें। परी हेंचि तुज पाहिजे। परिच्छिन्न[2] कळलें ॥ ४७ ॥ चारी देह चारी वाचा। पंचभूत त्रिगुणांचा। इंद्रियचाळक तया मनाचा। जाणता तूं होसी ॥ ४८ ॥ चारी अवस्था पांचवी उन्मनी। वृत्ति निवृत्ति तयांलागुनी। यांसही जाणतोसि कीं म्हणीं। लटिकें बोलतोसी ॥ ४९ ॥ आतां बरें मन घालूनियां पाहीं। मीपणासीही जाणतोस कीं नाहीं। जाणीतल्यासी जाणतोसी नाहीं। उगाचि आतां ॥ ५० ॥ जाणीतल्यासीही जाणीतलें। तरी ऐसें जरी कळलें। तुज कळल्याही वेगळें राहिलें। तेंचि स्वरूप तुझें ॥ ५१ ॥ आतां सांग रे अनुभव कैसा। स्वामी नाहीं सांगिजे ऐसा। ऐसें बोलतोसी कैसा। फट्ट रे पढतमूर्खा ॥ ५२ ॥ नाहीं सांगिजेल हें कळलें। तरी मी बोलिलों तें व्यर्थ गेलें। अरे वेड्या तुज जें अनुभवा आलें। त्याही वेगळा तो तूं ॥ ५३ ॥ आतां सांग पां बरें। उगाचि राहिलासि कां रे। मान हालवितो म्या रे। जीवेंचि यासी ॥ ५४ ॥ जीवित्व अवघें लोपलें। पाहा हो कैसें जालें। नाम म्यावयासी उरलें। नाहींच कोणी ॥ ५५ ॥ अरे शिष्या सावध होई। तुज आणिक सांगतों कांहीं। मीपण पाहातां नाहीं। भिऊं नको ॥ ५६ ॥ इति श्रीरामीरामदास म्हणे। ऐक वंध्यापुत्रांचें[3] बोलणें। चक्षुश्रवण[4] असेल तेणें। सावधान व्हावें ॥ ५७ ॥ इति त्रयोदश समासः ॥ १३ ॥ श्रीराम.

---

## १४. पूर्ण समाधान.

॥ श्रीराम ॥ वंध्यापुत्राचें बोलणें। हें सांगणेंचि बाष्कळपणें। पुत्रचि नाहीं तेथ कोणें। काय बोलावें ॥ १ ॥ वांज खरी पुत्र आहे। ऐसेंही एक नवल पाहें। स्वामी हें बोलणें न साहे। लटिकेंचि तुमचें असे ॥ २ ॥ पुत्र आहे निपुत्रवंती[5]। वंध्या म्हणाल तरी पुत्र असती। दोन्ही

---

१ शब्दपांडित्याच्या मर्यादेंत. २ स्पष्ट. ३ वांझेच्या मुलाची गोष्ट. ४ कानडोळे. ५ वंध्या.

बोलतांचि चित्तीं । खरें कैसें मानावें ॥ ३ ॥ अरे पुत्रपणें आपणासि व्याली । आपणचि नामेंही ठेविलीं । ऐसीं घरभरीं लेंकुरें जालीं । परी वांजपण आंगीं असे ॥ ४ ॥ भ्रतारेंविण सदा एकली । अवघी आपणचि मिरवली । भर्तारासही प्रसवली । लटिकाचि पाहिजे तो ॥ ५ ॥ हे इतुके प्रसवली आपण । परी सत्य जाण भर्तारेंविण । लटिकें बोलणें तरी आण । मज तुझी रे शिष्या ॥ ६ ॥ स्वामी बोलिले तें यथार्थचि । परी मी गोष्टी सांगतों जीवींची । मज जरी खरें वाटेल तरी पायांची । आण असे ॥ ७ ॥ कां जे पुरुष आणि प्रकृती । ऐसी विश्वतोमुखीं वदंती[1] । हे उभयतांचि मिरवती । मध्यें तिसरें नाहीं ॥ ८ ॥ या दोंमध्यें तिसरें नाहीं आलें । ऐसें बहुतीं असें बोलिलें । परंतु भर्तारेंविरहित ऐसें ऐकिलें । नाहीं सर्वथा ॥ ९ ॥ एकलीच आणि आपणासि व्याली । हे नवलवार्ता ऐकिली । असो व्याली तरी जाली । संतति पाहिजे कीं ॥ १० ॥ व्याली तीस जालें काय । ऐसी तरी पाहिजे सोय । अरे शिष्या न होय । आपसासी आपण ॥ ११ ॥ आपण व्याली जरी म्हणावें । पूर्वींच होतीसें जाणावें । व्याली नसतां स्वभावें । असतचि आहे ॥ १२ ॥ आतां असो हे हातचांचपणी[2] । किती करूं मी सोसणी । मज हे प्रांजळ होय ऐसी करणी । केली पाहिजे ॥ १३ ॥ भर्तारासी कैसी व्याली । विऊनि वांज कैसी जाली । आणि पुरुषेंविण एकली । आपणची कैसी ॥ १४ ॥ ऐक शिष्या सांगतों । तुज सत्य वाटे ऐसें करितों । तरी मी जें काय बोलतों । त्याचें विचारण करावें ॥ १५ ॥ एक प्रकृति आणि पुरुष । तूं जाणतोस कीं या दोहींस । परी विचारूनि पाहतां पुरुषास । ठाव नाहीं ॥ १६ ॥ साकार निराकार हेतु । तितुकी ही प्रकृति निभ्रांतु । ऐसें जाणोनियां त्वरितु । विचार करीं आतां ॥ १७ ॥ पुरुषशब्द आकारला । तो जाण प्रकृतीनेंचि केला । प्रकृतीपासूनि जाला । तरी पुत्र होय कीं ॥ १८ ॥ आतां विऊन वांझपण आंगीं । तें सांगतों तुजलागीं । व्याली तरी वोसंगीं[3] । लेंकुरें पाहिजेत कीं ॥ १९ ॥ वोसंगा आहे परी साकार । तरी हा इचाचि विस्तार । निराकार ते साकार । होणार नाहीं ॥ २० ॥ जितुका कांहीं आकार जाला । निराकारही कल्पनेनें सूचला । एवं निराभास याही बोला । मायाच आली ॥ २१ ॥ जैसी पृथ्वी कोंनी[4] निघाली । तयांस द्रुम लता वल्ली । मेरुमांदारें शृंगें जालीं । लेंकुरें तयांसी ॥ २२ ॥ कन्या पुत्र नपुं-

१ सर्व लोकांच्या तोंडीं ही भाषा आहे. २ अंधारीं हातानें चांचपण्यासारखें, अडखळणें मी किती सोसावें ? ३ मांडीवर. ४ निर्माण झाली.

सकें । नामें ठेविलीं अलोलिकें । ऐसीं जालीं लेंकुरें अनेकें । संख्याचि नाहीं ॥ २३ ॥ गड कोट पुरें पट्टणें । महाल दामोदरें[1] निर्माणें । जालीं असंख्य कोणें । गणना करावी ॥ २४ ॥ लेंकुरांसही लेंकुरें जालीं । नपुंसक कोणी निघालीं । कन्या पुत्र नपुंसकें आलीं । नपुंसकांचे पोटीं ॥ २५ ॥ कां कुलालशाळेंसि[2] पात्रें केलीं । नाना व्यक्ति[3] निर्माण जालीं । भिन्नभिन्नपणें नामेंही ठेविलीं । निर्माण जाल्यानंतर ॥ २६ ॥ ऐसी विस्तारें वाढली । पाहों जातां धरा एकली । तैसी माया ही विस्तारली । परी विचारितां आपणची असे ॥ २७ ॥ कां जैसा अग्नि प्रकाशला । आपणासी आपण जाला । पाहों जातां एकला । एकचि आहे ॥ २८ ॥ फुंकोनि दिवा लाविला । पुत्रपणें हिलाल जाला । हवाया चंद्रज्योति पावला । कन्यारूप नामें ॥ २९ ॥ ऐसिया नाना व्यक्ती । परी एक आदिअंतीं । कां बावन मातृकांप्रती । आकार सोडीना ॥ ३० ॥ ऐसी सर्वत्र बोलती माया । स्तब्धता जाली शिष्यराया । म्हणोनि पुसतां चित्ता माजिया । समाधान न घडे ॥ ३१ ॥ विचार करितां माया सर्व । परी पुरुषाचा दिसतो अभाव । तेणें माजा अंतर्भाव । डगमगला कीं ॥ ३२ ॥ अरे शिष्या माया कैंची । हे कन्या वंध्यापुत्राची । पुत्रचि नाहीं मा त्याचे कन्येशीं । वार्ता कोठें ॥ ३३ ॥ अरे ऐक कां घावरा जालासी । अंतरूं नको विवेकासी । उतावेळ करूं नको आम्हांसी । बोलों दे क्षणभरी ॥ ३४ ॥ जरी आम्ही तुजे जीवींचें । जाणोनि सांगितलें अंतरींचें । मग बोलावयाचें । कोण काज आहे ॥ ३५ ॥ किंचित धीरत्व धरावें । तुवां सुदृढ होऊनि ऐकावें । तुजी आशंका स्वभावें । निरसोनि जाईल ॥ ३६ ॥ माया मायिक आभासे । तुजिये कल्पनेसीच दिसे । देहीं देहबुद्धि वसे । म्हणोनियां ॥ ३७ ॥ तुज जें कांहीं सांगितलें । तें तुज इतुकेंचि कळलें । क्षणामध्यें डगमगिलें । चित्त तुजें ॥ ३८ ॥ आधीं आपणासी जाणावें । मग रघुनाथीं मिळावें । आपणासी राखितांचि[4] जीवें । राम कैंचा जोडे ॥ ३९ ॥ तुजी वासना जे माया उठोनि जावी । म्यां आपुल्या डोळां पहावी । तरी तुजी देहबुद्धि दवडावी । नलगे रे तुज? ॥ ४० ॥ ऐक या स्थूळासि निंदिलें । अवघिया विश्वावरी आलें । आणि त्याचें काय राहिलें । निराळें अनसुटेची[5] ॥ ॥ ४१ ॥ तैसी त्वां माया निंदावी । आणि कल्पना जतन करावी । गुप्त करूनि लपवावी । आपुली म्हणोनियां ॥ ४२ ॥ तुजी कल्पना हेचि माया । ते आधीं धाडी विलया । मग हें स्वसुख पहावया । अधिकारी

१ रत्नखचित मंदिरें. २ कुंभाराच्या भट्टींत मडकीं घडलीं. ३ प्रकार. ४ जीवपणानें वेगळें होतांच. ५ अलग, स्वतंत्र.

होसी ॥ ४३ ॥ तूं जरी चहूं देहांपरता । तरी कां भोंवसी स्थूळाभोंवता । तुजें तुज स्वरूप पावतां । माया कैंची रे तेथ ॥ ४४ ॥ जरी तुज स्वहित करणें आहे । तरी तूं कल्पनातीत होऊनि राहे । कल्पना हे सर्वथा न साहे । तुजे स्वरूपीं ॥ ४५ ॥ अंध आणि डोळसें कोणी एक । मार्गें जातां भयानक । ते देखोनि साशंक । डोळस सळोनि[1] पडे ॥ ४६ ॥ अंधासि ठावकेंचि नाहीं । त्यासी भयानक न दिसे कांहीं । तयासि देह असतां कांहीं । बाधूं न शके सर्वथा ॥ ४७ ॥ तैसे संकल्प तुजे डोळे । क्षण एक ठेवी पां निराळे । मग हे कैसी आढळे । भयानक माया ॥ ॥ ४८ ॥ मोठें भय तुझ्या स्थूळासी । तरी तूं काय स्थूळ होसी । क्षणक्षणा भ्रांत होतोसी । अविवेकसंगतीं ॥ ४९ ॥ तुज कैंचें रे लिंगदेह । मातें बिघडोनि नवजाय । हें तूं विचारूनि पाहें । खरें कीं खोटें ॥ ५० ॥ संग न साहे जेथें । मन बापुडें कैंचें तेथें । तुज पहावया काळातें । शक्ति कैंची रे ॥ ५१ ॥ तूं सिंहाचें पिलूं । काळ काय रे बापुडें भालु लुं[2] । मशक मेरूसी पाहे तोलूं । थडका हाणोनी ॥ ५२ ॥ थिल्लर बालकासी बुडवी खेळतां । आकाशमार्गें उडों जातां । तें केंवि बांधूं शके रामदूता । तया हनुमंतासी ॥ ५३ ॥ पिपीलिकेचिये पक्षंपातें[4] । कैसें पडे ब्रह्मांड पालथें । कां दर्दुर[3] उडेल गगनपंथें । सूर्य ग्रासावया केंवि ॥ ५४ ॥ कां बलाढ्य म्हणे मी तरवार ओढीन । धांवोनि जातांचि आकाश तोडीन । झोंबी घेऊनि ओढून । पाडीन पृथ्वीवरी ॥ ५५ ॥ तंववरी नडव्यानें[5] डवरावें । जंववरी त्या पंचाननें नवयावें । कां पतंगें जाऊनि भक्षावें । अनलासि जैसें ॥ ५६ ॥ कां जैसा नवनीताचा गोळा । युद्धालागीं उतावेळा । म्हणे मी वडवानळा । ग्रासीन सकळ ॥ ५७ ॥ कीं जैसा उदुंबरांतील पक्षी । म्हणे मी गिळीन ब्रह्मांडासी । तैसें तुजे स्वरूपासी । काळाचा आवांका[6] ॥ ५८ ॥ अरे तूं निःसंग आणि निर्मळ । तेथें काय रे बापुडें काळ । प्रलयानलासी मृगजळ । केंवि बाधूं शके ॥ ५९ ॥ काळ मायेचे अंगभूत । तुजे स्वरूपीं रोहिणीजळवत[7] । आणि स्वरूप तुजें मायातीत । तेही माया नाहीं ॥ ६० ॥ कर्पूराचे राशींतूनि । एक खडा गेला निवडूनी । अग्निसंगें भस्म होऊनी । गेला नव्हताचि जैसा ॥ ६१ ॥ तूं या मायेंतूनी । स्वरूपीं जातोसि निवडूनी । तेथ तुजी देहबुद्धि भस्मोनी । गेली नाहीं रे ॥ ६२ ॥ जातोसि येतोसि बोलणें न घडे । परी तुज स्वहित कैसें जोडे । म्हणोनि हें अघटित घडे । बोलणें

१ फिरसी २ भिऊन. ३ क्षुद्र कोल्हा. ४ मुंगीच्या पंख हालवण्यानें. ५ कोल्ह्यानें. ६ धैर्य. ७ मृगजळप्रमाणें.

तेणें असे स्थळ उणें। हें तों न घडे ॥२०॥ शिष्य विचारूनि बोले। देहीं काय निघोनि गेलें। शरीर अचेतन पडलें। कोण्या गुणें सांग पां ॥२१॥ शिष्य विचारूनि अंतरीं। म्हणे प्राण प्रयाण करी। प्राण नसतां शरीरीं। चेतना नाहीं ॥२२॥ तंव बोले गुरुराव। प्राण वायूचें नांव। तया वायूतेंचि देव। म्हणतोसी ॥ २३ ॥ शिष्य बोले जी भगवंता । बहूत बोलती ऐसी वार्ता। परमात्मा देह चालविता। तेणेंविण अचेतन ॥ २४ ॥ विचारें पाहतां देह वाव। चाळितयासी कैंचा ठाव । हा इतर दृष्टीचा स्वभाव आत्मा चाळक ऐसा ॥ २५ ॥ आत्म्यासि चाळकपण। हे तों निर्गुणासि गुण। बळेंचि लाविती ते खूण। चुकले आत्म्याची ॥ २६ ॥ निर्गुणापासोनि चराचर। जाले सृष्ट्यादि व्यापार । ऐसें बोलती अपार । ज्ञाते पुरुष ॥ २७ ॥ माया सत्य जया वाटे। त्याचें ज्ञान परम खोटें। माईक दृष्टीनें भेटे। परत्मा केविं ॥ २८ ॥ माया मिथ्या कैसी म्हणावी। प्राणिमात्रासि वेड लावी। सकळ रूप आपुलें दावी। प्रत्यक्ष आतां ॥ २९ ॥ प्रत्यक्षास प्रत्यक्ष दिसे। अप्रत्यक्ष कोठें असे। अप्रत्यक्षेंविण नसे। पूर्ण समाधान ॥ ३० ॥ पूर्ण समाधान कोण। मायामिथ्या लक्षण। ऐसें मज निरूपण। केलें पाहिजे ॥ ३१ ॥ अभिन्न तेंचि समाधान। मायेचें मिथ्या लक्षण। आत्मनिवेदनीं खूण। पावसी बापा ॥ ३२ ॥ सद्गुरुवचन-अंजन ल्याला। माया भयानक न दिसे त्याला। अभिन्नपणें आत्मयाला । सर्वत्र देखे ॥ ३३ ॥ सर्वत्र आत्मा देखे कवण। ऐसा केला शिष्यें प्रश्न। ह्या प्रश्नाचें लक्षण । ऐसें असे ॥ ३४ ॥ देखे तोही जाण आत्मा । सर्वांतरीं जो सर्वात्मा। ज्याच्या स्वरूपासि उपमा। देतांचि न ये ॥ ३५ ॥ निरुपम तो निर्गुण । जाणपणा हे तों गुण। म्हणोन सगुणनिर्गुण । जाणिजे आत्मा ॥ ३६ ॥ सगुण निर्गुण पुसे काय । आत्मा नेमिला न जाय। नेमातीत असंभाव्य। भाविला न वचे ॥ ३७ ॥ जो नातुडे भावनेसी। त्याची प्राप्ती घडे कैसी। ऐसा आक्षेप स्वामीसी। शिष्यें केला ॥ ३८ ॥ त्याची प्राप्ती त्यासी घडे। येरां सर्वथा नातुडे[1]। जयाचें वेगळेपण मोडे। तोचि आत्मा ॥ ३९ ॥ जो गगनाची गवसणी[2] । गवसणीचाही धनी। धनीपणाची कडसणी[3]। जेथें नाहीं ॥ ४० ॥ जें ब्रह्मांडापैलीकडे । मन-बुद्धीसी नातुडे। जेथें चपळपण मोडे। बापुड्या मनाचें ॥ ४१ ॥ त्याचे-शेवटीं तेंच आहे। आपुला अंत होवोनि राहे । आतां पैलपार पाहें। तेंचि अवघें ॥ ४२ ॥ चहूंकडे सारखेंचि। येकाजिनसीं आपणचि। अमूप सीमा स्वरूपाची। करितां नये ॥ ४३ ॥ जेथें मनाची धांव पुरे । पैली-

१ सांपडत नाहीं. २ आच्छादन, व्याप्ति. ३ विचार.

कडे उदंड उरे । मन माघारें फिरे । आले वाटे ॥ ४४ ॥ पाहूं जाय जे दिशेसी । ती घालोनि पाठीशी । सन्मुख धांवे प्रयासीं । अंत न लगे ॥ ४५ ॥ अष्ट दिशा पाहोनि आलें । मग तें ऊर्ध्वपंथें उडालें । गगन भेदोनियां गेलें । पैलीकडे ॥ ४६ ॥ बहूत लंघिली पोकळी । भोंवतें फिरे अंतराळीं । ऊर्ध्वमुखें तये वेळीं । अवलोकितें जालें ॥ ४७ ॥ निरावलंब वेगळें । सूक्ष्म रूप तें पांगुळें । असंभाव्य देखोनि गळे । आवांका पोटीं ॥ ४८ ॥ आलें आपुले स्थळीं । बुडी मारिली पाताळीं । सप्त पाताळाचे तळीं । अंत पाहे ॥ ४९ ॥ तें अत्यंत सखोल । बुडी दिल्ही बहुसाल । ठाव नाहीं व्याकुळ । ऐसें जालें ॥ ५० ॥ तेथोनियां उफाळे । ऊर्ध्वमुखें अंतराळें । बहू शिणलें नकळे । अंत स्वरूपाचा ॥ ५१ ॥ स्वरूपार्णव फिरून आलें । तेणें बहुत निर्बुजलें । हीन होवोनी पडलें । अचेतन ॥ ५२ ॥ गेलें ज्याच्या शुद्धीसी । पाहे तें आपणासी तैं विस्मित मानसीं । आश्चर्य करी ॥ ५३ ॥ जया इतुकें धुंडिलें । तें जवळचि देखिलें । आपणा पाहों गेलें । तेंचि आपण ॥ ५४ ॥ लवण सिंधू जालें । तैसें स्वरूपीं विरालें । तेणें गुणें जोडलें । धनासि धन ॥ ५५ ॥ ऐसी स्वरूपाची स्थिती । स्वानुभवी जाणती । हे वस्तूची प्राप्ती । सद्गुरुबोधें ॥ ५६ ॥ ऐसें हें स्वरूपज्ञान । याहीपर समाधान । त्या साक्ष आपुलें मन । अनिर्वाच्य तें ॥ ५७ ॥ जो स्वयें तृप्त जाला । तो सर्वांगें निवाला । निःशब्दीं स्वानंदाला । सांगतां न ये ॥ ५८ ॥ जें सांगतां न ये बोलें । तें बोलेंचि प्राप्त जालें । गुरुकृपेच्या सखोलें । अगाध वचनें ॥ ५९ ॥ गुरुवचनीं विश्वास । धरितां तुटे भवपाश । विनवी रामीरामदास । लडिवाळपणें ॥ ६० ॥

---

## २ जुनाटपुरुष.

॥ श्रीराम ॥ सकळ संत साधुजन । भूत भविष्य वर्तमान । तयां सकळांसी नमन । साष्टांगभावें ॥ १ ॥ जालें सकळांसी नमन । नमस्कारोनि श्रोतेजन । आतां कथानुसंधान । सावकाश ऐका ॥ २ ॥ जुनाट पुरुषाची कथा । नेमस्त मिळवी परमार्था । जीसमागमें महत्तीर्थां । पाविजेतें ॥ ३ ॥ पावनाचेनि तारूं । लंघोनि जाय सागरू । श्रवणें तैसा विश्वंभरू । पाविजेतो ॥ ४ ॥ जाणीवेरहित ज्ञानी । तोचि योग्य निरूपणीं । जैसा क्षुधित भोजनीं । तृप्त होय ॥ ५ ॥ बहुसाल व्युत्पत्ती

आली । कां बुद्धी तीक्ष्ण जाली । तरी समाधानाची किल्ली । वेगळीच आहे ॥ ६ ॥ ती कैसी आहे सांगा स्वामी । ऐसा आक्षेप केला तुम्हीं । सुचित होवोनि अंतर्यामीं । ऐका सांगतों ॥ ७ ॥ नव्हे रे टम काहाणी[1] । दाटून लावूं लावणी । चंचळ मनें श्रवणीं । बैसों नये ॥ ८ ॥ जें साव-धास नकळे । तें चंचळा कैसें कळे । ज्ञानेंसहित मावळे । विज्ञान जेथें ॥ ९ ॥ हातींचें रत्न जळीं गेलें । खडूळ होतां तें नाढळे । निवांत जळ निवळे । तरीच लाभे ॥ १० ॥ तैसें शुद्ध निरूपण । एकाग्र करावें श्रवण । तेणेंकरितां बाणे खूण । समाधानाची ॥ ११ ॥ होतां अद्वैतनिरूपण । पडे देहाचें विस्मरण । ऐसें एकाग्रलक्षण । श्रोतयांचें ॥ १२ ॥ वृत्ति स्वरूपीं भरे । आपेंआप विस्तरे । येक नसतां दुसरें । आठवेल कैंचें ॥ १३ ॥ जेव्हां आपुला ध्यास तुटे । आशंकामात्र तेव्हां फिटे । मग समाधान लिगटे । बळेंचि अंगीं ॥ १४ ॥ शब्द ठाकोने अंगीं । अर्थीं धांवों लागे वेगीं । दृढ अर्थाचे संगीं । निःसंग होय ॥ १५ ॥ अहं सोहं आपण । याहीवेगळें मीपण । मीपण गेलिया खूण । समाधानाची ॥ १६ ॥ समूळ अहंता विराली । ही समाधानाची किल्ली । जेथें वित्प-त्तीसीं निमाली तीक्ष्ण बुद्धी ॥ १७ ॥ बुद्धी जाऊं न पवे जेथें । वित्पत्ती काय करी तेथें । सद्गुरुकृपेचें भातें । अंगीं भरलें पाहिजे ॥ १८ ॥ स्वरूप-ज्ञान जया झालें । त्याचें निर्मूळ नाहीं जालें । तोंवरी समाधान जालें । घडेना सर्वथा ॥ १९ ॥ असो हें बोलणें आतां । अवधान द्यावें श्रोतां । जुनाट पुरुषाची कथा । सांगिजेल ॥ २० ॥ सकळांचा महापुरुष । जो ब्रह्मादिकांचा ईश । शिवादिक असती अंश । तो हा अनामी ॥ २१ ॥ सकळ सृष्टीचा व्यापक । जो मूळमायेचा जनक । तो हा पुरुष कोणीएक । बहु दिवसांचा ॥ २२ ॥ जयाचे आज्ञेप्रमाणें । ब्रह्मादिकांस वर्तणें । चंद्र सूर्य तारांगणें । जयाची सत्ता ॥ २३ ॥ मही अचळ मेघमाळा । नानासरिता-सिंधूजळा । मर्यादा चाले अवलीळा । जयाचेनी ॥ २४ ॥ ऐशा ब्रह्मांड-माळा अनंत । इच्छामात्रें होत जात । तरी जयाचा येकांत । मोडलाच नाहीं ॥ २५ ॥ आघण येकला सर्वकाळ । कन्या[3] खेळे नाना खेळ । येकटी असे लडिवाळ । नाना छंदें ॥ २६ ॥ तये गलबला[2] नावडे । म्हणोनि खेळे एकीकडे । ब्रह्मादिक केले वेडे । तये कुमारीनें ॥ २७ ॥ अनंत ब्रह्मांडें उतरंडी । खेळ मांडिला परवंडी[4] । काळ करी कडाफोडी । पुत्र तयेचा ॥ २८ ॥ शीण पावे कुमारी । नावेक[5] निद्रा करी । तेणें खेळाबाहेरी । होवोनि जाय ॥ २९ ॥ परम सुलक्षण । राहिना पित्या-

१ कल्पित गोष्ट. २ गद्दल. ३ मूळमाया. ४ नानाप्रकारचा ५ क्षणभर.

विण। पिता तियेचा निर्गुण । माता असेना ॥ ३० ॥ ते क्षणीं उठोनि पाहे। तों खेळ मोडिला आहे। पुनरपि लवलाहे। खेळ मांडी ॥ ३१ ॥ ऐशी निरंजनीं एकट । करी खेळाची खटपट । खेळ खेळतां वीट। मानूं नेणे ॥ ३२ ॥ खेळ मांडिला विचित्र । उतरंडीचें एक पात्र। तें हें ब्रह्मांड स्वतंत्र। जाणिजे तुवां ॥ ३३ ॥ खेळ खेळे महा सबळ। अत्यंत वाढली प्रबळ । वेड लाविलें सकळ। प्राणिमात्रासी ॥ ३४ ॥ नकळे तयेचें लाघव। बहुत पडिले मानव। पात्रीं सांठविले जीव । कोट्यानकोटी ॥ ३५ ॥ बहुत लोभाची आवडी। घातली इच्छेची बेडी । ऐशा बहुत उतरंडी। संपूर्ण केल्या ॥ ३६ ॥ प्राणी जाऊं नेदी बाहेरी। जिववून[1] मागुते मारी। चुकों नेदी वेरझारी। वासनासूत्रें ॥ ३७ ॥ बहुत प्राणी केले गोळा । लाविला विषय टकळा । तेणें येती पूर्वस्थळा। स्वेच्छें प्राणी ॥ ३८ ॥ ऐसें गोविलेच गोवी। मारून मागुता जन्म दावी। तयेपासून सोडवी । तो विरळा कोणी ॥ ३९ ॥ पळोन जावें दिगंतरा। तेथें आहे ते सुंदरा । त्या सांगातीं दुसरा । कोणीच नाहीं ॥ ४० ॥ संतान वाढलें लक्षवरी। तरी ते ठाईंची कुमारी। नांव ठेवितां उदरीं। पिता आला ॥ ४१ ॥ पिता उदरास आला । तरी तो नाहीं जन्मला। भर्ता स्वयें आपुला । होवोनि ठेली ॥ ४२ ॥ भ्रतारास प्रसवली। मग ती माय राणी जाली। सासू माता आपुली । आपणचि ॥ ४३ ॥ वायु फुंकोन केला वन्ही। पोटीं लाविलें पाणी। आपापासून धरणी। कळों आली ॥ ४४ ॥ ऐसी खेळास गुंतली। तेणें पिता विसरली। ते पाउलीं मुरडलीं। मागुती मागें ॥ ४५ ॥ जन्मभूमी वास पाहे । बाप म्हणोनि आस वाहे। मागुती निवांत राहे । स्तब्ध होवोनी ॥ ४६ ॥ पिता न दिसे डोळां । म्हणोनि शोक करी बाळा । भोंवती पाहे वेळोवेळां। अष्ट दिशेतें ॥ ४७ ॥ वेध पित्याचा लागला । मग खेळ मोडोनि गेला। उतरडी फोडून पळाला। काळपुत्र ॥ ४८ ॥ पिता पाहतां खेळ मोडे। खेळ पाहतां पिता दडे। पाहाती झाली दोहींकडे। उभी राहोन ॥ ४९ ॥ मग ते लोभें झळंबली । पित्याकडे चालली । खेळ विसरोन गेली। जन्मस्थाना ॥ ५० ॥ आपणा विसरोन पाहे। तंव पिता पुढें आहे। ऐसें देखोन लवलाहें। भेटती जाली ॥ ५१ ॥ पिता तापसी जैसा वह्नी। तया निःसंगाची मिळणी। कन्या नासली तत्क्षणीं । पित्यादेखतां ॥ ५२ ॥ तंव पिता झळंबला। कंठ सद्गदित जाला । म्हणे आज संग सोडला। कुमारीनें ॥ ५३ ॥ ऐसा नावेकवरी । विलाप पिता करी । पाहे तंव

[1] जीवंत करून.

अभ्यंतरीं । कन्या उभी ॥ ५४ ॥ मग तयेसी भेटला । उभयतां आनंद जाला । मागुता खेळ मांडला । तये कुमारीनें[1] ॥ ५५ ॥ समाप्तः ॥

## ३ अंतर्भाव.

### समास १ ला.

॥ श्रीराम ॥ जय जय सद्गुरु समर्था । जय जय पूर्णमनोरथा । चरणीं ठेवोनी माथा । प्रार्थितसें ॥ १ ॥ मी ये संसारीं गुंतला । स्वामीपदीं वियोग जाला । तेणें गुणें आळ आला । जीवपणाचा ॥ २ ॥ इच्छाबंधनीं गुंतलों । तेणें गुणें अंतरलों । आतां येथूनि सुटलों । पाहिजे दातारा ॥ ३ ॥ प्रपंची संसारउद्वेगें । क्षणोक्षणा मन भंगे । कुळाभिमानें डगे । समाधानासी ॥ ४ ॥ जेणें समाधान चळे । विवेक उठोनियां पळे । बळेंचि वृत्ती ढांसळे । संगदोषें ॥ ५ ॥ स्वामी प्रपंचाचेनि गुणें । परमार्थी आणिलें उणें । ईश्वरआज्ञेप्रमाणें । क्रिया न घडे ॥ ६ ॥ दुःखशोक आला चित्तीं । समाधान करावें किती । विक्षेप होतां चित्तवृत्ती । दंडळों लागे ॥ ७ ॥ प्रपंचें केलें कासाविस । घेऊंच नेदी उमसें[2] । तेणें गुणें उपजे त्रास । संसाराचा ॥ ८ ॥ आतां पुरे हा संसार । जाले दुःखाचे डोंगर । स्वामी अंतरसाक्ष विचार । सर्व जाणती ॥ ९ ॥ तरी आतां काय करावें । कोणें समाधानें असावें । हें मज दातारें सांगावें । कृपा करोनी ॥ १० ॥ ऐशी शिष्याची करुणा । ऐकोनि बोले गुरुराणा । केली पाहिजे विवंचना । पुढिलिये समासीं ॥ ११ ॥ इति श्रीअंतर्भाव । जन्ममृत्यु समूळ वाव । रामदासीं गुरुराव । प्रसन्न जाले ॥ १२ ॥ १ ॥

### समास २ रा.

॥ श्रीराम ॥ ऐक शिष्या सावध । सिद्धचि असतां निजबोध । मायिक हा देहसंबध । तुज बाधी ॥ १ ॥ बद्धकें कर्मे केलीं । तीं पाहिजेत भोगिलीं । देहबुद्धी दृढ जाली । म्हणोनियां ॥ २ ॥ मागें जें जें संचित केलें । तें तें पाहिजे भोगिलें । शूद्रें शेत जरी टाकिलें । तरी बाकी सुटेना ॥ ३ ॥ हा तों देहबुद्धीचा भाव । स्वस्वरूपीं समूळ वाव । परंतु प्राप्तीचा उपाव । सूचिला पाहिजे ॥ ४ ॥ स्वस्वरूपी लंकापुरी । सुवर्ण-

[1] परब्रह्माची लाडकी कन्या मूळमाया. तिनें अनंत ब्रह्मांडांचा खेळ मांडावा व काळानें तो मोडावा. ती ब्रह्माकडे सन्मुख झाली कीं खेळ मोडला व विन्मुख झाली कीं खेळ सुरू झाला. ब्रह्माकडे पाहतां सृष्टि नाहीं, सृष्टीकडे पाहतां ब्रह्म नाहीं. [2] विसांवा.

विटा त्या दुरी । देह बुद्धीच्या सागरीं । तरलें पाहिजे ॥ ५ ॥ विषय-मोळ्या वाहों सांडी । त्यासी कोण म्हणे काबाडी । तैसी पदार्थी गोडी । सांडितां आत्मा ॥ ६ ॥ देहबुद्धीचें लक्षण । दिसेंदिस होतां क्षीण । तद्-परी बाणे खूण । आतमयाची ॥ ७ ॥ सर्वात्मा ऐसें बोलतां । खूण बाणेना सर्वथा । साधनेंवीण ज्ञानवार्ता । बोलोंचि नये ॥ ८ ॥ दसऱ्याचें सोनें वांटलें । तेणें काय हातासी आलें । रायविनोदें आलें । सुखासन ॥ ९ ॥ तैसें शब्दीं ब्रह्मज्ञान । बोलतां नये समाधान । म्हणोनि आधीं साधन । केलें पाहिजे ॥ १० ॥ शब्दीं जेवितां तृप्ती जाली । हे तों वार्ता नाहीं आयकिली । पाकनिष्पत्ती पाहिजे केली । साक्षेपें स्वयें ॥ ११ ॥ कांहीं तरी येक कारण । कैसें घडे यत्नेंवीण । मा हे ब्रह्मज्ञान कठीण । साधनेंवीण केंवि ॥ १२ ॥ शिष्य म्हणे जी सद्गुरु । साधन तरी काय करूं । जेणें पाविजे पारू । महादुःखाचा ॥ १३ ॥ आतां पुढिलिये समासीं । स्वामी सांगती साधनासी । सावध श्रोतीं कथेसी । अवधान द्यावें ॥ १४ ॥ इति श्रीअंतर्भाव० ॥ २ ॥

---

## समास ३ रा.

॥ श्रीराम ॥ प्राप्त जालें ब्रह्मज्ञान । बाणलें पाहिजे पूर्ण । म्हणोनि हें निरूपण । सावध ऐका ॥ १ ॥ कांहींच नेणे तो बद्ध । समूळ क्रिया अबद्ध । भाव उठिला तो शुद्ध । मुमुक्षु जाणावा ॥ २ ॥ कर्मं त्यजोनि बाधक । शुद्ध वर्ते तो साधक । क्रिया पालटे विवेक । नीच नवा ॥ ३ ॥ तये क्रियेचें लक्षण । आधीं स्वधर्मरक्षण । पुढें अद्वैतश्रवण । केलें पाहिजे ॥ ४ ॥ नित्यनेम धरितां चित्तीं । तेणें शुद्ध चित्तवृत्ती । होवोनियां भग-वंतीं । मार्ग फुटे ॥ ५ ॥ नित्यनेमें भ्रांती फिटे । नित्यनेमें संदेह तुटे । नित्यनेमें लिगटे । समाधान अंगीं ॥ ६ ॥ नित्यनेमें अंतर शुद्ध । नित्य-नेमें वाढे बोध । नित्यनेमें बहु खेद । प्रपंचीं तुटे ॥ ७ ॥ नित्यनेमें सत्व चढे । नित्यनेमें शांती वाढे । नित्यनेमें थारा मोडे । देहबुद्धीचा ॥ ८ ॥ नित्यनेमें दृढभाव । नित्यनेमें भेटे देव । नित्यनेमें पुसे ठाव । अविद्येचा ॥ ९ ॥ नित्यनेम करूं कोण । ऐसा शिष्यें केला प्रश्न । केलें पाहिजे श्रवण । प्रत्यहीं स्वयें ॥ १० ॥ मानसपूजा जप ध्यान । येकाग्र करूनियां मन । त्रिकाळ ध्यावें दर्शन । मारुती[1]-सूर्याचें ॥ ११ ॥ हरिकथानिरूपण । प्रत्यहीं करावें श्रवण । निरूपणीं उणखूण[2] । केली पाहिजे ॥ १२ ॥ संकटीं

---

१ मन-आत्मा यांचा विचार करावा. २ चर्चा.

श्रवण न घडे । बळात्कारें अंतर पडे । तरी अंतरस्थिती मोडे । ऐसें न कीजे ॥ १३ ॥ अंतरींच पांच नामें । म्हणत जावीं नित्यनेमें । ऐसें वर्ततां श्रमें । बाधिजेना ॥ १४ ॥ ऐसी साधकाची स्थिती । साधकें असावें येणें रिती । साधनेंवीण ज्ञानप्राप्ती होणार नाहीं ॥ १५ ॥ तंव शिष्य म्हणे जी ताता । जन्म गेला साधन करितां । कोणे वेळे पावां आतां । समाधान ॥ १६ ॥ कैसें येईल सिद्धपण । केव्हां तुटेल साधन । मुक्तदशा सुलक्षण । मज प्राप्त केवीं ॥ १७ ॥ आतां याचें प्रत्युत्तर । श्रोतीं व्हावें सादर । ऐका पुढें सविस्तर । आदरेंकरोनी ॥ १८ ॥ इति श्री० ॥ ३ ॥

---

## समास ४ था.

॥ श्रीराम ॥ सिद्ध होवोनि बैसला । दृष्टीं [१]नाणी साधनाला । सादर अशनशयनाला । अत्यादरें ॥ १ ॥ ऐसा जो विषयासक्त । अत्यंत विषयीं आसक्त । सिद्धपणें आपुला घात । तेणें केला बळें ॥ २ ॥ जो सिद्धांचा मस्त[२]कमणी । महातापसी शूळपाणी । तोही आसक्त श्रवणीं । जपध्यानपूजेसी ॥ ३ ॥ अखंड वाचे रामराम । अनुष्ठान हेंच परम । ज्ञानवैराग्यसंपन्न । सामर्थ्यसिंधु ॥ ४ ॥ तो म्हणे मी साधक । तेथें मानव बापुडें रंक । सिद्धपणाचें कौतुक । केवीं घडे ॥ ५ ॥ म्हणोनि साध[३]नासी जो सिद्ध । तोचि ज्ञाता परम शुद्ध । येर ते जाणावे अबद्ध । अप्रमाण ॥ ६ ॥ साधनेंवीण बाष्कळता । तीच जाणावी बद्धता । तेणें घडे अनर्गळता । आसक्तिरूपें ॥ ७ ॥ मन सुखावलें जिकडे । अंग टाकिलें तिकडे । साधन उपाव नावडे । अंतरापासोनी ॥ ८ ॥ चित्तीं विषयाची आस । साधन म्हणतां उपजे त्रा[४]स । नेम धरितां कासावीस । परम होय ॥ ९ ॥ दृढ देहाची आसक्ती । तेथें कैंची पाविजे विरक्ती । विरक्तीवीण भक्ती । केवीं घडे ॥ १० ॥ एक शिष्यटिळका नेम न ज्या साधका । तयाअंतीं धोका । नेमस्त आहे ॥ ११ ॥ तंव शिष्य म्हणती । अंतीं मती तेचि गती । ऐसें सर्वत्र बोलती । मी काय करूं ॥ १२ ॥ अंतीं कोण अनुसंधान । कोठें ठेवावें मन । कैसें करावें साधन । अंतसमयाचें ॥ १३ ॥ अंतसमय येईल कैसा । हा न कळे भरंवसा । प्राप्त कोण दशा । हें तों श्रुत नाहीं ॥ १४ ॥ आशंका घेतली मनें । शिष्य बोल करुणावचनें । याचें उत्तर श्रोते जनें । सावध परिसावें ॥ १५॥ इति श्रीअंतर्भाव० ॥ ५॥

---

१ साधनाकडे लक्ष देत नाहीं. २ मुगुटमणी. ३ साधनासह. ४ कंटाळा.

## समास ५ वा.

॥ श्रीराम ॥ ऐक शिष्या सावधान । एकाग्र करोनि मन । तुवां पुसिलें अनुसंधान । अंतसमयींचें ॥ १ ॥ तरी अंत कोणासी आला । कोण मृत्यु पावला । हा तुवां विचार केला । पाहिजे आतां ॥ २ ॥ अंत आत्मयाचे माथां । हें तों न घडे सर्वथा । स्वरूपीं मरणाची वार्ता । बोलोंच नये ॥ ३ ॥ स्वस्वरूपीं अंत नाहीं । येथें पाहणें नलगे कांहीं । मृगजळाचे डोहीं । बुडोंचि नको ॥ ४ ॥ आतां मृत्यु देहासी घडे । तें अचेतन बापुडें । शवास मृत्यु न घडे । कदा कल्पांतीं ॥ ५ ॥ आतां मृत्यु कोठें आहे । बरें शोधूनि पाहे । शिष्य विस्मित होवोनि राहे । एक क्षण निवांत ॥ ६ ॥ मग पाहे स्वामीकडे । म्हणे हा देह कैसा पडे । चालविता कोणीकडे । निघोनि गेला ॥ ७ ॥ देह चालविता कोण । हे मज सांगावी खूण । येक म्हणती हा प्राण । पंचधारूपें ॥ ८ ॥ प्राणासी कोण चेतविता । येरू म्हणे स्वरूपसत्ता । सत्तारूपें तत्वता । माया जाण ॥ ९ ॥ मायेची मायिक स्थिती । ऐसें सर्वत्र बोलती । माया पाहातां आदि अंतीं । कोठेंचि नाहीं ॥ १० ॥ अज्ञानासी भ्रांती आली । तेणें दृष्टी तरळली । तेणें गुणें आडळली । नसतीच माया ॥ ११ ॥ शिष्या होईं सावचित्त । मायेचा जो शुद्ध प्रांत । तोचि चौदेहाचा अंत । सद्गुरुबोधें ॥ १२ ॥ चत्वार देहांच्या अंतीं । उरे शुद्ध स्वरूपस्थिति । तेणेंगुणें तुझी प्राप्ति । तुजसी जाली ॥ १३ ॥ जन्मलाचि नाहीं अनंत । तयासी कैंचा येईल अंत । आदि अंतीं निवांत । तोचि तूं अवघा ॥ १४ ॥ स्वामी म्हणती शिष्यासी । आतां संदेह धरिसी । तरी श्रीमुखावरी खासी[1] । निश्चयेंसी ॥ १५ ॥ देहबुद्धीचेनि बळें । शुद्ध ज्ञान झांकोळे[2] । भ्रांती हृदयीं प्रबळे । संदेहरूप ॥ १६ ॥ म्हणोनि देहातीत जें सुख । त्याचा करावा विवेक । तेणें गुणें अविवेक । बाधूं शकेना ॥ १७ ॥ तुटलें संशयाचें मूळ । देहचि मिथ्या समूळ । तयासि अंत हें केवळ । मूर्खपण ॥ १८ ॥ जें जन्मलेंचि नाहीं । त्यासी मृत्यु कैंचा काई । मृगजळाच्या डोहीं । बुडों नको ॥ १९ ॥ मनाचा करूनि जयो । स्वरूपाचा करावा निश्चयो । दृढनिश्चयें अंतसमयो । होवोनि गेला ॥ २० ॥ आदिकरोनि देहबुद्धी । देह टाकिला प्रारब्धीं । आपण देहाचा संबंधी । मुळींच नाहीं ॥ २१ ॥ असतें करोनि वावें[3] । नस्त्याचा पुसोनि ठाव । देहातीत अंतर्भाव । असावें खुणेनें ॥ २२ ॥ हें समाधान उत्तम । असतेपणाचें जें वर्म । देहबुद्धीचें कर्म । तुटे जेणें ॥ २३ ॥ आतां तुटली

१ तोंडांत खाशील. २ आच्छादिलें. ३ व्यर्थ, निरसन.

आशंका । मार्ग कुटला[1] विवेका । अद्वैतबोधें रंका । राज्यपद ॥ २४ ॥ तंव शिष्यें आक्षेपिलें । आतां स्वामी दृढ जालें । तरी हें तैसेंच बाणलें । पाहिजे आतां ॥ २५ ॥ निरूपणीं वृत्ति गळे । शुद्ध ज्ञान तें प्रबळे । उठोनि जातां मावळे । वृत्ति मागुती ॥ २६ ॥ सांगा यासी काय करूं । मज सर्वथा न धरे धीरू । ऐका सावध विचारू । पुढिलिये समासीं ॥ २७ ॥ इति श्री० ॥ ५ ॥

---

## समास ६ वा.

॥ श्रीराम ॥ शिष्या परम गुह्यज्ञान । जेणें घडे समाधान । ऐसें मागें निरूपण । केलें तुज ॥ १ ॥ तें निरूपण पहातां । अभ्यंतरीं तृप्त होतां । आशंकेसी सर्वथा । उरी[2] नाहीं ॥ २ ॥ आतां असो प्रस्तुत । देहास मांडतां अंत । तेव्हां साधकें निवांत । काय करावें ॥ ३ ॥ निरालंबीं चित्त न्यावें । तरी तें राहेना स्वभावें । ऐक्यतेच्या नांवें । शून्याकार ॥ ४ ॥ निरालंबींचें साधन । देह असतां सावधान । केलें पाहिजे समाधान । सत्संगें विवेकें ॥ ५ ॥ अनुसंधान[3] अंतकाळीं । कैसें राहे तें निर्मळीं । अनुसंधानमिसें जवळीं । मीपण उठे ॥ ६ ॥ ऐसें स्वरूपानुसंधान । अंतकाळीं न घडे जाण । आतां करावें ध्यान । सगुण मूर्तीचें ॥ ७ ॥ ध्यानासी कारण चित्त । तेंचि जालिया दुश्चित । कैसें घडे सावचित्त । ध्यान अंतीं ॥ ८ ॥ आतां करावें रामचिंतन । तरी वासना करी प्रपंचध्यान । प्रपंचीं गुंतलें मन । तें सुटलें पाहिजे ॥ ९ ॥ पडोनि कूंपा[4] भीतरीं । प्राणी नाना उद्वेग करी । परी तें न घडे जोंवरी । बाहेर न ये ॥ १० ॥ तैसें मन हें गुंतलें । वासनाविषयीं नेलें । वरिवरी नाम स्मरलें । याचें कोण काज ॥ ११ ॥ तरी आतां काय करावें । कोण्या उपायें तरावें । तेंचि आतां स्वभावें । सांगिजे स्वामी ॥ १२ ॥ दीनदयाळ गुरुराव । पूर्वींच रचिला उपाव । अंतीं चळे अंतर्भाव । म्हणोनियां ॥ १३ ॥ तरी त्या उपायाची खूण । केलें पाहिजे श्रवण । उपाय रचिला कोण । सद्गुरुनाथें ॥ १४ ॥ ऐका उपायाचें वर्म । दृढ लाविला नित्यनेम । हाचि उपाय परम । अंतसमयीं ॥ १५ ॥ पूर्वीं पडला जो अभ्यास । तोचि अंतीं निजध्यास । म्हणोनियां सावकाश । नित्यनेम धरावा ॥ १६ ॥ जयासी ठाईंची सवे । तयास नलगे सांगावें । म्हणोनि नित्यनेमा जीवें । विसंबों नये ॥ १७ ॥ नित्यनेम पूर्वीं कथिला । पुन्हा पाहिजे सांगितला ।

---

१ मोकळा झाला. २ बाकी, जागा. ३ स्वरूपचिंतन. ४ विहिरींत.

जो मागें निरोपिला । तोचि आतां ॥ १८ ॥ एकाग्र करोनियां मन । अंतरीं करावें ध्यान । सर्व सांग पूजाविधान । प्रत्यहीं करावें ॥ १९ ॥ नित्य नेमिला जो जप । त्रिकाळ दर्शनसाक्षेप । आदित्यमारुतीचें रूप । अवलोकावें ॥ २० ॥ हरिकथानिरूपण । प्रत्यहीं करावें श्रवण । हीच जाणावी खूण । नित्यनेमाची ॥ २१ ॥ अशक्त होवोनि प्राणी पडे । नित्यनेम त्यास न घडे । तेणें बळेंची नेमाकडे । चित्त न्यावें ॥ २२ ॥ नित्यनेमाचा अभ्यास । तोचि लागे निजध्यास । चुकतां कासावीस । अंतसमयीं ॥ २३ ॥ अहा देवा जप राहिला । मारुती नाहीं देखिला । प्राणी योगभ्रष्ट जाला । निजध्यासें ॥ २४ ॥ ऐसें नित्यनेमें कोडें । मन लागे देवाकडे । अंतकाळीं बळें घडे । निजध्यास ॥ २५ ॥ वाचा खुंटतां अंतर पडे । म्हणोनि अंतरीं जप घडे । स्वामी आधींच सांकडें । फेडीत गेले ॥ २६ ॥ जें वाल्मीकासी आधार । जें शतकोटींचें सार । उमेसहित शंकर । जपे जया ॥ २७ ॥ जेणें धन्य काशीपुरी । प्राणिमात्रासी उद्धरी । अंतकाळीं पृथ्वीवरी । उच्चार जयाचा ॥ २८ ॥ तेंचि अंतरीं धरावें । तेणेंचि संकटीं तरावें । कैलासनाथें सदाशिवें । उपाव केला ॥ २९ ॥ इति.

---

# ( ४ ) आत्माराम.

## समास १ ला.

॥ श्रीराम ॥ जयासि लटिका आळ आला । जो मायागौरीपासून जाला । जाला नाहीं तया अरूपाला । रूप कैंचें ॥ १ ॥ तेथें स्तवनाचा विचार । न घडे निर्गुण निर्विकार । तैसियासिच नमस्कार । भावबळें माझा ॥ २ ॥ जयाचेनि वेदशास्त्रें पुराणें । जयाचेनि नाना निरूपणें । जयाचेनि सुख लाधणें । शब्दीं निःशब्द ॥ ३ ॥ जें शब्दासी आकळेना । शब्देंवीण तें कळेना । कळेना ऐसेंही घडेना । जये स्वरूपीं ॥ ४ ॥ ऐसें सर्वत्र संचलें । तर्का न जाय अनुमानलें । तें जयेचेनि प्राप्त जालें । आत्मरूप ॥ ५ ॥ नमन तियेचे निजपदा । माया वाग्देवी शारदा । जिचेनि प्रवर्तती संवादा । संत महानुभाव ॥ ६ ॥ वंदीन सद्गुरुस्वामी । जेथें राहिलें मी तो तो मी । निवारिलीं निजधामीं । पांचही जणें ॥ ७ ॥ तया निजपदापैलीकडे । आनंदें वृत्ती वावडे । पद लाधलिया जोडे । तद्रूप होवोनी ॥ ८ ॥ स्वामीकृपेचा लोट आला । मानससरोवरीं सामा-

वला। पूर्ण होतां उचंबळला । आनंदउद्गार माझा ॥ ९ ॥ सद्गुरुकृपेचें बळ। माझें ठायीं जालें तुंबळ । तेणें गुणें स्वानंदजळ । हेलाऊं लागे ॥ १० ॥ आतां नमस्कारीन राम। जो योग्याचें निजधाम। विश्रांतीचा निजविश्राम । जये ठायीं ॥ ११ ॥ जो नांवरूपावेगळा । जो मायेहूनि निराळा। जेथें जाणिवेची कळा । सर्वथा न चले ॥ १२ ॥ जेथें भांबावला तर्क । जेथें पांगुळला विवेक । तेथें शब्दाचें कौतुक। केवीं घडे ॥ १३ ॥ जयाकारणें योगी उदास । वनवासीं फिरती तापस । नाना साधनें सायास। ज्या कारणें करिती ॥ १४ ॥ ऐसा सर्वात्मा श्रीराम। सगुण निर्गुण पूर्णकाम। उपमाचि नाहीं निरुपम। रूप जयाचें ॥ १५ ॥ आतां वंदीन सज्जन श्रोते । जे कृपाळू भावाचे भोक्ते । माझीं वचनें प्राकृतें। सांगेन तयांसीं ॥ १६ ॥ तयांचें वर्णावें स्वरूप । तरी ते स्वरूपाचे बाप । जें वेदास सांगवेना रूप । तें जयांपासोनि प्रगटे ॥ १७ ॥ आतां शिष्या सावधान। ऐक सांगतों गुह्य ज्ञान। तेणें तुझें समाधान। अधिक होय ॥ १८ ॥ तूं आशंका नाहीं घेतली । परी चिंता मज लागली। जे तुझी भ्रांती फिटली। नाहीं अद्यापि ॥ १९ ॥ दासबोधींचे समासीं । निर्मूळ केलें मीपणासी । त्या निरूपणीं वृत्तीसी । पालट दिसेना ॥ २० ॥ म्हणोनी न पुसतां सांगणें। घडलें शिष्या तुजकारणें। आतां तरी सोय धरणें । श्रवणमननीं ॥ २१ ॥ चातकपक्षी वरचेवरी। चंचू पसरोनि थेंब धरी। जीवन सर्वही अव्हेरी । भूमंडळीचें ॥ २२ ॥ तैसा शब्दवर्षाव होतां। असों न द्यावी व्यग्रता। श्रवणपुटीं सामावितां। मनन करावें ॥ २३ ॥ लाग जाणोनि शब्दाचा । आंवांका धरावा मनाचा । शब्दातीत गर्भाचा । सांठा धरावा ॥ २४ ॥ अरे तूं कोण कोणाचा। कोठून आलासि कैंचा । ऐसा विचार पूर्वींचा । घेईं बापा ॥ २५ ॥ अरे तुवां जन्मांतर घेतलें । काय मानितोसि आपुलें । ऐसें तुवां विचारिलें। पाहिजे आतां ॥ २६ ॥ येथें तुझें कोणी नाहीं। भुलला आहेस काई। चुकोनि आलासी जाईं । जेथील तेथें ॥ २७ ॥ तूं समर्थाचें लेंकरूं। अभिमानें घेतला संसारू। तो टाकितां पैलपारु। पावसी बापा ॥ २८ ॥ ईश्वरापासोनि जालासी । परंतु त्यास चुकलासी। म्हणोनि हें दुःख भोगिसी । वेगळेपणें ॥ २९ ॥ आणि विश्वाससी या बोला। तरी मी घालीन रे तुजला। लाधसी सकळ वैभवाला। जेथिंचा तेथें ॥ ३० तुझें अढळपद गेलें। तुज मायेनें वेड लाविलें । तें जरी तुझें तुज दिधलें। मज काय देशी ॥ ३१ ॥ जितुकें कांहीं नासोन जाईल।

१ धैर्य.

जें अशाश्वत असेल । तुजसमागमें न येईल । तितुकें देई ॥ ३२ ॥ मजही तें कासया व्हावें । तुजपासूनि टाकावें । तुवां टाकिलें तरी न्यावें । तुजसमागमें ॥ ३३ ॥ भूषण भिक्षेचें टाकिलें । अमरपद प्राप्त जालें । तरी तुझें काय गेलें । सांग बापा ॥ ३४ ॥ नाशिवंत तितुकें देशी । तरी पद प्राप्त निश्चयेंसी । यामध्यें लालूचीं करिसी । स्वहित न घडे ॥ ३५ ॥ तंव शिष्य म्हणे जी दिधलें । स्वामी म्हणती पद लाधलें । आतां तूं आपुलें । मानूंचि नको ॥ ३६ ॥ इतुकें स्वामी बोलले । अज्ञान घेऊन निघाले । तंव शिष्यें आक्षेपिलें । विनीत होवोनी ॥ ३७ ॥ आतां पुढिलिये समासीं । संवाद होईल उभयांसी । तेणें स्वानंदसिंधूसी । भरितें दाटे ॥ ३८ ॥ इति श्रीआत्माराम । रामदासीं पूर्णकाम । ऐका सावध वर्म । सांगिजेल ॥ ३९ ॥

---

## समास २ रा.

॥ श्रीराम ॥ जय जय सच्चिदानंदा । जयजयाजी निजबोधा । जयजयाजी आनंदकंदा । परमपुरुषा ॥ १ ॥ अनंत ब्रह्मांडें ढिसाळें । मायेनें रचिलीं विशाळें । तुमचे कृपेचेनि बळें । विरती स्वानंदडोहीं ॥ २ ॥ आतां स्वामीनें जें इच्छिलें । तें पाहिजे अंगिकारिलें । शरणागत आपुलें । उपेक्षूं नये ॥ ३ ॥ नाशिवंत काय टाकावें । तें मज स्वामींनीं सांगावें । मज दातारें करावें । आपणाऐसें ॥ ४ ॥ ऐकोनि शिष्याचें बोलणें । स्वामी म्हणती सावध होणें । अवधान देउनी घेणें । आनंदपद ॥ ५ ॥ शिष्या बहुत मन घालीं । आतां बाष्कळता राहिली । येथें वृत्ती चंचळ केली । तरी बुडसी ॥ ६ ॥ अग्निसंगें लोह पिटे । पिटतां तयाचा मळ तुटे । परिसासि झगडतां पालटे । लोहपण तयाचें ॥ ७ ॥ जयाचा मळ जळेना । अभ्यंतरही वळेना । तरी ते सहसा पालटेना । मृत्तिकारूपें ॥ ८ ॥ नाशिवंत तितका मळ । तुवां त्यजावा अमंगळ । तो गेलिया तूंचि सकळ । आहेसि बापा ॥ ९ ॥ नाशिवंत तूं जाण माया । माईक जाईल विलया । ते मायाचि प्राणसखया । ऐक सांगतों ॥ १० ॥ अहं ऐसें जें स्फुरण । तेंचि मायेचें लक्षण । मायेपासून त्रिगुण । गुणांपासोनि भूतें ॥ ११ ॥ पृथ्वी आप तेज वायु आकाश । सृष्टी रचिली सावकाश । एवं दृश्य आणि अदृश्य । सकळ माया ॥ १२ ॥ येक माया दों ठाईं वांटिली । प्रकृति आणि पुरुष जाली । जैसो दोदिवसांची बोली ।

---

१ आसक्ति, लोभ. २ अफाट. ३ ठोकलें जातें.

येकचि पर्वां ॥ १३ ॥ माया ज्ञाताज्ञेयज्ञान । माया ध्याता ध्येयध्यान । माया हेंचि समाधान । योगियांचें ॥ १४ ॥ ऐशी माया सच्चिदानंद । माया आनंदाचा कंद । माया हेचि निजबोध । शब्दरूपें ॥ १५ ॥ आत्मा ब्रह्मस्वरूप । हें मायेचें निजरूप । रूप आणि अरूप । सकळ माया ॥ १६ ॥ जीव शिव आणि ईश्वर । हाही मायेचा विस्तार । शिवरूप विश्वंभर । अवघी माया ॥ १७ ॥ माया मानसीं चाळक । माया बुद्धीस व्यापक । माया अनेकीं येक । ऐसें बोलणें ॥ १८ ॥ माया देहास चालवी । माया शब्दास बोलवी । माया द्रष्ट्यास दाखवी । नेत्रीं रिघोनियां ॥ १९ ॥ मायेनें माया चाले । मायेनें माया बोले । मायेनें माया हाले । वायुरूपें ॥ २० ॥ तंव शिष्य म्हणे जी ताता । 'माया चाले स्वरूपसत्ता'। 'अरे सत्ता ती तत्वता । माया जाण'॥ २१ ॥ तरी मायेनें स्वइच्छा असावें । स्वरूपसत्तेनें नसावें । मनास आलें तैसें करावें । हें केविं घडे ॥ २२ ॥ लटिक्यावरी खरें चाललें । लटिके मर्यादेनें राहिलें । तें गर्भांधें देखिलें । हे अघटित वार्ता ॥ २३ ॥ तैसी माया ही मानिली । स्वरूपसत्तेनें चालली । तुवां गर्भांधें देखिली । हे वार्ता सांगसी ॥ २४ ॥ जें जालेंचि नाहीं सर्वथा । तयावरी निर्गुणाची सत्ता । ऐसें हें ज्ञातेपणें बोलतां । तुज लाज नाहीं ॥ २५ ॥ सकळ माया म्हणतां । आणि जालीच नाहींही सांगतां । तरी म्यां काय करावें आतां । सांगा स्वामी ॥ २६ ॥ अरे जें जें मनास अनुभवलें । तें तें माईक नाथिलें । तितुकें तुवां टाकिलें । पाहिजे स्वानुभवें ॥ २७ ॥ सकळही माया नाथिली । स्वरूपीं नाहीं राहिली । एवं नाहीं हे बोली । माया जाणावी ॥ २८ ॥ एवं सांगतां तें ऐकावें । मायिक मायेतें जाणावें । आतां मनन करावें । सावध होवोनी ॥ २९ ॥ मायेकारितां माया दिसे । मायेकारितां माया भासे । मायेकरितां लाभ असे । परमार्थाचा ॥ ३० ॥ माया भवसिंधूचें तारूं । माया पाववी पैलपारू । मायेवीण उद्धारू । प्राणियासि नाहीं ॥ ३१ ॥ मायेकरितां देव भक्त । मायेकरितां ज्ञाते विरक्त । मायेकारितां जीवन्मुक्त । होती स्वानुभवें ॥ ३२ ॥ मायेकारितां वेदश्रुती । मायेकारितां व्युत्पत्ती । मायेकरितां होती । मूढ ते विवेकी ॥ ३३ ॥ माया परमार्थाचें अंजन । मायेकारितां जोडे निधान । मायेकारितां सावधान । साधक स्वरूपीं ॥ ३४ ॥ मायेकारितां स्वहित घडे । मायेरितां भ्रांति उडे । मायेकारितां विघडे । प्रपंचभान ॥ ३५ ॥ मायेवीण ज्ञान कैंचें । माया जीवन सकळांचें । मायेवीण साधकाचें । कार्य न चले ॥ ३६ ॥ मायेवीण परमार्थ जोडे । ऐसें हें

---

१ कालच्या मागचा व उद्यांचे पुढचा दिवस. २ मिथ्या. ३ उडून जाते.

कधींच न घडे । मायेवीण सहसा नातुडे । गुज योगियांचें ॥ ३७ ॥ माया योग्याची माउली । जेथील तेथें नेऊन घाली । कृपाळूपणें नाथिली । आपण होय ॥ ३८ ॥ सकळ मायेचें रूप जालें । त्यांत तुझेंही रूप आलें । हें इतुकेंही आपुलें । मानूंचि नको ॥ ३९ ॥ आतां सांगतों तुज खूण । त्वां नाशिवंत केलें मदर्पण । आतां करिशी हलकेंपण । तरी मज शब्द नाहीं ॥ ४० ॥ संग तितुका नाशिवंत । निःसंग शब्द अशाश्वत । म्हणोनि संगानिःसंगातीत । होवोनि राहें ॥ ४१ ॥ पुढिले समासीं निरूपण । आदरें करावें श्रवण । संगातीत होइजे ते खूण । सांगिजेल पुढें ॥ ४२ ॥ इति श्रीआत्माराम । रामदासीं पूर्णकाम । योगी पावती विश्राम । जये ठायीं ॥ ४३ ॥

---

## समास ३ रा.

॥ श्रीराम ॥ संग तितुका नाशिवंत । सोडून राहावें निवांत । येकपणाचा अंत । जालिया समाधान ॥ १ ॥ येकपणाचा उमस । काढितां त्रिपुटी सावकाश । होत आहे म्हणोनि ध्यास । येकपणाचा नसे ॥ २ ॥ तो मी आत्मा ऐसा हेतू । हें नाशिवंत टाकी तूं । उन्मनी अवस्थेचा प्रांतू । तें स्वरूप तुझें ॥ ३ ॥ ऐसा जो अनुभव जाला । तोही नाशिवंतामध्यें आला । अनुभवावेगळा राहिला । तो तूं आत्मा ॥ ४ ॥ हेंही न घडे बोलणें । आतां पाल्हेरा किती देणें । वेदशास्त्रें पुराणें । नासोनि जाती ॥ ५ ॥ ग्रंथमात्र जितुका बोलिला । आत्मा त्यावेगळा राहिला । हे मायेचा स्पर्श जाला । नाहींच त्यासी ॥ ६ ॥ स्वरूप निर्मळ निघोट । स्वरूप शेवटा शेवट । जिकडे तिकडे नीट । सन्मुख आहे ॥ ७ ॥ जें बहू दुरीच्या दुरी । निकट जवळी अंतरीं । दुरी आणि अभ्यंतरीं । घटणी नाहीं ॥ ८ ॥ जें सकळांपरीस मोठें । जेथें हें सकळ आटे । अकस्मात येकसरां तुटे । मूळ मायेचें ॥ ९ ॥ जें सकळांहून मृदु कोवळें । सकळांहून अत्यंत जवळें । जें सकळांमध्यें परि निराळें । अलिप्तपणें ॥ १० ॥ जें हाले ना चाले । जें बोले ना डोले । अवघें आपण संचलें । येकटेंचि तें ॥ ११ ॥ आकाश बाहेर भरलें । आकाश जेथें मुरालें । आकाश मुरूनि उरलें । येकजिनसी ॥ १२ ॥ जें चळे ना ढळे । अग्नीमध्यें न जळे । जें जळीं परि निराळें । उदकीं बुडेना ॥ १३ ॥ ज्यास कोणी नेईना । चोरूं जातां चोरवेना । कल्पांतींही वेंचेना । अणुमात्र जें ॥ १४ ॥ चक्षूनें लक्षिलें नवजाय । जेथें आकारु भस्मोनि जाय ।

सांगीतलें तें साकार होय । सांगणें न घडे ॥ १५ ॥ ऐसें जरी न बोलावें । तरीं म्यां काय करावें । न बोलतां कळावें । तुज कैसें ॥ १६ ॥ बोलणें तितुकें व्यर्थ जातें । बोलतां अनुभवा येतें । अनुभव सांडितां तें । आपण होइजे ॥ १७ ॥ मायारूप मूळ तयाचें । शोधूं जातां समाधान कैचें । मग लाभ जालिया दुःखाचें । मूळ तुटे ॥ १८ ॥ अहं ब्रह्मास्मि ही गाथा । आली देहबुद्धीच्या माथां । देहबुद्धीनें परमार्थां । कानकोंडें होइजे ॥ १९ ॥ देहबुद्धी हे टाकावी । हेही मायेची उठाठेवी । म्हणोनि काय अंगीकारावी । अंगिकारू न घडे ॥ २० ॥ मायेचे बळें ब्रह्मज्ञान । मायेकरितां ब्रह्मज्ञान । मायाचि गोंवी बंधन । तोडी तेही माया ॥ २१ ॥ माया आपणासी गोंवी । आपआपणा वेड लावी । प्राणी दुःखी होत जीवीं । अभिमानेंकरुनी ॥ २२ ॥ जैसा सारीपाट खेळती । सारी येकाच्या मागोन आणिती । खेळों बैसतां वांटोन घेती । आपुलाल्या ॥ २३ ॥ नस्ता अभिमान माथां । सारी मरतां परम व्यथा । डाव येतां सुखस्वार्थां । दोघेही पडिले[1] ॥ २४ ॥ फांशासी दे दे म्हणती । येक ते रेंडी[2] खाती । क्रोधें पेटल्या घेती । जीव येकमेकांचे ॥ २५ ॥ तैशा कन्या पुत्र नारी । वांटून घेतल्या सारी । अभिमान वाहती शिरीं । पांग प्रपंचाचा ॥ २६ ॥ इतुकीं वेडें लाविलीं । ते माया खेळे खेळ येकली । ते मायेनेंच विराली । पाहिजे माया ॥ २७ ॥ माया मोडितां अधिक जडे । म्हणोनि धरिती ते वेडे । धरितां सोडितां नातुडे । वर्म कळल्यावांचूनी ॥ २८ ॥ जैसें चक्र-व्यूहाचें उगवणें । बाहेर येऊन आंत जाणें । कां अंतरीं जाऊन येणें । अकस्मात बाहेरी ॥ २९ ॥ त्या कवाडीच्या कड्या । गुंतगुंतों उगवाव्या । तैसी जाण ही माया । गुंतोनि उगवावी ॥ ३० ॥ माया कैशी झाडावी । तोडौनि कैशी टाकावी । येथें विचारें पहावी । नाथिलीच हे ॥ ३१ ॥ बहुनाटक हे माया । मीपणें न जाय विलया । विचार पहातां इया । ठावाचि नाहीं ॥ ३२ ॥ वर्म हेंचि माया मायिक । इचा करावा विवेक । विवेक केलिया अनेक । येकीं मुरे ॥ ३ ॥ येकीं अनेक मुरालें । येकपण अनेकांस वेगळें । उपरी जें निःसंग उरलें । तें स्वरूप तुझें ॥ ३४ ॥ तुझें स्वरूप नाकळे । तें जया साधनें आकळे । तें साधन ऐक सोहळे । भोगिसी स्वानंदें ॥ ३५ ॥ इति श्रीआत्माराम । सांगिजेल पुढें साधनवर्म । जेणें भिन्नत्वाचा भ्रम । तुटोनि जाय ॥ ३६ ॥

---

१ पराभव पावतात. २ सोंगट्या.

## समास ४ था.

॥ श्रीराम ॥ जें सकळ साधनांचें सार । जेणें पाविजे पैलपार । जेणें साधनें अपार । साधक सिद्ध जाले ॥ १ ॥ तें हें जाण रे श्रवण । करावें अध्यात्मनिरूपण । मनन करितां समाधान । निजध्यासें पाविजे ॥ २ ॥ संत सज्जन महानुभवीं । परमार्थचर्चा[1] करीत जावी । हयगय न करावी । ज्ञातेपणें करोनी ॥ ३ ॥ परमार्थउठाठेवी करितां । लाभचि होय तत्वतां । दिवसेंदिवस जाणतां । पालट होय ॥ ४ ॥ नित्यनेम श्रवणमनन । त्या ऐसें नाहीं साधन । म्हणोनि हें नित्यनूतन । केलें पाहिजे ॥ ५ ॥ जैसें ग्रंथीं बोलिलें । तैसें पाहिजे केलें । क्रियेच्या माथां आलें । निश्चितार्थ ॥ ६ ॥ जे ग्रंथीं जो विचार । वृत्ती होय तदाकार । म्हणोनि निरूपण सार । भक्तिज्ञानवैराग्य ॥ ७ ॥ शिष्य म्हणे जी सर्वज्ञा । सत्य करावी प्रतिज्ञा । नाशिवंत घेत साधना । वरपडें[2] न करावें ॥ ८ ॥ अरे शिष्या मन घालावें । नाशिवंत तूं ओळखावें । साधन लागे करावें । प्रतिज्ञाच आहे ॥ ९ ॥ प्रतिज्ञा करावी प्रमाण । ऐसें बोलतो हा कोण । नाशिवंत केलें मदर्पण । यामध्यें तो आला ॥ १० ॥ तूं म्हणसी जें दिलें । घ्यावया कोण उरलें । अरे उरलें तें झुरलें । माझेकडे ॥ ११ ॥ तूं नाशिवंतामध्यें आलासी । आपणास कां रे चोरितोसी । नाशिवंत देतां कचकतोसी[3] । फद् रे पढतमूर्खा ॥ १२ ॥ शिष्य विचारून बोले । स्वामी कांहीं नाहीं उरलें । अरे 'नाहीं' बोलणें आलें । नाशिवंतामध्यें ॥ १३ ॥ 'आहे' म्हणतां कांहीं नाहीं । 'नाहीं' शब्द गेला तोही । नाहीं नाहीं म्हणतां कांहीं । उरलें कीं ॥ १४ ॥ येथें शून्या निरास जाला । आत्मा सदोदित संचला । पाहों जातां साधकाला । ठावचि नाहीं ॥ १५ ॥ अभिन्न ज्ञाता तोचि मान्य । साधक साध्य होतां धन्य । वेगळेपणें वृत्तिशून्य । पावती प्राणी ॥ १६ ॥ वेगळेपणें पाहों जातां । मोक्ष न जोडे सर्वथा । आत्मा दिसेना मता । वरपडे[4] होती ॥ १७ ॥ आपुल्या डोळां देखिलें । तें नाशिवंतामध्यें आलें । ऐसें जाणोनि धरिलें । ते नाडले प्राणी ॥ १८ ॥ जो पंचभूतांचा दास । तुया पंचभूतीं वास । भोगी नीच नवी सावकाश । पुनरावृत्ती ॥ १९ ॥ तों शिष्यें विनंती केली । म्हणे आशंका उद्भवली । पंचभूतांची सेवा केली । बहुतीं कीं ॥ २० ॥ सकळ सृष्टीमध्यें जन । संत साधु आणि सज्जन । करिती भूतांचें भजन । धातुपाषाणमूर्ती ॥ २१ ॥ कोणी नित्यमुक्त जाले । तेही धातु पुजूं लागले । परंतु ते पुनरावृत्ती पावले ।

१ चर्चा. २ गुंतलेलें. ३ कुरकुर करितोस. ४ मतांत पडतात.

किंवा नाहीं ? ॥ २२ ॥ ऐसा शिष्याचा अंतर्भाव । जाणोनि आनंदें गुरु-राव । म्हणे शीघ्रचि अनुभव । पावेल आतां ॥ २३ ॥ ऐसें विचारूनि मनीं । कृपादृष्टी न्याहाळुनी । शिष्याप्रती सुवचनीं । बोलते जाले ॥ २४ ॥ प्राणी देह सांडून जाती । वासनाशरीरें असती । पुनरावृत्ती भोगिती । वासना उरलिया ॥ २५ ॥ मूळमाया स्थूळ देहाचें । लिंगदेह वासनात्मकाचें । राहाणें तया लिंगदेहाचें । अज्ञानडोहीं ॥ २६ ॥ कारण-देह अज्ञान । ज्ञान तो आत्मा जाण । तया नांव महाकारण । बोलिजेतें ॥ २७ ॥ जरी मनाचा थारा तुटला । म्हणजे भवसिंधू आटला । प्राणी निश्चितार्थें सुटला । पुनरावृत्तीपासोनी ॥ २८ ॥ हेंचि जाण भक्तीचें फळ । जेणें तुटे संसारमूळ । निःसंग आणि निर्मळ । आत्मा स्वयें ॥ २९ ॥ संगातीत म्हणजे मोक्ष । तेथें कैंचें देखणें लक्ष । लक्ष आणि अलक्ष । दोहींस ठाव नाहीं ॥ ३० ॥ आत्मा म्हणोनि देखण्यास मिठी । घालूं जातां मोक्षतुटी । म्हणोनियां उठाउठी । आत्मनिवेदन करावें ॥ ३१ ॥ प्राप्त जालें अद्वैतज्ञान । अभिन्नपणें जें विज्ञान । तेंचि जाण आत्मनिवेदन । जेथें मी नाहीं ॥ ३२ ॥ ऐसी स्थिती जया पुरुषाची । तया पुनरावृत्ती कैंची । जाणोनि भक्ती केली दास्याची । देवासी अत्यंत ॥ ३३ ॥ पूर्वी दास्यत्व होतें केलें । त्याचें स्वामित्व प्राप्त जालें । आणि तयाचें महत्व रक्षिलें । तरी थोर उपकार ॥ ३४ ॥ आतां असो हें बोलणें । नाशिवंताचा विचार करणें । आणि मजपाशीं सांगणें । अनुभव आपुला ॥ ३५ ॥ आतां पुढिलिये समासीं । शिष्य लाधेल अनुभवासी । दृढ करोनियां तयासी । सांगती स्वामी ॥ ३६ ॥ इति श्रीआत्माराम । रामदासीं पूर्णकाम । ऐका साधनवर्म । आत्मज्ञानाचें ॥ ३७ ॥

---

## समास ५ वा.

॥ श्रीराम ॥ जी जी स्वामी सर्वेश्वरा । आम्हां अनाथांचिया माहेरा । सार्थक जालें जी दातारा । कृपाकटाक्षें ॥ १ ॥ या मनाचे संगती । जन्म घेतले पुनरावृत्ती । माया मायिक असोनि भ्रांती । वरपडा जालों होतों ॥ २ ॥ मी मानवी किंकर । येकयेकीं जालें विश्वंभर । संदेह तुटला थोर । यातायाती ॥ ३ ॥ संसाराहून सुटलों । मीच सकळ देहीं विस्तारिलों । जन्मदुःखापासूनि मुकलों । सर्वांभूतीं ॥ ४ ॥ मी करून अकर्ता । मी भोगूनि अभोक्ता । मजमध्यें वार्ता । मीपणाची नाहीं ॥ ५ ॥ ऐसें जें कां निजबीज । गाळींव मीपणाचा फुंज । तो मुरालिया सहज ।

---

१ स्वरूपाकार झाल्यावर दास्य उरतें, ही कृतज्ञता होय.

सिद्धचि आहे ॥ ६ ॥ ऐसा शिष्याचा संकल्पू । म्हणोनि बोले भवरिपू । संसारसर्प भग्नदर्पू । केला जेणें ॥ ७ ॥ जें स्वामीच्या हृदयीं होतें । तें शिष्यास बाणलें अवचितें । जैसें सामर्थ्य परिसाचें तें । लोहाअंगीं ॥ ८ ॥ स्वामीपरिसाचा स्पर्श होतां । शिष्य परीस जाला तत्वता । गुरुशिष्यांची ऐक्यता । जाली स्वानुभवें ॥ ९ ॥ गुज स्वामीच्या हृदयींचें । शिष्यासी वर्म तयाचें । प्राप्त जालें योग्यांचें । निजबीज जें ॥ १० ॥ बहुतां जन्मांच्या शेवटीं । जाली स्वरूपाची भेटी । यका भावार्थासाठीं । परब्रह्म जोडलें ॥ ११ ॥ जो वेदशास्त्रांचा भावगर्भ । निर्गुण परमात्मा स्वयंभ । तयाचा येकसरां लाभ । जाला सद्भावें ॥ १२ ॥ जें ब्रह्मादिकांचें माहेर । अनंत सुखाचें भांडार । जेणें हा दुर्गम संसार । सुखरूप होय ॥ १३ ॥ ऐसें ज्यासी ज्ञान जालें । तयाचें बंधन तुटलें । येर नसोनि पावलें । दृढ अविवेकें ॥ १४ ॥ संदेह हेंचि बंधन । निशेष तुटलें तेंचि ज्ञान । निःसंदेहीं समाधान । आपैसें होय ॥ १५ ॥ प्राणियांसी माया सुटेना । अभिमान त्रिपुटी तुटेना । वृत्ती स्वरूपीं फुटेना । स्फूर्तिरूपें ॥ १६ ॥ मायाजाळीं जे पडले । ते ईश्वरासि चुकले । ते प्राणी सांपडले । वासनाबंधनीं ॥ १७ ॥ ज्याचें दैव उदेलें । तयास ज्ञान प्राप्त जालें । तयाचें बंधन तुटलें । निःसंगपणें ॥ १८ ॥ सवसाक्षी तुर्यावस्था । तयेचाही तूं जाणता । म्हणोनि तुज निःसंगता । सहजचि आली ॥ १९ ॥ आपणासी तूं जाणसी । परी तूं तें नव्हेसी । तूंपणाची कायसी । मात स्वरूपीं ॥ २० ॥ जाणता आणि वस्तु । निमालिया उर्वरित तूं । तूंपणाचीही मातू । सहजचि वाव ॥ २१ ॥ असो हा शब्दपाल्हाळ । तुझें तुटलें जन्ममूळ । कां जें नाशिवंत सकळ । मदर्पण केलें ॥ २२ ॥ ज जें जाणोनि टाकिल । तें नाशिवंत राहिलें । तुझें तुज प्राप्त जालें । अक्षय पद ॥ २३ ॥ ऐस बोले मोक्षपाणी । ऐकोनि शिष्य लोटांगणीं । निःसंग स्वरूप मिळणीं । दोघे एकचि जाले ॥ २४ ॥ ऐसा कृपाळू स्वामीराव । आदिपुरुष देवाधिदेव । शिष्यासी निजपदीं ठाव । ऐक्यरूपें दिल्हा ॥ २५ ॥ जो स्वामीस शरण गेला । तेणें जन्म सार्थक केला । संदेहावेगळा जाला । जो देवां दुर्लभ ॥ २६ ॥ ग्रंथ संपतां स्तुतिउत्तरें । बोलिजेती अपारें । अर्थासी कारण येरें । चाड नाहीं ॥ २७ ॥ इति श्रीआत्माराम । रामदासीं पूर्णकाम । साधकें पाहतां भ्रम । बाधिजेना ॥ २८ ॥ इति श्रीआत्मारामः संपूर्णः ॥

---

# (५) पंचसमासी.

## समास १ ला.

॥ श्रीराम ॥ गणेश शारदा सद्गुरु। संतसज्जन कुळेश्वरु। माझा सर्वही रघुवीरु। सद्गुरुरूपें ॥ १ ॥ माझें आराध्यदैवत । परमगुह्य गुह्यातीत। गुह्यपणाची ही मात । न चले जेथें ॥ २ ॥ जें स्पर्शलें नाहीं वेदवाणी। जें वर्णवेना सहस्रफणी । जेथें अनुभवाची कडसणी[1] । आटोनि गेली ॥ ३ ॥ जें शब्दासी अचोजें[2] । जें निःशब्दाचें निजबीज । जें शंकराचें निजगूज । समाधिशोभा ॥ ४ ॥ जो वेदांचा अंतरभाव। सायुज्यमुक्तीचा ठाव। जेथें भावनेचा अभाव। भावेंसहित ॥ ५ ॥ शब्द जो बाहेर पडे। तें त्या शब्दापैलीकडे। म्हणोनि अनुभावितां मोडे। हाव मनाची ॥ ६ ॥ असें तेंचि आदिअंत । माझें आराध्यदैवत । जेथें सर्व मनोरथ। पूर्ण होती ॥ ७ ॥ जें साराचें निजसार। जें आनंदाचें भांडार । जें मोक्षाचें बिढार[3] । जन्मभूमी ॥ ८ ॥ जें निर्विकल्पतरूचें फळ । अनुभवें पिकलें रसाळ। तया रसाचे गळाळ[4]। घेती स्वानुभवी ॥ ९ ॥ जालिया रसाचे विभागी। अमरत्व जडे अंगीं। संगातीत महायोगी। होइजे स्वयें ॥ १० ॥ ऐसा जो कां परमपुरुष। निर्विकल्प निराभास। शुद्ध बुद्ध स्वयंप्रकाश। आत्माराम ॥ ११ ॥ ऐशा जी सद्गुरुरामा । अगाध तुमचा महिमा। ऐक्यरूपा अंतर्यामा । मूळपुरुषा ॥ १२ ॥ तुझिये कृपेचेनि उजियेडें। तुटे संसारसांकडें । दृश्य मायेचें मढें । भस्मोनि जाय ॥ १३ ॥ तुमचे कृपेचा प्रकाश। करी अज्ञानाचा नाश । भाविक भोगिती सावकाश। अक्षय पद ॥ १४ ॥ क्षयचि नाहीं कल्पांतीं। एक स्वयें आदिअंतीं। ऐसें सुख कृपामूर्ती प्रगट कीजोजी ॥ १५ ॥ जें साधनाचें निजसाध्य। निगमागमप्रतिपाद्य। योगेश्वरांचें सद्य । विश्रांतिस्थळ ॥ १६ ॥ जें सकळ श्रमाचें सार्थक। जें भाविकां मोक्षदायक। तुमच्या हृदयीं अलोलिक। परम गुह्य ॥ १७ ॥ जें महावस्तूचें साधन । जें अद्वैतबोधाचें अंजन। जेणें पावती समाधान । महायोगी ॥ १८ ॥ जेथें दुःखाचा दुष्काळ। आणि आनंदसुखाचा सुकाळ । जें निर्मळ आणि निश्चळ । तेंचि तें अवघें ॥ १९ ॥ ऐसें जें महा अगाध । योगेश्वरांचा निजबोध। आत्मज्ञान परम शुद्ध । पाषांडावेगळें ॥ २० ॥ नाना मतें मतांतरें । सृष्टींत

१ विचार. २ अप्राप्य. ३ बिऱ्हाड, वसतिस्थान. ४ घुटके.

चाललीं अपारें। तयांमध्यें ज्ञान खरें। वेदांतमतें ॥ २१ ॥ जें शास्त्रबाह्य घडलें। संतामहंतासी बिघडलें। तें ज्ञानचि परी पडिलें। पाषांडमतीं ॥ २२ ॥ असो सर्व प्रकारें शुद्ध। जें सर्वांमध्य प्रसिद्ध। तया ज्ञानाचा प्रबोध। मज दीनासी करावा ॥ २३ ॥ दुस्तर भरला भवसागरू। स्वामी बुडतयाचें तारूं। मज दीनासी पैलपारू। पाववाजी ॥ २४ ॥ ऐशीं नाना करुणावचनें। बोलता जाला म्लानवदनें। ऐकोन स्वामी आश्वासनें। बुझाविते जाले ॥ २५ ॥ आतां प्रातीचा समयो। होईल अज्ञानाचा लयो। मोक्षसाधनाचा जयो। होय श्रवणें ॥ २६ ॥ पुढील समासीं पूर्ण। ऐसें आहे निरूपण। श्रोतीं करावें श्रवण। सावध होवोनी ॥ २७ ॥

---

## समास २ रा.

॥ श्रीराम ॥ सर्वांगांचे करोनि कान। श्रोतीं व्हावें सावधान। पहिले समासीं प्रश्न। शिष्यें केला ॥ १ ॥ तया प्रश्नाचें प्रत्योत्तर। आतां ऐका तत्पर। सांगिजेल सविस्तर। येच क्षणीं ॥ २ ॥ जेणें निरसे हें अज्ञान। तया नांव ब्रह्मज्ञान। तया ज्ञानाचें लक्षण। ऐसें असे ॥ ३ ॥ स्वस्वरूपीं सावधपण। हेंचि ज्ञानाचें लक्षण। ब्रह्मीं पडे विस्मरण। हे अज्ञानदशा[२] ॥ ४ ॥ स्वस्वरूपीं भुली पडतां। बाधों बा लागे मोहममता। तेणें गुणें देहअहंता। दृढ होय ॥ ५ ॥ माझी माता माझा पिता। माझा पुत्र माझी कांता। माझे बंधु माझी सुता। जामात माझे ॥ ६ ॥ माझें घर माझा संसार। माझी जन्मभूमी सार। माझे सोयरे अपार। शेत वाडे पशु ॥ ७ ॥ माझें शरीर माझी संपत्ती। माझें वैभव माझी संतती। सर्वांचा अभिमान चित्तीं। दृढ जाला ॥ ८ ॥ ऐसें माझें माझें म्हणतां। अभिमानें वोझें वाहातां। आयुष्य वेंचलें अवचितां। मरोन गेला ॥ ९ ॥ गोंवून संसारीं वासना। अभिमानें भोगी यातना। विषयीं गुंतला चुकेना। जन्ममृत्यू ॥ १० ॥ नश्वर जाणोनि म्हणे माझें। व्यर्थचि अभिमानें फुंजे। माथां प्रपंचाचें वोझें। कुटुंबकाबाडी[३] ॥ ११ ॥ जें जयाचें मनोगत। तया होय तेंचि प्राप्त। म्हणोनि विषयीं आसक्त। तया स्वहित नाहीं ॥ १२ ॥ चुकोनि आत्मज्ञान। दृढ धरिलें विषयीं ज्ञान। यासी म्हणिजे अज्ञान। नेमस्त शिष्या ॥ १३ ॥ आतां हें ऐसें अज्ञान। तयासी निरसी तें ज्ञान। तया ज्ञानाचें लक्षण। ऐक सांगतों ॥ १४ ॥

---

१ संतसज्जनांना मान्य नाहीं. २ ब्रह्मस्वरूपाचें विस्मरण हें अज्ञान. ३ कुटुंबासाठीं काबाडकष्ट करणारा.

मी आत्मा ऐसें जाणिजे । तया नांव ज्ञान बोलिजे । हें ज्ञान जालियां सहजें । अज्ञान कैंचें ॥ १५ ॥ आत्मा पावावयाची खूण । आधीं पाहावें मी कोण । आपणासी पाहातां पूर्ण । समाधान बाणे ॥ १६ ॥ देह माझें ऐसें जाणतो । तरी जाण देहावेगळाचि तो । धणी गुरूं माझें म्हणतो । तो गुरूं नव्हे ॥ १७ ॥ सर्व पदार्थ धणी जाणे । तरी तो पदार्थ होऊं नेणे । तैसा आत्मा सकळ जाणे । परि तो तया वेगळा ॥ १८ ॥ मी कोण ऐसें पाहतां । देहाची तों मायिक वार्ता । आपण आपला शोध घेतां । आपणचि मिथ्या ॥ १९ ॥ देहीं शोधितां मीपण उडे । मार्ग लागला आणिकीकडे । मूळासीं जातां बापुडें । तों कोठेंचि नाहीं ॥ २० ॥ देहसंगें वृत्ती मळे । शुद्ध ज्ञान झांकोळे । आपणा नेणतां आरंदळे[1] । जीव दुःखें ॥ २१ ॥ आपली शुद्धी घेवों जातां । आपण आत्माचि तत्वतां । बंधनचि नाहीं मुक्तता । होईल कैंची ॥ २२ ॥ जन्ममृत्यु मायिक भ्रांती । हें आलें आत्मप्रचीती । अजन्मा तो आदिअंतीं । आपणचि आहे ॥ २३ ॥ अनुभवितां आत्मस्थिती । मुळीं नाहीं पुनरावृत्ती । या नांव सायुज्यमुक्ती । जाण शिष्या ॥ २४ ॥ जेथें शिणली वेदवाणी । तो तूं आत्मा पूर्णपणीं । सायुज्यमुक्तीचा धणी । तूंचि एक ॥ २५ ॥ ऐकोनि शिष्य आनंदला । म्हणे जन्म सार्थक जाला । माझा संशय फेडिला । सद्गुरुरायें ॥ २६ ॥ नमस्कारोनि पुढती । बोलता जाला स्वामीप्रती । होंचि दृढ माझे चित्तीं । बैसवा स्वामी ॥ २७ ॥ पुढिलिये समासीं । दृढ होईल शिष्यासी । श्रोतीं सावध कथेसी । अवधान द्यावें ॥ २८ ॥

---

## समास ३ रा.

॥ श्रीराम ॥ मागिले अध्यायीं निरूपण । निरोपिलें आत्मज्ञान । तेंचि आतां दृढीकरण । केलें पाहिजे ॥ १ ॥ जें ब्रह्मादिकां दुर्लभ । तें मानवीयांसी सुलभ । ऐसा हा अलभ्य लाभ । सद्गुरुवचनें ॥ २ ॥ परी हें बाणलें पाहिजे अंगीं । तरीच होइजे धन्य जगीं । जेणें समाधानें योगी । महानुभाव ॥ ३ ॥ हें समाधान उत्कट । अंगीं बाणतां संकट ? । कां जें प्रपंचासि निकट । संबंध आहे ? ॥ ४ ॥ बहुतां दिसांची भ्रांती । आहे देहबुद्धीची संगाती । आणि भगवंताची प्राप्ती । सांप्रत जाली ॥ ५ ॥ अनंत जन्मींचा काट जडला । अभ्यासचि पडोनि गेला । तो तितुकाही झाडिला । पाहिजे कीं ॥ ६ ॥ सकळ सृष्टीचा दंडक । लोभें व्यापला येकेक । तयामध्यें हा विवेक । आठवेल कैंचा ॥ ७ ॥ आपुला संसार

---

१ आक्रोश करितो.

करितां । जीव सर्वकाळ दुश्चिता । तेणें गुणें भगवंता । अंतर पडलें ॥ ८ ॥ क्षणभरही प्राणियास । माया घेऊं नेदी उमँस[1] । मिथ्या लोभासाठीं आयुष्य । व्यर्थ गेलें ॥ ९ ॥ उपाय होतां दिसेना । प्रपंचीं गुंतली वासना । तेणें गुणें समाधाना । अंतर पडे ॥ १० ॥ अनंत जन्मींचा अभ्यास । तोचि आतां निजध्यास । लागला असे जगदीश । कोंवि जोडे ॥ ११ ॥ मळीण वस्त्र धुतां धुतां । तेणें तें पावे शुद्धता । तैसा साधक तो भगवंता । साधनें पावे ॥ १२ ॥ साधनेंवीण ब्रह्मज्ञान । तेणें उडे समाधान । अंगीं जडे देहाभिमान । वाचाळपणें ॥ १३ ॥ शब्दज्ञान हातां आलें मी सिद्ध ऐसें कल्पिलें । बळेंचि धारिष्ट धरिलें । सिद्धपणाचें ॥ १४ ॥ तें धारिष्ट अंतीं उडे । प्राणी महासंशयीं पडे । सेखीं जन्ममृत्यु भोगणें संशयें ॥ १५ ॥ म्हणोनि जाणते पुरुषीं । सांडूं नये साधनासी । नाडूं नये आपणासी । सिद्धपणें सर्वथा ॥ १६ ॥ जो सिद्धाचाही सिद्ध । ज्ञानवैराग्यप्रसिद्ध । सामर्थ्यसिंधू अगाध । कैलासराणा ॥ १७ ॥ तो सिद्धचि करी साधन । सर्वकाळ रामचिंतन । ध्यान धारणा अनुष्ठान । चुकों नेदी ॥ १८ ॥ ऐसे अपार महामती । जाले ते साधन करिती । तरी तेथें मानव किती । बापुडें किंकर ॥ १९ ॥ राज्यपदाचेनि गुणें । रासभारूढ होणें । हें लोकीं लाजिरवाणें । निपटचि जालें ॥ २० ॥ मी सिद्ध ऐसें कल्पुनी । नित्यनेम न धरी मनीं । तत्पर अशनशयनीं । आत्महत्यारा[2] ॥ २१ ॥ अज्ञानें भाव पालटला । देवाचा पाषाण जाला । अज्ञानें संतसज्जनांला । भौतिक[3] भावी ॥ २२ ॥ जप कोणाचा करावा । नेम कोणाचा धरावा । सर्वात्मा भजावा । कोण सद्गुरू ॥ २३ ॥ स्वयें धर्म न करिती । पुढिलांसी वेढां[4] लाविती । भेद गेला नाहीं म्हणती । वाचाळ ज्ञानी ॥ २४ ॥ सहज सोडुनि उपाधि । तें तयासी नेमस्त बाधी । म्हणोनियां भजनविधी । चुकों न द्यावा ॥ २५ ॥ बिढार नाहीं भक्तीचें । तेथें समाधान असेल कैंचें । भिंतीवरील भस्माचें । जालेपण ॥ २६ ॥ भक्तीवीण जें ज्ञान । तेंचि सोलीव अज्ञान । तेणें कांहीं समाधान । होणार नाहीं ॥ २७ ॥ समाधानों जो आगळा । तेथें भक्तीचा जिव्हाळा । जैसी ते गृहाची कळा । आंगण सांगे ॥ २८ ॥ भक्तीवीण देव जोडे । ऐसें कल्पांतीं न घडे । भक्ती करितां साधक जडे । भगवंतीं ॥ २९ ॥ आतां भक्ती ते कैसी । दृढ व्हावया ज्ञानासी । हेंचि पुढिलिये समासीं । बोलिजेल ॥ ३० ॥

---

१ विश्रांति. २ आत्मघातकी. ३ पंचभौतिक, जडांतले. ४ गुतावितात.

## समास ४ था.

॥ श्रीराम ॥ मागां जालें निरूपण । केलें पाहिजे साधन । तया साध-नाचें लक्षण । ऐसें असे ॥ १ ॥ व्हावया ज्ञानाची प्राप्ती । आधीं केली पाहिजे भक्ती । भक्ती घडलिया मुक्ती । पाठी लागे ॥ २ ॥ मोक्षभुवन अतिसुंदर । आनंदरूप मनोहर । तेथें जावयाचा विचार । ऐक बापा ॥ ३ ॥ तेथें नऊ पायऱ्या उत्तम । ऐक पायरी प्रथम । जे चढतां तुटे भ्रम । निःशेष जीवांचा ॥ ४ ॥ तें तूं जाण गा श्रवण । करावें नित्य निरू-पण । तया निरूपणाची खूण । ऐसी असे ॥ ५ ॥ सज्जन आणि कृपाळ । जयासी ज्ञान जालें प्रांजळ । तया संगतीनें मळ । तुटे अज्ञानाचा ॥ ६ ॥ अद्वैतचर्चा अखंड । जेथें नाहीं पाषांड । तये संगतीनें बंड । नुरे मी-पणाचें ॥ ७ ॥ श्रवण करावे तेंचि ग्रंथ । जेथें बोलिला परमार्थ । शृंगार-श्रवणीं अनर्थ । नेमस्त आहे ॥ ८ ॥ म्हणोनि तें त्यजावें । जेथें नाना युक्ती लाघवें । भक्तिज्ञानवैराग्य भावें । घ्यावें आदरें ॥ ९ ॥ नाना कथा चमत्कार । नवरसिक अपार । तें त्यजूनियां सार । अद्वैत घ्यावें ॥ १० ॥ श्रवण केलियाचें फळ । क्रिया पालटे तत्काळ । तेणें करितां प्रांजळ । आत्मज्ञान होय ॥ ११ ॥ सगुण सर्वोत्तमाचें ध्यान । करावें गुणानुवाद-कीर्तन । हरिकथानिरूपण । करीत जावें ॥ १२ ॥ या नांव दुसरी भक्ती । ऐक तिसरीची स्थिती । सर्वकाळ आदरें चित्तीं । नाम असावें ॥ १३ ॥ चवथी पादसेवन । पांचवी असे अर्चन । सकळांचें करावें पूजन । विधीप्रमाणें ॥ १४ ॥ सकळांसीवंदन सहावी । दास्यत्व ही सातवी । आतां ऐका आठवी । भक्ति कैशी ॥ १५ ॥ सखा देवांचि मानावा । अखंड तोचि आठवावा । भार आभार घालावा । तयाचवरी ॥ १६ ॥ नवमी तें अद्वैत जाण । करावें आत्मनिवेदन । विचार घेतां अभिन्न । मुळींच आहे ॥ १७ ॥ हें नवविधा भजन । सायुज्यमुक्तिसाधन । तेणें करितां शुद्ध ज्ञान । प्राणियास होय ॥ १८ ॥ शुद्ध ज्ञानाचेनि बळें । अंतरीं वैराग्य प्रबळे । तेणें लिंगदेह मोकळें । होय वासनेसीं ॥ १९ ॥ लागतां स्वरूपा-नुसंधान । नाठवे देहाभिमान । विश्रांती देखोन मन । तद्रूप होय ॥ २० ॥ आदिपुरुष तो एकला । नाहीं द्वैताचा गलबला । संगत्यागें अवलंबिला । शुद्ध एकांत ॥ २१ ॥ तेथें मन पांगुळलें । आप आपणा विसरलें । आप-णास भुलोन गेलें । स्वरूपबोधें ॥ २२ ॥ मी कोण हें न कळे । अवघा आत्माचि प्रबळे । तेणं बळें मन मावळे । कर्पूरन्यायें ॥ २३ ॥ तेथें शब्द कुंठित जाला । अनुभव अनुभवीं निमाला । आतां असो हा गलबला । कोणीं करावा ॥ २४ ॥ वाटे एकांतासी जावें । पुनः हेंचि अनुभवावें ।

उगेंचि निवांत असावें । कल्पकोटी ॥ २५ ॥ नको वक्तृत्व उपाधि । पांगुळली स्वरूपीं बुद्धी । लागली सहजसमाधी । हेतुरहित ॥ २६ ॥ गुरु शिष्य एक जाले । अनुभवबोधीं बुडाले । त्यांचे शुद्धीस जे गेले । तयां तीच गती ! ॥ २७ ॥ तुटला संसारबंधु । आटोनि गेला भवसिंधू । बुडाला बोधीं प्रबोधू । विवेकबळें ॥ २८ ॥ ज्ञानाग्नी प्रगट जाला । तेणें माया कर्पूर जळाला । विवेकें अविवेक ग्रासिला । तये ठायीं ॥ २९ ॥ जालें साधनाचें फळ । चुकलें जन्माचें मूळ । निष्कलंक आणि निर्मळ । तोचि आत्मा ॥ ३० ॥ दृढ बाणली आत्मस्थिती । मिथ्यत्वें मुरडली वृत्ती । सांगिजे वर्तती गती । पुढीलिये समासीं ॥ ३१ ॥

---

## समास ५ वा.

॥ श्रीराम ॥ आतां शिष्या सावधान । मागील कथानुसंधान । जालिया आत्मनिवेदन । आली वृत्ती मिथ्यत्वें ॥ १ ॥ लोभी धन पाहोनि आले । परी मन तेथेंचि बैसलें । शरीरप्रपंचीं वर्तलें । भ्रांतापरी ॥ २ ॥ कार्य करी प्रपंचाचें । परि ध्यान लागलें धनाचें । अंतर गुंतलें तयाचें । द्रव्याकडे ॥ ३ ॥ तद्रूप जालें मन । ध्यानीं आठवे धन । पिसें लागलें स्वप्न । तैसेंचि देखे ॥ ४ ॥ तैसा ज्ञाता समाधानी । प्रारब्धयोगें वर्ते जनीं । परी अनुसंधान मनीं । वेगळेंचि असे ॥ ५ ॥ वृत्ती गुंतली स्वानुभवें । जनीं तेंचि भासे आघवें । सबाह्य व्यापिलें देवें । ब्रह्मांड अवघें ॥ ६ ॥ वृत्ति मूळाकडे पाहे । तंव रामचि दिसताहे । स्तब्ध होवोनियां राहे । तंव रामचि दिसे ॥ ७ ॥ मन मुरडालियां वाटे । तंव मार्गीं राम भेटे । मागें पुढें प्रगटे । रामचि अवघा ॥ ८ ॥ दाही दिशा अवलोकितां । रामचि भासे तत्वतां । वदन चुकवूं जातां । सन्मुख राम ॥ ९ ॥ राम झालिया सन्मुख । कल्पांतीं नव्हे विन्मुख । नेत्र झांकितां अधिक । रामचि दिसे ॥ १० ॥ मग विसरोनि पाहिलें । तंव तें रामचि जालें । जीव सर्वस्वें वेधले । संपूर्ण रामें ॥ ११ ॥ मग आपणाकडे पाहे । तव रामचि जाला आहे । उभयसाक्षी जो राहे । तोचि राम ॥ १२ ॥ रामेंविण सर्वथा कांहीं । अणुमात्र रितें नाहीं । दृश्य द्रष्टा दर्शन तेंही । रामचि भासे ॥ १३ ॥ प्रपंच सांडिला मानसें । दृढ लागलें रामपिसें । देह वर्ते भ्रमिष्ट जैसे । पिशाचवत् ॥ १४ ॥ रामरूपीं वेधलें मन । तेणें राहिला कुलाभिमान । पूर्वदशेचें लक्षण । पालटोनि गेलें ॥ १५ ॥ धरूनि रामरूपीं आवडी । प्रपंच गेला तडातोडी । माया राहिली बापुडी । न

चले कांहीं ॥ १६ ॥ ऐसा राम प्रगटला । दृश्य पदार्थ लोपला । असतच नाहींसा जाला । सद्गुरुप्रतापें ॥ १७ ॥ ऐसें नाहीं हें गे तें गे । ऐसें तैसें पुढें मागें । पूर्वस्थिती बोलणें लागे । ऐसें यापरी ॥ १८ ॥ स्वरूप बोलिलें नवजाये । बोलिल्याविण होता न ये । म्हणोनि शब्दउपाये । राचिला देवें ॥ १९ ॥ शब्दाचे उदरीं अगाध । सांठवला आहे बोध । अर्थ पहातां स्वानंद । तुंबळे बळें ॥ २० ॥ शब्दमंथन शब्दें केलें । अर्थनवनीत प्रगटलें । मंथनकर्त्यासी भक्षिलें । त्या नवनीतें ॥ २१ ॥ प्रपंचतक्राअंतरीं । नवनीत वास्तव्य करी । तक्र आटोनि पात्रभरी । नवनीत जालें ॥ २२ ॥ अवघें नवनीत दाटलें । तेणें बळें पात्र फुटलें । नवनीतें संपूर्ण जालें । ब्रह्मांड अवघें ॥ २३ ॥ तेथेंही दाटलें उदंड । तेणें उतटलें ब्रह्मांड । सकळ लोपोनि उदंड । तेंचि तें जालें ॥ ॥ २४ ॥ नवनीत प्राप्त व्हावयासी । जातां तयासि तेंचि ग्रासी । सकळ पदार्थमात्रासी । नवनीतें सेविलें ॥ २५ ॥ सेविलें आपणा आपण । हे अनुभवाची खूण । ग्रंथ जाला संपूर्ण । पंचसमासी ॥ २६ ॥ सद्गुरूसी जातां शरण । शीघ्र तुटे जन्ममरण । सर्व मनोरथ पूर्ण । होती वचनमात्रें ॥ २७ ॥ देह नासे क्षणांतरीं । जाणोनि सार्थक करी । तो एक धन्य संसारीं । सत्संगेंचि ॥ २८ ॥ उपजला प्राणी तो नासे । आपणा तोचि मार्ग असे । म्हणोनि दृढविश्वासें । सद्गुरुपाय धरावे ॥ २९ ॥ चालवीत असतां आश्रम । जे होइजे आत्माराम । ऐसा हा सत्समागम । महिमा कोटिगुणें ॥ ३० ॥ श्रोतीं सावध होणें । अंतकाळीं लागे जाणें । येथील राहाती सजणें । आणि संपत्ती ॥ ३१ ॥ बहुता जन्मांचे शेवटीं । नरदेह पुण्यकोटी । म्हणोनि भगवंता भेटी । होती सत्संगें ॥ ३२ ॥ ऐशी खूण सकळांस । सांगोनि गेला रामदास । सत्संगें जगदीश । नेमस्त भेटे ॥ ३३ ॥ अरुख बोबडी वाणी । भावें पूजिला कोदंडपाणी । न्यून पूर्ण संतजनीं । क्षमा केली पाहिजे ॥ ३४ ॥ इति पंचसमासीग्रंथः संपूर्णः ॥

---

# ( ६ ) जनस्वभावगोसावी.

॥ श्रीराम ॥ अनीती अविवेकी अन्यायी । अभक्त अधम लंडाई[1] । वेदशास्त्र करील काई । तया मूर्खासी ॥ १ ॥ कर्माच्या ठाईं अनादर । नाहीं

---

१ बेपर्वाई.

सगुणसाक्षात्कार। ज्ञान पहातां अंधार । निश्चय नाहीं ॥ २ ॥ उग्याच गोष्टी ऐकिल्या । मना आल्या त्या धरिल्या । रत्नें सोडून एकवटिल्या। शुंभा[1] जैशा ॥ ३ ॥ फाल्गुनमासींचा खेळ । जैसा अवघा बाष्कळ । तेथें पाहोनि निर्मळ । काय घ्यावें ॥ ४ ॥ प्रत्ययज्ञानेंविण । करी अनुमानाचा शिण । शत्रु आपणासी आपण । होऊन राहे ॥ ५ ॥ त्यासी कोणें उमजावें । मानेल तिकडें न्यावें । आंधळें गुरूं स्वभावें । धांवे चहूंकडे ॥ ६ ॥ जिकडे तिकडे ज्ञान जालें । उदंड गोसावी उतले[2] । तयांचे संगतीं जाले । बाष्कळ प्राणी ॥ ७ ॥ भ्रष्ट ओंगळ अनाचारी । कुकर्मी अनुपकारी । विचार नाहीं अविचारी । जेथें तेथें ॥ ८ ॥ गर्भांधा कैंची परीक्षा । दीक्षाहीनासि दीक्षा । प्रमाण मानी प्रत्यक्षा । विवेकहीन ॥ ९ ॥ कशापासून काय जालें । ब्रह्मांड कोणें निर्मिलें । कांहीं न कळतां भुंकलें । गाढव जैसें ॥ १० ॥ जें वेदशास्त्रीं मिळेना । अध्यात्म कांहीं कळेना । माजला बोका आकळेना । रेडा जैसा ॥ ११ ॥ कोण दीक्षा आहे कैसी । विवेक स्थिती ऐशी । न पाहतां वसवसी । श्वान जैसें ॥ १२ ॥ ऐसे प्रकारींचें जन । चित्तीं अवघा अनुमान । प्रतीतीवीण ज्ञान । उगेंच बोले ॥ १३ ॥ लक्षण नेणे अवलक्षण । भाग्य नेणें करंटपण । ज्ञान नेणे अज्ञान । परम अन्यायी ॥ १४ ॥ एक उपदेश घेती । देवतार्चन टाकून देती । धर्मनीति बुडविती । महापाषांडी ॥ १५ ॥ म्हणती आमुचा गुरु । तयाचा अगाध विचारू । तेथें अवघा एकंकारू । भेद नाहीं ॥ १६ ॥ एक म्हणती गुरु आमुचा । करी अंगीकार विष्ठेचा । तयासारिखा दुजा कैंचा । भूमंडळीं ॥ १७ ॥ एक म्हणती एकचि तो । अखंड ओक वर्पितो । बरें वाईट पाहे तो । गोसावी कैंचा ॥ १८ ॥ अंगीकार करी सौख्याचा । तो गोसावी कशाचा । पहा गोसावी आमुचा । गुखाडींत लोळे ॥ १९ ॥ वोक नरक आणि मूत । निःशंक घटघटा घेत । लोकांमध्यें मोठा महंत । तया म्हणावें ॥ २० ॥ वोंगळपणाची स्थिती । स्वयें ओंगळ करीती । शुचिष्मंत महापंडितीं । मानिजेना ॥ २१ ॥ बरें जैसें जैसें मानलें । तैसें तैसें घेतलें । येथें आमुचें काय गेलें । होइना कां ॥ २२ ॥ एक म्हणती अर्गळा । भूताळा आणि देवताळा । जनांमध्यें आग्या वेगळा । चेतऊं जाणे ॥ २३ ॥ म्हणती आमुचा गुरु । जाणे चेटकाचा विचारू । भूतें घालून संहारू । समथ असे ॥ २४ ॥ म्हणती आमुच्या घरीं । मोठी विद्या पंचाक्षरी । चेडे चेटके नानापरी । लोकांमध्यें ॥ २५ ॥ अखंड राहे स्मशानीं । सटवी मेसको मायराणी । नाना कुयंत्रें येथुनी । शिकोनि

[1] गोंवऱ्या. [2] पेव फुटले.

जावीं ॥ २६ ॥ एक म्हणती गोसावी । गारुड्यास वेड लावी । त्यांचे सर्पंची पळवी । चहूंकडे ॥ २७ ॥ कुसळी विद्या दृष्टिबंधन । तत्काळ सभामोहन । उच्चाटण आणि खिळण । मोहनी विद्या ॥ २८ ॥ आमुचे गोसावी महायोगी । औषधें देती जगालागीं । नपुंसक वनिता भोगी । चमत्कारें ॥ २९ ॥ आमुचे गोसावी साक्षेपें । अखंड करिती सोनें रुपें । अंजन साधन त्यापें । काय उणें ॥ ३० ॥ मोठा बडिवार गुरूचा । विंचू उतरी ठाईंचा । तैसाचि उतार सर्पाचा । ठाईंचा होय ॥ ३१ ॥ जंबुक मूषकें खिळवी । चोरटीं करावीं वोणवीं । अखंड भूतें राबवावीं । नाना-जिनसीं ॥ ३२ ॥ आमुचा गुरु गुप्त होतो । दुजे दिवशीं उमटतो । अचेतन चालवितो । मोठा ज्ञानी ॥ ३३ ॥ व्याघ्रावरी निःशंक । हातीं सर्पाचा चाबुक । वांचले होते सहस्त्र एक । सामर्थ्यबळें ॥ ३४ ॥ दांत पाडोनि निघाले । पांढरे केश काळे जाले । किती आले आणि गेले । गोसाव्या देखतां ॥ ३५ ॥ धारबंद नजरबंद । नाना घुटके काम बंद । पारे मोहरे नाना बंद । नाना प्रकारें ॥ ३६ ॥ अग्नीमध्यें परी जळेना । लोकांमध्यें परी कळेना । देखतां देखतां अस्माना[1] । वेंघून जाय ॥ ३७ ॥ जाणे दुसऱ्याचे जीवींच । वांझपण फेडिलें वांझेचें । मन विघडी दंपत्याचें । एकही करी ॥ ३८ ॥ त्याच मोठें नवल कीं गा । मृत्तिकेच्या करी लवंगा । ब्राह्मण समंध अंगा । आणून दावी ॥ ३९ ॥ मातीची साखर केवळ । ढेंकळाचा करी गूळ । धोत्र्यांच्या बोंडांचीं केवळ । वाळकें करी ॥४०॥ श्वास कोंडी दिशा कोंडी । पाडी तिडकेनें मुरकुंडी । घडा मानसाची मान वांकडी । करून मोडी ॥ ४१ ॥ ऐशापरीच्या करामती । भोंपळे पोटांत चढविती । मनुष्याचे पशु करिती । निमिषमात्रें ॥ ४२ ॥ गुरु भविष्य सांगती । रेड्याकरवीं वेद म्हणविती । गधड्याकरवीं पुराणें सांगविती । सामर्थ्यबळें ॥ ४३ ॥ कुतऱ्याकरवीं रागोद्धार । कोंबड्या-करवीं तत्वविचार । खेचर आणि भूचर । सकळ बाधी ॥ ४४ ॥ घुटका[2] घटकेनें करावा । फुटका कवडा वेचों न द्यावा । उदंड बचनाग साधावा । एकाएकीं ॥ ४५ ॥ वाळलीं काष्ठें हिरवाळलीं । आंधळीं डोळसें जालीं । पांगुळें धांवों लागलीं । चहूंकडे ॥ ४६ ॥ गर्भिणीस कन्या कीं पुत्र । हें ठाउकें आहे यंत्र । गोसाव्यांनीं विद्या मात्र । अभ्यासिली ॥ ४७ ॥ भांड-विद्या अभ्यासिली । तस्करविद्या कळों आली । विचारें पाहिली । वसुं-धरा ॥ ४८ ॥ आमुचा गुरु अधिक गुणें । डोईचें करी रांधणें । लोकांचे नवस पुरवणें । नाना प्रकारें ॥ ४९ ॥ मेले प्राणी उठविले । साकरेचें

१ आकाशास. २ भांगेचा घोटा.

मीठ केलें । गटगटा अग्नीस गिळिलें । काय सांगों ॥ ५० ॥ गोसावी समाधी बैसला । दुसरे वेळे उघडून पाहिला । पूर्वेचा पश्चिमेस गेला । अकस्मात ॥ ५१ ॥ लिंगाचे तुकडे तोडिती । कोटिलिंगें एकचि करिती । मोजवून दाढी चारिती । पाषाणनंदी ॥ ५२ ॥ आसन घातलें जळावरी । पाहतां तो पैलतिरीं । आमुचा गुरु समुद्रावरी । चालत जातो ॥ ५३ ॥ पुरुषाची करी वनिता । वनितेचा पुरुष मागुता । अन्न खाऊन तत्वतां । दिशा[1] नाहीं ॥ ५४ ॥ नानाजिनसी अन्न खाणें । परी उदक नाहीं घेणें । शापून भस्मचि करणें । ऐशा गुरु ॥ ५५ ॥ अन्न उदंडचि खाणें । किंवा उपवास करणें । गोमुखतोंडें जेवणें । यथासांग ॥ ५६ ॥ गुरु वाघासी भेटला । वाघें चरचरा चाटिला । वस्त्रें बांधोनि आणिला । घरास वाघ ॥ ५७ ॥ गोसावी वाघ होतो । दुसऱ्या वाघासी मारितो । भुंक भुकोंचि मरतो । उतार नाहीं ॥ ५८ ॥ साधी बाळंतिणीची खापरी[2] । मोहरे साधी नानापरी । तूप घे घागरीच्या घागरी । गुरु आमुचा ॥ ५९ ॥ मेल्या माशा उठविती । तुळसी देवावरी पाडिती । ऐशा नाना करामती । भूमंडळीं ॥ ६० ॥ आमुच्या गुरूची मोठी महंती । नाना अभक्ष भक्षिती । लोकांदेखतां फुलें करिती । मद्यमांसाचीं ॥ ६१ ॥ एक गोसावी पृथ्वीवरी । त्याची कोणी न पवे सरी । जेथें बैसे तेथें बोहरी । करी सावकाश ॥ ६२ ॥ एक गोसावी महा भला । पोरीं वाळवंटीं पुरिला । एक तो पडोनिच राहिला । कित्येक दिवस ॥ ६३ ॥ एक गोसावी भाग्य देती । एक गोसावी पुत्र देती । गोसाव्यानें नवस चालती । नानाप्रकारें ॥ ६४ ॥ जें जं मनामध्यें चिंतावें । तें तें गोसाव्यांनीं जाणावें । चुकलें ठेवणें काढून द्यावें । नानाप्रकारें ॥ ६५ ॥ सुडक्यामध्यें लाह्या भाजिती । थोड्या द्रव्याचं उदंड करिती । पराचीं खबुत्रें नाचविती । नानाप्रकारें ॥ ६६ ॥ हरपलें सांपडून द्यावें । चोरटें तत्काळ धरावें । थोडें अन्न पुरवावें । बहुत जनांसी ॥ ६७ ॥ ऐसें वर्ततें लोकीं । येणें सार्थक नव्हे कीं । अध्यात्मविद्या विवेकीं । जाणिजेते ॥ ६८ ॥ पिंडज्ञान तत्वज्ञान । आत्मज्ञान ब्रह्मज्ञान । पिंडब्रह्मांड सकळ शोधून । राहिले जे ॥ ६९ ॥ पदार्थज्ञानाचा बडिवार । त्याहून थोर ईश्वर । ऐसे प्राणी लहान थोर । सकळ जाणती ॥ ७० ॥

---

१ शौचास जाणें. २ मस्तकाची करवंटी.

# (७) षड्रिपुनिरूपण.



## १ काम. (अनुष्टुप् वृत्त).

भल्यांसी वैर करिताती ते साही वोळखा बरें । षड्रिपू कामक्रोधादि मद मत्सर दंभ तो ॥ १ ॥ प्रपंच साहवा वैरी हे वैरी जिंकितां बरें । भल्यांसी लाविती[१] वेढा परत्रमार्ग रोधिला ॥ २ ॥ काम आरंभिचा वैरी निष्काम बुडवी सदा । कामना लागली पाठी काम काम करी जनीं ॥ ३ ॥ काम उत्पन्न होताहे ते वेळे नावरे जनां । कामवेड जडे ज्याला तो प्राणी आत्मघातकी ॥ ४ ॥ कित्येक योषितेसाठीं[२] कातरा मृत्यु पावले । झडाच घालिती नेटें पतंगापरि भस्मती ॥ ५ ॥ आपणा राखणें नाहीं शुद्धि नाहीं म्हणोनियां । सभाग्य करंटे होती वेश्येसी द्रव्य नासिती ॥ ६ ॥ कित्येक भोरपी[३] झाले किती गेले उठोनियां । बाटले भ्रष्टले मेले बुडाले कामवेसनीं[४] ॥ ७ ॥ व्याधीनें नासती अंगें नासिकें झडती जनीं । औषधें दंतही जाती रूपहानीहि होतसे ॥ ८ ॥ रूपहानी शक्तिहानी द्रव्यहानी परोपरी । कुलहानी यातिहानी सर्व हानीच होतसे ॥ ९ ॥ कित्येक मातले भोगें लोकलाजचि सांडिली । शुभाशुभ नसे तेथें नीचाशीं[५] उंच भ्रष्टती ॥ १० ॥ कामाचे व्यसनें गेले मातले रतले जनीं । तारुण्य दोंदिलांसाठीं जन्म दुर्लभ नाशिला ॥ ११ ॥ विधीनें विषयो घ्यावा अविधी नसतां बरें । आश्रमीं न्यायनीतीनें प्रपंच करणें सुखें ॥ १२ ॥ घुटक्यानें नासती काया चेटकें तीं परोपरी । जारणमारणादीकें नाटकें चेटकें बहु ॥ १३ ॥ चेडेकां देवतें भूतें जन्महानीच होतसे । म्हणोनि काम हा वैरी आकळावा परोपरी ॥ १४ ॥ ऐसा निरूपिला काम क्रोध तो बोलिला पुढें । कोपतो तामसी प्राणी तमोगुणें अधोगति ॥ १५ ॥ इति कामनिरूपणं समाप्तम् ॥ १ ॥

## २. कोप.

कोपआरोपणा खोटी कोपें कोपचि वाढतो । मोडतो मार्ग न्यायाचा अन्याय प्रबळे बळें ॥ १ ॥ क्रोध हा खेद संपादी जेथें तेथें चहूंकडे । विवेक पाहतां कैंचा शुद्धि तेथें असेचिना ॥ २ ॥ भ्रुकुटी कुटिला गांठी काळिमा वदनीं चढे । कुर्कुरी बुर्बुरी रागें हस्तपायच चोळितो ॥ ३ ॥

---

१ वेढून टाकतात. २ स्त्रीसाठीं. ३ बहुरूपी. ४ कामव्यसनांत. ५ हीनयातीशीं संबंध केल्यानें.

कुशब्द वोखटे काढी त्रासकें वचनें वदे । घेतसे[1] बालटें ढालें उणें काढी परोपरी ॥ ४ ॥ बोलतां हिंसळे थुंका तायेताये[2] उकावतो । तांबडे जाहले डोळे रागें रागेंचि फूगला ॥५॥ कंठललाटिंच्या शीरा फुगल्या घाम चालिला । थर्थरां कांपतो रागें रूपें भूताचि जाहला ॥६॥ धर्ते लोक झिंजाडी सातांपांचांसि नावरे । लिथाडी पछ्याडी कुस्ती मारामारी धबाधबी ॥ ७ ॥ सुटलीं फिटलीं वस्त्रें नागवे दिसती जना । लाज ते अंतरीं नाहीं मातले नीट धांवती ॥ ८ ॥ अनर्थ मांडला मोठा लाथा बुक्क्या चप्रका । कोपरें मारिती शिरीं काष्ट पाषाण अर्गळा ॥ ९ ॥ मुसळें मारिती काठ्या शिळा डांगाच ढेंकळें । डसती झोंबती अंगा निकुरें लाविती कळा ॥ १० ॥ एकांहीं धरिल्या शेंड्या वृषणीं लाविती कळा । पाडिले दांत भोंकांडें मस्तकें फोडिलीं बळें ॥ ११ ॥ ताडिले पाडिले पडले रक्तबंबाळ जाहले । घरिचीं मारिती हांका हांका बोंबा परोपरी ॥ १२ ॥ दिवाणामाजि ते नेले मारिले दंड पावले । क्रोधानें करंटे केले क्रोध चांडाळ जाणिजे ॥ १३ ॥ भल्यानें कोप सांडावा शांतीनें असतां बरें । क्षुल्लकें कोप पाळावा भल्याचें काम तों नव्हे ॥ १४ ॥ इति क्रोधनिरूपणं समाप्तम् ॥ २ ॥

### ३. मद.

क्रोध तो बोलिला मागें मद तो ऐकिजे पुढें । मदाचीं गुप्त हें कामें अंतरींचा कळेचिना ॥ १ ॥ मद हा वोखटा मोठा मद हा खेदकारकु । मदानें पद लाधेना मद शोक करी भला ॥ २ ॥ देहाचा मद शक्तीचा द्रव्याचा मद अंतरीं । विद्येचा मद भाग्याचा मदरूप बहुविधा ॥ ३ ॥ मदानें थोकली[4] विद्या पुढें आणीक होइना । मानेना ना मना येना आपुले होरटी[5] कढे ॥ ४ ॥ कळेना सृष्टि देवाची बहुरत्ना वसुंधरा । मदाला नावडे कांहीं सर्वही तुच्छ होतसे ॥ ५ ॥ मदानें भुलला प्राणी विचारें उमजेचिना । पराचें सत्य मानेना विवरेना कदापिही ॥ ६ ॥ वेद हो शास्त्र हो चर्चा नीती हो न्याय हो न हो । आपणा पाहणें नाहीं विरंची[6] बोलिला तरी ॥ ७ ॥ इतरा कोण तो लेखा संतसाधू महंत हो । आपणें न्याय केला तो आपुलें बोलणें बरें ॥ ८ ॥ चालणें थोर तें माझें माझा मीच बहू भला । न्यायाची गोष्टि मानेना नीतीनें कोप येतसे ! ॥ ९ ॥ आपणापरतें नाहीं सर्व कांहीं भुमंडळीं । गुणग्राहकता नाहीं

---

१ आळ. २ उघडपणें. ३ थयथय नाचतो, तावातावानें उसळतो. ४ थांबली, खुंटली. ५ हृद्वान कढतो. ६ ब्रह्मदेव.

पराचें तुच्छ होतसे ॥ १० ॥ कैसेनी उमजावा तो हेंकाडें[1] आंधळें गुरूं । दिसेना नाकळे कांहीं वळित न वळे कदा ॥ ११ ॥ ऐशाचा संग तो खोटा हित तेथें असेचिना । स्वहीत आपुलें नाहीं परहीत कसें घडे ॥ १२ ॥ थोर आयुष्य मोलाचें मदें व्यर्थचि नाशिलें । पापी हा उमजों नेदी शेवटीं दूरि होतसे ॥ १३ ॥ मरतां मद काशाचा पुसे कोण तया मदा । पूर्वींच कळला नाहीं तऱ्हेनें जन्म नाशिला ॥ १४ ॥ देह गेलें बळ गेलें द्रव्य गेलें येकीकडे । बंड गेलें थोंबें[3] गेलें एकला जातसे खळु ॥ ५ ॥ इति मदनिरूपणं ॥

## ४. मत्सर.

मद तो तिसरा शत्रु चौथा मत्सर आइका । मत्सरें सत्य मानेना सत्याचें लटकें करी ॥ १ ॥ बऱ्याचें वोखटें सांगे मज नाहीं म्हणोनियां । पैशुन्य[4] नस्तेंचि करणें नसता कुंदे[5] लावणें ॥ २ ॥ नस्ते नस्ते ढाल घेणें ऐसी हे जाति मत्सरी । आपणु करंटा आहे समर्था निंदितो सदा ॥ ३ ॥ आपणु टोणपा असे सर्वज्ञा न मनी कदा । आपणु तामसी आहे पुण्यवंता पडेचिना ॥ ४ ॥ आपण कुकर्मी प्राणी सत्कर्मासी उच्छेदितो । आपणु चोरटा आहे सकळां चोरटें करी ॥ ५ ॥ आपणु भ्रष्टला आहे भल्याला भ्रष्ट भावितो । आपण घातकी मोठा पराला घातकी म्हणे ॥ ६ ॥ पोटींचा कपटी मोठा जनाला कपटी म्हणे । आपणा भक्ति ठाकेना हरिभक्ता उच्छेदितो ॥ ७ ॥ आपणु नीच कुळींचा कुळवंत मना न ये । आपणु ठायिंचा लंडी रणशूरांसि हांसतो ॥ ८ ॥ आपणु भ्याड ठायींचा धारिष्टा कर्कशू म्हणे । आपणु वोंगळू आहे निर्मळा कर्मठू म्हणे ॥ ९ ॥ आपणु लालुची मोठा वैराग्याची उडावणी । करवेना देखवेना ही ऐसा तो मत्सरू नरू ॥ १० ॥ आपणु कर्म भोगीतो पराला कर्म लावितो । जें कांहीं आपणा नाहीं तें सर्व उडवीतसे ॥ ११ ॥ भांडे तोंडेंचि तें वेडें भकाध्या[6] करिते जनीं । अखंड जनांसी भांडे तंडे तंडे उदंडसा ॥ १२ ॥ धीट तोंडाळ तो प्राणी कांहीं केल्या विटेचिना । लंड तो कोटिंगा[7] मोठा लाज त्याला असेचिना ॥ १३ ॥ मत्सरें भाग्यही गेलें मत्सरें बुद्धि नासिली । भक्ति ना ज्ञान ना कांहीं अरत्र परत्र नसे ॥ १४ ॥ पाहतां सौख्य तों नाहीं लौंद लाताड उद्धट । मत्सरें लाविलें वेढा ज्याचें त्याला कळेचिना ॥ १५ ॥ इति मत्सरनिरूपणं ॥ ४ ॥

---

१ हेकब. २ मद. ३ स्तोम. ४ परदोष. ५ पाप, दोष. ६ बडबड. ७ कोडगा.

## ५. दंभ.

दंभ हा पांचवा जाणा महाशत्रु कळेचिना । यालागीं भांडणें लोकां एकामेकां पडेचिना ॥ १ ॥ दंभ डांभा बरा वाटे यालागीं लोक भांडती। भांडती मरती जातो डंभालागीं निघोनियां ॥ २ ॥ सकळां पाहिजे डांभा परंतु मिळतो कसा । यालागीं चुमुंरीताती बुढाले दुःखसागरीं ॥ ३ ॥ स्वार्थ हा व्यर्थ जाणावा परंतु जन आंधळे । दंभानें आंधळें केलें ऐसा हा दंभतस्करू ॥ ४ ॥ शरीर मुख्य जायाचें दंभाची कोण ते कथा । सद्यांचि उमजेना कीं वैर साधी परोपरी ॥ ५ ॥ देहाचा दंभ तो खोटा परंतु आवडे जना । विवेकें पाहतां नाहीं दुःखी होती म्हणोनियां ॥ ६ ॥ ज्ञानिया दंभ बाधेना एकाएकीं खडाखडी । उठोनि चालिला योगी दंभ तें कुतरें किती ॥ ७ ॥ वैराग्य पाहिजे अंगीं उदास फिरती लिळा । दंभ तो उडाला तेथें लोलंगताचि खुंटली ॥ ८ ॥ निस्पृया दंभ बाधीना निस्पृह पाहिजे बरा । अंतरें अंतरा भेदी तेथें दंभाचि नाडळे ॥ ९ ॥ दंभ तो चोर जायाचा लालची करिती मुढें । शेवटीं सर्वही जातें प्रेत होतें भुमंडळीं ॥ १० ॥ मढ्याला कासया व्हावें जाणावें पहिलेंचि हो । लावावें कारणीं देहो दंभ कैंचा उरेल तो ॥ ११ ॥ अखंड आठवावे रे मरणाचें ध्यान अंतरीं । तेव्हांचि वैराग्य उठे दंभ लोटे परोपकारी ॥ १२ ॥ मांसाचा मोधळा[4] याचा दंभ तो कोण तो किती । सावधा दंभ बाधीना दुश्चिताला पछाडितो ॥ १३ ॥ तो धन्य विवेकी राजा वैराग्यबळ आगळें । भक्तीचा वोळला सिंधु दंभ तेथें दिसेचिना ॥ १४ ॥ इति दंभनिरूपणं ॥

## ६. प्रपंच.

प्रपंच साहवा वैरी परत्र अंतरी दुरीं । अवघा तोचि तो जाला तेणें देव दुरावला ॥ १ ॥ पदार्थी बैसली बुद्धि शुद्धि नाहीं परत्रिची । प्रपंच शेवटीं कैंचा गेल्या देहेच हातिंचा ॥ २ ॥ देव तो राहिला दूरीं ऐसा वैरी प्रपंच हा । बाळत्वीं छंद मायेचा खेळतां राहिला दुरीं ॥ ३ ॥ लागला छंद पोरांचा क्षणक्षण चुकावितो । सांगते माय मानेना लिहीना ना घरीं असे ॥ ४ ॥ हाणिती मारिती पोरें रडतो पडतो बहू । सोशितो आपुल्या जीवें खेळासाठीं मुलांकडे ॥ ५ ॥ कांहींसा शाहणा जाला शिकवीला परोपरी । लोभानें लग्नही केलें वोढला सासुऱ्याकडे ॥ ६ ॥ नोवरी आवडे जीवीं नटावेंसें मनीं उठे । तारुण्य बाणतां अंगीं काम-

१ मोठेपणा. २ जाणारें, नाशवंत. ३ वासना. ४ गोळा, पुतळा.

लोभेंचि भूलला ॥ ७ ॥ खेळ तो राहिला मागें काम तो पडिला पुढें । मोहिला शक्तिनें[1] प्राणी तीजवांचोनि नावडे ॥ ८ ॥ उदंड जाहलीं पोरें खर्च तो वाढला पुढें । उद्वेग लागला जीवा मेळवीतां मिळेचिना ॥ ९ ॥ उदंड करंटा जाला हिंडे चहुंकडे फिरे । प्रीति ते राहिली मागें अशक्त जाहला बहू ॥ १० ॥ फिटेना रीण तें वाढे ताडातोडी चहूंकडे । मिळेना अन्न ना वस्त्र वृद्धाप्यें खंगला बहु ॥ ११ ॥ कष्टला शेवटीं मेला गेला प्रपंच हातिंचा । घातला मागुती जन्मा ऐसा वैरी प्रपंच हा ॥ १२ ॥ जन्मासि घातलें देवें काय येऊनि साधिलें । भुलले चुकले देवा प्रपंच घातकी पहा ॥ १३ ॥ आधींच सर्व जाणावें काय येतें समागमें । निर्वाणीं अंतिंचा देवो कोणी येकें चुकों नये ॥ १४ ॥ घर गांव ठाव माझा वाडे शेत मळे गुरें । पुत्र कन्या वधू माझी सर्व सांडोनि चालिला ॥ १५ ॥ माझें माझें म्हणे वेडा स्वार्थबुद्धी बहूतसी । सर्व सांडोनि गेला रे येकायेकीं उठोनियां ॥ १६ ॥ प्रपंचें भुलला प्राणी व्यर्थ आयुष्य वेंचलें । देव ना धर्म ना कांहीं ऐसा हा साहवा रिपु ॥ १७ ॥ प्रपंचाकारणें कष्टी सर्वस्वें वेंचला जिवें । कांहींच संचिलें नाहीं शेवटीं हात झाडिला ॥ १८ ॥ अपेशीं सदाचा जाला मायाजाळेंचि भूलला । आपुलें मानिलें जें जें तें तें सर्वत्र राहिलें ॥ १९ ॥ जाहला खोत[2] पापाचा सर्वांच पाप घेतलें । यातना भोगणें लागे चुकला शाहणा कसा ॥ २० ॥ आधींच जाणिजे सर्व विवेकी त्यास बोलिजे । प्रपंच नाथिला बा रे वैरी हा सोडिला कसा ॥ २१ ॥ सर्वांसि योग साधेना पुण्य ऊदंड पाहिजे । सहस्रामाजि तो एक ज्ञानवैराग्यनेटका ॥ २२ ॥ षड्रिपू जिंकिले जेणें तोचि ज्ञानी महाभला । दीक्षेनें उद्धरी लोकां वैरागी तो उदासिनु ॥ २३ ॥ इति प्रपंचनिरूपणं ॥

# (८) पंचीकरणयोग.



श्रीराम.

नमूं ते शारदा देवी । त्रैलोकीं जाणती[3] कळा ।<br>
जगाची जाणती ज्योती । जगज्ज्योती म्हणोनियां ॥ १ ॥<br>
जीचेनि वर्तती सर्वै । देव गंधर्व मानवी ।<br>
योगी ऋषी मुनी ध्यानी । वर्तवीत अंतर्कळा ॥ २ ॥

१ स्त्रीनें. २ ढीग. ३ मूळमाया, अंतरात्मा, जगज्ज्योति हीं शारदेचीं नांवें होत.

चाळणा धारणा स्फूर्ती । मती युक्ती विचारणा ।
सद्बुद्धी सद्विद्या ते । भुक्ती मुक्ती सायोज्यता ॥ ३ ॥
खेचरां भूचरां सर्वै । मौन्यगर्भविचारणा ।
चारी खाणी चारी वाणी । बोलवी चालवी सदा ॥ ४ ॥
विवरीते विचारीते । प्रवृत्ति निवृत्तींकडे ।
जागृती स्वप्न हो तुर्या । उन्मनी ज्ञप्ती बोलिजे ॥ ५ ॥
देव हो भक्त हो ज्ञानी । शिवशक्ती च अष्टधा ।
प्रकुर्तिपुरुषादीक । नाना नामें परोपरीं ॥ ६ ॥
विस्तार मूळमायेचा । किती म्हणोनि सांगणें ।
नांव रूप जयेचेनी । जाणति जाणते गुणी ॥ ७ ॥
गुणी हो निर्गुणी हो तें । सर्वही सचराचरीं ।
देवदेव्या जगद्वंद्या । पिपिलिकाची विहंगमु ॥ ८ ॥
आगमी निगमी आहे । नानारूपीं विराजती ।
वाढवी मोडवी पाळी । निर्दाळी आपआपणा ॥ ९ ॥
होतें जातें पुन्हा होतें । विचित्र न कळे कळा ।
ते कळा अंतरीं जागे । प्रत्यक्ष न दिसे जना ॥ १० ॥
सर्व कर्तव्यता तेथें । येथें संदेह नाडळे ।
विरंची देव इंद्रादी । देवदेव्या बहुविधा ॥ ११ ॥
तीवीण जाणता कैचा । पांहों जातां भुमंडळीं ।
सर्व शास्त्रमयी देव्या । सद्विद्या ब्रह्मयोगिनी ॥ १२ ॥
कार्य कारणकर्तृत्वे । हेतुः प्रकृति जाणिजे ।
कर्म उपासना ज्ञानी । तत्त्वज्ञी योगधारणा ॥ १३ ॥
मुळीं ते येकली जाली । इश्वरु बोलिजे तिये ।
देवत्रये जयेचेनि । पुढें ब्रह्मांड जाहले ॥ १४ ॥
त्रैलोक्य सर्वब्रह्मांडीं । उत्पत्ती होत जातसे ।
येकांशें पाळिते सर्वें । नाना स्थानीं भुमंडळीं ॥ १५ ॥
कल्पना वासना काया । कायामाया परोपरीं ।
नेणणें आडवे केलें । जेथें तेथें कळेचिना ॥ १६ ॥
द्रव्य तें भूमीचे पोटीं । उदंड दाटलें असे ।
लोक ते पावती मृत्यु । द्रव्य तेथेंची राहिलें ॥ १७ ॥

१ शिवशक्ति—गणेशशारदारूपी मूळमाया. २ क्रमाक्रमानें किंवा झट्पट् पावायच दोन कर्ममार्ग किंवा ज्ञानमार्ग ( दास० २०—२—१० पहा ).

भाग्यानुसार तें द्रव्य । भुमीमध्येंची ठेविलें ।
नेणणें आडवें केलें । दरिद्रें लोक पीडिले ॥ १८ ॥
पोटानें गांजिले प्राणी । मृत्यूनें मारिले सदा ।
नेणती हीत तें कैसें । कांहीं केल्यां कळेचिना ॥ १९ ॥
नेणणें आडवें केलें । ज्ञान पैलाड राहिलें ।
त्यासंगें भुललें प्राणी । बुद्धियोग कळेचिना ॥ २० ॥

॥ इति श्री पंचीकरणयोग प्रथम ॥ १

---

संसार सांगणें किती । लोक सर्वत्र जाणती ।
नेणती देव तो कैसा । सिणती बहुतांपरीं ॥ १ ॥
सर्व ही सांडणें मागें । आधीं देवास धुंडणें ।
धुंडितां धुंडितां देवो । सत्संगें सांपडे जनीं ॥ २ ॥
देहपुरामधें आहे । पुरुष म्हणती तयां[१] ।
देह तो पंचभूतांचा । नरनारीनपुंसकु ॥ ३ ॥
सर्वत्र चालवी देवो । अंतरीचा कळेचिना ।
तयासी नेणतां प्राणी । पुढें तीर्थासि धांवती ॥ ४ ॥
लौकिक लागला मोठा । लौकिकें लोक वर्तती ।
लौकिकें चालती कर्में । देखोवेखीं परस्परें ॥ ५ ॥
स्नान संध्या टिळे माळा । श्रीमुद्रा गोपिचंदनें ।
गवाळीं आसनें चंबु । सोंवळीं तें परोपरीं ॥ ६ ॥
नाना देवार्चनें ध्यानें । पूजनें मंत्र यंत्र ते ।
अत्र गंधादिकें सर्वै । विध्युक्त सांग धारणा ॥ ७ ॥
नाना तपें पुरश्चर्णें । निग्रहें करिती किती ।
दिग्बंद आसनें मुद्रा । अष्टयोग देखणी ॥ ८ ॥
वेद पारायणें चर्चा । पुराणें महात्म्यें किती ।
भुंयेरीं विवरें गुंफा । देवाल्यें पुष्पवाटिका ॥ ९ ॥
होमयागादिकें लिंगें । पूजणें देवदेवता ।
कितेक आगमी क्रिया । वाम सव्य परोपरीं ॥ १० ॥
कर्मांची निर्फळी विद्या । उपासनाच कामना ।
ज्ञानेंचि जाणणें सर्वै । कर्माकर्मविवंचना ॥ ११ ॥

---

१ ' जाणत्या पुरुषाची सत्ता । शरीरीं विभागली तत्वता । सकळकळाचातुर्यता । तेथें वसे ॥ ७ ॥ सकळ पुरांचा ईश । जगामध्यें तो पुरुष ' ( दास० २०–४ ). २ तंत्रमार्गानुसारी.

तें ज्ञान कोणतें कैसें । अभ्यासें पाविजे जनीं ।
श्रवणभक्तीच्या योगें । मुक्ती सायोज्य पाविजे ॥ १२ ॥
कर्म तो पीपिलिका मार्ग । ज्ञानमार्ग विहंगमु ।
तात्काळ पाविजे ज्ञानें । कर्माकर्में हळु हळु ॥ १३ ॥
ज्ञानउपासनेमधें[1] । भेद तो पाहातां नसे ।
मनेंचीं जाणिजे ज्ञान । मनरूप उपासना ॥ १४ ॥
सत्यसंकल्प[2] तो विष्णु । तेची ज्ञान उपासना ।
सर्वज्ञ बोलिजे देव । ज्ञान सर्वज्ञ होय कीं ॥ १५ ॥
ज्ञानेंची चालते सृष्टी । ज्ञान हें देव बोलिजे ।
ज्ञानेंची पाविजे सर्वें । ज्ञानरूप हरी पाहा ॥ १६ ॥
हरी तो अंतरीं नांदे । अंतःकर्णची जाणिजे ।
तो देव सकळां पाळी । आतां प्रत्यक्ष रोकडा ॥ १७ ॥
हरिर्दाता हरिर्भोक्ता । हरिरन्न प्रजापती ।
एकांशें[3] चालवी सर्वें । त्रैलोक्य सचराचरी ॥ १८ ॥
विवराना विचाराना । उगेची सीणता कसे ।
देव सांडुनि देवालयें[4] । बाह्याकारें पुजीतसा ॥ १९ ॥
गृहेंचि पाहातां वेर्थें । गृहस्वामीस पाहाणें ।
देवाल्यें पुजीतां खोटें । आधीं देवासी पाहाणें ॥ २० ॥
॥ योग दुसरा ॥ २ ॥

---

जन्मदुखं जरादुखं । नित्यदुखं न सोसवे ।
जन्म तो निरसतो कैसा । हेंचि शोधूनि पाहाणें ॥ १ ॥
देहे चत्वार निरसावे । उपरी आत्मस्थिथती ते ।
पंचीकरण महावाक्यें । सत्संगेंची सुटका ॥ २ ॥
पंचीकर्ण पंचभूतें । येक येकांसी वाढलीं ।
तयाचा कर्दमु जाला । शास्त्राकारेंचि बोलिला ॥ ३ ॥
चळेना ढळेना ब्रह्म । निर्विकारीच संचलें ।
सृष्टिपूर्वील या गोष्टी । पुढें सृष्टी उभारिली ॥ ४ ॥
निश्चळीं जाहाली माया । सत्यसंकल्प जाणिजे ।
ईश्वरु बोलिजे त्याला । सर्वज्ञ अष्टधा मुळीं ॥ ५ ॥

---

[1] ‘उपासना ज्ञानस्वरूप’ (दास० २०-४-२०). [2] ‘मूळसंकल्प तो हरिसंकल्प’ (दास० २०-४-१९). [3] ‘एकांशेन स्थितोजगत्’ (गीता १०-४२). [4] दास० ७ स० १ सर्व पहा. ‘देहदेवाल्यांमध्यें देव तो पाहणें बरा!

त्रिगुण पंचभूतें तें । अष्टधा यासि बोलिजे ।
बीजाकारें मूळमाया । अधोमुखें विकारली ॥ ६ ॥
विकारी विकारें वाढे । निर्विकारी जसें तसें ।
घट घडे आणि मोडे । आकाश तें जसें तसें ॥ ७ ॥
निश्चळीं चळलें वारें । आलें गेलें पुनः पुन्हा ।
तैसीच मूळमाया ते । आली गेली पुनः पुन्हा ॥ ८ ॥
निर्मळीं मूळमाया ते । मिथ्यत्वें चालिली पुढें ।
कुमारी मूळमाया ते । गर्भिणी गुणक्षोभिणी ॥ ९ ॥
सत्व रज तमोगुण । तीजपासाव जाहाले ।
पृथ्वी आप तेज वायो । आकाश बोलिले कवि ॥ १० ॥
परंतु तो अंतरात्मा । पाचवें तत्त्व बोलिजे ।
चळतो तो अंतरात्मा । आकाश न चळे कदा ॥ ११ ॥
बोलणें हें प्रत्ययाचें । शाहाणे जाणती जीवीं ।
काम क्रोध शोक मोहो । अंतरात्म्यासी उठती ॥ १२ ॥
ब्रह्मांडीं पंचभूतें ते । पिंडीं प्रत्यक्ष दिसती ।
ब्रह्मांडीचे चारी देहे । कल्पकल्पूनि सूचिले ॥ १३ ॥
महाकारण मूळमाया । कारण ते अव्याकृति ।
सूक्ष्म तें हिरण्यगर्भ । स्थूळ विराट बोलिलें ॥ १४ ॥
पिंडावरूनि ब्रह्मांडीं । देहे चत्वार कल्पिले ।
तैसेंची बोलिजे आतां । लोकसंग्रहाकारणें ॥ १५ ॥
अंतःकरण जाणिजे विष्णु । मन चंद्रमा बोलिजे ।
बुद्धि तो विरंची तेथें । चित्त तोचि नारायेणु ॥ १६ ॥
अहंता रुद्र जाणावा । शास्त्रकारेंचि बोलिला ।
हे गुण अंतरात्म्याचे । आकाशीं बोलती जनीं ॥ १७ ॥
पृथ्वी आप तेज वायो । अंतरात्माचि पांचवें ।
अंतःकरण मन बुद्धि । चित्त अहंकार आत्मया ॥ १८ ॥
महद्भूत अंतरात्मा । मुळींची जाणती कळा ।
वायो तेज आप पृथ्वी । हे तत्त्वें चालिलीं पुढें ॥ १९ ॥
येकाचें लाविती येकां । प्रत्यक्ष जाणते कसे ।
पाहिल्याविण बोले जो । तो प्राणी आत्मघातकी ॥ २० ॥

॥ योग तिसरा ॥ ३

---

१ शुद्धांतून अशुद्धांत, सूक्ष्मांतून स्थूळांत अशी मायानदी अधोमुख वाहत आहे. तिच्यापासून.

पंचप्राण ब्रह्मांडीं । पिंडावरुनी वोळखा ।
श्रोत्र दिशा त्वचा वायो । चक्षु सूर्य जिव्हा जळु[1] ॥ १ ॥
वाचा वन्ही पाणी इंद्र । पादोपेंद्र[2] शिश्न[3] विधी ।
गुद नैरुत्य हें तत्त्वें । कल्पीत ब्रह्मांडीची ॥ २ ॥
पंच विषय तन्मात्रा । पिंड ब्रह्मांड येकची ।
ऐसा हा दुसरा देहो । ब्रह्मांडीचा निरोपिला ॥ ३ ॥
काम क्रोध शोक मोहो । भय काळ ब्रह्मांडीचे ।
हे गुण अंतरात्म्याचे । आकाशीं बोलिजे जनीं ॥ ४ ॥
चळणावळणादिक । विराटीं वायु जाणिजे ।
काळ क्षुधा तृषादिक । विराटीं तेज वोळखा ॥ ५ ॥
शुक्लीत[4] मेघ जाणावा । श्रोणीत[5] भूमिगर्भिचें ।
लाळ पाझर जाणावें । मूत्र क्षारसिंधु पाहा ॥ ६ ॥
स्वेद तें द्रव जाणावें । विराटीं आप बोलिजे ।
अस्थीं धोंडे मांस माती । त्वचा वायो नाडी नदी ॥ ७ ॥
रोम द्रुम लता पृथ्वी । ब्रह्मांडीं बोलती जनीं ।
स्थूळ विराट ब्रह्मांडीं । पूर्वीं चारी निरोपिले ॥ ८ ॥
कांहींसा प्रत्ययो येतो । कांहींसा प्रत्ययो नये ।
याकारणें पंचभूतें । मुळीं ऐलीकडे पाहा ॥ ९ ॥
पंच भूतें तीन गुण । पिंडब्रह्मांडऐक्यता ।
निश्चयो हाची जाणावा । येर संदेह वाढवी ॥ १० ॥
येक तत्त्व दोनि तत्त्वें । तीन तत्त्वेंची बोलती ।
चारीसा भांडती भेदे । पंचत्रीपांच पंचकें ॥ ११ ॥
मुळीं तत्त्व मूळमाया । संकल्प मुळीचा मुळीं ।
सत्यसंकल्प तो देवो । स्वयेंचि होत जातसे ॥ १२ ॥
सकळांसी निर्मिता देव । देवासी निर्मिता नसे ।
सर्वांसी मूळ तो देवो । देवासी मूळ नाडळे ॥ १३ ॥
जगाचा ईश तो देवो । जगदीश म्हणोनियां ।
ऐश्वर्य सर्वहि याचें । ईश्वरु याचकारणें ॥ १४ ॥
येकाचें लुटिती येक । भोक्ता तो येकला दिसे ।
सांडे फिटे विटे नासे । तेथें तो देहधारकु ॥ १५ ॥
अन्नाचे ते भोक्ते लोक । तृणाचे ते भोक्ते पशु ।
भोगत्यागेंचि जे जीती[6] । ऐसे हे जीव वर्तती ॥ १६ ॥

१ जळ. २ पाद–उपेंद्र. ३ शिश्न-विधि ( ब्रह्मा ) ४ रेत. ५ रक्त. ६ जगतात.

केर पुंजा राख माती । नाना जिन्नस कुजकें ।
भोक्ता तो सर्वहि भोगी । नाना देहीं भरोनियां ॥ १७ ॥
वांयां जाऊं नेदी कांहीं । बहुतीं बहुतांतरें ।
जातिभेदें देहेभेदें । सर्वही मान्य होतसे ॥ १८ ॥
चारी खाणी चारी वाणी । शोधितां पाहतां कळे ।
ब्रह्मांडीं जितुके प्राणी । येका तत्त्वेंचि वर्तती ॥ १९ ॥
तत्त्व तें येक जाणावें । विस्तार वाढला पुढें ।
त्रिगुण पांचही भूतें । अष्टधावीण नाडळ ॥ २० ॥

॥ योग ॥ ४

---

अंधारें काळिमा येना । उजेडें तें दिसेचिना ।
गोरजें धूळि लागेना । ऐसें निर्गुण जाणिजे ॥ १ ॥
जळामधें भिजेना तें । अग्नीमधें जळेचिना ।
उडेना वायोच्या संगें । ऐसें निर्गुण जाणिजे ॥ २ ॥
शीत नाहिं उष्ण नाहिं । नाहिं कठीण मृदु तें ।
सुगंध दुर्गंध नाहिं । ऐसें निर्गुण जाणिजे ॥ ३ ॥
नित्य आहे पूर्ण आहे । स्थिर आहे चळेचिना ।
धन आहे गुप्त आहे । ऐसें निर्गुण जाणिजे ॥ ४ ॥
आकाशीं आभाळें येती । निर्गुणीं दृश्य दीसतें ।
अभ्रत्यागें दृश्यत्यागें[1] । ऐसे निर्गुण जाणिजे ॥ ५ ॥
चळेना चंचळेना तें । गगनासारिखें असे ।
सन्नीध आडळेना तें । ऐसें निर्गुण जाणिजे ॥ ६ ॥
घेतां ना सांडितां येना । नाडळ जवळीं असे ।
सृष्टींत सृष्टि त्यामधें । ऐसें निर्गुण जाणिजे ॥ ७ ॥
विश्व हें बुडालें वाटे । परंतु कोरडें असे ।
सन्मुख सर्वदा आहे । ऐसें निर्गुण जाणिजे ॥ ८ ॥
पृथ्वीतळीं पृथ्वीमधें । पृथ्वीवर्ते[2] उदंडहि ।
सबाह्य अंतरीं आहे । ऐसें निर्गुण जाणिजे ॥ ९ ॥
येती जातील आभाळें । व्योम तें संचलें असे ।
ये जाय अष्टधा माया । ऐसें निर्गुण जाणिजे ॥ १० ॥
श्रवणें सार शोधावें । मन तें भीजतां बरें ।
निजध्यासें कळे सर्वें । आत्मनिवेदनी क्रिया ॥ ११ ॥

---

१ अभ्रत्यागें आकाश व दृश्यत्यागें निर्गुण. २ पृथ्वीच्या वर.

साधितां तत्त्वता वस्तु । तत्त्वें भूतें निवारती ।
उत्पत्ति स्थिति ते मोठी । आत्मनिवेदनी क्रिया ॥ १२ ॥
वृत्ती ते ज्ञान जाणावें । निवृत्ती पाहाणें बरी ।
विज्ञानी उन्मनी लागे । आत्मनिवेदनी क्रिया ॥ १३ ॥
शब्द निःशब्द बोलावा । वाच्यांशें बहुतांपरीं ।
लक्षांशें हेतही नाहीं । आत्मनिवेदनी क्रिया ॥ १४ ॥
मी कोण शोधितां तत्त्वें । देहे चत्वार निरसती ।
जाणता राहिला जेथें । आत्मनिवेदनी क्रिया ॥ १५ ॥
कार्य कर्ता कारणेंसीं । दृश्य द्रष्टा दर्शनें ।
त्रिपुटी नाडळे जेथें । आत्मनिवेदनी क्रिया ॥ १६ ॥
ध्येय ना ध्यान ना ध्याता । ज्ञेय ना ज्ञान नाडळे ।
वृत्तिशून्य महायोगी । आत्मनिवेदनी क्रिया ॥ १७ ॥
मुक्तीनें मोकळें केलें । भक्तीनें भेद नासिला ।
अभेदभक्तीच्यायोगें । आत्मनिवेदनी क्रिया ॥ १८ ॥
सोहं हंसा अहं ब्रह्म । महावाक्यार्थ जाणिजे ।
साधकु नाडळे जेथें । आत्मनिवेदनी क्रिया ॥ १९ ॥
आगमीं निगमीं शोधा । बुद्धि बोधा परोपरीं ।
जाणता भक्त तो देवो । आत्मनिवेदनी क्रिया ॥ २० ॥
॥ इति श्रीपंचीकरण योग संपूर्णमस्तु ॥ १०० ॥

---

# (९) चतुर्थमान[1].

॥ श्रीराम ॥

राम तो जाणिजे आत्मा । सर्वांतरात्मा तो चि तो ।
त्रैलोक्य चालावेतो तो । आतां हि रोकडा पाहा ॥ १ ॥
देखवी ऐकवीतो तो । चाखवी दाखवी सदा ।
बोलवी चालवीतो तो । देहपुरासी वर्तवी ॥ २ ॥
कृतायुगीं त्रेतायुगीं । द्वापारीं कलयुग हें ।
आद्यंत तोचि तो देवो । मायावी लाघवी पाहा ॥ ३ ॥
बहुदेहीं देहाकारें । वर्ततो तो दिसेंचिना ।
कळतो तोचि तो त्याला । जाणतो आपआपणा ॥ ४ ॥

---

१ मान म्हणजे परिमाण, प्रमाण, समास.

कल्पितो तर्कितो नाना । सवेवांचुनी[1] नाडळे ।
ब्रह्माविष्णुमहेशादि । इन्द्रादि देव सर्व ही ॥ ५ ॥
योगी ऋषी मुनी ध्यानी । ध्याता ध्येय दोहिंकडे ।
दानवांमानवांदीक । जीती हारि[2] स्वयेंचि हा ॥ ६ ॥
वंद्य निंद्य तयावीणें । सर्वथा न घडे जनीं ।
कर्तृत्व सर्वही तेथें । येथें काय वदों पुढें ॥ ७ ॥
विवरी तो हरी जाणा । एकदेसी नव्हे कदा ।
आत्मत्वें आत्मरूपी तो । आतां पाहेल तोचि तो ॥ ८ ॥
देहे धरी देहे त्यागी । नानारूपीं भरोनियां ।
बाळ तारुण्य वृद्धात्मा । नर नारी नपुंसकु ॥ ९ ॥
कुरूपी सुंदरु जाला । पापात्मा पुण्यवंत तो ।
वंद्य तो निंद्य तो जाला । नाना देहीं भरोनियां ॥ १० ॥
त्यावीण दुसरा कैचा । नाना देहे धरावया ।
करावया वोखटें बवें[3] । तोचि तो आपआपणा ॥ ११ ॥
नाना मतांतरीं वर्ते । प्रवर्ते योगसाधनीं ।
भोगी त्यागी महायोगी । संयोगी योगनास्तिकु ॥ १२ ॥
सुंदरु विपारा[4] होतो । हांसतो आपआपणा ।
अशक्त शक्त तो होतो । कुटितो आपआपणा ॥ १३ ॥
नरनारीदेहे होतो । भोगितो आपआपणा ।
जीव शिवशक्ती जाला । श्रेष्ठ मध्यस्थ धाकुटा ॥ १४ ॥
किडा मुंगी स्वयें होतो । तुटतो पशुच्या पदें ।
हांसे रडे पडे कुंथे । सर्वही करि एकला ॥ १५ ॥
देहाकारीं खबर्दारी । चोर मैंद वरपेकरी[5] ।
भला तो भक्त तो साधु । साधु भोंदु दोहिंकडे ॥ १६ ॥
वंद्य तो निंद्य तो होतो । पाहतां वेगळा दिसे ।
येकला येच[6] वेळे तो । जन्मतो मरतो किती ॥ १७ ॥
श्रीमंत करंटा होतो । भोग भोगी चहूंकडे ।
भासतो विवेकी लोकां । दिसतो हें घडेचिना ॥ १८ ॥
वळवळी चळवळी देहीं । पळतो पीटितो बळें ।
मुरडतो हांसतो जातो । पडतो प्रेत होउनी ॥ १९ ॥

---

१ स्वयें, स्वतःवांचून. २ जिंकणारा, हरणारा हाच. ३ बरेंवाईट. ४ कुरूप. ५ लुटारू. ६ याच, एकाच.

त्यावीण प्रेतसें होतें । नासतें देह नासकें ।
कळे तोहि कळेनाहि । मुरतो मधिच्यामधें ॥ २० ॥
विचित्र करितो काया । कायामाया परोपरीं ॥
बोलतां चालतां येना । उदंड तो म्हणोनियां ॥ २१ ॥
द्रष्टा साक्षी तिहीं लोकीं । मुळीचा मूळ ईश्वरु ।
गणेश शारदा जाला । मल्हारी क्षत्रपाळ तो ॥ २२ ॥
तुळजा काळिका चंडी । लक्ष्मी तो नारायणु ।
महादेव बहु शक्ती । रामकृष्णादि भार्गवु ॥ २३ ॥
नाना क्षेत्रें पूज्य स्थानें । देवभक्त दोहींकडे ।
प्रेमळु नाचतो गातो । किती म्हणोनि सांगणें ॥ २४ ॥
सर्वही करितो तो तो । किती म्हणोनि सांगणें ।
बोलिलें कळायासाठीं । रामदास जनीं वसे ॥ २५ ॥

॥ मान ॥ १

---

नादाचे शब्द होताती । शब्दाचा नाद होतसे ।
नाद शब्द मुळीं नाहिं । तें ब्रह्म जाणती भले ॥ १ ॥
रेखेचेनिं सुन्य होतें । सुन्यापासुनी येकला ।
येक सुन्य मुळीं नाहिं । तें ब्रह्म जाणती भले ॥ २ ॥
अहंतेचे तीन गुण । पुढें भूतें विकारलीं ।
त्रिगुण अहंता नाहिं । तें ब्रह्म जाणती भले ॥ ३ ॥
जड चंचळ हे माया । कायामाया परोपरीं ।
मायातीत निर्विकारी । तें ब्रह्म जाणती भले ॥ ४ ॥
ब्रह्मांड-पिंडिचीं तत्वें । बहुरूपें विकारलीं ।
पिंडब्रह्मांडही नाहिं । तें ब्रह्म जाणती भले ॥ ५ ॥
उर्ध्वमूलमधःशाखा-। पत्रें पुष्पें बहुविधा ।
फळ मूळ तरु नाहिं । तें ब्रह्म जाणती भले ॥ ६ ॥
जाणतां नेणतां प्राणी । जन्मतो मरतो सदा ।
जाणणें नेणणें नाहिं । तें ब्रह्म जाणती भले ॥ ७ ॥
उगमु चालिला बोधें । बोधें बोध बळावला ।
बोध ना उगमु नाहिं । तें ब्रह्म जाणती भले ॥ ८ ॥

---

दासबोध १२–५–१ पहा. २ गीता १५–१.

सृष्टिक्रमें सृष्टी जाली । संव्हारेंचे संव्हारली ।
सृष्टी संव्हारही नाहीं । तें ब्रह्म जाणती भले ॥ ९ ॥
सिद्धांत पूर्वपक्षेंसों । ब्रह्मीं पक्षाचे नाडळे ।
पक्षपात घडे जेथें । तें ब्रह्म जाणती भले ॥ १० ॥
जड चंचळ हे दोन्ही । वोढेती आपणाकडे ।
जड चंचळ यातीत । तें ब्रह्म जाणती भले ॥ ११ ॥
जाणणें हें घडेना कीं । नेणणें दूरि राहिलें ।
जाणण्यानेणण्यातीत । तें ब्रह्म जाणती भले ॥ १२ ॥
शब्देंचि शब्द जाणावा । मौन्य शब्देंचि तें कळे ।
शब्दची खुंटला तेथें । निःशब्द याचिकारणें ॥ १३ ॥
वाच्यांशें बोलते वाचा । लक्ष्यांशही वाचागुणें ।
ते वाचा खुंटली जेथें । निःशब्द याचिकारणें ॥ १४ ॥
कळलें बोलतां येना । बोलिलें तें कळेचिना ।
यतो वाचो निवतते । निःशब्द याचिकारणें ॥ १५ ॥
वृत्ति निवृत्ति होताहे । मनासो उन्मनी घडे ।
ज्ञान विज्ञान विचारें । निःशब्द याचिकारणें ॥ १६ ॥
परेहूनि पर्ता जो । मनबुद्धिअगोचरु ।
हेत संकेतही नाहिं । निःशब्द याचिकारणें ॥ १७ ॥
कल्पितां कल्पना होते । तर्कितां तर्क फूटतो ।
अद्वैत दुसरें नाहिं । निःशब्द याचेकारणें ॥ १८ ॥
शब्द ऐलीकडे जाला । शब्दसृष्टी उभारली ।
सृष्टीपूर्वील तें ब्रह्म । निःशब्द याचिकारणें ॥ १९ ॥
नेत्रांच पाहावें सर्वै । नेत्रं नेत्राचि बिंबती ।
पाहाणें राहिलें जेथें । निःशब्द याचिकारणें ॥ २० ॥
अभेदीं भेद केचा रे । अदृश्यीं दृश्य नाडळे ।
अष्टधा आरता जाली । निःशब्द याचिकारणें ॥ २१ ॥
निश्चळीं चेतना नाहीं । चंचळीं चेतना घडे ।
घडे तें विघडे सर्वै । निःशब्द याचिकारणें ॥ २२ ॥
सारासार विचारावें । पिंडब्रह्मांडानिरशनीं ।
संगातीत महायोगी । निःशब्द याचिकारणें ॥ २३ ॥
वायोनें वितुळे मेघु । ज्ञानें ज्ञानी वितुळला ।
कोणासी काय सांगावें । विवंचिता कोणे तरी ॥ २४ ॥

१ पक्ष नाहींसे होणें. २ या देहांहून पलीकडचें. ३ ऐलीकडे.

कर्पूर जाळितो वन्ही । दोघां होते बराबरी ।
जाणावें काय बोलावें । आत्मनिवेदनापुढें ॥ २५ ॥

॥ मान दुसरें ॥ २

काम क्रोध कुटावा तो । लुटावा मदमत्सरु ।
तुटावा संशयो धोका । दंभ प्रपंच त्यागणें ॥ १ ॥
कुबुद्धि लांथलावी[1] ने । सुबुद्धि धरणें बरी ।
अपकीर्ती दुरी घालावी । सत्कीर्ती राखणें सदा ॥ २ ॥
अहंता पापिणी मोठी । थोरथोरांसि सिंतरी[2] ।
बुकालावी[3] धुमालावी । लावावी भजनाकडे ॥ ३ ॥
भ्रष्टता[4] नष्ट आहे हो । श्रेष्ठता दवडीतसे ।
नष्टवी कष्टवी प्राणी । भल्यांपासीं कामा नये ॥ ४ ॥
वासना वास पाहे रे । राहे रे अंतरीं सदा ।
वैराग्यें तोंड ठेंचावें । चेंपावें मत वाउगें[5] ॥ ५ ॥
धारणा धरावी मोठी । विस्मृती हे कामा नये ।
आलस्य दुरी तो दौडा । साक्षपें यत्न पाहाणें ॥ ६ ॥
अभ्यास वाढवावा रे । इहलोकपरत्रिचा ।
जाणते नेणते राजो । राखावं बहुतांपरीं ॥ ७ ॥
कर्कश भुंकती श्वानें । तैसें वाक्य करूं नये ।
सर्वासीं मृदु बोलावें । चालावें सर्वमान्यसें ॥ ८ ॥
गुण देखोनी लोधावें । वेधावें उत्तमा गुणा ।
जयाचें त्या रिती जाणे । धन्य तो जाणता गुणी ॥ ९ ॥
प्रत्ययेंवीण जो ज्ञानी । तो ज्ञानी आत्मघातकी ।
तो संग त्यागणें खोटा । निःसंग[6] संग पाहाणें ॥ १० ॥
अर्थपुष्ट बरें गाणें । नाचणें समजोनियां ।
उगेंचि भुंकणें खोटें । गधडे भुंकती जसें ॥ ११ ॥
प्रेम प्रबंदही[7] नाहिं । ज्ञान ध्यान असोंचिना ।
कळाही पुरती नाहिं । तें गाणें श्रम वाढवी ॥ १२ ॥
लक्ष्मीवंतापुढें तोरा । करंटें दाखवीतसे ।
रणशूरापुढें लंडो । उदंड बडबडीतसे ॥ १३ ॥

---

१ लाथाळावी २ ठकवी. ३ ता बुकलून, धुमाळी किंवा धांदल उडवून भजनाकडे लावावी. ४ धर्माचारशून्यता. ५ पाखंड, खोटें मत. ६ निःसंगाचा संग करावा. ७ कवित्व.

शुचिस्मंतापुढें भ्रष्ट । श्लाघ्यता न पवे कदा ।
पंडितापुढें तो डुंबा[1] । काय बोलेल बाष्कळु ॥ १४ ॥
प्रत्ययासी अनुमानें । सहसा बोलतां नये ।
विचक्षणापुढें वेडें । काय बोलेल बापुडें ॥ १५ ॥
खऱ्या नाण्यापुढें खोटें । कोठेंचि न चले जनीं ।
मूर्ख ते ठकती घेती । जाणते ते शिवेचिना ॥ १६ ॥
जाणतां दरिद्रें जाती । जाणतां रोग भंगती ।
जाणते जिंकिती युद्धे । नेणते मोडती[2] सदा ॥ १७ ॥
जाणत्या जाणता व्हावा । नेणता व्यर्थ काय तो ।
जाणतां सर्वहि सौख्यें । नेणतां घात होतसे ॥ १८ ॥
जाणतां चुकती जन्म । नेणतां भय होतसे ।
जाणता चकऊं जाणे । नेणतें तें फांसां पडे[3] ॥ १९ ॥
मुळींच जाणिवेचेनि । विधी-प्रपंच[4] वाढला ।
जाणतां अष्टहि देहे । विज्ञानें उन्मनी घडे ॥ २० ॥
मापटें मोजितें दोणें[5] । तैसें सीकोन गातसे ।
अंत्यजें[6] वाहती द्रव्यें । अर्थसंभंध[7] नाडळे ॥ २१ ॥
ईरसालें[8] वाहाती आंबे । भोक्तव्य न घडे कदा ।
समजल्याविण तें वोझें । पोटासाठींच वाहती ॥ २२ ॥
ठकोन करंटा जाला । तें दुःख न धरी मनीं ।
अहंता लागली पाठीं । करंटा म्हणतां रडे ॥ २३ ॥
संचार होतसे तेव्हां । धांवतें भलतेकडे ।
निःशंक नागवें नाचे । ज्याचे त्याला कळेचिना ॥ २४ ॥
उमजणें समजणें आधीं । प्रवृत्तिनिवृत्तीकडे ।
भाग्यश्री मोक्षश्री होते । विरतां विवरतां पुढें ॥ २५ ॥

॥ मान तृतीय ॥

---

१ ठोंब्या, रड्या. २ पराभूत होतात, नष्ट होतात. ३ फशी पाडतो, फसतो. ४ ब्रह्मदेवाची सृष्टि. ५ धान्य उदंड मोजिलें । परी त्या मापें नाहीं भक्षिलें ।
विवरल्याविण तसें जालें । प्राणिमात्रांसी ॥ (दास० १८-५-१). तुकोबांनींही श्रोत्यावक्त्यांना म्हटलें आहे ' माप तैसी गोणी । तुका म्हणे रिती दोन्ही ! ' ६ महारें-त्यावेळीं खजिन्याचीं पोतीं महारलोक नेत असत. ७ आंतलि द्रव्याचा लाभ. ८ नजराणा.

कर्दळी थोर कर्पूरें । गर्भपत्रेंच केतकी ।
गुणेंचि मान्य या वल्ली । गुण सर्वत्र पाहिजे ॥ १ ॥
गुण जाणेल तो गुणी । पाहातां विरुळा दिसे ।
परीक्षेवीण तें खोटें । परीक्षा करितां बरें ॥ २ ॥
गीत वाद्य तानमान । ताळामिश्रीत नाचती ।
हस्तंन्यासें पदंन्यासें । नेत्रन्यासें विराजती ॥ ३ ॥
शंका ते घाळवी[1] पंका । रंका रंक करीतसे ।
निशंक वाचणें गाणें । अभ्यास याचकारणें ॥ ४ ॥
अर्थी[2] अर्थ मनें व्हावें । जाणावें बहुतांपरीं ।
सौख्य उदंड तें होतें । राजी लोकांसि राखतां ॥ ५ ॥
अर्थ सर्वत्र शोधावा । रोधांवा[3] आपला मनु ।
लोक सर्वत्र बोधावा । यथातथ्य प्रचीतिनें ॥ ६ ॥
न्याय अन्याय जाणावा । बाणावा अंतरीं सदा ।
सत्य नेमस्त बोलावें । अचुक न चुके कदा ॥ ७ ॥
अरत्रीं हो परत्रीं हो । प्रत्ययो यासि पाहिजे ।
अन्याय सर्वही खोटा । न्याय सर्वांसी मान्य तो ॥ ८ ॥
सामान्य मान्य होताहे । मान्य[4] सामान्य तो नव्हे ।
जाणत्या जाणता भेटे । यक ते जगदंतरें ॥ ९ ॥
अंतरें सार जाणावें । सारासारनिरूपणें ।
देवभक्तसीमा नाहिं । निवृत्तिपद पाहातां ॥ १० ॥
देहें माझें मन माझें । माझें अज्ञान निरसिलें ।
अज्ञान विज्ञानही नाहिं । वृत्तिशून्य निरंजनु ॥ ११ ॥
अनंता अंत नाहीं रे । अलक्षा लक्षितां नये ।
अपार पार नाहीं रे । मायातीत निरंजनु ॥ १२ ॥
निर्मळा मळ लागेना । निश्चळा चळणा नसे ।
निःसंगा संग तो नाहीं । निःसंग तो निरंजनु ॥ १३ ॥
अतर्क्या तर्क लागेना । अनाम्या नाम नाडळे ।
अमूप[5] तें काय मोजावें । अमूप तो निरंजनु ॥ १४ ॥
निर्गुणीं गुण कैचे हो । खूण कोण्हासि दाखऊं ।
उगवेना मावळेना । मायातीत निरंजनु ॥ १५ ॥

---

१ फजीती करिते. २ ज्याला अर्थ पाहिजे त्यानें, अर्थ्यानें. ३ मन आवरावें. ४ जा सर्वांस मान्य तो कांहीं सामान्य नाहीं, असामान्यच होय. ५ पुष्कळ, अगणित.

सत्य तें जाणिजे ब्रह्म । मिथ्या मायिक दृश्य तें ।
दृश्य भास मुळीं नाहीं । मायातीत निरंजनु ॥ १६ ॥
उदंड हारपेना तें । पाहों जातां दिसेचिना ।
संन्मुख भोंवतें आहे । मायातीत निरंजनु ॥ १७ ॥
जनीं वनीं विजनीं[१] तें । व्योमाकारेंचि संचलें ।
संचें[२]विसंचाहि नाहिं । मायातीत निरंजनु ॥ १८ ॥
जन्म ना मृत्यु पावेना । रचेना खचेना कदा ।
येइना जाइना कोठें । मायातीत निरंजनु ॥ १९ ॥
संन्मुख पाहतां आहे । विन्मुख करितां नये ।
सबाह्य अंतरीं आतां । मायातीत निरंजनु ॥ २० ॥
त्यामध्यें सृष्टि आहे रे । सृष्टीमध्येंचि तें वसे ।
विवेकें सार जाणावें । मायातीत निरंजनु ॥ २१ ॥
अभ्र धूम्र नभामध्यें । येतसे जातसे सदा ।
तैसीच अष्टधा माया । मायातीत निरंजनु ॥ २२ ॥
अवकाश गगनाऐसा । भकाश पैस मोकळा ।
धरितां सांडितां येना । मायातीत निरंजनु ॥ २३ ॥
जेथें जेथें मन जातें । तेथें तेथेंचि तेंचि तें ।
पदार्थावेगळें पाहे । मायातीत निरंजनु ॥ २४ ॥
थोर तत्व मूळमाया । तीहूनि परतें असे ।
संपूर्ण सकळा ठायीं । मायातीत निरंजनु ॥ २५ ॥
॥ इति श्री मानचतुर्थ ॥

---

# ( १० ) मानपंचक.



### श्रीराम.

राम विश्राम देवांचा । राम भक्तासि आश्रयो ।
राम योगी-मुनी-ध्यानीं । राम रक्षी ऋषिकुळा ॥ १ ॥
राम ध्यातो चंद्रमौळी[३] । राम राम सदा जपे ।
रामकथा ऐकतां हे । रामरूप निरंतरीं ॥ २ ॥

---

१ एकांतीं, जन नाहीं अशा ठायीं. २ जोड व मोड. ३ शंकर.

पार्वती पुसतां सांगे । राम जप अत्यादरें ।
सुंदरें दोनि अक्षरें । निवालों अंतरीं सुखें ॥ ३ ॥
जाळिलें पोळिलें वीषें[1] । कर्कशें काळिमा चढे ।
उपाय बहुधा केले । रामनामेंचि सुटका ॥ ४ ॥
सव्य अपसव्य या नामें । तरले सुटले बहु ।
अंतकाळीं सर्वकाळीं । सुटिका सकळै जना ॥ ५ ॥
कीर्ति या रघुनाथाची । पाहातां तुळणा नसे ।
येकबाणी येकवचनी । येकपत्नीच धार्मिकु ॥ ६ ॥
राज्य या रघुनाथाचें । काळि काळासि नातुडे ।
बहुवृष्टी अनावृष्टी । हें कदा न घडे जनीं ॥ ७ ॥
उद्वेग पाहातां नाहीं । चिंतामात्र नसे जनीं ।
व्याधी नाहीं रोग नाहीं । लोक आरोग्य नांदती ॥ ८ ॥
युद्धच नाहिंच अयोध्या । राग ना मत्सरु नसे ।
बंदानिर्बंदही नाहिं दंडदोष कदा नसे ॥ ९ ॥
कुरूपी पाहातां नाहिं । जरा मृत्य असेचिना ।
आदरु सकळै लोका । सख्यप्रीती परस्परें ॥ १० ॥
बोलणें सत्य न्यायाचें । अन्याय सहसा नसे ।
अनेक वर्तती काया । एकजीव परस्परं ॥ ११ ॥
दरिद्री धुंडितां नाहीं । मूर्ख हा तो असेचिना ।
परोपकार तो मोठा । सर्वत्र लोकसंग्रहो ॥ १२ ॥
अद्भूत पिकती भूमी । वृक्ष देती सदा फळें ।
अखंड दुभती धेनु । आरोग्यें वाहाती जळें ॥ १३ ॥
जळजें स्वापदें पक्षी । नाना जीव भुमंडळीं ।
आनंदरूप बोभाती[2] । नाना स्वर परस्परें ॥ १४ ॥
नद्या सरोवरें बावी । डोलती नूतनें वनें ।
फळती फुलती झाडें । सुगंध वनवाटिका ॥ १५ ॥
उदंड वसती ग्रामें । नगरें पुरेंचि पट्टणें ।
तीर्थें क्षेत्रें नाना स्थानें । शिवालयें गोपुरें बरीं ॥ १६ ॥
मठ मढ्या पर्णशाळा । ऋषिआश्रम साजिरे ।
वेदशास्त्रधर्मचर्चा । स्नानसंध्या तपोनिधी ॥ १७ ॥
चढता वाढता प्रेमा । सुखानंद उचंबळे ।
संतोष समस्तै लोकां । रामराज्य भुमंडळीं ॥ १८ ॥

१ हलाहल विष. २ संवाद करितात.

हरिदास नाचती रंगीं । गायनें कीर्तनें बरीं ।
रागरंग तानमानें । टाळबद्धें विराजती ॥ १९ ॥
प्रबंध कविता छंदें । धाटी मुद्रा परोपरीं ।
अन्वय जाड दृष्टांतें । गद्यें पद्येंचि औघडें[1] ॥ २० ॥
नाना युक्ती नाना बुद्धि । नाना विद्या नाना कळा ।
नाना संगीतसामर्थ्यें । नानावाद्यें परोपरीं ॥ २१ ॥
संमार्जनें रंगमाळा । पुष्पमाळा बहुविधा ।
केसरें धुसरें गंधें । सुगंधें करताळिका ॥ २२ ॥
सर्वही तोषले तोषें । नामघोषेंचि गर्जती ।
पुरेना दिन ना रात्रीं । यात्रा पर्वें हरिकथा ॥ २३ ॥
दीपिका चंद्रज्योती त्या । आर्त्या नीरांजनें जनें ।
रामराजा दयासिंधु । वोळला सेवकांवरी ॥ २४ ॥
रामदासीं ब्रह्मज्ञान । सारासारविचारणा ।
धर्मस्थापनसाठीं । कर्मकांड उपासना ॥ २५ ॥
इति श्रीमानपंचक सारासारविवेकनाम मान प्रथम ॥ १

---

उपासना[2] वोळखावी । कोण तो देव तो कसा ।
करावें भजन तें कैसें । कैसी आहे प्रसन्नता ॥ १ ॥
उपासना वोळखिली । देव तो अंतरीं वसे ।
भजावें वोळखावें तें । बुद्धियोगें प्रसन्नता ॥ २ ॥
रायासीं वोळखी होतां । सेना ही वोळखी धरी ।
मुख्य सामर्थ्य रायाचें । सेनेमध्यें विभागलें ॥ ३ ॥
सेवकें सांडिला राजा । सेविल्या आदरें प्रजा ।
तेणें सामर्थ्यही गेलें । पराधीन विटंबना ॥ ४ ॥
जनीं जनार्दन आहे[3] । परंतु सज्जनीं वसे ।
जना आणी सज्जनाला । येकची कारितां नये ॥ ५ ॥
जगामध्यें जगदात्मा । स्वामी सेवक वर्तवी ।
स्वामी सुखासनामध्यें । सेवकें वाहाती सदा ॥ ६ ॥
आधिक धारणा जेथें । नित्यानित्यविचारणा ।
तो स्वामी उद्धरी बद्धा । बद्धें बद्ध सुटेचिना ॥ ७ ॥
वैद्य तो वांचवी रोग्या । रोग्या रोगी न वांचवी ।
तारकु बुडत्या तारी । बुडतें तारकु नव्हे ॥ ८ ॥

---

१ अवघड. २ अंतरात्मा देव. ३ दासबोध १८–४–३५।३८ पहा.

ज्ञातया[1] ज्ञान मागावें । अज्ञाना मागतां नये ।
सभाग्या सेवितां भाग्य । अभाग्या सेवितां नये ॥ ९ ॥
मोक्ष देतो प्रचीतीनें । तयासी तुळणा नसे ।
मुख्य तो सद्गुरु जाणा । यातना चुकवी जनीं ॥ १० ॥
जो वंद्य सर्व ही लोकां । तयासी वंदितां बरें ।
निंद्य तें वंदितां खोटें । समान करिती मुढें[2] ॥ ११ ॥
देव दैत्य भले पांहीं । संतासंत भुमंडळीं ।
अमृत विष हें एक । कदापी मानितां नये ॥ १२ ॥
देवनामें महापापी । तरले उद्धरले किती ।
दैत्यनाम जपे ऐसा । येक ही नाडळे जनीं ॥ १३ ॥
भेदाभेदक्रिया देहीं । लागली हे सुटेचिना ।
जेथील विषयो तेथें । विपरीत[3] करितां नये ॥ १४ ॥
मुखेंचि सेवितां अन्नें । अपानीं घालि[4]तां नये ।
अन्याय करिती तैसा । समान मानिती जनीं ॥ १५ ॥
विंचु सर्प दुःखदाता । अंतरात्माच वर्तवी ।
परंतु हित तें घ्यावें । समान वर्ततां नये ॥ १६ ॥
त्यागा[5]त्यागें देह चाले । समान करितां पडे ।
अभागी उमजेना तो । पाषांडी राक्षसी क्रिया ॥ १७ ॥
समान देखणें आत्मा । समान करणें दया ।
वंद्य निंद्य विचारावें । हे मुख्य जाणती कळा ॥ १८ ॥
अन्नदाता प्राणदाता । बुद्धिदाता भुमंडळीं ।
तारकु मारकु येकु । ऐसें हें घडतें जनीं ॥ १९ ॥
सुख तें आवडे लोका । दुःख तें नलगे कदा ।
पुण्य तें आदरें घ्यावें । पाप तें दुरी त्यागणें ॥ २० ॥
सद्बुद्धि अंगिकारावी । कुबुद्धी आत्मघातकी ।
अन्मार्ग[6] चुकवावा तो । सन्मार्ग हितकारकु ॥ २१ ॥
यातिभ्रष्ट क्रियाभ्रष्ट । सर्वभ्रष्ट अनर्गळु ।
पाहातां पातकी दोषी । तो संग नर्क भोगवी ॥ २२ ॥
खरें खोटें समानत्वें । मानिती लोक ते कसे ।
गर्भांध वर्तती जैसे । तैसे ते आत्मघातकी ॥ २३ ॥

---

१ ज्ञात्यापाशीं २ मूढ जन. ३ वरील विषयाच्या समजुतीसाठीं दासबोध द. १३ स. १० व द. १७ स. ४ पहा. ४ दासबोध द. १७-४-२७ पहा. ५ कांहीं त्याग व कांहीं अत्याग. ६ असन्मार्ग, वाईट मार्ग.

कुसंग पातकें लाभे । सत्संगें पुण्यसंग्रहो ।
जाणता पाहिजे ज्ञाता । तो रक्षी धर्मस्थापना ॥ २४ ॥
देहानें रक्षणें क्रीया । देहातीत विचारणा ।
शब्देंचि शब्द बोलावा । शब्दातीत विवंचना ॥ २५ ॥
॥ इति श्रीमानपंचक सारासारविवेक मान ॥ २

---

आधीं तें करावें कर्म । कर्ममार्गें उपासना ।
उपासकां सांपडे ज्ञान । ज्ञानें मोक्षचि पावणें ॥ १ ॥
कर्म तें करावें कैसें । कर्मफळ तें कोणतें ।
विध्युक्त कर्म करणें । कर्मफळ उपासना ॥ २ ॥
उपासक देव धुंडाळी । सत्संगें देव सांपडे ।
देवाचा लागतां छंद । वैराग्य सहजीं घडे ॥ ३ ॥
वैराग्यें त्यागितां सर्वै । देव आपण येकला ।
देवाचें लागतां ध्यान । आपणासी ठावचि नसे ॥ ४ ॥
अभेदभक्ती ते ऐसी । आत्मनिवेदनी स्थिती ।
वृत्ती ते बद्धता मोठी । निवृत्ती मोक्ष बोलिजे ॥ ५ ॥
आकाशासारिखें ब्रह्म । तेथें संकल्प उठिला ।
ईश्वरु बोलिजे त्याला । शिवशक्तीच अष्टधा ॥ ६ ॥
भावनेसारिखीं नावें । उदंड ठेविलीं तया ।
निश्चळीं चंचळ आत्मा । मूळमायेसि बोलिजे ॥ ७ ॥
पंचीकरण मूळमाया । महाकारण बोलिजे ।
महाकारण ब्रह्मांडीं । मूळ प्रकृति जाणिजे ॥ ८ ॥
निरासितां अष्टही काया । मूळ प्रकृति निरसते ।
सर्वज्ञ जाणता ज्ञानी । अष्टदेहांमधें वसे ॥ ९ ॥
निश्चळीं घालितां ज्ञान । विज्ञान होतसे पुढें ।
मनास उन्मनी लागे । वृत्ती निवृत्ति होतसे ॥ १० ॥
परेहूनि जो पर्ता । परात्परचि बोलिजे ॥
उन्मेष[1] ते परा वाचा । वाचातीत निरंजनु ॥ ११ ॥
निश्चळु तो चळेना कीं । चंचळ होत जातसे ।
उत्पत्ति स्थिती संव्हारु । चंचळासी पुनःपुन्हा ॥ १२ ॥
कितेकां कितेक खातें । येकयेकांसि झोंबतें ।
येक तें चर्फडी प्राणी । येक तें क्रूर घातकी ॥ १३ ॥

---

१ स्फुरण.

यासी संदेह तों नाहीं । पाहातां दिसतें जनीं ।
प्रत्यक्षा प्रमाण काय । होत जातें क्षणक्षणा ॥ १४ ॥
नित्यानित्यविवेकानें । शोधितां अंतरीं कळे ।
क्षराक्षर विवंचावें । निर्गुण वेगळें असे ॥ १५ ॥
क्षरींच लागलें कर्म । अक्षरीं ज्ञान बोलिजे ।
अलक्ष्यीं लावितां लक्ष । स्वयें अलक्ष्य होईजे ॥ १६ ॥
विकारें आकार जाला । विकारेंचि विकारला ।
निर्गुण निर्विकारी तो । निर्विकारेंचि संचला ॥ १७ ॥
निर्मळीं मळ लागेना । लावितां निर्मळीं मळु ।
निःसंगीं संग लागेना । संग निःसंग होतसे ॥ १८ ॥
कर्म तें जड जाणावें । ज्ञान तें जाणती कळा ।
जाणते नेणते कांहिं । निर्गुणीं पाहातां नसे ॥ १९ ॥
वाच्यांश शब्द जाणावा । लक्षांश जाणती कळा ।
कळाचि विकळा होती । आपेंआप निवारतां ॥ २० ॥
आपणा शोधितां तत्त्वें । तत्त्वें भूतें विकारलीं ।
दृश्यभास विवंचावा । निराभासीं असेचिना ॥ २१ ॥
भासला भास तो भासु । दृश्याला दृश्य दीसतें ।
दृश्यभास मुळीं नाहिं । मध्येंची होत जातसे ॥ २२ ॥
गगनीं पाहातां जैसें । आभाळ वितुळे जुळे ।
निश्चळीं पाहातां तैसें । चंचळ होत जातसे ॥ २३ ॥
पिंड ब्रह्मांडीचे देहे । निरासितां काय उरलें ।
विवरावें विचारावें । प्रत्ययो पाहातां कळे ॥ २४ ॥
पावकु शुद्ध कर्पूरें । येकचि होत जातसे ।
देव भक्त अंतरात्मा । येकाचि होत जातसे ॥ २५ ॥

॥ मान ॥ ३

---

कासे[2] या रघुनाथाची । धरितां सुख पावलों ।
इतर कष्टती प्राणी । थोर संसारसांकडीं ॥ १ ॥
सांकडीं तोडिलीं माझीं । राघवें करुणालयें ।
पुर्वींच तुटली माया । दुःखशोक विसंचला[3] ॥ २ ॥

---

१ उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ( गीता अ० १५ ). २ येथून पुढील श्लोकांत रामकृपा झाल्याचें समर्थ सांगतात. ३ संपला, नाहींसा झाला.

सेवकु मानवीयांचे । कष्टती बहुतांपरीं ।
सेविला देव देवांचा । तेणें मी धन्य जाहालों ॥ ३ ॥
नीच हे मानवी प्राणी । नीचाश्रय कामा नये ।
महत्कीर्ति श्रीरामाची । फावला[1] महदाश्रयो ॥ ४ ॥
विबुधां[2] आश्रय ज्याचा । पावले बंदमोचनें[3] ।
सेवकु मारुती ऐसा । त्याचा मी म्हणती जनीं ॥ ५ ॥
निवाला शिव ज्या नामें । ज्या नामें वाल्मीक ऋषि ।
जें नाम सकळां तारी । तें नाम मज अंतरीं ॥ ६ ॥
कुळ या जगदीशाचें । धन्य वंश भुमंडळिं ।
आपली वाटती सर्वै । धन्य तूं गा रघोत्तमा ! ॥ ७ ॥
देव हा सर्व अंतरात्मा । वात हा त्याजपासुनि ।
वातसुत हनुमंतु । रामसेवक हा जनीं ॥ ८ ॥
वन्ही हा जानकीपिता । सूर्य हा वंशभूषणु ।
भूमि हे सीतेची माता । आजा आपोनारायणु ॥ ९ ॥
शिव तो राघवा ध्यातो । राम ध्यातो सदाशिवा ।
सख्यत्वें चालती दोघे । प्रसिद्ध ठाउकें जनीं ॥ १० ॥
विरंची सुत विष्णूचा । पुराणें सांगती बहु ।
शारदा नाति देवाची । गणेश मित्रकुमरु ॥ ११ ॥
शक्ती ते शक्ती शिवाची । शिवशक्ती समागमें ।
अंश जे चंद्रमौळीचे । ते सर्व प्रभुचे सखे ॥ १२ ॥
येकचि अंश विष्णूचे । देवमात्र भूमंडळीं ।
एकांशें चालती सर्वै । यालागी सर्व एकची ॥ १३ ॥
चंद्र तो लक्षुमीबंधु । मंगळ मेहुणा नभीं ।
शरीसमंधें सर्वै । त्रैलोक्यचि उपासना ॥ १४ ॥
ऐकती येकमेकांचें । येकमेकांसि पाहाती ।
जन्मले जीव ते सर्वै । येक देवाचे वर्तवी ॥ १५ ॥
स्वर्गीचे देव इंद्रादि । मृत्यलोकीं समस्तही ।
पाताळीं पन्नगादिकें[4] । सर्वत्र पाहातां सखे ॥ १६ ॥
रामउपासना ऐसी । ब्रह्मांडव्यापिनी पाहा ।
राम कर्ता राम भोक्ता । रामरूप वसुंधरा ॥ १७ ॥
कर्ता तो सर्व भोक्ता तो । प्रचीत पाहातां खरें ।
शरीरसंबंधासाठीं । दुःख संतोष पाहणें ॥ १८ ॥

१ मिळाला, लाभला. २ देवांना. ३ बंधापासून मुक्तता. ४ नागादि.

नित्य दर्शन देवाचें । चालतां बोलतां घडे ।
नाना लघु देहधारी । भूमि पाहोन चालणें ॥ १९ ॥
विषयो जाहाला देवो । नाना सुखें विलासवी ।
नाना दुःखें देव कर्ता । त्रासकें शरीरें धरी ॥ २० ॥
भुजंगें डंखितां देव । देव जाला धन्वंतरी ।
तारिता मारिता देव । बोलती ते येणें रिती ॥ २१ ॥
येकासी येक तारीतो । ज्ञान होय भुमंडळीं ।
येकासी येक मारीतो । नाना देहीं भरोनियां ॥ २१ ॥
शत्रुमित्र देव जाला । सुखदुःखें परोपरीं ।
येकासी हांसवी देवो । येकासी रडवीतसे ॥ २३ ॥
येकासी भाग्य दे देवो । येकासी करंटें करी ।
सर्व कर्तव्यता तेथें । येथें शब्दची खुंटला ॥ २४ ॥
शब्दज्ञान सरों आलें । ज्ञान सर्वत्र संचलें ।
जाणती जाणते ज्ञानी । मौन्यगर्भविचारणा ॥ २५ ॥
॥ इति श्री मानपंचक सारासारउपासनानिरूपण मान चतुर्थ ॥ ४

---

जयासी दुःख सांगावें । तयापासीं दुणें[1] वसे ।
दुणें हि तें चतुर्गुणें । बहुगुणें सरेचिना ॥ १ ॥
त्रैलोक्य व्यापिलें दुःखें । ज्याचें त्याचें परोपरीं ।
उगेंचि अनुमानेना । सांगतां सांगतां कळे ॥ २ ॥
दुःख जाणे पराव्याचें । ऐसा तो विरळा गुणी ।
ऐकतां ऐकतां ऐके । तेणेंचि आवडी दुणी ॥ ३ ॥
ऐकतां अंतरीं घेतां । क्षणाक्षणा विचारितां ।
हळु हळु हळु होतें । पावतें सुख संगती ॥ ४ ॥
दुःख वांटून तें घ्यावें । काढावें ऐसीयापरी ।
देहदुखें रोगव्याधी । औषधें परतें करी ॥ ५ ॥
सद्बुद्धि सांगणें लोकां । जेणें ते सुख पावती ।
प्रसंग राखणें आधीं । सोसावें बहुतांपरीं ॥ ६ ॥
न्याय अन्याय सोसावा । सोशितांहि विटों नये ।
न्यून पैशुन्य झांकावें । तेणें तें प्रस्तावा[2] पडे ॥ ७ ॥
चुकतें मागुतें येतें । येतें जातें पुनः पुन्हा ।
क्षमून हितकर्ता जो । तोचि गंभीर जाणता ॥ ८ ॥

---

१ दुप्पट. २ पश्चात्ताप पावतो.

नेणता उमजे जेथें । जाणता तोचि बोलिजे ।
नैराश्य नेघतां सांगे । निववी चंदनापरी ॥ ९ ॥
सांगणें नीतिन्यायाचें । मानावें बहुतांपरीं ।
सर्वत्र मान्य तो ज्ञाता । प्रत्ययें बोलतो खरें ॥ १० ॥
न्याय अन्याय तो जाणे । अन्याय न करी कदा ।
नीतिन्यायें मिळों जाणे । तोची तो लोकसंग्रही ॥ ११ ॥
मत्सरु नेदखे दृष्टी । न पडे कातऱ्यामधें ।
जाणते लोक नीतीचे । तेथेंचि वास तो करी ॥ १२ ॥
मनेंचि पारखी लोकां । परंतु नोबले कदा ।
जाणते मिळती तेथें । नेणते वास पाहाती ॥ १३ ॥
जाणत्या नेणत्या लोकां । प्रसंगें वर्तवी जगीं ।
सामान्य तो नव्हे कांहीं । सर्वांसी पाहिजे सदा ॥ १४ ॥
प्रबोध जाणिजे ऐसा । आधीं प्रपंच शोधणें ।
अत्र मानतां लोकां । परत्र सहजी घडे ॥ १५ ॥
अंतरें निवऊं जाणे । जाणे जयातयापरी ।
धरावें अंतरें लोकां । बाह्याकारें धरोंतिना ॥ १६ ॥
मनुष्यें राखतां राजी । दैवतें बहु माणसें ।
सुखाचि पावती जेथें । तेथें ते धांवती सदा ॥ १७ ॥
श्रेष्ठ जो तोचि जाणावा । बहुतां मानतां मनीं ।
सकळांसी मिळों जाणे । बहुतांसीं बहुतांपरीं ॥ १८ ॥
तोचि तो अंश देवाचा । मिळाला जगदंतरें ।
नैराश्यें तापसी ज्ञानी । सर्वांसी पाहिजे सदा ॥ १९ ॥
हिंडतां हिंडतां लोकीं । आवडे नित्य नूतनु ।
पुण्यात्मा सुकृती धर्मी । भक्तराज भुमंडळीं ॥ २० ॥
कर्म उपासना राखे । राखे वैराग्य आदरें ।
ज्ञान तें प्रत्ययें राखे । नित्यानित्यविचारणा ॥ २१ ॥
काळ तो नेटका घाली । हरिकथानिरूपणें ।
विचारें प्रत्यया आणीं । धूर्त तार्किक तीक्ष्णु ॥ २२ ॥
प्रबोध लागतां लोकीं । नेमस्त सुटिका घडे ।
पावनु तोची तो येकु । बद्ध लोकांसि सोडवी ॥ २३ ॥
बंधनें तोडिलीं रामें । योगधामें दयाळुवें ।
बुद्धियोग प्रयोगानें । मुक्त भक्त ततक्षणीं ॥ २४ ॥

१ पेंचांत. २ न बोले. ३ ज्याचें त्यापरी. ४ अंतःकरण वेधून. ५ निरिच्छ. ६ उत्तम प्रकारें.

धन्य हा देव देवांचा । राम त्रैलोक्यनायकु ।
रामदास म्हणे त्याचा । अनन्य शरणागतु ॥ २५ ॥

इति श्रीमानपंचक सारासारविवेकनिरूपणनाम मान पांचवें ॥

# (११) पंचमान.

श्रीराम.

गणनाथा गणाधीशा । गणेशा गणनायका ।
गणेंद्रा गंभीरा गुणा । गणपती गजानना ॥ १ ॥
पद्माक्षी पद्मवदना । निगमागमनायेका ।
दायका सकळा विद्या । गायका नामिली मनीं ॥ २ ॥
राघवा राजसा रामा । रामचंद्रा रघोत्तमा ।
रत्नविभूषणा देवा । रम्यराजीवलोचना ॥ ३ ॥
कामरूपा कळारूपा । कूटस्था कमळाकरा ।
केशवा कमळाकांता । कारणा कमळानना ॥ ४ ॥
परेशा पार्वतीकांता । पावना परमेश्वरा ।
पापाविध्वंसना देवा । पात्र पावकलोचना ॥ ५ ॥
मार्तंडमंडळा देवा । तेजोराशिप्रकाशका ।
तुझेनि वर्तती सर्वै । श्रीरामकुळभूषणा ॥ ६ ॥
जीवनें उत्पत्ति स्थिति । जीवनें जीव वांचती ।
तुझेन सर्वहि तीर्थै । धन्य आपोनारायणा ॥ ७ ॥
जराग्नी समस्तां लोकां । वांचवी सर्वभक्षकु ।
सर्वत्र ब्राह्मणा पूजा । मुख्य देव हुताशनु ॥ ८ ॥
वर्तवी सकळै लोकां । प्राणरूप जगत्रयीं ।
म्हणोनि धन्य ता वायु । चालवी जगडंबरु ॥ ९ ॥
निर्मळा निश्चळानंता । निर्गुणा गुणव्यापका ।
निःसगा नित्य निष्कामा । निर्धूत परमेश्वरा ।
गणेश शारदा देवी । सिद्धि बुद्धिच मूषकु ।
नाना फणी मणीधर्ता । या ध्यानें मूर्ख तो भला ॥ ११ ॥

१ देणारी—शारदा.

ईश्वरु गिरजा गंगा । वीरंणा स्वामिकार्तिकु ।
सर्पकुळें नंदी बस्वा । या ध्यानें सुखसंपदा ॥ १२ ॥
सर्वात्मा शेषशाई तो । श्रीहरी गरुडध्वजु ।
वैकुंठभुवनीं नांदे । या ध्यानें धारणा घडे ॥ १३ ॥
गायत्री सावित्री ब्रह्मा । इंद्रदेव ऋषि मुनी ।
गंधर्वनारदादीक । या ध्यानें वैभवीं रती ॥ १४ ॥
मत्स्य कूर्म वराह तो । लक्ष्मीनृसिंह वामनु ।
भार्गव भार फेडी तो । या ध्यानें पुण्यसंग्रहो ॥ १५ ॥
वसिष्ठ ब्रह्मयोगी तो । राम सौमित्र जानकी ।
भीम बिभीषणु मित्रु । या ध्यानें बंदमोजने ॥ १६ ॥
श्रीकृष्ण गोपिका सर्वै । गाई गोपाळ वांसुरें ।
वेणुनादीं क्रीडाछंदी । या ध्यानें उत्तमा गती ॥ १७ ॥
बोध्य कलंकी पुढें आहे । पुराणें सांगती लिळा ।
मल्लारी भैरवो देवो । या ध्यानें दंडणा खळां ॥ १८ ॥
तुळजा काळिका लक्ष्मी । कामाक्षी बनशंकरी ।
चांडिका रेणुका माता । या ध्यानें मनकामना ॥ १९ ॥
बारा लिंगें विष्णुमूर्ति । नाना देव भुमंडळीं ।
शिवशक्ती बहुरूपा । या ध्यानें श्रीहरी सुखी ॥ २० ॥
गंगा भागीरथी कृष्णा । कावेरी मनकर्णिका ।
नर्मदा गंडिका नद्या । या ध्यानेंचि पवित्रता ॥ २१ ॥
तीर्थें क्षेत्रें झरे टांकीं । कूप बावी सरोवरें ।
नाना पुण्यभूमि श्रेष्ठा । आटणें धर्मवासना ॥ २२ ॥
खंडें द्वीपें सप्तसिंधु । भुंयेरीं देउळें स्थळें ।
नाना बनें वनारण्यें । या ध्यानें वृत्ति वावरे ॥ २३ ॥
कपाटें वीवरें गुंफा । पावनें गिरिकंदरें ।
या ध्यानें तापसीं होणें । दिशा दिग्गज दिग्पती ॥ २४ ॥
रवी शशी ग्रह तारा । ढग मेघ विदुल्लता ।
भूमी आपोनळो वायो । या ध्यानें तर्क नीवळे ॥ २५ ॥

॥ मान ॥ १

---

वायोमधें देव नाना । वायोरूपेंची देवतां ।
त्रैलोक्य चालवी वायो । वायोस्तुति न बोलवे ॥ १ ॥
निश्चळावेगळा वायु । चंचळा वर्तवो सदा ।
देव तो हाचि जाणावा । सर्व देहांतरीं वसे ॥ २ ॥
येकांगें पाहतां वायो । येकांगें पाहातां हरी ।
चंचळत्वें जगज्ज्योती । आत्मा त्यासीच बोलीजे ॥ ३ ॥
सर्वात्मा सर्व अंतरात्मा । सर्वसाक्षी सर्वोत्तमु ।
सर्वकर्ता सर्वभोक्ता । सर्वत्र देहधारकु ॥ ४ ॥
बहुदेही बहुलीळा । बहुरूपी बहुकळा ।
बहुरंगी बहुसंगी । बहुगुण बहुबहु ॥ ५ ॥
जगदीश जगदात्मा । जाणता जगज्जीवनु ।
जुनाट जर्जरी काया । धरी त्यागी परोपरीं ॥ ६ ॥
चालवितो दिसेना कीं । शरीरें चालती खरें ।
क्रियेनें प्रत्यया येतें । रूप तें पाहातां नये ॥ ७ ॥
देह हा अस्थिमांसाचा । त्यामधें प्राण वासना ।
वासना जाणते सर्वै । प्राण देहास चेतवी ॥ ८ ॥
प्राण तों चेतना देहीं । प्राण जातां घडेचिना ।
तया प्राणांतरीं वर्ते । जाणती जगज्जोति हे ॥ ९ ॥
सुषुप्ती अवस्थेमधें । प्राण तों येत जातसे ।
परंतु नेणवे कांहिं । वेगळी जाणती कळा ॥ १० ॥
देहांतीं टाकितां देहो । मन प्राण समागमें ।
येक तें निवडेना कीं । तथापी भेदही कळे ॥ ११ ॥
कळे त्याला कळे सर्वै । कळेना त्या कळेचिना ।
म्हणोनि सांडिजे हेंका । प्रत्ययो पाहाणें बरा ॥ १२ ॥
अंडजा जारजा खाणी । स्वेतजा उद्भिजादिका ।
नाना देहांतरीं वर्ते । द्रष्टा पाहे परस्परें ॥ १३ ॥
नाना परादिका वाणी । नाना देश भाषा रिती ।
नानाक्षेत्रीं नानास्थानीं । येकला नटनाटकु ॥ १४ ॥
ज्ञानघनुचि सर्वज्ञु । कांहीं येक पुरातनु ।
नाना विद्या कळा जाती । दक्ष धूर्त विचक्षणु ॥ १५ ॥
गुरु तो शिष्य तो जाला । शिष्य तोचि पुढें गुरु ।
देव तो भक्त तो ज्ञानी । सर्व तो जगदंतरें ॥ १६ ॥

१ दासबोध १०-३-९।१० पहा.

१५-१६

थोर तो धाकुटा मोठा । सर्वत्र वैश्वानरु ।
तथा बीजाकारें पाणी । येकहि भेदहि दिसे ॥ १७ ॥
बहु भाग्य सभागी तो । अभागी अल्पवैभवें ।
भाग्यांशें पाहातां येकु । थोड्या भाग्यें न मानिती ॥ १८ ॥
जाणणें म्हणिजे ज्ञान । ज्ञानें सर्वत्र वर्तती ।
परंतु येक तो ज्ञानी । येक तो ज्ञानसाधकु ॥ १९ ॥
कितेक देवतें भूतें । कितेक ब्रह्मयोगिणी ।
कितेक हरीहरादिक । सर्वत्र जाणती कळा ॥ २० ॥
कल्पना कामनारूपें । वायोरूपें विराजती ।
कितेक घुमती आंगीं । प्रचीत रोकडी जनीं ॥ २१ ॥
आपलाल्या साभिमानें । मीपणें वाद घालिती ।
शरीरभावना भिन्ना । भिन्नें क्षेत्रें परोपरीं ॥ २२ ॥
वास घे वासनादेवो । स्थूळेंवीण खातां नये ।
म्हणोनी ब्राह्मणा द्यावें । विप्रमुखें संतृप्तता ॥ २३ ॥
निर्वैर सर्वभूतांसीं । वर्तणें न घडे कदा ।
उगेंचि व्यर्थ बोलावें । चालणें न घडे कदा ॥ २४ ॥
नेणतां नुमजे कांहीं । तारुणी मकरध्वजु ।
वृद्धाप्य आदळे अंगीं । दुःख ब्रह्मांड कोसळे ॥ २५ ॥
मागील कोण तो जन्म । माता पिता कळेचिना ।
कन्या पुत्र वधु कोण । कोण ते जन्मभूमिका ॥ २६ ॥
मागील नाठवे आतां । आतांचें नाठवे पुढें ।
येकाकी येकलें जावें । मायाजाळें भ्रमे जनु[1] ॥ २७ ॥
संचितासारिखे येती । प्राणी हे भोग भोगिती ।
भोगणें पुर्वीचा ठेवा । म्हणोनि पुण्य पाहिजे ॥ २८ ॥
पुण्यमार्गें भले जाती । पापिष्टें पाप संचिती ।
पापयोगें महादुःखें । पापयोगें दरिद्रता ॥ २९ ॥
पातकी दैन्यवाणा तो । निंदा द्वेष वसे मनीं ।
न्याय अन्याय तो नेणे । मातला मदमत्सरें ॥ ३० ॥
देव धर्म क्रिया नेणें । भ्रष्ट चांडाळ दुर्जनु ।
कुकर्मी घातकी दोषी । या लोका यमयातना ॥ ३१ ॥

॥ इति श्रीपंचमाने स्वल्पसंकेते अंतरात्माविवरण नाम मान दुसरें ॥ २ ॥

---

1 जन्म.

धन्य ते योगीये साधु। पावले परमेश्वरा।
आपुलें हित तें केलें। तरले तारिले जना॥ १॥
सत्कर्में शोभती वेष। बोलणें मधुरा गिरा।
पुण्यात्मे सुकृती न्यायी। योजिती धर्मस्थापना॥ २॥
विशाळा पावना बुद्धि। विशाळा सुखकारकी।
परोपकारणी काया। परत्र लोकसंग्रहीं॥ ३॥
यातना सेवका नाहीं। ते तंव ईश्वरी तनु।
उपायें सोडवी लोकां। तो संग सुकृतें घडे॥ ४॥
सन्मार्ग साधनालागी। संग तो पाहिजे बरा।
सत्संग शोधितां नाहीं। सत्संग हितकारकु॥ ५॥
कुसंगें नासती प्राणी। सत्संगें पावती पदा।
यांत मानेल तें घ्यावें। सर्वज्ञ जाणते तुम्ही॥ ६॥
संसार पाहिला डोळां। रंग वोरंग[1] होतसे।
हांसती रुदती प्राणी। सुखदुःखें परोपरीं॥ ७॥
देखिलें चाखिलें मागें। जन्मादारभ्य आठवे।
निःशेष राहिल्या शक्ती। रोगव्याधी विटंबणा॥ ८॥
दैन्यवाणा देह जातो। ते काळीं हित नाकळे।
म्हणोनि धन्य ते साधु। मायात्यागेंचि सुटले॥ ९॥
संपती संतती विद्या। शक्ती सामर्थ्य जातसे।
दक्ष[1] ते जाणती आधीं। बावळीं भुलली मदें॥ १०॥
राहिला कोण ये लोकीं। संव्हार रावणादिकां।
इतरां कोण तो लेखा। नेणती मूढ माणसें॥ ११॥
मधेंचि झांकिली काया। येतां जातां दिगंबरी।
जाणती तापसी योगी। संगत्यागें सदा सुखी॥ १२॥
मी मोठा मी मोठा वाटे। न शोधितां वसुंधरा।
चालिला गर्व कोणाचा। काळ हा घसरी जना॥ १३॥
पाहतां रंक ते राजे। राजे रंक पुनःपुन्हा।
भर्वसा कोण मानावा। हाणी मृत्य समागमें॥ १४॥
लाभ तो येक जाणावा। परमात्मा परमेश्वरु।
भक्तीनें आपुला कीजे। विचक्षणें चुकों नये॥ १५॥
चुकतां मुख्य देवासी। चुकेना यमयातना।
म्हणोनि सद्गुरु कीजे। न कीजे अवलक्षणु॥ १६॥

---

१ दक्ष व बावळीं हे विरुद्धार्थवाचक शब्द आहेत.

शाक्त मुक्त अनाचारी। मंत्र यंत्र करामती।
नाटकी चेटकी भोंदु। तो गुरु[1] न मने मना ॥ १७ ॥
कर्मठु नित्यसंदेही। ज्ञानहीन तमोगुणी।
अवैरागी[2] महाडंभी। तो गुरु न मने मना ॥ १८ ॥
तीर्थे व्रतें तपें दानें। बहुधाशास्त्रनिश्चयी।
प्रत्ययो नाडळे जेथें। तो गुरु न मने मना ॥ १९ ॥
असार कोण तें नेणे। सार तें तों कळेचिना।
सर्वसार[3] वदे लोकां। तो गुरु न मने मना ॥ २० ॥
कर्ता कोण तो नेणे। नेणे चंचळ निश्चळु।
त्रिगुण कोण तें नेणें। तो गुरु न मने मना ॥ २१ ॥
निष्ठाहीन अविश्वासी। व्यसनी परघातकु।
भ्रमिष्ट आळसी मंदु। तो शिष्य न पवे पदा ॥ २२ ॥
लालची तामसी वेडा। नष्ट भ्रष्ट बहुचकुं[4]।
प्रज्ञाहीन प्रेत्नहीन। तो शिष्य न पवे पदा ॥ २३ ॥
सुखवासी गोडग्रासी। निकामीच निसंगळु[5]।
कदापी धारणा नाहीं। तो शिष्य न पवे पदा ॥ २४ ॥
विवरेना विचारीना। श्रवणीं मननीं कदा।
प्रत्यय पाहिल्यावीण। तो शिष्य न पवे पदा ॥ २५ ॥
तत्वज्ञानें ब्रह्मज्ञानें। पिंडब्रह्मांडनायकु।
विवेकें चोजवीना जो। तो शिष्य न पवे पदा ॥ २६ ॥

इति श्रीपंचमाने स्वल्प संकेते ॥ गुरुशिष्यलक्षण नाम ॥ ३ ॥

---

भाविकें सात्विकें भोळीं। त्या नामस्मरणें रती।
विवेकी जाणते घेती। सारासारविचारणा ॥ १ ॥
मंत्रयंत्रजपध्यानें। भाविकें तोषती मनीं।
विवेकी जाणते घेती। सारासारविचारणा ॥ २ ॥
तीर्थे व्रतें तपें दानें। भाविकां सुख होतसे।
विवेकी जाणते घेती। सारासारविचारणा ॥ ३ ॥
होम याग पुन्हश्चरणें। स्वप्ननिष्ठां स्वभाविकां।
विवेकी जाणते घेती। सारासारविचारणा ॥ ४ ॥

---

१ मनाचे श्लोक १८०–१८३ पहा. २ वैराग्यहीन. ३ सर्वब्रह्मवादी. ४ बोहोचक, बहुवाचक, भोचक. ५ निर्लज्ज.

देखणी आसनें मुद्रा । जप होम विधी पुजा ।
विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा ॥ ५ ॥
भाविकां प्रतिमापूजा । पुराणें माहात्में शुभें ।
विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा ॥ ६ ॥
भाविकांला फळश्रुती । चमत्कारेंची निश्चयो ।
विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा ॥ ७ ॥
पिंगळे पाली सिंकोटीं[1] । ग्रह मुहूर्त भाविकां ।
विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा ॥ ८ ॥
राजसें तामसें कर्मे । नाना नवस भाविकां ।
विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा ॥ ९ ॥
दंडणा कामना यात्रा । भाविकास उपोषणें ।
विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा ॥ १० ॥
भाविकें घालिती डांका[2] । भोग राहाण[3] गोंधळ ।
विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा ॥ ११ ॥
भाविकां आगमी निष्ठा । षड्चक्र योगधारणा ।
विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा[4] ॥ १२ ॥
तीर्थीं पर्व महोत्साहीं । भाविकें जीव लाविती ।
विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा ॥ १३ ॥
मालीदेकौळकांकाले । भाविकें गळ टोंचिती ।
विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा ॥ १४ ॥
नाना नेम क्रियानिष्ठा । भाविकां बहु साधनें ।
विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा ॥ १५ ॥
शोधितां अष्टही काया । पिंडब्रह्मांडनायकु ।
तुटला थोर संदेहो । धोका यमयातनेचा ॥ १६ ॥
हें वर्म जाणती ज्ञानी । तत्वज्ञ जाणते जनीं ।
पंचीकरण महावाक्यें । सारासारविचारणा ॥ १७ ॥
दक्ष ते पावती खुणें । बावळीं भुललीं मदें ।
सोहं हंसा विचारावें । त्रिविधा बंदमोचनें ॥ १८ ॥

---

१ शिंक उठी ? २ मृताच्या बाराव्या दिवशीं करावयाचा एक विधी. ३ अंगांत दैवत [illegible]ल्ण्याची क्रिया. ४ भाविक नानाविध भल्याबुऱ्या साधनांच्या नादीं लागतात पण विवेकी [illegible]रासारविचारानें सारभूत ब्रह्म तेवढें स्वीकारतात हा या प्रकरणाचा सारांश आहे.

ब्रह्मास्मि ब्रह्माहमस्मि । अहंब्रह्म विशेषता ।
यदर्थीच प्रवेशावें । आत्मनिवेदनी क्रिया ॥ १९ ॥
जाणतां चुकती जन्म । जाणतां पद पावणें ।
जाणतां सर्वहि सिद्धि । जाणणेंचि विशेष हें ॥ २० ॥
नेणतां व्यर्थ कष्टावें । नेणतां तामसी क्रिया ।
नेणतां निर्फळी विद्या । नेणणें सर्व घातकी ॥ २१ ॥
आयुष्य वेचलें वांयां । तपें दानें तीर्थाटणें ।
देखणी आसनें मुद्रा । षड्चक्र योगधारणा ॥ २२ ॥
धोती पोती भुजंगी ते । अष्टांग योगसाधनें ।
गोरांजनें धूम्रपानें । पंचाग्नी होमसाधनें ॥ २३ ॥
उदास तापसी काया । अन्नवस्त्रविवर्जिता ।
उपोशनी पुरश्चरणी । निरोधी हटनिग्रही ॥ २४ ॥
निरोधें गांदती[1] काया । निरोधें कर वाळती ।
निरोधें सुकती गात्रें । निरोध भ्रमकारकु ॥ २५ ॥
निरोधी प्राण रोधीतो । निरोधी भूतसंग्रही ।
निरोधी आगमी क्रोधी । निरोध परघातकु ॥ २६ ॥

शैवशाक्तागमाद्या ये अन्ये च बहवो मताः ।
अपभ्रंशसमास्तेऽपि जीवानां भ्रांतचेतसाम्[2] ॥ १ ॥

चित्त हें मैळलें कार्टें[3] । चित्तशुद्धि घडेचिना ।
म्हणोनि चित्त शोधाया । नित्यानित्यविवेकु हा ॥ २७ ॥
नित्यानित्यविवेकानें । चुकती यमयातना ।
प्रत्ययो पाहाणें आतां । रोकडा ब्रह्मनिश्चयो ॥ २८ ॥
मी कोण हेंचि शोधावें । मायातीत निरंजनु ।
निःसंग होइजे येणें । ज्ञानें मुक्ति सायुज्यता ॥ २९ ॥

॥ इति श्रीपंचमाने स्वल्पसंकेते सारासारविवेक मान ॥ ४

---

ज्ञानेंचि चुकती जन्म । ज्ञानेंचि सुटका घडे ।
ज्ञानेंचि पाविजे मुख्या । निर्गुणा परमेश्वरा ॥ १ ॥
ज्ञानेंचि ज्ञान शोधावें । ज्ञानें अज्ञान त्यागणें ।
ज्ञानेंचि पाविजे मुख्या । निर्गुणा परमेश्वरा ॥ २ ॥

---

१ देहाला कष्ट देतात. २ दासबोध द. ५ स. ४ पहा. ३ दुर्बुद्धीनें मळलें.

ज्ञानेंचि चालती कर्मै । ज्ञानमार्ग उपासना ।
ज्ञानेंचि पाविजे मुख्या । निर्गुणा परमेश्वरा ॥ ३ ॥
ज्ञानेंचि प्रत्ययो येतो । ज्ञानें संदेह तूटती ।
ज्ञानेंचि पाविजे मुख्या । निर्गुणा परमेश्वरा ॥ ४ ॥
ज्ञानेंचि वेद वेदांतीं । ज्ञानेंचि सुटिका घडे ।
ज्ञानेंचि पाविजे मुख्या । निर्गुणा परमेश्वरा ॥ ५ ॥
ज्ञानेंचि सर्वही सिद्धि । ज्ञानेंची सकळै कळा ।
ज्ञानेंचि तीक्ष्णा बुद्धी । नित्यानित्यविवेकु हा ॥ ६ ॥
ज्ञानेंचि धारणा धृती । ज्ञानेंचि सर्वसाधनें ।
ज्ञानेंचि पाविजे मुख्या । निर्गुणा परमेश्वरा ॥ ७ ॥
सर्वारंभ तो ज्ञानें । ज्ञानें त्रैलोक्य चालतें ।
परंतु मुख्य तो ज्ञानी । परत्र पाववी जना ॥ ८ ॥
जेथुनी सर्वही जालें । पुन्हा तेथेंचि आटलें ।
सिद्धांत तोचि जाणावा । जेथें दृश्यचि नाडले ॥ ९ ॥
चंचळीं जाणणें मोठें । निश्चळीं निश्चयात्मकु ।
आद्यंत एक तो देवो । तो देव ज्ञानसाधकु ॥ १० ॥
बरें पाहें आपणाला । शोधितां नाडळे[1] नसे ।
येक तो आडळे देवो । नित्य शाश्वत संचला ॥ ११ ॥
असत्य पाहतां नाहीं । सत्य सर्वत्र संचलें ।
पदार्थेंवीण ज कांहिं । कदाकाळीं चळेचिना ॥ १२ ॥
तें ब्रह्म जाणिजे संतीं । जेथें विकार नाडळे ।
निर्गुण निर्विकारी जें । नित्य नूतन तेंचि तें ॥ १३ ॥
चैतन्य चेतवितें तें । जाणते साक्ष बोलिजे ।
जाणावें चेतवावें तें । तेंचि हें पाहातां नसे ॥ १४ ॥
या देहाचेनि जें नावें । तें नांव देह तंवरी ।
नासतां सर्वही देहो । ग्रामो नास्ति कुतः सीमा ॥ १५ ॥
अंतःकरण जाणतें तें । प्राण चैतन्य बोलिजे ।
जडांश चेतवीतो तो । मुख्य प्राण देहें धरी ॥ १६ ॥
प्राण तों चालती काया । प्राण तों चेतना घडे ।
प्राण तों जाणणें सर्वै । प्राण जातां घडेचिना ॥ १७ ॥
पंचभौतिक हे काया । शोधितां पांच पंचकें ।
करणपंचक तें जाणे । प्राणपंचक चेतवी ॥ १८ ॥

---

[1] आढळत नाहीं असें होत नाहीं.

प्रचीत पाहाती ज्ञानी । प्रचीतीवेगळीं मुढें ।
तत्वार्थ प्रत्यया आणी । धन्य तो ज्ञानसाधकु ॥ १९ ॥
तत्वार्थ शोधितां आतां । प्रचीत रोकडी घडे ।
मोक्ष तो हाचि जाणंवा । तत्वबंदविमोचनें[1] ॥ २० ॥
वाच्यांश सांडणें मागें । लक्ष्यांश पाहणें बरा ।
आत्मनिवेदनी भक्ती । कृतकृत्याचि होईजे ॥ २१ ॥
हें ज्ञान रामकृपेनें । धन्य रामउपासना ।
रामदास्य घडे ज्याला । ते सर्वत्र रामदास हो ॥ २२ ॥
येकसेंबत्तिसां श्लोकीं । साधकें पाहाणें बरें ।
आध्यात्म शोधणें सर्वै । दासबोधीं समाप्यते[2] ॥ २३ ॥

इति श्रीपंचमाने स्वल्पसंकेते सारासारविचारनिरूपणनाम मान पांचवें

# १२ मनोबोधाचे श्लोक.

॥ श्रीराम ॥

गणाधीश[3] जो ईश सर्वां गुणाचा । मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ।
नमूं शारदा मूळ चत्वार वाचा । गमू पंथ आनंत या राघवाचा ॥ १ ॥
मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें । तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें[4] ।
जनीं निंद्य[5] तें सर्व सोडूनि द्यावें । जनीं वंद्य तें सर्व भावें करावें ॥ २ ॥
प्रभाते मनीं राम चिंतीत जावा । पुढें[6] वैखरी राम आधीं वदावा ।
सदाचार हा थोर सोडूं नये तो । जनीं तोचि तो मानवीं धन्य होतो ॥३॥
मना वासना दुष्ट कामा नये रे । मना सर्वथां[7] पापबुद्धी नको रे ।
मना सर्वथा नीति सोडूं नको हो । मना अंतरीं सारवीचार[8] राहो ॥ ४ ॥

---

१ तत्वांच्या बंधांतून सुटका, तत्वांवेगळे होणें. २ पूर्णत्वें सांगितलें आहे. ३ गणेश-शारदारूप मूळमायेला प्रथम वंदन करून तिच्या पलीकडील शुद्धस्वरूपाचा म्ह० राघवाचा पंथ आकळावा असें या मंगलाचरणाच्या श्लोकांत म्हटलें आहे. ४ अनायासें सहज. ५ देवाला भजण व सदाचारानें चालणें हें वंद्य व कामक्रोधादि विकारांना वश होणें हें निंद्य असें पुढील ७।८ श्लोकांत सांगतात. ६ आधीं रामरूपाचें चिंतन करावें आणि मग ( पुढें ) याच भजन म्ह० नामस्मरण करावें. ७ मुळींच. ८ सारभूत जो परमात्मा त्याचा विचार.

मना पापसंकल्प[1] सोडूनि द्यावा । मना सत्यसंकल्प जीवीं धरावा ।
मना कल्पना ते नको वीषयांची । विकारें घडे हो जनीं सर्व ची चीं[2] ॥ ५ ॥
नको रे मना क्रोध[3] हा खेदकारी । नको रे मना काम नानाविकारी ।
नको रे मना सर्वथा अंगिकारू । नको रे मना मत्सरु दंभभारू ॥ ६ ॥
मना श्रेष्ठ[4] धारिष्ट जीवीं धरावें । मना बोलणें नीच सोशीत जावें ।
स्वयें सर्वदा नम्र वाचे वदावें । मना सर्व लोकांसि रे निववावें ॥ ७ ॥
देहे त्यागितां कीर्ति मागें उरावी । मना सज्जना हेचि क्रीया धरावी ।
मना चंदनाचेपरी त्वां झिजावें । परी अंतरीं सज्जना नीववावें ॥ ८ ॥
नको रे मना द्रव्य तें पूढिलाचें[5] । अती स्वार्थबुधीन[6] रे पाप सांचे ।
घडे भोगणें पाप तें कर्म खोटें । न होतां मनासारिखें दुःख मोटें ॥ ९ ॥
सदा सर्वदा प्रीति रामीं धरावी । दुःखाची स्वयें सांडि[7] जीवीं करावी ।
देहदुःख हें सूख मानीत जावें । विवेकें सदा स्वस्वरूपीं भरावें ॥ १० ॥
जनीं सर्वसुखी[8] असा कोण आहे । विचारें मना तूंचि शोधूनि पाहे ।
मना त्वांचि रे पूर्वसंचित केलें । तयासारिखें भोगणें प्राप्त जालें ॥ ११ ॥
मना मानसीं दुःख आणूं नको रे । मना सर्वथा शोक चिंता नको रे ।
विवेकें देहेबुद्धि[9] सोडूनि द्यावी । विदेहीपणें मुक्ति भोगीत जावी ॥ १२ ॥
मना सांग पा रावणा काय जालें । अकस्मात तें राज्य सर्वे बुडालें ।
म्हणोनी कुंडी[10] वासना सांडि वेगीं । बळें लागला काळ हा पाठिलागीं १३
जिवा कर्मयोग जनीं जन्म जाला । परी सेवटीं काळमूखीं निमाला ।
महा[11] थोर ते मृत्युपंथेंचि गेले । कितीयेक ते जन्मले आणि मेले ॥ १४ ॥
मना पाहतां सत्य हे मृत्युभूमी । जितां[12] बोलती सर्वही जीव मी मी ।
चिरंजीव[13] हे सर्वही मानिताती । अकस्मात सांडूनियां सर्व जाती ॥ १५ ॥
मरे येक त्याचा दुजा शोक वाहे । अकस्मात तोही पुढें जात आहे ।
पुरेना जनीं लोभ रे क्षोभ[14] त्यातें । म्हणोनी जनीं मागुता जन्म घेतें ॥ १६ ॥

१ मिथ्या मायेचा संकल्प तो पापसंकल्प व सत्य म्ह० शाश्वत ब्रह्माचा संकल्प तो पुण्य-संकल्प. २ छी, छी, फजीती. ३ कामक्रोधादि षड्विकारांपासून दूर रहा. ४ सात्विक धैर्य. आत्मनिष्ठेच्या योगानें मन प्राण व इंद्रियें यांचे व्यापार स्वाधीन ठेवणें तें सात्विक धैर्य (गीता अ. १८–३३). ५ दुसऱ्यांचें. ६ अति स्वार्थाच्या बुद्धीमुळें. ७ त्याग. दुःखाच्या आठवणीचा त्याग. ८ जनांत सर्वसुखी असा कोणीच नाहीं, पूर्वसंचितानुरूप कांहीं सुखें व कांहीं दुःखें प्रत्येकांस भोगावीं लागतात. ९ देहबुद्धीच्या योगानें म्ह. देहाला मी म्हटल्यामुळें दुःख शोक चिंता भोगावीं लागतात म्हणून ती सोडून देहातीत हो कीं मुक्तिसुख सहज आहे. १० वाईट वासना, दुर्बुद्धि. ११ लहान व थोर सारेच मृत्युवश आहेत. दासबोध द० ३ स० ९ पहा. १२ जिवंतपणीं. १३ अमर. १४ लोभामुळें, वासनेंमुळें जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतो.

मनीं मानव[1] व्यर्थ चिंता वाहातें । अकस्मात होणार होऊनि जातें ।
घडे भोगणें सर्वही कर्मयोगें । मतीमंद तें खेद मानी वियोगें[2] ॥ १७ ॥
मना राघवेवीण आशा नको रे । मना मानवाची नको कीर्ति तूं रे ।
जया वर्णिती वेद शास्त्रें पुराणें । तया वर्णितां सर्वही श्लाघ्य[3]वाणें ॥ १८ ॥
मना सर्वथा सत्य सोडूं नको रे । मना सर्वथा मिथ्य[4] मांडूं नको रे ।
मना सत्य तें सत्य वाचे वदावें । मना मिथ्य तें मिथ्य[5] सोडूनि द्यावें १९.
बहू हिंपुटी[6] होइजे माय[7]पोटीं । नको रे मना यातना तेचि मोठी ।
निरोधें पचे कोंडिलें[8] गर्भवासीं । अधोमूख रे दुःख त्या बाळकासी ॥२०॥
मना वासना चूकवीं येरझारा[9] । मना कामना सांडि रे द्रव्यदारा ।
मना यातना थोर हे गर्भवासीं । मना सज्जना भेटवीं राघवासी ॥ २१ ॥
मना सज्जना हीत माझें करावें । रघूनायका दृढ चित्तीं धरावें ।
महाराज तो स्वामि[10] वायूसुताचा । जना उद्धरी नाथ लोकत्रयाचा ॥२२॥
न बोलें मना राघवेंवीण कांहीं । जनीं वाउगें[11] बोलतां सूख नाहीं ।
घडीनें घडी काळ आयुष्य नेतो । देहांतीं तुला कोण सोडूं पहातो ॥२३॥
रघूनायकावीण वायां सिणावें । जनासारखें व्यर्थ कां वोसणावें[12] ।
सदा सर्वदा नाम वाचे वसों दे । अहंता मनीं पापिणी ते नसों दे ॥ २४ ॥
मना वीट मानूं नको बोलण्याचा । पुढें मागुता राम जोडेल कैंचा ? ।
सुखाची घडी लोटतां सूख आहे । पुढें सर्व जाईल कांहीं न राहे ॥ २५ ॥
देहेरक्षणाकारणें यत्न केला । परी शेवटीं काळ घेऊनि गेला ।
करीं रे मना भक्ति या राघवाची । पुढें अंतरीं सोडि चिंता भवाची॥२६॥
भवाच्या भयें काय भीतोस लंडी[13] । धरीं रे मना धीर धाकासि[14] सांडीं ।
रघूनायकासारिखा स्वामि शीरीं । नुपेक्षी कदा कोपल्या दंडधारी[15] ॥२७॥
दिनानाथ हा राम कोदंडधारी[16] । पुढें देखतां काळ पोटीं थरारी[17] ।
जना वाक्य नेमस्त हें सत्य मानीं । नुपेक्षी कदा राम[18] दासाभिमानी॥२८॥
पदीं राघवाचे सदा ब्रीद[19] गाजे । बळें भक्तरीपूशिरीं[20] कांबि वाजे ।
पुरी[21] वाहिली सर्व जेणें विमानीं । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥२९॥

---

१ हे क्षुद्र प्राणी. २ मृत्युजन्य वियोगामुळें. ३ गोड, योग्य. ४ मिथ्या मायेचा बडेजाव करूं नकोस. ५ मिथ्य समजून सोडून द्यावें. ६ कष्टी. ७ आईच्या पोटीं. ८ कोंडल्यामुळें. ९ वासनेच्या योगानें होणाऱ्या जन्ममरणाच्या यातना. १० मारुतिरायाचा स्वामी राम. ११ व्यर्थ वायफळ गोष्टी. १२ बडबडावें. १३ भित्र्या. १४ भय. १५ यमराज, काळ. १६ धनुर्धर. १७ भयभीत होतो. १८ भक्तांचा कैवारी राम भक्ताची उपेक्षा करीत नाहीं. १९ भक्तरक्षणाचें व्रत. २० भक्तांचा शत्रूंच्या मस्तकावर रामहस्तांतील धनुष्याचा तडाखा बसतो २१ अयोध्या.

गो. के. काळे



समर्थाचिया[1] सेवका वक्र[2] पाहे। असा सर्व भूमंडळीं कोण आहे ?।
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३०॥
महासंकटीं सोडिले देव जेणें। प्रतापें बळें आगळा सर्वगूणें।
जयातें स्मरे शैलजा[3] शूळपाणी। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३१॥
अहल्या शिळा राघवें मुक्त केली। पदीं[4] लागतां दिव्य होऊनि गेली।
जया वर्णितां सीणली[5] वेदवाणी। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३२॥
वसे[6] मेरु मांदार हे सृष्टिलीळा। शशी सूर्य तारांगणें मेघमाळा।
चिरंजीव केले जनीं दास दोन्ही। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३३॥
उपेक्षा कदा रामरूपीं[7] असेना। जिवां मानवां निश्चयो तो वसेना।
शिरीं भार वाहेन[8] बोले पुराणीं। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३४॥
असे हो जया अंतरीं भाव[9] जैसा। वसे हो तया अंतरीं देव तैसा।
अनन्यांस[10] रक्षीतसे चापपाणी। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३५॥
सदा सर्वदा देव सन्नीद्ध आहे। कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे।
सुखानंदआनंदकैवल्यदानी[11]। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३६॥
सदा चक्रवाकासि मार्तंड[12] जैसा। उडी घालितो संकटीं स्वामि तैसा।
हरीभक्तिचा घाव गाजे निशाणीं[13]। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३७॥
मना प्रार्थना तूजला येक आहे। रघूराज थक्कीत[14] होऊनि पाहे।
अवज्ञा[15] कदा हो यदर्थीं न कीजे। मना सज्जना राघवीं वस्ति कीजे॥३८॥
जया वर्णिती वेदशास्त्रेंपुराणें। जयाचेनि योगें समाधान बाणे।
तयालागि हें सर्व चांचल्य[16] दीजे। मना सज्जना राघवीं वस्ति कीजे॥३९॥
मना पाविजे सर्व ही सूख जेथें। अतीआदरें ठेविजे लक्ष तेथें।
विवेकें कुंडी[17] कल्पना पालटीजे। मना सज्जना राघवीं वस्ति कीजे॥४०॥
बहू हिंडतां सौख्य होणार नाहीं। सिणावें परी नातुडे हीत कांहीं।
विचारें बरें अंतरा[18] बोधवीजे। मना सज्जना राघवीं वस्ति कीजे॥४१॥
बहूतांपरी हेंचि आतां धरावें। रघूनायका आपुलेसें करावें।
दिनानाथ हें तोडरी ब्रीद[19] गाजे। मना सज्जना राघवीं वस्ति कीजे॥४२

१ रामाच्या. २ श्रेष्ठ. ३ हिमनगकन्या पार्वती व शंकर. ४ चरणाला. ५ थकली, 'नेति नेति' वदली. ६ मेरुमांदारादि पर्वत, सूर्यचंद्र, नक्षत्रतारा व मेघमाळा आहेत तोंवर बिभीषण व मारुती चिरंजीव आहेत. ७ रामाच्या ठिकाणीं भक्ताची उपेक्षा नाहींच. ८ 'योगक्षेमं वहाम्यहम्' इ० वचनें. ९ भावासारखा देव. १० एकनिष्ठ भक्तास. ११ मोक्ष देणारा. १२ सूर्य. १३ निशाणावर, नगाऱ्यावर. १४ आश्चर्यभरित. १५ हेळणा. १६ रामाला चांचल्य देऊन तूं त्यापासून निश्चलता उर्फ समाधान घे. १७ वाईट. द्वैताची वाईट कल्पना टाकून अभेद भावानें भज. १८ अंतःकरणाला विचारानें बोध कर. १९ दीनरक्षणाचें रामाचें ब्रीद आहे.

मना सज्जना येक जीवीं धरावें। जनीं आपुलें हीत तूंवां करावें।
रघूनायकावीण बोलों नको हो। सदा मानसीं तो निजध्यास[1] राहो॥४३॥
मना रे जनीं मौन्यमुद्रा[2] धरावी। कथा आदरें राघवाची करावी।
नसे राम तें धाम सोडूनि द्यावें। सुखालागीं आरण्य सेवीत जावें॥४४॥
जयाचेनि संगें समाधान भंगे। अहंता अकस्मात येऊनि लागे।
तये संगतीची जनीं कोण गोडी। जिये संगतीनें मती राम जोडी॥४५॥
मना जे घडी राघवेंवीण गेली। जनीं आपुली ते तुवां हानि केली।
रघूनायकावीण तो सीण[3] आहे। जनीं दक्ष[4] तो लक्ष[5] लाऊनि पाहे॥४६॥
मनीं लोचनीं[6] श्रीहरी तोचि पाहें। जनीं जाणता[7] भक्त होऊनि राहें।
गुणीं[8] प्रीति राखे क्रमू साधनाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥४७॥
सदा देवकाजीं झिजे देह ज्याचा। सदा रामनामें वदे नित्य वाचा।
स्वधर्मेंचि[9] चाले सदा उत्तमाचा। जगीं धन्यतो दास सर्वोत्तमाचा॥४८॥
सदा बोलण्यासारिखें चालतोंहे[10]। अनेकीं सदा येक देवासि पाहे।
सगूणीं भजे लेशं[11] नाहीं भ्रमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥४९॥
नसे अंतरीं कामकारी विकारी। उदासीन जो तापसी ब्रह्मचारी।
निवाला मनीं लेश नाहीं तमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥५०॥
मदें मत्सरें सांडिली स्वार्थबुद्धि। प्रपंचीक नाहीं जयातें उपाधी।
सदा बोलणें नम्र वाचा सुवाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥५१॥
क्रमी वेळ जो तत्त्वचिंतानुवादें[12]। न लिंपे कदा दंभवादें विवादें।
करी सूखसंवाद जो ऊगमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥५२॥
सदा आर्जवी[13] प्रीय जो सर्व लोकीं। सदा सर्वदा सत्यवादी विवेकी।
न बोले कदा मिथ्य वाचा त्रिवाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥५३॥
सदा सेवि आरण्य तारुण्यकाळीं। मिळेना कदा कल्पनेचेनि मेळीं[14]।
चळेना मनीं निश्चयो दृढ ज्याचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥५४॥

१ आत्मारामाचें चिंतन. २ मौन्याची मुद्रा, मौन. ३ रामावांचून सर्व कर्म दुःखक्लेशाला कारण होतें. ४ सावध. ५ अनुसंधान. ६ आंतबाहेर. ७ ज्ञानीभक्त ८ सगुणीं प्रेम राखून साधन मार्ग कायम ठेवतो. ९ जातिवर्णानुसार वागणें हा स्वधर्म, किंवा 'सकळधर्मांमध्यें धर्म, स्वरूपीं राहणें हा स्वधर्म' म्ह० स्वस्वरूपानुसंधान हा स्वधर्म. १० क्रियेवीण शब्दज्ञान। तेंचि श्वानाचें वमन। (दा०१२–१०). म्ह० आचार, विचार व उच्चार यांत एकरूपता ठेवतो. ११ भ्रम-रहित पूर्णज्ञानी असून सगुणभजन सांभाळतो. १२ तत्वमसि ह्या महासिद्धांताचें (मनांत) चिंतन व (जनांत) अनुवाद म्ह० व्याख्यान. १३ ऋजु म्ह० सरळ. आर्जव म्ह० सरळ-पणा, मनोगताप्रमाणें प्रियत्वें वागणें. १४ गोंधळांत.

नसे मानसीं नष्ट आशा दुराशा[1] । वसे अंतरीं प्रेमपाशा पिपांशा[2] ।
ऋणी देव हा भक्तिभावें जयाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ५५
दिनाचा दयाळु मनाचा मवाळु । स्नेहाळु कृपाळु जनीं दासपाळु ।
तया अंतरीं क्रोध संताप कैंचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥५६॥
जगीं होइजे धन्य या रामनामें । क्रिया[3] भक्ति ऊपासना नित्यनेमें ।
उदासीनता[4] तत्त्वता सार आहे । सदा सर्वदा मोकळी वृत्ति राहे ॥ ५७ ॥
नको वासना वीषई वृत्तिरूपें[5] । यदर्थी जडे कामना पूर्वपापें ।
सदा राम निःकाम चिंतीत जावा । मना कल्पनालेश तो ही नसावा५८
मना कल्पना कल्पितां कल्पकोटी । नव्हे रे नव्हे सर्वथा रामभेटी ।
मनीं कामना[6] राम नाहीं जयाला । अती आदरें प्रीति नाहीं तयाला ५९
मना राम कल्पतरु, कामधेनु, निधी सार, चिंतामणी, काय वानूं ? ।
जयाचेनि योगें घडे सर्व सत्ता । तया साम्यता कायसी कोण आतां ६०
उभा कल्पवृक्षा[7]तळीं दुःख वाहे । तया अंतरीं सर्वदा तेंचि आहे ।
जनीं सज्जनीं वाद हा वाढवावा । पुढें मागुता शोक जीवीं धरावा ॥६१॥
निजध्यास तो सर्व तूटोनि गेला । बळें अंतरीं शोकसंताप ठेला ।
सुखानंद आनंद भेदें बुडाला । मनीं निश्चयो सर्व खेदें उडाला ॥ ६२ ॥
घरीं कामधेनू पुढें[9] ताक मागे । हरीबोध सांडूनि वीवाद लागे ।
करीं सार-चिंतामणी, काचें[10]खंडें । तया मागतां देत आहे उदंडें[11] ! ॥६३॥
अती मूढ त्या दृढ बुद्धी[12] असेना । अती काम त्या राम चित्तीं वसेना ।
अती लोभ त्या क्षोभ होईल जाणा । अती वीषई सर्वदा दैन्यवाणा[13] ॥६४॥
नको दैन्यवाणें जिणें भक्तिऊणें[14] । अती मूर्ख त्या सर्वदा दुःख दूणें[15] ।
धरीं रे मना आदरें प्रीति रामीं । नको वासना हेमधामीं विरामीं[16] ॥६५॥
नव्हे सार संसार हा घोर[17] आहे । मना सज्जना सत्य शोधूनि पाहे ।
जनीं वीष खातां पुढें सूख कैंचें । करी रे मना ध्यान या राघवाचें ॥६६॥
घनश्याम हा राम लावण्यरूपी । महा धीर गंभीर पूर्णप्रतापी ।
करी संकटीं सेवकाचा कुडावा[18] । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥६७॥

१ स्वार्थाची क्षुद्र आशा. २ प्रेमाची तहान, तृष्णा. ३ स्वधर्माचरण, अंतरंगभक्ति, ज्ञानपूर्वक स्वस्वरूपाचें अनुसंधान व नित्यनेमाचें कार्य. ४ निःसंगता. ५ विषयांकडे मनोवृत्तींचा ओढा. ६ विषयांच्या वासना, कल्पना. ७ आत्माराम निकट असून कल्पनेचें दुःख कां वहावें ? ८ वादापासून तोटे; आत्मानुसंधान तुटतें, नस्ता शोकसंताप होतो, भेदभाव वाढल्यानें निजानंद लोपतो, व आत्मनिश्चय ढिलावतो ! ९ दुसऱ्यांकडे. १० काचेचे तुकडे. ११ पुष्कळ. १२ आत्मबुद्धि. १३ हीनदीन. १४ भक्तिहीन. १५ दुप्पट. १६ रामरहित आशा सुवर्णागारांत. १७ दुःखरूप. १८ रक्षण.

बळें आगळा राम कोदंडधारी[1] । महाकाळ विक्राळ तोही थरारी ।
पुढें मानवा किंकरा कोण केवा[2] । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥६८॥
सुखानंदकारी निवारी भयातें । जनीं भक्तिभावें भजावें तयातें ।
विवेकें त्यजावा अनाचार हेवा[3] । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥६९॥
सदा रामनामें वदा पूर्णकामें[4] । कदा बाधिजेनापदा[5] नित्यनेमें ।
मदालस्य[6] हा सर्व सोडूनि द्यावा । प्रभातें मनीं राम चिंतीत जावा ॥७०॥
जयाचेनि नामें महादोष जाती । जयाचेनि नामें गती पाविजेती ।
जयाचेनि नामें घडे पुण्यठेवा । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ ७१ ॥
न वेंचे कदा ग्रंथिचे[7] अर्थ कांहीं । मुखें नाम उच्चारितां कष्ट नाहीं ।
महाघोर संसार शत्रू जिणावा[8] । प्रभातें मनीं राम चिंतीत जावा ॥७२॥
देहेदंडणेचें[9] महादुःख आहे । महा दुःख तें नाम घेतां न राहे ।
सदाशीव चिंतीतसे देवदेवा । प्रभातें मनी राम चिंतीत जावा ॥ ७३ ॥
बहुतांपरी संकटें साधनाचीं । व्रतें दान उद्यापनें तीं धनाचीं ।
दिनाचा दयाळू मनीं आठवावा । प्रभातें मनीं राम चिंतीत जावा ॥७४॥
समस्तांमध्यें[10] सार साचार आहे । कळेना तरी सर्व शोधून पाहे ।
जिवा संशयो वाउगा[11] तो त्यजावा । प्रभातें मनीं राम चिंतीत जावा ॥७५॥
नव्हे कर्म ना धर्म ना योग कांहीं । नव्हे भोग ना त्याग ना सांग[12] पाहीं ।
ह्मणे दास विश्वास नामीं धरावा । प्रभातें मनीं राम चिंतीत जावा ॥७६॥
करी कामं[13] निःकाम या राघवाचें । करी रूप स्वरूप सर्वां जिवांचें ।
करी छंद निर्द्वंद्व हे गूण गातां । हरीकीर्तनीं वृत्तिविश्वास होतां ॥ ७७ ॥
अहो ज्या नरा रामविश्वास नाहीं । तया पामरा बाधिजे सर्व कांहीं ।
महाराज तो स्वामि कैवल्यदाता[14] । वृथा वाहणें देहसंसारचिंता ॥७८॥
मना पावना[15] भावना राघवाची । धरी अंतरीं सोडिं चिंता भवाची ।
भवाची जिवा मानवा भूलि ठेली । नसे वस्तुची[16] धारणा व्यर्थ गेली ७९

१ धनुर्धारी. २ पाड, किंमत. ३ मत्सरादि. ४ कामना पूर्ण करणारें रामनाम. ५ नित्यनेमानें रामभजन करणारास संकटांची बाधा होत नाहीं. ६ मद व आळस. ७ गांठीचा पैसा ८ जिंकावा. ९ जप तप यात्रादिकांत देहाला कष्ट आहेत, पण नामस्मरणभक्तींत ते नाहींत. १० सर्वसाधनांचें सार नाम आहे. ११ व्यर्थ. १२ कलिकालप्रभावांमुळें यांतलें कांहींच धड होत नाहीं. १३ रामाचा काम (प्रीति) भक्ताला सकल कामनांपासून सोडवितो, त्याच्या रूपाचें ध्यान सर्वांभूतीं भगवद्भाव वाढवितें, व त्याच्या गुणगायनाचा छंद भक्ताला द्वंद्वांपासून मुक्त करितो. १४ मोक्ष देणारा राम—त्याला भक्ताचा योगक्षेम चालविणें काय जड आहे ? मग चिंता कशाला ? १५ निर्मळ भावना. १६ मिथ्या प्रपंचाची जीव व्यर्थ काळजी वाहतो.

धरा श्रीवरा त्या हराअंतरातें[1] । तरा दुस्तरा त्या परा सागरातें ।
सरा वीसरा त्या भरा दुर्भरातें[2] । करा नीकरा[3] त्या खरा मत्सरातें ॥८०॥
मना मत्सरें नाम सोडूं नको हो । अतीआदरें हा निजध्यास राहो ।
समस्तांमध्यें नाम हें सार आहे । दुजी तूळणा तूळितांही न साहे[4] ॥८१॥
बहू नाम या रामनामीं तुळेना । अभाग्या नरा पामरा हें कळेना ।
विषा[5] औषध घेतलें पार्वतीशें । जिवा मानवा किंकरा कोण पूसे ॥८२॥
जेणें जाळिला काम तो राम ध्यातो । उमेसीं अतीआदरें गूण गातो ।
बहु ज्ञान वैराग्य सामर्थ्य जेथें । परी अंतरीं नामविश्वास तेथें ॥ ८३ ॥
विठोनें शिरीं वाहिला देवराणा[7] । तया अंतरीं ध्यास रे त्यासि नेणा ।
निवाला स्वयें तापसी चंद्रमौळी । जिवां सोडवी राम हा अंतकाळीं८४
भजा राम विश्राम योगेश्वरांचा । जपू नेमिला नेम गौरीहराचा ।
स्वयें नीववी तापसी चंद्रमौळी । तुम्हां सोडवी राम हा अंतकाळीं ॥८५॥
मुखीं राम विश्राम तेथेंचि आहे । सदानंद आनंद सेऊनि राहे ।
तयावीण तो सीण[9] संदेहकारी । निजधामें[10] हें नाम शोकापहारी ॥८६॥
मुखीं राम त्या काम बाधूं शकेना । गुणें इष्ट धारिष्ट[11] त्याचें चुकेना ।
हरीभक्त तो शक्त कामास मारी । जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी ८७
बहू चांगलें नाम या राघवाचें । अती साजिरें स्वल्प सोपें फुकाचें ।
करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें[12] । जिवां मानवां हेंचि कैवल्य साचें ॥८८॥
जनीं भोजनीं नाम वाचे वदावें । अती आदरें गद्य घोषें[13] ह्मणावें ।
हरीचिंतनें अन्न जेवीत जावें । तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥८९॥
न ये राम वाणी तया थोर हाणी[14] । जनीं व्यर्थ प्राणी तया नाम काणी[15] ।
हरीनाम हें वेदशास्त्रीं पुराणीं । बहू आगळें[16] बोलिली व्यासवाणी ॥९०॥
नको वीट मानूं रघूनायकाचा । अतीआदरें बोलिजे राम वाचा ।
न[17] वेंचे, मुखीं सांपडे रे फुकाचा । करीं घोष त्या जानकीवल्लभाचा ९१

---

१ शिवाचें हृदय जो राम त्यातें. २ पोटाला भरा पण त्याला जरा विसरून रामाला स्मरा. ३ मत्सराशीं झगडा. ४ दुसऱ्या साधनांला नामाची सर येणार नाहीं. ५ हालाहल-विषाच्या दाहशमनार्थ. ६ शंकराच्या ठिकाणीं. ७ शंकराला विष्णूनें मस्तकावर घेतलें आहे. पंढरीची विठ्ठलमूर्ति पहा. ८ तुम्ही जाणत नाहीं. ९ रामनामावांचून बाकी संशय वाढविणारे सारे श्रम वृथा होत. १० निजाचें म्ह० आत्मारामाचें नाम हें घर आहे. ११ कामादिकांशीं झगडण्यांत त्याचें धैर्य ढळत नाहीं. १२ भवाचें मूळ निर्मूळ करितें, जन्माचें मूळ जी वासना ती जाळून टाकते. १३ गर्जून गावें. १४ हानी, घात. १५ कष्टाचें, क्लेशदायक. १६ श्रेष्ठ. १७ तुझें कांहीं खर्चत नाहीं.

अती आदरें सर्वही नामघोषें । गिरींकंदरीं जाइजे दूर दोषें ।
हरी तिष्ठतु[1] तोषला नामघोषें । विशेषें हरामानसीं रामपीसें ॥ ९२ ॥
जगीं पाहतां देव हा अन्नदाता । तया लागली[2] तत्वता सार चिंता ।
तयाचें मुखीं नाम घेतां फुकाचें । मना सांग पां रे तुझें काय वेचें ॥९३॥
तिन्ही लोक जाळूं शके कोप येतां । निवाला हरु तो मुखें नाम घेतां ।
जपे आदरें पार्वती विश्वमाता । ह्मणोनी म्हणा तेंचि हें नाम आतां ९४
अजामेळ[3] पापी वदे पुत्रकामें । तया मुक्ति नारायणाचेनि नामें ।
शुकाकारणें कुंटणी[4] राम वाणी । मुखें बोलतां ख्याति जाली पुराणीं ९५
महाभक्त प्रल्हाद हा दैत्यकूळीं । जपे रामनामावळी नित्यकाळीं ।
पिता[5] पापरूपी तया देखवेना । जनीं दैत्य तो नाम मूखें म्हणेना ॥ ९६ ॥
मुखीं नाम नाहीं तया मुक्ति कैंची । अहंतागुणें यातना तेफुकाची ।
पुढें अंत येईल तो दैन्यवाणा । म्हणोनी म्हणा रे म्हणा देवराणा ॥९७॥
हरीनाम नेमस्त पाषाण तारी । बहू तारिले मानवदेहधारी ।
तया रामनामीं सदा जो विकल्पी[6] । वदेना कदा जीव तो पापरूपी ॥९८॥
जगीं धन्य वाराणसी[7] पुण्यराशी । तयेमाजिं जातां गती पूर्वजांसी ।
मुखें रामनामावळी नित्यकाळीं । जिवा हीत सांगे सदा चंद्रमौळी॥९९॥
यथासांग रे कर्म[8] तेंही घडना । घडे कर्म तें पुण्य गाठीं पडेना ।
दया पाहतां सर्वभूतीं असेना । फुकाचें मुखीं नाम तेंही वसेना ॥१००॥
जया नावडे नाम त्या यम जाची । विकल्पें उठे तर्क त्या नर्क ची ची ।
म्हणोनी अतीआदरं नाम घ्यावें । मुखें बोलतां दोष जाती स्वभावें १०१
अतीलीनता सर्वभावें स्वभावें । जना सज्जनांलागि संतोषवावें ।
देहे कारणीं सर्व लावीत जावें । सगूणीं अती आदरेंसी भजावें ॥१०२॥
हरीकीर्तनें प्रीति रामीं धरावी । देहेबुद्धि नीरूपणीं वीसरावी ।
परद्रव्य आणीक कांता परावी[9] । यदर्थीं मना सांडि[10] जीवीं करावी १०३
क्रियेवीण नानापरी बोलिजेतें । परी चित्त दुश्चीत[11] तें लाजवीतें ।
मना कल्पना धीट सैराट[12] धांवे । तया मानवा देव कैसेनि पावे ॥१०४॥
विवेकें क्रिया आपुली पालटावी । अती आदरें शुद्ध क्रीया धरावी ।
जनीं बोलण्यासारिखें चाल बापा । मना कल्पना सोडिं संसारतापा१०५

---

१ नामघोष चालतो तेथें हरी संतुष्ट होऊन उभा राहतो. २ त्यानेंच सर्वभार शिरावर घेतला आहे. ३ अजामेळाची कथा भागवत स्कंध ६ अ० १।२।३ मध्यें पहावी. ४ गणिका. ५ हिरण्यकशिपु दैत्य. ६ सःशंक. ७ काशीस मृत्युकाळीं स्वयें शंकर कानांत रामनामाचा उपदेश करितात. ८ हरिसेवेंत व परोपकारांत. ९ पराची स्त्री. १० मनांतून त्याग. ११ दुश्चित्त, कानकोंडें. १२ हवी तिकडे, स्वच्छंद.

वरी स्नानसंध्या करीं येकनिष्ठा । विवेकें मना आवरीं स्थानभ्रष्टा[1] ।
दया सर्वभूतीं जया मानवाला । सदा प्रेमळू भक्तिभावें निवाला[2] ॥१०६॥
मना कोप[3]आरोपणा ते नसावी । मना बुद्धि हे साधुसंगीं वसावी ।
मना नष्ट चांडाळ तो संग[4] त्यागीं । मना होइरे मोक्षभागीं विभागी[5] १०७
मना सर्वदा सज्जनाचेनि योगें । क्रिया पालटे भक्तिभावार्थ लागे ।
क्रियेवीण वाचाळता ते निवारी । तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥१०८॥
जनीं वादवेवाद सोडूनि द्यावा । जनीं सूखसंवाद[6] सूखें करावा ।
जनीं तोचि तो शोकसंतापहारी । तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥१०९॥
तुटे वाद संवाद त्यातें म्हणावें । विवेकें अहंभाव यातें जिणावें ।
अहंतागुणें वाद नानाविकारी । तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥ ११० ॥
हिताकारणें बोलणें सत्य आहे । हिताकारणें सर्व शोधूनि पाहे ।
हिताकारणें बंड पाखांड वारी । तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥ १११ ॥
जनीं सांगतां ऐकतां जन्म गेला । परी वादवेवाद तैसाचि ठेला ! ।
उठे संशयो वाद हा दंभधारी । तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥ ११२ ॥
जनीं हीत पंडीत[7] सांडीत[8] गेले । अहंतागुणें ब्रह्मराक्षस जाले ।
तयाहूनि व्युत्पन्न तो कोण आहे । मना सर्व जाणीव[9] सांडूनि राहें ११३
फुकाचें मुखीं बोलतां काय वेचे ? । दिसेंदिस अभ्यंतरीं गर्व सांचे ।
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे । विचारें तुझा तूंचि शोधून पाहे ११४
तुटे वाद संवाद तेथें करावा । विवेकें अहंभाव हा पालटावा ।
जनीं बोलण्यासारिखें आचरावें । क्रियापालटे भक्तिपंथेंचि जावें ॥११५॥
बहू श्रापितां कष्टला अंबरूषि[10] । तयाचे स्वयें श्रीहरी जन्म[11] सोशी ।
दिल्हा क्षीरसिंधू[12] तया ऊपमानी[13] । नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी ११६
धुरू[14] लेंकरूं बापुडें दैन्यवाणें । कृपा भाकितां दीधली भेटि जेणें ।
चिरंजीव[15] तारांगणीं प्रेमखाणी । नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी ॥११७॥
गजेंद्रु महासंकटीं[16] वाट पाहे । तयाकारणें श्रीहरी धांवताहे ।
उडी घातली जाहला जीवदानी[17] । नुपेक्षी कदा देवभक्ताभिमानी ॥११८॥

---

१ निर्विषय ब्रह्मापासून च्युत अशा. २ रामसुख पावला. ३ कोपवश होणें. ४ काम-कोपांचा संग. ५ मोक्षाचा वाटेकरी. ६ वादविवाद सोडून प्रेमळांशीं सुखसंवाद मात्र करावा, कां कीं तो मात्र शोकसंताप दूर करितो. ७ शब्दपंडित. ८ शास्त्र पाहिलेले. ९ जाणते-पणाचा अहंकार. १० याची कथा भागवत स्कंध ९ अ० ४ ते ६ पहा. ११ दशावतार. १२ दुधाचा समुद्र. १३ उपमन्यूला (महाभारत अनुशासनपर्व अ. १४ पहा.). १४ ध्रुवाची कथा भागवत स्कंध ४ अ. ८ मध्यें पहा. १५ अढळपद. १६ नक्रानें पाय धरिले तेव्हां भागवत स्कंध ८ अ. २ ते ४. १७ प्राण वांचविणारा.

अजामेळ पापी तया अंत आला । कृपाळूपणें तो जनीं मुक्त केला ।
अनाथासि आधार हा चक्रपाणी । नुपेक्षी कदा देवभक्ताभिमानी ११९
विधी[1]कारणें जाहला मत्स्य वेगीं । धरी कूर्मरूपें धरा पृष्ठभागीं ।
जना रक्षणाकारणें नीच[2] योनी । नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी ॥१२०॥
महा भक्त प्रल्हाद हा कष्टवीला । म्हणोनी तयाकारणें सिंह[4] जाला ।
न ये ज्वाळ वीशाळ सन्नीध कोण्ही । नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी१२१
कृपा भाकितां जाहला वज्रपाणी । तयाकारणें वामनु चक्रपाणी ।
द्विजाकारणें भार्गव[5] चापपाणी । नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी ॥१२२॥
अहल्येसतीलागि आरण्यपंथें । कुडावा[6] पुढें देव बंदी तयांतें ।
बळें सोडितां घाव घालि निशाणीं । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी१२३
तयें द्रौपदी कारणें लाँगवेगें । त्वरें धांवतू सर्व सांडूनि मागें ।
कळीलागि जाला असे बौद्ध मौनी । नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी १२४
अनाथां दिनां कारणें जन्मताहे । कलंकी पुढें देव होणार आहे ।
जया वर्णितां सीणली वेदपाणी । नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी ॥१२५॥
जनाकारणें देव लीळावतारी । बहूतांपरी आदरें वेषधारी ।
तया नेणती ते जन पापरूपी । दुरात्मे महानष्ट चांडाळ पापी ॥ १२६ ॥
जगीं धन्य तो रामसूखें निवाला । कथा ऐकतां सर्व तल्लीन जाला ।
देहेभावना रामबोधें उडाली । मनोवासना रामरूपीं बुडाली ॥ १२७ ॥
मना वासना वासुदेवीं वसों दे । मना कामना कामसंगीं नसों दे ।
मना कल्पना वाउगी ते न कीजे । मना सज्जना सज्जनीं वस्ति कीजे १२८
गतीकारणें संगती सज्जनाची । मती पालटे सूमती दुर्जनाची ।
रतीनायिकेचा[8] पती नष्ट आहे । म्हणोनी मनातीत[9] होऊनि राहें ॥१२९॥
मना अल्प[10]संकल्प तो ही नसावा । सदा सत्य[11]संकल्प चित्तीं वसावा ।
जनीं जल्प विकल्प[12] तोही त्यजावा । रमाकांत येकांतकाळीं भजावा१३०
भजाया जनीं पाहतां राम येकू । करीं बाण येकू मुखीं शब्द येकू ।
क्रिया पाहतां उद्धरे सर्व लोकू । धरा जानकीनायकाचा[13] विवेकू ॥१३१॥
विचारूनि बोले विवंचूनि[14] चाले । तयाचेनि संतप्त तेही निवाले ।
बरें शोधिल्याविण[15] बोलों नको हो । जनीं चालणें शुद्ध नेमस्त राहो १३२

१ ब्रह्मदेवासाठीं. २ वराहावतार. ३ वाईट. ४ नृसिंह. ५ परशुराम. ६ रक्षण, उद्धार. ७ लवकर. वस्त्रहरण प्रसंगीं. ८ रति जी नायिका तिचा पति मदन, काम. ९ उन्मन होण्याचा. १० अल्पही विषयकामना. ११ ब्रह्माचें अनुसंधान. १२ वाद. १३ एकपत्नी एकवचनी सदाचाराचा आदर्श अशा रामाचा. १४ पूर्ण विचारपूर्वक. १५ पाहिल्याविना.

हरीभक्त वीरक्त विज्ञानराशी[1]। जेणें मानसीं स्थापिल निश्चयाशीं[2]।
तया दर्शनें स्पर्शनें पुण्य जोडे। तया भाषणें नष्ट संदेह मोडे ॥ १३३ ॥
नसे गर्व आंगीं सदा वीतरागी। क्षमाशांति भोगी दयादक्ष[3] योगी।
नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा। इहीं[4] लक्षणीं जाणिजे योगिराणा १३४
धरीं रे मना संगती सज्जनाची। जेणें वृत्ति हे पालटे दुर्जनाची।
बळें भाव सद्बुद्धि सन्मार्ग लागे। महा क्रूर तो काळ विक्राळ भंगे १३५
भयें व्यापिलें सर्व ब्रह्मांड आहे। भयातीत तें संत आनंत पाहें।
जया पाहतां द्वैत कांहीं दिसेना। भय मानसीं सर्वथा ही असेना १३६
जिवा श्रेष्ठ ते स्पष्ट सांगोनि गेले। परी जीव अज्ञान तैसेचि ठेले।
देहेबुद्धिचें कर्म खोटें टळेना। जुनें ठेवणें[6] मीपणें[7] आकळेना ॥ १३७ ॥
भ्रमें नाडळे वित्त तें गुप्त[8] जालें। जिवा जन्मदारिद्र[9] ठाकूनि आलें।
देहेबुद्धिचा निश्चयो ज्या टळेना। जुनें ठेवणें मीपणें आकळेना ॥१३८॥
पुढें पाहतां सर्व ही कोंदलेंसे[10]। अभाग्यास हें दृश्य पाषांण[11] भासे।
अभावें कदा पुण्य गांठीं पडेना। जुनें ठेवणें मीपणें आकळेना ॥ १३९ ॥
जयाचे तया[12] चूकलें प्राप्त नाहीं[13]। गुणें[14] गोविलें जाहलें दुःख देहीं।
गुणावेगळी वृत्ति[15] तेही वळेना। जुनें ठेवणें मीपणें आकळेना ॥ १४० ॥
ह्मणे दास सायास त्यांचे[16] करावे। जनीं जाणता पाय त्याचे धरावे।
गुरुअंजनेवीण[17] तें आकळेना। जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ॥ १४१ ॥
कळेना कळेना कळेना ढळेना। ढळे नाढळे संशयो ही ढळेना।
गळेना गळेना अहंता गळेना। बळें आकळेना मिळेना मिळेना[18] ॥१४२॥
अविद्यागुणें मानवा ऊमजेना। भ्रमें चूकलें हीत तें आकळेना।
परीक्षेविणें बांधलें दृढ नाणें। परी सत्य मिथ्या असें कोण जाणे[19] ॥१४३॥
जगीं पाहतां साच तें काय आहे। अतीआदरें सत्य शोधूनि पाहें।
पुढें पाहतां पाहतां देव जोडे। भ्रमें भ्रांति अज्ञान हें सर्व मोडे ॥१४४॥

---

१ स्वानुभवी. २ आत्मनिश्चयी. ३ भूतदयेच्या कामीं तत्पर. ४ अशा. ५ निर्भय द्वैतरहित असें निर्गुणपद. ६ निजस्वरूप. ७ अहंभावामुळें. ८ आत्माख्य धन जवळ असून दिसत नाहीं, हरपलेंसें वाटतें. ९ जन्ममृत्युवान् मी आहे ही खोटी बुद्धि, हे करंटपण. १० हें धन गुप्त नसून सर्वत्र कोंदाटलें आहे. ११ राम न दिसतां करंट्याला पाषाणच दिसतो ! १२ देव जवळी अंतरीं आहे. १३ भ्रमामुळें आकळत नाहीं. १४ त्रिगुणांत ह्या सांपडल्यामुळें. १५ गुणातीतता. १६ ज्ञानी भक्ताची, सद्गुरूची सेवा करावी. १७ गुरूनें डोळ्यांत ज्ञानांजन घातल्याशिवाय. १८ गुरूनें अंजन घातल्याशिवाय ब्रह्म आकळायचें नाहीं, अहंकार गळायचा नाहीं, निःसंदेहता व्हायची नाहीं. १९ अज्ञानामुळें नाणें पदरीं बांधलें पण खऱ्या खोट्याची परीक्षा जाणणारा ज्ञाता भेटला पाहिजे.

सदा वीषयो चिंतितां जीव जाला । अहंभाव अज्ञान जन्मासि आला ।
विवेकें सदा स्वस्वरूपीं भरावें । जिवा ऊगमीं[1] जन्म नाहीं स्वभावें १४५
दिसे लोचनीं तें नसे कल्पकोडी[2] । अकस्मात आकारलें काळ मोडी ।
पुढें सर्व जाईल कांहीं न राहे । मना संत आनंत शोधूनि पाहें ॥ १४६ ॥
फुटेना तुटेना चळेना ढळेना । सदा संचलें[3] मीपणें तें कळेना ।
तया येकरूपासि[4] दुजें न साहे । मना संत आनंत शोधूनि पाहे ॥ १४७ ॥
निराकार आधार ब्रह्मादिकांचा । जया सांगतां सीणली वेदवाचा ।
विवेकें तदाकार होऊनि राहें । मना संत आनंत शोधूनि पाहें ॥ १४८ ॥
जगीं पाहतां चर्मचक्षीं[5] न रक्षे । जगीं पाहतां ज्ञानचक्षीं नरक्षे[6] ।
जगीं पाहतां पाहणें[7] जात आहे । मना संत आनंत शोधूनि पाहे ॥१४९॥
नसे पीत[8] ना श्वेत ना श्याम कांहीं । नसे व्यक्त[9] अव्यक्त[10] ना नीळ[11] नाहीं ।
ह्मणे दास विश्वासतां मुक्ति लाहे । मना संत आनंत शोधूनि पाहे १५०
खरें शोधितां शोधितां शोधताहे[12] । मना बोधितां बोधितां बोधताहे ।
परी सर्व ही सज्जनाचेनि योगें । बरा निश्चयो पाविजे सानुरागें[13] ॥१५१॥
बहूतांपरी कूसरी[14] तत्त्वझाडा[15] । परी अंतरीं पाहिजे तो निवाडा ।
मना सार साचार तें वेगळें रे । समस्तांमधें येक तें आगळें रे ॥ १५२ ॥
नव्हे पिंडज्ञानें[16] नव्हे तत्त्वज्ञानें । समाधान कांहीं नव्हे तानमानें[17] ।
नव्हे योगयागें नव्हे भोगत्यागें । समाधान तें सज्जनाचेनि योगें ॥१५३॥
महावाक्य[18] तत्त्वादिकें पंचिकर्णें[19] । खुणें[20] पाविजे संतसंगें विवर्णें ।
द्वितीयेसि संकेत[21] जो दाविजेतो । तया सांडूनी चंद्रमा भाविजेतो १५४
दिसेना जनीं[22] तेंचि शोधूनि पाहें । बरें पाहतां गूंज[23] तेथेंचि आहे ।
करीं घेउं जातां कदा आडळेना । जनीं सर्व कोंदाटलें तें कळेना ॥१५५॥

१ मूल ब्रह्मस्वरूप. २ कोटिकल्प टिकणारें. ३ कोंदाटलें. ४ त्या एकमेवाद्वितीय ब्रह्माला दुसरें ( द्वैत ) खपत नाहीं. ५ चर्मचक्षूला दिसत नाहीं. ६ ज्ञानचक्षूच्या टप्यांत आल्याशिवाय राहत नाहीं. ७ पाहणें म्ह. द्रष्टा दृश्यांत विलीन होतो. ८ पीत म्ह. पिंवळें, श्वेत म्ह. पांढरें, श्याम म्ह. काळें अर्थात् रजोगुण, सत्वगुण व तमोगुण अशा त्रिगुणातीत आहे. ९ सगुण. १० निर्गुण. ११ आकाश—त्याहूनही ब्रह्म पर आहे. १२ विचार करितां करितां शोध लागतो, तें, सांपडतें. १३ संतचरणीं प्रेम ठेवल्यानें ब्रह्माचा निश्चय होतो. १४ कलाकौशल्य, चातुर्य. १५ तत्वांचा विचार. १६ शरीरशास्त्र. १७ ललितकला. १८ चार वेदांचीं चार महावाक्यें आहेत. १९ पंचीकरण. २० शाश्वत ब्रह्माच्या खुणेला पावावें. २१ द्वितीयेची चंद्रकला पाहणें असल्यास पानांची किंवा फांदीची खूण धरून पाहण्यास सांगतात, तद्वत् महावाक्यादिकांचा विचार सत्संगांत करून ब्रह्मरूपाच्या खुणेला ज्याचें त्यानेंच पाहायचें असतें. ( जुना दासबोध स० १७ पहा ). २२ सृष्टींत, विश्वांत. २३ जुनें ठेवणें, गुप्तधन, शाश्वत ब्रह्म.

ह्मणे जाणता[1] तो जनीं मूर्ख पाहे । अतर्कासि[2] तर्की असा कोण आहे ।
जनीं मीपणें[3] पाहतां पाहवेना । तया लक्षितां वेगळें राहवेना ॥ १५६ ॥
बहू[4] शास्त्र धुंडाळितां वाड आहे । जया निश्चयो येक तोही न सोहे[5] ।
मती भांडती शास्त्रबोधें विरोधें । गती खुंटती ज्ञानबोधें प्रबोधें ॥१५७॥
श्रुती न्याय मीमांसकें तर्कशास्त्रें । स्मृती वेद वेदांतवाक्यें विचित्रें ।
स्वयें शेष मौनावला स्थीर राहे । मना सर्व जाणीव सांडून पाहे १५८
जेणें मक्षिका[6] भक्षिली जाणिवेची । तया भोजनाची रुची प्राप्त कैंची ।
अहंभाव ज्या मानसीचा विरेना । तया ज्ञान हें अन्न पोटीं जिरेना १५९
नको रे मना वाद हा खेदकारी । नको रे मना भेद नानाविकारी ।
नको रे मना सीकऊं पूढिलांसी । अहंभाव जो राहिला तूजपासीं १६०
अहंतागुणें सर्वही दुःख होतें । मुखें बोलिले ज्ञान तें व्यर्थ जातें ।
सुखी राहतां सर्वही सूख आहे । अहंता तुझी तूंचि शोधूनि पाहे ॥१६१॥
अहंतागुणें नीति सांडि विवेकी । अनीतीबळें श्लाघ्यता सर्व लोकीं ।
परी अंतरीं सर्वही सांक्ष येते । प्रमाणांतरें[10] बुद्धि सांडूनि जाते ॥ १६२ ॥
देहेबुद्धिचा निश्चयो दृढ जाला । देहातीत[11] तें हीत सांडीत गेला ।
देहेबुद्धि ते आत्मबुद्धि करावी । सदा संगती सज्जनाची धरावी ॥१६३॥
मनें कल्पिला वीषयो[12] सोडवावा । मनें देव निर्गूण तो वोळखावा ।
मनें कल्पितां कल्पना ते सरावी । सदा संगती सज्जनाची धरावी १६४
देहादीक प्रपंच हा चिंतियेला । परी अंतरीं लोभ निश्चित ठेला ।
हरीचिंतनें मुक्तिकांता वरावी । सदा संगती सज्जनाची धरावी ॥ १६५ ॥
अहंकार विस्तारला या देहाचा । स्त्रियापुत्रमित्रादिकें मोह त्यांचा ।
बळें भ्रांति हे जन्मचिंता हरावी । सदा संगती सज्जनाची धरावी १६६
वरा निश्चयो[13] शाश्वताचा करावा । ह्मणे दास संदेह तो वीसरावा ।
घडीनें घडी सार्थकाची करावी । सदा संगती सज्जनाची धरावी १६७
करी वृत्ति जो संत[14] तो संत जाणा । दुराशागुणें जो नव्हे दैन्यवाणा ।
उपाधी[15] देहेबुद्धिते वाढवीते । परी सज्जना केवि बाधूं शके ते ॥ १६८ ॥

१ मला कळलें म्हणेल तो मूर्ख. २ अतर्क्य, तेथें तर्क, कल्पना, शब्द पोंचत नाहीं. ३ मी आहे तोंवर तें नाहीं. ४ पुष्कळ. ५ नाना शास्त्रांचीं नाना मतें. ६ जाणतेपणाची माशी पोटांत गेली कीं ज्ञानान्न पचत नाहीं. ७ इतरांस. ८ लोकांत मान्यता. ९ मन खात असतें. १० अन्य शास्त्रादिकांचीं प्रमाणेंही तो मानीत नाहीं. ११ देहापलीकडील आत्महित. १२ द्वैताची कल्पना सोडावी व अद्वैत ब्रह्माची कल्पना करावी व अखेर तीही सोडावी व केवल ब्रह्म व्हावें. १३ आत्मनिश्चय. १४ शाश्वत. १५ संत उपाधींत असले तरी उपाधीचा पगडा त्यांवर बसत नाहीं.

नसे अंत आनंत संता पुसावा[१]। अहंकारविस्तार हा नीरसावा ।
गुणेंवीण[२] निर्गूण तो आठवावा । देहेबुद्धिचा आठवो नाठवावा ॥ १६९ ॥
देहेबुद्धि हे ज्ञानबोधें[३] त्यजावी । विवेकें तये वस्तुची भेटि घ्यावी ।
तदाकार[४] हे वृत्ति नाहीं स्वभावें । ह्मणोनि सदा तेंचि शोधीत जावें १७०
असे सार साचार तें चोरलेंसें । इहीं लोचनीं पाहतां दृश्य भासे ।
निराभास निर्गूण तें आकळेना । अहंतागुणें कल्पितांही कळेना ॥१७१॥
स्फुरे वीषयीं कल्पना ते अविद्या । स्फुरे ब्रह्म रे जाण माया सुविद्या ।
मुळीं कल्पना दोरुपें[५] तेचि जाली । विवेकें तरी स्वस्वरूपीं मिळाली १७२
स्वरूपीं उदेला अहंकारराहो । तेणें सर्व आच्छादिलें व्योम[६] पाहों ।
दिशा पाहतां ते निशा वाढताहे । विवेकें विचारें विवंचूनि पाहें ॥१७३॥
जयाँ[७] चक्षुनें लक्षितां लक्षवेना । भवा भक्षितां रक्षितां रक्षवेना ।
क्षयातीत[८] तो अक्षयी मोक्ष देतो । दयादक्ष तो साक्षिनें पक्ष[९] घेतो ॥१७४॥
विधी[१०] निर्मितां लीहितो सर्व भाळीं । परि लीहितो कोण त्याचे कपाळीं ।
हरू जाळितो लोक संहार काळीं । परी सेवटीं शंकरा कोण जाळी१७५
जगीं द्वादशादित्य[११] हे रुद्र अक्रा । असंख्यात संख्या करी कोण शक्रा ।
जगीं देव धुंडाळितां आढळेना । जनीं मुख्य[१२] तो कोण कैसा कळेना१७६
तुटेना फुटेना कदा देवराणा । चळेना ढळेना कदा दैन्यवाणा ।
कळेना कळेना कदा लोचनासी । वसेना दिसेना जनीं मीपणासी १७७
जया मानला देव तो पूजिताहे । परी देव शोधूनि कोणी न पाहे ।
जगीं पाहतां देव कोट्यानकोटी । जया मानिली भक्ति जे तेचि मोटी१७८
तिन्ही लोक जेथूनि निर्माण जाले । तया देवरायासि कोणी न बोले ।
जगीं थोरला देव तो चोरलासे । गुरूवीण तो सर्वथाही न दीसे ॥१७९॥
गुरु पाहतां पाहतां लक्ष कोटी । बहूसाल[१३] मंत्रावळी शक्ति मोटी ।
मनीं कामना चेटकें धातमाता । जनीं व्यर्थ रे तो नव्हे मुक्तिदाता १८०

---

१ अनंताचें स्वरूप संतांना पुसावें. २ गुणातीत होऊन. ३ आत्मज्ञानाच्या बोधानें. ४ मनाची स्वाभाविक ओढ बाह्य विषयांकडे आहे, आत्म्याकडे नाहीं. ५ कल्पना मूळीं एकच, तिची अशुद्ध कल्पना उर्फ अविद्या व शुद्ध कल्पना उर्फ सुविद्या असे प्रकार कल्पिले आहेत. ६ राहू आकाश व्यापतो तद्वत् अहंवृत्ती आत्मरूपाला आच्छादून देहबुद्धीचा अंधार पाडते. ७ ब्रह्म डोळ्याला दिसत नाहीं पण त्याचा साक्षात्कार झाला कीं तो जननमरणरूप भवाला खाऊन टाकतो. ८ शाश्वत. ९ तोच निर्गुण परमात्मा दयावश होऊन भक्तांच्या कैवारानें सगुण अवतार घेतो. १० ब्रह्मदेव. ११ बारा सूर्य. १२ मुख्य देव, थोरला देव, परमात्मा. १३ मोठाल्या शक्ति व नानाविध मंत्रतंत्र.

नव्हे चेटकू चाळकू द्रव्यभोंदू । नव्हे निंदकू मत्सरु भक्तिमंदू ।
नव्हे उन्मतू व्यसनी संगबाधू । जनीं ज्ञानिया तोचि साधू अगाधु॥१८१॥
नव्हे वाउगी चाहुंटी[1] काम पोटीं । क्रियेवीण वाचाळतां तेचि मोठी ।
मुखें बोलिल्यासारखें चालताहे । मना सद्गुरु तोचि शोधूनि पाहें १८२
जनीं भक्त ज्ञानी विवेकी विरागी । कृपाळू मनस्वी क्षमावंत योगी ।
प्रभू[2] दक्ष व्युत्पन्न चातुर्य जाणे । तयाचेन योगें समाधान बाणे ॥ १८३ ॥
नव्हे[3] तेचि जालें नसे तेचि आलें । कळों लागलें सज्जनाचेंनि बोलें ।
अनिर्वाच्य तें वाच्य वाचे वदावें । मना संत आनंत शोधीत जावें ॥१८४॥
लपावें[4] अतीआदरें रामरूपीं । भयातीत निश्चिंत ये स्वस्वरूपीं ।
कदा तो जनीं पाहतांही दिसेना । सदा ऐक्य तो भिन्नभावें वसेना १८५
सदा सर्वदा राम सन्नीध आहे । मना सज्जना सत्य शोधून पाहे ।
अखंडीत भेटी रघूराजयोगु । मना सांडि रे मीपणाचा वियोगु[5] ॥ १८६ ॥
भुतें पिंड ब्रह्मांड हें ऐक्य[6] आहे । परी सर्वही स्वस्वरूपीं न साहे ।
मना भासलें सव कांहीं पहावें । परी संग सोडूनि सूखी रहावें ॥१८७॥
देहेभान हें ज्ञानशस्त्रें खुडावें । विदेहीपणें भक्तिमार्गेंचि जावें ।
विरक्तीबळें निंद्य सर्वै त्यजावें । परी संग[7] सोडूनि सूखें रहावें ॥ १८८ ॥
मही निर्मिली देव तो वोळखावा । जया पाहतां मोक्ष तत्काळ जीवा ।
तया निर्गुणालागिं गूणीं पहावें । परी संग सोडूनि सूखें रहावें ॥ १८९ ॥
नव्हे कार्यकर्ता नव्हे सृष्टिभर्ता । परेहून पर्ता न लिंपे विवर्ता ।
तया निर्विकल्पासि कल्पीत जावें । परी संग सोडूनि सूखें रहावें॥१९०॥
देहेबुद्धिचा निश्चयो ज्या ढळेना । तया ज्ञान कल्पांतकाळीं कळेना ।
परब्रह्म तें मीपणें आकळेना । मनीं शून्य अज्ञान हें मावळेना ॥ १९१ ॥
मना नाकळे नाढळे रूप ज्याचें । दुजेवीण तें ध्यान सर्वोत्तमाचें ।
तया खूण तें हीण दृष्टांत पाहे । तेथें संग निःसंग दोनी न साहे ॥१९२॥
नव्हे जाणता नेणता[9] देवराणा । न ये वर्णितां वेदशास्त्रा पुराणा ।
नव्हे दृश्य अदृश्य साक्षीं तयाचा । श्रुतीं नेणती नेणती अंत त्याचा १९३

---

१ चावटी. २ समर्थ. ३ शुद्ध स्वरूपीं ब्रह्म नव्हतेंच, पण तें जालें असे लोक मानतात. याचें वर्म सत्संगांतच कळतें. ४ रामरूपीं भय व चिंता नाहीं तेथें गुप्त व्हावें, देह विसरून देहातीत व्हावें. ५ मीपणामुळें रामाचा वियोग ( तुटी ) जाला असें वाटतें पण वस्तुतः त्याची अखंड भेट आहेच. ६ पिंड ब्रह्मांड पांचभौतिक असल्यामुळें त्यांत ऐक्य आहे, स्वरूप त्याहून वेगळें आहे. ७ आत्मा निःसंग आहे म्हणून स्वयें निःसंग होऊन त्याचें म्ह. आपलेंच सुख भोगावें. ८ तो निर्गुण समुण होतो हें पहावें, पण सगुणनिर्गुण या उभय कल्पनातीत आपण निर्विकल्प आहोंत हें अनुभवावें. ९ सत्वगुण जाणता सृष्टिभर्ता किंवा नेणता तमोगुण रुद्र किंवा अर्धनेणता रजब्रह्मा याहून तो पर आहे.

वसे हृदई देव तो कोण कैसा । पुसे आदरें साधकू प्रश्न ऐसा ।
देहे टाकितां देव कोठें रहातो । परी मागुता ठाव कोठें पहातो ॥ १९४ ॥
वसे हृदई देव तो जाण ऐसा । नभांचेपरी[1] व्यापकू जाण तैसा ।
सदा संचला येत ना जात कांहीं । तयावीण कोठें रिता ठाव नाहीं १९५
नभीं वावरे जो अणूरेणु कांहीं । रिता ठाव या राघवेवीण नाहीं ।
तया पाहतां पाहतां तेंचि जालें । तेथें लक्ष आलक्ष सर्वे बुडालें ॥१९६॥
नभासारिखें रूप या राघवाचें । मनीं चिंतितां मूळ तूटे भवाचें ।
तया पाहतां देहबुद्धि उरेना । सदा सर्वदा आर्त पोटीं पुरेना ॥ १९७ ॥
नभें व्यापिलें सर्व सृष्टीस आहे । रघूनायका उपमा ते न[2] साहे ।
दुजेवीण जो तोचि तो हा स्वभावें । तया व्यापकू व्यर्थ कैसें म्हणावें१९८
अतीजीर्ण[3] विस्तीर्ण तें रूप आहे । तेथें तर्कसंपर्क[4] तोही न साहे ।
अती गूढ तें दृढ तत्काळ सोपें । दुजेंवीण जें खूण स्वामिप्रतापें[5] ॥ १९९ ॥
कळे आकळे रूप तें ज्ञान होतां । तेथें आटली सर्वसाक्षी[6] अवस्था ।
मना उन्मनी शब्द कुंठीत राहे । तो गे तोचि तो राम सर्वत्र पाहे २००
कदा ओळखीमाजि दूजें दिसेना । मनीं मानसीं द्वैत कांहीं वसेना ।
बहूतां दिसां आपुली भेटि जाली । विदेहीपणें सर्व काया निवाली२०१
मना गूज रे तूज हें प्राप्त जालें । परी अंतरीं पाहिजे यत्न केले ।
सदा श्रवणें पाविजे निश्चयासी । धरी सज्जनासंगती धन्य होसी २०२
मना सर्वहीं संग सोडूनि द्यावा । अती आदरें सज्जनाचा धरावा ।
जयाचेनि संगें महादुःख भंगे । जगीं साधनेवीण सन्मार्ग लागे ॥ २०३ ॥
मना संग हा[9] सर्वसंगास तोडी । मना संग हा मोक्ष तत्काळ जोडी ।
मना संग हा साधकां शीघ्र सोडी । मना संग हा द्वैत निःशेष मोडी२०४
मनाचीं शतें ऐकतां[11] दोष जाती । मतीमंद ते साधना योग्य होती ।
चढे ज्ञानवैराग्यसामर्थ्य अंगीं । ह्मणे दास विश्वासतां मुक्ति भोगी २०५

---

१ आकाशासारखा व्यापक. २ नभ सृष्टीस व्यापतें, तेथें व्यापक व्याप्य हा भेद आहे. रामराय व्याप्य व्यापक भेदरहित एकीएक आहेत, त्या एक जिनसी ब्रह्माला दृष्टांतच नाहीं. ३ पुरातन व विशाल. ४ तर्काचा वाराही तेथें लागत नाहीं. ५ गुरुकृपेनें तें एकच आहे, दुजें कांहीं नाही हें प्रत्ययास येतें. ६ साक्षित्वाची तूर्यावस्था आटून जाते, वाचा कुंठित होते, मन मनपणाला मुकतें. ७ रामावांचून कसलीच प्रतीति येत नाहीं. ८ वेगळीक नव्हतीच पण मीपणा मावळल्यामुळें भेट झाली, ऐक्य झालें. ९ सत्संग. १० सोडवितो. ११ ग्रंथाची ही फलश्रुति आहे.

# (१३) रामायण

## १ सुंदरकांड

॥ श्रीराम ॥

नमूं सर्वकर्ताचि तो विश्वभर्ता । गुणी शोकहर्ताचि हर्ता विवर्ता[1] ।
परेहूनि पर्ताचि पर्ताचि पर्ता[2] । भुतेंभूतधर्ताचि[3] धर्ता उधर्ता ॥ १ ॥
महीमंडळीचे कपी रीस[4] राजे । तया मध्यभागीं महावीर साजे ।
महारुद्र आज्ञेप्रमाणें निघाला । सिताशुद्धि आणावया सिद्ध जाला ॥ २ ॥
सर्व मंडळ्या चालिल्या वानरांच्या । नभमंडळामाजि फौजा विरांच्या[5] ।
गिरीकंदरें देश नानापरीचे । तडागें नद्या ओघ जाती गिरीचे ॥ ३ ॥
पुरें पट्टणें अट्टणें धुंडिताती । कपीवीर दाही दिशा हिंडताती ।
सिता शोधितां शुद्धि कोठें न लागे । बळें धुंडितां तो विरेंवीरं भागे ॥४॥
वनें भूवनें रम्य नानापरीचीं । बरीं शोधिलीं तीं गिरी कंदरीचीं ।
दरें[6] शृंग पाठार मैदान दारी । कपाटें गव्या विवरें तीं भुयेरीं ॥ ५ ॥
कपी शोधितां शोधितां सुस्त जाले । नव्हे कार्य ते दैन्यवाणे मिळाले ।
समुद्रातिरीं ते उदासीन जाती । गळाल्या तनू थोर उद्वेग चित्तीं ॥ ६ ॥
कपी बोलती काय आतां करावें । न लागे सिताशुद्धि तेव्हां मरावें ।
ह्मणे मारुती वीर हो स्थीर बैसा । तिन्ही लोक पाहोनि येतों तमासा॥७॥
भयासूर तो भीम सिंधू उडाला । त्रिकूटाचळाहूनि पैलाड गेला ।
पुढें सर्वही पाणजंजाळ पाहे । हनुमंत विस्मीत होऊनि राहे ॥ ८ ॥
समुद्रामधें भेटला तो अतीतु । ह्मणे रे अरे रे अरे कोण रे तूं ।
नमस्कार घाली हनूमंत त्याला । मनामाजि तो थोर संतुष्ट जाला ॥ ९ ॥
मुनी तो त्रिकुटाचळीं शुद्धि सांगे । किराणें[9] उडाला कपीवीर मागें ।
अकल्पीत लंकापुरी कांचनाची । पुढें देखिली सौख्यदाती मनाची॥१०॥

---

१ विवर्त ह्म० भ्रम तो दूर करणारा. २ परावाणीच्या फार फार पलीकडचा. ३ भूतमात्र ४ अस्वल, जांबवंतादि. ५ सर्व वीर. ६ दऱ्या, शिखरें, पर्वताच्या माथ्यावरील सपाट जागा, मैदानें, खिंडारें, गुहा, विवरें, गायरानें भुयारें सर्व धुंडलें. ७ थंड. ८ अथांग पाणीच पाणी. ९ उड्डान करून.

गुढ्या गोपुरें देउळें तें अपारें । [१]बुडे कोट जाळांधरें थोरथोरें ।
सुवर्णाचळामाजि तें तेज फांके । तया पाहतां कीरणें दृष्टि झांके ॥ ११ ॥
कपाटें लोहोआर्गळा पंथ मोठे । बळी बैसले थोर आश्चर्य वाटे ।
बहूसाल वाद्यें दडाडां धडाडां । खुसी[२]हाल आगाज होती भडाडा ॥१२॥
पुढें पाहतां जावया रीग नाहीं । न सूचे मनीं मानसीं येत्न कांहीं ।
पुढें भीम तो अंतराळें उडाला । लघूरूप होऊनि लंकेंत गेला ॥ १३ ॥
गृहागोपुरांचा बहू दाट [३]खेटा । सदा सर्वदा वाहती सर्व वाटा ।
[४]विदीं हाट बाजार कुचे दुकानें । महामस्त ते हस्त जाती गुमानें ॥ १४ ॥
सिलेभा[५]र संजू[६]द ते राउतांचे । बरे फेर संगीत[७] होती विरांचे ।
दिसेना तयांलागिं झुंझार कोण्ही । बळें जिंकिले पीडिले लोक तीन्ही ।
बहू सज्ज तें राज्यं लंकापुरीचें । पुरीमाजि तें सैन्य मोठ्या बळाचें ।
उफाळेंचि जाती भुजा फुर्फुरीती । तया देखतां देव ते थर्थरीती ॥ १६ ॥
त्रिकूटाचळीं मारुती सर्व पाहे । लघूरूप होऊनि तो हिंडताहे ।
गृहें गोपुरें पाहिल्या धर्मशाळा । अकस्मात त्या देखिल्या बंदिशाळा ॥१७॥
हि[९]णासारिखे देव ते दीन जाले । नसे [१०]शक्ति ना युक्ति पोटीं गळाले ।
भयाभीत ते कांपती दैन्यवाणे । बहू गांजिले दुख तें कोण जाणे ॥ १८ ॥
सुरांकारणें कोप भीमासि आला । मनामाजि आवेश तो थर्थरीला ।
रुपें [११]भंभरीला [१२]तमें गर्गरीला । प्रसंगीं तये मारुती गुप्त जाला ॥ १९ ॥
मनामाजि आंवांकिलें सर्व कांहीं । सिमा सांडिली तूळणा त्यासि नाहीं ।
बहू मातले गर्व मोठ्या बळाचा । तया झोडितों दास मी राघवाचा ॥२०॥
नट नाटकू त्रीकुटामाजि कैसा । महांकांड सुंदर्य जाला [१३]तमासा ।
देहें आपुलें सर्वही गुप्त केलें । प्रसंगीं तये पुछे तें वाढवीलें ॥ २१ ॥
बहू व्यापिली वेढिली सर्व लंका । कितेकां मनीं वाटली थोर शंका ।
गृहांतूनि अंतर्गृहीं पुछ्य घाली । बहू पाडितां फोडितां हाक जाली ॥२२॥
बळें लांगुळें रूधिल्या सर्व वाटा । बहू तुंबला लोक तो दाट खेटा ।
तयांभोंवतें पुछ्य बांधोनि भारे । नभीं पोकळीमाजि नेटें उभारें ॥२३॥
बहू भार ते स्वार मधोंचि खंडी । महां मस्त तें हस्त नेटें उलंडी ।
गुरें [१४]शकटें राक्षसांलागि पाडी । पदीं पुछ्य बांधोन ओढी पछ्याडी २४

१ बुरूज. २ उत्तम व्यवस्था आहे, खुशाली आहे असे दाखविणारे तोफांचे आवाज ३ गर्दी, ४ रस्ते, ५ शिलेदारांच्या दरचे अधिकारी. ६ घोड्यांचीं पथकें. ७ व्यवस्थित. ८ लंकेचें हें वर्णन फार बहारीचें आहे. ९ दीनांसारखे. १० शक्ति आणि युक्ति हीं दोनी राज्यसंपादनाचीं साधनें देवांपाशीं नव्हतीं. ११ क्षोभला. १२ रागानें. १३ मारुतीनें लंकेंत असें नटनाट्य केलें कीं त्यामुळें सुंदरकांडासारखें रमणीयकांड उभें राहिलें. १४ गाड्या.

पडों लागले दैत्य नेटें बदादां । कितीयेक ते दीर्घदेही भदादां ।
बळाचीं दळें पाडिलीं पुछ्यमारें । दिसेना परी गर्जतो भूभुकारें ॥ २५ ॥
धरी पंथ कोणासही जाउं देना । पुरीमाजि पाणी कदा येउं देना ।
चुली पेटल्या वन्हि तेथें विदारी । बळी धांवती त्यासि तेथेंचि मारी २६
गळे पाय बांधे किती हात बांधे । पुरीमाजि हाकेसि ते हांक सांदे[1] ।
महां वीर चौताळले तें धरेना । बळें वावरे पुछ्य तें आवरेना ॥ २७ ॥
जना वोढितें पाडितें आपटीतें । समस्तां जणालागिं पाडूनि जातें ।
पशूराक्षसें सर्वही येक केलीं । कितीयेक तें चिर्डचिर्डोंचि मेलीं ॥ २८ ॥
कितीयेक राक्षेस ते हाकलीती । कितीयेक राक्षेस ते बोंबलीती ।
कितीयेक ते थोर जालीं रुदंतीं । कितीयेक राक्षेस ते चर्फडीती ॥ २९ ॥
असंभाव्य तें पुछ्य सांडी उलंडी । कडाफोडि[2] होतांच येतांचि झोडी ।
पुरीमाजि नानापरी घोळ[3] केला । विरेंवीर राक्षेस सर्वै बुडाला ॥ ३० ॥
नसे अन्नपाणी मुखामाजि घाणी । कितीयेक तें जाहली दैन्यवाणी ।
पुरीमाजि सर्वांसही आट केला । पुढें अस्तमानासि तो दीन गेला ॥ ३१ ॥
उदासें घरें मंदिरें थोरथोरें । महां पुछ्य तें वावरे अंधकारें ।
भुजंगापरी सर्व वेंटाळिताहे । विरेंवीर चाकाटला[4] सर्व पाहे ॥ ३२ ॥
मुलां लेंकुरांमाजि तें खेळताहे । निजेल्यामध्यें पुछ्य तें लोळताहे ।
कुमारीकुमारागळां हार घाली । भयाभीत अंतःपुरीं हाक जाली ॥ ३३ ॥
अकस्मात तें काय होतें कळेना । चळेना ढळेना कदा आकळेना ।
सभेमाजि रायापुढें हाक गेली । अहो पाहतां काय लंका बुडाली ॥ ३४ ॥
भयाभीत ते सर्वही लोक जाले । त्रिकूटाचळीं सर्प उदंड आले ।
कळेना बरें सर्प कीं काय आहे । करी तें महां मार त्याचा न साहे ॥ ३५ ॥
उगा लोळसा घोळ मोठा करीतो । करारूनि बांधोनि सर्वां धरीतो ।
बहूतांपरीं सांगती रावणाला । बहूतां जणाचे घरीं कोंड जाला ॥ ३६ ॥
नव्हे जी नव्हे सर्व सामान्य मातु । महां घोर हा थोरला पुछ्यकेतु ।
सभामंडपीं कोप रायासि आला । म्हणे सांगती त्यांस मारूनि घाला ३७
तयां मारितां पुछ्य तेथेंचि आलें । सभामंडपामाजि नेटें निघालें ।
दिवे पाडिले दीवटे आपटीले । अकस्मात हीलाल हीरोनि नेले ॥ ३८ ॥
मुखीं बोलती दीप रे दीप आणा । दिवे आणितां मूकती दैत्य प्राणा ।
कितीयेक त्या दीवट्या दीप थोवे[5] । बळें लागवेगें समूदाव धांवे ॥ ३९ ॥

---

१ सांदणें म्ह. मिळून जाणें. २ तोडफोड. ३ गोंधळ. ४ चमत्कारला. ५ थोव, स्तोम, समुदाय.

पुन्हा मागुते दीप घेऊनि आले । बळें धांवतां पुछ्यमारें विझाले ।
तया लांगुळें रुधिलीं सर्व द्वारें । कपी वीर तो वावरे अंधकारें ॥ ४०
सभामंडपीं गुद्गुल्या तो करीतो । मुखें नासिकें कर्ण छेदूनि नेतो ।
बळें गाल सर्वांग तो वर्बडीतो । चिरे ओडितो फाडितो गुर्गुरीतो ॥४१
बळाचे महावीर तेथें मिळाले । परी अंधकारेंचि कांहीं न चाले ।
बहू लाटिले कूटिले चूर केले । भयाभीत कोण्हास कोण्ही न बोले ॥४२
कपीवीर तो थोर लाहान होतो । धरीतां बळें हात मोडूनि जातो ।
बुक्या मारितो पापरां[1] वज्रथापा[2] । असंभाव्य तो कोपला राव कोपा ४३
ह्मणे वीर हो काय रे काय जालें । कळेना मुखें बोलती काय आलें ।
भयासूर तें गुर्गुरीतें कळेना । करूं काय आह्मांसि हें आकळेना ॥ ४४
कपीवीर रायाकडे सीघ्र गेला । बळें थाप मारूनि मूगूट नेला ।
वरे ठोंसरे मारिले रावणाला । म्हणे मारितां रे तुझ्या आक्षयाला[3] ॥४५
चिरें सुंदरें फाडिलीं रावणाचीं । करी भूषणें चूर मुक्ताफळांचीं ।
कपीनें सभा सर्वही नग्न केली । त्रिकूटाचळीं ख्याति ऊदंड जाली ॥४६
हाहाकार जाला सभेमाजि मोठा । बळें मारुती मारिताहे चपेटां[4] ।
सभामंडपीं वस्त्र घेऊनि गेला । कपीनें पुढें मोकळा मार्ग केला ॥ ४७ ।
लपाला कपी पुछ्य वोढूनि नेलें । लघू मश्यकाचे परी रूप केलें ।
असंभाव्य त्या दीवट्या चंद्रजोती । असंख्यात राक्षेस ते धांवताती ॥४८
सभामंडपामाजि धांवोनि आले । तेणें नागिवे लोक लज्जीत जाले ।
महांवीर मागें पुढें हात देती । कपीनें बहूसाल केली फजीती ॥ ४९ ॥
सभामंडपीं वस्त्र कोठें दिसेना । भुतासारिखे नागिवे लोक नाना ।
चिरें आणिलीं नेसले स्वस्त जाले । मनामाजि लज्जीत कोण्ही न बोले ५०
कपीवीर तेथूनि वेगीं उडाला । अशोकावनामाजि वृक्षीं दडाला ।
अधोमूख तो जानकीलागि पाहे । कपी राममुद्रा पुढें टाकिताहे ॥ ५१
सितेनें पुढें मुद्रिका वोळखीली । बहूतांपरीं शब्द कारुण्य बोली ।
पुढ मारुती भेटला जानकीला । समाचार सांगोनि आनंद केला ॥ ५२
क्षुधाक्रांत मी जाहलों फार माते । तनू चालतां चांचेरी[5] सर्व जाते ।
बहूतांपरीं बोलिला जानकीला । निरोपेंचि आज्ञेप्रमाणें निघाला ॥ ५३
अशोकीं बहू लागले वृक्ष नाना । पहातां असंख्यात संख्या असेना ।
नव्हाटें जुनाटें वनें दाट थाटें । वनें मोडिता जाहला कडकडाटें ॥ ५४

१ वर्त्रे. २ लाथा. ३ आखयाला, रावणपुत्राला, अक्षाला. ४ चापट्या. ५ चांचरणें भुलणें, कलणें, झोंक जाणें: 'जैसें आंधळें चांचरोनि पडे' दा० (५-१-३७).

फळें भक्षिलीं सर्व नानापरीचीं । बहू स्वाद वर्णें कळाकूसरीचीं ।
कपीवीर तो तृप्त जाला निवाला । पुढें वृक्ष मोडावया सिद्ध जाला ॥५५॥
तरू मोडिले पाडिले ऊपडीले । किती झोडिले झाडिले चूर केले ।
गिरीसारिखे ढीग झाडून टाकी । तयाला असंभाव्य राक्षेस हाकी ॥ ५६ ॥
वनें मोडितां मोडितां हाक जाली । असंभाव्य ते दैत्यमांदी[1] मिळाली ।
गलोले कमानां[2] करीं भिंडिमाळा[3] । बळें हांकितां नाद गेला भुगोळा ॥५७॥
बहूतां बळांचे बहू लौंढ[4] आले । कितीयेक ते धिंग[5] मोठे मिळाले ।
वनें वेढिलीं धांविले काळ जैसे । भुतां खेचरां थोर कल्पांत भासे ॥५८॥
कपीवीर चौताळला वेग केला । कितीयेक राक्षेस भंगोनि गेला ।
त्रिकूटाचळीं रावणा जाणवीलें । वनीं वानरें थोर अद्भूत केलें ॥ ५९ ॥
बळें धांविला कूमरू रावणाचा । सदा अक्षै वीर मोठ्या बळाचा[6] ।
असंभाव्य राक्षेस धांवोनि आले । कपीलागि मारावया सिद्ध जाले ॥६०॥
बळें आगळा आक्षया लक्ष[7] भेदी । चुकावी कपीवीर लागोंचि नेदी ।
बहू मारितां भागले भग्न जाले । कितीयेक ते दैत्य पोटीं गळाले ॥ ६१ ॥
पहा हो कपी धीट मोठा पळेना । सदा सर्वदा लक्ष याचें चळेना ।
पुन्हा मागुते दैत्य ते सिद्ध जाले । कितीयेक ते पाश घेऊनि आले ॥ ६२ ॥
मुखें बोलती मर्कटा बैसलेंसी । समरंगणामाजि युद्धा न येसी ।
कपी वीर तो गर्जला भूभुकारें । समरंगणीं चालिला घोर मारें ॥ ६३ ॥
रिपू झोडिले पाडिले वृक्षघातें । भुमीं लोळती दैत्य होऊनि प्रेतें ।
पुढें देखतां जंबुमाळी कुटीला । बळें आखया आपटीला पिटीला ॥६४॥
पळाले फळी फूटली राक्षसांची । पुढें हाक गेली तया आखयाची ।
त्रिकूटाचळीं शोकआरंभ जाला । प्रितीचा महां अक्षया तो निमाला ६५
पुरीमाजि अंतःपुरीं घोष[8] जाले । सुखानंद मंदोनि गेले विझाले ।
बहू दुःख जालेंचि मंदोदरीला । तिनें कूमरालागि आकांत केला ॥६६॥
पुसे रावणू काय रे काय जालें । तुम्हांलागि मारावया कोण आलें ।
कपी येकला बैसला तो पळेना । चळेना ढळेना कदा आकळेना ॥६७॥
तया टाकितां पाश मोठाचि होतो । लघूरूप[9] होऊनि निघोनि जातो ।
कदाही पडेना कदा सांपडेना । तेणें मारिली दैत्य ऊदंड सेना ॥ ६८ ॥

---

१ मांदी म्ह० समूह. २ कमटा, धनुष्य. ३ गोफणगोटे. ४ गलेलठ्ठ. ५ धटिंगण. ६ अधिक बळाचा. ७ लक्ष्य, निशाण. ८ अंतःपुरांत, स्त्रीमंडळांत रडारड झाली. ९ मारुतिरायाला योगबळानें लहानमोठें होतां येत असे. अणिमा, महिमा, गरिमा, इ० महासिद्धींचें वर्णन एकनाथीभागवत अ० १५ पहा.

विधीलागि[1] बोलाविलें रावणानें। कठीणोत्तरीं गांजिलें दुर्जनानें।
म्हणे जायें रे आणि वेगीं कपीला। तया नाणितां शीघ्र ताडीन तूला६९
विरंची पुढें घातला चालवीला। असंभाव्य तो लोक मागें मिळाला।
वनामाजि येतां नमस्कार घाली। तया मारुतीची बहू स्तूति केली ७०
बहूतांपरी कीर्तिचें येश घ्यावें। दयाळा कपी ये घडी शांत व्हावें।
न होतां मला मारिती ब्राह्मणाला। बहूसाल कल्याण व्हावें तुम्हाला ७१
कपीवीर तो थोर कोपें कडाडी। करी गर्जना मेघ जैसा घडाडी॥
परी सांकडीमाजि कांहीं न चाले। मिळाले कपीलागि घेऊनि आले ७२
अरे मर्कटा थोर अन्याय केला। ह्मणे रावणू मारितो सीघ्र तूला।
तुझा मृत्य कोठें खरें सांग आतां। मुढा कश्मळा[2] मारितों जातजातां ७३
ह्मणे मारुती काळ[3] मारूं शकेना। कृपाळूपणें तोषला रामराणा।
न वाटे खरें सांगतां रावणाला। ह्मणे वान्नरूलांगुळीं अन्न घाला॥ ७४॥
ह्मणे रावणू पाहतां काय आतां। चिरें आणवा सांगताहे समस्ता।
असंभाव्य ते वीर धांवोनि गेले। त्रिकूटाचळीं लोक ते नग्न केले॥७५॥
पुढें पुछ्य वोढूनि गुंडाळितातीं। सिमा सांडिली वीर वेंटाळितातीं।
तयां वोढितां तें असंभाग्य लांबे। विरेंवीर त्या लांगुळालागिं झोंबे॥७६॥
कितीयेक तें आणिलीं आज्य[4] तेलें। कितीयेक तें मोगेरेलें फुलेलें[5]।
महां पुछ तें सर्वही भीजवीलें। 'पहा हो कपी बापुडें वेर्थ मेलें?' ॥७७॥
तया लावितां वन्हि तेथें न लागे। बळें फुंकितां तो विरेंवीर भागे।
तया देखतां रावणू सीघ्र आला। बळें फुंकितां फुंकितां तो गळाला॥७८॥
पुढें रावणू थोर कोपें कडाडी। बळें फुंकितां ज्वाळ नेटें भडाडी।
जळालीं मुखें भस्मल्या खांडमीषा[6]। बहूसाल लंबीत होत्या विशेषा ७९
बळें चेतला वन्हि नेटें भडाडी। कडाडीत ज्वाळा दडाडी धडाडी।
कपी वीर तो वाड जाला उडाला। पुढें जाळिता जाहला त्रीकुटाला ८०
गृहांगोपुरांमाजि तो पुछ घाली। त्रिकूटाचळीं। आगि नेटें निघाली।
बिदी हाट बाजार चौबार कुंचे। पळे बोंबली नागिवा लोक नाचे॥८१॥
बहूतांपरींची बहू हांक जाली। पळा रे पळा रे पळा आगि आली।
गुरें वांसुरें सिंगुरें लेंकुरें तें। सुणींमर्जरें[7] तें खरेंयेशरें[8] तें॥ ८२॥
किती सेरडें[9] मेंढरें तें अचाटें। जळालीं किती राक्षसें कल्कलाटें।
किती शकटें कुंजरें दिव्य घोडें। महीमंडळीं त्यांस नाहींत जोडे॥ ८३॥

१ ब्रह्मदेव. २ पापियाला. ३ भक्ताचें मुख्य बळ उपास्य. ४ तूप. ५ मोगऱ्याचें तेल. ६ अत्तरें. ७ लांब खांडमिशा. ८ कुत्रींमांजरें. ९ गाढवें खेचरें वगैरे. १० शिरड्या.

बहूतांपरींचीं बहू रम्य यानें । बहूसाल छत्रें विचित्रें निशाणें ।
बहूतांपरींच्या बहूसाल शाळा । जळाल्या विवीधा विचित्रा विशाळा ८४
पळे लोक तेथें बळें पुछ्य घाली । बहूतां विरांची बहू शांति[1] जाली ।
महां पुछ तें ज्वाळभंबाळ जाला । बहू साक्षपें वन्हि तो चेतवीला ॥ ८५ ॥
पळाले भयासूर ते दुरि थोवे[2] । कपीवीर लांगूळ घेऊनि धांवे ।
बहू धांवताहे बहू भोवताहे । उठे वन्हिचें चक्र लांगूळ पाहे ॥ ८६ ॥
फिरे गर्गराटें कपी चक्र जैसा । विधी शक्र आवेग्र[3] पाहे तमासा ।
विरां खेचरां भूचरां अंत जाला । त्रिकूटाचळा थोर कल्पांत आला ॥८७॥
बहूसाल दारूमधें पुछ्य घाली । उसाळें नभामाजि दारू निघाली ।
तडाडी थडाडी भडाडी धडाडी । शशी सूर्य नक्षत्रमाळा कडाडी ॥८८॥
बहू धूम्र तेणें कदाही दिसेना । बहूसाल वढाणि[4] ते सोसवेना ।
बहू घोष तो शब्द कानीं पडेना । कपी रोषला झाडितां ही झडेना ॥ ८९ ॥
पुढें धूम्रत्यागी धगागीत आगी । महांवन्हि कोपेंचि जाला विभागी ।
त्रिकूटाचळू कांचनाचा तखाखी । सतेजीक तेजें झकाकी लखाखी ॥९०॥
महांवज्र लांगूळ कल्लोळ जाला । परी पाहतां रोम नाहीं जळाला ।
गदादीत[5] काया समुद्रांत घाली । निवाला कपी पुछ्यज्वाळा विझाली॥९१॥
समुद्रीं सुचिष्मंत होऊनि आला । नमस्कार घाली तये जानकीला ।
म्हणे जानकी 'येकला बा! विदेसीं । कपी रे बहूतांपरीं कष्टलासी '॥९२॥
म्हणे मारुती 'धन्य हे दीस आले । तुम्हां देखतां[6] सर्वही कष्ट गेले ।
प्रभू वाट पाहेल तो रामराजा । निरोपेंचि मी सीघ्र जाईन काजा '॥९३॥
सितेमारुती योगवीयोग[7] जाला । बहूसाल नेत्रोदकां पूर आला ।
म्हणे जननी लोभ आतां असावा । सुरांचा बळें राम येतो कुडावा[8] '॥९४॥
कपी मागुती मागुती वास वाहे । उदासीन जातो ग्रिवा दाटताहे[9] ।
विवेकें जिवामाजि तो धीर केला । पुढें मारुती सीघ्र सिंधू उडाला ॥९५॥
कपीलागि सांगे सिताशुद्धि जाली । सुखें ऐकतां मंडळी ते निवाली ।
समस्तां जणालागि आनंद जाला । कपी मारुती रामभेटी निवाला ॥९६॥
दळेंसी बळें राहिला रामराजा । कपीवीर ते रीस वेष्टीत फौजा ।
स्फुरद्रूप ऊभारिला सव्य बाहो । रघुनायकें देखिला भीमदेहो[10] ॥ ९७ ॥
कपी लागवेगें मुखें बोलताहे । अशोकीं जगन्मात कल्याण आहे ।
पुढें मारुती तो नमस्कार घाली । चितोवृत्ती ते राघवाची निवाली ९८

---

१ मेले. २ थवे, समूह ३ अव्यग्र, एकाग्रतेनें ४ दुर्गंधी, घाण. ५ गदादणें तापणें. ६ तुमचें दर्शन झाल्यामुळें. ७ भेटी झाली नंतर तुटी झाली. ८ रक्षणकर्ता. ९ कंठ दाटून आला. १० मारुतीची मूर्ती.

समस्तांसि देखोनि आनंद जाला । सिताशुद्धि[1] घेऊनियां भीम आला ।
बहूतां बहू सांगती येकमकां । सिता शोधिली सौख्य जालें अनेकां ॥९९॥
त्रिकूटाचळीं ख्याति केली भीमानें । पुढें पत्रिका धाडिली ब्रह्मयानें ।
तया वाचितां वाचितां राम हांसे । क्रिडाकौतुकें अंतरामाजि तोषे १००
सभामंडळी राम सन्मूख पाहे । उभा दास साकल्य तो सांगताहे ।
महत्कृत्य व्हावें जनीं येश यावें । प्रभूसी समस्तांसि कल्याण व्हावें १०१

---

## २ युद्धकांड

॥ श्रीराम ॥

नमूं विघ्नहर्ता शुळी[2] सैन्यभर्ता । मुढा धर्तकर्ता[3] विभांडी[4] विवर्ता ।
चतुर्भूज मत्तानंनू[5] शोभताहे । तया चिंतितां भ्रांति कोठें न राहे ॥ १ ॥
सदा भेदहंती महंती महंता[6] । सदा ज्ञानवंती नियंती नियंता[7] ।
सुविद्याकळा स्फूर्तिरूपा अमूपा । नमस्कारिली शारदा मोक्षरूपा ॥ २ ॥
नये बोलतां चालतां रूप कांहीं । नये भावितां दावितां सर्वथा ही ।
सदा संत आनंतरूपीं[8] भरावें । पदीं लागतां सद्गुरूचे तरावे ॥ ३ ॥
नमस्कारिला राम कोदंडपाणी । पुढें गावया रामरामेति वाणी ।
भविष्योत्तरें बोलिलीं जें पुराणीं । उमाकांत ध्यातो सदा शूळपाणी ॥४॥
कथा शंकराची कथा कार्तिकाची । कथा चंडिकेची कथा मोरयाची ।
कथा वेंकटाची कथा विठ्ठलाची । कथा मल्लयाची कथा भैरवाची ॥५॥
कथा नृसिंहाचीवामनाभार्गवाची । कथा कौरवापांडवामाधवाची ।
कथा देव इंद्रादिब्रह्मादिकांची । समस्तांमधें श्रेष्ठ या राघवाची ॥ ६ ॥
जेणें फेडिला पांग[9] ब्रह्मादिकांचा । बळें तोडिला बंद त्या त्रिदशांचा[10] ।
ह्मणोनि कथाथोर या राघवाची । जनीं ऐकतां शांत होते भवाची ॥७॥
कथा थोर रामायणीं सार आहे । दुजी ऊपमा ये कथेला न साहे ।
तिन्ही लोक गाती सदा आवडीनें । भविष्योत्तरें[11] वांटिली शंकरानें ॥८॥

---

१ सीतेचा शोध. २ हातीं शूळ घेणारा. ३ उद्धार करणारा. ४ भ्रम मोडून काढणारा. ५ मत्त गजाप्रमाणें आनन म्हणजे मुख आहे ज्याचें. ६ महंतांत महंत, ७ नियंत्यांत (नियमन करणारांत नियंता हा श्रेष्ठ) (शारदेचें विशेषण). ८ शाश्वत, ब्रह्म. ९ इच्छा पराधीनता. १० देवांचा. ११ वाल्मीकीची भविष्यवाणी.

ऋषीमाजि श्रेष्टू विचारें वरिष्टू । सदा येकनिष्टू सगूणीं प्रविष्टू ।
चरित्रें विचित्रें वनामाजि वस्तां । मुखें बोलिला राम[1] नस्तां समस्तां ॥९॥
कथा राघवाची सदाशीव पाहे । तळीं ऐकतां शेष थकीत राहे ।
कथा श्रेष्ठ हे ऐकतां दोष जाती । जनीं सुकृती ऐकती धन्य होती ॥१०॥
कथा संपली कांड सुंदर्य मागें । प्रवाहो पुढें चालिला लागवेगें ।
स्वयें श्रोतयातें कवी प्रार्थिताहे । पुढें युद्धकांडीं कथा रम्य आहे ॥११॥
ऋषीपर्वतीं[2] रामसोमीत्र होते । अकस्मात आला हनूमंत तेथें ।
ह्मणे जानकी देखिली रामचंद्रा । क्षमारूप[3] लंकेसि आहे नरेंद्रा ॥ १२ ॥
सिता रावणें रक्षिली वाटिकेसी । प्रभू पाहिली म्यां स्वयें निश्चयेसी ।
तया घोर नीशाचरी रक्षणासी । बळें ठेविल्या कर्कशा गर्वरासी ॥१३॥
पुढें राघवें सुग्रिवाचेनि मत्तें । विचारूनियां सर्वही वानरांतें ।
दळेंसी[4] बळें दक्षणे चालि केली । विरांची असंभाव्य सेना मिळाली १४
कपी सुग्रिवें सर्व भूमंडळींचे । बहू आणिले वीर मेरूबळाचे ।
विरापाठिसीं भार कोट्यानुकोटी । रिसां वानरांची असंभाव्य दाटी १५
अती आदरें स्कंदभागीं विरानें । रघूनायका घेतलें मारुतानें ।
सुमीत्रासुतालागि त्या अंगदानें । प्रभू चालिले ते बळी थोर माने ॥ १६ ॥
सिता शोधिली भीमराजें विशाळें । दळें लोटलीं वानरांचीं ढिसाळें[5] ।
गिरीतुल्य झेंपावती वायुवेगें । करपल्लवीं[6] झोलिती शैलयशृंगें[7] ॥ १७ ॥
अपारें क्रुरें वानरें सैरें[8] मेळा । कठोरें करें फोडिती चंडशीळा ।
रिसें कर्कशें भीसें[9] भिंगोळिवाणी[10] । मधें सांवळा राम कोदंडपाणी ॥ १८ ॥
पुढें चालतां भार गोलांगुळांचे[11] । कडे लागले थोर विंध्याचळाचे ।
तया पर्वतामाजि चंडें उदंडें । विशाळें बहू लागलीं झाडखंडें ॥ १९ ॥
कपीभार विंध्याचळामाजि आले । असंभाव्य ते झाडखंडी निघाले ।
वरी वाड झाडें तळीं दाट छाया । कपी सर्वही सिद्ध जाले उडाया २०
तळीं पोटेंळे[12] उंच शाखा फुलांचे । वरी लोंबती घोंस नाना फळांचे ।
बहूतांपरीच्या बहू पक्षयाती । बहू स्वापदें तें फळें भक्षिताती ॥ २१ ॥
तयामाजि ते भार कोट्यानकोटी । रिसां वानरांची असंभाव्य दाटी ।
झडा घालिती येकमेकां पुढारे । खडाडां बळें वृक्षवल्ली विदारे ॥ २२ ॥
कितीयेक ते बैसले वृक्षअग्रीं । वरी वाइली वक्रपुछें समग्रीं ।
कितीयेक मध्येंचि ते गुप्त जाले । कितीयेक ते वृक्षअग्रीं मिळाले ॥२३॥

---

१ राम नसतांना, रामाचा अवतार होण्यापूर्वी. २ सऋष्य मूक पर्वतावर. ३ कुशल. ४ सैन्यासह. ५ मोठी. ६ करकमळीं. ७ शैलशृंगें, पर्वताचीं शिखरें. ८ स्वछंदी. ९ केसाळ. १० भयानक. ११ वानरांचे. १२ पोठळणें=प्रफुल्लित होणें.

स्वइच्छा फळें भक्षिती आदरेंसी । बहू वांटिती येकमेकां त्वरेसी ।
फळें तोडिती टाकिती तें अपारें । वनामाजि ते क्रीडती भूभुकारें ॥२४॥
कितीयेक हेलावती वृक्ष आंगें । कितीयेक ऊफाळती[1] लागवेगें ।
कितीयेक ते झोंबती आंग वेस्तें । कितीयेक ते लोंबती येक हस्तें ॥२५॥
कितीयेक पोटाळिती वाड झाडें । किती मोडती आंगभारें कडाडें ।
बहू मांडिली झाडखंडी धुमाळी[3] । कितीयेक झेंपावती अंतराळीं ॥ २६ ॥
वनें व्यापिलीं वानरें गर्जताती । दिशा लंघिती स्वापदें पक्षयाती ।
भुतें खेचरें थोर धाकें पळालीं । चळीं कांपती दैव्यवाणीं गळालीं ॥२७॥
कपीचीं पुढें चालती दाट थाटें । वनें चालतां सर्व होती सपाटें ।
महां थोर विंध्याचळा लागवेगें । पुढें चालले सर्व सांडूनि मागें ॥ २८ ॥
तयां चालतां चालतां दक्षणेसी । बहूसाल आवेश महां विरांसी ।
पुढें देखिले शृंग मैळाचळाचे । तया मस्तकीं भार गोलांगुळाचे ॥ २९ ॥
गिरीशृंगपाठार पाहोनि वेगीं । बळें चालिले भार ते दक्षणांगीं ।
पुढें चालतां चालतां अस्तमाना । समुद्रातिरीं लोटली भीमसेना ॥३०॥
कपीसैन्य सिंधूतिरामाजि आलें । असंभाव्य देखोनि चक्कीत जालें ।
जळें मातला सिंधु नेटें धडाडी । करी गर्जना मेघ जैसा घडाडी ॥ ३१ ॥
दिसे पाहतां सर्व आकाश जैसें । कळेना सिमा दाटलें तोय तैसें ।
बहू पाणजंजाळ देखोनि डोळा । भयातूर त्यां कंप सूटे चळाळां ॥३२॥
समुद्रातिरीं राहिली चंडसेना । असंभाव्य ते सैन्य भूमी दिसेना ।
गिरी वृक्ष देखोनि येती फुराणें[4] । वरी साधिती अंतराळीं किराणें ॥३३॥
कपीभार ते सर्वही स्वस्त जाले । महांपर्वताचे परी ते मिळाले ।
समुद्रातिरीं राहिलें सैन्य ऐसें । पुढें वर्तलें त्रीकुटामाजि कैसें ॥ ३४ ॥
सिताशुद्धि घेऊनियां रुद्र गेला । तईं आशयातें क्षयो प्राप्त केला ।
बहु मानसीं दुःख मंदोदरीला । तिनें सीघ्र पाचारिलें देवराला[5] ॥ ३५ ॥
ह्मणे देवरालागि बीभीषणा हो । तुह्मी आजि वेगीं सभेमाजि जा हो ।
मदोन्मत्त तो अंकुशें आवरावा । विवेकें बळें राव तैसा वळावा ॥ ३६ ॥
ह्मणे धन्य हो धन्य तूं राजकांते । मनीं माझिये हीत ऐसेंचि होतें ।
वरी अंतरीं मांत[6] घेऊनि पूर्ती । निघाला सभेमाजि तो धर्ममूर्ती ॥ ३७ ॥
तया रावणाच्या गृहामाजि गेला । बहूतांपरी रावणू सीकवीला ।
पुढें दोघही ते सभेमाजि आले । महांवीर राक्षेस सर्वै मिळाले ॥ ३८ ॥

---

१ उडतात. २ उलटें. ३ धुमाकूळ. ४ फुरण, स्फुरण. ५ दिराला, बिभीषणाला. ६ गोष्ट, विचार.

सभे श्रेष्ठ तो रावणू कुंभकर्णु । सभेमाजि बीभीषणू अग्रगण्यु ।
सभे सर्वही पुत्र मंत्री मिळाले । तयालागि तो रावणू काय बोले ॥ ३९॥
तया रावणें सर्व सांडूनि शुद्धि । पुढें प्रेरिता जाहला पापबुद्धि ।
ह्मणे ऐक गा बुधिमंता प्रहस्ता[1] । करीं रे मला वश्य ते रामकांता ॥ ४० ॥
सितेकारणें म्यां बहू कष्ट केले । परी पाहतां सर्वही वेर्थ गेले ।
मनीं चिंतिलें कोड[2] कांहीं पुरेना । उरे शीण तो शोक पोटीं धरेना ४१
सितेसुंदरेलागि संभोग द्यावा । समूळें बळें रामशत्रू वधावा ।
इतूकेनहीं सर्वही कृत्य जालें । सुखें सर्वदा चित्त माझें निवालें ॥ ४२ ॥
अहंकारला रावणू कोटिगूणें । मनीं मानिलें सर्व ब्रह्मांड ऊणें ।
समस्तांमधें आगळा मेघवर्णु । पुढें बोलता जाहला कुंभकर्णु ॥ ४३ ॥
वदे कुंभकर्णू तया रावणाला । मदें सर्वही नीतिधर्म बुडाला ।
अकस्मात लंकापतिबुद्धि नासे । पुढें सर्वही सूख तेणें विनासे ॥ ४४ ॥
जगें निंदिलें तेंचि ठाकूनि येतां । पुढें वेळ नाहीं तया दुःख होतां ।
विषें घोळलें ठेवितां प्रिती तेथें । पुढें सत्वर जाइजे मृत्यपंथें ॥ ४५ ॥
वदे कुंभकर्णू असें काय केलें । सिता आणितां सर्वही राज्य गेलें ।
पुढें भंगलें चित्त जाणोनि जीवें । तयासारिखें बोलिला तो स्वभावें ४६
शुभाशूभ जें मानलें तूजलागी । घडो तेंचि आतां भले ये प्रसंगीं ।
बळें माझिया सर्व सूखें रहावें । पुढें काय होईल तैसें पहावें ॥ ४७ ॥
कपी मानवी सर्व कैसे मिळाले । क्षुधेकारणें माझिये प्राप्त जाले ।
रिपू घालितों ऊदरामाजि सांठा । नरें वानरें ग्रास घेतों गटाटां ॥ ४८ ॥
उदेल्या महां घोर माझेनि कोपें । पुढें देखतां तो चळीं काळ कांपे ।
रिसें मर्कटें बापुडीं दैन्यवाणीं । रिपू आमुचें थोर वाटे शिराणी ॥ ४९ ॥
तया बोलतां रावणा सूख जालें । प्रतीउत्तरें आदरें गौरविलें ।
महांवीर पारश्व[3] ऊदीत[4] वेगीं । पुढें बोलता जाहला ते प्रसंगीं ॥ ५० ॥
अहो कायसा मंत्र पूसा रिपूचा । जनीं कोण लेखा तया मर्कटांचा ।
समर्थापुढें दूसरा कोण कैचा । करूं येकला सर्व संहार त्याचा ॥ ५१ ॥
सितेची बहू प्रार्थना कां करावी । प्रभू सांगतो बुद्धि पोटीं धरावी ।
ह्मणे वीर पारश्व त्या रावणाला । बळत्कार राया करावा सीतेला ॥५२॥
ह्मणे रावणू धन्य गा बुद्धिवंता । तुझें बोलणें मानलें दृढचित्ता ।
परी श्राप आहे मज ब्रह्मयाचा । करीना बळात्कार हे सत्य वाचा ॥५३॥
तया बोलतां दुःख बीभीषणाला । बहूसाल संतापला क्रोध आला ।
ह्मणे रे रघूनाथ पूर्णप्रतापी । दुरात्मे तुम्ही नष्ट चांडाळ पापी ॥ ५४ ॥

---

१ रावणाचा सेनापति. २ आवड, हौस. ३ महापार्श्व. ४ उदित, उत्कंठित.

तुह्मीं राक्षसें निर्बळें बुद्धिहीणें । मती मंदली पातकांचेनि गूणें ।
सुरांकारणें राम आला कळेना । मदें मातला रावणू वोळखेना ॥ ५५
कपी वीर ते दूरि टाकूनि शंका । मिळाले करायासि निर्मूळ लंका
त्रिकूटाचळू दृश्य नाहीं तयाला । तवं जानकी भेटवा राघवाला ॥५
रणीं तीव्र त्या राघवाचेनि बाणीं । तुटों लागती तूमचे पादपाणी ।
धडें मस्तकें मेदमांसें चिडोणी[1] । न होतां सिता भेटवा च्यापपाणी ।
रुपें कर्कशें कोपला वीर गाढा[2] । रणमंडळीं राम वाईल मेढा ।
तया देखतां काळ भीडों शकेना । तुह्मीं मश्यकें[3] राक्षसें सर्व सेना ॥
तया बोलतां ते सभा तप्त जाली । सुतामांत्रियांचे मुखीं तीव्र बोली
असंभाव्य त्या रावणा कोप आला । कुशब्दें बहू त्रास त्या बीभीषणाल
सभेमाजि धीकारिलें रावणानें । उठोनी पदें ताडिलें दुर्जनानें ।
बहूतांमधें येकला धर्ममूर्ती । मनीं खोंचला तो उदासीन चित्तीं ॥ ६
मनू भंगला हो तया धार्मिकाचा । पुढें त्याग तत्काळ केला सभेचा
उडाला नभमंडळामाजि वेगीं । पुरोहीत चत्वार ते पृष्ठभागीं ॥ ६१
झळंबे मनीं लोभ त्या सांडि[4] केली । अकस्मात ते वृत्ति भंगोनि गेल
पुढें वाक्य बोलोनियां रावणातें । उदासीन तो चालिल व्योमपंथें
पुरोहीत चत्वार ते पृष्ठभागें । त्वरें उत्तरे चालिला लागवेगें ।
समुद्रास लंघून पैलाड गेले । नभीं पारिखे सुग्रिवें वोळखीलें ॥ ६३
कपींद्र ह्मणे पैल[5] पाहो विशाळू । नभीं येतुसे कोण हा पंचमेळू[6] ।
अकस्मात खालावला व्योमपंथें । भिडों पाहती वानरें त्या अनर्थें ।
मिळाले कपी बोलती त्यासि वाचा । अकस्मात आलासि तूं कोण कै
ह्मणे बंधु मी होय लंकापतीचा । परी दास अंकीत या राघवाचा ॥
पुरी त्यागिली सर्व येका जिवेंसी । करा हो तुह्मी भेटि या राघवें
ह्मणे सत्य बीभीषणू नाम माझें । नव्हे सर्वथा अन्यथा वाक्य दूजें
कपी सर्वही जुत्पती[7] धर्ममूर्ती । बहूतांपरी ऐकिली वाड कीर्ती ।
समस्तीं तुह्मीं हीत माझें करावें । कृपाळूपणें राघवा भेटवावें ॥ ६९
ह्मणे वीर सुग्रीव नार्वेक[8] बैसा । त्वरें मात हे जाणवीतों सुरेशा ।
कपीराज तो लागवेगें निघाला । अती आदरें भेटला राघवाला ॥
समाचार सांकल्य[9] तो सांगताहे । ह्मणे भेटि नीशाचरू इछिताहे ।
परी अंतरीं कोण कैसा कळेना । तया ठेवितां राजनीती मिळेना॥

---

१ कर्दम, चिखल. २ दांडगा, बळवान्. ३ मशाक, क्षुद्र. ४ त्याग. ५ प
६ पांचजणांचा समुदाय. ७ बलाढ्य. ८ क्षणभर. ९ संपूर्ण.

समस्तांकडे पाहिलें राघवानें । बहुतांपरीं बोलिलें ते सभेनें ।
मनीं पाहतां देखिला दैन्यवाणा । कृपाळूपणें आणवी रामराणा ॥ ७० ॥
उभें राहिलें भाग्य बीभीषणाचें । करीं अंतरीं ध्यान पादांबुजांचें ।
भिजे दिव्य सर्वांग त्या अश्रुबिंदीं । मिठी घातली रामपादारविंदीं ॥७१॥
कृपासागरें ठेविला हस्त माथां । चिरंजीव लंकापती होय आतां ।
मधूरा गिरा राघवें ऊठवीला । पुढें तिष्ठतु हात जोडूनि ठेला ॥ ७२ ॥
बहू स्तूति केली रघूनायकाची । करी आदिनारायणाची विरंची ।
तयाचेपरी शब्दकारुण्य बोले । पुढें पाउले लक्षितां अश्रु आले ॥ ७३ ॥
म्हणे राम बीभीषणा बैस आतां । पूरे स्तूति सांडीं त्यजीं सर्व चिंता ।
सुमित्रासुतालागि[1] संकेत केला । दिजे मंगळस्नान बीभीषणाला ॥ ७४ ॥
त्वरें ऊठिला बंधु त्या राघवाचा । घटू आणिला पूर्ण सिंधोदकाचा ।
पुढें सीघ्र बीभीषणालागिं शेषें[2] । विशेषें दिल्हें सौख्य राज्याभिषेकें ॥७५॥
म्हणे राम बीभीषणा सत्य वाचा । प्रतापें वधू केलियां वैरियांचा ।
तुज दीधलें राज्य लंकापुरीचें । चळेना चिरंजीव जैसें ध्रूवाचें ॥ ७६ ॥
वरू दीधला रामचंद्रें दयाळें । कृपासागरें दासपाळें भुपाळें ।
प्रसंगीं तये थोर आनंद जाला । दिल्हें अक्षई राज्य बीभीषणाला ॥७७॥
कपी सुग्रिवादीक मांदी मिळाली । समस्तीं विरीं आदरें स्तूति केली ।
जगीं धन्य हें भाग्य बीभीषणाचें । प्रितीपात्र जाला रघूनायकाचें ॥७८॥
रघूनायका देखतां सूख जालें । बहू दुःख मागील सर्वें निमालें ।
जगीं धन्य गा धन्य बीभीषणा तूं । तुजलागि प्रसन्न जाला अनंतु ॥ ७९ ॥
समस्तांसि सन्मानिलें आदरेंसीं । नमस्कार केला रघूनायकासी ।
पुढें मंत्रियांमाजि तो बैसवीला । तेणें थोर आनंद बीभीषणाला ॥ ८० ॥
म्हणे राम बीभीषणा बैस अतां[3] । त्रिकूटाचळु सांग साकल्य वार्ता ।
वदे राज्य लंकापुरी सर्व सेना । मनामाजि संतोषला रामराणा ॥ ८१ ॥
पुढें राम बीभीषणा मंत्र पूसे । कपीभार पैलीकडे जाति कैसे ।
विचारूनियां सुग्रिवाचेनि मत्तें । म्हणे हो क्षमा मागिजे मार्ग[4] यातें ॥८२॥
समुद्रासि देऊनियां श्रेष्ठ मानु । करावा अती आदरें सुप्रसन्नु ।
मनीं बोलणें सत्य मानूनि देवें । समुद्रातिरीं बैसिजे शुद्धभावें ॥ ८३ ॥
त्रिकूटाचळींहून तो हेर आला । पुढें सर्व पाहोन शार्दूळ[5] गेला ।
समाचार सांगे तया रावणाला । म्हणे वानरेंसीं बळें राम आला ॥ ८४ ॥

---

१ लक्ष्मणास. २ शेषाचा अवतार लक्ष्मण त्यानें. ३ अलीकडे, जवळ. ४ जाण्याचा मार्ग, समुद्र त्याची. ५ शार्दूलनामक राक्षस हेर.

समाचार हा सत्य हो जी भुपाळा। नव्हे मिथ्य हें देखिलें म्यांचि डोळां।
मिळाले कपी रीस कोट्यानकोटी। समुद्रातिरीं जाहली थोर दाटी ८५
बळें राहिली ते असंभाव्य सेना। विरांची असंख्यात संख्या असेना।
सिळा सीखरें झेलिती द्रूमपाणी[1]। सदा सर्वदा गर्जती घोर वाणी॥८६॥
तयामाजि तो मानवीवेषधारी। रूपें रम्य लावण्य कामावतारी।
असंख्यात मेळा रिसांवानरांचा। कपीश्रेष्ठ सुग्रीव राजा तयाचा॥८७॥
प्रभू सांगतों सिद्ध आतां असावें। पुरीमाजि दुश्चीत कांहीं नसावें।
तया सांगतां थोर उद्वेग जीवा। म्हणे मागुता कोण रे पाठवावा॥८८॥
पुढें शूक[2] बोलाविला आदरेंसीं। म्हणे जाय रे बोल त्या सुग्रिवासी।
म्हणावे कपी तूं सखा आमुचा रे। अनूचीत हें वाउगें कासया रे॥८९॥
बहूतांपरीं शूक तो सीकवीला। अळंकार देऊनियां तोषवीला।
नमस्कार केला तया रावणासी। निघाला बळें हेर तैसा त्वरेसीं॥९०॥
नभमंडळीं शीघ्र उडाण केलें। देहें आपुलें सर्वही पालटीलें।
रूपें सुंदरू जाहला शुद्ध पक्षी। निराळा नभामाजि तो सैन्य लक्षी॥९१॥
म्हणे सुग्रिवां ऐक रे येकभावें। कपी वेर्थ आलासि मागें फिरावें।
त्वरें आपल्या भूवनामाजि जावें। समरंगणीं वाउगें कां मरावें॥ ९२ ॥
त्रिकूटाचळा रामकांतेसि नेलें। कपी सांग पां रे तुझें काय गेलें।
तया मानवां साह्य जालासि कैसा। मनीं नेणतां चालिला मूर्ख जैसा ९३
बळें हीण झुंजासि त्याच्या न जावें। कदा कृपणाचें वऱ्हाडी न व्हावें।
महां मूर्ख रे सख्य त्याचें नसावें। स्वयें हीत तें ज्ञान पोटीं वसावें॥९४॥
त्रिकूटाचळु लभ्य नाहीं सुरेशा। नरां वानरां प्राप्त होईल कैसा।
कपीपुंगवा वेर्थ आलासि वायां। समरंगणीं बाणघातें मराया॥ ९५ ॥
समस्तीं रणामाजि जीवें मरावें। तये मैत्रिकीचें जनीं काय घ्यावें।
बहूतांपरीं हेंचि आतां करावें। तुवां आपुल्या भूवनामाजि जावें॥९६॥
शुकें निंदिलें सर्वही वानरांतें। बहूसाल धिक्कार केला तयांतें।
तिहीं ताडिला पाडिला कुस्त[3] केला। पुढें सोडिला तो नभामाजि गेला ९७
म्हणे शूक ऐका रिसें वानरें हो। तुम्हां रावणें रक्षिलें निर्बळें हो।
अरे मूर्ख हो वेर्थ आलेति येथें। समरंगणीं जावया मृत्यपंथें॥ ९८ ॥
अरे सुग्रिवा वानरा भूललासी। रिसांमर्कटांमाजि तूं मूर्ख होसी।
मुढा वेर्थ आलासि घेऊनि सेना। तुला रावणू कोण कैसा कळेना॥९९॥
पुन्हा बोलतां जाहला घोर वाणी। कपी मागुते क्षोभले द्रूमपाणी।
धरूनी बळें आणिलें पक्षियाला। तिहीं रक्षिलें पाशबंदीं तयाला॥१००॥

१ वृक्ष आहे हातांत ज्यांचा. २ शुक नामक दुसरा राक्षस हेर. ३ चेंदामेंदा केला.

पुढें सीघ्र कोपेल हा रामचंद्रु । म्हणे दास भेटेल भावें समुद्रु ।
प्रतापें बळें तारिती चंड सीळा । बळें सेतु बांधोनि घेती सुवेळा[1] ॥१०१॥

---

## २

॥ श्रीराम ॥

समुद्रातिरीं राम राजीवनेत्रें । भुमी सेज दर्भासनीं तीन रात्रें ।
बहूतांपरीं दीधला श्रेष्ठ मानु । परी सागरू तो नव्हे सुप्रसन्नु ॥ १ ॥
फळें तोय सांडूनियां[2] नित्यनेमें । बहूतांपरीं प्रार्थिला सिंधु रामें ।
परी नायके जो बळें धुंद जाला । रघूनायेका कोप तत्काळ आला ॥ २ ॥
उभा राहिला काळ कृतांत जैसा । बळें सिंधु जाळावया राम तैसा ।
दिसे रूप अद्भूत वज्रांग ठाणें । करीं चाप तें सज्जिलें अग्निबाणें ॥ ३ ॥
बळें वोढितां घोरघोषें करारी । दिशा दाटल्या वन्हि सीतें थरारी ।
भयें बैसला काळपोटीं दरारा । चवों[3] लागल्या त्या असंभाव्य तारा ॥४॥
बहू क्षोभला राम जाळूं निघाला । पुढें सिंधु भेटावया सीघ्र आला ।
म्हणे स्वामियां थोर अन्याय जाला । समुद्रासि हो सीघ्र पाल्हाण[4] घाला ॥
नळाचेनि हस्तें जळीं चंड सीळा । गिरीशृंग तर्तील हो जी भुपाळा ।
वदे निश्चयें आदरें तो समुद्रू । तेणें थोर आनंदला रामचंद्रु ॥ ६ ॥
बहूतांपरीं राम संतोषवीला । पुढें सिंधु तोही जळामाजि गेला ।
नळें वानरांचीं दळें सिद्ध केलीं । गिरीशृंग आणावया सीघ्र गेलीं ॥ ७ ॥
त्वरें उत्तरें चालिले भार सैरा । बळी धांवती येकमेकां पुढारां ।
शिळा शीखरें झाडखंडें प्रचंडें । बळाचे कपी चालवीती उदंडें ॥ ८ ॥
कपी धांवती लक्ष कोट्यानकोटी । बळें गर्जती थोर आनंद पोटीं ।
गिरीकंदरें देश लंघून जाती । शिळा शीखरें शीघ्र घेऊन येती ॥ ९ ॥
निळे पींवळे श्वेत आरक्त काळे । फिके जांभळे गौर जांभे गव्हाळे ।
बहूरंग पाषाण नानापरीचे । उभे वक्र वर्तूळ गाभे गिरीचे ॥ १० ॥
कपीवीर ते सर्व घेऊनि जाती । बळें माधवाचेपरीं[5] वर्षताती ।
सिळीं स्वेतु बांधे नळू लागवेगें । असंभाव्य तें चालिलीं शैल्यशृंगें ॥ ११ ॥
कपी मोडिती वाड झाडें कडाडां । कडे पाडिती पर्वतांचे खडाडां ।
उड्या घोति आकाशपंथें धडाडां । बळें टाकिती सिंधुमधें थडाडां ॥ १२ ॥

---

१ सुवेलाचल. २ फळें व उदक यांचें सेवन न करितां. ३ पडूं—हलूं लागल्या, च्यवल्या. ४ खोगीर, पूल. ५ इंद्रासारखे.

विशाळा जडा वर्तुळा त्या उदंडी । बहू मस्तकीं वाहती चंड धोंडी ।
शिळा शीखरें फोडिती जे अभंगें । नभीं भार झेंपावती लागवेगें ॥ १३ ॥
कपी मारुतीसारिखे जे उडाले । गिरी मंदरासारिखे चालवीले ।
कपी साक्षपी[1] देवरूपी बळाचे । कडे लागले त्या सुवेळाचळाचे ॥ १४ ॥
बळें सेतु बांधावया वेग केला । शत योजनें लांब विस्तीर्ण जाला ।
दश योजनें भव्य रुंदी तयाची । जळीं बांधणी सर्व पांचा दिसांची ॥ १५
कपी सर्व आनंदले कार्य जालें । बळें गर्जती चित्त सूखें निवालें ।
सुवेळाचळा सेतु बांधोनि नेला । नळावानराला जयो प्राप्त जाला॥१६॥
ह्मणे रामराणा तया सुग्रिवातें । दळें चालवा सागराचेनि पंथें ।
निरोपी कपी सीघ्र सेनापतीला । निळें सर्व सेन्यासि संकेत केला १७
दळें सर्वही वानरांचीं निघालीं । पुढें चालतां दाटणी थोर जाली ।
कडेचा पडे तो उडे अंतराळीं । सुवेळाचळू पावले सीघ्र काळीं ॥१८॥
सुवेळाचळाभीतरीं राजभारीं । दळें लोटलीं वानरांचीं अपारें ।
बळें घोरघोषें कपी गर्जताती । दिशाचक्र सिंधू गिरी पाहताती ॥ १९ ॥
त्रिकूटागिरीशीखरीं दिव्य जे कां । रघूनायकें देखिली रम्य लंका ।
दिसे तेजपुंजाळ लावण्यराशी । तया देखतां पारणें लोचनासी ॥ २० ॥
ह्मणे धन्य रे धन्य तो विश्वकर्मा । असंभाव्य या पर्वताचा महीमा ।
सुवर्णाचळासारिखा दिसताहे । सिता सुंदरी या स्थळामाजि राहे २१
पुढें राम बोले रिसांवानरांसीं । असावें तुह्मीं सिद्ध सेनाप्रदेशीं ।
कपीचक्र अव्यग्र ते सिद्ध जाले । निळें वानरें सर्व सन्नीध केलें ॥ २२ ॥
कपीभार ते सर्वही स्वस्थ जालें । पुढें धर्मता उत्तरीं राम बोले ।
ह्मणे सुग्रिवा बापुडें शुक सोडा । तया पाइंचे सर्वही पाश तोडा ॥ २३॥
तया सोडितां अंगदें तो उडाला । मुखीं रामनामें नभीं गुप्त जाला ।
बळें चालिला मुक्तसूखें त्वरेसीं । त्रिकूटाचळीं भेटला रावणासीं ॥२४॥
ह्मणे रावणू गा शूका काय जालें । नवरात्रपरियंत कोठें क्रमीलें ।
वदे शूक हो लंकनाथा वरिष्ठा । मुखें व्यर्थ बोलों नये अप्रतिष्ठा ॥ २५ ॥
तया वानरांच्या दळामाजि गेलों । देहें पालटीलें स्वयें शूक जालों ।
नभमंडळीं राहिलों अंतराळीं । बळें वानरांचीं दळें तें न्यहाळी ॥ २६ ॥
समुद्राचिये उत्तरे भीमसेना । दहा योजनें दाट भूमी दिसेना ।
तिथें मुख्य ते रामसौमित्र बंधु । कपिश्रेष्ठ सुग्रीव राजा अगाधु ॥ २७ ॥
उचिष्ठोत्तरें तूमचीं त्या कपीला । मुखें सर्वही बोलिलों सुग्रिवाला ।
मज सांगतां वीर कोपासि आले । कितीयेक ते पाठिलागें उडाले ॥२८॥

---

१ उद्योगी, तिरलस.

कपीवीर धांवोनियां पाठिलागीं। मज ताडिते जाहले ते प्रसंगीं।
बहु सूख जालें तयां वानरातें। कठोरें करें ताडिलें या देहातें॥ २९॥
बहू कष्ट जाले प्रभू या जिवासी। नको वोखटी वेळ ते वैरियांसी।
रिसांवानरांची असंभाव्य मांदी। पुढें घातलें हो मज पाशबंदीं॥ ३०॥
प्रभू काय सांगों चमत्कार जाला। समुद्रांतुनी सिंधु बाहेरि आला।
रुपें भव्य तो मूर्तिमंतू निघाला। अती आदरें भेटला राघवाला॥ ३१॥
पुढें बोलता जाहला तोयरासी। तेणें शुद्धि सांगीतली राघवासी।
ह्मणे जी बळें सिंधु बांधा दयाळा। नळाचेनि हस्तें जळीं चंडसीळा ३२
कपी प्रेरिले ते रघूनायकानें। सिळा तारिल्या त्या नळावानरानें।
कपीभार ते सर्व ऐलाड आले। सुवेळाचळामस्तकीं ते मिळाले॥ ३३॥
कृपाळूपणें बोलिला रामचंद्र। कपीला ह्मणे शूक सोडा नरेंद्र।
पुढें वानरीं सोडिलें लागवेगीं। समर्था तुला भेटलों ये प्रसंगीं॥ ३४॥
प्रभू सांगतों बुद्धि ऐसी करावी। त्वरें जानकी राघवा भेटवावी।
सिता पाठवीतां बरें लंकनाथा। न होतां असें प्राप्त होईल वेथा॥ ३५॥
शुका सांगतां रावणा कोप आला। ह्मणे कोण लेखा नरां वानरांला।
रणमंडळीं सोडितां बाणवृष्टी। बळें आपुल्या सर्व जाळीन सृष्टी॥ ३६॥
बळें बूझितों भूमि आकाश बाणीं। ह्मणे काय तें लेंकुरें दैन्यवाणीं।
न होतां असंभाव्य त्या बाणवृष्टी। मुखें सांगती थोर संग्राम गोष्टी॥३७॥
अमित्रीं तिहीं येक अद्भुत केलें। समुद्रासि पाल्हाणिलें सैन्य आलें।
नव्हे पाहतां गोष्टि सामान्य कांहीं। परी राक्षसां शुद्धि अद्यापि नाहीं ३८
पुढें हेर बोलाविले आदरेंसीं। सुखासारणातें[1] म्हणे गर्वरासी।
मिळालीं दळें श्रावणारीसुताचीं[2]। तुळारे बळें त्या रिसांवानरांचीं॥३९॥
तयें बोलिल्यानंतरें लंकनाथें। बळें चालिले शीघ्र आकाशपंथें।
सुवेळाचळा देखतां सिद्ध जाले। देहे आपुलें तें तिहीं पालटीलें॥ ४०॥
रुपें जाहले वानरवेषधारी। कळेना कळा बाणलीसे शरीरीं।
दळीं कोटिच्या कोटि संख्या असेना। तिहीं राक्षसीं तूळिली सर्व सेना ४१
सभे बैसले रामसौमित्र जेथें। शुकासारणाला नव्हे रीग तेथें।
पुढें अंतरें दूरि राहोनि वेगीं। बळें तूळिते जाहले ते प्रसंगीं॥ ४२॥
सभे अंतरें लक्ष लाऊनि ठेले। अकस्मात बीभीषणें वोळखीले।
धरीलें करीं त्या शुकासारणातें। म्हणे दूत हे धाडिले लंकनाथें॥ ४३॥

---

१ शुक आणि सारण हे रावणाचे अमात्य. २ श्रावणाला मारणाऱ्या दशरथाच्या मुलाचीं, रामाचीं.

तंव बोलिला राम बीभीषणाला। दळें सर्वही दाखवा शीघ्र याला।
तुळा जा दळें तें शुकाशारणा हो। तुम्ही आपुलें कार्य सिद्धीस न्या हो॥
स्तुतीउत्तरें सारणू शीघ्र बोले। कृपासागरें हेर ते रक्षियेले।
प्रभू देइजे स्नेहआज्ञा दयाळा। तुजलागि कल्याण हो जी भुपाळा॥ ४५॥
निरोपेंचि तत्काळ ते हेर गेले। तया रावणाला नमस्कार केले।
प्रभु मृत्यु आला बळें लागवेगें। परी सूटिका जाहली सर्वभाग्यें॥ ४६॥
दळांमाजि बीभीषणें वोळखीलें। धरूनी बळें ते सभेमाजि नेलें।
उदारें रघूनायकें सोडवीलें। कृपाळूपणें नृपती मुक्त केलें॥ ४७॥
कळेना दळीं कोण संख्या बळाची। असंभाव्य सेना बहू विक्रमाची।
तयाच्या बळा ऊपमा काय द्यावी। समरंगणीं भेटि त्याची न व्हावी!॥
रघूनाथसौमित्रबीभीषणानें। कपी सुग्रिवें अंगदें मारुतानें।
बळें घेउं लंका असा नेम केला। घडीनें घडी कोप येतो तयांला॥ ४९॥
मनीं वाटतें बुद्धि ऐसी करावी। सिता आदरें राघवा भेटवावी।
तया बोलतां कोपला गर्वरासी। म्हणे ताडिलें काय नेणों तुम्हासी॥५०॥
भया सांगतां त्या नरावानरांचे। सदा सर्वदा भक्ष्य जें राक्षसाचें।
मज रावणासारिखा कोण आहे। समरंगणीं काळ भीडों न राहे॥ ५१॥
महां थोर दामोदरीं[1] गर्वराशी। पुढें रावणू वेधला सारणेंशीं।
तया मस्तकीं उंच आकाशपंथीं। पुढें पाहतां दृष्टि फांके दिगंती॥ ५२॥
सुवेळाचळीं दृष्टि घालूनि पाहे। असंभाव्य तें सैन्य पोटीं न साहे।
पुढें रावणू सारणालागि पूसे। कपी सांग रे सर्व आहेति कैसे॥ ५३॥
कपीभार पाहोनियां हेर आले। पुसे रावणू सारणू शीघ्र बोले।
वदे देखिल्यासारिखें सत्य वाचे। पुढें दाखवी भार गोलांगुळांचे॥ ५४॥
म्हणे सारणू ते कपी वीर जेठी[3]। मिळाले असंभाव्य कोट्यानकोटी।
देहे पर्वतासारिखे काळरूपी। रणीं भीडतां शूर संग्रामकोपी॥ ५५॥
म्हणे लंकनाथा कपी पैल पाहे। समस्तांमधें आगळा बैसलाहे।
समरंगणीं वीर नेतो विरामा[4]। महा मुख्य सेनापती नीळनामा॥ ५६॥
दिसे दूसरा त्याचिये दक्षिणांगीं। बळें डुल्लतू वीर लोहीतआंगी[5]।
धरा हाणतां पुच्छघातें थरारी। कपी अंगदू नाम त्याचें सुरारी॥ ५७॥
मिळाले कपी रीस कोट्यानकोटी। पुढें बैसला भार घालूनि पाठीं।
सदा सर्वदा लक्ष ज्याचें त्रिकूटीं। बहूसाळ युद्धा उतावेळ पोटीं॥ ५८॥

---

१ रत्नखचित मंदिरीं. २ वानरांचे. ३ तालीमबाज, वीर. ४ विश्रांतीप्रत, मृत्युप्रत. ५ तांब्रवर्णाचा.

करी चंड उड्डाण आकाशपंथें । महां मेघ वीतूळती अंगवातें ।
समरंगणीं भीडतां अग्रवादु । बळें आगळा नाम याचें कुमोदु ॥ ५९ ॥
देहे सिंधुरासारिखें पैल पाहे । महांवीर विंध्याचळामाजि राहे ।
सुपर्णासि[1] सांडून उड्डाण ज्याचें । कपी थोर हा ऋषभू नाम त्याचें ॥६०॥
दिसे पैल पुच्छासनीं वीर भारें । खचे स्वर्ग तें याचिया भूभुकारें ।
कपी शेर्भ[2] ऐसें तया नाम राया । उतावेळ हा थोर शत्रू जिणाया ॥ ६१ ॥
कपी वीनतू पैल पाहा विशाळु । रणीं धांवतां वीर प्रेतां सुकाळु ।
देहे आचळा[3]सारिखा तांम्रवर्णी । विरांवानरांमाजि अद्भूत कर्णी ॥ ६२ ॥
भ्रुकूटी भयासूर त्या भीस[4] पाहे । भुमीं आंगरोमावळी रूळताहे ।
कपी क्रंदनू नृपती नाम याचें । तयासारिखें देह नाहीं बळाचें ॥ ६३ ॥
प्रमाथी कपी वीर कैसा गडाडी । महामेघ गंभीर जैसा गडाडी ।
रणीं जुंझतां थोर कल्पांत मांडे । तया वानरेंसीं बळें कोण भांडे ॥ ६४ ॥
सुवर्णाचळासारिखा देहे ज्याचा । मुखें विक्रमू बोलवेना बळाचा ।
गवायू कपी वीर तत्काळ कोपे । उडाणें सवीतारथीं[5] अश्व कांपे ॥ ६५ ॥
विशाळू गजू वानरू पैल पाहो । तुळीतो सदा सर्वदा सव्य बाहो ।
त्रिकूटाचळीं लाविली दृष्टि जेणें । बळें सर्व रोमांच येती स्फुराणें ॥ ६६ ॥
विरांमाजि हा धूम्रचंड प्रतापी । महापर्वतासारिखा काळरूपी ।
रिसू कर्कशू घोरघोषू अगाधू । बळी होय हा जांबुवंतासि बंधु ॥ ६७ ॥
कपीचें बहूसाल सामर्थ्य वानी । मुखें बोलतां रावणू वीट मानी ।
म्हणे रावणू सारणा मूर्ख होसी । मज देखतां मर्कटां वर्णितोसी ॥ ६८ ॥
असों दे रिसे मर्कटें ये प्रसंगीं । रिपू दाखवीं राम तो मुख्य वेगीं ।
अभिप्राव जाणोनि लंकापतीचा । वदे सारणू मागुती रम्य वाचा ॥६९॥
म्हणे राम तो पैल कोदंडपाणी । रूपें सांवळा रम्य लावण्यखाणी ।
रतीचा पती तूळितां तुच्छ होये । विराजे रिसांवानरांमाजि पाहे ॥७०॥
पहा राम विश्राम आत्मा जगाचा । बळें काळहर्ता विहर्ता अघांचा ।
तुणीरां[6]बरें कास मांथा लपेटा । झणत्कारती वाजटा चापघंटा ॥ ७१ ॥
महांवीर तो देखतां धाक सूटे । समरंगणीं भीडतां काळ वीटे ।
तयासीं बळें भांडतां पूरवेना । कदाही जयो प्राप्त होतां दिसेना ॥ ७२ ॥
तया दक्षणे दूसरा बैसला हो । महावीर सौमित्र राया पहा हो ।
असंभाव्य सामर्थ्य याचें कळेना । बळें आगळा जिंकितां जिंकवेना ७३

१ गरुडपक्ष्यासारखें. २ शरभ. ३ पर्वतोपम. ४ केसाळ. ५ सूर्याच्या रथाचे घोडे. ६ बाण व त्यांचा भाता.

कपी राघवावामभागींच आहे । त्रिकूटाचळू दृष्टिनें वक्र पाहे ।
कपीनाथ सुग्रीव तो वोळखावा । कळेना असंभाव्य याचा उठावा ॥७४॥
कपी आणिले सर्व भूमंडळीचे । असंख्यात संख्या नसे भार त्याचे ।
वनीं मैत्रिकी जोडिली राघवेंसीं । रघूनायका साह्य जाला जिवेंसीं ॥७५
सिता शोधिली मारिलें कूमरासी । वनें मोडिलीं जाळिलें त्रीकुटासी ।
बळें आगळा नृपती पैल पाहे । समस्तांमधें मारुती शोभताहे ॥ ७६ ॥
महाभीस[1] भिंगूळ[2] काळा कराळु[3] । विशाळें नखें फोडितो ब्रह्मगोळु ।
रिसां कर्कशांमाजि हा काळकेतु । बळें आगळा पैल जांबुवंतु ॥ ७७ ॥
उतावेळ मारावया दैत्य पाहे । महावीर बीभीषणू शोभताहे ।
तया सांगतां रावणा दुःख जालें । असंभाव्य कोपानळें तप्त केलें ॥ ७८ ॥
करीं खड्ग घेऊनियां सारणाला । प्रसंगीं तये सीघ्र मारूं निघाला ।
म्हणे सारणू जी पिडा कां करीतां । मुखें बोलिलों सर्वही सत्य वार्ता ७९
तुळाया दळें पाठवीलें भुपाळें । रिपूचीं दळें पाहिलीं तीं विशाळें ।
तयासारिखें बोलिलों सत्यभावें । समर्थापुढें मिथ्य कैसें वदावें ॥ ८० ॥
प्रभू आमुचा कोण अन्याय जाला । खरें सांगतां कोप येतो तुम्हाला ।
नसे पाहतां अल्प अन्याय कांहीं । नसे मिथ्य आम्ही नव्हों स्वामिद्रोही
पुढें रावणू कोप सांडूनि ठेला । पुसे आदरें मंत्र मोहोदराला ।
सुवेळाचळा कोण रे पाठवावा । रिपूचा विवेकें बरा शोध घ्यावा ॥ ८२ ॥
वदे वीर मोहोदरु रावणातें । सुवेळाचळा पाठवा शार्दुळातें ।
महाधूर्त तो जाणतो सर्व मत्तें । बळें सीघ्र तूळील रीपूदळातें ॥ ८३ ॥
पुढें दैत्य बोलाविला आदरेंसीं । म्हणे सैन्य पाहोनि यावें त्वरेसी ।
अळंकार देऊनियां तोषवीला । बळें हेर तो सीघ्र जाऊनि आला ॥८४॥
नमस्कारिला राव तो आदरेंसीं । म्हणे रावणू म्लान कां दीसतोसी ।
अधोमूख राहोन शार्दूळ बोले । म्हणे हो कपी काळ जैसे उदेले ॥ ८५ ॥
बहू दाटलीसे असंभाव्य सेना । नसे रीग तेथें कदा जाववेना ।
परी मी तयामाजि तैसाचि गेलों । बहू ताडिलों पाडिलों कुस्त केलों ८६
निरोपें तुझ्या शीघ्र गेलों सुरारी । रूपें जाहलों वानरवेषधारी ।
मज हिंडतां हिंडतां थोर मानें । पुढें लक्षिलें धूर्त बीभीषणानें ॥ ८७ ॥
कपी धांविले दूत त्या सुग्रिवाचे । पुरोहीत चत्वार बीभीषणाचे ।
धरूनी मज चालवीलें त्वरेसीं । पुढें चालतां देखिलें राघवासी ॥ ८८ ॥
म्हणे धन्य तो रामराजा दयाळु । मज देखतां शीघ्र सोडी भुपाळु ।
मनीं माझिये वाटतें निश्चयेसीं । रघूनायका भेटवावें सितेसी ॥ ८९ ॥

१ अत्यंत केसाळ. २ भयानक. ३ उग्र.

समाचार तो सर्वही श्रूत केला । तया सांगतां रावणा कोप आला ।
पुढें राक्षसें शीर केलें रिपूचें । वनीं चालिला सत्व घ्याया सितेचें ॥९०॥
अशोकीं वसे जानकी भूमिबाळा । वदे रामनामावळी सत्वशीळा ।
पहा रावणें शीर माईक केलें । छळाया सितेकारणें शीघ्र नेलें ॥ ९१ ॥
म्हणे रावणू व्यर्थ त्वां धीर केला । रणीं वीर भर्तार तूझा निमाला ।
कपीराक्षसांतें महा मारु[1] जाला । प्रहस्तू जयो शीघ्र घेऊनि आला ॥९२॥
रिपू सांगतां ते भयातूर जाली । भयें जानकी शोकसिंधू बुडाली ।
शिरा देखतां मूर्छना शीघ्र आली । देहे सांवरेना भुमीं आंग घाली ॥९३
भविष्योत्तरें सर्वही वाल्मिकाचीं । म्हणे कायसा बोलिला तो विरंची ।
पहा आजि तें सर्वही मिथ्य जालें । कृतांतापुढें मश्यका यश आलें ॥९४
बहू शोक होतां देहेभाव सांडी । म्हणे रावणू सत्व सीता न संडी ।
महाप्रेत्न सायास म्यां व्यर्थ केला । पुढें शीघ्र लंकापुरीमाजि गेला ॥९५
दळें सिद्ध केलीं बळें लंकनाथें । प्रतीमल्ल राक्षस चत्वार पंथें ।
महावीर ते सर्वही शस्त्रपाणी । बुझूं पाहती भूमिआकाश बाणीं ॥ ९६ ॥
कपीचक्र तेही बळें सिद्ध जालें । निळें वानरेंसी प्रतीमल्ल केलें ।
महावीर ते गर्जती मेघ जैसे । भुतांखेचरां थोर कल्पांत भासे ॥ ९७ ॥
सुवेळाचळा राम पाहे स्वभावें । तया मस्तकीं शृंग तो दोनि गावें ।
नभीं लागले उंच आकाशपंथें । म्हणे राम गा सुग्रिवा जाउं तेथें ॥९८॥
म्हणे वीर सुग्रीव आज्ञा प्रभूची । असंभाव्य सेना रिसांवानरांची ।
महावीर तत्काळ सर्वै मिळाले । बळें शृंग वेंघावया सिद्ध जाले ॥९९॥
कथेलागि श्रोतीं पुढें चित्त द्यावें । म्हणे दास अर्थांतरीं वीवरावें ।
स्वहीता कथामृत घ्यावें फुकाचें । सदा सेवितां दुःख दारिद्र्य कैचें १००

---

## ३

॥ श्रीराम ॥

पुढें चालिला शीघ्र तो रामराजा । कपी धांवती वीर वेष्टीत फौजा ।
करीं हात घेऊनि बीभीषणाचा । बळें वेघले शृंग त्या पर्वताचा ॥ १ ॥
कितीयेक ते राहिले भार मागें । बळें वेंघती शृंग तो लागवेगें ।
पुढें शीघ्र आटोपिलें जातजातां । मिळाले कपी रामसौमित्र माथां ॥२॥
सुवेळागिरीशीखरीं राम पाहे । अतीसाजिरा त्रीकुट्ट शोभताहे ।
उभा रावणू गोपुरीं थोर ताठा । तेथें पावला सुग्रिवाचा चपेटा ॥ ३ ॥

---

[1] मोठा मार, हत्या.

कव घातली पेटला सीघ्र कोपा । बळें रावणू ताडिला चंड थापा ।
बळें झोडिलीं पाडिलीं दिव्य छत्रें। म्हणे जानकी आणिली या कुपात्रें ॥४
पुढें देखतां रावणा कोप आला । पदा झाडिलें ताडिलें सुग्रिवाला ।
मदें मातले दूरि टाकूनि शंका । कळा लाविती नीकुरें[1] येकमेकां ॥ ५ ॥
बहू कोपले मल्लयुद्धासि आले । रिपू भीडतां आंग आंगीं मिळाले ।
बळें हाणती पुष्टिसी वज्रमुष्टी । दणाणीतसे त्रीकुटीं सर्व सृष्टी ॥ ६ ॥
वीरश्रीबळें वीर झोंबीस आले । झडां[2] चांचरें[3] भूतळामाजि गेले ।
पुढें रावणें देह संकोचवीलें । अनर्थासि भीवोन गंतव्य केलं ॥ ७ ॥
कपीनाथ तो यश घेऊनि आला । रिपूगर्व तो सर्वही भग्न केला ।
नमस्कारिलें राघवा ते प्रसंगीं । कपीभार त्या थोर आनंद संगीं ॥ ८ ॥
कपींसीं[4] सुवेळाचळा राम आला । असंभाव्य तो वीरमेळा मिळाला ।
दळें भूतळें दाटले भार सैरा । पुढें आणिलें राजनीती विचारा ॥ ९ ॥
कपी शोधितां शोधितां लक्ष कोटी । तयामाजि हा अंगदू वीरजेठी ।
बळें आगळा दक्ष चातुर्य जाणे । वयें अल्प लावण्य तारुण्य बाणे ॥१०॥
स्तुतीउत्तरीं राम बोले तयासी । म्हणे धन्य गा अंगदा गूणरासी ।
मिळालासि तूं आमुच्या स्नेहवादा । विवेकें तुवां सांडिलें पितृद्वंद्वा[5] ॥११॥
बहुतांपरीं राघवें गौरवीला । तेणें शोभला शीघ्र ऊदीत जाला ।
प्रतीउत्तरें अंगदें स्तूति केली । उभा दृष्टि हे रामपाईंच ठेली ॥ १२ ॥
पुढें आपुला विक्रमु वाड बोले । महावीर ते सर्व चक्कीत जाले ।
तया अंगदा थोर आवेश आला । तेणें राघवालागि संतोष जाला ॥१३॥
म्हणे रामराणा तया अंगदासी । त्रिकूटाचळीं भेट रे रावणासी ।
तया सांग रे भीम पुरुषार्थ माझा । वदे व्यर्थ संव्हारसी कोण काजा १४
प्रसंगोत्तरें अंगदा त्वां वदावें । बहुतांपरीं रावणा बोधवावें ।
सिताकारणीं युद्ध मागोनि घ्यावें । परी सेवटीं भाग तोडूनि यावें[6] ॥१५॥
नमस्कारिलें त्या रघुनायकाला । समस्तांसि सन्मानिलें सिद्ध जाला ।
कपी रामआज्ञेसि घेऊनि माथां । उडाला बळें चालिला व्योमपंथा १६
नभामाजि झेंपावला वेग केला । बळें शीघ्र लंकापुरीमाजि गेला ।
अकस्मात खालावला व्योमपंथें । रिपूची सभा बैसली भीम जेथें ॥ १७ ॥
पुढें पावला तो सभेमाजि कैसा । कपी राक्षसा भासला काळ जैसा ।
रिपू शस्त्रपाणी बळें सिद्ध जाले । उगे सर्व कोण्हास कोण्ही न बोले १८

---

१ डावपेंच करिती. २ तडफेनें. ३ धडपडत. ४ कपीसह. ५ बापाच्यामुळें वाटणारें वैषम्य. ६ निकाल लावून यावें.

कपीनें सभा सर्व आमान्य केली। पुढें रावणू लक्षिला भेटि जाली।
मनीं पाहतां तो रिपू तुच्छ होतो। महापुछ सींहासनीं बैसला तो ॥१९॥
रिपू सर्वही बैसले स्तब्ध जाले। तयालागि हा अंगदू काय बोले।
पुढें बोलतां बोलतां येरयेरां। बहूसाल धिक्कारिलें थोरथोरां ॥ २० ॥
बहुतांपरीच्या बहू शब्दयाती। महावीर तोंडागळे गर्जताती।
रिपू घोर ते आपुलाल्या वगंत्रें। बळें मातले हाणती शब्दशस्त्रें ॥ २१ ॥
बहू बोलती बोल नानापरीचे। महायुक्तिचे भक्तिसंख्या रसांचे।
तया बोलतां मातला शब्दसिंधु। असंख्यात संख्या नसे तो अगाधु २२
बहुतांपरीं रावणू बोधवीला। परी नायके मानसीं गर्व केला।
म्हणे काय रे पाहतां त्या कपीला। महांवीर तो अंगदू आक्रमीला ॥२३॥
कपीनें बळें थोर उड्डाण केलें। सभामंडपा मस्तकां शीघ्र नेलें।
रिपू घोर तेही भयातूर जाले। धिराचे बहू स्तंभ झोंकें उडाले ॥ २४ ॥
विरें अंगदें त्रीकुटीं ख्याति केली। नभीं अंतराळीं बळें झेंप गेली।
बळाचे भुजी मल्लराक्षस कैसे। गळाले तळीं मारिले सर्प जैसे ॥ २५ ॥
पुढें अंगदू भेटला रामचंद्रा। नमस्कारिलें आदरें त्या नरेंद्रा।
कपी वर्तला तो समाचार सांगे। म्हणे शत्रुचा गर्वताठा न भंगे ॥ २६ ॥
बहू बोलिलों जी तया रावणासी। परी नायके मातला गर्वरासी।
भिजेना जळामाजि पाषाण जैसा। धरीना मनीं सांगतां शब्द तैसा २७
बहूसाल त्या रावणें गर्व केला। रघूनायका कोप तत्काळ आला।
म्हणे राम गा सुग्रिवा ये प्रसंगीं। त्रिकूटाचळू पालथा घालि वेगीं ॥२८॥
कपींद्रू वदे शीघ्र सेनापतीला। निळें सर्व सैन्यासि संकेत केला।
बळें चालिलीं तें दळें वानरांचीं। अयूधें करीं शैल्यशृंगादिकांचीं ॥ २९ ॥
कपी क्षोभले गर्जती मेघ जैसे। बळें भार ऊठावले शीघ्र तैसे।
महाघोर घोषें भुमीकंप जाला। त्रिकूटाचळा थोर कल्पांत आला ॥३०॥
हुडे कोठ आटोपिले लंकनाथें। कपीभार झेंपावले व्योमपंथें।
महायुद्ध आरंभलें येकमेकां। बळें घेतली वानरीं शीघ्र लंका ॥ ३१ ॥
त्रिकूटाचळीं वानरीं लाग केला। कपीराक्षसांतें महामार जाला।
बहू कोपले वीर ते चंड कोपा। बळें हाणती मस्तकीं वज्रथापा ॥ ३२ ॥
ग्रिवा तोडिती मोडिती पंजरातें। कपी झोडिती पाडिती वृक्ष घातें।
रिपू भीडती थोर आवेश पोटीं। बळें वोढिती हात घालूनि झोंटी ॥३३

१ वक्त्रें, तोंडानें. २ भक्ति नवविधा आहे तेव्हां भक्तिसंख्या म्हणजे नऊ. नऊ रसांत भाषणें झालीं. ३ आयुधें. ४ ग्रीवा, माना. ५ शेंडी.

कपी कोपले गर्जती युद्धकाळीं । शिळा टाकिती पाडिती दुर्गपाळी[1] ।
गिरी हाणतां थोर नेटें घडाडी । बळें लागतां दिव्य लंका धडाडी ॥३४॥
त्रिकूटाचळीं लोटली सर्व सेना । असंभाव्य ते भार लंका दिसेना ।
कपी क्षोभले गर्जती काळ जैसे । दळेंसीं बळें धांवती वीर तैसे ॥ ३५ ॥
दळें पायिचीं अश्व रत्नें गजांचीं । रणीं चालिली दाट थाटें रथांचीं ।
बहू भार शृंगारले राक्षसांचे । महावीर ते घोर नानापरीचे ॥ ३६ ॥
रणीं पातली ते भयासूर सेना । रेजें[2] मातलें चंद्रसूर्यो दिसेना ।
बहूसाल वाद्यें बहूतांपरींचीं । महाकर्कशें वाजती राक्षसांचीं ॥ ३७ ॥
समरंगणीं चालिले राजभारें । दळें लोटलीं वानरांचीं अपारें ।
बळें हाणती येकमेकां धबाबां । झरे लागले शोणितांचे[3] थबाबां ॥ ३८ ॥
पुढें धांविले पायिचे शस्त्रधारी[4] । जया देखतां रोम आंगीं भरारी ।
कपीराक्षसांतें महामार जाला । तेणें शोणितांचे नदीपूर आला ॥ ३९ ॥
रणीं तोडिती वीरवीरां घसासां । भगाडें[5] बहू पाडिती ते धसासां ।
बळें टोंचिती शूळ पोटीं भसासां । शिरें फोडिती मुष्टिघातें ठसासां ४०
पुढें झुंजतां भार तो मृत्यु पावे । करीती बळें वीर मागें उठावे[6] ।
कपी कोपले थोर काळाग्नि जाले । रिपू पायिचे सर्वही भग्न केले ॥४१॥
निमाले रणीं देह त्या पायिच्यांचे । बळें ऊठिले भार त्या राउतांचे[7] ।
देहे टाकिती झुंझती स्वामिकाजा । पुढें धांवती वीर मागील फौजा ४२
कपी झुंजतां भंगल्या अश्वयाती । रणीं लोटल्या त्या बळें भद्रजाती[8] ।
गिरीसारिखीं थोर किंकाट घोषें । गर्जी वानरां त्रासिलें हो विशेषें ४३
कळेना महामार त्या वानरांचा । रणीं थोर संहार केला गजांचा ।
तया पृष्ठिभागीं पुन्हा भार आले । रिपू वानरीं सर्वही भग्न केले ॥ ४४ ॥
कपीराज ते हाणती हस्तहस्तें । बळें तोडिती कुंजरें स्वस्तव्यस्तें ।
दळें पायिंचीं अश्वरत्नें अपारें । रणीं पाडिलीं कुंजरें थोरथोरें ॥ ४५ ॥
पुढें चालिले भार नाना रथांचे । बहू बाणजाळें कपीसैन्य खोंचे ।
रणीं धांवती चक्रचाली घडाडां । कपी टाकिती चंडशीळा धडाडां ४६
रथी सारथी सर्वही चूर्ण केले । महावीर ते घोर मागूनि आले ।
रणीं राक्षसातें क्षयो प्राप्त जाला । जयो वानरां शीघ्र ठाकूनि आला ४७
रणीं पाडिला मारुतें जंबुमाळी । सुषेणें वींदुणां[9] पुढें तेचि काळीं ।
विरें सुग्रिवें क्षिप्रें भट्टासि[10] द्वंदें । बळें झाडिलें वज्रमुष्टीसि मैंदें[11] ॥ ४८ ॥

१ पाळ=किल्याबाहेरची उतरती जमीन, रेवण. २ धुराळा. ३ रक्तांचे. ४ पायदळ. ५ भोकसे. ६ जोर. ७ घोडदळांचे. ८ हत्ती. ९ सुषेणनामक वानरानें विद्युन्माली नामक राक्षसाला त्याच वेळीं मारिलें. १० प्रघस नामक राक्षसाबरोबर. ११ मैंदवानरानें वज्रमुष्टि राक्षसाला.

द्विवीधाकरें वज्रस्पर्शू[1] निमाला । नळें ताडिलें शीघ्र प्रतापनाला ।
रणीं लक्ष्मणें भेदिले वीरुपाक्षा । चतुर्थांसिं[2] रामें शरें येक शिक्षा ॥ ४९ ॥
दळीं राक्षसांचे हाहाकार जाला । दळेंसीं बळें वीरपाक्षू निमाला ।
कपी राक्षसांची बहूसाल सेना । रण माजलें युद्ध तें वोहटेना ॥ ५० ॥
निशी प्राप्त जाली रणीं घोरमारें । महावीर ते झुंजती अंधकारें ।
बळें हाणती कोण कोणा कळेना । विरश्रीबळें मातले ते ढळेना ॥ ५१ ॥
पुढें शीघ्र चंद्रोदयो शुद्ध जाला । दिसों लागलें राक्षसांवानरांला ।
रिपू हाणती येकमेकां कडाडां । नद्या वाहती शोणिताच्या भडाडां ५२
रणीं वीर चंद्रोदयाच्या उजेडें । बळें हाणती येकमेकां निवाडें ।
दळें भांडती राक्षसांवानरांचीं । असंभाव्य भ्यासूर प्रेतें विरांचीं ॥ ५३ ॥
कपी तापले कोपले वीरजेठी[3] । बळें ताडिले दैत्य कोट्यानकोटी ।
समरंगणीं आटली सर्व सेना । रणीं राक्षसां येश येतां दिसेना ॥ ५४ ॥
क्षयो प्राप्त जाला बहू राक्षसांतें । पुढें युद्ध आरंभिलें इंद्रजीतें ।
दिसे पाहतां सर्वही येश गेलें । तया राक्षसें शीघ्र कापट्य केलें ॥ ५५ ॥
अकस्मात तो इंद्रजीतू उडाला । नभोमंडळीं रावणी[4] गुप्त जाला ।
पुढें घोर नीशाचरीं तेंचि काळीं । कपी पाडिले सर्वही सर्पजाळीं ॥ ५६
बहू सर्प झेंपावले व्योमपंथें । बळें धांवती वानरी सैन्य जेथें ।
महाकाळ कर्कोट[5] नानापरीचे । रणीं पाडिती भार गोळांगुळांचे[6] ॥५७॥
कपींची पडों लागली सर्व सेना । पुढें पाहतां युद्धकर्ता दिसेना ।
गमे सर्व आकाश व्यालें विखारीं[7] । बळें झोंबती सर्पकूळें जिव्हारीं ॥५८
कपीभार ते सर्व निर्जीव केले । निचेष्टीत ते रामसौमित्र ठेले ।
रिपू पाडिले थोर आनंद जाला । पुढें शीघ्र लंकापुरीमाजि गेला ॥५९॥
नमस्कारिला राव तो आदरेंसीं । तेणें पुत्र आळंगिला सौख्यरासी ।
अतीआदरें सुंदरें रम्य सारें । पिता आंगिचीं दे अळंकार चीरें[8] ॥ ६० ॥
म्हणे हो रणीं शांति केली रिपूंची । बळें सर्वही त्या नरांवानरांची ।
बहूतांपरीं राव[9] संतोषवीला । निरोपेंचि तो भूवनामाजि गेला ॥ ६१ ॥
बहू सूख जालें तया रावणासी । तेणें शीघ्र पाचारिलें त्रीजटेसी[10] ।
म्हणे हो विमानीं सिता बैसवावी । रिपू मारिले शीघ्र तेथेंचि न्यावी ६२
रणीं पाडिले ते तिया दाखवावें । सिता वीट मानील ऐसें करावें ।
बहूतांपरीं रावणें सीकवीली । वनामाजि ते त्रीजटा शीघ्र गेली ॥ ६३ ॥

---

१ द्विविदवानराच्या हस्तें वज्रस्पर्श म्हणजे अशनिप्रभ राक्षस. २ चौघां राक्षसांस. ३ श्रेष्ठ मोठमोठे वीर, वीरनायक. ४ रावणपुत्र इंद्रजित. ५ भयानक सर्प. ६ वानरांचे. ७ विषारी सर्पेच प्रसवलें असें वाटलें. ८ वस्त्रें. ९ राजा रावण. १० त्रिजटा ही बिभीषणभार्या.

पुसे जानकी ते तये त्रीजटेला । सभामंडपीं कोण वृत्तांत जाला ।
म्हणे त्रीजटा सोडिं चिंता स्वभावें । रणमंडळा राजआज्ञेन जावें ॥६४॥
अंबो जानकी दुःख चिंतीन तूतें । तरी देह माझा पडो वज्रघातें ।
म्हणे सोडि शंका सिते सर्व कांहीं । तया लंकनाथा जयो प्राप्त नाहीं ॥
सिता ऐकतां शोक सांडूनि ठेली । तये त्रीजटेची बहू स्तूति केली ।
पुढें बैसल्या शीघ्र दोघी विमानीं । रणमंडळा पावल्या घोरवाणी ॥६६॥
पुढें पाहतां लक्ष कोट्यानकोटी । रणीं पाडिले हुंबती वीरजेठी ।
धडें तूटलीं राक्षसांवानरांचीं । शिरें दाटलीं घोर महाविरांचीं ॥ ६७ ॥
भयासूर हा घोर संहार जाला । रणीं राक्षसांवानरां अंत आला ।
असंभाव्य उत्पाटिले वृक्ष जैसे । रणीं भग्न केले महावीर तैसे ॥ ६८ ॥
असंभाव्य ते तूटले पादपाणी । धडें मस्तकें थोर विक्राळवाणी ।
बहू जाहली मेदमांसें चिडोंणी[२] । महादर्प ते माजली वरढाणी[३] ॥ ६९ ॥
कितीयेक ते छेदिले सर्व आंगीं[१] । तेणें काळिजें दीसती पृष्टिभागीं ।
शिरें फोडिलीं मेंदु नीघे बरारां । बहु घाय तें रक्त वाहे चरारां ॥ ७० ॥
रणीं येक ते वीर जाले उताणे । किती पालथे दीसती दैन्यवाणे ।
कितीयेक ते वीर घालूनि मेटे । भुमी पीटिती थोर दुःखें ललाटें ॥ ७१ ॥
कितीयेक भूमी वमीती अशुद्धें । कितीयेक ते मोडलें माजमध्यें[४] ।
कितीयेक ते वीर चौरंग[५] जाले । कितीयेक ते दूधडी भग्न केले ॥ ७२ ॥
कितीयेक ते मुंडपीं[६] हीण जाले । कितीयेक वक्षस्थळीं चूर्ण केले ।
कितीयेक तें तूटलीं जानु घोटीं । कितीयेक तें कंठबोटीं ललाटीं ॥७३॥
कितीयेक वाठारिती तीव्र डोळे । निघाले बहू पोटिचे मांसगोळे ।
पितें चारटें फोपसें रक्त मेंदु । किती आंतडीं कातडीं मूळ कंदु[७] ॥ ७४ ॥
कितीयेक जालीं सिरें चूर्ण चेंदा । बहू दाटलासे रणीं रक्तरेंदा ।
कितीयेक हुंकारती दैन्यवाणी । किती घोरती मागती अन्नपाणी ॥७५॥
कितीयेक ते झाडिती पादपाणी । कितीयेक ते शब्द कारुण्यवाणी ।
कितीयेक ते दंशती[८] भूमि दंतीं । कितीयेक ते लागले मृत्यपंथीं ॥ ७६ ॥
सिरें राक्षसांचीं धडें वानरांचीं । रणीं लागलीं येकमेकां विरांचीं ।
विरां शकटा कुंजरां घोडियांचीं । रिसां वानरां सर्व इत्यादिकांचीं ॥७७॥
नदी शोणिताचे महापूर जाती । धडें कोथळे फूगले ते वहाती ।
शिरे पादपाणी बहू मांसमाळा । धनू खेटकें भातड्या[९] त्या विशाळा ७८

१ अगे. २ चिखल. ३ रक्ताची घाण. ४ कंबरेमध्यें. ५ हातपाय तुटलेले असे. ६ मुंडप=शिरस्त्राण, पागोटें. ७ देंठ, मूलाधार. ८ डसतात, कुरतडतात. ९ भाले.

गिंदे[1] स्वापदें तें असंभाव्य आलीं । स्वइच्छा बहू मांस भक्षूं निघालीं ।
भुतें सर्वही औठकोटी मिळालीं । बहूतांपरीची बहू तृप्ति जाली ॥ ७९ ॥
पुढें जानकी बोलिली त्रीजटेसी । रणीं पाडिले सर्वही प्रेतरासी ।
महावीर ते कोण वेळा तयांतें । म्हणे त्रीजटे दाखवीं शीघ्र मातें ॥ ८० ॥
रणीं त्रीजटा दाखवी जानकीसी । महावीर ते पाडिले नागफांसीं ।
दिसे रामसौमित्र तोही निमाला । पुढें जानकीनें महाशोक केला ॥ ८१ ॥
बहूतांपरीं जानकी शांत केली । तये त्रीजटा शीघ्र घेऊनि गेली ।
समाचार सांगे तया रावणाला । वनामाजि आली सितारक्षणाला ॥८२॥
कपी सर्वही पावले मृत्युपंथू । जिती मारुती आणि नैऋत्यनाथु[2] ।
जयालागि जाली दया राघवाची । पहाव्या तया शक्ति काळासि कैंची ॥
रणें शोधिलीं सर्व बीभीषणानें । विरांलागि आश्वासिले थोर मानें ।
पुढें दृष्टिनें पाहिलें राघवानें । गरूडास्त्र नीरोपिले व्योमजानें[3] ॥ ८४ ॥
तयालागि प्रयोजितां सीघ्र तेथें । असंभाव्य झेंपावले व्योमपंथें ।
उड्या घालिती पक्षवातें झडाडां । बळें तोडिती सर्पकूळें तडाडां ॥ ८५ ॥
विहंगीं तिहीं सर्पसंहार केला । कपीभार तो मोकळा सिद्ध जाला ।
गिरीशीखरें सर्वसेना घडाडी । त्रिकूटाचळीं घोष तेणें धडाडी ॥ ८६ ॥
म्हणे रावणू थोर आश्चर्य जालें । कपीचक्र ते सर्व निर्जीव केले ।
सुतें वैरियां दाविली थोर ख्याती । रणीं मागुते ते कपी गर्जताती ॥८७॥
रणीं शत्रु जिंकील धूम्राक्षनामा । तया पाठवीजे प्रभू सार्वभौमा ।
पुढें मंत्र ऐकोनियां मंत्रियांचा । वदे रावणू आदरें त्यासि वाचा ॥ ८८ ॥
म्हणे गा विरा सीघ्र तूं ये प्रसंगीं । रिपूलागि मारावया जाय वेगीं ।
अळंकार देऊनियां तोषवीला । महावीर धूम्राक्ष युद्धा निघाला ॥ ८९ ॥
रणीं वीर धूम्राक्ष तो वज्रदंष्ट्री । तिजा अंकपू चालिला भार पुष्टी ।
रणमंडळीं थोर संहार केला । पुढें राक्षसांतें क्षयो प्राप्त जाला ॥ ९० ॥
बहू युद्ध केलें तया राक्षसानें । महावीर धूम्राक्ष त्या अंकपानें ।
बळें दोघही मारिले मारुतानें । रणीं वज्रदंष्ट्री तया अंगदानें ॥ ९१ ॥
महावीर ते झुंजतां भग्न जाले । बहूसाल घायाळ धाकें पळाले ।
तिहीं सर्व सांगीतली युद्धवार्ता । तेणें रावणा मानसीं थोर चिंता ॥९२॥
रणीं राक्षसांतें क्षयो प्राप्त जाला । प्रहस्तू पुढें शीघ्र युद्धा निघाला ।
कपीराक्षसां थोर संहार जाला । निळें झोडिला पाडिला भग्न केला ९३
पुढें रावणू चालिला लागवेगें । तयालागि मंदोदरी नीति सांगे ।
न मानीत तो चालिला आवरेना । बळें लोटली ते असंभाव्य सेना ॥९४॥

---

१ गिंधें, गृध्रें, गिधाडें. २ नैर्ऋत=राक्षस, त्यांचा नाथ बिभीषण. ३ आकाशांतून.

महावीर जुंझार ते भार आले । बहूसाल शृंगारमंडीत जाले ।
बळें पुत्रप्रधानमेळा मिळाला । रणमंडळा रावणू शीघ्र आला ॥ १५
बहू त्रासिलें सैन्य गोळांगुळांचें । रिपू बाणजाळें बहूसाल खोंचे ।
महावीर तेहीं बळें भग्न केले । पळाले कपी राघवाआड गेले ॥ १६ ॥
बहू त्रासलों राक्षसाचेनि बाणें । कपीवीर ते बोलती दैन्यवाणे ।
चळीं कांपती खोंचले देति धापा । बळें रक्ष गा राघवा मायबापा ॥ १
तया देखतां राम कार्मूक वोढी । पुढें शीघ्र सौमित्र तो हात जोडी ।
म्हणे वीर तो स्थीर व्हावें समर्थें । करीतों बळें भग्न या रावणातें ॥ १
रणीं रावणें वीरसामर्थ्यें नेलें । नटे[1] नीळ माया तया भग्न केलें ।
पुढें शीघ्र पाचारिलें रावणाला । महावीर सौमित्र युद्धा निघाला ॥
सुमित्रासुता रावणा युद्ध आतां । पुढें देइजे आदरें चित्त श्रोता ।
म्हणे दास हा वीर कोदंडपाणी । रणीं रावणालागि त्रासील बाणीं २

---

४

॥ श्रीराम ॥

दशशीर[2] सौमित्र युद्धा निघाले । समरंगणीं वीर सन्मूख जाले ।
महाशूर संग्रामआवेश पोटीं । पुढें देखिलें येकमेकांसि द्दष्टी ॥ १ ॥
बहूसाल धिकारिलें येरयेरां । बहू सोडिलीं बाणजाळें सरारां ।
दळीं टाकिती थोर शस्त्रें शरांचीं । बळें तोडिती येकमेकां विरांचीं ।
रणीं भीडतां हाणती येकमेकां । म्हणे रावणू लक्ष्मणू वीर नीका[3] ।
पुढें शक्ति काढूनियां ब्रह्मयाची[4] । बळें सोडिलीं वोळि विद्युलत्तेची ।
शरें वारितां बैसली शक्ति आंगीं । रणीं वीर सौमित्र तो देह त्यागी
पुढें रावणू धांविला शीघ्र तेथें । बळें ताडिता जाहला मुष्टिघातें ॥ ४
तया देखतां मारुता कोप आला । अकस्मात तो व्योमपंथें उडाला ।
कठोरें करें ताडिला वज्रमुष्टी । वमूं लागला रावणू रक्तसृष्टी ॥ ५ ॥
रिपू रावणू मागुता शीघ्र गेला । पुढें लक्ष्मणू ऊठिला स्वस्थ जाला
पुढें रावणू कोपला काळरूपी । विरांराक्षसांमाजि चंडप्रतापी ॥ ६ ॥
दहां मस्तकांतें दहा दिव्य छत्रें । पताका बहू मच्छमार्तंडपत्रें ।
महावैभवेंसीं रथारूढ जाला । तया मागुता थोर आवेश आला ॥ ७

---

१ नीळवानर मायेच्या योगानें नाना रूपें धारण करी तथापि त्यासहि रावणानें पर केलें. २ रावण. ३ खरा. ४ ब्रह्मदेवानें दिलेली.

बहू बाणजुंबाड[1] बांधोन पृष्ठी । दहाही धनुष्यें करीं दृढ मुष्टी ।
करूं लागला मागुता बाणवृष्टी । रघूनायकें देखिलें त्यास दृष्टी ॥ ८ ॥
उभा राहिला राम वज्रांगठाणें । करीं सजिलें च्याप चंद्रार्धबाणें[2] ।
दहा हेममूकूट[3] छत्रें धनुष्यें । बळें तोडिलीं पाडिलीं तें निमिष्यें[4] ॥ ९ ॥
पुढें रावणू तो भयातूर जाला । बहूतांपरीं राघवें सीकवीला ।
म्हणे जाइ रे रक्षिले आजि तूला । रिपू प्राण घेऊनि तैसा पळाला १०
महां मेघनादु असें नाम ज्यासी । पळे लंकनाथासवें तो त्वरेसी ।
तयासारिखी मुंडमुंडें[5] मिळालीं । रणीं भ्रष्टलीं सर्व मागें पळालीं ॥ ११ ॥
न पाहात मागें पुरीमाजि गेले । विरामाजि कोण्हास कोण्ही न बोले ।
पुढें सर्वही मंडपामाजि गेले । समस्तांसि तो रावणू काय बोले ॥ १२ ॥
भयातूर लंकापती दैन्यवाणा । म्हणे ऊठवा हो बळें कुंभकर्णा ।
तयावीण आणीक कोण्ही दिसेना । रिपू घोर हा थोर संहारवेना ॥१३॥
पुढें धाडिलें शीघ्र मोहोदराला[6] । महाघोरवाद्यें दळेंसीं निघाला ।
कितीयेक ते धीट मागें पळाले । कितीयेक पोटीं भयातूर जाले ॥ १४ ॥
निजेला दरीभीतरी कुंभकर्णु । दिसे काळ विक्राळ तो मेघवर्णु ।
शरीरें भयासूर हा घोररूपी । विरां भासला मृत्यु येमस्वरूपी ॥ १५ ॥
तया ऊठवीतां भयातूर जाले । महावीर त्यां कंप आंगीं उदेलें ।
पुढें जाहले धीट ते नेटपाटें[7] । उभीं पाहती सर्व नैरुत्यथाटें[8] ॥ १६ ॥
बहूसाल वाद्यें बहूतांपरीचीं । महां कर्कशें घोर चंड ध्वनीचीं ।
तयाचा पुढें जाहला येकवेळा । नभोमंडळीं नाद गेला भुगोळा ॥ १७ ॥
गदा तोमरें हाणती वज्रघातें । महामार आरंभिला राक्षसांतें ।
कळा लाविती टाकिती वृक्ष नाना । गळाले परी कुंभकर्णू उठेना ॥१८॥
शिळा टाकिती टोंचिती शूळ शस्त्रें । महाघोष संपूर्ण ते कर्णपात्रें ।
बळें लोटले मस्त ते हस्त वेगीं । शरीरावरी चालती ते प्रसंगीं ॥ १९ ॥
विरां ऊठवायां बहू प्रेत्न केले । परी नूठतां सर्वही व्यर्थ गेले ।
तया मारितां हिंपुटी[9] वीर जाले । उठेना महांवीर सर्वै गळाले ॥ २० ॥
नव्हे कार्य तेणें बहूसाल शंका । पुढें बोलती वीर ते येकमेकां ।
उठेना महांवीर कैसें करावें । तवं जाहलें अंतरीं वर्म[10] ठावें ॥ २१ ॥
तया किन्नरी रम्य गाती विशेषें । अळापें शिळा वीरती[11] तोय जैसें ।
जयाचेनि नट्टांग लावण्यवेषें । मनीं होये शक्रादिका कामपीसें ॥ २२ ॥

---

१ बाणांचे समूह. २ अर्धचंद्राकृति बाणानें. ३ सोन्याचा किरीट. ४ क्षणार्धांत. ५ क्षुल्लकें. ६ महोदराला. ७ महाप्रयासानें. ८ राक्षसांचे समुदाय. ९ कष्टी. १० कुंभकर्णाची विषयलंपटता लक्ष्यांत आली. ११ द्रवतात, पाझरतात.

तयांलागि बोलाविलें आदरेंसीं । पुढें आलिया गायका स्वर्गवासी[1] ।
करीं ताळ मृदांग यंत्रें उपांगें । बहू गीतसंगीत ते रागरंगें ॥ २३ ॥
सुखें भोगिती देव त्या गायनाचीं । मनें धांवती ऊर्ध्व शेषादिकांचीं ।
सुधा सेवितां त्यापुढें वीष वाटे । स्वरें सुस्वरें अमृतानंद लोटे ॥ २४ ॥
तेथें गायनाची कळा रम्य जाली । तेणें कुंभकर्णासि जागृति आली ।
भुकेला दिसे बैसला काळ जैसा । बहू भक्षिलें शोणिता मद्यमांसा ॥ २५
रिपू सिद्ध होऊनि लंकेसि चाले । कपी देखतां ते भयातूर जाले ।
उभा राहतां शीर बाहेर गेलें । रघूनायकें थोर आश्चर्य केलें ॥ २६ ॥
पुसे आदरें राम बिभीषणाला । महावीर हा कोण हो सिद्ध जाला ।
कथी सर्व साकल्य[2] तो मंत्रि त्याचा । म्हणे राघवा बंधु हा रावणाचा ।
बळें आगळा वीर हा कुंभकर्णु । महापर्वतासारिखा मेघवर्णु ।
समरंगणीं काळ भीडों शकेना । सखा बंधु हा रावणा होय सांना[3] ॥ २८
पुढें कुंभकर्णू सभेमाजि गेला । नमस्कारिलें भेटला रावणाला ।
म्हणे भोगणें लागलें कर्म केलें । सिता आणितां दुःख हें प्राप्त जालें २
मनीं भंगला राव जाणोनि तेणें । पुन्हा तोषवीलें विरें कुंभकर्णें ।
रिपू मारणें हेचि आतां प्रतिज्ञा । उभा राहिला शीघ्र घेऊनि आज्ञा ३
पुढें पावला तो रणीं शीघ्रकाळें । दळेसीं बळें चालिला येक वेळें ।
कपी ग्रासिले त्रासिले शूळमारें । समरंगणीं लाविलें घाय[4] वारें[5] ॥ ३१
रिसां वानरां मांडिली थोर आटी[6] । कपी गीळिले लक्ष कोट्यानकोटी ।
उठे सृष्टि भक्षावया काळ जैसा । रणीं वावरे तो महावीर तैसा ॥ ३२
रिपूभार तो भक्षिला भग्न केला । कपीनाथ[7] काखे दुर्पांडें[8] उडाला ।
पुरी पावतां पावतां सुग्रिवानें । त्वरेनें पणू[9] सिद्ध केला विरानें ॥ ३३
तया सुग्रिवें कर्ण नासीक नेलें । पुढें पाहतां दर्पणीं दुःख केलें ।
म्हणे व्यर्थ आतां जिणें रूपहाणी । रणीं मागुता लोटला शूळपांणी[10] ३
बहू कोपला वीर राक्षस कैसा । कडाडी बळें घोर काळाग्नि जैसा ।
कपीवाहिनीची मनीं सांडि केली । रणीं रामचंद्रा उजू धांव घाली ३
तया राक्षसें उघडिल्या वज्रदाढा । रणीं राघवें वाइला चंड मेढा ।
बळें लागतां मेरुमांदार फोडी । रघूनाथ ऐसे बहू बाण सोडी ॥ ३६

१ स्वर्गाकडे. २ सविस्तर. ३ धाकटा. ४ जखमा. ५ प्रहारानें. ६ नाश. ७ सुग्रीं
८ दोन पांडे अंतरावर. ९ कुंभकर्णाच्या तावडींतून निसटण्यापूर्वी सुग्रीवानें पायांनीं त्या
कुशी फोडल्या अशी जी रामायणांत कथा आहे. १० कुंभकर्णाचे हातांत शूळ हो
म्हणून शूळपाणी.

रणामाजि तें तीव्र संधान कैसें। गिळूं लागला आदरें खाद्य जैसें।
बहू सोडिले बाण कोट्यानकोटी। बळें राक्षसें घातले सर्व पोटीं ॥३७॥
सुळासारिखे बाण पोटीं निघाले। असंभाव्य मध्येंचि ते गुप्त जाले।
महां घोर संधान या राघवाचें। गिळीतो रणीं कोण सामर्थ्य याचें ॥३८॥
महाचंड त्या मुद्गलाचेनि घातें। रणीं हाणता जाहला राघवातें।
रघूनायकें छेदिला तोचि बाहो। भुमी चालिला शोणिताचा प्रवाहो ३९
रणीं जाहलें हस्त सव्यांग ऊणें। पुढें दैत्य तो कोपला कोटि गूणें।
बळें ताळ[1] उत्पाटिला वामहस्तें। रघूनायकें तोडिला बाणघातें ॥ ४० ॥
बहू कोपला दैत्य सन्मूख आला। रणीं पाद छेदूनि चौरंग[2] केला।
पदेंवीण चाले महासर्प जैसा। बळें ऊदरें चालिला वीर तैसा ॥ ४१ ॥
पुढें राघवें शीर छेदूनि नेलें। बहूसाल तें व्योमपंथें उडालें।
रणीं कोथळा फोडिला बाणघातें। महावीर तो चालिला मृत्युपंथें ॥४२॥
तया देखतां वीर मागें पळाले। भयें शीघ्र लंकापुरीमाजि गेले।
पुढें देखिला रावणू मेघवर्णु। तया सांगती पाडिला कुंभकर्णु ॥ ४३ ॥
करूं लागला रावणू शोक भारी। पुढें त्रीशरा[3] त्यासि बोधें निवारी।
म्हणे हो रणीं आजि युद्धासि जातों। रिपू थोर सामर्थ्य याचें पहातों ४४
महावीर तो त्रीशरा सिद्ध जाला। सुतां आणिकां थोर आवेश आला।
करूं लागले पुत्र मंत्री प्रतिज्ञा। निघाले बळी शीघ्र घेऊनि आज्ञा ॥४५॥
महामत्त मोहोदरें सीध केला। तुरंगीं नरांअंतकु[4] स्वार जाला।
बहूसाल तेजाळ तें खड्ग हातीं। बळें चालिले वीर ते राजपंथीं ॥ ४६ ॥
रणींशूर देवांतकू त्रीशरा हा। अतीकाय तो वीर पारश्व माहा।
बळी चौघंही[5] चौरथीं स्वार जाले। दळें लोटलीं विक्रमेंसी निघाले ४७
निघाले बळें भार सांहीं जणाचे। महां वीर ते गर्जती विक्रमाचे।
रणमंडळीं पारिखे वीर कैसे। दळेंसीं बळें धांविले काळ जैसे ॥ ४८ ॥
महां मार दोहीं दळीं येक जाला। कपीवीर राक्षेस कीती निमाला।
पुढें वानरीं घोरघातें निघातें। रणीं भग्न केलें तया राक्षसांतें ॥ ४९ ॥
तया देखतां लोटिला दिव्य घोडा। नराअंतकू कोपला वीर गाढा।
बळें हाणतां शस्त्र वाजे धडाडा। तुटों लागले पाद पाणी थडाडां ॥ ५० ॥
बहू वेग संहारिती सर्व सेना। कपी पाहती अश्व कोठें दिसेना।
पुढें पाहतां पाहतां लागवेगीं। अकस्मात तें आदळे खड्ग आंगीं ॥ ५१ ॥

१ ताड. २ हस्तपादविरहित. ३ त्रिशिरा राक्षस. ४ नरांतक. ५ देवांतक, त्रिशिरा, अतिकाय व महापार्श्व असे चार राक्षस चार रथांवर आरूढ झाले.

बहूसाल तेणें रिसांवानरांच्या । ग्रिवा कापिल्या थोर माहाविरांच्या ।
कपीवाहिनीचा[1] रणीं आट जाला । भुमी लोटला शोणितें पूर आला ५२
कपीवीर ते खोंचले भग्न जाले । महामार देखोनि मागें पळाले ।
किती येक ते सुग्रिवां आड गेले । पुढें अंगदें सर्वही स्वस्त केले ॥ ५३ ॥
उणें देखिलें धांविला शीघ्र कोपें । बळें ताडिला अश्व तो वज्रथापें ।
नराअंतकाला रणीं अंत आला । बहू मेदमांसें भुमी गाळ जाला ॥ ५४ ॥
नराअंतका मारिलें अंगदानें । पुढें वीर ऊठावले थोर त्राणें[2] ।
रणमंडळामाजि ते सीघ्र आले । तया अंगदाही कपी साह्य जाले ॥५५॥
करी नीळ तो युद्ध मोहोदरेंसीं । महां वीर देवांतकू मारुतेंसीं ।
भिडे त्रीशरा पार्श्व तो ऋषभेसी । बळी झुंजती तीघं[3] चौघां जणेंसी ५६
पुढें मांडला थोर संव्हार तेथें । रणामाजि जालीं बहूसाल प्रेतें ।
महां वीर ते धीर संग्रामशूरें । बळें धांवती येकमेकां पुढारे ॥ ५७ ॥
विरश्रीबळें दूरि टाकून शंका । रणीं हाणती घाय ते येकमेकां ।
महां थोर संग्राम साहीं जणाचा । परी पूरला अंत त्या राक्षसांचा ॥५८॥
गजारूढ मोहोदरू त्या निळानें । रणामाजि देवांतकू मारुतानें ।
महावीर तो पार्श्व त्या ऋषभानें । रणीं झुंजतां पाडिले थोर मानें ॥५९॥
बळें कोपला तो अतीचंडकाया[4] । रथू लोटिला मुख्य शत्रू जिणाया ।
कपी वीर ते आडवे शीघ्र आले । पुढें चालतां सर्वही भग्न केले ॥ ६० ॥
रथीं बैसला पर्वतासारिखा तो । म्हणे राम हा कोण युद्धासि येतो ।
वदे शीघ्र बीभीषणू रम्य वाचा । रघूनायका पुत्र हा रावणाचा ॥ ६१ ॥
सखा होय सौमित्र तुम्हांसि जैसा । अतीकाय तो मेघनादासि तैसा ।
न लेखी कपीवाहिनीचा उठावा । तुम्हीं[5] कां सुमीत्रासुतें हा वधावा ६२
पुढें राघवें वोढिला बाण जैसा । वदे आदरें वीर सौमित्र तैसा ।
पहावें घडी येक राजीवनेत्रें । वधीतों बळें दैत्य मूहूर्तमात्रें ॥ ६३ ॥
म्हणे त्यासि माहा बरें रावणारी[6] । उभा राहिला शीघ्र कोदंडधारी[7] ।
विरश्रीबळें बाणली दिव्य शोभा । रणमंडळीं ठाण मांडूनि उभा ॥६४॥
पुढें पावला तो अतीचंडकाया । बहू बोलती येकमेका जिणाया ।
तया येकमेकांसि निर्वाण जालें । शर सोडिले व्योम संपूर्ण केलें ॥६५॥
शर तोडिती येकमेकां विरांचे । पुन्हा मागुते भार येती शरांचे ।
बळें भीडती बाण बाणांसि कैसे । पडों लागले छेदिले सर्प जैसे ॥ ६६ ॥

१ कपींच्या सेनेचा. २ नेटानें. ३ नीळ, मारुती व ऋषभ हे तिघे वानर महोदर, देवांतक, त्रिशिरा व महापार्श्व या चौघां राक्षसांबरोबर लढले. ४ अतिकाय राक्षस. ५ तुम्ही किंवा लक्ष्मणानेंच त्यास मारावें. ६ राम. ७ लक्ष्मण.

शरीं राक्षसें व्योम संपूर्ण केलें । विरें लक्ष्मणें सर्व छेदूनि नेलें ।
रिपू कोपला मागुते बाण सोडी । बळें वीर सौमित्र तत्काळ तोडी ६७
पुढें वीर रामानुजें तेचि काळीं । नभीं मंडपू घातला बाणजाळीं ।
किती चूकले भार येतां शरांचे । देहे खोंचले येकमेकां विरांचे ॥ ६८ ॥
विरश्रीबळें दुःख नाहीं तयाचें । नभीं पाहती देव कौतूक त्यांचें ।
दळें थोकलीं युद्ध होतां खणाणा । तया मस्तकू डोलवी रामराणा ॥६९
भला रावणी वीर हा चंडदेही । दुजा मानवीवीर सौमित्र तोही ।
महावीर दोघे रणामाजि कैसे । बळें मातले भीडती काळ जैसे ॥ ७० ॥
पुढें वीर सौमित्र तो वज्रठाणें । बळें तोडिलें सीर चंद्रार्धबाणें ।
रणीं पाडिला तो अतीचंडकाया । भयें लागले दैत्य मागें पळाया ॥ ७१
बहूसाल ते मृत्युपंथेंचि गेले । परी अल्प घायाळ मागें पळाले ।
पुरीमाजि जाऊनि लंकापतीला । भयें सांगती सर्व संहार जाला ॥७२॥
बहू झुंजतां झुंजतां भग्न जाले । रणीं सर्वही पुत्र मंत्री निमाले ।
नरां वानरांला जयो प्राप्त जाला । क्षयो राक्षसां शीघ्र ठाकूनि आला ॥
पुढें रावणू तो भुमीं आंग घाली । तया ऐकतां मूर्छना शीघ्र आली ।
शरीरीं नसे शुद्धि सर्व उडाली । बहू दैन्यवाणी दशा प्राप्त जाली ॥७४॥
करी रावणू शोक शंकारहीतु । सभामंडपीं धांविला इंद्रजीतु ।
पिता शीघ्र आळंगिला मेघनादें । म्हणे काय जी सीणता व्यर्थ खेदें ७५
बहूतांपरी जंनकू सीकवीला । म्हणे शीघ्र मारूनि येतों रिपूला ।
तेणें रावणू शोक सांडूनि ठेला । बहूसाल सन्मानिले त्या सुताला ॥७६
बहू दीस होती गळां रत्नमाळा । तये पाहतां मौल्य थोडें भुगोळा ।
करीं घेतली माळिका आवडीनें । सुताच्या गळां घातली रावणानें ॥७७
रणा चालिला वीर संग्रामशूरा । दळेंसी बळें लोटले भार सैरा ।
रथां घोडियां कुंजरां मीत्य[1] नाहीं । बहूसाल वाद्यें पुढें येक घाई ॥ ७८॥
महावैभवेंसीं रणामाजी आला । तया इंद्रजीतें रणीं होम केला ।
तयालागि पूर्णाहुतीचेनि तोषें । रथू दीधला अग्निवर्णू हुताशें ॥ ७९ ॥
रथू तोमरें खड्गबाणीं विराजे । वरी रावणी तो महावीर साजे ।
उडाला रथेंसीं बळें अंतराळें । असंभाव्य सोडी तळीं बाणजाळें ॥८०॥
बळें सूटले बाण त्या राक्षसाचे । बहू खोंचले भार गोळांगुळांचे ।
तुटों लागले कोथळे पाद पाणी । भयें बोलती वानरें दैन्यवाणी ॥ ८१ ॥
कितीयेक ते वीर भेणें पळाले । पुढें जातजातांचि चौरंग केले ।
कितीयेक धाकें विरां आड जाती । अकस्मात तथेंचि ते भेदिजेती ॥८२॥

1 मिति, संख्या.

कपीवाहिनीमाजि आकांत जाला । रणीं तों विरें वीर सर्वै निमाला ।
सुमित्रासुतू बोलिला राघवेंसी । बहू आट जाला रिसांवानरांसी ॥ ८३ ॥
पुढें बोलतां बोलतां तेंचि काळीं । अकस्मात ते भेदिले बाणजाळीं ।
निचेष्टीत भूमी धनुष्यें गळालीं । विरें इंद्रजीतें रणीं ख्याति केली ॥८४॥
बळी रावणी येकला वीरजेठी । कपी पाडिले लक्ष कोट्यानकोटी ।
महावीर ते धीर मेरूबळाचे । प्रतापें सुरांहून ते विक्रमाचे ॥ ८५ ॥
रिसांवानरां सर्व संहार केला । पुरीमाजि तो यश घेऊनि गेला ।
नमस्कार केला तया रावणाला । दळेंसीं बळें रामशत्रू निमाला ॥ ८६ ॥
रणीं सर्वही पाडिले प्रेतरासी । बहूसाल आनंद त्या रावणासी ।
महासूख लंकापुरीमाजि ऐसें । पुढें वर्तलें वानरांमाजि कैसें ॥ ८७ ॥
कपीवीर ते पर्वातातुल्य ऐसे । निमाले रणीं पाडिले वृक्ष जैसे ।
तयामाजि कल्याण दोघां जणाला । कपी मारुती आणि बीभीषणाला ८८
रण माजलें सर्वही प्रेतरूपी । तयामाजि हे दोघ उद्वेगरूपी ।
विचारूनियां वन्हिशीखाउजेडें । रणें शोधिलीं सर्व तेंहीं निवाडें ॥ ८९ ॥
रणें शोधितां सर्व सेनेसि अंतु । तयांमाजि तो बोलिला जांबुवंतु ।
पुढें वीर ते शीघ्र धांवोनि आले । तया पाहतां बाण आंगीं बुडाले ॥९०॥
बहूसाल तो रीस घायाळ जाला । बहू बाणजाळें रणीं आकळीला ।
महां वीर बीभीषणें ऊठवीला । बळी बाण वोढूनियां स्वस्त केला ॥९१॥
पुढें ऋक्ष[१] बीभीषणालागि पूसे । महां वीर ते मुख्य आहेत कैसे ।
म्हणे जांबुवंतासि नैरुत्यनाथु । विरा पूससी काय जाला अनर्थु ॥ ९२ ॥
महां वीर दोघे निचेष्टीत जाले । कपी सुग्रिवादीक सर्वै निमाले ।
रणामाजि ते शोधिली सर्व सेना । समस्तांमधें येक तोही वदेना ॥ ९३ ॥
प्रसंगीं निरोपी यथातथ्य मातु । मनामाजि तो जांबुवंतु निवांतु ।
म्हणे वीर बीभीषणु जांबुवंता । समस्तांसि कल्याणसे सांग आतां ॥९४॥
म्हणे ऋक्ष तो मारुतीवीण कांहीं । विरां ऊठवाव्या दुजा प्रेत्न नाहीं ।
क्षिराब्धीतटीं योजनें चारि कोटी । गिरी द्रोण आणील हा वीरजेठी ९५
महारम्य द्रोणाचळू भव्यरूपी । तया मस्तकीं औषधी दिव्यरूपी ।
बळें आणितां ऊठती सर्व सेना । कपी मारुतीवीण दूजा दिसेना ॥ ९६ ॥
म्हणे जांबुवंतासि नैरुत्यनाथु । असंभाव्य तूं सांगसी दूरि पंथु ।
गमे प्रेत्न हा सर्वथाही घडेना । गिरी मारुताचेन तो आणवेना ॥ ९७ ॥
म्हणे गा विरा काय तूं बोलिलासी । कपीसारिखें मारुता भावितोसी ।
परी जाण हा ईश्वरू साक्षरूपी । कळेना जना रुद्र पूर्णप्रतापी ॥ ९८ ॥

---

१ अस्वल, जांबवान्.

बहू स्तूति केली तया मारुतीची । तेणें तोषली वृत्ति बीभीषणाची ।
म्हणे गा विरा संकटीं धांव घालीं । बळें ऊठवीं सर्व सेना निमाली ९९
कपी मारुती उत्तरें सीध जाला । मनीं चिंतिलें रामपादांबुजांला ।
महां वीर आणील द्रोणाचळातें । पुढें दास तो विनवी श्रोतयातें ॥ १०० ॥

---

५

॥ श्रीराम ॥

उभा राहिला वीर मांदार जैसा । मनाहूनि पूढें बळें वेग तैसा ।
रुपें कर्कशू पाहतां पाहवेना । बहूसाल उच्चाट[1] त्या राहवेना ॥ १ ॥
अकस्मात तो व्योमपंथें उडाला । मही झोंकली पन्नगा[2] भार जाला ।
बहू धोकले[3] कूर्म वाराह दंतीं । झडा चांचरें[4] ते धरा सांवरीती ॥ २ ॥
स्फुरद्रूप सर्वांग वाजे झडाडां । उडाले नभीं वृक्षवातें फडाडां ।
असंभाव्य पिंजारलें पुछ्य मागें । नभोमंडळीं जातुसे लागवेगें ॥ ३ ॥
बहू लंघिली पोकळी वेग केला । द्विपें पांचही शीघ्र टाकूनि गेला ।
उडाला बळें पांच सिंधू अगाधू । पुढें देखिला साहवा क्षीरसींधु ॥ ४ ॥
तयाचे तिरीं उंच आकाशपंथें । विरें देखिलें रम्य द्रोणाचळातें ।
तया मस्तकीं दिव्य वल्ली अपारा । प्रभा फांकली तेजकल्लोळ सैरा[5] ॥५॥
पुढें देखतां मारुता सांवरेना । धरीतां बळें तेज ह्वाता चढेना ।
महाऔषधी दिव्य शैल्यानिशैल्यां[6] । कपी देखतां सर्वही गुप्त जाल्या ॥ ६
तया पर्वताची बहू स्तुति केली । परी नायके सर्वही व्यर्थ गेली ।
बहूसाल त्या आंचळें[7] गर्व केला । पुढें मारुता कोप तत्काळ आला ॥७॥
महाथोर धिक्कार केला तयासी । बळें शीघ्र उत्पाटिलें पर्वतासी ।
गिरी घेतला पुच्छवेष्टीत माथा । कपीराज तो चालिला व्योमपंथा ॥८॥
रणीं जाहला सर्व संहार जेथें । महावीर आला अकस्मात तेथें ।
निशा दाटली अंधकारें दिसेना । गिरी ठेवितां देखिली सर्व सेना ॥ ९ ॥
पितां पावला तो बळें मारुतीचा । रणीं वास नेला तया औषधीचा ।
सुगंधेंचि ते वीर आरोग्य जाले । कपी सर्वही मृत्यु मारूनि ठेले[9] ॥१०॥
दळेंसीं बळें ऊठिला रामराजा । फुंराणें[10] कपी गर्जती वीर फौजा ।
पुढें मारुतें घेतलें पर्वताला । क्षिराब्धीतटीं शीघ्र ठेऊनि आला ॥ ११ ॥

---

१ उतावीळपणा, उत्सुकता. २ शेषाला. ३ हलले. ४ झडकर. ५ हलणारी. ६ शिखरनशिखर, सर्व शिखरें. ७ अचलें, पर्वतानें, द्रोणागिरीनें. ८ वायु. ९ उठले, जिवंत झाले. १० स्फुरण येऊन.

तुळेना गती शक्ति माहाविराची। कळेना करी कोण संख्या बळाची।
दिसे पाहतां वानरू वेषधारी। परी जाणिजे सत्य हा त्रीपुरारी[1] ॥ १२ ॥
निशीच्या पदें चारि कोटी उडाला। गिरी दोंपदीं शीघ्र घेऊनि आला।
पुन्हा मागुता तीपदींमाजि नेला। प्रभातेचि चौथे पदीं प्राप्त जाला[2] १३
सहस्त्रेक गावें गिरी स्थूळ मोठा। असंभाव्य या मारुतीचा चपेटा।
उडाला नभीं योजने कोटि सोळा। नसे दूसरा शोधितां या भुगोळा १४
बहू पंथ चाले रवी भार नेंना[3]। बहू भार वाहे फणी तो उडेना।
गरूडासि तो आचळू हालवेना। दुजी साम्यता ब्रह्मगोळीं दिसेना ॥१५
पुढें मारुती भव्य आनंदरूपी। नभोमंडळीं भानु जैसा प्रतापी।
महावीर तैसा दळामाजि आला। समस्तांसि देखोनि आनंद जाला १६
सखा जीविचा तो असे दूरि देसीं। सदा लागलें चित्त हें त्याजपासीं।
पुढें पाहतां तो अकस्मात आला। तयासारिखें वाटलें राघवाला ॥१७॥
कपीनें कसें पाहिलें राघवासी। पुढें देखिलें लोभियानें धनासी।
तथा बाळकें लक्षिलें जंन्ननीला। तयासारिखें वाटलें मारुतीला ॥ १८ ॥
नमस्कारिलें त्या रघूनायकासी। उभा राहिला हात जोडून पासीं[4]।
म्हणे राम तो धन्य गा धन्य वीरा। कपी काय द्यावें तुझ्या ऊपकारा १९
अगा मारुती ! तूझिया ऊपकारें। जिवा रीण जाले बहूसाल भारें।
सदा सर्वदा आमुचीं तूज चिंता। समस्तांसि तूं येकला प्राणदाता ॥२०
म्हणे मारुती सर्व स्वामीप्रतापें। प्रभू काय कीजेल म्यां दीनरूपें।
समर्था तुझीये कृपेवीण कांहीं। स्वता अल्पही कार्य होणार नाहीं ॥ २१
बहूतांपरीं मारुतें स्तूति केली। चितोवृत्ति[5] ते राघवाची निवाली।
पुढें राघवें रुद्र संतुष्ट केला। बहूतांपरीं आदरें गौरवीला ॥ २२ ॥
प्रसंगें कपीनाथ सुग्रीव बोले। म्हणे मारुती प्राण त्वां रक्षियेले।
कुळामाजि जालासि पूर्णप्रतापी। कपीचीं कुळें सर्वही श्लाघ्यरूपी ॥२३
कपी सर्वही बाणजाळें निमाले। तुझीया प्रतापें पुन्हा जन्म जाले।
प्रसंगें सखा राघवें निर्मिलासी। कपींकारणें तूं बहू कष्टालासी ॥ २४ ॥
तया बोलतां मारुता सूख जालें। पुन्हा मारुतेंहीं बहू तोषवीलें।
असो हे बहूसाल पाल्हाळ गोवी। कथा राहिली ते पुढें चालवावी २५
कपीनाथ बोले रघूनायकासी। न ये रावणू चंडदुःखें रणासी।
तरी शीघ्र लंकापुरी जाळवावी। समर्थें कपीलागि आज्ञा करावी ॥ २६ ॥

---

१ त्रिपुरारि शंकर २ पहिल्या प्रहरीं उडाला, दुसऱ्या प्रहरीं पर्वत आणला, तिसऱ्या प्रहरीं नेऊन ठेवला, चवथ्या प्रहरीं परत आला. ३ नेईना. ४ समीप. ५ चित्तवृत्ति.

पुढें बोलिजे सुग्रिवालागि देवें। तुम्ही कल्पिलें कार्य सिद्धीस न्यावें
कपी रामआज्ञेसि घेऊनि वेगीं। विरांलागि आज्ञापिलें ते प्रसंगीं ॥ २७ ॥
तुम्हीं लागवेगें चुड्या पाजळीजे। बळें शीघ्र लंकापुरी दग्ध कीजे।
करीं घेतले उंच बांधोनि भारे। कपी धांवती येकमेकां पुढारे ॥ २८ ॥
चुड्या पावकें सर्वही दीप्त केल्या। अकस्मात लंकापुरीमाजि नेल्या।
बळाचे कपी धांवती लक्ष कोटी। चुड्या खेळती थोर आनंद पोटीं २९
शिखा लागतां सर्व जाले उमाळे[१]। निळे पींवळे श्वेत आरक्त काळे।
बळें लागला चंड वारा भरारां। पुरीमाजि तो वन्हि धांवे सरारां ॥३०॥
गृहां गोपुरां जाहला येकवेळां। असंभाव्य हेलावती तीव्र ज्वाळा।
दिशा दाटल्या धूम्र आकाशपंथें। पिडा जाहली खेचरां भूचरांतें ॥३१॥
मळें धूववीलीं तया रावणानें। सळें ऊसिणें घेतलें[२] पावकानें।
बळें लागतां थोर कोपें कडाडी। बहू माजला वन्हि पोटीं धडाडी ॥३२॥
बळें क्रोध आला तया पावकाला। वरी वात वेगें बळें साह्य जाला।
शिखा चालिल्या अंतराळीं भडाडां। जळों लागली दिव्य लंका धडाडां
अपारें घरें गोपुरें रम्य सारें। बहूसाल दामोदरें थोरथोरें।
पडों लागली दग्ध होतां धबाबां। महांराक्षसी तोंड घेती खबाबां[३] ॥३४॥
ध्वनी राक्षसांची असंभाव्य जाली। मुखें बोलती आगि रे आगि आली।
कितीयेक राक्षस धांवोनि आले। अकस्मात ते वीर सर्वै जळाले ॥ ३५ ॥
बळें धांविली ते असंभाव्य सेना। पुढें जावया लाग कोठें दिसेना।
शिखा धांवती वन्हिच्या पाठिलागें। पळाले बळी प्राण घेऊनि मागें ३६
बळें खुंटलीं वैभवें राक्षसांची। बहू दाटलीं वाट प्रेतें विरांचीं।
कितीयेक ते धीट नेटें जळाले। कितीयेक ते वीर मागें पळाले ॥ ३७ ॥
त्रिकूटाचळीं थोर आकांत जाला। असंभाव्य राक्षस कीती निमाला।
स्त्रिया बाळकें जेथजेथें पळालीं। शिखा लागतां तेथतेथें जळालीं ॥३८॥
पळायासि मागें पुढें रीग नाहीं। जळालें पुरीमाजि तें सर्व कांहीं।
बहू कुंजरें शकटें अश्व नाना। निमाले रथी सारथी सर्वसेना ॥ ३९ ॥
सहस्रें दहा भूवनें रावणाचीं। जळाली बहू संपती वैभवाची।
सुवस्तां[४] अळंकार दिव्यांबरांची। सुगंधेल अज्यादि नाना रसांची ॥४०
गुरें वासुरें जाळिलीं पावकानें। बहू हाट बाजार केणी[५] दुकानें।
बहूतां जणाचें बहू वित्त गेलें। त्रिकूटाचळीं पावकें शुद्ध केलें ॥ ४१ ॥

१ प्रकाशाचे डोंब. २ अग्नीकडून रावणानें केर काढविला होता तें वैर मनांत धरून पावकानें त्याचें उसणें फेडलें ! ३ तोंडावर हात आपटून घेऊं लागल्या. ४ उत्तम वस्तु. ५ विक्रीचीं.

बहू वेवसाई¹ भले मोठमोठे । भुसारी जरी जोहरी आणि चाटे ।
जळालें बहू वित्त हाणोनि घेती । धरेना कदा सांवरेना रुदंती ॥ ४२ ॥
सभामंडपा राक्षसीं हाक नेली । म्हणे पाहतां काय लंका जळाली ।
दहा योजनें तीसरा भाग जो कां । बळें जाळिली वानरीं सर्व लंका ४३
तया रावणा वाटली सर्व चिंता । म्हणे पाठवावा रणीं कोण आतां ।
न दीसे मुखीं मंदली सर्व शोभा । पुढें बोलिला शीघ्र कुंभा निकुंभा ४४
म्हणे वानरें जाळिली दिव्य लंका । तयासी करा युद्ध टाकून शंका ।
तया सांगतां शीघ्र उदीत² जाले । महां वीर ते सात युद्धा निघाले ॥४५॥
बळी कुंभ नीकुंभ जंघें प्रजंघें । दळें सीध केलीं बळें लागवेगें ।
महां वीर झुंजार भारे युपाक्षु³ । दळीं चालिला क्रोधनू शोणितांक्षु⁴॥४६॥
बळी सात ही⁵ ते रथारूढ जाले । महां वीर राक्षस सर्व मिळाले ।
दळें चालिलीं राक्षसांचीं अपारें । भुमी शेष सांडूं ह्मणे थोर भारें ॥४७॥
बहू होत लंकापुरी दग्ध जेथें । बळें चालिले भार तेणेंचि पंथें ।
निमेषांत कुंभें विरें तेचि काळीं । महामेघ तो पाडिला बाणजाळीं ॥४८॥
बळें मातला वान्हि तो वीझवीला । त्रिकूटाचळीं लोक आनंदवीला ।
विझाली पुरी सीघ्र तेणेंचि मार्गें । निघाली पुढें वाहिनी वातवेगें ॥ ४९ ॥
रणमंडळा पारिखे वीर आले । कपी द्रूमपाणी बळें सिद्ध जाले ।
समस्तांपुढें अंगदू वीर रागें । रणीं लोटला क्रोधनू लागवेगें ॥ ५० ॥
बळें फोडिली हाक कल्पांत जैसी । रणीं मांडलें युद्ध दोघां जणासी ।
विरें विंधिलें वानरालागिं बाणीं । कपी कोपला अंगदू शैल्यपाणी ॥५१॥
गिरी टाकितां क्रोधनू गुप्त जाला । महांपर्वताचे तळीं तो निमाला ।
तया सावया शोणिताक्षू निघाला । तेणें अंगदू भेदिला भग्न केला ॥५२॥
रणीं वीर लक्षूनियां बाण घाली । बळें गेलिया आंग भेदूनि भाली ।
उणें देखतां सीघ्र मैंदें-द्रिवीधें⁶ । तरू घेतला हाक देऊनि क्रोधें ॥ ५३ ॥
कपी वीर धांवोनि युद्धासि आले । रणीं अंगदालागि ते साह्य जाले ।
तवं शीघ्र येरीकडे लागवेगें । बळें धांविले ते विरश्रीतरंगें ॥ ५४ ॥
प्रजंघें युपाक्षें तया शोणिताक्षा । दिल्हें पुंठ⁷ धांवोनि घेऊनि पक्षा ।
त्रिवर्गीं त्रिवर्गीं रणीं युद्ध जालें । शरीं राक्षसीं व्योम संपूर्ण केलें ॥५५॥
शिळा शीखरें वृक्षपाषाणघातें । कपी वीर ते हाणती राक्षसातें ।
समरंगणीं दूरि टाकूनि शंका । बळें नीकुरें भेदिती येकमेकां ॥ ५६ ॥

---

१ व्यवसायी, व्यापारी, धान्याचे व्यापारी, जर विकणारे, मोत्यें, हिरे वगैरे विकणारे, व कापडाचे व्यापारी. २ तयार. ३ यूपाक्ष राक्षस. ४ शोणिताक्ष राक्षस. ५ साह्य व्हाया. ६ मैंद आणि द्विविद वानरांनीं. ७ साह्य.

तवं अंगदें थोर अद्भूत केलें । बळें वाड जुंबाड तें उन्मळीलें ।
प्रजंघासि हाकूनि क्रोधें बहूतें । रणीं झोडिला पाडिला वृक्षघातें ॥५७॥
पुढें देखिलें त्या युपाक्षासि मैंदें । बळें गर्जला तो कपी घोरनादें ।
रणीं झुंजतां थोर आवेश मैंदा । शिळा टाकितां जाहलें शिर चेंदा ॥५८
द्विवीधें विरें पाडिला शोणिताक्षु । उणा देखिला सर्व नैरुत्यपक्षु[1] ।
तिघां राक्षसां थोर संहार जाला । रणामाजि युध्यासि तो कुंभ आला ५९
पिता कुंभकर्णू महावीर जैसा । तयासारिखा लोटला कुंभ तैसा ।
उभा रे उभा फीर मैंदा द्विवीधा । रणामाजि जासील कोठें आगंदा ६०
बहू विक्रमें पाडिलें राक्षसांसी । रणीं ऊसिणें सीघ्र घेतों तुम्हांसी ।
क्षणीं तेचि कोदंड घेऊनि हातीं । कपी मैंद तो भेदिला बाणघातीं ६१
नवां बाणघातीं कपी भग्न केला । रणामाजि तो प्रेत होऊनि ठेला ।
द्विवीधासि दाही शरें तेचि काळीं । विरें राक्षसें पाडिलें बाणजाळीं ६२
पुढें पाहतां देखिलें अंगदाला । कपी वीर तो वृक्ष घेऊनि आला ।
बळें हाणतां खीळिला हस्त बाणीं । चळेना कपी वीर तो वज्रठाणीं ६३
उभा राहिला बाण झेलीत कैसा । कुठारा[2] तळीं छेदिजे वृक्ष जैसा ।
तया आंगदा सीघ्र प्राणांत आलें । रघूनायका वानरीं जाणवीलें ॥ ६४ ॥
मुखें बोलती अंगदू वीर गेला । कपीनाथ सुग्रीव तैसा उडाला ।
रथारूढ होऊनि कोदंडहातें । बळें मोडिलें ताडिलें राक्षसातें ॥ ६५ ॥
रणीं कुंभ तो मल्लयुद्धासि आला । बळें ताडिता जाहला सुग्रिवाला ।
तया सुग्रिवें दीधली वज्रमुष्टी । रणीं कुंभ तो पाडिला प्रेतसृष्टी ॥ ६६ ॥
महावीर तो धाडिला मृत्युपंथें । निकुंभें रणीं हाकिलें सुग्रिवातें ।
कपीनाथ सुग्रीव घालूनि मागें । पुढें मारुती धांविला लागवेगें ॥ ६७ ॥
तया राक्षसें भेदिलें मारुताला । कपीवीर किंचीत मूर्छीत जाला ।
पुढें ऊठिला तो कपी काळ जैसा । मनामाजि अद्भूत आवेश तैसा ॥६८॥
महापर्वतू घेतला मारुतानें । निकुंभावरी टाकिला थोर त्राणें[3] ।
गिरी टाकितां शांति जाली रिपूची । फळी फूटली सर्वही राक्षसांची ६९
त्रिकूटाचळामाजि घायाळ गेले । रिपू प्राण घेऊनि तैसे पळाले ।
भयातूर ते सांगती रावणाला । बळी तों विरेंवीर सर्वै निमाला ॥ ७० ॥
बहू दुःख जालें तया रावणासी । पुढें धाडिलें शीघ्र तीघां सुतांसी ।
विशाळाक्ष मकराक्ष आणी खरातें । रणा पाठवीलें तिघां कूमरांतें ॥७१॥
बडींगें लोहो मूशळें शूळपाणी । कटारा सुऱ्या तोमरें चापपाणी ।
बहू खेटकें[4] मुद्गलें आणी भाले । महा वीर राक्षस युद्धा निघाले ॥ ७२ ॥

---

१ राक्षसांचा पक्ष. २ कुठारानें. ३ शक्तीनें. ४ ढाला.

कपीवाहिनीचा असंभाव्य यांवा[१] । प्रतापें बळें सीघ्र केला उठावा ।
शिळाशीखरें हाणती राक्षसांतें । रिपूवानरां मारिती बाणघातें ॥ ७३ ॥
तिघेही दळेंसीं बळें सिद्ध जाले । असंभाव्य ते भार मागें उदेले ।
महां विक्रमें झेलिती वीर खङ्गें । समरंगणीं चालिले लागवेगें ॥ ७४ ॥
महां युद्ध आरंभलें येकमेकां । तया भीडतां तो धरी काळ शंका ।
रणीं राक्षसां पाडिलें घोर मारें । कपी वीर ते गर्जती भूभुकारें ॥ ७५ ॥
रणामाजि मकराक्ष तो सीघ्र कोपें । पुढें चालिला चापपाणी प्रतापें ।
स्वयें आपुलें सैन्य घालूनि मागें । कपी भेदिता जाहला लागवेगें ॥ ७६ ॥
बळें सोडिलीं राक्षसें बाणजाळें । तुटों लागलीं वानरांचीं सिसाळें[२] ।
थटांटां रणीं तूटती पादपाणी । शरीरें बहूसाल विक्राळवाणी ॥ ७७ ॥
देहे खोंचले थोर माहां विरांचे । झरे लागले वाहती शोणिताचे ।
रणीं झुंजतां राक्षसें भग्न केले । कितीयेक ते भार मागें पळाले ॥ ७८ ॥
गमे मांडला थोर कल्पांत सृष्टीं । बहूतीं विरीं दीधली त्यासि पुष्टी ।
रणामाजि कोण्हासही राहवेना । करी घोर संधान तें साहवेना ॥ ७९ ॥
बळें धांवती बाण ते लागवेगें । पळाले बळाचे कपी सर्व मागें ।
कपीचीं दळें भंगिलीं राक्षसानें । तया मस्तकू तूकिला[४] राघवानें ॥ ८० ॥
म्हणे राम हो कोण सामर्थ्य याचें । रणीं भंगिलें सैन्य गोळांगुळांचें ।
वरी अंतराळीं बहू बाणजाळें । क्षणामाजि तें तोडिलें शीघ्र काळें ॥ ८१ ॥
उभा राहिला राम वज्रांगठाणें । गुणीं लाविलें चाप तें घोर बाणें ।
टणत्कारितांसीत[५] बोटें थरारी । महां चंड ब्रह्मांड घोषें गरारी ॥ ८२ ॥
बळें राक्षसें व्योम संपूर्ण केलें । रणीं राघवें शीघ्र छेदूनि नेलें ।
पुढें घेतला दूसरा बाण रामें । गुणीं लाविला थोर शत्रू विरामें ॥ ८३ ॥
विरें मागुतें घोर संधान केलें । रिपूचें रणीं शीर छेदूनि नेलें ।
महावीर मकराक्ष तो बाणघातें । निमाला रणीं चालिला मृत्युपंथें ॥ ८४ ॥
पुढें राम पाचारिला त्या खरानें । विशाळाक्ष ऊठावला थोर त्राणें[६] ।
म्हणे राजपुत्रा बरें युद्ध केलें । रणीं विक्रमें शीर छेदूनि नेलें ॥ ८५ ॥
अरे सर्वदा तो जयो प्राप्त कैचा । करी ग्रास राहो रवीमंडळाचा ।
प्रतीउत्तरें बोलतां राम वाणी । बळें बूझिलें भूमिआकाश बाणीं ॥ ८६ ॥
तिहीं राक्षसीं घोर संधान केलें । विरां वाटलें थोर कल्पांत आलें ।
पुढें तोडिले सर्वही बाण रामें । प्रतापें रणामाजि ते पूर्णकामें ॥ ८७ ॥
प्रतापें रणीं राघवें बाणघातें । रिपू दोघही धाडिले मृत्युपंथें ।
रणीं राक्षसां थोर संहार जाला । समाचार गेला तया रावणाला ॥ ८८ ॥

१ धैर्य. २ शिरें. ३ भराभर. ४ मान डोलविली. ५ बाण. ६ आवेशानें.

पुढें रावणानें बहु दुःख केलें । नसे अंतरीं सौख्य टाकूनि गेलें ।
दशग्रीव बोले विरा इंद्रजीता । प्रतापें रणामाजि तूं जाय आतां ॥ ८९ ॥
रिसांवानरांची असंभाव्य सेना । तुज वेगळी सर्व संहारवेना ।
उभा राहिला सीघ्र उदीत जाला । बहूसाल वाद्यें दळेंसीं निघाला ॥९०॥
दळें चालिलीं राक्षसांचीं अचाटें । पुढें वानिती भाट वेताळ थाटें ।
बळी रावणी तो रथारूढ जाला । म्हणे शीघ्र संहारितों वैरियांला॥ ९१
रणामाजि येऊनियां होम केला । महाभीम कृत्यारथू[1] प्राप्त जाला ।
रथारूढ होऊनि वेगीं उडाला । नभोमंडळामाजि तो गुप्त जाला ॥ ९२ ॥
असंसाव्य ते मोकली बाणजाळें । बळें धांवती प्रेरिले दूत काळें ।
कपीचीं तुटों लागलीं कंठनाळें । रणीं लोटलीं वीरप्रेतें विशाळें ॥ ९३ ॥
असंभाव्य सामर्थ्य या रावणीचें । कळेना कळा कोण कापट्य याचें ।
कदा नेणती बापुडे देव कांहीं । रणीं पाडितो वीर सन्मूख नाहीं ॥९४॥
बहू खोंचली ते असंभाव्य सेना । दिशा दाटल्या बाणजाळें दिसेना ।
कपीवाहिनीमाजि आकांत जाला। पुढें मारुतीचा पिता शीघ्र आला ९५
निरोपी अती आदरें राघवासी । म्हणे अंगिराशस्त्र योजा त्वरेसीं ।
पुढें राम तत्काळ तें शस्त्र घाली । तेणें तूटले शीर कृत्या निमाली ॥९६
पुढें रावणी भूतळामाजि आला । रणमंडळीं मृत्यु जैसा उदेला ।
भयासूर तो वीर घोरप्रतापी । शर सोडिता जाहला काळरूपी ॥ ९७ ॥
समस्तीं अकस्मात तो देखियेला । तया येकवेळां बहू मार केला ।
कपी वीर ऊठावले शीघ्र काळें । शिळाशीखरें टाकिती बाणजाळें ॥९८॥
रणीं रावणी येकला वीरजेठी । कपी लोटले लक्ष कोट्यानकोटी ।
रिसींवानरीं थोर कल्लोळ केला । बळें ताडिते जाहले राक्षसाला ॥९९॥
बळें फोकिला[2] शूळ त्या मारुतानें । गदा घेतली शीघ्र बिभीषणानें ।
परीघासि घेऊनियां मैंद धांवे । कुमोदू करी वेग नेटें उठावे ॥ १०० ॥
कपीऋषभां थोर आवेश आला । शतघ्नीस[3] घेऊनि सन्मूख जाला ।
द्विवीधें बळें सोडिलें चक्र कैसें । महापर्वतीं चालिलें वज्र जैसें ॥ १ ॥
सुगंधें विरें ताडिला शक्तिघातें । गिरीशृंग तो घेतला जांबुवंतें ।
सिळा टाकिली चंड त्या अंगदानें । महा खड्ग तें मोकलीलें नळानें ॥२॥
बडींगा नळें झोकिला तो विशाळु । कपी सुग्रिवें टाकिला चंड शैळु ।
सुमित्रासुतें राघवें तेचि काळीं । रिपू रावणी विंधिला बाणजाळीं ॥३॥

१ कृत्या=आरक्तवर्ण शिरस्त्राण धारण केलेल्या स्त्रिया. अग्निमध्यें हवन करून त्यांना संतुष्ट केल्यास अदृश्य राहून शत्रूचा नाश करण्याची शक्ति येते. २ फिरविला. ३ तोफ. शंभरांस एकदम ठार करणारी म्हणून शतघ्नी. शतशब्दानें शेंकडो घ्यावेत.

बहूतां जणीं येकला इंद्रजीतु। रणीं वेढिला काळ जैसा कृतांतु।
बळें वानरांचा बहू मार जाला। रिपू राक्षसें अंतरीं तुच्छ केला॥ ४॥
बहूतां जणीचा बहु येक वेळा। निमेषांत तोडूनि नेला वळीला[1]।
पुढें राक्षसें घोर संधान केलें। विरें विक्रमें सर्व छेदूनि नेलें॥ ५॥
रिपूचीं दळें पाडिलीं इंद्रजीतें। रणामाजि जालीं बहूसाल प्रेतें।
रिसें वानरें राम सौमित्र बाणीं। बळें भेदूनि चालिला चापपाणी॥ ६॥
पुढें सज्जनीं चित्त द्यावें कथेला। समाचार सांगेल हा रावणाला।
महावैर हें ऐकतां वैर नासे। म्हणे दास निर्वैर सूखें विलासे॥ १०७॥

६

॥ श्रीराम ॥

सभे बैसला राव त्रीकूटवासी। पुढें भेटला इंद्रजीतू तयासी।
नमस्कार केला तया रावणाला। म्हणे शत्रुचा सर्व संहार केला॥ १॥
बहू लंकवासी रणीं भग्न केले। कितीयेक ते मृत्युपंथेंचि गेले।
बळें ऊसिणें घेतलें हो तयाचें। प्रभू शोधिलें मूळ त्या वैरियांचें॥ २॥
तया रावणा थोर संतोष जाला। बळें अमृताचे नदी पूर आला।
अकस्मात संताप सर्वै बुडाला। पुढें बोलता जाहला कूमराला॥ ३॥
ह्मणे इंद्रजीता विरा बैस आतां। सुपुत्रा तुवां तोडिली सर्व चिंता।
बळी चक्रचूंडामणी वीर राजा। असाव्या तुझ्या वज्रकल्याण भूजा॥४॥
अगा इंद्रजीता सखे गोत्रबंधु। प्रतापें बळें आगळे वीरसिंधु।
निमाले रणीं वैरियांचेनि हस्तें। बहूसाल वाटे मनीं दुःख मातें॥ ५॥
त्रिकूटाचळीं वानरीं लाग केला। मुळारंभ राक्षस कीती निमाला।
पुढें घोर संग्राम दारूण जाला। विरेंवीर तो प्रेतसिंधु बुडाला॥ ६॥
तयाऊपरी वीर धूम्राक्ष जेठी। जेणें जिंकिले देव ते लक्ष कोटी।
समरंगणीं त्या विरा अंत आला। रणमंडळीं देह त्यागूनि गेला॥ ७॥
रणीं वज्रदंष्ट्री दिसे यमरूपी। गिरीसारिखा अंकपानू प्रतापी।
महावीर ते दोघ युद्धासि गेले। समरंगणीं युद्ध होतां निमाले॥ ८॥
बळी दक्ष व्युत्पन्न चातुर्य जाणे। तया देखतां अंतरीं सूख वाणे।
प्रसंगेंचि तो वीर युद्धासि गेला। प्रहस्तू रणीं घोर मारें निमाला॥ ९॥
तयाऊपरी क्रोध आह्मांसि आला। रिपू राम जिंकावया वेग केला।
तयाचें महायुद्ध तें काय बोलों। समरंगणीं भ्रष्टलों[2] भग्न जालों॥ १०॥

१ अवलीळा, लीलेनें. २ सर्व सैन्यांत वरिष्ठ.

तयाऊपरी धीर आम्हां धरेना। पुढें ऊठवीलें बळें कुंभकर्णा।
तया सारिखा कोण आहे बळाचा। समरंगणीं धीर काळासि कैचा ११
महावीर तो घोर युद्धासि गेला। रिसां वानरां थोर संहार केला।
रिपूनें तया सेवटीं बाणघातें। समरंगणीं धाडिला मृत्युपंथें॥ १२॥
प्रतापी सखा बंधु माझा निमाला। बळें आगळा थोर आधार गेला।
मज पूसिल्यावीण गंतव्य केलें। नये सांगतां दुःख ब्रह्मांड जालें॥ १३॥
तयाऊपरी चौघही सूत माझे। अगा इंद्रजीता सखे बंधु तूझे।
तयाच्या प्रतापानळें सूख वाटे। समरंगणीं भीडतां काळ वीटे॥ १४॥
नरा अंत केला नराअंतकानें। बळें पीडिलें देव देवांतकानें।
तळीं घातले सर्प त्या त्रीशरानें। रणीं वानरीं घेतले सर्व प्राणें॥ १५॥
अतीकाय तो वीर मेरूबळाचा। प्रतापें सुराहूनि तो विक्रमाचा।
रथारूढ होऊनि युद्धासि गेला। तयाचा सुमित्रासुतें घात केला॥१६॥
निमाले सखे दुःख ऊदंड जालें। पुढें पाहतां वीर सामर्थ्य गेलें।
महावीर ते मृत्यपंथेंचि जाती। नरें वानरें बापुडीं यश घेती॥ १७॥
निमाले सखे सूत बंधू बळाचे। प्रतापें सुरांहून जे विक्रमाचे।
रणमंडळीं सर्व सेना निमाली। बहूसाल संहारली कूळवल्ली॥ १८॥
अगा इंद्रजीता तुवां सौख्य द्यावें। प्रतापें बळें सर्व शत्रू वधावे।
मज सांगसी लाविले मृत्युपंथीं। परी मागुते ते रिपू ऊठताती॥ १९॥
रिपू ऊठती मागुतें हें न व्हावें। बळें सर्व निर्मूळ त्यांचें करावें।
प्रतापें रणीं सर्व पाडून येसी। परी मागुता जीव येतो तयासी॥ २०॥
बहू वेळ त्वां युद्ध सामर्थ्य केलें। परी पाहतां सर्वही व्यर्थ गेलें।
प्रतापें रणीं मारिसी बाणघातीं। समरंगणीं मागुते सिद्ध होती॥ २१॥
महीमंडळीं नाम त्यांचें नसावें। विरा विक्रमा त्वां मज सौख्य द्यावें।
पिता बोलतां धीर पोटीं धरेना। असंभाव्य कोपानळू सांवरेना॥ २२॥
उभा राहिला वाक्य बोले पित्यासी। ह्मणे आजि संहारितों वैरियांसी।
समरंगणामाजि ऐसें न होतां। तरी जाणिजे भेटि ते हेचि आतां॥२३॥
बहू कोपला चालिला वीरजेठी। प्रतापें ह्मणें सर्व जाळीन सृष्टी।
पुढें वानरें बापुडीं दैन्यवाणी। खिळीतों बळें सर्व ब्रह्मांड बाणीं॥ २४॥
पित्याकारणें वीरभद्रू निघाला। तथा दैत्य जाळांधरू सिद्ध जाला।
तयाचेपरी कोपला काळरूपी। बळें चालिला शक्रशत्रू प्रतापी॥ २५॥
तुरें वाजती नाद गेला भुगोळा। दळेंसीं बळें पावला होमशाळा।
तया राक्षसें मागुती होम केला। महावीर मेघासनीं गुप्त जाला॥ २६॥

बळें बूझिलें भूमि आकाश बाणीं । पडों लागलीं वानरें दैन्यवाणी ।
कपीवाहिनीमाजि आकांत जाला । पुन्हा मागुता थोर कल्पांत आला २७
वरी पाहतां युद्धकर्ता दिसेना । धडाडां पडों लागली सर्व सेना ।
महावीर ते घोर मागें गळाले । चळां कापति राघवा आड गेले ॥ २८ ॥
म्हणे राम तो सुग्रिवां मारुता हो । नभोमंडळीं युद्धकर्ता पहा हो ।
प्रतापें बळें वीर सत्रै उडाले । असंभाव्य ते पोकळीमाजि गेले ॥ २९ ॥
महां थोर तें युद्ध सामर्थ्ये नेलें । तया इंद्रजीतें पुढें काय केलें ।
अकस्मात तो भूतळामाजि आला । रणमंडळीं सैन्यसिंधू मिळाला ३०
खटाटोप आटोपिलें शस्त्रपाणी । रुपें कर्कशू काळ कर्कोट[1] वाणी ।
बळें चालिला भार वेष्टीत सेना । रंजें[2] मातलें व्योम पूढें दिसेना ॥ ३१ ॥
कपी वीर राक्षस संन्मूख जाले । समरंगणामाजि युद्धा निघाले ।
पुढें राक्षसें रूप केलें सितेचें । महारम्य लावण्य तें जानकीचें ॥ ३२ ॥
रणीं लोटल्या वीर राक्षसफौजा । कपीभार ऊठावले स्वामिकाजा ।
दळीं राक्षसांचे बळी इंद्रजीतु । बळें चालिला काळ जैसा कृतांतु ॥३३॥
तया देखतां धांविला रुद्र तैसा । करीं घेतला शैल्य ब्रह्मांडऐसा ।
बळी इंद्रजीता उजू धांव घालीं । तवं इंद्रजीतें सिता दाखवीली ॥ ३४ ॥
म्हणे रे कपी हे सिता राघवाची । गुणी स्वामिणी हे तुह्मां मर्कटांची ।
महां पापिणी सर्पिणी दुःखदाती । त्रिकूटाचळीं राक्षसीकूळहंती ॥ ३५ ॥
अशोकावनामाजि हे शोकवल्ली । अकस्मात कोठूनि निर्माण जाली ।
तया दीवसापासुनी दुःख जालें । त्रिकूटाचळा थोर दारिद्र्य आलें ॥३६॥
बळाचे बहू वीर हे पापिणीनें । सखे आमुचे ग्रासिले सर्पिणीनें ।
कळहो मांडला त्यास हे मूळ सीता । करीतों इचा शीघ्र संव्हार आतां ३७
तया राक्षसें मारिलें जानकीला । म्हणे रे कपी सांग त्या राघवाला ।
समरंगणीं शीर छेदूनि नेलें । तया राक्षसें शीघ्र गंतव्य केलें ॥ ३८ ॥
शिरा देखतां मारुती आंग घाली । प्रसंगीं तये मूर्छना सीघ्र आली ।
महाशोक आरंभिला त्या कपीनें । म्हणे काय केलें जगज्जननीनें ॥ ३९ ॥
बहू दुःख मागील तें आठवीलें । उदासीन हे चित्त उद्विग्न जालें ।
म्हणे काय सांगों तया राघवाला । कपी मारुती शोकसिंधीं बुडाला ४०
म्हणे रे कपाळा असें काय केलें । बहू थोर हें पाप माझें उदेलें ।
न सांगों तरी गोष्टि राहों न ये कीं । पुढें सांगतां राघवा दुःख हें कीं ४१
प्रवाहो बळें चालिला अश्रुपाती । विळापें करूं लागला तो रुदंती ।
बळें ऊठिला चालतां चालवेना । रघूनायका भेटला दैन्यवाणा ॥ ४२ ॥

१ भयंकर, विक्राळ. २ धुराळ्यानें. ३ सिंधूंत.

अधोमूख राहोनि कांहीं वदेना । दुःखें दाटला कंठ त्या बोलवेना ।
म्हणे जानकीसारिखी शस्त्रघातें । रणीं मारिली राक्षसें इंद्रजीतें ॥ ४३ ॥
तया सांगतां मांडिला शोक रामें । मिळालीं दळें वानरांचीं विरामें ।
कपीवाहिनीमाजि आकांत जाला । सुमित्रासुतें राम तो शांत केला ४४
भविष्योत्तरें वाल्मिकी सत्य व्हावीं । देहेसांगसंपादणी ते करावी ।
म्हणोनी रघूनायकें शोक केला । तवं वीर बीभीषणू शीघ्र आला ॥४५॥
म्हणे जी प्रभु शोक वायां करीतां । असे सत्य नेमस्त कल्याण सीता ।
अशोका वना दूत म्यां पाठवीले । प्रसंगीं समाचार घेऊनि आले ॥४६॥
तया इंद्रजीतें रणीं माव[1] केली । नव्हे सत्य ते मिथ्य होऊनि गेली ।
परी होम आरंभिला मेघनादें । पुरा जालियां कोण घेईल द्वंद्वें ॥ ४७ ॥
तया इंद्रजीतासि आधीं वधावें । वृथा शोक सांडूनियां सिद्ध व्हावें ।
पुरा होम होतां रिपू आवरेना । समरंगणीं मारितांही मरेना ॥ ४८ ॥
प्रभू जाहली अंग्रिणी[2] व्योमपंथें । वधावा सुमित्रासुताचेनि हस्तें ।
तया सांगतां थोर आनंद जाला । बहूतांपरीं राघवें गौरवीला ॥ ४९ ॥
पुढें राघवाची बहू स्तूति केली । विरांची असंभाव्य मांदी मिळाली ।
सभामंडळीं ते कपी वीर राजे । तया मध्यभागीं महां वीर साजे ॥ ५० ॥
समस्तांसि सोडीलसें इंद्र भावी । समर्था तया ऊपमा काय द्यावी ।
असो राम हा देव ब्रह्मादिकांचा । सुमित्रासुतेंसीं वदे रम्य वाचा ॥५१॥
म्हणे होम आरंभिला इंद्रजीतें । मुखें बोलिलें सत्य नैरुत्यनाथें ।
पुरा होम होतां कदा आवरेना । समरंगणीं मारितांही मरेना ॥ ५२ ॥
प्रतापें समरंगणीं त्या वधावें । बळें आजि ब्रह्मादिका सौख्य द्यावें ।
पुढें ऊठिला शीघ्र सौमित्र[3] कैसा । समरंगणीं तीव्र आदित्य जैसा ॥५३॥
जया देखतां काळ कांपे थरारां । सवें दीधलें राघवें पंच वीरां ।
हनुमंत बीभीषणु जांबुवंतु । सुगंधु कपी ऋशभु वीर्यवंतु ॥ ५४ ॥
महावीर ते पांचही सिद्ध जाले । कपी रीस आणीक कीती निघाले ।
सुमित्रासुतालागिं राजाधिराजें । मुखें बोलिजें शक्तिसामर्थ्यबीजें ॥५५॥
वरू दीधला स्वामि देवाधिदेवें । म्हणे शत्रु जिंकोनिया सीघ्र यावें ।
करू मस्तकीं ठेविला रामचंद्रें । नमस्कार तैसाचि केला फणींद्रें ॥ ५६ ॥
समस्तीं विरींहीं नमस्कार केले । पुढें सव्य घालूनि तैसे निघाले ।
अती आदरें स्कंदभागीं[4] विरानें । सुमित्रासुता घेतलें मारुतानें ॥ ५७ ॥
निघाले महावीर ते लागवेगें । पिता हिंपुटी मारुतीमागमागें ।
पुढें चालती पंथ नीकुंभिळेचा[5] । विरां थोर आवेश काळासि कैचा ५८

१ माया, कपट. २ अशरीरिणी. आकाशवाणी. ३ लक्ष्मणानें ४ कष्टी. ५ निकुंभिला नामक अरण्याचा.

महां थोर तो लंघिला मार्ग तेहीं । पुढें पाहतां पाहतां वाट नाहीं ।
तरूचीं बनें लागलीं तें वितंडें । प्रचंडें उदंडें बहू झाडखंडें ॥ ५९ ॥
भुमी दाटले वृक्ष वृक्षी मिळाले । तया अंतरीं वंश[1] मिश्रीत जाले ।
वरी पाहतां वाड आकाशपंथें । पुढें रीग नाहीं तया वारयातें ॥ ६० ॥
समें वीषमें झाडखंडें अचाटें । मिळालीं बळें वाजती कर्कराटें ।
कडे तूटले थोर त्या पर्वताचे । झरे वाहतीं झाडखंडीं विषाचे ॥ ६१ ॥
तया अंतरीं सिंह शार्दूळ[2] कैसे । मदें मातले गर्जती काळ जैसे ।
गजांचीं बहू दाट थाटें विशेषें । पळों लागती थोर किंकाटघोषें ॥ ६२ ॥
बहू शकटें धांवती रानह्मैसे । रिसें कर्कशें देखतां जीव त्रासे ।
बहू सामरें चीतळें रानगाई । सुन्यां[3] शूकरां मर्कटां मीत्य[4] नाहीं ॥ ६३ ॥
बहू स्वापदें घोर नानापरीची । बहू गर्जती तें बहूतां स्वरांचीं ।
भुतें खेचरें शाक्ति वेताळ पीसे । बहू धांवती वन्हिचे ज्वाळ जैसे ॥ ६४ ॥
बहू व्याळ वेंटाळले झाडखंडीं । वनें व्यापिलीं सर्पकूळीं उदंडीं ।
बहूतांपरीचीं बहू तें विखारें[5] । विषें घोळलीं लोळती थोरथोरें ॥ ६५ ॥
वहाती विषाचे महां वोघ तेथें । धुधूःकारतां ज्वाळ आकाशपंथें ।
गिरीसीं बळें आदळे तोयरासी । बहूसाल त्या तोडिलें पर्वतासी ॥ ६६ ॥
गिरीशृंग पाठार दारीं कपाटें । सिळा सीखरें वृक्ष पाषाण थाटें ।
दरे दर्कुटे थोर भ्यासूरवाणे । बहूतांपरींचे तरू ते पुराणे ॥ ६७ ॥
कडे कापले तोय नेटें भडाडी । गिरीकंदरीं घोष तेणें धडाडी ।
धबाबा नद्या लोटल्या व्योमपंथें । भुमी तूटल्या थोर घातें निघातें ॥ ६८ ॥
महारण्य तें घोर नीकुंभिळेचें । पुढें जावयालागि सामर्थ्य कैचें ।
समुद्रातिरीं दाटलें वीस गावें । पुढें जावया वाट नाहीं स्वभावें ॥ ६९ ॥
भुमी पंथ नाहीं पुढें जावयातें । उडाले महावीर आकाशपंथें ।
समीरासि सांडूनि वेगीं निघाले । बळें शीघ्र नीकुंभिळेमाजि गेले ॥ ७० ॥
पुढें काळ विक्राळ ते वीर गाढे । बळें राक्षसीं घातले सप्त वेढे ।
तया मध्यभागीं विरें इंद्रजीतें । त्वरें आणिलीं होमद्रव्यें बहूतें ॥ ७१ ॥
घटीं मद्य आज्यादिकें मांस नेलें । विरें राक्षसें शोणितें स्नान केलें ।
पुढें वेदिकेमाजि[6] हूताशनू तो । महावीर प्रेतासनीं बैसला तो ॥ ७२ ॥
सहस्रेक[7] आहुतिचा नेम केला । ह्मणे म्यां वधावें नरां वानरांला ।
शतें भक्ति[8] संख्याहुती लागवेगें । त्वरें घातल्या वन्हिमूखीं प्रसंगें ॥ ७३ ॥

१ वेळू. २ वाघ. ३ कुत्र्यांना. ४ संख्या. ५ विषारी. ६ होमकुंडांत. ७ एक हजार एक. ८ नऊशें.

रथू नीघतां हिंसती दिव्य घोडे। उदेले मुखीं आगळे घोंष गाढे।
तया धूर्त बीभीषणा श्रूत जालें। सुमित्रासुतालागि तें जाणवीलें ॥ ७४ ॥
ह्मणे होम पूर्णाहुनीलागि आला। प्रतापें बळें पाहिजे यत्न केला।
ह्मणे शेष[1] गा धन्य बीभीषणा तूं। सवें धाडिलें राघवें याचि हेतु ॥ ७५ ॥
वधूं शीघ्र राक्षस हे बाणघातें। तंवं वारिलें त्यासि नैरुत्यनाथें।
ह्मणे हो प्रभू झुंजतां पूरवेना। पुरा होम होतां रिपू आवरेना ॥ ७६ ॥
तंव बोलिला ऋक्ष तो जांबुवंतु। ह्मणे वीर हो आइका येक मातु।
तुह्मी होम विध्वंसिजे लागवेगे। रणामाजि मी पाडितों दैत्यदुर्गें ॥ ७७ ॥
मुखें बोलिला वीर मेरूबळाचा। सुमित्रासुतू गौरवी रम्यवाचा।
कपी ऋषभें आणि त्या वायुसूतें। बळें घातली धांव आकाशपंथें ॥७८॥
नभीं मुख्य हे वीर दोघे उडाले। कपी रीस ऊदंड धांवोनि गेले।
धबाबां शिळा टाकिल्या व्योमपंथें। बळें होम विध्वंसिला घोर घातें ७९
रथू मोडिला फोडिलीं सर्व पात्रें। विरें पाडिलें कुंड संकेतमात्रें।
पुढें वन्हि वीदारिला वेग केला। कितीयेक राक्षस भंगोन गेला ॥ ८० ॥
रिपू रावणी ध्यान भंगूनि पाहे। तवं भंगिला होम तो दीसताहे।
त्वरें इंद्रजीतू नभीं दृष्टि घाली। तवं ऋषभानें दिशा सीघ्र केली ॥८१॥
बळें होम विध्वंसिला मारुतानें। देहधर्म संपादिला ऋषभानें।
पुढें पाहतां होम भंगोनि गेला। महां वीर राक्षस युद्धा निघाला ॥८२॥
बळें कोपला काळ कृतांत जैसा। महां वीर ऊठावला सीघ्र तैसा।
कपी वीर दोघे त्वरेसीं निघाले। बळें आपुल्या त्या दळामाजि आले॥८३॥
सुमित्रासुतें वाइला चंड मेढा। पुढें चालिला तो बळें वीर गाढा।
कपी लोळ कल्लोळकोट्यान कोटी। दळेंसीं बळें चालिले वीर जेठी॥८४॥
महांवीर ते घोर राक्षस होते। कपी वीर ते धांविले सीघ्र तेथें।
समरंगणीं भार भारीं मिळाले। कितीयेक ते भीडतां भग्न जाले॥ ८५ ॥
दळें लोटलीं राक्षसांचीं अचाटें। समरंगणीं चालिलीं दाट थाटें।
बळें हाणती शस्त्रघातें खणाणा। महींमंडळीं घोंष ऊठे दणाणा ॥ ८६ ॥
असंभाव्य राक्षस मारीत आले। कपी वीर ते भंगिले भग्न केले।
तया देखतां मारुता कोप कैसा। बळें चालिला काळ कृतांत जैसा ॥८७॥
गदा घेतली शीघ्र नैरुत्यनाथें। उडाला कपी ऋषभू व्योमपंथें।
सुगंधू कपी लोटला वीर्यवंतु। बळें आगळा चालिला जांबुवंतु॥ ८८ ॥
कपी काळ कल्पांतिचे मेघ जैसे। रणीं लोटले गर्जती वीर तैसे।
बळें घालिती पालथें या भुगोळा। तिहीं मांडिला आट राक्षसकूळां ॥८९

---

१ शेष, लक्ष्मण.

रणीं हाणती येकमेकां फडाडां। तुटों लागलीं पादपाणी थडाडां।
नद्या लोटल्या शोणिताच्या भडाडां। समरंगणीं घोष ऊठें धडाडां ॥९०॥
रणीं पाडिले दैत्य कोट्यानकोटी। बहूतीं विरों दीधली त्यास पुष्टी।
पुढें देखतां कोपला काळ जैसा। रणीं लोटला रावणी वीर तैसा॥ ९१ ॥
तया राक्षसें घोर संधान केलें। कपीवाहिनीमाजि कल्पांत आलें।
मयूरासि पिंजारलें पुच्छ जैसें। रणीं पाडिले ते कपी वीर तैसे॥ ९२ ॥
कपी मारुतीसारिखे भग्न केले। कितीयेक ते वीर धाकें पळाले।
पुढें पाहतां वीर सौमित्र कैसा। गजा देखतां ऊठिला सिंह जैसा॥९३॥
टणत्कारिलें चाप काळाग्निरोषें। थरारी मही सप्त पाताळ घोषें।
भुमी वर्षता मेघ ऊदंड गारा। चवों लागल्या त्या असंभाव्य तारा॥९४॥
भिडाया रणीं लोटला वीर कोपें। बळें सृष्टि जाळील नेणों प्रतापें।
तवं शीघ्र बीभीषणें वेग केला। गदा घेउनी वीर सन्मूख जाला॥ ९५ ॥
सुमित्रासुतालागिं घालूनि मागें। पुढें धांवला वीर तो लागवेगें।
रणीं देखिला वीर बीभीषणू तो। तया बोलता जाहला रावणी तो॥९६
ह्मणे रे बहूतां दिसां देखिलासी। वृथापुष्ट रे राक्षसांमाजि होसी।
नरें वानरें दास जालासि त्यांचा। मनू भंगिला रे तुवां पूर्वजांचा ॥९७॥
तुज ठाउका कोप माझा कृतांतू। मज इंद्रजीतापुढें मश्यका तूं।
करूं पाहसी थोर सामर्थ्य येथें। समरंगणीं धाडितों मृत्युपंथें॥ ९८ ॥
ह्मणे इंद्रजीतासि नैरुत्यनाथु। बळेंवीण तूं बोलसी व्यर्थ मातु।
मजलागि तों काळ मारूं शकेना। वरू दीधला तोषला रामराणा॥९९॥
बहू सीकवीलें तुह्मां दुर्जनांसी। परी नायका रे तुम्ही पापरासी।
मज सांगतां हीत अव्हेर केला। समस्तांसि येणें गुणें मृत्यु आला १००
मज ताडिलें वैभवाचेनि तोषें। बुडालेति रे सर्व तेणेंचि दोषें।
समस्तांसि मारील हा रामराजा। समरंगणीं मीच पाहेन वोजा॥१०१॥
सभामंडपीं फार त्वां गर्व केला। कळेना तुला मृत्य सन्नीध आला।
तुज आजि मारील सौमित्र बाणीं। मुढा राक्षसा! जाण हे सत्य वाणी॥
बहूसाल धिक्कार केला तयातें। प्रतापें सिमा सांडिली इंद्रजीतें।
पदें ताडितां तो महासर्प जैसा। रणीं कोपला वीर राक्षस तैसा॥१०३
म्हणे रे उभा धीर सन्मूख राहें। समरंगणीं घोर संधान साहे।
बळें सोडिले बाण दारूण आले। सुमित्रासुतें सर्व छेदूनि नेले॥ १०४॥
रणीं घातला रावणानूज पाठीं। प्रतापें पुढें चालिला वीर जेठी।
समरंगणीं अंतकातुल्य भासे। महा वीर तो देखतां जीव त्रासे॥ १०५॥

महां युद्ध होईल दोघां जणासी । पुढें सज्जनीं चित्त द्यावें कथेसी ।
म्हणे दास ऊदास श्रोतीं न व्हावें । ऋषी[1] बोलिला तेंचि हें सार घ्यावें ।

---

७

॥ श्रीराम ॥

फणी रावणी[2] वीर सन्मूख जाले । बळाचे महाकाळ जैसे उदेले ।
करायासि निर्वाण ते येकमेकां । विरश्रीबळें सांडिली सर्व शंका ॥ १ ॥
पुढें बोलता जाहला इंद्रजीतु । कृतांतापुढें निर्बळा मानवा तूं ।
मरायासि तूं व्यर्थ आलासि येथें । निमेषांत मारीन रे बाणघातें ॥ २ ॥
रणामाजि सन्मूख होतां बळेंसीं । समस्तां तुम्हां पाडिलें नागपाशीं ।
पुन्हा मागुते सर्वही बाणजाळीं । निमालेति माझ्या करें युद्धकाळीं॥३॥
अरे काय जाली तुझी शक्ति तेथें । पुन्हा शीघ्र आलासि युद्धासि येथें ।
तुवां आणिलें काय सामर्थ्य जायां[4] । बळें दावितां निर्बळें व्यर्थ वांयां ४
वृथापुष्ट रे हा बहू राजभ्राता । नृपें ताडिला रे सभेमाजि लत्ता ।
समस्तांमधें रावणें भ्रष्टवीला । तुम्हां मर्कटांमाजि तो श्रेष्ठ केला ॥ ५ ॥
बळें आपुल्या रे तुझे पादपाणी । नभामाजि खंडूनि धाडीन बाणीं ।
समस्तां तुम्हां ठाउकी शक्ति माझी । रहाव्यो[5] पुढें काय रे प्राप्ति तूझी ६
बहू बोलिला वाजट्ट घोर शत्रु । प्रतीउत्तरें बोलिला तो सुमैत्रु ।
मि हा कोण तूं नेणसी काय मूढा । वृथा विक्रमू बोलसी वाड गाढा ७
मही रुंद वीस्तीर्ण छपन्नकोटी । गिरी दीग्गजांचीं[6] असंभाव्य दाटी ।
तडागें नद्या मातले भव्य सिंधु । वरी दाटली जीवसृष्टी अगाधु ॥ ८ ॥
असंभाव्य हा भार कोण्हा धरेना । न घेतां पुढें जीवसृष्टी उरेना ।
सहस्रा फणींचा असंभाव्य व्याळु[7] । तयेमाजि येके फणी हा भुगोळु॥९॥
स्वभावें शिरीं ठेविजे पुष्प जैसें । तयासारिखें घेतलें विश्व तैसें ।
तयाहून तो कोण आहे विशेषु । मुढा नेणसी कां स्वयें मीच शेषु ॥१०॥
भविष्योत्तरें सर्वही सत्य व्हावीं । बळें वैभवें राक्षसांचीं दिसावीं ।
म्हणोनि तुवां घेतलें यश युद्धीं । नभामाजि जाऊनि कापट्यबुद्धी ॥११
जनी हीण त्याला बरी वेळ आली । अकस्मात ते कीर्ति होऊनि गेली ।
बळें आगळा राम आत्मा जगाचा । तयाहूनि रे विक्रमु तूज कैंचा ॥१२

---

१ वाल्मीकि ऋषीनें रामायणांत वर्णिलेल्या कथेचें तात्पर्य मी मराठींत सांगत आहे.
२ शेषावतार लक्ष्मण. ३ रावणपुत्र, इंद्रजित. ४ जाण्याचें, चंचळ ५ रहावया. ६ हत्ती.
७ सर्प, शेष.

तुम्हां पापरूपांमधें भक्त येकु । महावीर बीभीषणू पुण्यश्लोकु ।
तयासीं सभामंडपीं गर्व केला । दिसेंदीस राक्षेस सर्वै बुडाला ॥ १३ ॥
रिपू बोलतों जाण रे सत्य वाणी । प्रतापें तुझें शीर छेदीन बाणीं ।
तया बोलतां ताविली[1] भीमदृष्टी । उभा काळ जाळावया जीवसृष्टी ॥१४
बळें छेदिता जाहला वोष्ट्र दंती । सिमा फांकली वैभवाची दिगंतीं ।
करारां रणीं खादल्या वज्र दाढा । शतें सोडिलीं बाण वोढूनि मेढां[2] ॥१५
बळें धाविलीं बाणजाळें उफाळें । लखाखीतसे प्रेरिले दूत काळें ।
तडाडीत घोंषें कडाडीत आले । सुमित्रासुतें सर्व छेदूनि नेले ॥ १६ ॥
पुन्हां कोपला तो रिपू कोटिगूणें । शतांचीं शतें सोडिले बाण तेणें ।
नभामाजि ते बाण बाणी खणाणा । कितीयेक स्फुलिंग भाली फणाणा॥
असंभाव्य ते जाहली बाणवृष्टी । जळों लागली पावकें सर्व सृष्टी ।
अती चंड तें दंड अद्भूत कैसें । महाकाळ कल्पांतिचे मेघ जैसे ॥ १८ ॥
कडाडां खडाडां गडाडां घडाडां । तडाडां थडाडां दडाडां धडाडां ।
बहूतांपरींचे बहू घोष जाले । ग्रहां चंद्र सूर्यादिकां कंप आले ॥ १९ ॥
कितीयेक सिंधूदकें तप्त जाली । कितीयेक तें श्वापदें हीं जळाली ।
असंभाव्य त्या दाटल्या बाणकोटी । बळें झोडिती पाडिती वीरजेठी २०
नभामाजि कल्पांत ते बाणजाळीं । महां युद्ध तें होतसे अंतराळीं ।
रिपू दोघही पेटले घोरमारा । भुमी वृष्टि गारापरी सर्व तारा ॥ २१ ॥
वरी पाहतां बाणबाणी खणाणा । रिपू येकमेकासी तो भेदवेना ।
रथारूढ तो रावणी धांवताहे । पदीं चालतां शेषकक्षां[3] न साहे ॥ २२ ॥
पुढें चालिला वीर तो जांबुवंतु । सिळा घेतली धांविला काळकेतु ।
बळें हाक देऊनियां चक्र चाली । उफाळें सळें तो रणामाजि घाली ॥२३॥
रथा मोडिलें फोडिलें भग्न केलें । सुमित्रासुता रावणी साम्य जालें ।
सुगंधें विरें वैभवें लागवेगें । महां अश्व ते चूर्ण केले प्रसंगें ॥ २४ ॥
महां वीर बीभीषणें मारुतानें । विरांलागि सन्मानिलें थोर मानें ।
भले हो भले थोर आश्चर्य केले । रिपूच्या रथा विक्रमें भंगवीलें ॥ २५ ॥
नभीं सर्व आनंदली देवसृष्टी । बहूसाल संपादिली पुष्पवृष्टी ।
समस्तां मनीं थोर आनंद जाला । रिसीं वानरीं घोष अद्भूत केला ॥२६॥
म्हणे रावणी हा रिपू आवरेना । बहूसाल सामर्थ्य याचें सरेना ।
शरें मारितां सर्व तोडीत आहे । पुढें अग्निशस्त्रासि तो सोडिताहे ॥ २७

१ तप्त झाली. २ दोरीचा पीळ, गांठ, प्रत्यंचा ओढून शेंकडो बाण सोडले. ३ लक्ष्मण व जांबवंत यांना.

तया सोडितां शस्त्र तैसें निघालें । धडाडीत तें तेजपुंजाळ आलें ।
नभीं धूम्र दाटे असंभाव्य ज्वाळा । करूं पाहती भस्म नक्षत्रमाळा ॥२८
असंभाव्य ते चालिली वन्हिधाडी । मही सर्व आकाश तेणें कडाडी ।
बहू धूम्रज्वाळाशिखा धांवताती । भडाडीत नेटें कपीमाजि येती ॥२९॥
कपी ऋक्ष तेणें भयातूर जाले । कितीयेक ते वीर पोटीं गळाले ।
बहू सोडिला धीर नैरुत्यनाथें । म्हणे गा विरा सर्व गेलों अनर्थें ॥ ३० ॥
सुमित्रासुतें देखिलें अग्निशस्त्रा । पुढें सोडिता जाहला मेघशस्त्रा ।
तया सोडितां मेघ तैसे उदेले । गिरीचे परी अंबरीं भार आले ॥ ३१ ॥
नभीं दीसती ते हुडे कोठ झाडें । महामेघ गंभीर गर्जे निवाडे ।
नभ व्यापिला थोर अंधार जाला । दिसेना रणामाजि दोहीं दळाला ३२
नभीं चालिलें तें बहू कीट काळें । झकाकीत सौदामिनीचेनि मेळें ।
बळें मेघधारा असंभाव्य गारा । सुटे कंप सुंसाट घोषें थरारां ॥ ३३ ॥
प्रसंगीं तये पाणजंजाळ जालें । रणमंडळीं तोय अद्भूत आलें ।
कितीयेक झाडें भुमी चूर्ण होती । पुरें पट्टणें सर्व वाहोनि जाती ॥ ३४ ॥
सुमित्रासुतें थोर अद्भूत केलें । जनाला गमे आजि कल्पांत आलें ।
बुडों लागलें भार त्या राक्षसांचे । बहूसाल ते धीर गेले विरांचे ॥ ३५ ॥
रणीं सोडिलें शस्त्र नेटें विझालें । पुढें राक्षसां थोर कल्पांत आलें ।
त्वरें रावणी वायुशस्त्रास सोडी । असंभाव्य तो वात नेटें झडाडी ॥३६॥
कडाडीत पाडें झडाडीत झाडें । बळें पाडिलीं वाड जुंबाड झाडें ।
फुटों लागलीं शैल्यशृंगें खडाडां । कडे चालिले पर्वताचे भडाडां ॥ ३७॥
भ्रमों लागली खेचरें प्रेत जालीं । गृहें गोपुरें येक वेळे उडाली ।
बहूसाल तो वात आवर्त जाला । तया देखतां मेघ नेटें उडाला ॥ ३८ ॥
सुमित्रासुतें देखिला चंड वारा । गिरीशस्त्र सोडूनि केला निवारा ।
असंभाव्य ते चालिलीं शैल्यशृंगें । बहू वात निर्वात केला प्रसंगें ॥ ३९ ॥
गिरी चालिले ते असंभाव्य कैसे । नभीं धांवती मातले मेघ जैसे ।
महावीर तो वज्रशस्त्रास सोडी । रणीं रावणी शैल्य तत्काळ तोडी ॥४०
रिपू राक्षसें शैल्य ते पिष्ट केले । बळें आपुल्या दिग्गजाआड नेले ।
पुढें जाहली ते बहू वज्रदाटी । तया देखता जाहला वीरजेठी ॥ ४१ ॥
पुढें वीर सौमित्र ब्रह्मास्त्र सोडी । तयापासुनी वन्हि नेटें भडाडी ।
गमे कोटि विद्युल्लता येक मेळा । महां लोळ कल्लोळ भासे भुगोळा ॥४२
रणमंडळीं पावकें त्या अचाटें । बळें जाळिलीं सर्व ही वज्र थाटें ।
पुढें चालिल्या त्या असंभाव्य ज्वाळा । रणमंडळीं जाहला येकवेळा ४३

१ विजेच्या.

तया देखतां रावणी तेंचि सोडी । रणमंडळीं येकमेकांसि तोडी ।
रणामाजि तत्काळ सन्मूख आले । महाज्वाळ ते येक होतां विझाले ४४
पुढें घोर रुद्रास्त्र त्या रावणीनें । बळें सोडिलें सीघ्र माहाविरानें ।
रणामाजि तीं चालिलीं येकवेळे । भुमी पाय आकाशपंथीं सिसाळें ४५
बळें धांविलें तें रणामाजि कैसें । गिळाया भुगोळा महाविघ्न जैसें ।
तया देखतां कोप माहा विरांसी । भयें मूर्छना पातली वानरांसी ॥४६॥
तयां देखतां तो फणी सिद्ध जाला । पुढें सोडिलें शीघ्र माहेश्वराला ।
उठे मातला काळ कल्पांतकाळीं । दिशा दाटल्या सर्व आकाश जाळी ॥
रवी कोटि विदुल्लता येक वेळा । रणीं धांवतां कंप जाला भुगोळा ।
महातेज हेलावलें तेचि काळीं । असंभाव्य तें चालिलें ब्रह्मगोळीं ॥४८॥
तयां देखतां शस्त्र मागें पळालें । बहू कूळ तें खेचराचें जळालें ।
पुढें देखतां रावणी भ्रांत जाला । भयें भूलला वारवेना तयाला ॥ ४९ ॥
मनीं भावितो कोण राखेल गेलों । कळेना मला व्यर्थ येथें जळालों ।
तंव शीघ्र रामानुजें काय केलें । प्रतिज्ञापणाला मनीं आठवीलें ॥ ५० ॥
म्हणे हो रणीं शीर छेदूनि न्यावें । म्हणोनी बळें शस्त्र मागें वळावें ।
रणमंडळामाजि वीरें सुमित्रें । बळें वारिलें शस्त्र तें बीजमंत्रें ॥ ५१ ॥
म्हणे मेघनादु मला विघ्न आलें । परी थोर आश्चर्य कां वांचवीलें ।
भला वीर सौमित्र हा वीर्यवंतु । मनासारिखें युद्ध मोठें करीतु ॥ ५२ ॥
असेना पुढें वीर होणार नाहीं । बहू देखिले पाहिले झुंजतांहीं ।
महावीर हे सूर्यवंशी बळाचे । रिपूंलागिं रक्षावया कोण कैचे ॥ ५३ ॥
महावीर दोघे रणीं तेचि काळें । पुन्हा सोडिते जाहले बाणजाळें ।
रणामाजि ते भेदिती येकमेकां । नभीं सोडिल्या बाणभाली अनेकां ५४
रिपूचीं रिपू तोडिती बाणजाळें । पुन्हा मागुतें सोडिती ते उफाळें ।
विरेंवीर तो भेदितांही ढळेना । विरश्रीबळें काय होतें कळेना ॥ ५५ ॥
पुढें काय केलें तया मेघनादें । रणीं हाक देऊनि धांवोनि क्रोधें ।
महां तेजपुंजाळ त्या सीघ्र काळीं । बळें भेदिल्या तीन भाली कपोळीं ॥
महां वीर तो रावणी काळरूपी । पुराणा बहूकाळ कापट्य कोपी ।
सुमित्रासुतू तो दिसे बाळलीळा । बळें भेदिले रक्त वाहे कपोळा ॥ ५७ ॥
तया देखतां कोप नैऋत्यनाथा । बळें चालिला पाववायासि व्यथा ।
रणीं हाक देऊनि बीभीषणानें । गदा घेतली चालिला थोर त्राणें ॥ ५८ ॥
तया देखतां त्या दशग्रीवसूतें । रणीं विंधिला पाडिला बाणघातें ।
पुढें देखतां कोपला वीर गाढा । सुमित्रासुतें वाइला चंड मेढा ॥ ५९ ॥

---

१ मस्तक, शीर्ष. २ माहेश्वर नामक अस्त्र. ३ प्रत्यंचा ओढला, धनुष्य सज्ज केलें.

रणीं रावणी लक्षिला तेचि काळीं । बळें भेदिल्या बाणभाली कपोळीं ।
नवां बाणघातीं रिपू खस्त केला । तया मेघनादा बहू खेद जाला ॥६०॥
कपोळीं बळें भेदिले बाण वीरें । प्रवाहो बळें चालिलासे रुधीरें ।
महां मस्तकामाजि सर्वै बुडाले । कपोळावरी पीछेबासिंग जालें ॥ ६१ ॥
ह्मणे वीर बीभीषणू वीरछत्रा । बरें ऊसिणें घेतलें गा सुमैत्रा ।
रिपू रावणी तापला वीर कैसा । शुळें टोचितां ऊठला सर्प जैसा ॥६२॥
महावीर निर्वाणिचे बाण सोडी । लघू लाघवें शेष तत्काळ तोडी ।
असंभाव्य कोपानळें तीव्र ज्वाळा । मुखें सोडितां काळ कांपे चळाळां ॥
सिमा सांडिली थोर कल्पांत काळीं । महावीर ते खीळिले बाणजाळीं ।
बहू खोंचलें देह दोघां जणांचे । झरे चालिले वाहती शोणिताचे ॥६४॥
विरश्रीबळें दुख नाहीं प्रतापें । रणीं भेदिती येकमेकांसि कोपें ।
बहू माजलें युद्ध तें वोसरेना । बळी भीडती येकमेकां सरेना ॥ ६५ ॥
पुढें काय केलें सुमित्रासुतानें । गुणीं साज्जिलें त्या रवीचक्र बाणें ।
मुखीं धांवती त्या शिखा पावकाच्या । बहू चंचळ कोटि वीद्युल्लतांच्या ॥
कडाडीत कोपानळें बाणभाली । बळें सोडितां शीघ्र तैसी निघाली ।
भयातूर दोहीं दळीं कंप जाले । ऋसी देव गंधर्व धाकें पळाले ॥ ६७ ॥
गृहादीक आकाशपंथीं जळाले । बहू खेचरें भार भूमी गळाले ।
ध्वनी ऊठिली घोर घोषें तडाखा । बळी कांपती ईतरां कोण लेखा ॥६८॥
सुमित्रासुतें शीघ्र संधान केलें । रणीं रावणी शीर छेदुनि नेलें ।
समस्तां सुरांलागि आनंदवीलें । सुरेशा मनींचें बहू शैल्य गेलें ॥ ६९ ॥
रणामाजि तो इंद्रजीतू निमाला । समस्तां सुरांलागि आनंद जाला ।
महाकंटकू थोर संहार केला । त्रिलोकीं बहू कीर्तिचा घोष गेला ॥७०॥
पुढें शेष सुगंध बीभीषणानें । दळें सर्वही सिद्ध केलीं विरानें ।
कपीसी सुवेळाचळा राम जेथें । महावीर ते चालिले सर्व तेथें ॥ ७१ ॥
प्रभू राम तो बंधुची वाट पाहे । उतावेळ पोटीं वियोगा न साहे ।
बहूसाल चिंता करी बांधवाची । ह्मणे कोण वेळा सुमित्रासुताची ॥७२॥
तया बोलतां भार तैसे उदेले । दळेंसी बळें यश घेऊनि आले ।
समर्थां प्रभूला नमस्कार केले । रघूनायका भेटले स्वस्थ जाले ॥ ७३ ॥
सुमित्रासुताचा देह स्वस्थ जाला । पुढें राघवें वैद्य पाचारवीला ।
मुखें बोलिला राम तो वीरबाहो । करावा अतीआदरें दिव्य देहो ॥ ७४ ॥
रणीं इंद्रजीतासी प्राणांत जालें । कपी ऋशभानें सवें शीर नेलें ।
निचेष्टीत काया रणीं स्तब्ध ठेली । प्रियेलागि सांगावया भुज[1] गेली ॥७५॥

---

१ भुजा, हात. इंद्रजिताचा हात सुलोचनेच्या अंगणांत जाऊन पडला.

त्रिकूटाचळीं भूवनें रावणाचीं । तयासारिखीं रम्य नीकुंभिळेचीं ।
तया भूवनामाजि सूलोचना ते । सुखें वैभवाची बरी वेळ जाते ॥ ७६ ॥
अकस्मात तेथें ध्वनी घोष जाला । परीचारिका[1] सांगती भुज आला ।
भुमी रम्य राजांगणें पाचबंदीं । पुढें भुज तेथें श्रवे रक्तबिंदी[2] ॥ ७७ ॥
मनामाजि वोसावली[3] दीव्य बाळा । रणामाजि भर्तार त्या कोण वेळा ।
भ्रमें चित्त दुश्चित्त बाहेरि आली । फणीचे परी भुज ते वोळखीली ॥७८॥
खुणा दाविलें लीहिलें पत्र[4] तेथें । म्हणे चालिलों मी पुढें मुक्तिपंथें ।
तुजकारणें धाडिली मूळ बाहे[5] । प्रिये चाल वेगीं तुझी वाट पाहें ॥ ७९ ॥
तया वाचितां थोर आंकांत जाला । दुःखामाजि तो सौख्यसिंधू बुडाला ।
मनीं वैभवाची तिनें सांडि केली । त्रिकूटाचळा जावया सिद्ध जाली ॥
बहू पूतळ्या पिंजरे पक्षयाती । तये भोंवतींभोंवतीं रूदताती ।
अवो माय आम्हांसि सांडूनि जाशी । तुजवेगळीं सर्व आम्ही विदेशी ॥
तयालागि संबोखिलें रम्य वाणी । तुम्हां रक्षिता देव तो शूळपाणी ।
मिळाले बहू लोक ते दाटि जाली । शिबीकेमधें भुज वेगीं निघाली ॥८२
विसोरे[6] बहूसाल नानापरीचे । आळंकार भांगार[7] ते सुंदरीचे ।
धनें संपदा पाहतां मित्य[8] नाहीं । तिनें वांटिलें लूटिलें सर्व कांहीं ॥८३॥
पुढें शीघ्र ते अश्विनीरूढ[9] जाली । बहू वेग लंकापुरीमाजि गेली ।
नमस्कार केला तया रावणाला । पुढें वाचितां पत्र आकांत जाला ॥८४
रणीं झुंजतां इंद्रजीतू निमाला । बहू नायकांचा ध्वनी घोष जाला ।
दुःखें व्याप्त लंकापती आंग घाली । शरीरीं नसे शुद्धि–सर्वै उडाली ८५
प्रधानीं बहूतांपरीं सांवरीला । पुढें रावणा कोप तत्काळ आला ।
म्हणे आजि संहारितों वैरियाला । दळेंसी रणा जावया सिद्ध जाला ॥
म्हणे सासुऱ्यालागि सूलोचना ते । घडीनें घडी आमुची वेळ जाते ।
समर्थें मला शीर आणून द्यावें । पुढें काय मानेल तैसें करावें ॥ ८७ ॥
शिरें आणितों आजि आठां जणाचीं । मुखें तीव्र क्रोधानळें रावणाचीं ।
रिपू दोघ बीभीषणा अंगदाचें । रिसा सुग्रिवा मारुता ऋशभाचें ॥ ८८ ॥
बहूसाल तो कोप रायासि आला । पुढें मंदिरामाजि नेलें सुनेला ।
तयेलागि मंदोदरी हीत सांगे । रघूनायका भेट गे लागवेगें ॥ ८९ ॥
अवो देखिलें स्वप्न म्या घोरवाणें । निमाले रणीं सर्व राक्षस प्राणें ।
नव्हे स्वप्न हें वाटतें साच आहे । दिल्हें राज्य बीभीषणालागि पाहे ॥९०

---

१ दासी. २ रक्ताचे बिंदु गळाले. ३ चकित झाली. ४ त्या भुजानें सर्व वृत्तांत लिहून दाखविला. ५ बाहु, भुजा. ६ चित्रें ७ सोन्याचे अलंकार. ८ मिति, गणना. ९ घोड्यावर बसली.

ग्रहे सूटले तूटली पाशबेडी । पुढें सोडिले देव तेतीस कोडी ।
त्रिलोकीं उभी राहिली रामगुढी । पुढें साच होईल ऐसीच प्रौढी ॥९१॥
म्हणोनी तुवां शीघ्र आतां उठावें । दिनाचेपरी रामचंद्रा वदावें ।
करुणास्वरें राघवा वोळगावें[1] । बहूतांपरीं शीर मागोन घ्यावें ॥ ९२ ॥
त्वरें ऐकतां ऊठिली शब्द नेटें । पुढें वानिती भाटवेताळथाटें[2] ।
कपीवाहिनीनें महद्भूत केलें । त्वरें बोलती जानकी पाठवीलें ॥ ९३ ॥
म्हणे राम हें सर्वथाही घडेना । रिपू मारिल्यावीण दृष्टी पडेना ।
असंभाव्य सेना सभा दाटली ते । पुढें शीघ्र सूलोचना भेटली ते ॥९४॥
पुढें देखतां राम सूखें निवाली । कृपा भाकितां ते नमस्कार घाली ।
कृपासागराची बहू स्तूति केली । सुशब्दें रघूनायकें तोषवीली ॥ ९५ ॥
प्रसंगीं तये थोर आश्चर्य जालें । निचेष्टीत शीरें[3] बरें हास्य केलें ।
कृपें पाहिलें रामचंद्रें भुपाळें । पती ऊठवीतों तुझा शीघ्र काळें ॥ ९६ ॥
खुणा दाविती हो वळावें दयाळा । सभे घालिती येकमेकांसि डोळा ।
कपी वीर ते सांगती कानगोष्टी । पुढें ऊठतां सर्व आटील सृष्टी ॥ ९७ ॥
वदे ऋक्ष स्वामी बरेंसें विचारा । रिपूला नुठावें[4] कदा ऊपकारा ।
वदे मारुती राघवालागि रागें । रघूनायकें सांडिली गोष्टि मागें ॥ ९८ ॥
उदासीन देखोनि सूलोचना ते । नमस्कार केला त्वरें चालिली ते ।
प्रभू सव्य घालूनि तैसी निघाली । मनोभावना सर्वही सिद्ध केली ९९
समुद्रातिरीं भीमकुंडा प्रचंडा । बळें चेतल्या अग्निशीखा उदंडा ।
दशग्रीव मंदोदरी राजभारें । सवें चालिलीं ग्रामलोकें अपारें ॥ १०० ॥
ऋसी देव गंधर्व मांदी[5] मिळाली । समस्तीं तयेची बहू स्तूति केली ।
करीती ऋसीनायका अक्षवांणें[6] । उडी घातली अग्निमुखीं फुरांणें[7] ॥ १ ॥
मनामाजि होती मनांतील हेतु । पुढें देखिला इंद्रजीतु समर्थु ।
सती आदरें मुक्तिपंथासी गेली । कथा राहिली पाहिजे चालविली ॥२॥
फणीगर्भरत्नास[8] हो दग्ध केलें । म्हणे दास हें राक्षसी कृत्य जालें ।
पुढें सज्जनीं चित्त द्यावें कथेला । महाशक्ति भेदील रामानुजाला ॥ ३ ॥

---

१ शरण जावें. २ वेताळ व भाट यांचे समुदाय. ३ इंद्रजिताच्या शिरानें. ४ न उठवावा. ५ समुदाय. ६ औषणें, ओवाळणें. ७ स्फूर्तीनें. ८ शेषकन्या सुलोचना तिला.

८

॥ श्रीराम ॥

सुमित्रासुतें पाडिला इंद्रजीतु । रणीं ग्रासिला काळ जैसा कृतांतु ।
दळें फूटलीं वीर मागें पळाले । कितीयेक घायाळ लंकेंत गेले ॥ १ ॥
सभामंडपीं वीर घालूनि[1] मेटें । भूमी पीटिती थोर दुःखें ललाटें ।
मुखें बोलती इंद्रजीतु निमाला । पुरीमाजि तो थोर आकांत जाला ॥ २ ॥
तया रावणा मूर्छना सांवरेना । भुमी आंग घाली कदा आवरेना ।
स्त्रियापुत्रकन्यादिकें तोंड घेती । प्रसंगीं तये थोर जाली रुदंती ॥ ३ ॥
त्रिकूटाचळीं मृत्यु आला बहूतां । समस्तांसि संहार हे मूळ सीता ।
सुपारश्व[2] संबोखितां तें प्रसंगीं । पिशाचापरी ऊठिला लागवेगीं ॥ ४ ॥
अशोका वनामाजि तो सीघ्र गेला । सितेलागि मारावया सिद्ध जाला ।
पुढें देखतां ते भयातूर जाली । सुपारश्व धांवोनियां आड घाली ॥ ५ ॥
बहूतांपरीं राव तो बोधवीला । पुढें रावणु क्रोध सांडूनि ठेला ।
महावीर दोघे पुरीमाजि आले । रणा जावयालागि ते सिद्ध जाले ॥ ६ ॥
पुढें पाठवीलीं दळें सिद्ध होतीं । रथी सारथी हस्त घोडे पदांती ।
महाविक्रमें चालिले राजभारें । दणाणीतसे मेदनी थोर भारें ॥ ७ ॥
असंभाव्य तें सोडिलीं बाणजाळें । कपी टाकिती थंड शीळा उफाळें[3] ।
महावीर संघट्टले येकमेकां । बळें भेदिती दूरि टाकूनि शंका ॥ ८ ॥
महां मार आरंभिला वानरांतें । पुढें बाण कार्मूक तें सिद्ध होतें ।
उभा राहिला विक्रमें वीर कैसा । बळें सर्व संहारिता काळ जैसा ॥ ९ ॥
बहूसाल तीं सोडिलीं बाणजाळें । तुटों लागलीं राक्षसांचीं सिसाळें[4] ।
असंभाव्य तें पोकळीमाजि जाती । पुरे धांव तेथूनियां खालि येती ॥ १० ॥
बहूसाल संहार केला दळाचा । करी कोण लेखा तया घायळांचा[5] ।
रणीं राघवें लाविलें घाय वारें । पळाले पुरीमाजि ते घोर मारें ॥ ११ ॥
भयें बोलती सांगती रावणाला । रणामाजि तो सर्व संहार जाला ।
असंभाव्य तो कोपला गर्वरासी । पुढें धाडिलें शीघ्र तीघां[6] जणासी ॥ १२ ॥
विरूपाक्ष युध्यन्मतु आणि मत्तु । रथारूढ होऊनियां लंकनाथु ।
महाशस्त्र सामाग्रिया तो समर्थु । बळें चालिला रुंधिला राजपंथु ॥ १३ ॥
असंभाव्य सेना पुढें आणि मागें । रणमंडळा चालिला लागवेगें ।
बहूसाल वाद्यें पुढें येकवेळा । समरंगणीं नाद गेला भुगोळा ॥ १४ ॥

---

१ गुडघ्यांत डोकें खुपसून. २ अमात्य सुपार्श्व. ३ आवेशानें ४ मस्तकें. ५ घायाळ झालेल्यांचा. ६ विरूपाक्ष, युद्धोन्मत्त महोदर व मत्त महापार्श्व असे तीन राक्षस.

रथा घोडियां कुंजरां दाटि जाली। उफाळें बळें चंड सेना निघाली।
बहू शस्त्रपाणी बहु छत्रछाया। बळें वोळले मेघ जैसे पडाया॥ १५॥
उभा राहिला रावणू राजभारें। तिघे वीर ते भीडती घोरमारें।
पुढें देखतां रावणां सांवरेना। उभा राहतां धीर पोटीं धरेना॥ १६॥
बळें रावणें वाइलीं चंड चापें। बहूसाल ते बाण सोडी प्रतापें।
असंभाव्य तें सोडिलीं बाणजाळें। तुटों लागलीं पादपाणीसिसाळें॥१७॥
कपी सर्वही भेदिले मुख्य शत्रु। रणमंडळीं गर्जला तो अमित्रु।
कपी खोंचले नेट पोटीं धरेना। पराधीक[1] तें सुग्रिवां साहवेना॥ १८॥
बळें हाक देऊनि तैसा निघाला। तया पाठिसीं तो विरेंवीरें[2] आला।
कितीयेक ते वाड जुंबाड हाती। कितीयेक ते धांवती शृंग घेती॥ १९॥
कितीयेक घेऊनियां चंड शीळा। कितीयेक फीराविती भिंडिपाळा[3]।
कितीयेक ते झाडिती शस्त्रधारा। कितीयेक घेऊनि आले कुठारा॥२०
कितीयेक ते खड्ग घेऊनि आले। कितीयेक ते शूळपाणी मिळाले।
कितीयेक लोहागळा[4] ते प्रसंगीं। कितेकीं गदा घेतल्या लागवेगीं॥२१॥
कितीयेक घेऊनि आले दशघ्नी[5]। कितीयेक घेऊनि आले शतघ्नी।
किती तोमरें पट्टिशेंसीं[6] निघाले। कितीयेक ते शूळ घेऊनि आले॥२२॥
किती फर्शपाणी किती चक्रपाणी। कितीयेक तेवी खट्वांगपाणी[7]।
कपीनायकाभोंवती दाट थाटें। रणीं धांवती वीर ते कडकडाटें॥ २३॥
बहूतांपरीचीं बहूसाल शस्त्रें। बळें हाक देती विशाळें वर्क्त्रें[8]।
कितीयेक आसीळता[9] झाडिताती। कटारा सुऱ्या वीर घेऊनि येती॥२४
पुढें रावणें देखिला थोर यावा[10]। असंभाव्य त्या सुग्रिवाचा उठावा।
कपीचक्र ते थोर अद्भूत आले। मनामाजि तें थोर आश्चर्य केलें॥ २५॥
कपींचा रणीं लोळकल्लोळ आला। गजारूढ माहामतु सिद्ध जाला।
तया रावणा देखतां युद्ध होतें। बहू मांडिला आट त्या राक्षसातें॥२६
गजारूढ माहामतु शैल्य जैसा। सिळा टाकितो वीर सुग्रीव तैसा।
गजा मस्तकीं ते सिळा चंड आली। गराळूनि तो कुंजरु आंग घाली॥
गजा पाडितां छेदिला वोष्ट्र दंतीं। बळें चालिला शूळ घेऊनि हातीं
म्हणे साहें रे सांहें[11] तूं सुग्रिवाला। शुळा टाकितां वीर वर्ता उडाला॥२८

१ शत्रूचा उत्कर्ष. २ एकुणएक वीर. ३ भिंदीपाल नामक हत्यार. ४ लोखंडाचा अडसर. ५ दहाजणांचा संहार करणाऱ्या तोफा म्ह० दशघ्नी; शंभरांचा करणाऱ्या म्ह० शतघ्नी. ६ पट्टे घेऊन. ७ खट्वांग=सोटा, गदा. ८ वक्त्रें, तोंडानें. ९ असिलता, तलवारी. १० वानर समूह. ११ सहन कर, सोस.

पुढें शूळ मोडूनियां लागवेगीं । गदाघात हाणी तया पृष्ठभागीं ।
महावीर तो घोर मारें निमाला । रणीं राक्षसां थोर संहार जाला ॥२९
विरेंवीर राक्षेस ते भग्न जाले । कपी धीट ते नीट मारीत आले ।
तया देखतां वीरुपाक्षु निघाला । बहूसाल धिक्कारिलें सुग्रिवाला ॥३०॥
पुढें सुग्रिवें वाड जुंबाड हातें । रिपूचे रथीं टाकिलें घोर घातें ।
वरी पाहतां झाड संन्मूख आलें । विरें बाण टाकून छेदूनि नेलें ॥ ३१ ॥
सिळा टाकिली चंड त्या सुग्रिवानें । बळें फोडिली बाणघातें विरानें ।
पुन्हां राक्षसें घोर संधान केलें । कपी सुग्रिवें तुच्छ मानूनि नेलें ॥३२॥
पुढें सुग्रिवें शृंग त्या आचळाचें[1]। करीं घेतलें अग्र मंद्राचळाचें ।
बळें टाकिली ते शिळा घोर घातें । विरूपाक्ष तो चालिला मृत्युपंथें ॥
रणीं राक्षसां पातली मृत्युवेळा । पुढें रावणें देखिलें त्यासि डोळां ।
आहा रे ह्मणे काय जालें कपाळा । भयें भूलला पातली कंपवेळा ॥३३
पुढें रावणें पाहिलें सव्यभागीं । महावीर युध्यन्मतु ते प्रसंगीं ।
तया बोलिला पाहसी काय वीरा । महावीर तो पेटला घोरमारा ॥३५॥
रथारूढ होऊनियां सुग्रिवाला । पुढें शीघ्र पाचारिला त्या कपीला ।
शरांचीं शतें टाकिलीं राक्षसानें । विरश्रीबळें साहिलीं सुग्रिवानें ॥३६॥
पुढें सुग्रिवें घेतली चंडशीळा । बळें टाकिली त्यासि लक्षूनि डोळां ।
शिळा फोडिली राक्षसें बाणघातें । बहू कोप आला तया सुग्रिवातें॥३७
शिळा घेतली दूसरी सुग्रिवानें । पुन्हां टाकिली चंड माहाविरानें ।
तया राक्षसें फोडिलें ते शिळेला । महां वीर तो धीर देतो दळाला ३८
कपीनाथ सुग्रीव देखोनि ऊणें । बहू कोपला वीर तो कोटिगूणें ।
बळें लांगुळें घाव हाणे महीला । गदें ताडिलें पाडिलें त्या रथाला ॥३९॥
निमाले गदा लागतां दिव्य घोडे । रथू वीघडे चूर्ण होऊनि मोडे ।
पडे सारथी दैन्यवाणा उताणा । विरा राक्षसा मूर्छना सांवरेना ॥ ४० ॥
रणीं ऊठिला वीर तो सिद्ध जाला । गदा घेतली हाकिले सुग्रिवाला ।
बळें हाणतां झेलिली त्या कपीनें । पुन्हां हाणती येकमेकां गदेनें ॥ ४१ ॥
बळाचे महावीर दोघे प्रतापी । गदा हाणती भीडती काळरूपी ।
गदाघातसंघट्टणीं वन्हिवृष्टी । तया पावकें जाळिली सर्व सृष्टी ॥ ४२ ॥
बळें हाणतां भंगले सर्व कांहीं गदा टाकिल्या घेतले शूळ तेहीं ।
रणीं भीडतां शूळ ते चूर्ण जाले । महांवीर ते मल्लयुद्धासि आले ॥४३॥
दणाणा रणामाजि ते मुष्टिघातें । बळें हाणती येकमेकां निघातें ।
कपी सुग्रिवें दीधली वज्रमुष्टी । महावीर तो पाडिला प्रेतसृष्टी ॥ ४४ ॥

१ अचलाचें, पर्वताचें.

तया देखतां मत्त धांवोनि आला । रणमंडळीं हाकिलें अंगदाला ।
बहू त्रासिता जाहला घोरवाणी । तेणें अंगदा भेदिलें पंचबाणीं ॥ ४५ ॥
तया मूर्छना देखतां जांबुवंतें । महावीर तो ताडिला वृक्षघातें ।
विरें राक्षसें वृक्ष छेदूनि नेला । रणीं भेदिला ऋक्ष तो भग्न केला ॥४६॥
रणीं भेदिलें देखिलें त्या रिसाला । गवाक्षा विरा थोर आवेश आला ।
पुढें लक्षिता जाहला राक्षसातें । बळें ताडिला थोर पाषाणघातें ॥ ४७॥
विरें शीघ्र पाषाण तो भग्न केला । शरें नीकुरें भेदिलें त्या कपीला ।
गवाक्षू कपी तो भुमी आंग घाली । तवं अंगदें मूर्छना सांवरीली ॥४८॥
करीं सार आसीळतेसीं[1] निघाला । बळें हाक देऊनि सन्मूख आला ।
कठोरें करें ताडिलें राक्षसातें । महां मत्त तो चालिला मृत्युपंथें ॥ ४९ ॥
रणमंडळीं शांति जाली रिपूची । दळें गर्जतीं जाहलीं वानरांचीं ।
उणें देखतां रावणा कोप आला । प्रतापें रणामाजि युद्धा निघाला ॥५०
रथू लोटिला रावणें शीघ्रकाळें । बहूसाल तें सोडिलीं बाणजाळें ।
पुढें देखतां राम तत्काळ छेदी । पुन्हा रावणू घोर संधान साधी ॥ ५१ ॥
नभीं सोडिले बाण कोट्यानकोटी । असंभाव्य ते जाहली थोर दाटी ।
महामेघ तो मोकली मेघधारा । रघूनायकें छेदिले ते सरारां ॥ ५२ ॥
पुढें रावणू थोर कोपें कडाडी । करी गर्जना मेघ जैसा घडाडी ।
बहू कोपला तो असुरास्त्र सोडी। तेणें चालिल्या त्या नभीं चक्रकोडी॥
असंभाव्य तीं चालिलीं घोरचक्रें । महां तेजपुंजाळ त्यांचीं वगत्रें[2] ।
कपीवाहिनीमाजि तें येक वेळें । तुटों लागलीं वानरांचीं सिसाळें[3] ॥५४॥
पुढें देव गंधर्वशस्त्रास सोडी । तेणें तोडिल्या सर्वही चक्रकोडी ।
रणीं रावणू रुद्रशस्त्रास्त्र घाली । शुळामूसळांची नभीं दाटि जाली ॥५५॥
धुधांटें[4] कपीच्या दळामाजि यावें । तंव योजिलें तें महाशस्त्र देवें ।
महाघोर माहेश्वरी मूळमंत्रें । तया सोडितां सूटली वज्रशस्त्रें ॥ ५६ ॥
लोहो मूसळें तें गदा शूळ हातें । बळें तोडिलें पाडिलें वज्रघातें ।
दशग्रीव तो क्षोभला काळ जैसा । तेणें भेदिलें पंचबाणी सुरेशा ॥ ५७॥
रिपूबाण वर्मांग भेदूनि गेले । दळीं रावणाचे महाघोष जाले ।
वपू भेदिली रावणीं पंचबाणीं । चळेना रणीं राम तो वज्रठाणी ॥ ५८ ॥
रणीं ऊसिणें घेतलें राघवानें । दशग्रीव तो भेदिला सप्तबाणें ।
महादुःख जालें तया रावणाला । सुमित्रासुता थोर आवेश आला ॥५९॥
तया अग्रजालागि घालूनि मागें । महावीर तो चालिला लागवेगें ।
सुमित्रासुतें बाणघातें निघातें । रिपूसारथी धाडिला मृत्युपंथें ॥ ६० ॥

---

१ असिलता—तलवार घेऊन. २ वक्त्रें, मुखें. ३ शीर्षें. ४ झंझावातानें.

पुढें मागुतें थोर संधान केलें । रिपूच्या धनुष्यासि छेदूनि नेलें ।
तया वीर बीभीषणा कोप गाढा । रणीं चालिला चंड वाऊनि मेढा ॥ ६१ ॥
तेणें पाडिलें अष्ट तुरंगमातें । ध्वजस्तंभ तो छेदिला बाणघातें ।
रथू सारथी सर्वही भग्न केला । दशग्रीव दूजे रथीं स्वार जाला ॥ ६२ ॥
महाशक्ति ब्रह्मी तया रावणानें । अनुजावरी टाकिली ते फुराणें ।
कडाडीत धांवे महावीज जैसी । करी शेष मागें रिपूबांधवासी ॥ ६३ ॥
सुमीत्रासुतें थोर संधान केलें । महाशक्तिला सीघ्र छेदूनि नेलें ।
शरें तोडितां पावकें वृष्टि केली । कितीयेक राक्षेससेना निमाली ॥ ६४ ॥
रणीं रावणु तो कडाडीत कोपें । सिमा सांडिली घोर रूपें प्रतापें ।
धुधुःकार सांडीत घर्डीत दाढा । अनर्थासि ऊठावला वीर गाढा ॥ ६५ ॥
महाशक्ति काढूनि मायासुराची । बहूकाळ सन्नीध ते सैवरांची ।
तयेलागि त्या रावणें सिद्ध केलें । जयेमाजि ब्रह्मांड बिंबोनि गेलें ॥ ६६ ॥
कडाडीत घोषें धडाडीत ज्वाळा । तडाडी नभामाजि नक्षत्रमाळा ।
महावीर ते थोर धाकें गळाले । विमानीहुनी देव नेटें पळाले ॥ ६७ ॥
सुमित्रासुता लक्षिलें रावणानें । त्वरें टाकिली शक्ति महावीरानें ।
बळें आदळे ते अकस्मात आंगीं । रणीं वीर सौमित्र तो प्राणत्यागी ६८
दळीं वानराचे हाहाकारु जाला । महावीर सौमित्र युद्धीं निमाला ।
कपी वीर नैऋत्य धांवोनि आले । तयाभोंवते वीर सर्वै मिळाले ॥ ६९ ॥
पुढें शोक आरंभिला राघवानें । तया वारिलें शीघ्र बीभीषणानें ।
म्हणे काय जी स्वामिया कोण वेळा । उभा रावणू तो पिटावा भुपाळा ॥
सुमित्रासुता मारिलें तो उभासे । कपीवाहिनी थोर कल्पांत भासे ।
प्रभू शोक सांडूनि वेगीं उठावें । धनुर्बाण घेऊनियां सीद्ध व्हावें ॥ ७१ ॥
रणीं रावणें भेदिला ब्रह्मचारी । मिळाले कपी देखिला जैत्यहारी ।
बळें हाक देऊनि क्रोधें नरेंद्रें । सिमा सांडिली रामकाळाग्निरुद्रें ॥ ७२ ॥
करीं बाण कोदंड चंड प्रतापी । रणीं रावणा भासला काळरूपी ।
पुढें देखतां पातली कंपवेळा । उभा राम ग्रासील नेणों भुगोळा ॥ ७३ ॥
पळू सूटला रावणा कंप देहीं । भयें भूलला न स्मरे युद्ध कांहीं ।
पडे चांचरे धांवतां थोर धाकें । पुढें पाहतां राम सर्वत्र देखे ॥ ७४ ॥

१ धनुष्य सज्ज करून. २ धाकट्या भावावर, बिभीषणावर. ३ लक्ष्मणानें त्याला मागें खेंचून आपण त्या शक्तीचा छेद केला. ४ मयासुरानें कन्येच्या म्ह० मंदोदरीच्या विवाहसमयीं रावणाला दिलेली घोर शक्ति त्यानें यावेळीं लक्ष्मणावर टाकली. ५ दिसतो. ६ जैत्या म्ह० जिंकलेपणाचें यश–तें हरण करणारा रावण.

रणीं पाडिलीं दैत्यकूळें अपारें। तेणें रावणा लागलें घायवारें।
बळें झोडितां थोर नेटें पळाला। चळी कांपतु गर्व ताठा गळाला ॥७५॥
रणीं भ्रष्टला तो भयातूर जाला। पुढें रावणू मंदिरामाजि गेला।
समाचार मंदोदरीलागि बोले। म्हणे आजि युद्धीं बहू कष्ट जाले॥ ७६ ॥
समाचार तो सर्वही सांगताहे। म्हणे काय होणार तें होत आहे।
बहूतांपरीं त्वां मला सीकवीलें। परी मूर्ख मी सर्वही तुच्छ केलें॥ ७७ ॥
करूं काय आतां प्रिये सांग वेगीं। बहू बोलता जाहला ते प्रसंगीं।
त्वरें काळनेमी पुढें पाठवीला। स्वयें शीघ्र ऊठोन होमास गेला॥ ७८ ॥
पुढें चालिला वीर तो काळनेमी। बहूसाल तो थोर कापट्यकर्मी।
हनूमंत जाईल द्रोणागिरीला। पथीमाजि तो बैसला योग केला॥ ७९ ॥
वनें पोफळी कर्दळी नारिकेळी। बनें आंवळी जांबळी रम्य वोळी।
बहू वृक्षयाती बहू पुष्पजाती। बहू कूप बावी तळी वोघ वाती॥ ८० ॥
वनें पावनें जीवनें भूवनें ते। सुखें गोमुखें रम्य वृंदावनें तें।
तिरें सुंदरें बांधले सार वोटे। अकस्मात तें देखतां सौख्य वाटे॥ ८१ ॥
रणीं पाडिला वीर सौमित्र जेथें। मिळाले कपी ऋक्ष ते सर्व तेथें।
समस्तां मनीं लागली थोर चिंता। कपी बोलती नासलें कार्य आतां॥
पुढें राघवा शोक तो आवरेना। धरीतां बळें धीर पोटीं धरेना।
मिळालीं दळें भोंवतीं दैन्यवाणी। विळापें वदे राम कारुण्यवाणी ॥८३॥
पुढें बोलता जाहला वैद्य तेथें। प्रभू शोक केल्यां पुढें काय होतें।
म्हणे औषधी शीघ्र त्या आणवाव्या। न जातां निशी[1] सर्व देहीं पिळाव्या॥
बहूसाल तो पंथ दूरस्थ आहे। करा वेग हा काळ जातो न राहे।
समस्तांकडे पाहिलें राघवानें। कपी बोलते जाहले सर्व मानें॥ ८५ ॥
बळासारिखी बोलिली सर्व सेना। निशीमाजि तो आचळू आणवेना।
रघूनायकें पाहिलें मारुताला। कपीराज तो शीघ्र ऊदीत जाला॥ ८६ ॥
म्हणे राम गा मारुती ये प्रसंगीं। विरासारिखी शक्ति तूं बोल वेगीं।
वदे मारुती स्वामि देवाधि देवा। गिरी आणितों सीघ्र सांगाल तेव्हां ८७
तया बोलतां राघवा सूख जालें। प्रितीउत्तरें त्या कपी गौरवीलें।
म्हणे मारुता जाय गा ये प्रसंगीं। गिरी आणिला पाहिजे रात्रभागीं ८८
म्हणोनी तुवां सीघ्र आतांचि जावें। विरा लक्ष्मणालागि त्वां ऊठवावें।
कपी मारुती वीर तैसा उडाला। अकस्मात तो आश्रमी[2]माजि आला॥
स्थळें निर्मिलीं रम्य नानापरीचीं। बहूसाल तें भूवनें कूसरीचीं।
मुनी बोलती हो पुढें शीघ्र यावें। फळें तोय भक्षूनि सूखें रहावें॥ ९०॥

१ सूर्योदयापूर्वी. २ काळनेमी राक्षसानें उभारलेल्या कपट–आश्रमांत.

म्हणे मारुती राहतां पूरवेना । तृषा लागली धीर पोटीं धरेना ।
मुनीनें तडागा जळा दाखवीलें । जळा सेवितां थोर अद्भूत जालें ॥९१॥
जळांतून धांविन्नली ते विशाळा[1] । विरें मारुतें देखिलें तीसि डोळां ।
मिठी घातली मारुतें चूर्ण केली । तिच्या मेदमांसें भूमी तृप्त जाली ९२
निघाली तयेंतून ते दिव्य कांता । निरोपी मुखें सर्व साकल्य वार्ता ।
म्हणे राक्षसु बैसला कूडभावें[2] । समर्थां प्रभु त्यास आधीं वधावें ॥ ९३ ॥
नव्हे मिथ्य साचार हें सांगतें मी । प्रभू धाडिला रावणें काळनेमी ।
तये बोलतां मारुती वाड जाला । ऋसी ऊठिला सीघ्र युद्धा निघाला ॥
महावीर राक्षस कैसा कुकर्मी । बहूसाल ते जाहले काळनेमी ।
प्रसंगीं तये थोर संग्राम जाला । कपीच्या करें काळनेमी निमाला ॥९५
विरें सुंदरीलागि उद्धार केला । उडाला बळें तो नभामाजि गेला ।
गिरी चंद्र टाकूनियां लागवेगीं । कपी वीर द्रोणाचळीं ते प्रसंगीं ॥ ९६ ॥
वटा वेढिता जाहला शेष जैसा । गिरी घेतला सीघ्र बांधोनि तैसा ।
उडाला नभामाजि तो लागवेगें । बळें जातसे मारुती व्योममार्गें ॥ ९७ ॥
कपी लागवेगें बळें जात आहे । महीमंडळीं तेज हेलावताहे ।
अयोध्यापुरीमाजि रामानुजानें[3] । कपी भेदिला पाडिला येक बाणें ॥९८
मुखें रामनामावली बोलताहे । महावीर तो त्यासि येऊनि पाहे ।
म्हणे कोण तूं सांग आम्हा कपी रे । बहूसाल तू दीससी साक्षपी रे ९९
मुखीं रामनामें सखा वाटतोसी । विरा कोण तू कोठपरियंत जासी ।
म्हणे मारुती वोखटें थोर जालें । सुमित्रासुतालागि देहांत आलें ॥ १००
समाचार सांगीतला मारुतीनें । मुखें बोलिलें सीघ्र रामानुजानें ।
कपी कष्टलासी बहू दूरि जातां । सुखें बाणमूखावरी बैस आतां ॥ १ ॥
त्वरें पाठवीतों विरा सीघ्र जावें । पुढें राहिलें कार्य सीद्धीस न्यावें ।
म्हणे मारुती सर्वथाही घडेना । उडाला नभीं लंघितो देश नाना ॥ २ ॥
त्रिकूटाचळीं राम तो वाट पाहे । विरेंवीर तो सर्वही बैसलाहे ।
अवस्था बहू लागली आवरेना । बहू रात्रि जाली कपी कां दिसेना ॥३॥
बहू राम तेथें उतावेळ जाला । अकस्मात तो मारुती शीघ्र आला ।
कपी सर्व आनंदले गर्जताती । प्रभूलागि सांगावया शीघ्र जाती ॥ ४ ॥
मनीं चिंतिले शीघ्र हातासि आलें । तयासारिखें तें समस्तांसि जालें ।
सुषेणें रसू काढिला औषधीचा । क्षतांमाजि तो वोतिला अमृताचा ॥५
सुमित्रासुतालागि आरोग्य जालें । समस्तीं विरीं मारुता गौरवीलें ।
त्वरें ऊठिला वीर सौमित्र बा हो । रघूनायकें देखिला दिव्यदेहो ॥ ६ ॥

१ भयंकर मकरी. २ कुड्या भावानें, कपटानें. ३ भरतानें.

कपीरामसौमित्रमेळा मिळाला। गिरी मारुती शीघ्र ठेऊनि आला।
पुन्हा मागुती मागुती येकमेकां। तया देखतां सौख्य जालें अनेकां ॥७॥
कथा ऐकतां नासलें कार्य होतें। महां विघ्न तें भग्न होऊनि जातें।
सुखानंद आनंद नानाविळासीं। अखंडीत प्रचीत हे रामदासीं ॥ ८ ॥

---

९

॥ श्रीराम ॥

म्हणे वीर सौमित्र स्वामी समर्था। बळें तोडिजे थोर चत्वार[1] चिंता।
सुरेशासि हो मुक्त आधीं करावें। अरिभ्रातया राज्य हें शीघ्र द्यावें ॥१॥
कपीराज हा राज्य त्यागूनि आला। कपींसीं पुन्हा पाहिजे शीघ्र गेला।
प्रभू नीजबंधूसि त्या भेटि द्यावी। अयोध्या पुरी सर्व सूखी करावी ॥२॥
म्हणे सीघ्र त्या रावणाच्या वधांतीं। समाधान तें पाविजेतें समस्तीं।
म्हणोनी त्वरें हेंचि आतां करावें। बळें सर्व लोकत्रया सौख्य द्यावें ॥३॥
वदे रावणानूज वाक्यें प्रमाणें। प्रभू कल्पवृक्षातळीं काय ऊणें।
परी होम आरंभिला रावणानें। पुरा जालियां भीडिंजे[2] त्यासि कोणें ॥४॥
कपीवीर ते पाठवावे भुपाळें। महाहोम विध्वंसिजे सीघ्र काळें।
रिपू रावणू तो रणामाजि येतां। पुढें पाठवावें तया मुक्तिपंथा ॥ ५ ॥
प्रभु हेर ते गुप्त लंकेसि गेले। समाचार साकल्य[3] घेऊनि आले।
कपींद्राकडे पाहिले राघवानें। विरां जाणवीलें तया सुग्रिवानें ॥ ६ ॥
पुढें ग्रंथसंख्यां[4] कपी सिद्ध जाले। सहस्त्रें दहा वीर मागें मिळाले।
हनुमंतु तारासुतु जांबुवंतु। गवायु सुषेणु बळी वीर्यवंतु ॥ ७ ॥
सुगंधू कपी नीळ तो शर्भ नामें। महां मैद द्वीवीध तो वीर धर्में।
सहस्त्रें दहासीं बळें सिद्ध जाले। महां वीर ते होमपंथें निघाले ॥ ८ ॥
कितीयेक राक्षस ते रक्षणासी। कपीनें बळें युद्ध केलें तयासीं।
मुखें हाकिती हाणती थोर नेटें। तया पूसती रे दशग्रींव कोठें ॥ ९ ॥
गुहेचें मुखीं लाविली चंड सीळा। तये भोंवते जाहले वीर गोळा।
सिळेनें सिळा फोडिली घोर घातें। कपी चालिले ते गुहेचेनि पंथें ॥१०॥
पुढें मारुती चालिला लागवेगें। कपी सर्वही चालिले मागमागें।
महांयोगियाचे परी बैसला तो। नभीं पावकू तो धडाडीत जातो ॥११॥

---

१ इंद्रादि देवांना बंधमुक्त करणें, बिभीषणास लंकेचें राज्य देणें, सुग्रीवाला आपल्या देशीं परत पाठविणें व भरताला भेट देणें ह्या चार चिंता. २ तोंड देणें, सन्मुख होणें. ३ संपूर्ण. ४ दहा.

तया हाणते जाहले द्रूमपाणी[1]। मुखें हाकिती टाकिती घोरवाणी।
शिळा शिखरें हाणती तो उठेना। कपी लोटिती ध्यान त्याचें सुटेना १२
कितीयेक ते गर्जती कर्णबीळीं। मुखामाजि ते टाकिती येक धुळी।
विरीं वानरीं मांडलीसे धुमाळी। बहूतांपरी ताडिला होमकाळीं॥ १३॥
बहूतांपरीं मांडिले प्रेत्न नाना। परी रावणू कांहिं केल्यां उठेना।
विरें अंगदें थोर वीचार केला। बळें शीघ्र अंतःपुरामाजि गेला॥ १४॥
बहूसाल अंतःपुरे त्या सुनारी। तयामाजि मंदोदरी मुख्य नारी।
तियेलागि घेऊनि वेगीं उडाला। महावीर तेथें अकस्मात आला॥१५॥
अळंकार चीरें करें चूर्ण केलीं। बहु भूषणें कंकणें भग्न जालीं।
कपी कंचुकी केश वोढूनि घेती। विटंबूनि लोटूनियां शीघ्र देती॥१६॥
अरे रावणा घे तुझी नीज कांता। जगज्जननी आणिली व्यर्थ सीता।
तिचें ऊसणें काढिती द्रूमपाणी। वदे मुख्य मंदोदरी दैन्यवाणी॥ १७॥
अहो प्राणनाथा असें काय केलें। तुम्हां देखतां कां मला कष्टवीलें।
महा रम्यनेत्रीं जळें वोघ जाती। विळापें करूं लागली ते रुदंती॥ १८॥
करुणास्वरें रावणालागि बाहे। प्रभू धांव रे वानरु नेत आहे।
प्रसंगीं तये थोर आकांत जाला। भुमीकंप होतांचि पाहों निघाला १९
पुढें अंगदा लात हाणोनि पाडी। तया जांबुवंतासि वेगीं लिथाडी।
कितीयेक ते ताडिले मुष्टिघातें। किती वोढिले पाडिले व्योमपंथें॥२०॥
नभीं ऊर्ध्व पाहोनि वेगीं उडाला। बळें झोडिलें पाडिलें मारुताला।
धरी हृदईं सीघ्र मंदोदरीला। विवेकेंचि संबोखिलें ते वधूला॥ २१॥
अहिल्या सती ते शिळारूप होती। विचारूनि पाहें नळाची दमंती।
बहू कष्टली मुख्य वृंदा पुलोमा। सिता सुंदरी सांगणें काय तुम्हां॥२२॥
बहूतांपरी ते सती तोषवीली। पती धाडितां भूवनामाजि गेली।
दळें सिध केलीं रथारूढ जाला। रणींशूर संग्रामसैरा निघाला॥ २३॥
प्रतापें बळें वाहिनी घोर चाले। कपी वीर ते सर्व पूर्वींच गेले।
पुढें सोडिता जाहला बाणजाळें। बळें धांवती प्रेरिले दूत काळें॥ २४॥
कपीभार ऊठावले लागवेगें। करीं घेतलीं वृक्षपाषाणशृंगें।
बळें टाकिते जाहले द्रूमपाणी। रणीं रावणें भेदिले सर्व बाणीं॥ २५॥
गळाले महावीर धाकें पळाले। चळीं कांपती राघवा आड गेले।
उभा राहिला राम तो वीर गाढा। करीं घेतला चंड[2] वाऊनि मेंढा॥२६॥
बहू बाण सोडी महावीर कैसा। रणीं जोभला काळ कृतांत जैसा।
महावीर ते दोघ सन्मूख जाले। बळें सोडिती बाण बाणीं मिळाले २७

१ वृक्ष हातीं घेऊन. २ धनुष्य.

रणमंडळी तोडिती बाण बाणीं । बहू मातली ते विरश्री फुराणी ।
पुन्हा रावणें सोडिल्या बाणकोडी । लिळाविग्रही राम तत्काळ तोडी २८
बहू क्षोभले व्योम संपूर्ण केलें । शरीं दाटलेसें नभीं थाट जालें ।
बळें तोडिती येकमेकां विरांचे । पुन्हा मागुते भार येतीं शरांचे ॥ २९ ॥
रणीं झुंजती ते महावीर बा हो । मोहो पातले तें भयें केत[1] राहो[2] ।
बुध मंगळा थोर देहांत आला । शनी सोम तो आपधाकें पळाला ॥३०॥
ग्रहानें ग्रहे भूतले प्रेत जाले । विमानीहुनी देव धाकें पळाले ।
दिशा दिग्गजा व्यापिलें अंतकाळें । बळी द्वीदळीं कापती ते चळाळें ३१
महावीर तें मातले घोरमारें । दिशा दाटल्या व्यापिलें अंधकारें ।
पुढें पाहतां अंधकारें दिसेना । ध्वनी मातली ऊठिले घोष नाना ॥ ३२ ॥
महांवीर दोघे रणीं स्तब्ध जाले । पुढें पाहतां बाण बाणीं गळाले ।
पुन्हा मागुते हाणती येकमेकां । भरें नीखुरें[3] दूरि टाकूनि शंका ॥ ३३ ॥
पुढें रावणू पंन्नगाशस्त्र सोडी । तेणें चालिल्या त्या नभीं सर्पकोडी ।
उभे वानरांमाजि आकांत जाले । मुखें बोलती सर्प रे सर्प आले ॥ ३४ ॥
गरुडास्त्र तें राम सोडी भडाडां । नभीं चालिलीं पक्षकूळें झडाडां ।
तिहीं तोडिलीं सर्पकूळें तडाडां । कपी गर्जती नामघोषें घडाडां ॥ ३५ ॥
पुढें रावणें सोडिलीं तीं अचाटें । नभीं चालिलीं थोर गंधर्वथाटें[4] ।
भुमी पाय आकाशपंथीं सिसाळें । बहू भार ते चालिले येकवेळे ॥ ३६ ॥
निवारावया राम तो तेंचि सोडि । नभामाजि तें शस्त्र शस्त्रासि तोडी ।
वमी रावणू थोर क्रोधाग्निज्वाळा । रुपें जाहला घोर कर्कोट काळा ३७
शरा अस्त्र तें सोडिलें लंकनाथें । बहूसाल वर्षाव केला अनर्थें ।
महां सिंह नानापरी सर्प जैसे । महामत्त व्याघ्रांपरी बाण तैसे ॥ ३८ ॥
गज-अस्त्र सोडूनि राजीवनेत्रें । असंभाव्य तीं चालिलीं वज्रशस्त्रें ।
तिहीं सर्वही बाण छेदूनि नेले । कपीभार ते थोर आनंदवीले ॥ ३९ ॥
तया रावणा क्रोध पोटीं भडाडी । कडाडीत कोपें रणीं बाण सोडी ।
अकस्मात रामावरी स्पर्श जाला । गडाडीत मेघापरी घोष केला ॥ ४० ॥
रथारूढ जाला रणीं लंकनाथु । पदीं चालतु रामराजा समर्थु ।
नभीं देव ते देखवेना तयाला । रथूं[5] मातुळी सीघ्र तो पाठवीला ॥ ४१ ॥
बहू शस्त्रमंडीत रत्नी विराजे । वरी अंतकातुल्य तो राम साजे ।
नभीं दुंदुभीघोष आकाश गाजे । तया रावणाअंतरीं क्रोध माजे ॥ ४२ ॥

---

१ केतु. २ राहु. ३ पूर्ण निश्चयानें. ४ गंधर्वास्त्रें. ५ इंद्रानें आपला सारथी " मातली " यांस रथासह पाठविलें.

पुढें बोलता जाहला घोर वाणी । तुला साह्य जाला रणीं वज्रपाणी[1] ।
उभा रे रिपू खीळितों आजि बाणीं । तुसीं झुंजतां थोर वाटे शिराणी[2] ४३
तुझा बंधु म्यां पाडिला येक वेळा । रणमंडळीं देखिलें त्वांचि डोळां ।
तयासारिखें तूज मारीन आतां । पतंगापरी जाळितों जातजातां ॥४४॥
पुढें ऐकतां राम बोले तयाशी । म्हणे ऐक रे रावणा गर्वराशी ।
असंभाव्यें[3] रे वैभवें मातलासी । मराया रणीं आजि तूं पातलासी ॥४५॥
म्हणे राम रे रावणा वीरधर्में । रणामाजि मी तूज मारीन नेमें ।
पळालासि कोठें तऱ्ही हें सुटेना । तुझी मृत्युवेळा कदा पालटेना ॥४६॥
रिपू जाण रे तूजला मृत्यु आला । दिल्हें अक्षयी राज्य बीभीषणाला ।
सितेकारणे थोर कापट्य केलें । अभाग्या! तुझें सर्वही राज्य गेलें ॥४७॥
तया बोलतां कोपला वीर गाढा । रणामाजि त्या घर्डिल्या वज्रदाढा ।
पुढें शूळबाणें करी सज्ज मेढा । बळें वोढितां चूकला रामवोढा ॥ ४८ ॥
कडाडीत घोंषें रणीं तेचि काळीं । रघूनायका बैसले बाण भाळीं ।
असंभाव्य तो कोपला चापपाणी । दशग्रीव तो भेदिला शीघ्र बाणीं ४९
बळें मारिती वारिती बाणजाळें । पुन्हा क्षोभले धांवती ते उफाळें ।
रथीं सारथी पाडिती अश्व जे कां । विरें नीकरें[4] भेदिलें येकमेकां ॥५०॥
रिपू कोपला थोर काळाग्नि जाला । तया रावणा थोर आवेश आला ।
प्रतापें रणीं राघवें येकवेळे । बळें फोडिलीं बाणघातें कपोळें ॥ ५१ ॥
बळें छेदिता जाहला वोष्ट्र दंतीं । बहूबाण ते सोडिले व्योमपंथीं ।
कितीयेक ते राघवें चूर्ण केले । कितीयेक ते बाण अंगीं बुडाले ॥ ५२ ॥
तया देखतां रावणू हाक फोडी । असंभाव्य तो मागुते बाण सोडी ।
बळें अश्व तो मातुळी भग्न केला । ध्वजस्तंभ तो शीघ्र छेदूनि नेला ५३
भयातूर ते भार गोळांगुळांचे । ऋषी देव गंधर्व इत्यादिकांचे ।
रणीं आगळें दाखवी लंकनाथु । भयें बोलती मांडला कीं अनर्थु ॥ ५४ ॥
पडे मातुळी अश्व ते पोळवीले । ऋषी देव गंधर्व साशंक जाले ।
कपी बोलती मांडले विघ्न हें कीं । रणामाजि त्या रावणें जींकिलें कीं ॥
अगस्ती ऋषी तो रणामाजि आला । रवीमंत्र[5] सांगे रघूनायकाला ।
जपे राम तो आदरें मूळ मंत्रें । रवी शीघ्र येऊन दे सार शस्त्रें ॥ ५६ ॥
म्हणे राघवा जिंकिसी रावणाला । अती काळ हा वेळ नाहीं तयाला ।
पुढें राघवें विंधिले पंचबाणी । तुरंगें रणीं पाडिलीं दैन्यवाणी ॥ ५७ ॥

---

१ इंद्र. २ हौस, लाभ. ३ अपरंपार, अफाट वैभवानें माजलास. ४ आवेशानें, त्वेषानें.
५ 'आदित्य हृदयनामक मंत्र'.

विरें सारथी धाडिला मृत्युपंथें। ध्वजस्तंभ तो छेदिला बाणघातें।
रणीं राघवें चूर्ण केलें रथाचें। बळें ऊसिणें घेतलें मातुळीचें ॥ ५८ ॥
पुन्हा राघवें मागुतें तेचि काळीं। रिपू भेदिला बाणजाळें कपोळीं।
सुरां देखतां थोर आनंद जाला। महद्भूत तो वानरीं घोष केला ॥ ५९ ॥
असंभाव्य त्या राक्षसा कोप आला। बळें टाकिलें शीघ्र तेणें शुळाला।
रणीं फोडिली हाक नैऋत्यनाथें[1]। म्हणे शूळ आला प्रभू व्योमपंथें ॥६०॥
बहू बाणसंभार जातां जळाला। पुढें शूळ पाशूपतें[2] भग्न केला।
पुन्हा राघवें घोर संधान केलें। असंभाव्य तें पोकळीमाजि[3] गेलें ॥६१॥
सुरेशें गिरी फोडिले वज्रघातें। तयाचे परी भेदिलें रावणातें।
देहे चाळिला बाण पैलाड गेले। महीमंडळामाजि जातां विझाले ॥६२॥
पुन्हां सोडिलीं राघवें बाणजाळें। बहूसाल सुंसाटती अंतराळें।
रथीं खीळिला प्राण व्याकूळ जाला। बहू मूर्छना सांवरेना तयाला ६३
रिपू भेदिला थोर लक्षूनि वर्मे। उगा राहिला राम तो वीरधर्में।
रथू सारथी शीघ्र घेउनि गेला। पुढें शुद्धि जाली तया रावणाला ॥६४॥
बहू कोप आला तया रावणासी। म्हणे सारथ्या तूं भयातूर होसी।
रथू काढिला कां तुवां लागवेगीं। न येतां उणें दीसतें ये प्रसंगी ॥६५॥
म्हणे सारथी स्वामियां हो उदारा। रिपू पेटला तो रणीं घोर मारा।
रथारूढ राया तुम्ही वीकळांगें[4]। म्हणोनी रथू काढिला लागवेगें ॥६६॥
तया बोलतां राव संतुष्ट जाला। समर्पीतसे हातिच्या कंकणाला।
बहू वेग केला तया लंकनाथें। रथू फीरवीला रणाचेनि पंथें ॥ ६७ ॥
रणीं माजल्या त्या बहू प्रेतराशी। पुढें जावया वाट नाहीं रथासी।
भुमी दाटली मेदमांसें अचाटें। रथांगें बळें वाजती चर्चराटें ॥ ६८ ॥
समरंगणीं रावणू शीघ्र आला। वदे घोर वाणी तया राघवाला।
नुलंघी सिमा सीघ्र मृत्युंजयाला। रणीं कोण लेखा तुला मानवाला ६९
असंभाव्य तो रावणू बाण सोडी। नभीं वांकुडीचे परी ते झडाडी।
उफाळें बळें धांवती दिव्य घोडे। रथामाजि संघटणी घोष गाढे ॥७०॥
धुरा ऊलथों पाहती सीघ्र मागें। विरीं वोढिले वाग[5] ते लागवेगें।
रथामाजि तो पैस ऊदंड जाला। विरां मागुता थोर आवेश आला ॥७१॥
रणीं रावणा राघवा युद्धकाळुं। रिपूभारसंव्हार भूतां सुकाळु।
करीं चंड कोदंडमंडीत बाणीं। उभे राहिले शूर ते वज्रठाणीं ॥ ७२ ॥
बळी येकमेकांसि ते घोर शब्दें। बहू भाषणें त्रासिती वीर द्वंदें।
बळें धांवती क्षोभले वीर क्रोधें। पुढें मारिती शस्त्र क्रोधें विरोधें ॥७३॥

---

१ बिभीषणानें. २ पाशुपतास्त्रानें. ३ आकाशांत. ४ विकलांग, अवयवहीन. ५ दोर.

रणीं लोटला राम हा सूर्यवंशी । महां युद्ध आरंभिलें रावणेंशीं ।
उभे राहिले काळ कृतांत जैसे । महावीर त्या घोर आकांत भासे ॥ ७४
बळें सोडितां शक्ति नेटें सरारी । महावात विख्यात पिछें भरारीं ।
मही सप्तपाताळ घोषें गरारी । पळालीं भुतें काळ पोटीं थरारी ॥ ७५ ॥
फणी कूर्म वाराह थक्कीत जाले । विमानाहुनी देवऋषी पळाले ।
ग्रहे सोमसूर्यादि पोटीं गळाले । कपी खेचरां दिग्गजां कंप जाले ॥७६॥
प्रसंगीं तये थोर उत्पात जाला । नदीं शोणीताचा बळें पूर आला ।
धुमारें बहू दाटलेंसे दिगंतीं । असंभाव्य ते ऊलुकापात[1] होती ॥ ७७ ॥
बळें कोपले रुद्र काळाग्नि जैसे । अरी राय ते मातले भीम तैसे ।
तया झुंजतां कोण कोण्हास वारी । रणीं भीडती काळ कोदंडधारी ७८
रिपू सोडिती घोरशस्त्रें सणाणा । बळें वाजती बाणभाली खणाणा ।
बहूसाल स्फुल्लिंग जाती फणाणा । महींमंडळीं घोष ऊठे दणाणा ॥७९॥
महाशक्ति ते काळरूपें कडाडी । असंभाव्य ते ज्वाळवन्ही भडाडी ।
मही मेरु मांदार घोषें धडाडी । बळें शोकला सिंधु पोटीं तडाडी ॥८०॥
पुढें राघवें लक्षिलें रावणातें । बळें मस्तकें तोडिलीं बाणघातें ।
गिरीशीखरांचे परी तें विशाळें । पुन्हा नीघती कंठनाळें ढिसाळें[2] ॥८१॥
शिरें देखतां राम चक्कीत जाला । म्हणे मृत्यु नाहीं गमे रावणाला ।
वदे मातुळी स्वामि देवाधिदेवा । सुधावक्ष[3] भेदूनि शत्रू वधावा ॥ ८२ ॥
कुपी फोडिली बाणघातें निघातें । तेणें रावणू चालिला मृत्युपंथें ।
ऋषी देव गंधर्व ते सर्व तोषें । विमानीं सुखें गर्जती नामघोषें ॥ ८३ ॥
नभीं दुंदुभी वाजती येक नादें । बहूतांपरीची बहूसाल वाद्यें ।
ध्वनी दाटले पूर्ण ब्रह्मांड घोषें । कपी गर्जती नामघोषें विशेषें ॥ ८४ ॥
सुखानंद आनंदली जीवसृष्टी । विमानीहुनी जाहली पुष्पवृष्टी ।
ऋषी देव गंधर्व सर्वै मिळाले । विणे वाउनी नारदादीक आले ॥ ८५ ॥
मिळाल्या सुखें नायिका अष्टभावें । करीं ताळ मृदांग वीणे स्वभावें ।
कळा कौतुकें दाखवीती प्रसंगें । गुणी नाचणी[4] नाचती रागरंगें ॥ ८६ ॥
बहू गायनें थोर गंधर्व गाती । कळा ऐकतां देव थक्कीत होती ।
जयांच्या आलापें देहेभाव जाती । मृगें श्वापदें लोधल्यां[5] त्या विजाती ॥
रूपें सुंदरी किन्नरी दिव्य यंत्रें । बहूसाल विद्याधरी गूणपात्रें ।
उठे राग कल्लोळ सप्तस्वरांचा । गमे वोळला मेघ हा अमृताचा ॥ ८८ ॥

१ उल्कापात, तारापतन. २ प्रचंड. ३ अमृतमय वक्षस्थळ. ४ कलावंतिणी. ५ लुब्ध झाल्या.

तुरें वाजती अंबरीं शंख भेरी। जयो पावला राम लीळावतारी।
सुरां मानसीं थोर आनंद जाला। महाघातकी रावणू तो निमाला ॥८९
समस्तां सुरां मानसीं सूख जालें। परी दुःख बीभीषणा प्राप्त केलें।
रणीं रावणू श्रेष्ठ बंधू निमाला। झळंबे मनीं शोक उत्पन्न जाला ॥ ९० ॥
रुदंती प्रसंगीं ध्वनीं घोष जाला। झळंबे मनीं दुःख बीभीषणाला।
अहाहा अहाहा मुखें बोलताहे। विळापेंचि तो श्वास टाकीत आहे ९१
बहू लोटले वोघ नेत्रोदकाचे। दिनाचेपरी शब्दकारुण्य वाचे।
घडीनें घडी तो भुमी अंग घाली। अरिभ्रातया शुद्धि सर्वै उडाली ९२
देहभाव सांडूनि तो रूदताहे। मोहोजाळ होतांचि आक्रंदताहे।
बहूतांपरीचें बहू सौख्य दिल्हें। मनामाजि तें सर्वही आठवीलें ॥ ९३ ॥
मुखें श्वास सांडूनि पाणी चुरीतो। भुमी मस्तकू आपटीतो पिटीतो।
म्हणे वीर तो वोखटा काळ आला। त्रिकूटाचळाचा अळंकार गेला ९४
नव्हे रावणासारिखा संपतीचा। नव्हे रावणासारिखा व्युत्पत्तीचा।
बहू सांगतां वैभवालागि कांहीं। प्रतापी तयासारिखा वीर नाहीं ॥ ९५ ॥
मनाचा उदारु धनाचा कुबेरु। बहूसा विचारु जनीं दानशूरु।
गळाला बहू धीर त्या राक्षसांचा। महीमंडळीं धाक गेला सुरांचा ॥९६॥
बहूतां जणाचें बहू भाग्य गेलें। गमे सर्व ब्रह्मांड हें वोस जालें।
जयाकारणें देव लीळावतारी। तयाच्या गुणा तूळणा कोण सारी ॥९७॥
उदासीन वाटे जनीं पाहवेना। मनीं स्वस्थ नाहीं कदा राहवेना।
गताच्या गुणें वीर तो मग्न जाला। तयालागि वारावया राम आला ९८
उभा चापपाणी वदे रम्य वाणी। सदा सर्वदा गाइजे जो पुराणीं।
म्हणे गा विरा थोर आश्चर्य जालें। मोहोसागरीं ज्ञानतारूं बुडालें! ९९
तयासारिखें आजि हो दीसताहे। प्रभू बोलतां वीर तत्काळ राहे।
करीं घेतलें शीघ्र बीभीषणाला। दिनाचा दयाळु दळामाजि आला १००
म्हणे राम बीभीषणा बुद्धिवंता। रणीं रावणालागि देहांतव्यथा।
तुम्ही शीघ्र अंतःपुरामाजि जावें। समस्तांसि पाहावया आणवावें ॥१०१॥
समर्थामनीं लागली सर्व चिंता। पराअंतरा जाणता सौख्यदाता।
तयाची कथा ऐकतां दुःख नासे। चरित्रें बरीं अंतरीं दास तोषे ॥ १०२ ॥

---

## १०

॥ श्रीराम ॥

तया रावणालागि देहांत आलें । प्रधानासि बीभीषणें पाठवीलें ।
तुम्ही सीघ्र अंतःपुरामाजि जावें । समस्तांसि पाहावया आणवावें ॥ १ ॥
प्रभू बोलतां वीर तैसे निघाले । पुढें सीघ्र अंतःपुरामाजि गेले ।
समस्ता वधू मार्ग लक्षीत होत्या । उदासीन उद्विग्न चिंतातुरा त्या ॥ २ ॥
तंव देखिलें तें अकस्मात डोळां । भयातूर त्या कंप सूटे चळाळां ।
तयामाजि मंदोदरी मुख्य नारी । तये सांगती वो निमाला सुरारी ॥ ३ ॥
प्रसंगीं तये थोर कल्लोळ जाला । रणामाजि तो सौख्यसिंधू बुडाला ।
भुमी लोळती रूदती येकवेळा । देहे व्यस्त हाणोनि घेती कपाळा ॥ ४ ॥
समस्तां जणीचे महाशब्द जाले । दुःखाचे तया योग सर्वै मिळाले ।
मुळें बोलती थोर आघात जाला । समस्तां सुखाचा अळंकार गेला ॥५॥
धुळी टाकिती ऊर हाणोनि घेती । धरेंनां[1] असंभाव्य जाली रुदंती ।
चिरें फाडिती ते अळंकार गेले । भुमी लोळती मोकळे केस जाले ॥ ६ ॥
पुढें सर्व राजांगना त्या निघाल्या । दशग्रीव तेथें रणामाजि आल्या ।
रणीं कांत देखोनि आकांत केला । बहू पाप हो वोखटा[2] काळ आला ७
अकस्मात तें सर्व सौभाग्य गेलें । समर्था प्रभू कां उदासीन केलें ।
समस्तांसि शोकार्णवीं मोकलीलें । असंभाव्य हें दुःख ठाकूनि आलें ॥८॥
म्हणे राम बीभीषणा जाय आतां । बहूतांपरीं तोषवावें समस्तां ।
निमाल्यांवरी[3] वैर कां हो करावें । विवेकेंचि मंदोदरी नीववावें ॥ ९ ॥
कृपासागरें वीर तो पाठवीला । अकस्मात राजांगनांमाजि आला ।
प्रबोधेंचि नानापरी शांत केल्या । समस्ताजणी भूवना पाठवील्या ॥१०॥
पुन्हा मागुता वीर तत्काळ आला । म्हणे हो प्रभू पाठवीलें तयांला ।
वदे मागुता राम बीभीषणातें । रणीं रावणु अग्नि द्या जा तयातें ॥ ११ ॥
पुढें ऊठिला तो रणामाजि आला । यथासांग त्या रावणा वीधं[4] केला ।
समुद्रीं शुचिमंत होऊनि आला । नमस्कार केला तया राघवाला ॥१२॥
वदे राम तैसाचि त्या बांधवातें । कपीनाथ सुग्रीव राजा तयातें ।
तुम्ही शीघ्र नैऋत्यनाथासि न्यावें । विधीयुक्त भद्रासनीं बैसवावें ॥१३॥
महां वीर तेहीं नमस्कार केले । पुढें सव्य घालूनि तैसे निघाले ।
सवें चालिली ते असंभाव्य सेना । ऋषी देव ते रूढ जाले विमाना १४

---

१ अनावर झालें. २ वाईट, गोमटा नव्हे. ३ मेल्यावर. 'मरणांतानि वैराणि' (वाल्मीकि रामायण). ४ विधि, अंत्यविधि.

बहूसाल वाद्यें ध्वनी घोष जाला । बळी गर्जती नाद गेला भुगोळा ।
कपीनाथ सौमित्र ते राजभारे । दळें चालिलीं वानरांचीं अपारें ॥ १५ ॥
महादूत वेगीं पुढें पाठवीले । बळें सीघ्र लंकापुरीमाजि गेले ।
त्वरें लाविलें काम पूर्वींच तेंहीं । बहू वेग त्या राक्षसां वारि[1] नाहीं ॥१६॥
बहूसाल कामार[2] ते लक्ष कोटी । स्थळें सिद्ध होतां असंभाव्य दाटी ।
प्रसंगीं तये तांतडी थोर जाली । पहाया सुखें लोकमांदी[3] मिळाली ॥१७॥
सिड्या पाइऱ्या उंच आकाशपंथें । असंभाव्य तें लाविलें काम तेथें ।
बहू जाणते वेग मोठा बळाचा । पुरीमाजि तो येकवेळा तयाचा ॥ १८ ॥
कपींच्या करें अल्पसी भग्न जाली । पुरी मागुती सर्वही सिद्ध केली ।
त्रिकूटाचळीं भव्य चत्वार द्वारें । विशाळें नभासारिखी थोरथोरें ॥ १९ ॥
दिसे रम्य लंकापुरी कांचनाची । वरी पाहतां हांव पूरे मनाची ।
हुडे कोट गेले नभामाजि उंचीं । जगीं धन्य निर्माण केली तयाची ॥२०॥
पहाया गवाक्षें लघू दीर्घ द्वारें । बहूसाल जाळांधरें[4] थोरथोरें ।
असंभाव्य चर्यागिरी तो विळासे । वरी सर्व रेखाटिलें व्योम भासे ॥२१॥
हुडे कोठ दामोधरें थोरथोरें । सजे चाउड्या चौक नानाप्रकारें ।
महांमंदिरें सुंदरें थोरथोरें । भुंयेरीं बरीं वीवरें तें अपारें ॥ २२ ॥
बहू चित्रशाळा बहू होमशाळा । बहू सुंदरा धर्मशाळा विशाळा ।
तेके[5] थोर वृंदावनें पार वोटे । सभामंडपीं देखतां सौख्य वाटे ॥ २३ ॥
विदी हाट बाजार माळ्या दुकानें । मढ्या पर्णशाळा महां योगस्थानें ।
वनें वाटिका जीवनें वोघ जाती । झरे कालवे वाहती पाट जाती ॥२४॥
ध्वजा गोपुरें शीखरें तें अपारें । बहू देव देवाळयें थोरथोरें ।
तळीं कूप बावी जळें पूर्ण जाली । बहूतांपरीचीं स्थळें सिद्ध केली ॥२५॥
बळी झाडिती लोटिती सर्व शाळा । सडे सींपिती घालिती रंगमाळा ।
सुगंधें बहू गुंफिल्या पुष्पमाळा । जळें निर्मळें बैसका[6] त्या सुढाळा ॥२६
सुवर्णांचिया रत्नमंडीत भिंती । हिरे पाच गोमेद ते ढाळ[7] देती ।
सडे सिंपिले कस्तुरीकेशरानें । बहूसाल तें रम्य यानें विमानें ॥ २७ ॥
तया राजद्वारीं बहू दाटि जाली । सभामंडपीं मंडळी ते मिळाली ।
पुढें रावणानूज शृंगारवीला । विधीयुक्त भद्रासनीं वैसवीला ॥ १८ ॥
ध्वजा त्या गुढ्या तोरणें ऊभवीलीं । पुरी सर्व शृंगारमंडीत केली ।
पताका निशाणें वरी दिव्य छत्रें । बहू चामरें मत्स्यमार्तंडपत्रें ॥ २९ ॥

---

१ जागा. २ कामगार लोक, सेवक. ३ लोकांची गर्दी. ४ जाळ्या. ५ तके ? ६ बैठकी. ७ तेजस्विता, पाणी.

धमामा नभीं दुंदुभीनाद जाला । सुरीं अंबरीं पुष्पवर्षाव केला ।
रघुनायकें सेवका राज्य दील्हें । सुरां सोडिलें थोर आनंदवीलें ॥ ३० ॥
असंभाव्य तो वाद्यकल्लोळ जाला । निशाणांवरी[1] तो विरीं घाव केला ।
महां वीर संतोषले राज्यतोषें । बहूसाल ते गर्जती नामघोषें ॥ ३१ ॥
समस्तां जणांचें बहू पाप गेलें । सुरांचें महां शल्य निर्मूळ केलें ।
यथासांग लंकापुरी ते प्रसंगें । विरीं वानरीं पाहिली लागवेगें ॥ ३२ ॥
पुढें सर्वही वीर तैसे निघाले । रघूनायका भेटले स्वस्थ जाले ।
समाचार ते सर्वही सांगताती । जगन्नायका थोर आनंद चित्तीं ॥ ३३ ॥
म्हणे राम गा मारुती ये प्रसंगीं । अशोका वना जाय तूं लागवेगी ।
समाचार सांगें तये सुंदरीला । कपीवीर तो शीघ्र तैसा निघाला ॥ ३४ ॥
अशोकीं वसे जानकी शोकभारीं । अकस्मात तेथेंचि आला वनारी ।
नमस्कार घालूनि तो बोलताहे । सुवेळे[2] समस्तांसि कल्याण आहे ॥ ३५ ॥
दशग्रीव संव्हारिला लंकवासी । प्रतापें दिल्हें राज्य बीभीषणासी ।
प्रभूनें समाचार हा सांगवीला । तेणें जानकी थोर आनंद जाला ॥ ३६ ॥
स्तुती उत्तरें बोलतीं येकमेकां । सिता तोषली दूरि टाकूनि शंका ।
म्हणे मारुती हा समाचार नेतों । पुन्हा न्यावया सीघ्र जाऊनि येतों ३७
नमस्कार केला तये जानकीसी । म्हणे रे कपी तूं चिरंजीव होसी ।
त्वरें चालिला भेटला राघवाला । पुन्हा मागुतें पाठवीलें तयाला ॥ ३८ ॥
म्हणे गा विरा सांग बीभीषणातें । वना जाउनी आणिजे जानकीतें ।
दिजे मंगळस्नान नानाप्रकारें । सुगंधें फुलेलें अळंकार चीरें ॥ ३९ ॥
महावीर ते सीघ्र तैसे निघाले । पहाया सिता सर्वही सिद्ध जाले ।
बहूसाल वाद्यें दळेंसीं निघाले । अशोकावनामाजि ते वीर आले ॥ ४० ॥
सुवेळाचळामाजि तो रामराजा । पहाया तयाची लिळा देवफौजा ।
मदोन्मत्त ऐरावतारूढ जाला । सुरेंसीं सुरेशु पुढें सिद्ध आला ॥ ४१ ॥
पुढें सीघ्र मेषारुढें पावकानें । करीं शुभ्र शक्ती तया तांब्रवर्णे ।
बहू भूषणें देव तो अग्नि आला । सुखें चालिले राम पाहावयाला ॥ ४२ ॥
पहा दंडपाणी महां मेघ जैसा । तयालागि बैसावया थोर म्हैसा ।
पती[3] दक्षणेचा तया रूढ जाला । सुखें चालिला राम पाहावयाला ॥ ४३
नरारूढ होऊनिं नैऋत्यनाथें । त्वरें जाइजे धूम्रवर्णें समर्थें ।
करीं खड्ग घेऊनियां सिद्ध जाला । सुखें चालिले राम पाहावयाला ४४
जळाधीश[4] नक्रीं समारूढ जाला । करीं पाश घेऊनि तो शीघ्र आला ।
सर्वे सागरांचा समूदाव मेळा । सुखें चालिले राम पाहावयाला ॥ ४५ ॥

१ दुंदुभी वगैरे वाद्यांवर. २ योग्यवेळीं, यथाकाळ. ३ रेड्यावर बसलेला यम. ४ वरुण.

निळावर्ण तो वायु अंकूशपाणी । मृगारूढ होऊनियां नीळवर्णी ।
सुताच्या गुणें आवडीनें निघाला । सुखें चालिला राम पाहावयाला ४६
गदा घेऊनी तो प्रभू[1] उत्तरेचा । हयारूढ तो शुभ्रवर्णू तयाचा ।
महासुंदरु तो सुधा[2]रूप आला । सुखें चालिला राम पाहावयाला ॥४७॥
रूपें कर्दळीसूत[3] तो शूळपाणी । जपे अंतरीं रामरामेति वाणी ।
महादेव नंदीवरी रूढ जाला । सुखें चालिले राम पाहावयाला ॥ ४८ ॥
गणेंसीं गणाधीश अंकूशपाणी । चतुर्भूज तो भव्य सिंदूरवर्णी ।
महां स्थूळ तो मूषकारूढ जाला । सुखें चालिला राम पाहावयाला ४९
सुरांचा गुरु[4] अंगिरा दूसरा तो । प्रतापें कुबेरु धनाचा बळी तो ।
रथारूढ होऊनि मार्तंड आला । सुखें चालिले राम पाहावयाला ॥५०॥
विधी[5] मुख्य हंसासनी सृष्टिकर्ता । तयाचेन हे उत्पती विश्वभर्ता ।
ऋषीदेवगंधर्वमेळा मिळाला । सुखें चालिले राम पाहावयाला ॥ ५१ ॥
गुणी नाचणी गायका स्वर्गवासी । अलापें कला कूशला त्या विलासी ।
दळें भूतळीं दाटिल्या देवकोटी । बहूतांपरीं चालिले रामभेटी ॥ ५२ ॥
सदासीव तो सीघ्र भेटीस आला । पदें पांच तो रामसन्मूख जाला ।
प्रितीनें सखे भेटती येकमेकां । तयां भेटतां सौख्य जालें अनेकां ॥५३॥
विरंचीस[6] आलिंगिले राघवानें । बहू सौख्य तें मानिलें ब्रह्मयानें ।
पुढें भेटला शक्र[7] सूखें निघाला । तया मानसीं थोर आनंद जाला ॥ ५४
ऋषी देव गंधर्व सर्वै मिळाले । पुढें रामआलिंगना सीध जाले ।
समस्तांसि तो भेटला रामचंद्रु । महीं लोटला सर्वसूखें समुद्रु ॥ ५५ ॥
सभा बैसली सर्वही स्वस्थ जाली । कथा राहिली पाहिजे चालवीली ।
रघूनायकें मारुती पाठवीला । पुढें सीघ्र लंकापुरीमाजि गेला ॥ ५६ ॥
पुढें भेटला सीघ्र बीभीषणातें । बहूसाल सन्मानिलें मारुतातें ।
तयालागि उंचासनीं बैसवीलें । म्हणे आजि हें भाग्य माझें उदेलें ॥ ५७
सखा वाटसी राघवें धाडिलासी । बहूसाल हें सौख्य जालें मनासी ।
प्रभूची मला काय आज्ञा वदावी । शिरीं वंदितोंसें करंन्यास दावी ॥५८
पुढें मारुतें मार्त[8] ते जाणवीली । म्हणे जानकी वैभवें आणवीली ।
महावीर ते सीघ्र तैसे निघाले । दळेंसीं अशोकावनामाजि गेले ॥ ५९ ॥
बहूसाल यानें[9] गजा घोडियांचीं । सवें चालिलीं दिव्य सूखासनाचीं ।
महां भार ते सर्व ठेऊनि मागें । त्वरें वीर ते चालिले लागवेगें ॥ ६० ॥

---

१ कुबेर. ४ चंद्र. ३ कापूर. कापराप्रमाणें रूप म्हणजे कर्पूरगौर. ४ बृहस्पति. ५ ब्रह्मदेव. ६ ब्रह्मदेवास. ७ इन्द्र. ८ गोष्ट, प्रकार. ९ वाहनें.

पुढें भेटते जाहले जानकीला । नमस्कार साष्टांग केले तयेला ।
अनुवादिजे सीघ्र नैऋत्यनाथें । तुम्हां न्यावया पाठवीलें समर्थें ॥ ६१ ॥
तरी जननी सीघ्र आतां उठावें । महामंगळस्नान आधीं करावें ।
अळंकार चीरें पुढें सिद्ध केलीं । सुगंधेल तेलें बहू आणवीलीं ॥ ६२ ॥
बहूसाल आनंद ते जानकीला । स्तुती उत्तरें गौरवीलें तयाला ।
म्हणे मारुती जानकी मानु दीजे । उदासीन बीभीषणाला न कीजे ॥६३
कपी बोलतां गोष्टि ते मान्य केली । सवें राक्षसी सीघ्र तैसी निघाली ।
बहूसाल उष्णोदकें सिद्ध होतीं । बहू कूशळा राक्षसी माखितां[१]ती ॥६४
स्तुतीउत्तरीं माखिलें जानकीला । म्हणे आजिचा दीन हा धन्य जाला।
चिरें सुंदरें कंचुकी रत्नमाळा । सुगंधें बहू घातल्या पुष्पमाळा ॥ ६५ ॥
अळंकार भांगार[२] जांबूनदा[३]चे । महीमंडळीं ते भुपाळासि कैचे ।
तया मारुतें बैसका[४] सिद्ध केली । जगज्जननी बैसली सिद्ध जाली ॥ ६६
पुढें ठेविलें पात्र सुधाफळां[५]चें । शकुनार्थ घ्यावें म्हणे रम्यवाचे ।
दिल्हीं पंचकें दोनि दोघां जणाला । कपी मारुती आणि बीभीषणाला ॥
जीवाच्या सख्या राक्षसी जानकीच्या। बहू दीस होत्या वनीं संगतीच्या।
दिल्हीं पंचकें दोनि दोघीं जणींला । महाशर्भे नामें तये त्रीजटेला ॥६८॥
म्हणे जानकी लोभ आतां असावा । उदासीन वाटे बहू कष्ट जीवा ।
समस्तां जणातें फळें पाठवीलीं । सुखें जानकीनें बहू स्तूति केली ॥ ६९
फळें सेविलीं आचमनें शुद्ध केलीं । पुढें शीबिका[६] ते विरें आणवीली ।
पताका चिरें सुंदरें दिव्य छत्रें । पुढें विंझणे चामरें तें विचित्रें ॥ ७० ॥
दळें चालिलीं दाटणी थोर जाली। सिता शीबिकेमाजि तैसी निघाली।
तुरे सुंदरें गंभिरें वाजताती । असंभाव्य वाद्यें ध्वनी गर्जताती ॥ ७१ ॥
महा सुंदरें रम्य दिव्यांबरें तें । वरी सर्व आच्छादिलें शीबिकेतें ।
पुलस्ती कपी वीर सन्नीध जाती । पुढें वारिती वेत्रें[७] घेऊनि हातीं ॥७२॥
अशोकावनाहूनि ते लागवेगें । बहुवीध संन्नीध येती प्रसंगें ।
सवें चालिले लोक त्रीकूटवासी । पहाया अती आदरें जानकीसी ॥७३
सभे बैसला देव कैळासवासी । गणाधीश तो ईश सर्वां गुणेंसीं ।
विधी शक्र गंधर्व ते सर्व आले । ऋषी देव तेतीस कोटी मिळाले ॥७४॥
मिळाले कपी रीस कोट्यानकोटी। सिता आणितां जाहली थोर दाटी।
शतांची शतें धांवती वेत्रपाणी । दळें वारिती गर्जती घोरवाणी ॥ ७५ ॥

---

१ तेलें लावतात. २ सोनें. ३ जांबुनद म्हणजे सोनें असा रूढ अर्थ आहे. ४ आसन. ५ सुधाफळ, आवळा. ६ पालखी. ७ छडी.

पहाया सिता वीरमांदी मिळाली। प्रसंगीं तये दाटणी थोर जाली।
बळें टाकिती येकमेकांसि मागें। कपीवीर ते धांवती लागवेगें॥ ७६ ॥
झडा घालिती येकमेकां पुढारे। दिसेना पदीं सर्व सेना उभारे।
पहाया पुढें घालिती मस्तकातें। महावीर ते हाणती वेत्रघातें॥ ७७ ॥
कितीयेक आकाशपंथें उडाले। कितीयेक ते वृक्षअग्रीं दडाले।
कितीयेक ते फिरती अंतराळीं। कितीयेक ते घोष उल्हासताळीं॥७८॥
कपींचीं दळें चंचळें फार जालीं। महामार देखोनि मागें पळालीं।
बळें गर्जती घोर घोंषें फुराणें। वरी साधिती अंतराळीं किराणें॥ ७९ ॥
महां मार देखोनि माहाविरांचे। भ्रमों लागले भार गोलांगुळांचे।
दिसेना सिता आर्त पोटीं पुरेना। उतावेळ त्या धीर जैनीं[1] धरेना॥ ८०
कपी धांवती सीघ्र पाहावयाला। परी रीग नाहीं पुढें जावयाला।
प्रसंगीं महां मार देखोनि दृष्टी। रघूराज तो बोलिला येक गोष्टी॥ ८१॥
सितेकारणें वानरीं कष्ट केले। किती वेळ हे युद्ध होतां निमाले।
उतावेळ पोटीं पहाया सीतेला। दिसे स्पष्ट ऐसें करावें तयेला॥ ८२ ॥
महोत्साव यात्रा तया पर्वकाळीं। विवाहीं युद्धांतीं तथा अंतकाळीं।
गृहीं सासुऱ्याचे तथा जन्नकाचे। नव्हे निंद्य ते संगतीनें वराचे[2]॥ ८३॥
पुढें धाडिलें सीघ्र त्या अंगदाला। म्हणे रे कपी सांग बीभीषणाला।
म्हणावें बळें आपुले लोक वारा। पुरें शीघ्र येऊनियां दूरि सारा॥ ८४॥
त्वरें धांविला राव त्रीकूटवासी। बहू वारिलें मारिलें राक्षसांसी।
पुढें काढिलें पटकूळां[3] दुकूळां। दिसों लागली जानकी दिव्य बाळा॥८५॥
समस्तीं सिता देखिली आदरेंसी। असंभाव्य सौंदर्य लावण्यरासी।
तये देखतां सर्व सूखें निवाले। कपी बोलती आजि निःपाप जालें॥८६॥
सिता देखती जाहली रामचंद्रा। नमस्कार तैसाचि केला महींद्रा।
तया राघवें पाहिलें जानकीला। पुढें भ्रूलता वक्र अव्हेर केला॥ ८७ ॥
उदासीन ते जानकीलागि केलें। सभामंडळीं सर्व वोरंग[4] जालें।
सभेमाजि ते बोलती येकमेकां। सितेलागि अव्हेरिलें राघवें कां॥ ८८ ॥
अवस्था[5] बहू लागली ते प्रसंगीं। बुडाले कपी वीर सर्वै विरंगीं।
मुखें बोलती सर्वही कोण वेळा। शिणे मारुती कंप जाला भुगोळा ८९
सभा बैसली ते द्विजांब्राह्मणाची। असंभाव्य सौंदर्यता हे सितेची।
कितेकीं मनामाजि संकेत केला। तिहीं कल्पिले अंतरीं दोष तीला ९०

१ नयनीं. २ महोत्सवादि प्रसंगीं पतिसान्निध परक्यांचे दृष्टीस पडण्यांत दोष नाहीं.
३ रेशमी पडदे. ४ विरस. ५ उत्कंठा.

रघूनाथ हा हेत जाणे मनाचा । सदा सर्वदा साक्ष सर्वे जनाचा ।
जिवांतील जाणे तया चोरवेना । महापातकी पाप त्याचें सरेना ॥ ९१ ॥
म्हणोनी प्रसंगीं उदासीन केलें । जनी कल्पिलें सर्वही व्यर्थ गेलें ।
म्हणे राम तो जानकीलागि जावें । स्वइच्छा सुखें तां दिगंतीं भ्रमावें ९२
प्रसंगीं तये शब्दकाठिण्य रामें । मुखें बोलिजे अर्थभेदें विरामें ।
अधोमूख सीतावलोकी[1] भुमीतें । मही भीजती जाहली अश्रुपातें ॥ ९३ ॥
म्हणे न्याय अन्याय सर्वे बुडाला । दिसे आजि कल्पतरू वांज[2] जाला ।
नसे अल्प अन्याय ब्रह्मांड केला । वृथा दंड हा कोण धर्मा मिळाला ९४
मनीं अल्प हे कल्पना कां करावी । उगी कल्पिली बुद्धि पोटीं धरावी ।
बहूसाल बोलोनियां काय आतां । महासौख्य तें पावकें भस्म होतां ९५
म्हणे जानकी त्या रिसां वानरांसीं । बहूसाल रे कष्ट जाले तुम्हासी ।
परी मागुतें येक जीवीं धरावें । बहूसाल त्या पावका चेतवावें ॥ ९६ ॥
पुढें सीघ्र खांणोनियां कुंड केलें । असंभाव्य त्या पावका चेतवीलें ।
शिखा धांवती ऊर्ध्व आकाशपंथें । पिडा जाहली खेचरांभूचरांतें ॥९७॥
विरंचीहरादीक देवां समस्तां । मनामाजि ते थोर जाली अवस्था ।
मुखें बोलती सर्वही कार्य जालें । परी मागुतें काय हें विघ्न आलें ॥९८॥
स्वभावेंचि हा वन्हि जाळीत आहे । तयामाजि हे जानकी केवि राहे ।
धडाडीत ज्वाळा पुढें पाहवेना । तया अंतरेंही उभें राहवेना ॥ ९९ ॥
मनामाजि पूजा यथासांग केली । पुढें जानकी पावकामाजि गेली ।
तये स्पर्शतां पावकु शुद्ध जाला । प्रसंगीं तये शांत जाला निवाला १००
तयामाजि ते जानकी शोभताहे । समस्तै सभा लोक त्रैलोक्य पाहे ।
पुटीं[3] घालिजे पूतळी कांचनाची । तयाहूनि ते दिव्य काया सितेची ॥१॥
अळंकार चीरें बहू पुष्पमाळा । सुगंधें तनू चर्चिली दिव्य बाळा ।
जगज्जननी सीघ्र बाहेर आली । सभे देखतां वन्हि सीता निघाली ॥२॥
महावीर ते गर्जती नामघोषें । कपी वीर ते तोषले थोर तोषें ।
सुरीं अंबरीं पुष्पवर्षाव केला । नभीं दुंदुभीवाद्यकल्लोळ जाला ॥ ३ ॥
सिता मुख्य ते पावकामाजि होती । वृथा रावणें चोरिली हे वदंती ।
रमा सागरांतून नेली हरीनें । तयाचे परी जानकी राघवानें ॥ ४ ॥
पुढें जानकी रामअंकीं विराजे । रमा आदिनारायणीं जेवि साजे ।
असंभाव्य तो वाद्यकल्लोळ गाजे । कपीवाहिनीमाजि आनंद माजे ॥ ५ ॥
जनाच्या मनाकारणें धीर केला । कृपेच्या कृपासागरा पूर आला ।
कृपादृष्टिनें पाहिलें जानकीला । पुढें सीघ्र आळंगिलें ते सितेला ॥ ६ ॥

१ सीता अवलोकी. २ निष्फळ. ३ पुटांत घालून शुद्ध केलेली.

म्हणे दास हे श्लोक रामायणाचे। जनीं अल्प सोपेचि नाना गुणांचे।
कितीयेक पाल्हाळ सांडूनि मागें। कथा चालिली ते पुढें लागवेगें॥ ७॥

---

११

॥ श्रीराम ॥

प्रतापें दिनेशु[1] तपाचा हुताशु[2]। विरांमाजि ईशु[3] सुरांचा सुरेशु[4]।
मुनींचा महेशु महादेव धीशु[5]। सदांचा उदासु वनारण्यवासु॥ १॥
पिनाकी[6] शुळी बोलिजे रुद्रवाणी। जटाभार पंचाननू शूळपाणी।
हरु शैल्यजावल्लभु[7] भक्तपाळु। धीरोदार मृत्युंजयू तो कृपाळु॥ २॥
महादेव शंभू गिरीजाविलासी। सुवर्णाचळामाजि कैलासवासी।
विराजे रुपें गौर कर्पूर जैसा। दिसे धाम धौळा[8] सदासीव तैसा॥ ३॥
विषें कंठ काळा दिसे चंद्रमौळी। फणीधारकू[9] वन्हि वाजे कपाळीं[10]।
असंभाव्य भोळा गळां रुंडमाळा। महामस्तकीं वोघ[11] जाती खळाळां॥
वसे भस्म अंगीं प्रभू वीतरागी। उदासीन जो सर्व सामर्थ्य त्यागी।
विधी शक्र हे सर्व ध्याती जयाला। महादेव तो वर्णितो राघवाला॥५॥
म्हणे धन्य रामा विरा पूर्णकामा। असंभाव्य सीमा कळेना महीमा।
महाथोर अद्भूत सामर्थ्य केलें। प्रतापेंचि ब्रह्मादिकां सोडवालें॥ ६॥
तया रावणालागि प्रसन्न आम्ही। वरें मातला जाहला पापकर्मी।
ऋषी देव माझे बहू कष्टवीले। समर्था तुवां सर्वही सोडवीले॥ ७॥
अखंडीत घेतों तुझें नाम वाणी। पुजा अंतरामाजि कोदंडपाणी।
बहू काळ होतें बहू आर्त पोटीं। प्रसंगेंचि हे जाहली थोर भेटी॥ ८॥
अकस्मात हा भेटिचा लाभ आला। मनामाजि अद्भूत आनंद जाला।
सुरांकारणें संकटीं पावलासी। मनोभावना राहिली तूजपासीं॥ ९॥
भविष्योत्तरें बोलिलीं वालिमकानें। पहातों चरित्रें तुझीं आवडीनें।
विषें[12] पोळला प्राण माझा निवाला। निजध्यास तो लागला पार्वतीला॥
समस्तां मनीं लागला ध्यास रामा। तुझें रूप ध्यातों सदा योगधामा।
बहूसाल हें बोलणें काय देवा। अखंडीत हा लोभ आतां असावा॥११॥

---

१ सूर्य. २ अग्नि. ३ गणेश. ४ इंद्र. ५ बुद्धीचा अधिपति. ६ पिनाकसंज्ञक धनुष्य आहे ज्याचें असा शंकर. ७ पार्वतीचा नाथ. ८ धवला, शुभ्र, ९ नाग धारण करणारा. १० अग्नि आहे तिसरा डोळा ज्याच्या कपाळीं असा शंकर, भाललोचन, त्रिनेत्र. ११ गंगेचे ओघ. १२ हालाहल पिऊन.

प्रतीउत्तरीं राम बोले महेशा । उदाराधिशा सुंदरा देवधीशा[1] ।
समर्था प्रभू लोकपाळा भुपाळा । लिळा जाळिसी पाळिसी या भुगोळा ॥
तुझा योग होतांचि आनंद जाला । पुढें देखतां प्राण माझा निवाला ।
दयासागरें सर्व सांभाळ केला । सुखानंद हेलावला तृप्त जाला ॥ १३ ॥
पुढें बोलता जाहला तो विरंची । म्हणे धन्य हे आजि वेळा सुखाची ।
तुझा योग होतां घडी अमृताची । बहु स्तूति केली रघूनायकाची ॥१४॥
किती बंधनें पावलों पूर्वपापें । बहू दीस वोसंडिलें[2] मायबापें ।
बहू कष्टलों स्वामि देवाधिदेवा कृपाळुपणें सीघ्र केला कुढावा[3] ॥ १५ ॥
तुम्हावेगळे सर्वही दीन जालों । त्रिकूटाचळीं बंदिशाळे मिळालों ।
हिनासारिखे जाहलों दैन्यवाणे । प्रभू आमुचें दुःख तें कोण जाणे ॥ १६
बहू कष्टवीलें तया रावणानें । घडीनें घडी त्रासिलें दुर्जनानें ।
गमे हा नियंता[4] मनामाजि चिंता । समस्तांसि कोण्ही नसे सोडवीता ॥
बहू वोखटी वेळ येऊनि गेली । कृपासागरें धांवणी सीघ्र केली ।
सुतालागि झेंपावला व्याघ्र जैसा । जगज्जनका तूं समस्तांसि तैसा ॥१८
स्तुतीउत्तरें बाळकू काय जाणे । बरें वोखटें सर्व कांहींच नेणे ।
मुलें खेळतां मायबापांसि चिंता । तयाचे परी बोलताहे विधाता ॥१९॥
बहू स्तूति केली तया ब्रह्मयानें । कृपाळूपणें वारिलें राघवानें ।
प्रसंगें विधीचें समाधान केलें । मनीं दुःख मागील तें सर्व गेलें ॥ २० ॥
पुढें बोलता जाहला वज्रपाणी[5] । सदासर्वदा देव ऐकों पुराणी ।
तया सुकृताचा बरा काळ आला । प्रभू रामचंद्रा तुझा योग जाला २१
बहूतांपरीं राघवा ऐकिलासी । परी पूरली लोचनाची असोसी[6] ।
पुढें पाहतां देखतों रूप तूझें । जगन्नायका धन्य हें भाग्य माझें ॥ २२ ॥
उणें कोटिकंदर्प[7] हें रूप साजे । सदासर्वदा योग ध्यानीं विराजे ।
मुनी शोधिती भक्त कोट्यानकोटी । बहूसाधनें ही नव्हे शीघ्र भेटी २३
कितीयेक योगी उदासीन जाले । गिरीकंदरीं तूज धुंडीत गेले ।
तया अंतरीं भेटसी अल्प कांहीं । जनीं आमुच्या सुकृता पार नाहीं २४
म्हणे इंद्र तो स्वामि देवाधिदेवें । जनीं सेवकां आपुलेंसें म्हणावें ।
घडेना मला भक्ति भावार्थ नाहीं । प्रभू सांगिजेजी मुखें कार्य कांहीं २५
म्हणे राम गा वज्रपाणी प्रसंगें । रथू मातुळी धाडिला लागवेगें ।
तुवां कार्य तें सर्व पूर्वीच केलें । रथारूढ होऊनियां यश आलें ॥ २६ ॥

१ देवाचा अधीश. २ त्यागिलें. ३ संरक्षण. ४ नियामक, शास्ता. ५ इंद्र. ६ इच्छा, हाव. ७ कोटिकंदर्प ( मदन ) ज्यापुढें कमी असें तुझें रूप.

पुन्हा मागुतें येक आतां करावें । निमाले कपी ऋक्ष त्यां ऊठवावें ।
सुधामेघ पाडूनियां लागवेगीं । कपी वीर ते ऊठवी ये प्रसंगीं ॥ २७ ॥
मुखें बोलता जाहला चापपाणी । तेणें थोर संतोषला वज्रपाणी ।
प्रसंगीं तये थोर आनंद जाला । नमस्कार केला रघूनायकाला ॥ २८ ॥
जळेशासि[1] आज्ञापिलें तेचि काळीं । महामेघ ते चालिले अंतराळीं ।
असंभाव्य ते जाहली मेघवृष्टी । तेणें भीजली सर्वही प्रेतसृष्टी ॥ २९ ॥
कपी रीस ते सीघ्र आले निमाले । नमस्कारिला राम सैन्यीं मिळाले ।
कळेना कळा कोण या राघवाची । मनीं कल्पितां हाव पूरे मनाची ३०
निमाले कपी पावले दिव्य देहो । मिळाला रिसांवानरांचा समूहो ।
सुवेळाचळामाजि ते भार आले । क्षमारूप तैसेचि सर्वै मिळाले ॥ ३१ ॥
मिळाले बहू देव कोट्यानकोटी असंभाव्य दोंहीं दळांमाजि दाटी ।
मुखें बोलती देखती राघवाला । स्तुतीउत्तरीं तोषवीती दयाळा ॥ ३२ ॥
प्रसंगेंचि आज्ञा समस्तांस द्यावी । पुन्हा मागुती सर्व चिंता असावी ।
तुम्हीं हो अयोध्यापुरीमाजि जावें । प्रजापाळकें राज्य सूखें करावें ॥३३॥
प्रतीउत्तरीं राम बोले समस्तां । बरें हो म्हणे जाइजे सीघ्र आतां ।
समस्तीं तुम्हीं भूवनामाजि जावें । विलासें बहू राज्य सूखें करावें ॥३४॥
मुखें बोलतां राम तो देव तोषे । करें पीटिती ताळिका नामघोषें ।
नमस्कार केला रघूनायकाला । समस्तां मनीं थोर आनंद जाला ॥३५॥
रवी पावकें यम नैऋत्यनाथें । जळाढ्यें[3] धनाढ्यें[4] रघूनायकातें ।
गुरू अंगिरा देव गंधर्व तेही । बहू बोलते जाहले सर्व कांहीं ॥ ३६ ॥
ऋषी देव गंधर्व सर्वै मिळाले । स्तुतीउत्तरीं बोलते सीघ्र जाले ।
समस्तांसि सन्मानिलें राघवानें । गुंणा[5] किन्नरादीक गाती पुराणें ॥३७॥
निरोपेंचि त्या चालिल्या देवकोडी । पुढें सीघ्र बीभीषणु हात जोडी ।
समर्थें मला थोर आतां करावें । घडी येक लंकापुरीमाजि यावें ॥ ३८ ॥
धरावें मनामाजि देवाधिदेवें । जनीं सेवकालागि कांहीं घडावें ।
करावें समर्थें जिणें श्लाघ्य माझें । घडावें महद्भाग्य हें दास्य तूझें ॥३९॥
प्रतीउत्तरीं राम बोले तयासी । म्हणे धन्य बीभीषणा गूणरासी ।
प्रसंगें सखा बंधु तूं जोडलासी । पुरेना तुझे संगतीची असोसी ॥ ४० ॥
प्रितीच्या सुखालागि कैसें वदावें । गुणाच्या गुणाला किती आळवावें ।
बहूसाल त्वां राखिला स्नेहवादू । जनामाजि तो धन्य साधू अगाधू ४१
स्नेहाळा तुवां आजि ऐसें करावें । पुरीमाजि त्या सुग्रिवालागि न्यावें ।
विळासें बहूतांपरीं सौख्य द्यावें । कपी ऋक्ष घेऊनि वेगीं उठावें ॥ ४२ ॥

---

१ वरुणाला. २ रणांत पडले होते ते. ३ वरुण. ४ कुबेर. ५ गुणांचीं पुराणें, पवाडे.

सखा सुग्रिवासारिखा कोण आहे । मनामाजि बीभीषणा तूंचि पाहें ।
जिवेंसी सखा आमुचा साह्य जाला । असंभाव्य हा वीरमेळा मिळाला ४३
जनीं मैत्रिकी राखिली सुग्रिवानें । बहूसाल हा कष्टला जीवप्राणें ।
स्वयें देखिलें सांगणें काय तुम्हां । कपी पूजितां पावलें सर्व आम्हां ४४
पुढें शीघ्र बीभीषणें तेचि काळीं । अती आदरें ठेविलें वाक्य भाळीं ।
करीं घेतलें प्रीतिनें सुग्रिवाला । म्हणे आजिचा काळ हा धन्य जाला ४५
समर्थांगुणें[1] तूं सखा जोडलासी । तुझा योग हा पार नाहीं सुखासी ।
कपी ऋक्ष घेऊनि तैसा निघाला । पुढें सीघ्र लंकापुरीमाजि गेला ॥४६
जळें निर्मळें सर्व अभ्यंग[2] जालें । अळंकार चीरें कपी तोषवीले ।
बहूतांपरीचीं सुगंधें फुलेलें । समस्तांसि नाना रसें तृप्त केलें ॥ ४७ ॥
रिसांवानरांला पुजा सांग जाली । बहूसाल बीभीषणें स्तूति केली ।
महावीर विश्रांति पावोनि तेथें । निघाले पुढें सर्वही राजपंथें ॥ ४८ ॥
सुगंधें बहू घातल्या पुष्पमाळा । अनीळें[3] सुखें वास नेला भुगोळा ।
प्रभूला नमस्कार साष्टांग केले । मिळाले कपी रुक्ष सर्वै निवाले ॥ ४९ ॥
सभेमाजि आली बहूसाल शोभा । पुढें राहिला हात जोडूनि ऊभा ।
प्रसंगीं तये राम बीभीषणाला । सुधाउत्तरीं बोलता सीघ्र जाला ॥ ५० ॥
म्हणे गा विरा त्वां पुरीमाजि जावें । ध्रुवाचे परी राज्य सूखें करावें ।
शशी[4] सूर्य तारांगणें अंतराळीं । असावें सुखी भोगिजे सर्वकाळीं ॥५१॥
पुढें बोलिजे सीघ्र नैऋत्यनाथें[5] । म्हणे वासना पूरवावी समर्थें ।
प्रभू बोलतां चित्त माझें न राहे । पहावी अयोध्यापुरी वासना हे ॥५२॥
पुरीमाजि भद्रासनीं तूं भुपाळा । महोत्साव उत्साव पाहेन डोळां ।
उद्दारा प्रभू सौख्य पाहेन संगें । निरोपेंचि मी शीघ्र येईन मागें ॥ ५३ ॥
सव घेतलें वीर बीभीषणाला । रघूराज तो वानरेंसीं निघाला ।
असंभाव्य तो वाद्यकल्लोळ जाला । पुढें सिद्ध केलें महा पुष्पकाला ५४
नसे तूळणा रत्नमंडीत याना[6] । महीतुल्य त्या आणवीलें विमाना ।
तयारूढ तो जाहला राम वेगीं । कपी वीर ते आपुलाले विभागीं ॥५५॥
विमानावरी रामराजा विराजे । तरी बैसले ते कपीऋक्षराजे ।
सुमित्रासुतू बैसला सव्यभागीं[7] । जगन्मात सीता तया वामभागीं[8] ॥५६॥
विमानावरी वाजती घंटमाळा । खडे घोष हेलावती मुक्तमाळा ।
समुद्रोदकीं पूर्ण तारूंच जैसें । नभामाजि ते चालिलें भव्य तैसें ॥ ५७ ॥

---

१ रामाच्या योगानें. २ अभ्यंगस्नान. ३ अनिलानें, वायूनें. ४ चंद्र. ५ बिभीषण. ६ वाहन. ७ उजवीकडे. ८ डावीकडे.

पुढें चालतां चालतां लागवेगी। सितेलागि तो राम सांगे प्रसंगीं।
रणमंडळीं आट राक्षसकूळां। त्रिकूटाचळू दाखवीली सुवेळा॥ ५८॥
असंभाव्य पाल्हाणिला[१] सेतु जेथें। स्वयें वास दर्भासनी योग तेथें।
स्त्रिया रत्नमंडीत नानाविलासी। समुद्रातिरीं भेटला तोयरासी॥ ५९॥
बळें आगळा वीर वाळी निमाला। दिल्हें राज्य जेथें कपी सुग्रिवाला।
अकस्मात जाली हनूमंतभेटी। तडागें नद्या दाखवी वीरजेठी॥ ६०॥
जटायू पुढें पावला स्वर्गलोकीं। जनस्थान हें रम्य गोदातटाकीं।
पुढें चालतां राम राजाधिराजें। तया राहवीलें ऋषी भारद्वाजें॥ ६१॥
कपीचीं दळें भूतळीं दाटि जाली। तया भारद्वाजें बहू स्तूति केली।
पुढें धाडिलें मारुतीलागि देवें। म्हणे गा विरा भ्रातया जाणवावें॥ ६२॥
प्रभू बोलतां वीर तैसा निघाला। तया गूहकानें नमस्कार केला।
स्तुती बोलतां तो समाचार सांगे। नंदिग्राम तो पावला लागवेगें॥६३॥
कपी देखिला भव्य रामानुजानें। नमस्कार केला तया बांधवानें।
कपी भेटला बैसला स्वस्थ जाला। समाचार साकल्य सांगे तयाला ६४
म्हणे मारुता राघवाच्या वियोगें। पळें भासती तें किती काळ यूगें।
महद्भाग्य आलासि येणें प्रसंगें। रघूनाथ तो भेटवीं लागवेगें॥ ६५॥
उदासीन तो बंधु त्या राघवाचा। वदे मारुतीलागि कारुण्यवाचा।
बहू कष्टलों काळ गेला दुःखाचा। कधीं राम येईल सिंधू सुखाचा॥६६॥
वृथा संपदा राज्य हे काय कीजे। उदासीन या राघवाला न कीजे।
पदें भोगितां त्या मदें बाधिजेतें। दिसेंदीस आयुष्य तें व्यर्थ जातें॥६७॥
कितीयेक ते भाग्य भोगून गेले। पुन्हा मागुते मृत्युपंथें निमाले।
कितीयेक साधू उदासीन जाले। महींमंडळीं लोक सूखें निवाले॥ ६८॥
भले जाणती संपदा दुःखदाती। स्वहीता परत्रासि[२] होते नियंती।
हरादीक ते तापसी याचलागीं। सदा सर्वदा फीरती वीतरागी॥ ६९॥
म्हणोनी मला राघवेंवीण कांहीं। सदा सर्वदा वैभवीं चाड नाहीं।
मला भेटवीं राम आत्मा जगाचा। वदे मारुतीलागि तो दीन वाचा॥७०॥
म्हणे मारुती धन्य गा धन्य साधु। महाशक्ति वीरक्ति बोधें अगाधु।
नव्हे साधनें भेटि ब्रह्मादिकांला। तुह्मांलागि भेटीस तो राम आला॥
नमस्कार केला तया मारुतानें। रंजें[३] डौरलें[४] भाळ माहाविरानें।
प्रिती लागली अंतरीं ते ढळेना। म्हणे धन्य गा धन्य लीळा कळेना ७२

१ पालाणिला, पूल बांधला. २ संपदा ही इहलोकींचें हित व परलोकींचें हित या दोहों-सही बाधक होते. ३ धुराळ्यानें. ४ डौरणें=ओतप्रोत भरणें.

तया देखतां चित्त सूखें निवालें । मनामाजि तें थोर आश्चर्य केलें ।
म्हणे वीर अद्भूत वैराग्य कैसें । महद्भाग्य हें मानिलें तृण जैसें ॥ ७३
पुढें वीर रामानुजें काय केलें । पुरीमाजि शत्रूघना पाठवीलें ।
सुमेतां वसिष्ठादिकां जाणवीलें । असंभाव्य ते सैन्य पाल्हाणवीलें[1] ॥७
म्हणे वीर तो राम येईल आतां । सुखी जाहली मुख्य माता समस्ता
प्रसंगीं तये थोर आनंद जाला । पुरीमाजि तो लोक सर्वे मिळाला ७
पुढें सीघ्र पाल्हाणिले दिव्य घोडे । महीमंडळीं त्यांस नाहींत जोडे ।
असंभाव्य ते हिंसती लक्षकोडी । उफाळें तया धांवतां भूमि थोडी ७
मोहोळी[2] झुली पाखरा[3] मुक्तमाळा । बहू रत्नमंडीत भासे उमाळा[4] ।
अळंकार भांगारमंडीत केले । बहू भार शृंगारले सिद्ध जाले ॥ ७७ ॥
गिरीसारिखीं चंड बंडें अपारें । बहू मातलीं कुंजरें[5] थोरथोरें ।
पताका झुली रम्य दिव्यांबरांच्या । बहूरंग लावण्य नानापरींच्या ॥७
महामस्त ते हस्त[6] भारें निघाले । त्वरें चालतां भव्य सर्वांग डोले ।
भुमी हाणतां अंदु[7] वाजे दणाणा । बळें वाजती चंड घंटा घणाणा ॥७
तयारूढ ते वीर कित्येक जाले । घडाडीत सेना असंभाव्य चाले ।
शिबीका बहूसाल सूखासनें तें । निशाणें पताका फडाडीत वातें ॥ ८
महावीर शत्रूघनू लागवेगीं । सुमंतू प्रधानू तया पृष्ठभागीं ।
बहू वाद्य तो घोष गेला दिगंता । ऋषीराव वासीष्ठ[8] त्या मुख्य माता ।
पदीं चालिला मुख्य तो योगिबंधू । सवें घेतला मारुती वीरसिंधू ।
महा वीर दोघे पुढें शीघ्र गेले । असंभाव्य ते भार मागें उदेले ॥ ८२ ।
पुढें राम तेथूनि वेगीं निघाले । महापुष्पकारूढ होऊनि आले ।
त्वरें पावतां पावतां नंदिग्रामा । कपी वीर तो दाखवी शीघ्र व्योमा ८
असंभाव्य तें तेज हेलावताहे । म्हणे गा कपी काय हें येत आहे ।
तया सांगतो मारुती राम आला । नभामाजि त्या पुष्पकारूढ जाला ।
पुढें रामभ्राता नमस्कार घाली । सुखाची असंभाव्य हे वेळ आली ।
तया देखतां सौख्य अद्भूत जालें । वरी पाहतां यान सन्नीध आलें ॥८
पुढें देखिला भव्य तो राम योगी । असंभाव्य सेना तया पृष्ठभागीं ।
त्वरें चालतां धांवतो रामभ्राता । नसे धीर त्या भेटिचा काळ येतां ॥८
बहू रम्य लावण्य कामावतारी । महावीर दोघे रुपें योगधारी ।
तया देखतां रोम अंगीं भरारी । सुखें पाहतां सर्व सेना थरारी ॥ ८७

१ घोड्यांवर पल्याण म्ह० खोगीर घालून घोडेस्वार तयार केले. २ मोहाळी=घोड्य म्होरकी. ३ पाखर=घोड्याच्या पाठीवर घालायाची झालर. ४ दिव्य देखावा. ५ ह ६ हत्ती. ७ हत्तीच्या पायाला अडकविलेला साखळदंड. ८ ऋषींचा राव ( राजा ) वसि

रुपें सारिखे वीर दोघे मिळाले। सुखाचे बहू कंप रोमांच आले।
पदीं ठेविला मस्तकू बांधवानें। तया ऊठवीलें त्वरें राघवानें ॥ ८८ ॥
स्फुरद्रूप आलिंगनीं वीरगात्रीं। जळें लोटलीं रम्य राजीवनेत्रीं।
तया राम रामानुजा भेटि जाली। प्रसंगीं तये सृष्टि सूखें निवाली ॥८९॥
सुमित्रासुता भेटला वीतरागी[1]। नमस्कारिली जानकी ते प्रसंगीं।
खुणा दाविता रामराजाधिराजें। कपीनाथ आलिंगिला योगिराजें ॥९०॥
पुढें भेटिचा लाभ नैऋत्यनाथा। पदीं ठेविला शीघ्र येऊनि माथा।
तयालागि रामानुजें ऊठवीलें। समस्तां विरां राघवें भेटवीलें ॥ ९१ ॥
प्रिती भेटला अंगदा जांबुवंता। प्रसंगें कपी थोरथोरां समस्तां।
स्तुतीउत्तरें बोलती येकमेकां। स्नेह लागला सौख्य जालें अनेका ॥९२॥
प्रितीनें तया गूहका भक्तराजा। कृपाळूपणें भेटला रामराजा।
नमस्कार केला समस्तां विरांला। तया अंतरीं थोर आनंद जाला ॥९३॥
पुढें सर्वही पुष्पकारूढ जाले। दळेंसीं महावीर तैसे निघाले।
अयोध्यापुरी देखतां सूख जालें। प्रसंगें रघूनायकें दाखवीलें ॥ ९४ ॥
रुढीच्या[2] मनासारिखें वर्तताहे। महींमंडळीं[3] यान[4] येऊनि राहे।
भुमी ऊतरे राम बंधूसितेसीं। कपीनाथसुग्रीवबीभीषणेंसीं ॥ ९५ ॥
कपी रीस ते भार कोट्यानकोटी। दिसेना भुमी जाहली थोर दाटी।
समर्थें विमानासि त्या पाठवीलें। कुबेरासि भेटावया शीघ्र गेलें ॥ ९६ ॥
असंभाव्य तो वाद्यकल्होळ जाला। कपी पाहती भार अद्भूत आला।
रजें व्योम आच्छादिलें सर्व कांहीं। विरां कुंजरां घोडियां मित्य नाहीं ॥
कपी सर्व चाकाटले[5] पाहताती। गिरीचे परी भार अद्भूत येती।
कपीभार ते देखिले राजभारें। पहाया दळें लोटलीं तें अपारें ॥ ९८ ॥
खुणा दाविती येकमेकांसि तेथें। मुखें बोलती राहिले राम येथें।
महावीर ते मुख्य धांवोनि आले। कपी भार त्यामाजि वेगीं मिळाले ९९
रघूनायकालागि शत्रूघनानें। नमस्कार केला तया मंत्रियानें।
उभे वर्ग ते भेटले राघवाला। तयां मानसीं थोर आनंद जाला ॥१००॥
सुमित्रासुता आणि ते जानकीला। महां वीर तेहीं नमस्कार केला।
प्रसंगीं समस्तांसही भेटी जाली। सुखाची नदी अंतरामाजि आली १
सुमंतू समर्था म्हणे पैल पाहे। ऋषी जंन्नमी मंडळी येत आहे।
तया सांगतां राम तो सिद्ध जाला। पदें चालतां तो पुढें शीघ्र आला ॥

---

१ वैराग्यसंपन्न भरत. २ रुढीला धरून चालणाऱ्या माणसांच्या. ३ पृथ्वीवर. ४ वाहन, पुष्पकविमान. ५ चकित झालेले.

पुढें देखिला तो ऋषी ब्रह्मनिष्ठु । कुळा रक्षिता तो कुळामाजि श्रेष्ठु ।
रघूनाथ तेथें नमस्कार घाली । स्तुतीउत्तरें आदरें भेटि जाली ॥ ३ ॥
प्रसंगें नमस्कारिली मुख्य माता । बहू सौख्य जालें तया भेटि होतां ।
समस्तां जणींला नमस्कार केले । तया देखतां प्राण त्यांचे निवाले ॥ ४ ॥
समस्तांसि तो भेटला राम जैसा । यथासांग तो वीर सौमित्र तैसा ।
नमस्कार घाली बहू स्तूति केली । तया देखतां मंडळी ते निवाली ॥ ५ ॥
सितेसुंदरीनें नमस्कार केले । असंभाव्य ते लोक तेथें मिळाले ।
स्तुतीउत्तरें येकमेकांसि जालीं । प्रसंगीं तये अंतरें तें निवालीं ॥ ६ ॥
समस्तां समस्तांजणा भेटि जाली । पहाया सुखें लोक[1]मांदी मिळाली ।
पुरीमाजि तो थोर आनंद जाला । मुखें बोलती हो सुखें राम आला ॥ ७ ॥
सुखें पाहतां मुख्य माता मिळाल्या । सवें सुंदरा त्या असंभाव्य आल्या ।
वधूंची बहू दाटणी थोर जाली । सिता सुंदरी सीघ्र तेथें मिळाली ॥ ८ ॥
नमस्कारिलें नम्र होऊन श्रेष्ठां । प्रसंगेंचि भेटी वरिष्ठां वरिष्ठां ।
धडाडां नभीं वाजती चंड भेरी । बहू वारितां जाहली दाटि थोरी ॥ ९ ॥
महावैभवाची कथा राघवाची । जनीं सौख्यदाती च ब्रह्मादिकांची ।
पुढें रामऊपासकें रामदासें । पुरी वर्णिली रम्य नाना विळासें ॥ १० ॥

---

## १२

॥ श्रीराम ॥

पुढें चालिली ते असंभाव्य सेना । रजें मातलें व्योम पूढें दिसेना ।
कितीयेक ते भार सन्मूख आले । समर्थास तेहीं नमस्कार केले ॥ १ ॥
दळें राहिलीं दूरि वेष्टीत पाळे[2] । कपीचक्र येकीकडे चंड मेळा ।
तया मध्यमागी ऋषी बंधु माता । महावीर ते मुख्य चत्वार कांता ॥ २ ॥
उभा राहिला राम तो राजभारें । गृहें निर्मिलीं अंबरांचीं[3] अपारें ।
सभामंडपीं धर्मशाळा विशाळा । गृहें रम्य अंतर्गृहें चित्रशाळा ॥ ३ ॥
बहूसाल दिव्यांबरें थोरथोरें । सुचित्रें विचित्रें अमूल्यें अपारें ।
कितीयेक त्या लागल्या स्तंभवोळी । प्रभा रत्नमंडीत तेथें झळाळी ॥ ४ ॥
बहू रत्नमाळा बहू मुक्तमाळा । बहू लाविले घोस नक्षत्रमाळा ।
कितीयेक जाळी वरी अंतराळीं । कितीयेक मुक्तें निराळीं निराळीं ॥ ५ ॥

---

१ लोकसमुदाय. मांधाळ, मायंदळ म्ह० पुष्कळ या अर्थी हा शब्द रूढ आहे. २ वेढा
३ वस्त्रांचीं.

सुढाळा किळी[1] मंडपीं ढाळ देती। विशाळा स्थळामाजि त्या रत्नज्योती।
सुवर्णासनें रम्य नानापरीचीं। कितीयेक सिंहासनें कूसरीचीं ॥ ६ ॥
बहूते फुलोरे[3] बहूतांपरींचे। वरीं घोंस हेलावती माणिकांचे।
निळे पाच गोमेद इत्यादिकांचे। बहू रंग नानापरी कांचनाचे ॥ ७ ॥
नभामाजि त्या दिव्य नक्षत्रमाळा। तयाचे परी शोभती मुक्तमाळा।
विराजे तया मंडपामध्यभागीं। ऋषी राम माता सखे बंधुवर्गीं ॥ ८ ॥
असंभाव्य ते संपदा वैभवाची। मुखें सर्व बोलावया शक्ती केंची।
वरी पाहतां उंच आकाशपंथें। असंभाव्य तें भव्य लावण्य तेथें ॥ ९ ॥
समूदाव तो बैसला स्तब्ध जाला। वधूमेळ अंतर्गृहामाजि गेला।
ऋषी राम माता सखे बंधुवर्गीं। स्नेहउत्तरीं बोलिजेते प्रसंगीं ॥ १० ॥
कितीयेक तो काळ गेला वियोगें। असंभाव्य तें सौख्य संयोगयोगें।
सरेना मुखें बोलतां मोहमाया। निवाली सुखें पाहतां सर्व काया ॥११॥
कपीनाथ बीभीषणाला भुपाळें। रहाया स्थळें दीधलीं तें विशाळें।
तयामाजि ते सर्वही स्वस्थ जाले। समर्थें बहू सोहळे दाखवीले ॥ १२॥
पुढें मंगळस्नान तेणेंचि काळें। बहू दास ते चालिले येकवेळे।
कितीयेक ते हाटकाचे[4] तटाकीं। जळें ठेविलीं सेवकीं ग्रामलोकीं ॥१३॥
असंभाव्य तीं सिद्ध केलीं फुलेलें। बहूतांपरीचीं सुगंधेल तेलें।
किती चौकिया चौक गंगाळपात्रें। विशाळें पवित्रें सुचित्रें विचित्रें ॥१४
सुगंधें रसें चोखण्यां[5] कालवील्या। यथासांग सामग्रिया सिद्ध केल्या।
बहू आर्त पोटीं उभा भर्तबंधु[6]। करी प्रार्थना राम कारुण्यसिंधु ॥ १५ ॥
प्रभू बोलता जाहला सीघ्र काळें। किजे मंगळस्नान या लोकपाळें।
अयोध्यापुरीवासियां सर्व लोकां। विरें सर्व संकेत केला अनेकां ॥१६॥
समस्तांसि तत्काळ अभ्यंग जालें। महालोक ते सर्व सूखें निवाले।
कितीयेक सामग्रिया सिद्ध केल्या। कपीनाथबीभीषणा पाठवील्या १७
पुन्हा राम बोले वसिष्ठा वरिष्ठा। किजे मंगळस्नान हो सर्व श्रेष्ठां।
पुढें जन्ननीलागि देवाधिदेवें। म्हणे मंगळस्नान तुम्ही करावें ॥ १८ ॥
समस्तीं यथासांग अभ्यंग केलें। पुन्हा देव तो भ्रातयांलागि बोले।
सखे बोलती स्वामि देवाधिदेवा। तुम्ही सांग अभ्यंग आधीं करावा १९
बहूतांपरी प्रार्थिलें बांधवांसी। कितीयेक ते सिद्ध जाले विलासी।
उभी मंडळी कूशळां नापिकांची। तींहीं मांडिली सांग सेवा प्रभूची २०

१ कीळा=प्रभा, कांती. २ प्रकाश. ३ फुलोरा=फुलांची माळ, उधळलेलीं फुलें. ४ सुवर्णाच्या हौदांत. ५ उटणीं. ६ भरतबंधु.

समश्रू[1] क्रमें जाहलीं त्या प्रसंगें । नखें काढिलीं नीळ रंगें तरंगें ।
जटाजूट ते मोकळे सर्व केले । स्नेह[2] घालितां रम्य चक्षू निवाले ॥२१॥
पुढें दर्पणीं पाहिलें रूप रामें । प्रसंगीं तये कोटिकंदर्पधामें ।
कळा बाणली भव्य लावण्यगात्रीं । असंभाव्य सौंदर्य राजीवनेत्रीं ॥२२॥
जळें पादप्रक्षाळणा सर्व जाली । पदीं लागतां सर्व गंगा निवाली ।
पदांगुष्ठभागीरथी वोघ जाला । जनमज्जनें लोक निर्दोष केला ॥ २३ ॥
पुढें तीर्थ वंदूनि बंधूजनानें । निवाले पवित्रोदकें तीर्थपानें ।
बहू लाविलें लोचना आवडीनें । मनीं मानिलें सौख्य त्या बांधवानें २४
बहूसाल आयुष्य हो कल्पकोडी । घडावी सदा सर्वदा भक्तिजोडी ।
सुगंधें फुलेलें चबाबीत माथां । महामस्तकीं मर्दिती लोकनाथा ॥ २५ ॥
बहू मर्दना सांग नानापरीची । लिव्हा काढिली ते मळी निर्मळाची ।
जळें निर्मळें घालिती उष्ण धारा । मुखें बोलती तोय आणीक सारा २६
शिरीं घालिती तोय नेटें घळाळां । नद्या वाहती उष्ण वोघें खळाळां ।
सुगंधेंचि दोहीं तिरीं पंक जाला । असंभाव्य ते भृंग तेथें मिळाला ॥२७
यथासांग अभ्यंग केलें भुपाळें । पुढें रम्य दिव्यांबरें सीघ्र काळें ।
महातेजपुंजाळ ते लागवेगीं । विरें वल्कलें त्यागिलीं ते प्रसंगीं ॥ २८ ॥
प्रसंगी तये रत्नमंडीत मानें । पुढें पादुका ठेविल्या बांधवानें ।
वसिष्ठासि रामें नमस्कार केला । महावीर तो बैसला स्वस्थ जाला २९
बहू कस्तुरी केशरें तेचि काळीं । ऋषी राम वीलेपने भव्य भाळीं ।
बहू भूषणें रत्नमंडीत रामें । अमूल्यें सुखें घेतलीं पूर्णकामें ॥ ३० ॥
उटी घेतली घातल्या पुष्पमाळा । बहूतांपरींच्या बहू रत्नमाळा ।
महां मस्तकीं हेममूकूट साजे । असंभाव्य तो तेजकल्लोळ माजे ॥ ३१ ॥
वरी कीरकी कुंडलें वैजयंती । अळंकार नानापरी ढाळ देती ।
चिरें सुंदरें घातल्या भव्य धाटा[3] । कटी किंकिणी नागरा[4] क्षुद्र घंटा ॥३२
बरीं कंकणें मुद्रिका चापपाणी । ब्रिदें घातलीं अंदु[5] बांकीं झणाणी ।
महीमंडळीं सर्वही येक जाले[6] । रघूनायका भव्य लावण्य आलें ॥ ३३ ॥
पहातां नसे तूळणाही तुळाया । विराजे बहूभूषणी दिव्यकाया ।
ऋषी राजबंधू सखे आणी माता । सुखें पाहती राम तो सौख्यदाता ३४
प्रितीनें सुखें बोलता राम जाला । म्हणे स्नान कीजे तया बांधवांला ।
स्नेहेउतरें ऐकतां सीघ्र तैसें । किजे मंगळस्नान नाना विलासें ॥ ३५ ॥

---

१ स्मश्रु. २ तेल. ३ वस्त्राचे पट्टे. ४ चांगलें. ५ तोडे. ६ महीमंडळीचें म्ह० ब्रह्मांडाचें लावण्य रामाच्या ठायीं एकवटलें.

जटाजूट ते मोकळे सर्व केले । मळें त्यागिलीं सर्व सुस्नात जाले ।
सुगंधें उटी घातल्या पुष्पमाळा । अळंकार दिव्यांबरें रत्नमाळा ॥ ३६ ॥
प्रसंगें समस्तांसि अभ्यंग जालें । सभे ते सखे आप्त सर्वें मिळाले ।
अळंकार दिव्यांबरें दिव्य माता । सुखें पाहाती राघवा त्या समस्ता ३७
फळें खाद्य नैवेद्य नानापरीचे । फळाहार ते आणिले कूसरीचे ।
बहूतांपरींचे बहू उंच मेवे । म्हणे राम सर्वांसही पाठवावे ॥ ३८ ॥
समस्तांसि ऊदंड ते पाठवीलें । फळें सेवितां लोक संतुष्ट जाले ।
स्वइछा स्वयें सेविलें अल्प कांहीं । जनीं सेवितां तूळणा त्यांस नाहीं ३९
जळें निर्मळें आच्मनें शुद्ध केलीं । समस्तांसि पानें बहू पाठवीलीं ।
विडे घेतले सर्वही स्वस्थ जाले । असंभाव्य ते पाकही सिद्ध केले ॥४०
पुढें मंडळी सेवकांची मिळाली । विशाळें स्थळें सर्वही सिद्ध केलीं ।
बहू चित्रशाळा बहू होमशाळा । सडे शिंपिती घालिती रंगमाळा ॥ ४१
बहू रत्नमंडीत मोठीं अचाटें । दुकंठीं[1] बहू मांडिलीं दिव्य ताटें ।
कितीयेक तें बत्तिसां वाटियांचीं । कितीयेक विस्तीर्ण नानापरीचीं ४२
असंभाव्य तें रम्य चित्रें विचित्रें । बहूतांपरीचीं बहू तोयपात्रें ।
बहू आसनें दिव्य नानापरीचीं । असंभाव्य तें घातलीं कूसरीचीं ॥ ४३॥
बहूवर्ण दिव्यांबरें पट्टकूळें । बहूरंग नानापरीचीं दुकूळें ।
असंभाव्य तीं सोवळीं[2] सिद्ध केलीं । कितीयेक दिव्यांबरें आणवीलीं ४४
पुढें भोजना सर्वही सिद्ध जाले । कितीयेक ते लक्ष कोटी मिळाले ।
मिळाली ऋषी मंडळी ब्राह्मणांची । बहू भव्य मार्तंड जैसे विरंची ॥ ४५
वये धाकुटे सर्व कोट्यानकोटी । स्थळें रूंधिलीं जाहली थोर दाटी ।
बहूसाल संतोषला राम तोषें । असंभाव्य ते गर्जती नामघोषें ॥ ४६ ॥
बहूसाल गंधाक्षता पुष्पमाळा । बरीं धोत्र पात्रें दिल्या रत्नमाळा ।
विरें सुंदरें रम्य यज्ञोपवीतें । धनें चंदनें दीधलीं ब्राह्मणांतें ॥ ४७ ॥
पुढें वाढिते जाहले शीघ्र काळीं । बहू दाटल्या त्या असंभाव्य वोळीं ।
महामंडपीं बैसला रामराजा । ऋषी मुख्य बंधु सखे आप्त वोजा[3] ॥ ४८॥
बहू रत्न झाऱ्या बहूसाल चंबू । सुवासें तयामाजि संपूर्ण अंबू[4] ।
स्थळें सर्वही सिद्ध पूर्वींच केलीं । असंभाव्य अन्नें बहू आणवीलीं ॥४९
कपीनाथ सुग्रीव बीभीषणाला । बहू धाडिलीं दिव्य अन्नें तयाला ।
रसें पूर्ण त्या कावडी लक्ष कोटी । पथामाजि ते जाहली थोर दाटी ५०
पुढें वाढिते जाहले पात्रधारी । असंभाव्य ते चालिले येकहारी ।
रुचीं रायतीं लोणचीं रम्य वोळी । बहू स्वाद शाखावळी शीघ्र काळीं ॥

१ दोहों बाजूंस. २ रेशमीचीं व जरीचीं वस्त्रें. ३ उत्तम. ४ उदक.

वरी वाढिला वोदनु[1] तो सुवासें । वेरान्नें[2] क्षिरी शर्करा पंच भक्षें ।
कीतीयेक आणीक नानापरीचीं । बहू वाढिलीं भिन्नभिन्ना रुचीचीं ॥५२॥
सुगंधें तुपें वाढिलीं तें खळाळां । पयें वाढिती थोर नेटें घळाळां ।
पुढें दिव्य नाना रसें पूर्णपात्रें । सभा शोभली भव्य राजीवनेत्रें ॥ ५३ ॥
बहूसाल संतोष नाना सुवासें । ऋषी मंडळी गर्जती नामघोषें ।
पुढें सर्व औरोगिती[3] सावकाशें । सुखें जेविती सर्व नानाविलासें ॥ ५४ ॥
गिरीसारिखे वोदनु शुभ्रवर्णे । बहू भक्षिती भक्ष संपूर्ण पूर्णे ।
कथीं[4] मागती सांगती येकमेकां । असंभाव्य ते तृप्ति जाली अनेकां ॥५५॥
कढी वर्पती आवडीनें फरारां । रुसी जेविती ढेंकरीती डरारां ।
पुरे हो पुरे आन्न ऊर्दंड जालें । बहू भोजनें कंठमर्याद आलें ॥ ५६ ॥
पुढें सीघ्र दध्योदनें[5] लागवेगीं । बहू वाढिते जाहले ते प्रसंगीं ।
ऋषी राम बंधू सखे आणि माता । मुखें बोलती सर्व संतृप्ति आतां ॥५७॥
सुवासें रुचीचीं असंभाव्य तर्कें । कदाही कधीं नेणिजे स्वाद शर्कें[6] ।
सुखें सेविती जेविती लोक इच्छा । यथासांग संपूर्ण जालें स्वइच्छा ५८
यथासांग तें भोजनें सर्व जालीं । खळाळां बरीं आचमनें शुद्ध केलीं ।
सुपारी विडे घेतले कर्पुरांचे । बहू शुभ्र ते चूर्ण मुक्ताफळांचें[7] ॥ ५९ ॥
सुवासें चतुर्भाग[8] मागोन घेती । सुखी जाहल्या सर्वही वेदमूर्ती ।
बहूसाल मंत्राक्षता मंत्रघोषें । मुखें बोलती सर्वही विप्र तोषें ॥ ६० ॥
कपी रीस ते सर्वही तृप्त जाले । बहू भक्षिलें अन्न सूखें निवाले ।
गिरीसारिखीं राहिलीं सर्व अन्नें । विडे घ्यावया धाडिलीं त्यांसि पानें ६१
यथासांग सर्वांसि संतृप्ति जाली । सभामंडपीं मंडळी ते मिळाली ।
पुढें ब्राह्मणीं मांडिली धर्मचर्चा । मुखें बोलती धन्य दीनू[9] सुखाचा ॥६२॥
पुढें दीन तो चालिला अस्तमाना । नमायासि आली असंभाव्य सेना ।
कितीयेक त्या दीवट्यांचीं अचाटें । सभामंडपीं चालिलीं दाट थाटें ६३
प्रसंगीं तये वाद्यकल्लोळ जाला । दुरस्ता बहू लोक सूखें मिळाला ।
विराजे सभेमाजि तो रामराजा । पुढें चालिल्या त्या कळावंत फौजा ६४
झणाणीत वीणे मनोरम्य नादें । दणाणीत मृदांग गंभीरशब्दें ।
अलापें कळा दाविती रागमाळा । स्वरें सुस्वरें माजली रंग वेळा ॥ ६५ ॥
बहू ताळ कल्लोळ वाजे खणाणा । विणे वाजती तंतनादें झणाणा ।
बहू गीत संगीत वेळा सुखाची । भले जाणती ते घडी अमृताची ॥ ६६ ॥

१ ओदन, भात. २ वरणें. ३ भक्षिती. ४ कढी. ५ दहीभात. ६ तर्के शक्रस्य दुर्लभम्. ७ मोत्यांचा चुना. ८ पान, सुपारी, चुना व कात, ९ दिवस.

असंभाव्य तो नृत्यकल्लोळ जाला। सुखें पाहती शुद्धि नाहीं जनाला।
गुणी मातले रातले गायनानें। तदाकार ते वस्ति केली मनानें॥ ६७॥
अळंकार चीरें पुढें ढीग केले। कळावंत ते सर्व संतुष्ट जाले।
विसर्जी सभा तो पुढें रामराजा। निरोपेंचि गेल्या बहू लोकफौजा॥६८॥
समस्तीं घडी येक विश्रांति केली। अकस्मात प्रभात ते प्रात जाली।
पुढें सारिते जाहले नित्यनेमें। महावीर ते आपुलाल्या स्वधर्में॥ ६९॥
सभे बैसिजे राम देवाधिदेवें। म्हणे आजि वेगीं अयोध्येसि जावें।
पुरी सर्व शृंगारमंडीत केली। असंभाव्य ते सर्व सेना निघाली॥ ७०॥
महीमंडळीं मुख्य आधीं पुराणी। मुखें बोलिजे ते रवींवंश खाणी।
अयोध्यापुरी धन्य हे पुण्यरासी। किती राहिले तापसी तीर्थवासी॥७१॥
मुनी संत योगी सदा वीतरागी। उदासीन साधू पराचे विभागी।
ऋषी मंडळी सात्विकांसज्जनांची। महायोग्य व्युत्पन्न विद्वज्जनांची ७२
कितीयेक ते मंडळी प्रेमळांची। कितीयेक ते ब्राह्मणा सूशिळांची।
मनस्वी किती ते यती ब्रह्मचारी। बहूतांपरींचे बहू वेषधारी॥ ७३॥
सदा सर्वदा योगध्यानस्थ जाले। कितीयेक ते काळ होऊनि गेले।
भुंयेरी मठ्या त्या बहूतांपरींच्या। नदीचे तिरीं पर्णशाळा मठांच्या ७४
प्रभू देव हा सर्व ब्रह्मादिकांचा। जया वर्णितां शीणली वेदवाचा।
स्वयें वास जेथें जगन्नायकाचा। महीमा वदे कोण हो त्या स्थळाचा ७५
कितीयेक ते राहिले भक्तज्ञानी। कृपाळू भले मुख्य नामाभिधानी।
बहू सुकृती सूर्य जैसे तपाचे। सदा धर्मचर्चा अखंडीत वाचे॥ ७६॥
नदी चालिली भव्य ते पूर्णतोयाँ। जनालागि आधार आली उपाया।
शिवालयें बहू बांधली थोरथोरें। ध्वजा देउळें शीखरें तें अपारें॥ ७७॥
तडागें जळें निर्मळें कूप बावी। सदा सर्वदा राहिजे मानुभावीं।
स्थळें निर्मळें निर्मिलीं पावनानें। किती येक कल्पतरूचीं उद्यानें॥७८॥
कितीयेक त्या लागल्या वृक्षजाती। वनें वाटिका जीवनें पुष्पयाती।
अयोध्यापुरी रम्य लावण्य नावें। महाभव्य विस्तीर्ण तें वास गावें॥७९
गृहें बांधलीं तें असंभाव्य उंची। कितीयेक ते पंच सत्तां खणांची।
संजे चौक दामोदरें थोरथोरें। विशाळें विचित्रें गवाक्षें अपारें॥ ८०॥
बिदी हाट बाजार चौबार कुंचे। असंभाव्य ते भव्य नानापरीचे।
कितीयेक तें सारिखीं दीसताती। महाधूर्त तेही बळें भ्रांत होती॥८१॥

१ मर्मज्ञ. २ माजले. ३ रमले. ४ मोक्षाचे अधिकारी. ५ उत्तम शीलांची. ६ मनोजयी. ७ पाण्यानें तुडुंब भरलेली ८ शिवालयें. ९ महानुभाव, साधु. १० पांचमजलीं सातमजलीं घरें. ११ सज्जे. १२ रत्नखचित मंदिरें.

महागोपुरांचा बहू दाट खेटा। हुडे माडिया ऊपऱ्या[1] त्या अचाटा
महद्भाग्य श्रीमंत ते लोक तेथें। सदा सर्वदा दाटणी थोर पंथें ॥ ८
सदानंद उद्वेग नाहीं जनाला। नव्हे वृद्ध ना मृत्यु नाहीं तयाला।
कुरूपी महामूर्ख तेथें असेना। सुखाचें जिणें दैन्यवाणं दिसेना ॥
बहू नीतिन्यायें विवेकें उपायें। कदाही तया बाधिजेना अपायें।
बहूतां धनाचे उदारा मनाचे। विशेषा गुणाचे गुणी सज्जनाचे ॥
पुरीमाजि ते सर्वही लोक कैसे। सुवर्णाचळीं नांदती देव जैसे।
प्रतापी बळाचे सदा सत्यवाचे। पुरीमाजि लावण्यदेहे जनाचे ॥ ८
पुरीमाजि तें सर्व चातुर्य मोठें। कदाही मनीं नावडे त्यास खोटें।
विलासें वसे ते रमा आणि विद्या। कळा सर्व साधारणा[2] सर्व सद्य[3]
अळंकार दिव्यांबरें सर्व लोकां। सदा प्रीतिनें बोलती येकमेकां।
महावैभवाचे बहूसुकृताचे। पुरीमाजि ते लोक नाना गुणांचे ॥ ८
पुरीमाजि आरोग्य ते लोकभारीं। मुलें लेंकुरें थोरलीं आणि नारी
करंटे तयामाजि कोण्हीच नाहीं। नसे दोष ना मत्सरू सर्व कांहीं।
पुरीमाजि ते दाटणी मंदिरांची। रिकामी भूमी ते रहायासि कैंची
तया मध्यभागीं असंभाव्य तेथें। महां भूवनें उंच आकाशपंथें ॥ ८
गृहें गोपुरें निर्मिली कांचनाचीं। बहूसाल विश्रांतिदाती मनाची।
महारत्नमंडीत तें थोरथोरें। किती धाकुटीं भव्य मोठीं अपारें ॥ ९
भुमी बांधल्या पाचबंदी विशाळा। मनोरम्य त्या रेखिल्या चित्रशा
कितीयेक द्वारें लघू थोरथोरें। स्थळें दिव्य तें पाहतां सौख्यकारें।
किती अन्नशाळा किती वस्त्रशाळा। कितीयेक विस्तीर्ण त्या होमशा
किती नाट्यशाळा किती रत्नशाळा। कितीयेक त्या धर्मशाळा विशा
गृहें रम्य अंतर्गृहें हाटकाचीं। बहू हांसळ्या पूतळ्या नाटकाची।
भुयेरीं घरें वीवरें गुप्तद्वारें। स्थळें भव्य बैसावया थोरथोरें ॥ ९३ ॥
सभामंडपीं ते असंभाव्य शोभा। बहू शोभतो हेमकल्लोळगाभा[4]।
फुलोरे बहू लाविले माणिकांचे। कितीयेक ते घोस मुक्ताफळांचे।
महींमंडळीं तेजपुंजाळ जालें। असंभाव्य तें भव्य लावण्य आलें।
विशाळा स्थुळा निर्मिल्या भव्य भिंती। निळे पाच गोमेद ते ढाळ दे
बहू रत्न पुंजाळले ज्वाळ जैसे। असंभाव्य हारी उभे स्तंभ तैसे।
विशाळें स्थळें निर्मिलीं जाड कैसी। सुवर्णाचळामाजि विस्तीर्ण जै

---

१ माड्या. २ सामान्य. ३ सद्यः प्रतीति देणाऱ्या. ४ सुवर्णप्रभेच्या किरणांनीं दै
मान असा अंतर्भाग.

विचित्रा कळाकूसरी लेखनाच्या । बहू रत्नमंडीत त्या कांचनाच्या ।
सभामंडपीं फांकल्या रत्नकीळा[1] । दिसे रंग तेथें निराळा निराळा ॥९७॥
कितीयेक तीं फांकलीं भव्य कीर्णें[2] । बहूतांपरींची बहू रंगवर्णें ।
कितीयेक हेलावती हेमपर्णें । कितीयेक घंटावळी त्या सुवर्णें ॥ ९८ ॥
स्थळें शोभती रम्य बैसावयाचीं । बहूसाल तें भिन्न भिन्नापरीचीं ।
कितीयेक तें रत्नमंडीत यानें । कितीयेक सिंहासनें तें विमानें ॥ ९९ ॥
बहू बैसका रम्य दिव्यांबरांच्या । विचित्रा बहूरंग नानापरीच्या ।
वरी लोंबती घोस मुक्ताफळाचे । कितीयेक माळावळी[3] जाळियाचे १००
कितीयेक रत्नावळी रम्य कैशा । कितीयेक मुकावळी शुक्र जैशा ।
प्रभेचे बहू घोंस हेलावताती । बहूतांपरीच्या बहू रत्नजोती ॥ १०१ ॥
स्थळें निर्मिलीं रम्य विस्तीर्ण नाना । कितीयेक बैसावया सर्व सेना ।
कितीयेक विस्तीर्ण राजांगणें तें । भुमी पाचबंदी महारम्य तेथें ॥ १०२ ॥
हुडे कोठ माड्या सजे मोठमोठे । उभें राहिलें भव्य ब्रह्मांड वाटे ।
असंभाव्य चर्या लघू पंथहारी । नभा भासवी रूप नाना विकारी ॥१०३
झरोंके कितीयेक त्या गुप्त वाटा । किती ऊपऱ्या अंतराळीं अचाटा ।
कितीयेक त्या भक्तिसंख्यां[4] रसांच्या । कितीयेक त्या उंच तेरा खणाच्या ॥
वरी रत्नकळसांचिया रम्य वोळी । रवीकीर्ण तैशा कळा अंतराळीं ।
वरी लागल्या सर्व नक्षत्रमाळा । मनीं भासती फांकती दीव्य कीळा ॥
रवीवौंशीचे स्वर्गविख्यात राजे । जयांच्या प्रतापें विधीगोळ[5] गाजे ।
करी कोण संख्या तया वैभवाची । उणी वर्णितां बुद्धि ब्रह्मादिकांची ॥
किती कोण लेखा मला मानवाला । मतीमंद मी काय वर्णूं तयाला ।
म्हणे दास त्या अल्पशा भक्तिभावें । प्रभू बोवड्या उत्तरीं तोषवावें १०७

---

## १३

॥ श्रीराम ॥

पुरी वर्णिली हो यथासांग येथें । परी पाहतां दीसती अल्प तेथें ।
मनीं संशयो श्रोतयां प्राप्त जाला । प्रतीउत्तरें काय दिल्हीं तयाला ॥१॥
अयोध्यापुरी स्वर्गलोकासि गेली । पुढें वोस होतांचि ते भग्न जाली ।
असेना जना राहणें वस्ति जेथें । खडे माणिकें कोण ठेविल तेथें ॥ २ ॥

---

१ रत्नांच्या प्रभा. २ किरणें. ३ जाळीच्या माळांचे सर. ४ नवरसांइतक्या म्हणजे नऊ मजली. ५ ब्रह्मगोल, ब्रह्मांड.

पुरें पट्टणें वोस होती कितेकें । पुढें पाहतां दीसती सर्व टेकें[1] ।
युगें लोटतांही वसे अल्प कांहीं । असंभाव्य हें तूं विचारूनि पाही ॥ ३ ॥
असो तूटला संशयो श्रोतयांचा । पुढें राहिला बोध जातां कथेचा ।
अयोध्यापुरा चालिले वीरजेठी । निघाले असंभाव्य कोट्यानकोटी ॥४॥
ऋषी राम ते चालिले राजभारें । दळें चालिलीं पृष्ठिभागीं अपारें ।
शिबीका पुढें चालती दिव्य हारी । सखेलोकबंधूंमधें रावणारी ॥ ५ ॥
पुढें दाटले भार माहाविरांचे । दळीं घोष जाले गजांघोडियांचे ।
गिरीतुल्य सेना रिसांवानरांची । बहू राक्षसीं दाटि लंकापतीची ॥ ६ ॥
पुरी पावतां रूधिल्या सर्व वाटा । असंभाव्य तो जाहला दाट खेटा ।
शतांचीं शतें धांवती वेत्रधारी । दळें माजलीं कोण कोण्हास वारी ॥७॥
कितीयेक ग्रामस्थ मध्येंचि गेले । कितीयेक ते चूकले भ्रांत जाले ।
अयोध्यापुरीमाजि ऊभी अचाटें । गृहीं गोपुरीं पाहती दाट थाटें ॥ ८ ॥
करीं रत्नताटें कितीयेक हारी । असंभाव्य त्या चालिल्या दिव्य नारी ।
बहूसाल नीरांजनें लक्षकोटी । पुरीतूंनि येतां पुढें थोर दाटी ॥ ९ ॥
रूपें राजसा सुंदरा त्या प्रितीनें । रघूनाथ वोवाळिती आवडीनें ।
मनामाजि ते लागलीसे अवस्था । सुखें पाहती येकपत्नीव्रतस्था[2] ॥१०॥
करीती बहू सुंदरा अक्षवाणें[3] । कितीयेक वोवाळिती निंबलोणें ।
असंभाव्य थोवे तया नायकांचे । मुखें गर्जती भाट वेताळ वाचे ॥ ११ ॥
पताका निशाणें बहू रंगवर्णें । महां तेजपुंजाळ मार्तंडपर्णें ।
वरी दाटलीं तें असंभाव्य छत्रें । भ्रमों लागलीं दिव्य चित्रें विचित्रें ॥१२
पहा हो पहा पैल तो राम आला । असंभाव्य हा वीरमेळा मिळाला ।
दिसेना पुढें पाहतां गर्द जाला । समस्तीं करें ताळिकाघोष केला ॥१३॥
पुढें सर्वही भूवनामाजि गेले । महावीर ते बैसले स्वस्थ जाले ।
पुरीमाजि सर्वांसि आनंद जाला । उभें राहिलें भाग्य हा राम आला १४
ऋषी सांगती हे बरी शुद्ध वेळा । त्वरें बैस भद्रासनीं तूं भुपाळा ।
समस्तांसि आनंद राज्याभिषेकें । ऋषी अक्षता टाकिती मंत्रघोषें ॥१५॥
विधीयुक्त भद्रासनीं रामराजा । यथायोग्य संपादिली सांग पूजा ।
कितीयेक पुष्पांजुळी ते वहाती । सदानंद आनंद सूखें पहाती ॥ १६ ॥
असंभाव्य नानापरी दान केलें । बहूतांपरीं याचकां तोषवीलें ।
गिरीचे परी शर्कराढीग केले । कितेकीं समस्तांसि ते पाठवीले ॥ १७ ॥
नभीं दाटलीं मेघडंब्रें[4] अपारें । कितीयेक तें चामरें थोरथोरें ।
असंभाव्य हेलावती मत्स्यपुच्छें । बहू डोलती उन्मतें शक्रैतुच्छें[5] ॥ १८ ॥

१ टेंकड्या. २ रामाला. ३ औक्षणें, ओंवाळणी. ४ घुमट. ५ इंद्राच्या वैभवाला तुच्छ करणारीं.

सुचित्रें विचित्रें रवीतेजपत्रें । असंभाव्य तीं दाटली भव्य छेत्रें ।
विशाळा पताका सतेजें निशाणें । वरी सर्व आच्छादिलें व्योम तेणें ॥
असंभाव्य ते दाटली भीमसेना । प्रसंगें विरीं घाव केला निशाणा ।
महां दीव्य सिंहासनीं रामराजा । पहाया भ्रमों लागल्या वीरफौजा २०
वरी रामराज्यें गुढी ऊभवीली । गजंबें[1] सुखें लोकमांदी मिळाली ।
झडा घालिती राम पाहावयाला । समस्तां मनीं थोर आनंद जाला २१
पुरीमाजि तीं वैभवाचीं अचाटें । दुताळीं-तिताळीं[2] उभीं लोकथाटें ।
खुणा दाविती सांगती येकमेकां । बहूवेध तो राम वेधीं अनेकां ॥ २२ ॥
दमामे धमामा दडाडां धडाडां । बहू वाजती चंड भेरी भडाडां ।
तुतारे नगारे बहू शंख शृंगें । किती चौघडे ढोलकर्णे बुरुंगें[3] ॥ २३ ॥
तुरें गंभिरें सुंदरें गर्जताती । कितीयेक पांवे मुखें वंशवाती[4] ।
नफेऱ्या बहू दुंदुभीघोष जाला । असंभाव्य तो वाद्यमेळा मिळाला ॥२४
कितीयेक ते चौंडके वाजताती । कितीयेक ते बागडे नाचताती ।
कितीयेक ते मागुते मेळ आले । कितीयेक ते वेषधारी मिळाले ॥ २५॥
कितीयेक थोवे कळावंत गाती । हरीदास ते कीर्तनीं गर्जताती ।
कितेकीं गुणी नाचणी नृत्यरंगें । अळापें कळारागरंगें तरंगें ॥ २६ ॥
कितीयेक वाखाणिती भाट ब्रीदें । कितीयेक तें छंद नाना विनोदें ।
दिंडीगाण तें मांडिलें वासुदेवीं[6] । बहू किन्नऱ्या लोधले लोकजीवीं ॥ २७
कितीयेक ते भैरवांचे[7] मिळाले । कमाचें कितीयेक घेऊनि आले ।
कितीयेक ते नाचताती धबाबां । सुखें डोलती वाजवीती रबाबा ॥ २८ ॥
कितीयेक ते गारुडी नाचताती । गळे फूगले घागऱ्या घोळ घेती ।
कितीयेक ते लोक नाना गुणाचे । ब्रिदें अंकुशें लाविले भार कुंचे ॥२९॥
कितीयेक ते भोंवती भेद नाना । भ्रमों लागले पाय भूमी थिरेना ।
कितीयेक ते टीपरीं घालिताती । मिळाले समेळें बहू वाजताती ॥ ३० ॥
घनें सुस्वरें नादकल्लोळ जाला । बहूतांपरींचा बहू लोक आला ।
महद्भूत ते माजली रंगवेळा । दणाणी मही नाद गेला भुगोळा ॥ ३१ ॥
निशी प्राप्त जाली असंभाव्य दाटी । बहू दीवट्या लक्ष कोट्यानकोटी ।
कितीयेक ते उंच नेले उमाळे[9] । नळे जाळितां घोष तैसे उफाळे ॥ ३२ ॥

---

१ गजबजून. २ दुसऱ्या तिसऱ्या मजल्यावर. ३ बुरग म्हणून एक वाद्यविशेष आहे. ४ वंशवाती, अलगूज. ५ एकतारी. ६ मोराच्या पिसाऱ्याचा मुगुट घालून पहाटेच्या प्रहरीं जे भिक्षेकरी येतात त्यांना वासुदेव म्हणतात. ७ भैरवी दीक्षेचे लोक. ८ संबळ. ९ आगीचे लोट.

सरारां फुलें धांवती अंतराळीं । कडाडीत घोषें निराळीं निराळीं ।
भरारां हवाया कितीयेक वेळा । पहाती बळें उर्ध्व नक्षत्रमाळा ॥ ३३ ॥
बहू औषधें दिव्य नानापरीचीं । कितीयेक तें जाळिती कूसरीचीं ।
घडीनें घडी तेजपुंजाळ होती । उजेडेंचि ते लोक लोकां पहाती ॥ ३४ ॥
पुढें ऊठिला राम तो ते प्रसंगीं । प्रभू चालिले भूवनामाजि वेगी ।
समस्तांस आरोगणा[1] सांग केली । विडे कर्पुरें घेतले तृप्ति जाली ॥ ३५ ॥
गृहें दीधलीं रम्य दिव्यांबराचीं । दळें स्वस्थ जालीं रिसांवानरांची ।
कपी वीर राक्षस सूखें निजेले । सुषुप्तीचिया भूवनामाजि गेले ॥ ३६ ॥
सुवर्णाचिया मंचकीं मृदु शैय्या । वरी सूमनें सेज त्या देवराया ।
सभामंडपीं ते निशी अर्ध गेली । प्रभूनें यथासांग विश्रांति केली ॥३७॥
निजेले ऋषी राव ते बंधु माता । यथायोग्य विश्रांति जाली समस्तां ।
कितीयेक त्या वीरफौजा समस्ती । असंभाव्य तो वाद्यकल्लोळ गस्ती ॥
प्रभातेचि ऊठोनियां नित्य नेमें । किजे स्नानसंध्यादिकें सांग कर्मे ।
कितीयेक दानें कितेकां रसांचीं । धनें कांचनें भव्य नानापरीचीं ॥ ३९॥
अळंकार मुक्ताफळें मुक्तमाळा । कितीयेक दिव्यांबरें रत्नमाळा ।
कितीयेक धोत्रें कितीयेक पात्रें । दिल्हीं ब्राह्मणां दान राजीवनेत्रें ॥४०॥
कितीयेक कोट्यावधी गौतमींचीं[2] । कितीयेक लक्षावधी कुंजरांचीं ।
बळाचे बहू अश्व ते पाखरीले[3] । धनेंसी द्विजां ब्राह्मणां दान केले ॥ ४१॥
ऋषी बांधवीं सारिलीं स्नानदानें । यथायोग्य उंचासनें स्थानमानें ।
सभेमाजि तो बैसला रामराजा । निघाल्या कपीवीर राक्षस फौजा ॥४२॥
कपीनाथ तो अंगदु जांबुवंतु । कुमोदु गजु वीनतु वीर्यवंतु ।
महां वीर लंकापती मारुती तो । सुमूखु द्विवीधु कपी केसरी तो ॥ ४३ ॥
प्रमाथी गवायु निळु हेमकूटू । सुखेणू नळू मैद मोठा अचाटू ।
कपी क्रोधनू ऋषभू आणि रंभू । गवाक्षू दधीमूख खेदू शरभू ॥ ४४ ॥
कपी रीस राक्षस कोट्यानकोटी । असंभाव्य ते चालिले रामभेटी ।
समस्तीं प्रभूला नमस्कार केले । पुढें सर्वही हात जोडून ठेले ॥ ४५ ॥
समस्तीं विरीं राम गूणागराला । बहू प्रार्थिलें त्या दयासागराला ।
समस्तांसि देवें निरोपासि द्यावें । म्हणे राम तो शीघ्र जेऊनि जावें ४६
नमस्कार केले तया विश्ववंद्या । पुढें शीघ्र संपादिल्या स्नानसंध्या ।
असंभाव्य तें दिव्य अन्नें सुवासें । बहू पंगती घातल्या सावकासें ॥ ४७ ॥
ऋषी राम ते सर्वही बंधुवर्गी । कीतीयेक ते बैसिजे आप्तवर्गी ।
प्रभा फांकली दिव्यरत्नी अनर्घी । कपीवीर ते बैसले जेवि स्वर्गी ॥ ४८॥

१ भोजन. २ गायींची ३ पाखर म्ह० झालर घालून सज्ज केले.

कपी ऋक्ष राक्षस सर्वै मिळाले। असंभाव्य ते भोजनालागि आले।
बहू पाकनिष्पत्ति नानापरीची। प्रकारें रसाळें कळाकूसरीचीं ॥ ४९ ॥
जगज्जननी जानकी वाढिताहे। सुवासें महासौख्य तें होत आहे।
यथासांग संपूर्ण तें अन्न जालें। पुढें सीघ्र तें शर्करा आज्य आलें ॥५०॥
पयादीक नानारसें पूर्णपात्रें। त्वरें घेतले ग्रास राजीवनेत्रें।
समस्तांसि आज्ञापिले देवधीशें। कपी गर्जले सर्वही नामघोषें ॥ ५१ ॥
तया जेवितां जेवितां भक्ष जालें। पुन्हा मागुतें सद्यं[1] ऊदंड आलें।
घृतें वाढितां वाढितां वोघ गेले। असंभाव्य नाना रसें तृप्त केले ॥ ५२ ॥
अपेक्षीं तया मागती सर्व शाखा। कीतीयेक ते आणवीती कथीका[2]।
क्षिरी लोणचीं रायतीं भातभक्षें। खुणा दाविता मागती येक लक्षें ॥५३॥
जळें सीतळें सर्वही सेविताती। पुन्हा मागुते वीर ते जेविताती।
समस्तांसि तें सांग संपूर्ण जाली। पुढें सीघ्र दध्योदनें आणवीलीं ॥५४॥
बहू जेवितां जेवितां येक मधें। प्रतापें मुखें बोलती श्लोक गद्यें।
मनीं भासती अर्थ नानापरीचे। मुखें रामनामें महद्घोष वाचे ॥ ५५ ॥
समस्तांसि तें सांग संपूर्ण जालें। महां तृप्तिनें चित्त सूखें निवालें।
वरीं आच्मनें शुद्ध केलीं खळाळां। कितीयेक तें तोय घेती घळाळां ५६
सभामंडपीं सर्वही स्वस्थ जाले। सुगंधें विडे सीघ्र ते आणवीले।
समस्तांसि संपूर्ण नाना सुवासें। कपी पूजिले सर्व नानाविलासें ॥५७॥
समस्तीं विडे घेतले पीतवर्णें। सुपारी बरी कर्पुरें मुक्तचूर्णें[3]।
बहू व्येलंं[4] लोंगा[5] सुवासें खदीरें[6]। किती जाति कंकोळ नानाप्रकारें ॥ ५८
अळंकार चीरें बहू सिद्ध केलीं। असंभाव्य दिव्यांबरें आणवीलीं।
बहू भूषणाचे बहू ढीग केले। जगज्जनकें ते कपी गौरवीले ॥ ५९ ॥
तुरे लाविले घातल्या पुष्पमाळा। कितीयेक त्या रत्नमाळा सुढाळा[7]।
करीं कंकणें मुद्रिका लेववीली। यथासांग संपूर्ण सर्वांग केलीं ॥ ६० ॥
सभामंडपीं फांकल्या रत्नकीळा। समस्तांसि ते जाहली सौख्य वेळा।
कितीयेक सांगीतल्या सौख्यगोष्टी। महावीर आनंदले सर्व सृष्टी ॥६१॥
स्तुतीउत्तरें सर्व लावण्यखाणी। मुखें बोलिला राम कारुण्यवाणी।
तुम्ही कष्ट केले जिवें सर्वभावें। तुम्हांलागिं उत्तीर्ण म्यां काय व्हावें ६२
कपी सुग्रिवां अंगदा जांबुवंता। गजा मारुता आणि नैऋत्यनाथा।
समस्तांसि सन्मानिलें रामचंद्रें। सुधाउत्तरीं तोषवीलें नरेंद्रें ॥ ६३ ॥

१ तत्काळ, वरचेवर. २ कढी. ३ मोत्याचा चुना. ४ वेलची, वेलदोडा. ५ लवंगा. ६ कात. ७ भव्य, प्रशस्त.

मुखें बोलिजे वैद्यराजासी देवें । कपी तूज ऊचीत म्यां काय द्यावें ।
वरू दीधला रामचंद्रें उचीती । तुझ्या दर्शनें लोक आरोग्य होती ॥६४॥
समस्तांकडे पाहिलें राघवानें । तया सर्व रोमांच आले स्फुराणें ।
नमस्कारिले स्वामि देवाधिदेवा । म्हणे राम तो लोभ आतां असावा ६५
असंभाव्य केली स्तुती राघवाची । वदों लागली मंडळी प्रेमळांची ।
कपी बोलती सर्व कारुण्यवाचा । स्तुती ऐकतो राम सिंधू सुखाचा ६६
गिरीकंदरामाजि आम्ही असावें । नरीं देखतां वानरीं सीघ्र जावें ।
समर्थं सवे[1] लागिली मर्कटांला । महां सुकृता पार नाहीं सुखाला[2] ॥६७॥
प्रभू बोलणें चालणें काय जाणों । बरें वोखटें सर्व कांहींच नेणों ।
बहूतांपरीं चालवीलें दयाळें । तुम्हां योग्य हें आमुचें तोंड काळें[3] ॥६८॥
कृपाळूपणें राघवें थोर केलें । बरें वोखटें सर्व साहोनि नेलें ।
बहू देखिलें सौख्य नानापरीचें । प्रभू श्वापदांलागि हें प्राप्त कैचें ॥ ६९ ॥
सभाग्याचिये संगतीनें असावें । बहूतापरीचें बहू सौख्य घ्यावें ।
तयासारिखें सर्व आम्हांसि जालें । महां वैभवें चित्त सूखें निवालें ॥७०
नव्हे भेटि नानापरी योगयागें । नव्हे भेटि नानापरी भोगत्यागें ।
नव्हे भेटि ब्रह्मादिकां सीघ्र काळें । त्रिकूटांचळीं दाखवीलें भुपाळें ॥७१
कपी रीस ते बोलती दैन्यवाणे । कृपासागरू जीवीचा भाव जाणे ।
तयाच्या सिणें देव तो सीणताहे । बहूतांपरीं राम संबोखिताहे ॥ ७२ ॥
सवे लागली राघवाची सुटेना । प्रिती गुंतली तोडितांही तुटेना ।
बहू दीस गेले सुखाचेनि योगें । अकस्मात तें दुःख जालें वियोगें ॥ ७३॥
प्रभू संगतीची सवे दृढ केली । अकस्मात कां सर्व छेदूनि नेली ।
तया बोलता जाहला रावणारी । तुम्हां भेटि देईन कृष्णावतारीं ॥ ७४ ॥
दयाळासि तेहीं नमस्कार केले । प्रभू सव्य[4] घालूनि तैसे निघाले ।
समस्तीं समस्तांस वंदून वेगीं । पुढें नीघते जाहले ते प्रसंगीं ॥ ७५ ॥
मनें वीकळें[5] भक्तपाळें भुपाळें । मनामाजि ते खंति केली दयाळें ।
जनीं सेवकांलागि देखोनि ऊणें । बहू कष्ट घेऊनियां सौख्य देणें ॥ ७६ ॥
मनीं भावना भक्तलोकांसि जैसी । तयासारिखी देवरायासि तैसी ।
जनीं सेवकांकारणें जन्म घेणें । महद्भाग्य सांडूनियां नीच होणें ॥७७॥
पडे सांकडें सर्वदा सेवकांचें । दिनानाथ हें ब्रीद विख्यात साचें ।
मनामाजि ते जैसजैसी अपेक्षा । करीना कदा राम त्यांची उपेक्षा ॥७८॥

१ सवय. २ हें कपींचें सर्व भाषण कळवळ्याचें व फार उमदें आहे. ३ आम्ही तर वाईट आहोंत पण तुम्हीं दयेनें आमचें चालविलें ही तुमची थोरवी ! ४ उजवी प्रदक्षिणा. ५ विकळ, विव्हळ, व्याकुळ.

असंभाव्य अन्याय तो आठवीना। बहू चूकतां देव कांहीं सिणेना।
तया मानसीं लागली प्रेममाया। करी सेवकालागि नाना उपाया ॥७९॥
सदा सर्वदा देव दासाभिमानी। कृपा भाकितां सीघ्र पावे निदानी।
तया अंतरीं थोर लहान नाहीं। परी पाहिजे दृढ भावार्थ कांहीं ॥ ८० ॥
जया अंतरीं भाव होईल जैसा। तयांलागि तो देव पावेल तैसा।
यदर्थीं कदा संशयोही असेना। अभावें तरी देव तो पालटेना ॥ ८१ ॥
कितीयेक अन्याय कोट्यानकोटी। भ्रमें होय नानापरी बुद्धि खोटी।
तऱ्हीं पाहतां लोभ त्याचा सरेना। कृपासागरू तो कदा वोसरेना॥ ८२ ॥
दयाळुपणें देव राजाधिराजें। शिरीं वाहिजे सर्वही भक्तवोझें।
जनीं दास देखोनियां दैन्यवाणा। मनामाजि वोसावतो देवराणा॥ ८३ ॥
बहूसाल हें बोलणें काय कीती। स्वयें जाणती ज्यां असे सप्रचीती।
अयोध्यापुरीमाजि तो रामराजा। कृपाळू सुखें राहिला भक्तकाजा ८४
कपीवीर गेले स्थळें जेथजेथें। प्रिती मारुती राहिला राम तेथें।
रघूनाथ सीता तये बंधुवर्गीं। उभें राहिजे सेवकें पूर्वभागीं ॥ ८५ ॥
समस्तांसि पूजूनि नाना विळासें। नमस्कारिलें सर्वदा सानुदासें।
उदासीन श्रोतीं कदाही न कीजे। बहू भेद भाषा क्षमा सर्व कीजे ॥८६॥
मनामाजि ऊपासना रामध्यानी। जनीं दास नीवेदनी ब्रह्मज्ञानी।
अखंडीत या राघवाच्या प्रतापें। विवेकें विचारें समाधान सोपें ॥ ८७ ॥
पदीं लागतां निर्गुणी भक्त जाले। बहूसंग निःसंग होऊन गेले।
विवेकें बरें पाहतां ध्येय ध्याता। विचारें बरें शोधितां ज्ञेय ज्ञाता ॥८८॥
विवंचून तो साधकू साध्य जाला। असंभाव्य तो ब्रह्मबोधें बुडाला।
पुसावें कळेना तरी सज्जनाला। धरूनी त्यजावें विदेहीपणाला ॥ ८९ ॥
असो हें जनीं प्राप्त तेणें धरावें। अनुर्वाच्य तें वाच्य कैसें म्हणावें।
सदा नित्य नीरूपणीं वीवरावें। नुरावें परी कीर्तिरूपें उरावें ॥ ९० ॥
असो जाणत्याला कळे सर्व कांहीं। जनीं नेणता त्यास कांहींच नाहीं।
नसे ज्ञान तें सर्वही व्यर्थ गेलें। जळो पंचभौतीक हें काय केलें ॥ ९१ ॥
असो हे कथा बोलिली राघवाची। जनीं सर्वदा ऐकती धन्य त्यांची।
कथा ऐकतां ते महा दोष जाती। दुःखें नासती लोक ते धन्य होती ९२

---

१ 'ये यथा मां प्रपद्यन्ते । तांस्तथैव भजाम्यहम्' २ उदास, असमाधानी होतो. ३ आत्मनिवेदन भक्ति करणारा. ४ ध्येय आणि ध्याता व ज्ञेय आणि ज्ञाता हीं विचार करून पाहातां एकच आहेत.

चरित्रें बरीं उत्तमें राघवाचीं । असंभाव्य विस्तारली पावनाची ।
कितीयेक तें पाहतां कोटि होती । जनीं येक येकाक्षरें दोष जाती ॥९३
शतांचीं शतें पूर्ण आरंभ संधी । कळाया कथा हेतसंकेत सिधी ।
पुढें बोलिलें तें बरें वीवरावें । पुसायासि हें गद्य पोटीं धरावें ॥ ९४ ॥
मुळारंभ ते स्तूति नानापरीची । गिरीवर्णना जाहली सागराची ।
पहीले शतीं भेटि बिभीषणाची । पुढें सेवटीं शेज दर्भासनाची ॥ ९५
द्वितीये शतीं राम क्रोधासि आला । कथेलागि तेथूनि आरंभ जाला ।
बळें सिंधु पाल्हाणिला शूक गेला । अपेक्षा मनीं शृंग पाहावयाला ॥९६
तृतीये शतीं शृंग पाहों निघाले । रिपूलागि तो शिष्ट जाऊनि बोले ।
बहू वीर राक्षस युद्धीं निमाले । कपी सर्वही नागफांसीं निजेले ॥ ९७
रणें दाखवीलीं तये जानकीला । तृतीये विरेंसीं प्रहस्तू निमाला ।
प्रसंगेंचि मंदोदरी नीति सांगे । निघाला दशग्रीव तो लागवेगें ॥ ९८ ॥
चतुर्थे शतीं युद्ध त्या रावणानें । रघूनायकें सोडिला जीवदानें ।
पुढें कुंभकर्णासि संहार केला । समूदाव तो कूमराचा निमाला ॥ ९९ ॥
कितीयेक ते वीर महादरेंसी । प्रतापें रणामाजि ते प्रेतरासी ।
पुढें इंद्रजीतें कपी भग्न केले । महां वीर ते बाणजाळें निमाले ॥ १०० ॥
शता पांचव्यालागि आरंभ जाला । कपीवीर द्रोणाचळामाजि गेला ।
महां वीर ते ऊठिले स्वस्थ जाले । त्रिकूटाचळू सर्व जाळूं निघाले ॥१।
कपी क्षोभले काळयुद्धीं निघाले । कितीयेक राक्षस युद्धीं निमाले ।
नभींहूनि तो रावणी वीर आला । समस्तांसि भेदूनियां शीघ्र गेला ॥ २
सहावे शतीं रावणू दुःख सांगे । त्रिकूटाचळीं रावणी लागवेगें ।
पुन्हा इंद्रजीतू रणामाजि आला । विरीं वानरीं होम तो भग्न केला ॥३।
शतीं सातवे त्या विरें इंद्रजीतें । रणामाजि केलीं असंभाव्य प्रेतें ।
सुमित्रासुतें मारिला बाणघातें । यथासांग तो वन्हि सूलोचनेतें ॥ ४ ॥
शतीं आठवे वीर घायाळ गेले । कीतीयेक राक्षस युद्धीं निमाले ।
सुमित्रासुता रावणें घात केला । गिरी द्रोण आणूनियां सिद्ध जाला ५
नवांमाजि रामासि सौमित्र सांगे । बळें भंगिला होम तो लागवेगें ।
रघूनायकें घोर संग्राम केला । रणामाजि तो मुख्य शत्रू निमाला ॥ ६ ॥
दहावें शतीं शोक अंतःपुराचा । प्रसंगें महोत्साव बीभीषणाचा ।
रघूनायकें जानकी आणवीली । समस्तां सुरां राघवा भेटि जाली ॥७॥
शतीं येक येकादसी राघवाची । असंभाव्य ते स्तूति ब्रह्मादिकांची ।
महापुष्पकारूढ होऊनि गेले । पुढें भ्रातया भेटले स्वस्थ जाले ॥ ८ ॥

१ श्लोक ६६ ते ९३ हे सर्वच अत्यंत बहारीचे आहेत. बहुवार वाचून तृप्ति होत नाहीं.

पुढें द्वादसी मंदिरें त्या विरांचीं । यथायोग्य स्नानें समस्तां जणाचीं ।
पुजा भोजनें सांग सर्वांस जालीं । पुरी वर्णितां मानसें तें निवालीं ॥९॥
शतीं अष्टपंची पुरीमाजि गेले । रघूराज भद्रासनीं बैसवीले ।
महोत्साव उत्साव नानापरीचा । समूदाव तो बोळवीला कपीचा ॥१०॥
करी राम तो राज्य नानाविलासीं । जनामाजि ऊपासना रामदासीं ।
यथासांग तेरा शतें श्लोक जाले । गुणी ऐकतां चित्त सूखें निवाले ॥ ११

इति श्रीयुद्धकांडरामायण.



# ( १४ ) करुणास्तोत्रें.



१

विद्यानिधान गणराज विराजताहे ।
सिंधूर[1] तो घवघवीत रसाळपाहे ।
विघ्नांसि मार अनिवारचि होत आहे ।
आनंदरूप तुळणा दुसरीन साहे ॥ १ ॥

गंडस्थळें झिरपती बहु वास जेथें ।
सुवासमस्त[2] रिझले अळिकूळ तेथें ।
शुंडा प्रचंड मिरवी गजकर्णथापा ।
तेजाळ अंकुश म्हणे दुरितासि कापा ॥ २ ॥

फर्सा[3] पुसूनि सरसावतसे अघाला ।
भक्तांसि विघ्न रचितां रिचवीत घाला ।
साठीसहस्त्र गण त्यांसरिसा निघाला ।
मूषकवाहन करी दुरितासि हाला ॥ ३ ॥

वीतंडसा बलवंड गिरितुल्य धांवे ।
भक्तांसि रक्षित रिपूवरि तो उठावे ।
अंदूस तोडरगुणें करितो चपेटा ।
गर्जिन्नल्या घणघणाट प्रचंड घंटा ॥ ४ ॥

ध्यानीं धरील नरकुंजर बुद्धिदाता ।
त्याची फिटे अवलिळा सकळैक चिंता[4] ।
आधीं गणेश सकळांपुजणेंचि लागे ।
दासां मनीं तजविजा औवजा[5] न लागे ॥ ५ ॥

---

१ शेंदूर. २ परिमळानें मस्त झालेले भ्रमरसमुदाय. ३ परशु. ४ चिंता. ५ भय.

## २ गणेशशारदासद्गुरु.

गजवदन विराजे रंगसाहित्य माजे।
रतिपतिगति लाजे लुब्ध कैळासराजे।
फरश कमळ साजे तोडरीं ब्रीद गाजे।
सिद्धि बुद्धि अबळा जेपावती विश्वबीजें ॥ १ ॥
नटवर नटनाट्यें नाट्यनट्टांगसंगीं।
गजवदन सुरंगीं रंगसाहित्यरंगीं।
अभिनव नटलीळा रंगणीं रंग माजे।
चपळपण विराजे सर्व कल्लोळ गाजे ॥ २ ॥
हरिसुतदुहिता[1] ते मुख्य आधीं नमावी।
मग सुगमपथीं हे सीघ्र काळें गमावी[2]।
मतिकमळ विकासे सर्व साहित्यभासे।
दुरित सकळ नासे स्वस्व-रूपीं विळासे ॥ ३ ॥
तुजविण मति माझी मंदली शारदांबे।
लगबग[3] जगदंबे तूं करीं वो विलंबें।
प्रगट रुप करावें वैखरीमाजि आतां।
अगणित गुण गातां तोषवीं बुद्धिमंतां[4] ॥ ४ ॥
अगणितसुखदाता त्यासि वंदीन आतां।
शुभ लिखित विधाता शीकवी धातमाता।
गुरुवचनबळें हा साधकां मोक्ष लाभे।
विमळ भजनलीळा अंतरामाजि शोभे ॥ ५ ॥

## ३ विमळ विवेक.

गजमुख सुखदाता मानसीं आठवावा।
मग विमळमतीचा योग पुढें करावा।
सुरवर मुनि योगी वंदिती धुंडिराजा।
सकळ सफळ विद्या यावया आत्मकाजा ॥ १ ॥
खळखळ खळयोगें वाउगी होत आहे।
तळमळ मळ पोटीं सज्जनांतें न साहे।
मळमळ करिताहे तें कदाही न राहे।
परि विमळविवेकें कल्पना स्थीर राहे ॥ २ ॥

---

१ ब्रह्मकन्या, शारदा. २ प्राप्त व्हावी, पावावी. ३ पावण्याची त्वरा. ४ चतुर श्रोते.

चटपट विषयांची सर्व सोडूनि द्यावी ।
वटवट न करावी भक्ति भावें करावी ।
खटपट हटयोगें कामना ते नसावी ।
झटपट श्रवणाची सार चित्तीं वसावी ॥ ३ ॥
जपतजपत काचा मेळ त्या मातृकांचा ।
निगमगुज फुकाचा योग सर्वा सुखाचा ।
सकलभुवनवासी चूकलासी तयासी ।
हर हर हर कासीसर्वदा तूजपासी ॥ ४ ॥

## ४ नमन.

नमूं फर्शपाणी नमूं यंत्रपाणी । नमूं मोक्षपाणी नमूं चापपाणी ।
नमूं चक्रपाणी नमूं शूळपाणी । नमूं दंडपाणी हरिद्रुमपाणी ॥ १ ॥
नमूं आदिमाता नमूं योगमाता । नमूं वेदमाता नमूं विश्वमाता ।
नमूं भक्तिमाता नमूं मुक्तिमाता । नमूं सज्जनाची कृपा ज्ञानमाता ॥ २ ॥
नमूं योगरूपी नमूं ज्ञानरूपी । नमूं संतरूपी नमूं ध्यानरूपी ।
नमूं दिव्यरूपी नमूं निश्वरूपी । नमूं येकरूपी गुरु स्स्वरूपी ॥ ३ ॥
नमूं संतयोगी नमूं सिद्धयोगी । नमूं भक्त ज्ञानी विवेकी विरागी ।
नमूं आत्मनिष्ठां नमूं योगनिष्ठां । नमूं सर्वश्रेष्ठां वरिष्ठां वरिष्ठां ॥ ४ ॥
मनीं चिंतितां राम विश्राम वाटे । जगज्जाळजंजाळ हे सर्व तूटे ।
तुटे काळजी काळ जिंकावयाची । फुटे वृत्ति अर्थांतरीं जावयाची ॥५॥

## ५

गणपती मति दे मज लाघवी । जनकजापतिचा लघुसा कवी ।
विनवितों करुणाळयकारणा । परम सुंदर दे मज धारणा ॥ १ ॥
सबळ रामकथा वदतां नये । म्हणाने वांछितसे तुझिये दये ।
विधिसुते स्वहिते करुणालये । हरिजना विजयो तुजला जये ॥ २ ॥
बहुत वाड पवाडे वदों कसे । कवित-जाडकळा हृदईं नसे ।
बहुत हीण कठीण कुलक्षणु । रघुविराकरितांचि सुलक्षणु ॥ ३ ॥
बहुत सेवक त्याहुनि हीण मा । बहुत सेवक त्याहुनि दीन मी ।
बहुत काय वदों गुण आपुले । पतित ते मजहूनि भले भले ॥ ४ ॥

---

१ गणेश, शारदा, सद्गुरु व संत यांना चार श्लोकांत नमन करून पांचव्यांत रामचिंतनाचें फल काय मिळतें तें सांगितलें आहे. २ हरिद्रुम म्ह० कल्पवृक्ष. ३ सूक्ष्म. ४ सीतापतिरामाचा. ५ ब्रह्मसुते, शारदे. ६ मोठी कीर्ति. ७ उत्तम कवित्वशक्ति.

पतित दास जनीं तुमचे खरे। पतितपावन नाम कसें उरे।
वचन लागतसे पाहातां धुरे[1]। नुधरितां[2] ब्रिद हें तुमचें नुरे॥ ५॥

६

रघुपतितनुरंगें रंगली नीळशोभा।
रघुपतिरुपयोगें सर्वलावण्यगाभा।
रघुपतिगुणगंधें धैर्य गांभीर्य लोकीं।
रघुपति मम चित्तीं बैसला येकनेकीं[3]॥ १॥
त्रैलोक्यनाथ रघुनाथ अनाथबंधू।
त्रैलोक्यनाथ रघुनाथ करुणैकसिंधू।
त्रैलोक्यनाथ रघुनाथ कोदंडधारी।
त्रैलोक्यनाथ रघुनाथ लीळावतारी॥ २॥
रघुपतिपदयुग्मीं लीन भावें असावें।
रविकुळटिळकाचें नाम वाचे वसावें।
श्रवणमनन भावें आदरेंसीं करावें।
परम सुख समाधी संतसंगें तरावें॥ ३॥
तुजविण सिण जाला धांव रे रामराया।
कठिण दिवस जातो तापली सर्व काया।
सकळ विकळ गात्रें अवस्था लागली रे।
तुजविण जगदीशा बुद्धि हे भंगली रे॥ ४॥

## ७ गूज हें सज्जनाचें.

वदनिं मदन इंदू तूळितांही तुळेना।
अगणितगुणसिंधू बिंदु तो वर्णवेना।
सकळ भुवन पाळी ऊपमा काय द्यावी।
विकळशरिरभावें भावितां चित्त गोवी॥ १॥
दशशतवदनाचा धीर मेरू बळाचा।
परम कुशळ वाचा शेष सर्वोत्तमाचा।
अगणितगुणमुद्रा शोधितां त्या नरेंद्रा।
अकळ विकळभावें जाहला गूणनिद्रा॥ २॥
स्मरण स्मररिपूचें वीषहर्तें वपूचें।
निजबिज निगमाचें सार सर्वागमांचें।

---

१ लोकनायकाला. २ उद्धरिलें नाहीं तर. ३ अनेकीं येक असा.

मन त्रिभुवनाचें गूज योगीजनाचें ।
जिवन जड जिवांचें नाम या राघवाचें ॥ ३ ॥

हरिजनभजनाचा होय साक्षी मनाचा ।
सकळत्रिभुवनाचा प्राण साधूजनांचा ।
परिहरिभजनाचा आखिलासे दिनाचा ।
घननिळगगनाचा रंग सर्वोत्तमाचा ॥ ४ ॥

विधिकुळभुषणाचें धाम सर्वागुणांचें ।
भरण अभरणाचें सर्वलावण्य साचें ।
सुख परमसुखाचें ध्येय ब्रह्मादिकांचें ।
भजन हरिजनाचें गूज हें सज्जनाचें ॥ ५ ॥

## ८ शीतल छाया.

रघुविरभजनाची मानसीं प्रीति लागो ।
रघुविरस्मरणाची अंतरीं वृत्ति जागो ।
रघुविरचरणाची वासना वास मागो ।
रघुविरगुण गातां वाणि हे नित्य रंगो ॥ १ ॥

चतुरपण जनीं हें पाहतां आडळेना ।
निकट रघुविराचें रूप कैसें कळेना ।
चपळमन वळेना गर्वताठा गळेना ।
तुजविण जगदीशा कर्मरेखा टळेना ॥ २ ॥

तरुणपण देहाचें लोपतां वेळ नाहीं ।
तनमनधन अंतीं वोसरे सर्व कांहीं ।
सकळ जन बुडाले व्यर्थ मायाप्रवाहीं ।
झडकरि सुमना रे हीत शोधूनि पांही ॥ ३ ॥

पळपळ चळताहे बाळ तारुण्य देहीं ।
तळमळ विषयांची नेणवे हीत कांहीं ।
ळळलळ गरळा तो काळ लाळीत आहे ।
जळजळ शितळा हे भक्तिसेउनि राहे ॥ ४ ॥

दिनकरकुळवल्ली लोटली अंगभारें ।
रघुविरअवतारें दाटली थोरथोरें ।
सुखरूप सुखवासी राहिले योगरासी ।
सफळ सितळ छाया फावली रामदासीं ॥ ५ ॥

## ९ श्रीरामाचे उपकार.

हिणाहून मी हीण जैसे भिकारी। दिनाहून मी दीन नानाविकारी।
पतीतांसि रे आणि हातीं धरावें। समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें॥ १॥
जनीं भक्ति नाहीं मनीं भाव नाहीं। मला युक्ति ना बुद्धि कांहींच नाहीं।
कृपाळूपणें राज्य रंकासि द्यावें। समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें॥ २॥
बहूसाल अन्याय कोट्यानकोटी। रघूनायकें घातले सर्व पोटीं।
किती काय गुणांसि म्यां आठवावें। समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें॥३
समर्थें दिल्हें सौख्य नानापरीचें। सदा सर्वदा जाणसी अंतरीचें।
लळे पाळिले तूं कृपाळू स्वभावें। समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें॥ ४॥
दिनानाथ हें ब्रीद त्वां साच केलें। ह्मणे दास भक्तांसि रे उद्धरीलें।
सुखें सांडणें या देह्याचें करावें। समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें॥ ५॥

## १० प्रभु दर्शन.

नव्हे राजयोगी महद्भाग्य त्यागी। उदासीन जो वीतरागी विरागी।
जनस्थानगोदातटीं वास केला। प्रभू देखिला दास संतुष्ट जाला॥ १॥
लिळाविग्रही देव ब्रह्मादिकांचा। सदा बोलणें चालणें सत्य वाचा।
जया चिंतितां चंद्रमौळी निवाला। प्रभु देखिला दास संतुष्ट जाला॥ २
दिनानाथ विख्यात हें नाम साजे। प्रजापाळकू रामराजा विराजे।
बहू सुकृताचा बरा काळ आला। प्रभु देखिला दास संतुष्ट जाला॥३॥
जेणें सोडिल्या देवकोटी अचाटा। सुखें चालती स्वर्गिच्या स्वर्गवाटा।
प्रतापेंचि त्रैलोक्य आनंदवीला। प्रभू देखिला दास संतुष्ट जाला॥ ४॥
ऋषी तापसी योगरासी विळासी। मनीं चिंतिती राम लावण्यरासी।
असंभाव्य त्या कीर्तिच्या कीर्तिढाला। प्रभू देखिला दास संतुष्ट जाला ५

## ११ श्रीसमर्थांची इच्छा.

सीवर्णा मनाचा विपरीतवाणा। उदास वाटे बहुसाल प्राणा।
मग राघवा रे तुज बाहिलों रे। कृपाळुवें सत्वर पाहिलों रे॥ १॥
देवें दयाळें करुणा करावी। भक्ताभिमानें भरणी भरावी।
हे रामनौमी तरणी तरावी। दासां समस्तां वरणी वरावी॥ २॥
रघुनाथदासा कल्याण व्हावें। अती सौख्य व्हावें आनंदवावें।
उद्वेग नासो वर शत्रु नासो। नानाविळासें मग तो विळासो॥ ३॥

---

१ उतराई. २ त्याग. ३ पंचवटींत. ४ शंकर. ५ पुष्कळ. ६ क्षपणक किंवा श्रमणक या शब्दाचा हा अपभ्रंश असावा. 'दुर्बल' असा तात्पर्यार्थ. ७ धांवा केला. ८ पोषण. ९ नौका. १० पुजेची पाळी.

कोडें[1] नको रे कळहो नको रे। कापट्य कर्मीं सहसा नको रे।
निर्वाणचिंता निरसीं अनंता। शरणागतां दे बहु धातमांता[2] ॥ ४ ॥
अजयो न हो रे जयवंत हो रे। आपदा नको रे बहु भाग्य हो रे।
श्रीमंतकारी जनहीतकारी। परऊपकारी हरि दास तारीं ॥ ५ ॥

## १२ श्रीसमर्थांची निष्ठा.

तुज वर्णितों भाट मी देवराया। सदा सर्वदा गाय ब्रीदें सवाया।
महाराज दे आंगिचें वस्त्र आतां। बहू जीर्ण जाली देहेबुद्धिकंथा ॥ १ ॥
तुझा भिक्षकू दातया रामचंद्रा। सदा स्वस्था चिंतीतसे गा महींद्रा।
राजाधीश देशा उरपूर्ण[3] द्यावें। भवदैन्य हें देशधाडी करावें ॥ २ ॥
तुझा भृत्य मी भार्गवादर्पजीता[4]। जीवित्व असे अर्पिलें तूज आतां।
भवा जिंकितां जीव देईन पाहे। तुज सन्मुख पाठिसीं स्थीर राहे ॥ ३ ॥
रघूनायका नीकट दास तूझा। तुला वीकिलासे स्वयें देह माझा।
सदा सर्वभावें करी दास्य तूझें। देईं आपुलें वेसवेतन[5] माझें ॥ ४ ॥
तुझे मारुतीसारिखे दास देवा। मज मानवा किंकरा कोण केवा[6]।
दिनानाथ विख्यात हें ब्रीद गाजे। तेणें मानसीं थोर आनंद माजे ॥ ५ ॥

## १३ चाफळीं श्रीरामाच्या आगमनाचा आनंद.

लवे नेत्रपातें स्फुरे आजि बाहे। दिनानाथ हा राम येणार आहे।
जयाचेनि योगें सुखानंद लोटे। तया देखतां अंतरीं बाष्प दाटे ॥ १ ॥
लळे पाळितो राम आम्हां दिनांचे। कृपासागरू भाव जाणे मनाचे।
नुपेक्षी कदा संकटीं धांव घाली। तया देखतां मानसें तें निवालीं ॥ २ ॥
लगाँ[7] पाहतां राघवेंवीण नाहीं। निराधार हें पाहतां सर्व कांहीं।
चळेना जनीं तोचि आश्रो[8] धरावा। रघूराज आधार याचा करावा ॥ ३
लपावें[9] अती आदरें रामरूपीं। भयातीत निश्चित ये स्वस्वरूपीं।
कदा तो जनीं पाहतां ही दिसेना। सदा ऐक्य तो भिन्न भावें वसेना ४
लघूलाघवी राम कोदंडधारी। मनीं चिंतितां शोक संताप हारी।
महा संकटें नाम घेतां निवारी। भवसागरीं मूढ पाषाणतारी ॥ ५ ॥

---

१ संकट. २ धात=कल्पित गोष्ट व मात=घडलेली गोष्ट. ३ ऊरपूर, सुभिक्ष. ४ परशुरामाचा गर्व हरण करणाऱ्या रामा ५ वेसवेतन=दासाचें वेतन. ६ बरोबरी. ७ आधार. ८ अचळ शाश्वत अशाचाच आश्रय करावा. ९ मनोबोध श्लोक १८५ पहा. ह्याच तो आहे.

## १४ श्रीरामाचें ब्रीद.

चकोरासि चंद्रोदयीं सूख जैसें । रघूनायका देखतां सूख तैसें ।
सगूणासि लांचावलें स्थीर राहे । रघूनंदनेंवीण कांहीं न पाहे ॥ १ ॥
चळेना समरंगणीं ठाण मागें । चळेना मुखें बोलतां वाक्य यूगें ।
चळेना कृपासिंधु कल्पांतकाळीं । रघूराज हा आदरें दास पाळी ॥ २ ॥
चमत्कारलें चित्त हें रामगूणीं । उठे कीर्ति वाखाणितां प्रीति दूणी ।
रघूनायकासारिखा देव नाहीं । क्रिया पाहतां चोखडी सर्व कांहीं ॥ ३ ॥
चळेना कदा राज्य बीभीषणाचें । चळेना देहे चालतां मारुतीचें ।
चळेना तगी राहतां नामछंदीं । चळेना सिमा घातली सेतुबंदीं ॥ ४ ॥
चपेटा विझे काळमाथां जयाचा । धरीं रे मना पंथ या राघवाचा ।
विवेकीं जनें राजपंथें चि जावें । तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥ ५ ॥

## १५ रामरूप.

परमसुंदर रूपश्यामळ । इंद्रनीळकिळकांति कोमळ ।
भयनिवारण भक्तवत्सळ । वरपराक्रम कीर्तिवीमळ ॥ १ ॥
भुवनकंटकदैत्यमारक । अमरमोचन दैन्यहारक ।
दुरितनाशन पुण्यकारक । हरितसंकट दासतारक ॥ २ ॥
विकटविषमताळछेदक । वरअनावदैत्यभेदक ।
दशमुखांतकसीरच्छेदक । ऋषिमुनीजनचित्तवेधक ॥ ३ ॥
अमरभूषण उत्तमोत्तम । भुवनपाळक हा रघूत्तम ।
विरवीरांतक हा वीरोत्तम । असुर अंतक हा वरोत्तम ॥ ४ ॥
बहुतपीडकदैत्यभंजन । ऋषिमुनीजनयोगिरंजन ।
दुरितदानवदुष्टभंजन । अतुळकीर्तन व्यस्तव्यंजन ॥ ५ ॥

## १६ परशुरामाची प्रार्थना.

महांकोप अग्नी ऋसी जामदग्नी । समर्था तया जाणिजे सर्वसूज्ञी ।
सदा सर्वदा घेतसे नाम तूझें । वरिष्ठा स्वभावेंचि हें गोत्र माझें ॥ १ ॥
वसे सागराचे तिरीं सूत तूझा । समाचार तो घेत नाहींच माझा ।
तयाला बहूतांपरी शीकवावें । स्वभावेंचि वोढेल ऐसें करावें ॥ २ ॥
किती येक मागें बहू युद्ध केलें । कितीवेळ या ब्राह्मणा राज्य दिल्हें ।
अकस्मात सामर्थ्य तें काय जालें । युगासारिखें काय नेणों विझालें ॥ ३
चिरंजीव आहेसि ऐसी वदंती । समर्था ! तुझें चित्तकाठिण्य कीती ।
तुझें नामधारी तुला हें कळेना । कृपाळूपणें चित्त कैसें वळेना ॥ ४ ॥

नको रे उदासीन हें वाक्य मानी। समर्था असावें बहू साभिमानी।
करावी दिनानाथ हे सत्य वाचा। तुला चिंतितों दास मी राघवाचा ५

## १७ उदासीन हा काळ कोठें न कंठे.

समाधान साधुजनाचेनि[1] योगें। परी मागुतें दुःख होतें वियोगें।
घडीनें घडी शीण अत्यंत वाटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे॥ १ ॥
घरें सुंदरें सौख्य नाना परीचें। परी कोण जाणेल तें अंतरीचें।
मनीं आठवीतांचि तो कंठ दाटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥२॥
बळें लावितां चित्त कोठें जडेना। समाधान तें कांहिं केल्यां घडेना।
नव्हे धीर नैनीं[2] सदा नीर लोटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥३॥
अवस्था[3] मनीं लागली काय सांगों। गुणीं गुंतला हेत कोण्हासि मागों।
बहूसाल भेटावया प्राण फूटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ४ ॥
कृपाळूपणें भेट रे रामराया। वियोगें तुझ्या सर्व व्याकूळ काया।
जनामाजि लौकीक हा ही न सूटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ५
अहा रे विधी[4]! त्वां असें काय केलें। पराधेनता पाप माझें उदेलें।
बहूतांमधें चूकतां तूक[5] तूटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ६ ॥
समर्था मनीं सांडि[6] माझी नसावी। सदा सर्वदा भक्तचिंता असावी।
घडेना तुझा योग हा[7] प्रात खोटें। उदासीन हा काळ कोठें न कंठे॥ ७॥
अखंडीत हे सांग सेवा घडावी। न होतां तुझी भेटि काया पडावी।
दिसंदीस आयुष्य हें व्यर्थ आटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥८॥
भजों काय सर्वांपरी हीण देवा। करूं काय रे सर्व माझाचि ठेवा।
म्हणों काय मी कर्मरेखा न लोटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ९
म्हणे दास मी वास पाहें दयाळा। रघुनायका भक्तपाळा भुपाळा।
पहावें तुला हें जिवीं आर्त मोठें। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥१०

## १८ तुजवीण रामा मज कंठवेना.

तुझिया वियोगें जीवित्व आलें। शरीरंपांगें[9] बहु दुःख जालें।
अज्ञान दारिद्र्य माझें सरेना। तुजवीण रामा मज कंठवेना॥ १ ॥
परतंत्र जीणें कंठूं किती रे। उच्चाटं[10] माझे मनीं वाटतो रे।
ललाटरेखा तरि पालटेना। तुजवीण रामा मज कंठवेना॥ २ ॥

---

१ संतांच्या संयोगांत सुख, वियोगांत दुःख, दुर्जनांच्या अगदीं उलट! २ नेत्रांतून. ३ भेटीची उत्कंठा. ४ ब्रह्मदेवा! ५ तुक, वजन, महत्व. ६ त्याग. ७ हें प्रारब्ध. ८ तळमळ. ९ देहाच्या पराधीनतेमुळें. १० त्रास, कंटाळा.

जडली उपाधी अभिमान साधी। विवेक नाहीं बहुसाल बाधी।
स्वामी वियोगें पळही गमेना। तुजवीण रामा मज कंठवेना ॥ ३ ॥
विश्रांति देहीं अणुमात्र नाहीं। कुळाभिमानें पडिलों प्रवाहीं।
स्वहीत माझें होतां दिसेना। तुजवीण रामा मज कंठवेना ॥ ४ ॥
विषयी जनानें मज लाजवीलें। प्रपंचसंगें आयुष्य गेलें।
समयीं बहुक्रोध शांती घडेना। तुजवीण रामा मज कंठवेना ॥ ५ ॥
सदृढ जाली देहेबुद्धि देहीं। वैराग्य कांहीं होणार नाहीं।
अपूर्ण कामीं मन हें विटेना। तुजवीण रामा मज कंठवेना ॥ ६ ॥
निरूपणीं हे सद्वृत्ति होते। स्थळत्याग होतां सर्वेचि जाते।
काये करूं रे क्रिया घडेना। तुजवीण रामा मज कंठवेना ॥ ७ ॥
संसारसंगें बहु पीडलों रे। कारुण्यसिंधु मज सोडवीं रे।
कृपाकटाक्षें सांभाळीं दीना। तुजवीण रामा मज कंठवेना ॥ ८ ॥
जय जय दयाळा त्रैलोक्य पाळा। भवसिंधुहारी मज तारि हेळा।
स्वामी वियोगें पळही गमेना। तुजवीण रामा मज कंठवेना ॥ ९ ॥
आम्हां अनाथां तूं एक दाता। संसारचिंता चुकवीं समर्था।
दासा मनीं आठव वीसरेना। तुजवीण रामा मज कंठवेना ॥ १० ॥

## १९ रघुनायका मागणें हेंचि आतां.

उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी। अती आदरें सर्व सेवा करावी।
सदा प्रीति लागो तुझे गूण गातां। रघुनायका मागणें हेंचि आतां ॥ १॥
तुझें रूपडें लोचनीं म्यां पहावें। तुझे गुण गातां मनासी रहावें।
उठो आवडी भक्तिपंथेंचि जातां। रघुनायका मागणें हेंचि आतां ॥ २ ॥
मनीं वासना भक्ति तुझी करावी। कृपाळूपणें राघवें पूरवावी।
वसावें मज अंतरीं नाम घेतां। रघुनायका मागणें हेंचि आतां ॥ ३ ॥
सदा सर्वदा योग तूझा घडावा। तुझे कारणीं देह माझा पडावा।
नुपेक्षीं मज गुणवंता अनंता। रघुनायका मागणें हेंचि आतां ॥ ४ ॥
नको द्रव्यदारा नको येरझारा। नको मानसीं ज्ञानगर्वें फुगारा।
सगुणीं मज लाविं रे भक्तिपंथा। रघुनायका मागणें हेंचि आतां ॥ ५ ॥
भवें व्यापलों प्रीतिछाया करावी। कृपासागरें सर्वचिंता हरावी।
मज संकटीं सोडवावें समर्था। रघुनायका मागणें हेंचि आतां ॥ ६ ॥
मनीं कामना कल्पना ते नसावी। कुबुद्धी कुडी वासना नीरसावी।
नको संशयो तोडिं संसारव्यथा। रघुनायका मागणें हेंचि आतां ॥ ७ ॥

समर्थापुढें काय मागों कळेना । दुराशा मनीं बैसली हे ढळेना ।
पुढें संशयो नीरसीं सर्व चिंता । रघुनायका मागणें हेंचि आतां ॥ ८ ॥
ब्रिदाकारणें दीन हातीं धरावें । म्हणे दास भक्तांसि रे उद्धरावें ।
सुटो ब्रीद आम्हांसि सांडूनि जातां । रघुनायका मागणें हेंचि आतां ९

## २० रामपंचायतन.

देवालयें परम सुंदर दीपमाळा ।
वृंदावनें रमणियें वरधर्मशाळा ।
राजांगणें समघनें भुमिका सुढाळा ।
पुंजाळ ते झळकती बहु रत्न माळा ॥ १ ॥
सुवर्णवर्ण बहुवर्ण किरणें अपारें ।
मिश्रीत ते तळपती घन थोरथोरें ।
उंचावले गगन त्याहुनि उंच भासे ।
मुक्ताफळीं जडित मंडप तो विळासे ॥ २ ॥
सिंहासनावरि रघूत्तम मध्यभागीं ।
बंधू तिथे परम सुंदर पृष्ठभागीं ।
वन्हीसुता निकट शोभत वामभागीं ।
वीलासतो भिम भयानक पूर्वभागीं ॥ ३ ॥
मार्तंडमंडप उदंडचि सौख्यकारी ।
त्रैलोक्यपावन प्रभू दुरितें निवारी ।
ध्यातो सदाशिव अखंडित चापपाणी ।
ऊदंड कीर्ति निगमीं महिमा पुराणीं॥ ४ ॥
आनंदकंद रघुनंदन शोभताहे ।
कंदर्पकोटि वदनीं उपमा न साहे ।
आकर्ण पूर्णनयनीं रमणीय शोभा ।
विस्तीर्ण कीर्ण भुषणीं जगदीश उभा ॥ ५ ॥

## २१ रविकुळटिळक.

रविकुळटिळकाचें रूपलावण्य पाहे ।
रविकुळटिळकाचे चिंतनीं चित्त राहे ।
रविकुळटिळकाची कीर्ति जीवीं भरावी ।
रविकुळटिळकाची मूर्ति ध्यानीं धरावी ॥ १ ॥
कमळनयनरामें वेधिलें पूर्णकामें ।
सकळभयविरामें राम विश्रामधामें ।

घननिळतनुश्यामें चित्ततोषें आरामें ।
भुवनभजननेमें तारिले दास रामें ॥ २ ॥
बहुविध भजनाचीं दैवतें पाहिलीं हो ।
सकळ त्यजुनि रामीं वृत्ति हे राहिली हो ।
विमळगुणशिळाची लागली प्रीति मोठी ।
विमळ हृदय होतां उद्धरे कूळकोटी॥ ३ ॥
विमळगुणशिळाचे आदरें गूण गावे ।
विमळगुणशिळाचे दास वाचे वदावे ।
विमळगुणशिळाचा अंतरीं वेध लागो।
विमळगुणशिळाचा रंगणीं रंग गाजो ॥ ४ ॥
सकळगुणनिधीचा राम लावण्यसिंधू ।
अगणित गणवेना शक्तिरूपें अगाधू ।
प्रबळ बळ चळेना वाउगें व्यर्थ कामीं ।
ह्मणउनि मन रामीं लागलें पूर्णकामीं ॥ ५ ॥
परमसुखनदीचा मानसीं पूर लोटे ।
घननिळतनु जेव्हां अंतरीं राम भेटे ।
सुख परमसुखाचें सर्व लावण्य साचें ।
स्वरूप जगदिशाचें ध्यान त्या ईश्वराचें ॥ ६ ॥
मधुकर मन माझें रामपादांबुजीं हो ।
सगुण गुण निजांगें नित्य रंगोनि राहो ।
अचपळ गुणगूणीं बैसली प्रीति दूणी ।
शरणचरणभावें जाहला राम ऋणी ॥ ७ ॥
रघुपति गुणरंगें पाविजे भक्तिसंगें ।
भजन जनतरंगें सर्व सांडुनि मागें ।
अनुदिन वितरागें योगयागें विरागें ।
प्रगट तरत संगें सर्वदासानुरागें ॥ ८ ॥
रघुवरपर आतां कीर्तनीं गूण गावे ।
मथन त्रिभुवनाचें सर्व साहित्य फावे ।
सकळ जन तरावे वंश ही उद्धरावे ।
स्वजन जन करावें रामरूपीं भरावें ॥ ९ ॥
सकळ भुवन तारी राम लीळावतारी ।
भवभय अपहारी राम कोदंडधारी ।
मनन करि मना रे धीर हे वासना रे ।
रघुविरभजनाची हे धरीं कामना रे ॥ १० ॥

समर्थांपुढें काय मागों कळेना । दुराशा मनीं बैसली हे ढळेना ।
पुढें संशयो नीरसीं सर्व चिंता । रघुनायका मागणें हेंचि आतां ॥ ८ ॥
ब्रिदाकारणें दीन हातीं धरावें । म्हणे दास भक्तांसि रे उद्धरावें ।
सुटो ब्रीद आम्हांसि सांडूनि जातां । रघुनायका मागणें हेंचि आतां ९

## २० रामपंचायतन.

देवालयें परम सुंदर दीपमाळा ।
वृंदावनें रमणियें वरधर्मशाळा ।
राजांगणें समघनें भुमिका सुढाळा ।
पुंजाळ ते झळकती बहु रत्न माळा ॥ १ ॥
सुवर्णवर्ण बहुवर्ण किरणें अपारें ।
मिश्रीत ते तळपती घन थोरथोरें ।
उंचावले गगन त्याहुनि उंच भासे ।
मुक्ताफळीं जडित मंडप तो विळासे ॥ २ ॥
सिंहासनावरि रघूत्तम मध्यभागीं ।
बंधू तिथे परम सुंदर पृष्ठभागीं ।
वन्हीसुता निकट शोभत वामभागीं ।
वीलासतो भिम भयानक पूर्वभागीं ॥ ३ ॥
मार्तंडमंडप उदंडचि सौख्यकारी ।
त्रैलोक्यपावन प्रभू दुरितें निवारी ।
ध्यातो सदाशिव अखंडित चापपाणी ।
ऊदंड कीर्ति निगमीं महिमा पुराणीं॥ ४ ॥
आनंदकंद रघुनंदन शोभताहे ।
कंदर्पकोटि वदनीं उपमा न साहे ।
आकर्ण पूर्णनयनीं रमणीय शोभा ।
विस्तीर्ण कीर्ण भुषणीं जगदीश उभा ॥ ५ ॥

## २१ रविकुळटिळक.

रविकुळटिळकाचें रूपलावण्य पाहे ।
रविकुळटिळकाचे चिंतनीं चित्त राहे ।
रविकुळटिळकाची कीर्ति जीवीं भरावी ।
रविकुळटिळकाची मूर्ति ध्यानीं धरावी ॥ १ ॥
कमळनयनरामें वेधिलें पूर्णकामें ।
सकळभयविरामें राम विश्रामधामें ।

घननिळतनुश्यामें चित्ततोषें आरामें ।
भुवनभजननेमें तारिले दास रामें ॥ १ ॥
बहुविध भजनाचीं दैवतें पाहिलीं हो ।
सकळ त्यजुनि रामीं वृत्ति हे राहिली हो ।
विमळगुणशिळाची लागली प्रीति मोठी ।
विमळ हृदय होतां उद्धरे कूळकोटी॥ ३ ॥
विमळगुणशिळाचे आदरें गूण गावे ।
विमळगुणशिळाचे दास वाचे वदावे ।
विमळगुणशिळाचा अंतरीं वेध लागो।
विमळगुणशिळाचा रंगणीं रंग गाजो ॥ ४ ॥
सकळगुणनिधीचा राम लावण्यसिंधू ।
अगणित गणवेना शक्तिरूपें अगाधू ।
प्रबळ बळ चळेना वाउगें व्यर्थ कामीं ।
ह्मणउनि मन रामीं लागलें पूर्णकामीं ॥ ५ ॥
परमसुखनदीचा मानसीं पूर लोटे ।
घननिळतनु जेव्हां अंतरीं राम भेटे ।
सुख परमसुखाचें सर्व लावण्य साचें ।
स्वरूप जगदिशाचें ध्यान त्या ईश्वराचें ॥ ६ ॥
मधुकर मन माझें रामपादांबुजीं हो ।
सगुण गुण निजांगें नित्य रंगोनि राहो ।
अचपळ गुणगूणीं बैसली प्रीति दूणी ।
शरणचरणभावें जाहला राम ऋणी ॥ ७ ॥
रघुपति गुणरंगें पाविजे भक्तिसंगें ।
भजन जनतरंगें सर्व सांडुनि मागें ।
अनुदिन वितरागें योगयागें विरागें ।
प्रगट तरत संगें सर्वदासानुरागें ॥ ८ ॥
रघुवरपर आतां कीर्तनीं गूण गावे ।
मथन त्रिभुवनाचें सर्व साहित्य फावे ।
सकळ जन तरावे वंश ही उद्धरावे ।
स्वजन जन करावें रामरूपीं भरावें ॥ ९ ॥
सकळ भुवन तारी राम लीळावतारी ।
भवभय अपहारी राम कोदंडधारी ।
मनन करि मना रे धीर हे वासना रे ।
रघुविरभजनाची हे धरीं कामना रे ॥ १० ॥

## २२ अनुदिन अनुतापें तापलों.

अनुदिन अनुतापें तापलों रामराया।
परमदिनदयाळा नीरसी मोहमाया।
अचपळ[1] मन माझें नावरे आवरीतां।
तुजविण शिण होतो धांव रे धांव आतां ॥ १ ॥
भजनरहित रामा सर्वही जन्म गेला।
स्वजनजनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला।
रघुपति मति माझी आपुलीशी करावी।
सकळ त्यजुनि भावें कास तूझी धरावी ॥ २ ॥
विषयजनित सूखें सौख्य होणार नाहीं।
तुजविण रघुनाथा वोखटें सर्व कांहीं।
रविकुळटिळका रे हीत माझें करावें।
दुरित दुरि हरावें स्वस्वरूपीं भरावें ॥ ३ ॥
तनु मनु धनु माझें राघवा रूप तुझें।
तुजविण मज वाटे सर्व संसार वोझें।
प्रचळित न करावी सर्वथा बुद्धि माझी।
अचळभजनलीळा लागली आस तुझी ॥ ४ ॥
चपळपण मनाचें मोडितां मोडवेना।
सकळस्वजनमाया तोडितां तोडवेना।
घडि घडि विघडे हा निश्चयो अंतरीचा।
म्हणउनि करुणा हे बोलतों दीनवाचा ॥ ५ ॥
जळत हृदय माझें जन्म कोट्यानकोटी।
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटीं।
तळमळ निववीं रे राम कारुण्यसिंधु।
षडरिपुकुळ माझे तोडि याचा विरोधु ॥ ६ ॥
तुजविण करुणा हे कोण जाणेल माझी।
सिणत सिणत पोटीं पाहिली वास तुझी।
झडकरि झड घालीं धांव पंचानना रे।
तुजविण मज नेते जंबुकी वासना रे ॥ ७ ॥
सबळ जनक माझा राम लावण्यपेटी।
म्हणउनि मज पोटीं लागली आस मोठी।

---

१ अति चपळ.

दिवस गणित बोटीं प्राण ठेऊनि कंठीं ।
अवचट[1] मज भेटी होत घालीन मीठी ॥ ८ ॥

जननिजनकमाया लेंकरूं काय जाणे ।
पय न लगत मूखें हाणतां वत्स नेणे ।
जळधरकणआशा लागली चातकासी ।
हिमकर अवलोकी पक्षिया भूमिवासी ॥ ९ ॥

तुजविण मज तैसें जाहलें देवराया ।
विलग विषमकाळीं तूटली सर्व माया ।
सकळजनसखा तूं स्वामि आणीक नाहीं ।
वमकवमन जैसें त्यागिलें सर्व कांहीं ॥ १० ॥

स्वजनजनधनाचा कोण संतोष आहे ।
रघुपतिविण आतां चित्त कोठें न राहे ।
जिवलग जिव घेती प्रेत सांडूनि देती ।
विषय सकळ नेती मागुता जन्म देती ॥ ११ ॥

सकळ जन भवाचे आखिले[2] वैभवाचे ।
जिवलग मग कैचें चालतें हेंचि साचें ।
विलग विषमकाळीं सांडिती सर्व माळी ।
रघुविर सुखदाता सोडवी अंतकाळीं ॥ १२ ॥

सुख सुख म्हणतां हें दुःख ठाकूनि आलें ।
भजन सकळ गेलें चित्त दुश्चित्त जालें ।
भ्रमित मन कळेना हीत तें आकळेना ।
परम कठिण देहीं देहबुद्धी वळेना ॥ १३ ॥

उपरति मज रामीं जाहली पूर्णकामीं ।
सकळभ्रमविरामीं राम विश्रामधामीं ।
घडिघडि मन आतां रामरूपीं भरावें ।
रविकुळटिळका रे आपुलेंसें करावें ॥ १४ ॥

जळचर जळवासी नेणती त्या जळासी ।
निशिदिन तुजपासीं चूकलों गुणरासी ।
भुमिधरनिगमांसी[3] वर्णवेना जयासी ।
सकळभुवनवासी भेटि हे रामदासीं ॥ १५ ॥

---

१ अकस्मात्, अकल्पित. २ अंकित. ३ शेष व वेद यांना.

## २३ झडकरि मज रामा सोडवीं.

वरुण वदन वापीमाजि जिव्हास्वरूपी ।
मुख वसत तदापी वैखरी कोकिळापी ।
मधुर मधुर कुंजे नाम या राघवाचें ।
निववी वसत संतीं श्रोतयां सज्जनाचें ॥ १ ॥
ममवदनसरोजीं षट्पदें शारदांबे ।
रघुपतिगुण रुंझे तूं न गुंते विलंबें ।
तंववरि करि लाहो प्राण जैं अर्क आहे ।
प्रचळित समयीं आकर्षणें स्थीर राहे ॥ २ ॥
वणवण विषयांची सर्वथा ही शमेना ।
अनुदिन मोहमाया लागली हे तुटेना ।
झडकरि मज रामा सोडवीं पूर्णकामा ।
तुजविण गुणधामा कोण रक्षील आम्हां ॥ ३ ॥
विषयविष वमावें कल्पनेला दमावें ।
निजपद निजभावें दृढ चित्तीं धरावें ।
भवभय निरसावें साधुसंगीं वसावें ।
सगुणभजन द्यावें स्वामि देवाधिदेवें ॥ ४ ॥
विगळित मन माझें तूं करीं देवराया ।
हरिभजन कराया पाहिजे दृढ काया ।
निरुपण विवराया तर्कपंथेंचि जाया ।
रघुपतिगुणछाया चित्त माझें निवाया ॥ ५ ॥

## २४ नाथलोकत्रयाचा.

हरि हरि दुरितें तो स्वामि वैकुंठराजा ।
सुरवर नर पाळीं शोभती चारी भूजा ।
झळफळित किळा हे हेमरत्नांबरांचा ।
परम कुशळ शोभे नाथ लोकत्रयाचा ॥ १ ॥
शमशम विषयांची कांहि केल्यां शमेना ।
अचपळ मन माझें साजणी हें दमेना ।
अनुदिन मज पोटीं दुःख तेंही वमेना ।
तुजविण जगदीशा वेळ तोही गमेना ॥ २ ॥
विषम गति मनाची ते मला आवरेना ।
शरिर विकळ कामें तें कदा सांवरेना ।

सुख दुःख मज माझें वाढिलें तेंचि जेऊं ।
रघुपति ! तुजला रे कासया बोल ठेऊं ॥ ३ ॥
नवस हरिकथेचे राम भक्तीं करावे ।
कठिण विषम काळीं मम जीवीं धरावे ।
विविध सकळ कांहीं दोष नासोनि जाती ।
रघुविरभजनें हो कामना पूर्ण होती ॥ ४ ॥

## २५ तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों.

असंख्यात रे भक्त होऊनि गेले । तिहीं साधनांचे बहू कष्ट केले ॥
नव्हे कार्यकर्ता भुमीभार जालों । तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों १
बहू दास ते तापसी तीर्थवासी । गिरीकंदरीं भेटि नाहीं जनांसी ॥
स्थिती ऐकतां थोर विस्मीत जालों । तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों २
सदा प्रेमरासी तयां भेटलासी । तुझ्या दर्शनें स्पर्शनें सौख्यराशी ॥
अहंतामनीं शब्दज्ञानें बुडालों । तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों ॥ ३
तुझ्या प्रीतिचे दास जन्मास आले । असंख्यात ते कीर्ति बोलोनि गेले॥
बहू धारणा थोर चक्कीत जालों । तुझा दास मीं व्यर्थ जन्मास आलों ४
बहूसाल देवालयें हाटकाचीं[1] । रसाळा कळा लाघवें नाटकाचीं ॥
पुजा देखतां जाड जीवीं गळालों । तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों ५
कितेकीं देहें त्यागिले तूजलागीं । पुढें जाहले संगतीचे विभागी[2] ॥
देहेदुःख होतांचि वेगीं पळालों । तुझा दास मीं व्यर्थ जन्मास आलों ॥६
किती योगमूर्ती किती पुण्यमूर्ती । किती धर्मसंस्थापना अन्नशांती ॥
परस्तावलों कावलों तप्त जालों । तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों ॥७
सदासर्वदा राम सोडोनि कामीं । समर्था तुझे दास आम्ही निकामी ॥
बहू स्वार्थबुद्धीन[3] रे कष्टवीलों । तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों ॥८॥

## २६ श्रीरामावर भार.

नसे भक्ति ना ज्ञान ना ध्यान कांहीं । नसे प्रेम हें राम विश्राम नाहीं ॥
असा दीन अज्ञान मी दास तूझा । समर्था जनीं घेतला भार माझा ॥१॥
रघूनायका जन्मजन्मांतरींचा । अहंभाव छेदोनि टाकीं दिनाचा ॥
जनीं बोलती दास या राघवाचा । परी अंतरीं लेश नाहीं तयाचा ॥२॥
दिनाचें उणें दीसतां लाज कोणा । जगीं दास दीसे तुझा दैन्यवाणा ॥
शिरीं स्वामि तूं राम पूर्णप्रतापी । तुझा दास पाहीं सदा शीघ्र कोपी ३

---

१ सोन्याचीं. २ लोभाचे भोक्ते. ३ स्वार्थ बुद्धीनें.

रघूनायका दीन हातीं धरावें । अहंभाव छेदोनियां उद्धरावें ॥
अगूणी तयालागिं गूणी करावें । समर्थें भवसागरीं ऊतरावें ॥ ४ ॥
किती भार घालूं रघूनायकाला । मजकारणें शीण होतील त्याला ॥
दिनानाथ हा संकटीं धाव घाली । तयाचेंचि हे सर्व काया निवाली ॥५
मला कोंवसा[1] राम कैवल्यदाता[2] । तयाचेनि हे फीटली सर्व चिंता ॥
समर्थां तया काय उत्तीर्ण[3] व्हावें ।सदासर्वदा नाम वाचे वदावें ॥ ६ ॥

## २७ बुद्धि दे रघुनायका.

युक्ति नाहीं बुद्धि नाहीं । विद्या नाहीं विवेकिता ॥
नेणता भक्त मी तुझा । बुद्धि दे रघुनायका ॥ १ ॥
मन हें आवरेना कीं । वासना वावडे सदा ॥
कल्पना धावते सैरा । बुद्धि दे रघुनायका ॥ २ ॥
अन्न नाहीं वस्त्र नाहीं । सौख्य नाहीं जनांमध्यें ॥
आश्रयो पाहतां नाहीं । बुद्धि दे रघुनायका ॥ ३ ॥
बोलतां चालतां येना । कार्यभाग कळेचिना ॥
बहू मी पीडलों लोकीं । बुद्धि दे रघुनायका ॥ ४ ॥
तुझा मी टोणपा जालों । कष्टलों बहुतांपरी ॥
सौख्य तें पाहतां नाहीं । बुद्धि दे रघुनायका ॥ ५ ॥
नेटकें लिंहितां येना । वाचितां चुकतों सदा ॥
अर्थ तो सांगतां येना । बुद्धि दे रघुनायका ॥ ६ ॥
प्रसंग वेळ तर्केना । सुचेना दीर्घ सूचना ॥
मैत्रिकी राखितां येना । बुद्धि दे रघुनायका ॥ ७ ॥
कळेना स्फूर्ति होईना । आपदा लागली बहू ॥
प्रत्यहीं पोट सोडीना । बुद्धि दे रघुनायका ॥ ८ ॥
संसार नेटका नाहीं । उद्वेगो वाटतो जिवीं ॥
परमार्थू कळेना कीं । बुद्धि दे रघुनायका ॥ ९ ॥
देईना पुरविना कोणी । उगेचि जन हांसती ॥
विसरु पडेना पोटीं । बुद्धि दे रघुनायका ॥ १० ॥
पिशुनें वाटती सर्वै । कोणीही मजला नसे ॥
समर्था तूं दयासिंधू । बुद्धि दे रघुनायका ॥ ११ ॥
उदास वाटतें जीवीं । आतां जावें कुणीकडे ॥
तूं भक्तवत्सला रामा । बुद्धि दे रघुनायका ॥ १२ ॥

---

१ आधार. २ मोक्षदाता. ३ उतराई.

काया वाचा मनोभावें । तुझा मी म्हणवीतसें ॥
हे लाज तुजला माझी । बुद्धि दे रघुनायका ॥ १३ ॥
सोडवील्या देव कोटी । भूभार फेडिला बळें ॥
भक्तांसि आश्रयो मोठा । बुद्धि दे रघुनायका ॥ १४ ॥
भक्त उदंड तुम्हांला । आम्हांला कोण पूसतें ॥
ब्रीद हें राखणें आधीं । बुद्धि दे रघुनायका ॥ १५ ॥
आशा हे लागली मोठी । दयाळू बा दया करीं ॥
आणखी नलगे कांहीं । बुद्धि दे रघुनायका ॥ १६ ॥
उदंड ऐकिली कीर्ति । पतीतपावना प्रभो ॥
मी एक रंक दुर्बुद्धी । बुद्धि दे रघुनायका ॥ १७ ॥
रामदास म्हणे माझा । संसार तुज लागला ॥
संशयो लागतो पोटीं । बुद्धि दे रघुनायका ॥ १८ ॥

## २८ रघूनायका काय कैसें करावें.

उदासीन हा काळ जातो गमेना । सदा सर्वदा थोर चिंता शमेना ।
उठे मानसीं सर्व सोडोनि जावें । रघूनायका काय कैसें करावें ॥ १ ॥
जनीं बोलतां बोलतां वीट वाटे । नसे अंतरीं सूख कोठें न कंठे ।
घडीनें घडी चित्त कीती धरावें । रघूनायका काय कैसें करावें ॥ २ ॥
बहू पाहतां अंतरीं कोंड होतो । शरीरास तो हेत सांडोनि जातो ।
उपाधीस देखोनि वाटे सरावें । रघूनायका काय कैसें करावें ॥ ३ ॥
अवस्था मनीं होय नानापरीची । किती काय सांगूं गती अंतरींची ।
विवेकेंचि या मानसा आवरावें । रघूनायका काय कैसें करावें ॥ ४ ॥
म्हणे दास ऊदास जालों दयाळा । जनीं व्यर्थ संसार हा वायचाळा ।
तुझा मी तुला पूसतों प्रेमभावें । रघूनायका काय कैसें करावें ॥ ५ ॥

## २९ सर्वोत्तमा कै मज भेटि देसी.

दुःखानळें मी संतप्त देहीं । तुजवीण रामा विश्रांति नाहीं ।
आधार तूझा मज मी विदेसी । सर्वोत्तमा कै मज भेटि देसी ॥ १ ॥
प्रारब्ध खोटें अभिमान आला । स्वामीसमर्था वियोग जाला ।
तेणें बहु क्षीति वाटे मनासी । सर्वोत्तमा कै मज भेटि देसी ॥ २ ॥
तुझिया वियोगें बहु वेदना रे । विवेक नाहीं आम्हां दिना रे ।
पडिला समंधु या दुर्जनेसीं । सर्वोत्तमा कै मज भेटि देसी ॥ ३ ॥

---

१ खंती, दुःख. २ भवाशीं.

संसारचिंता मज वाटते रे। रामा प्रपचीं मन जातसे रे।
संसर्ग आहे इतरां जनासीं। सर्वोत्तमा कै मज भेटि देसी ॥ ४ ॥

## ३० उदासीन हे वृत्ति कोठें न लागे.

रघुनायेकावीण हा शीण आहे। सदा सर्वदा रंग वोरंगताहे[1]।
निशिदीन या राघवाच्या वियोगें। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ १
गुणीं गुंतलें चित्त हें आवरेना। तयावीण आणीक कांहीं स्मरेना।
समाधान हें होय त्याचेनि संगें। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ २ ॥
मनीं प्रीति हे लागली राघवाची। सदानंद हे राम मूर्ती सुखाची।
पदार्थी बळें लावितां चित्त भंगे। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ ३ ॥
मनीं आठवीतां समाधान वाटे। तया देखतां संशयो सर्व तूटे।
न लिंपे कदा चित्त दुश्चित भंगे। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ ४ ॥
मनीं तुंत अनंत या राघवाचा। तुटे किंत तो नावडे या भवाचा।
सदा सर्वदा अंतरीं राम जागे। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ ५ ॥
मनीं नावडे द्रव्य दारा पसारा। मनीं नावडे मायिकांचा उबारा[2]।
मनीं नावडे भोग हा राजयोगें। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ ६ ॥
जनीं पाहतां भेदबुद्धी अनेका। मदमत्सरें निंदिती येकमेकां।
घडे त्याग याकारणें लागवेगें। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ ७ ॥
बहुसाल हें बोलणें आवडेना। जनीं वासना शब्दज्ञानें पडेना[3]।
क्रियेवीण तें बोलतां चित्त भंगे। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ ८ ॥
मनीं सर्वथा सत्य तें सांडवेना। मनीं सर्वथा मिथ्य तें मांडवेना।
समाधान तें योगसंगें निसंगें। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ ९ ॥
जनासारिखें बोलणें ही घडेना। म्हणोनी जनीं सर्वथा ही पडेना।
अहंतागुणें बुद्धि वीवाद लागे। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ १० ॥
उपाधीगुणें सत्य तें मिथ्य होतें। उपाधीगुणें मिथ्य तें सत्य होतें।
उपाधीगुणें येक रंगे विरंगें। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ ११ ॥
उपाधीगुणें लागतो पक्ष घेणें। उपाधीगुणें सत्य सोडून देणें।
उपाधीगुणें वीषयीं जीव रंगे। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ १२ ॥
उपाधीगुणें सर्व सोसीत जावें। उपाधीगुणें मानवाधेन[4] व्हावें।
उपाधीगुणें वेर्थ हा स्वार्थ लागे। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥१३॥

---

१ विघडतो. २ ऊब, उष्णता, ज्वर. ३ नष्ट होत नाहीं. ४ माणसांच्या अधीन.

मनीं सांडितां संगव्याधी उपाधी । पुढें सांपडे राम कारुण्यनीधी ।
विवेकें मनींचा अहंभाव भंगे । उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ १४ ॥
पराधीनता राम-दासीं घडेना । देहे चालतां रामभक्ति उडेना ।
उभा राम सांभाळितो पृष्ठभागें । उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥१५॥

### ३१. श्रीरामराम हे म्हणा.

सुरेंद्र चंद्रशेखरु[1] । अखंड ध्यातसे हरु ।
जनांसि सांगतो खुणा । श्री राम राम हें म्हणा ॥ १ ॥
महेश पार्वतीप्रती । विशेष गूज सांगती ।
सलाभ होतसे दुणा । श्री राम राम हें म्हणा ॥ २ ॥
विषें बहूत जाळिलें । विशेष अंग पोळलें ।
प्रचीत माझिया मना । श्री राम राम हें म्हणा ॥ ३ ॥
विशाळ व्याळ[2] व्यस्त[3] कीं । नदी खळाळ मस्तकीं ।
ऋषीभविष्यकारणा । श्री राम राम हें म्हणा ॥ ४ ॥
बहुत प्रेत्न पाहिले । परंतु सर्व राहिले ।
विबूध[4]पक्षरक्षणा । श्री राम राम हें म्हणा ॥ ५ ॥
अपाय होत चूकला । उपाय हा भला भला ।
नसे जयासि तूळणा । श्री राम राम हें म्हणा ॥ ६ ॥
विरांमधें विरोत्तमु । विशेष हा रघूत्तमु ।
सकाम काळ आंकणा[5] । श्री राम राम हें म्हणा ॥ ७ ॥
बहूत पाहिलें खरें । परंतु दोनि आक्षरें ।
चुकेल यमयातना । श्री राम राम हें म्हणा ॥ ८ ॥
मनीं धरूनि साक्षपें । अखंड नाम हें जपें ।
मनांतरीं क्षणक्षणा । श्री राम राम हें म्हणा ॥ ९ ॥
देहे धरूनि वानरी[6] । अखंड दास्य मी करीं ।
विमुक्त राज्य रावणा । श्री राम राम हें म्हणा ॥ १० ॥

---

१ चंद्र ज्याच्या मस्तकावर शंकर. २ सर्प. ३ उलटें. ४ देवांचा पक्ष रक्षण व्हावा म्हणून बहुत प्रयत्न करून पाहिले पण सर्व व्यर्थ झाले, शेवटीं 'राम' भजनानें यश आलें. ५ काळ ज्याच्या अंकित. ६ शंकर पार्वतीला सांगतात कीं मारुतीचा देह धरून मी रामाचें अखंड दास्य केलें तेव्हां रावणाचें राज्य बुडवितां आलें.

### ३२ रामभक्ताची योग्यता.

श्रीराम भक्तमूळ रे । प्रसन्न सानुकूळ रे ।
समर्थ तो तयागुणें[1] । समस्त होय ठेंगणें ॥ १ ॥
प्रपंच सांचितां हरी[2] । विसांचितां बरोबरीं ।
दयाळ तो परोपरीं । विशाळ[3] सेवकां करी ॥ २ ॥
समस्त ही पदें पदें । प्रभूपदेंचि वीशदें ।
विचार सार जोडला । सदृश्यभास मोडला ॥ ३ ॥
तद्रूपरी विवंचना । विचार आणितां मना ।
मनास ठाव नाडळे । विशेष हेतही गळे ॥ ४ ॥
विवेक हा भला भला । उदंड राम देखिला ।
पदीं अनन्य मीळणी[5] । उरी नसे दुजेपणीं ॥ ५ ॥
विचार सार सारसा । करील कोण फारसा ।
बळें बळेंचि नीवळे । कळे कळेंचि आकळे ॥ ६ ॥

---

# (१९) भीमरूपी स्तोत्रें.

## श्लोक.

### १ वृत्त अनुष्टुप्.

भीमरूपी महारुद्रा वज्रहनुमान मारुती ॥
वनारी अंजनीसूता रामदूता प्रभंजना[6] ॥ १ ॥
महाबली प्राणदाता सकळां ऊठवी बळें ॥
सौख्यकारी शोकहर्ता धूर्त वैष्णव गायका ॥ २ ॥
दिनानाथा हरिरूपा सुंदरा जगदंतरा[7] ॥
पातालदेवता-हंता भव्यशेंदूरलेपना ॥ ३ ॥
लोकनाथा जगन्नाथा प्राणनाथा पुरातना ॥
पुण्यवंता पुण्यशीला पावना परतोषका ॥ ४ ॥

---

१ रामाच्या अनुकूलतेच्या, प्रसन्नतेच्या, योगानें भक्त ' **समर्थ** ' होतो. २ हरण करितो. ३ प्रपंच त्यागिला कीं साम्यतेला येतो, मग देव-भक्त समान होतात. ४ देवभक्तांना वाढवितो. ५ समरसता. ६ वायुरूप वायुसुता. ७ जगाच्या अंतरीं राहणारा. ८ लंका.

ध्वजांगें ऊचली बाहो आवेशें लोटला पुढें ॥
काळाग्नी काळरुद्राग्नी देखतां कांपती भयें ॥ ५ ॥
ब्रह्मांडें माइलीं नेणों आवळे दंतपंगती ॥
नेत्राग्नी चालिल्या ज्वाळा भ्रुकुटी ताठिल्या बळें ॥ ६ ॥
पुच्छ तें मुर्डिलें माथां किरीटी कुंडलें वरी ॥
सुवर्णकटि[1] कासोटी घंटा किंकिणि नागरा ॥ ७ ॥
ठकारे[2] पर्वताऐसा नेटका सडपातळू ॥
चपलांग पाहतां मोठें महाविद्युल्लतेपरी ॥ ८ ॥
कोटिच्या कोटि उड्डाणें झेंपावे उत्तरेकडे ॥
मंदाद्रीसारिखा द्रोणू क्रोधें उत्पाटिला[3] बळें ॥ ९ ॥
आणिला मागुती नेला आला गेला मनोगती ॥
मनासी टाकिलें मागें गतीसी तुळना नसे ॥ १० ॥
अणूपासूनि ब्रह्मांडाएवढा होत जातसे ॥
तयासी तुळणा कोठें? मेरु मंदार धाकुटे ॥ ११ ॥
ब्रह्मांडाभोंवते वेढे स्वपुच्छें घालवूं शके ॥
तयासी तुळणा कैंची? ब्रह्मांडी पाहतां नसे ॥ १२ ॥
आरक्त देखिलें डोळां गिळिलें सूर्यमंडळा ॥
वाढतां वाढतां वाढे भेदिलें शून्यमंडळा[4] ॥ १३ ॥
भूत प्रेत समंधादी रोगव्याधी समस्तही ॥
नासती तूटती चिंता आनंदें भीमदर्शनें ॥ १४ ॥
हे धरा पंधरा श्लोकीं लाभली शोभली भली ॥
दृढ देहोनिसंदेहो संख्या[5] चंद्रकळा गुणें ॥ १५ ॥
रामदासीं[6] अग्रगणू कपिकुळासि मंडणू ॥
रामरूपीं अंतरात्मा दर्शनें दोष नासती ॥ १६ ॥

## २

जनीं ते अंजनी माता जन्मली ईश्वरी तनू ॥
तनू मनू तो पवनू एकची पाहतां दिसे ॥ १ ॥
त्रैलोक्यीं पाहतां बाळें ऐसें तो पाहतां नसे ॥
अतूळ तूळना नाहीं मारुती वातनंदनू ॥ २ ॥

---

१ सुंदर. २ ठाण मांडून उभा राहतो. ३ उपटला. ४ आकाशाला भेदून पलीकडे जाणारा. ५ सोळा कळा. ६ रामाच्या दासांत मुख्य, श्रेष्ठ असे मारुतिराय.

चळे तें चंचळे नेटें बाळ मोवाळ[1] साजिरें ॥
चळताहे चळवळी बाळ लोवाळ गोजिरें ॥ ३ ॥
हात कीं पाय कीं सांगों नखें बोटें परोपरी ॥
दृष्टीचें देखणें मोठें लांगूळ[2] लळलळीतसे ॥ ४ ॥
खडी खारी दडे तैसा पीळ पेंच परोपरी ॥
उड्डाण पाहतां मोठें झेंपावे रविमंडळा ॥ ५ ॥
बाळानें गिळिला बाळू[3] स्वभावें खेळतां पहा ॥
आरक्त पीत वाटोळें देखिलें धरणीवरी ॥ ६ ॥
पूर्वेसि देखतां तेथें उडालें पावलें बळें ॥
पाहिलें देखिलें हातीं गिळिलें जाळिलें बहू ॥ ७ ॥
थुंकोनि टाकितां तेथें युद्ध जालें परोपरी ॥
उपरी ताडिला तेणें एक नामचि[5] पावला ॥ ८ ॥
हा गिरी तो गिरी पाहे गुप्त राहे तरूवरी ॥
मागुता प्रगटे धांवे झेंपावे गगनोदरीं ॥ ९ ॥
पळही राहिना कोठें बळेंची घालितो झडा ॥
कडाडां मोडती झाडें वाड वाडें[7] उलंडती ॥ १० ॥
पवनासारिखा धांवे वावरे विवरें बहू ॥
अपूर्व बाळलीला हे रामदास्य करी पुढें ॥ ११ ॥

३

कोपला रुद्र जे काळीं ते काळीं पाहवेचि ना ॥
बोलणें चालणें कैंचें ? ब्रह्मकल्पांत मांडला ! ॥ १ ॥
ब्रह्मांडाहून जो मोठा स्थूळ उंच भयानकु ॥
पुच्छ तें मुर्डिलें माथां पाऊल शून्यमंडळा ॥ २ ॥
त्याहून उंच वज्रांचा[9] सव्य बाहो उभारिला ॥
त्यापुढें दुसरा कैंचा अद्भूत तुळणा नसे ॥ ३ ॥
मार्तंडमंडळाऐसे दोन्ही पिंगाक्षं[10] ताविले ॥
कर्करा घर्डिल्या दाढा उभे रोमांच ऊठिले ॥ ४ ॥
अद्भूत गर्जना केली मेघची वोळले भुमीं ॥
फुटले गिरिचे गाभे तुटले सिंधु आटले ॥ ५ ॥

१ सुकुमार. २ स्वभावानें मृदु. ३ पुच्छ. ४ बालसूर्य. ५ हनुमान्. ६ हा पर्वतप्राय मारुती. ७ मोठाल्या इमारती कोसळून पडत. ८ दऱ्याखोरीं फिरे. ९ वज्रतुल्य. १० ताम्रनेत्र.

अद्भूत वेश आवेशें कोपला रणकर्कशू ॥
धर्मसंस्थापनेसाठीं दास तो ऊठिला बळें ॥ ६ ॥

४ वृत्त प्रमाणिका.

अंजनीसुत प्रचंड वज्रपुच्छ कालदंड ॥
शक्ति पाहतां वितंड दैत्य मारिले उदंड ॥ १ ॥
धगधगी तसी कळा वितंड शक्ति चंचळा ॥
चळचळीतसे लिळा प्रचंड भीम आगळा ॥ २ ॥
उदंड वाढला असे विराट धाकुटा दिसे ॥
त्यजूनि सूर्यमंडळा नभांत भीम आगळा ॥ ३ ॥
लुळीत बाळकी लिळा गिळोनि सूर्यमंडळा ॥
बहूत पोळतांक्षणीं थुंकिलाचि तत्क्षणीं ॥ ४ ॥
धगधगीत बूबुळा प्रत्यक्ष सूर्यमंडळा ॥
कराळ काळमूख तो रिपूकुळासि दुःख तो ॥ ५ ॥
रुपें कपी अचाट हा सुवर्णकट्टचास[2] तो ॥
फिरे उदास दास तो खळास काळ भासतो ॥ ६ ॥
झळक झळक दामिनी[3] वितंड काळकामिनी ॥
तयापरी झळाझळी लुळीत रोमजावळी ॥ ७ ॥
समस्तप्राणनाथ रे करी जना सनाथ रे ॥
अतूळ तूळणा नसे अतूळशक्ति वीलसे ॥ ८ ॥
रुपें रसाळ बाळकू समस्तचित्तचाळकू ॥
कपी परंतु ईश्वरू विशेष लाधला वरू ॥ ९ ॥
स्वरुद्र क्षोभल्यावरी तयासि कोण सावरी ॥
गुणागळा परोपरी सतेजरूप ईश्वरी ॥ १० ॥
समर्थदास हा भला कपीकुळांत शोभला ॥
सुरारि काळ क्षोभला त्रिकूट जिंकिला भला ॥ ११ ॥

५

हनुमंता रामदूता वायुपुत्रा महाबला ॥
ब्रह्मचारी कपीनाथा विश्वंभरा जगत्पते ॥ १ ॥
कामांतका दानवारी शोकहारी दयानिधे ॥
महारुद्रा मुख्य प्राणा मूळमूर्ति पुरातना ॥ २ ॥

१ त्यापुढें ब्रह्मांड खुजें. २ तापलेल्या सोन्याच्या पत्र्यासारखा. ३ वीज.

वज्रदेही सौख्यकारी भीमरूपा प्रभंजना ॥
पंचभूतां मूळमाया तूंचि कर्ता समस्तही ॥ ३ ॥
स्थितिरूपें तूंचि विष्णू संहारक पशूपती ॥
परात्परा स्वयंज्योति नामरूपा गुणातिता ॥ ४ ॥
सांगतां वर्णितां येना वेदशास्त्रां पडे ठकां[1] ॥
शेष तो शिणला भारी 'नेति नेति' परा श्रुती ॥ ५ ॥
धन्यावतार कैसा हा भक्तांलागिं परोपरी ॥
रामकाजीं उतावेळा भक्तां रक्षक सारथी ॥ ६ ॥
वारितो दुर्घटें मोठीं संकटीं धांवतो त्वरें ॥
दयाळ हा पूर्ण दाता नाम घेतांच पावतो ॥ ७ ॥
धीर वीर कपी मोठा मागें[2] नव्हेचि सर्वथा ॥
उड्डाण अद्भुत ज्याचें लंघिलें सागराजळा ॥ ८ ॥
देऊनी लिखिता हातीं नमस्कारी सितावरा ॥
वाचितां सौमित्र अंगें राम सूखें सुखावला ॥ ९ ॥
गर्जती स्वानंदमेळीं ब्रह्मानंदें सकळही ॥
अपार महिमा मोठा ब्रह्मांदीकांसि नाकळे ॥ १० ॥
अद्भुत पुच्छ तें कैसें भोवंडी नभपोकळीं ॥
फांकडें तेज तें भारी झांकिलें सूर्यमंडळा ॥ ११ ॥
देखतां रूप पैं ज्याचें उड्डाण अद्भुत शोभलें ॥
ध्वजांत ऊर्ध्व तो बाहू वामहस्त कटीवरी ॥ १२ ॥
कसिली हेमकासोटी[3] घंटा किंकिणि भोंवत्या ॥
मेखळे जडलीं मुक्तें दिव्य रत्नें परोपरी ॥ १३ ॥
माथा मुगुट तो कैसा कोटि चंद्रार्क लोपले ॥
कुंडलें दिव्य तीं कानीं मुक्तामाला विराजते ॥ १४ ॥
केशर रेखिलें भाळीं मुख सूहास्य चांगलें ॥
मुद्रिका शोभती बोटीं कंकणें कर मंडित ॥ १५ ॥
चरणीं वाजती अंदू[4] पदीं तोडर गर्जती ॥
कैवारी नाथ दीनांचा स्वामी कैवल्यदायकू ॥ १६ ॥
स्मरतां पाविजे मुक्ती जन्ममृत्यूसि वारितो ॥
कांपती दैत्य तेजासी भुभुकाराचिया बळें ॥ १७ ॥
पाडितो राक्षसू नेटें आपटी महिमंडळा ॥
सौमित्रप्राणदाताचि कपिकूळांत मंडणू ॥ १८ ॥

---

१ मौन. २ माघार घेणारा. ३ सुवर्णाची लंगोटी. ४ पायांतली हंसळी.

दंडिली पाताळशक्ती अहीमही निर्दाळिले ॥
सोडिलें रामचंद्रा कीर्ति हे भुवनत्रयीं ॥ १९ ॥
विख्यात ब्रीद तें कैसें मोक्षदाता चिरंजिवी ॥
कल्याण त्याचेनि नामें भूतपिशाच्च कांपती ॥ २० ॥
सर्पवृश्चिकपश्वादी विषशीतनिवारण ॥
आवडी स्मरतां भावें काळ कृतांत धाकतो ॥ २१ ॥
संकटें बंधनें बाधा दुःखदारिद्र्यनाशका ॥
ब्रह्मग्रहपीडाव्याधी ब्रह्महत्यादि पातकें ॥ २२ ॥
पूरवीं सकळही आशा भक्तकामकल्पतरू ॥
त्रिकाळीं पठतां स्तोत्र इच्छिलें पावसी जनीं ॥ २३ ॥
परंतु पाहिजे भक्ती संधे[1] कांहीं धरूं नका ॥
रामदासा सहाकारी सांभाळीतो पदोंपदीं ॥ २४ ॥

६ वृत्त मालिनी.

फणिवरें[2] उठवीला वेग अद्भूत केला ।
त्रिभुवनजनलोकीं कीर्तिचा वोघ गेला ॥
रघुपतिउपकारें दाटले थोर भारें ।
परम धिर उदारें रक्षिलें सौख्यकारें ॥ १ ॥
सबळ दळ मिळालें युद्ध ऊदंड झालें ।
कपिकटक निमालें पाहतां येश गेलें ॥
परदळशरघातें कोटिच्या कोटि प्रेतें ।
अभिनवरणपातें दुःख बीभीषणातें ॥ २ ॥
कपिरिसघनदाटी जाहली थोर आटी ।
म्हणउनि जगजेठी धांवणें चारि कोटी ॥
मृतिविरहित[3] ठेले मोकळे सिद्ध झाले ।
सकळ जन निवाले धन्य सामर्थ्य चाले ॥ ३ ॥
बहु प्रिय रघुनाथा मुख्य तूं प्राणनाथा ।
उठविं मज अनाथा दूर सारूनि वेथा ॥
झडकरिं भिमराया तूं करीं दृढ काया ।
रघुविरभजना या लागवेगेंचि जाया ॥ ४ ॥
तुजविण मज पाहें पाहतां कोण आहे ।
म्हणउनि मन माझें रे ? तुझी वाट पाहे ॥

१ संदेह, शंका. २ शेषावतार लक्ष्मण. ३ मरणापासून सुटले.

मज तुज निरवीलें पाहिजे आठवीलें ।
सकळिक निजदासांलागिं सांभाळवीलें ॥ ५ ॥
उचित हित करावें उद्धरावें धरावें ।
अनहित न करावें त्वां जनीं येश घ्यावें ॥
अघटित घडवावें सेवकां सोडवावें ।
हरिभजन घडावें दुःख तें वीघडावें ॥ ६ ॥
प्रभुवर विरराया ! जाहली वज्र काया ।
परदळ निवटाया दैत्यकूळें कुटाया ॥
गिरिवर उतटाया रम्यवेषें नटाया ।
तुजचि अलगठाया ठेविलें मुख्य ठाया ॥ ७ ॥
बहुत सबळ सांठा मागतों अल्प वांटा ।
न करित हित कांटा थोर होईल ताठा ॥
कृपणपण नसावें भव्य लोकीं दिसावें ।
अनुदिन करुणेचें चिन्ह पोटीं वसावें ॥ ८ ॥
जळधर[1] करुणेचा अंतरामाजि राहे ।
तरि तुज करुणा हे कां नये सांग पां हे ॥
कठिण हृदय जालें ? काय कारुण्य गेलें ? ।
न पवसि मज कां रे म्यां तुझें काय केलें ॥ ९ ॥
वडिलपण करावें सेवकां सांवरावें ।
अनहित न करावें तूर्त हातीं धरावें ॥
निपटचि हटवादें प्रार्थिला शब्दभेदें ।
कपि घन करुणेचा बोळला रामवेधें ॥ १० ॥
बहुतचि करुणा या लोटली देवराया ।
सहजचि कफकेतें जाहली वज्र काया ॥
परम सुख विलासे सर्वदासानुदासें ।
पवनतनुज तोषें वंदिला सावकाशें ॥ ११ ॥

७ वृत्त चामर.

रुद्र हा समुद्र देखताक्षणीं उठावला ।
शिरोंणि[2]चें किराण[3] सज्ज त्रीकुटा[4]स पावला ॥
वात जातसे तसाचि स्थूळ देह राहिला ।
[5]वोवरोनि वीवरोनि तो त्रिकूट पाहिला ॥ १ ॥

---

१ मेघ. २ मोठें. ३ उड्डाण. ४ लंकेस. ५ न्याहाळून.

हीन देव दीनरूप देखतांचि पावला ।
गड्गडीत घड्घडीत कड्कडीत कोपला ॥
लाटि कूटि पाडि फोटि झोडि झोडि झोडला ।
दैत्यलोक एक हाक सर्वगर्व मोडिला ॥ २ ॥
सानरूप तें स्वरूप गुप्तरूप बैसला ।
पुच्छकेत शोध घेत त्रीकुटांत बैसला ॥
गड्गडी दिसेचिना बुझेल कोण कैसला ।
वळवळी चळचळी विशाळ ज्वाळ जैसला ॥ ३ ॥
काळदंडसे प्रचंड ते वितंड जातसे ।
भारभार राजभार पुच्छमार होतसे ॥
पाडिले पछाडिले रुधीरपूर व्हातसे[1] ।
दैत्य बोलती वळें पळोन काय ध्यातसे ॥ ४ ॥
काळकूट तें त्रिकूट धूट धूट ऊठिलें ।
दाट थाट लाट लाट कूट कूट कूटिलें ॥
घोर मार ते सुमार लूट लूट लूटिले ।
चिर्डिलेचि घर्डिलेचि फूट फूट फूटिले ॥ ५ ॥
दाट थाट आट घाट तें कपाट घातलें ।
सर्व रोध तो निरोध थोर दुःख पावले ॥
सैन्य कट्ट त्यासि घट्ट कर्करून बांधिलें ।
थोर घात त्यास पात चर्फडीत चेंदलें ॥ ६ ॥
वज्र पुच्छ त्यासि तुच्छ मानिलें निशाचरीं ।
सर्वही खणखणाट ऊठिले घरोघरीं ॥
फुटेचिना तुटेचिना समस्त भागले करीं ।
लट्लटीत कांपती बहूत धाक अंतरीं ॥ ७ ॥
थोर थोर दूर दूर दाट दाट दाटले ।
कोण मस्त तंग वस्त थाट थाट थाटले ॥
मंदिरीं घरोघरीं अचाट पुच्छ वाढलें ।
दैत्यनास तो घसास काट काट काटले ॥ ८ ॥
हात पाय मान माज वोढितें पछाडितें ।
अडचणींत अड्कवूनि पीळ पेंच काढितें ॥
लोहदंडसें अखंड राक्षसांसि ताडितें ।
मूळ जाळ व्याळ जाळ दैत्यकूळ नाडितें ॥ ९ ॥

1 वाहूं लागले.

थोर धाक एक हाक त्रीकुटासि पूरले ।
घरोघरींच चळवळी पुढें उदंड ऊरले ।
बैसले उदंड दैत्य तें सभेंत घूसले ।
सभा विटंबिली बळेंचि कोणसें न सूचलें ॥ १० ॥
देह मात्र एक सूत्र थोर यंत्र हालिलें ।
पुरोनि ऊरलें बळें सभेमधेंचि चालिलें ।
रत्नदीप तेलदीप तेज सर्व काढिलें ।
लाटि कूटि धामधूम पाडिले पछाडिले ॥ ११ ॥
गुप्तरूप मारुती दशाननाकडे भरे ।
मुगूट पाडिला शिरीं कठोर वज्र ठोंसरे ।
सभा विटंबिली बळेंचि गर्गरीत वावरे ।
बलाढ्य दैत्य मारिले कठीण पुच्छ नावरे ॥ १२ ॥
हस्तमार दैत्यमार दंडमार होतसे ।
लंडसे कलंडले उलंडलेचि मंडसे ।
येत येत पुच्छकेत दैत्य सर्व बोलती ।
गळीत[1] बैसले भुमीं न बोलती न चालती ॥ १३ ॥
स्वप्नहेत सौख्य देत दैत्यघात भावला ।
रुद्र हा उठावला कुढावयासि पावला ।
जाळिलें त्रिकूट नीट आपटून रावणी[2] ।
राक्षसांसि थोर दुःख ऊसिणें ततक्षणीं ॥ १४ ॥
दीनरूप देव सर्व हास्यरूप पाहिलें ।
कळवळून अंतरीं रघूत्तमासि बाहिलें ।
एक वीर तो सधीर! थोर धीर ऊठला ।
तोष तोष तो विशेष अंतरींच दाटला ॥ १५ ॥
उदंड देव आटिले तयांसि भीम आटितो ।
रामदूत वातसूत लाटि लाटि लाटितो ।
ऊठ आमुचे समस्त कूट कूट कूटितो ।
धूट धूट दैत्य त्यास लूट लूट लूटितो ॥ १६ ॥
समस्त दैत्य आळितो बळें त्रिकूट जाळितो ।
पुरांत गोपुरें बरीं निशाचरांसि वाळितो ।
उदंड अग्नि लाविला बहू बळें उठावला ।
कडाडिला तडाडिला भडाडिला धडाडिला ॥ १७ ॥

१ गळून, घाबरून. २ रावणपुत्र अक्ष.

उदंड जाळिलीं घरें कितेक भार खेंचरें ।
किलाणं धांवती भरें सुरांस वाटलें बरें ।
वितंड दैत्य धांवडी तयांत पुच्छ भोंवडी ।
कडाकडी खडाखडी गडागडी घडाघडी ॥ १८ ॥

बळें चपेट मारिला उदंड दैत्य हारिला ।
तरारिला थरारिला भयंकरू भरारिला ।
गद्गदी तनू वितंड सागरीं सरारिला ।
जानकीस भेटला प्रभूकडे झरारिला ॥ १९ ॥

काळसे विशाळ दैत्य त्यांत एकला भरे ।
थोर धाक एक हाक काळचक्र वावरे ।
शक्ति शोधिली बळेंचि भव्य देखिले धुरे ।
वानरांसहीत रामदास भेटले त्वरें ॥ २० ॥

८ वृत्त मालिनी.

भुवनदहनकाळीं काळ विक्राळ जैसा ।
सकळ गिळित ऊभा भासला भीम तैसा ।
दुपटत कपि झोंकें झोकिली मेदिनी हे ।
तळवट धरि धाकें धोकली जाउं पाहे ॥ १ ॥

गिरिवरुनि उडाला तो गिरी गुप्त झाला ।
घसरत दश गांवें भूमिकेमाजि आला ।
उडति झडझडाटें वृक्ष हे नेटपाटें ।
पडति कडकडाडें अंग घातें धुंधाटें ॥ २ ॥

थरथरित थरारी वज्र लांगूल जेव्हां ।
गरगरित गरारी सप्तपाताळ तेव्हां ।
फणिवर कमठांचे पृष्ठिशीं आंग घाली ।
तगटित पवनाची झेंप लंकेसि गेली ॥ ३ ॥

थरकत धरणी हे हाणतां वज्रपुच्छें ।
रगडित रणरंगीं राक्षसें तृणतुच्छें ।
सहज रिपुदळाचा थोर संव्हार केला ।
अवघड गड लंका शीघ्र जाळून आला ॥ ४ ॥

---

१ समुदाय. २ प्रळयकाळीं. ३ झंझावातानें. ४ शेष. ५ कूर्मांचे ( कांसवाचे ).

सहज करतळें जो मेरुमांदार पाडी ।
दशवदन रिपू हे कोण कीती बराडी[1] ।
अगणित गणवेना शक्ति काळासि हारी ।
पवनतनुज पाहो पूर्ण रुद्रावतारी ॥ ५ ॥

९ वृत्त भुजंगप्रयात.

लघूशी परी मूर्ति हे हाटकांची[2] । करावी तथा मारुतीनाटकाची ।
असावी सदा ताइतामाजि दंडीं । समारंगणीं पाठ[3] दीजे उदंडीं ॥ १ ॥
ठसा हेमधातूवरी वायुसुतू । तथा ताइताचेपरी रौप्यधातू ।
तयाची पुजा मंदवारीं[4] करावी । बरी आवडी आर्त पोटीं धरावी ॥ २
स्वधामासि जातां प्रभू रामराजा । हनूमंत तो ठेविला याच काजा ।
सदा सर्वदा राम दासासि पावे । खळीं गांजितां ध्यान सोडून धांवे ॥

१०

चपळ ठाण विराजतसे बरें । परम सुंदर तें रुप साजिरें ।
धगधगीत बरी उटि सिंदुरें । निकट दास कपी विर हें खरें ॥ १ ॥
कपीवीर जेठी उडे चारि कोटी । गिरी द्रोण दाटी तळाथें उपाटी ।
झपेटी लपेटी करी पुच्छवेटी । त्रिकूटाचळीं ऊठवी वीर कोटी ॥ २ ॥
रघुविरा समिरात्मजे[5] भेटला । हरिजनां भजनांकुर फूटला ।
कपिकुळें सकळें मिनलीं बळें । रिपुदळें विकळें वडवानळें ॥ ३ ॥
कपीवीर तो लीन तल्लीन जाला । प्रसंगींचि पाहोनि सन्मूख आला ।
हनूमंत हें पावला नाम तेथें । महीमंडळीं चालिले सर्व येथें ॥ ४ ॥
नव्हे सौम्य हा भीम पूर्ण प्रतापी । देहो अचळांतुल्य[6] हा काळरूपी ।
पुढें देखतां दैत्यकूळें दरारा । भुतें कांपती नाम घेतां थरारां ॥ ५ ॥
सिमा सांडिली भीमराजें विशाळें । बळें रेंटिले दैत्य कृत्तांतकाळें ।
गजामस्तकीं केसरीचा चपेटा । महारुद्र तैसा विभांडी त्रिकूटा ॥ ६

११ मारुति.

नमन गा तुज भिमराया । निजमती मज दे तुज गाया ।
तडकितां तडका तडकाया । भडकितां भडका भडकाया ॥ १ ॥
हरुषलां[7] हर हा वरदानी[8] । प्रगटला नटला मज मानीं ।
वदवितां वदनीं वदवीतो । पुरवितो सदनीं पदवी तो ॥ २ ॥

---

१ क्षुद्र. २ सोन्याची. ३ पळून जातील. ४ शनिवारीं. ५ वायुपुत्र, मारुति. ६ पर्वत प्राय. ७ हर्षला. ८ वर देणारा.

अवचितां चढला गड[1] लंका । पळभरी न धरी मन शंका ।
तडकितां तडके तडकीतो । भडकितां भडके भडकीतो ॥ ३ ॥
खवळले रजनीचरभारें । भडकितां तडके भडमारें ।
अवचिता गरजे भुभुकारें । रगडिजे गमकें[2] दळ सारें ॥ ४ ॥
कितिकां खरडी खुरडीतो । कितेकां नरडी मुरडीतो ।
कितेकां चरडी चिरडीतो । कितेकां आरडी दरडीतो ॥ ५ ॥
महाबळी रजनीचर आले । भीम भयानकसेचि मिळाले ।
रपटितां रपटी रपटेना । आपटितां आपटी आपटेना ॥ ६ ॥
खिजवितां[3] खिजवी खिजवेना । झिजवितां झिजवी झिजवेना ।
रिझवितां रिझवी रिझवेना । विझवितां विझवी विझवेना ॥ ७ ॥
झिडकितां झिडकी झिडकेना[4] । तडकितां तडकी तडकेना ।
फडकितां फडकी फडकेना । कडकितां कडकी कडकेना ॥ ८ ॥
दपटितां दपटी दपटेना । झपटितां झपटी झपटेना ।
लपटितां लपटी लपटेना । चपटितां चपटी चपटेना ॥ ९ ॥
दडवितां दडवी दडवेना । घडवितां घडवी घडवेना ।
बडवितां बडवी बडवेना । रडवितां रडवी रडवेना ॥ १० ॥
कवळितां कवळी कवळेना । खवळितां खवळी खवळेना ।
जवळितां जवळी जवळेना । मवळितां मवळी मवळेना ॥ ११ ॥
चढवितां चढवी चढवेना । झडवितां झडवी झडवेना ।
तडवितां तडवी तडवेना । गडवितां गडवी गडवेना ॥ १२ ॥
तगटितां तगटी तगटेना । झगटितां झगटी झगटेना ।
लगटितां लगटी लगटेना । झुगटितां झुगटी झुगटेना ॥ १३ ॥
टणकितां टणकी टणकेना । ठणकितां ठणकी ठणकेना ।
दणगितां दणगी दणगेना । फुणगितां फुणगी फुणगेना ॥ १४ ॥
चळवितां चळवी चळवेना । छळवितां छळवी छळवेना ।
जळवितां जळवी जळवेना । टळवितां टळवी टळवेना ॥ १५ ॥
घसरितां घसरी घसरेना । विसरितां विसरी विसरेना ।
मरवितां मरवी मरवेना । हरवितां हरवी हरवेना ॥ १६ ॥
उलथितां उलथी उलथेना । कलथितां कलथी कलथेना ।
उडवितां उडवी उडवेना । बुडवितां बुडवी बुडवेना ॥ १७ ॥

---

१ त्रिकूटाचल. २ गमतीनें, लीलेनें. ३ त्याला खिजवूं लागले असतां तो दुसऱ्यांस खिजवी, स्वतः खिजत नसे. ४ तुच्छ होईना.

बुकलितां बुकली बुकलेना । धुमसितां धुमसी धुमसेना ।
धरवितां धरवी धरवेना । सरवितां सरवी सरवेना ॥ १८ ॥
झडपितां झडपी झडपेना । दडपितां दडपी दडपेना ।
तटवितां तटवी तटवेना । फटवितां फटवी फटवेना ॥ १९ ॥
वळवितां वळवी वळवेना । पळवितां पळवी पळवेना ।
ढळवितां ढळवी ढळवेना । लळवितां लळवी लळवेना ॥ २० ॥
घुरकितां घुरके घुरकावी । थरकितां थरके थरकावी ।
भरकितां भरके भरकावी । झरकिरकितां झरके झरकावी ॥ २१ ॥
परम दास हटी हटवादी । लिगटला उतटी[1] तटवादी ।
सिकवितां सिकवी सिकें[2] लावी । दपटितां दपटून दटावी ॥ २२ ॥

## १२

बळें सर्व संहारिलें रावणाला । दिलें अक्षयी राज्य बीभीषणाला ॥
रघूनायकें देव ते मुक्त केले । अयोध्यापुरीं जावया सिद्ध जाले ॥ १ ॥
पथामाजि कृष्णातिरीं रामराया । घडे राहणें स्नानसंध्या कराया ॥
सिता राहिली शीरटें गांव जेथें । रघूराज तो पश्चिमेचेनि पंथें ॥ २ ॥
जप ध्यान पूजा करी रामराजा । तयाचेपरी वीर सौमित्र वोजा ॥
स्मरेना देहें चित्त ध्यानस्थ जालें । अकस्मात तें तोय अद्भूत आलें ॥३॥
बळें चालिला ओघ नेटें भडाडां । नभीं धांवती लोट लाटा धडाडां ॥
नदी चालली राम ध्यानस्थ जेथें । बळें विक्रमें पावला भीम तेथें ॥ ४ ॥
उभा राहिला[3] भीमरूपी स्वभावें । बळें तुंब तो तुंबिला दोन गांवें ॥
नदी एक वीभागली दोन्हि बाहें । म्हणोनी तया नांव हें गांव बाहें ॥५॥
सुखें लोटती देखतां रामलिंगा । बळें चालिली भोंवती कृष्णगंगा ॥
परी पाहतां भीम तेथें दिसेना । उदासीन हें चित्त कोठें वसेना ॥ ६ ॥
हनूमंत पाहावयालागिं आलों । दिसेना सखा थोर विस्मीत जालों ॥
तयावीण देवालयें तीं उदासे । जळांतून बोभाइला[4] दास[5] दासें[6] ॥ ७ ॥
मनांतील जाणोनि केला कुढावा । दिले भेटिचा जाहला थोर यावा ॥
बळें हांक देतांचि तैसा गडाडी । महामेघ गंभीर जैसा घडाडी ॥ ८ ॥
रघूराज वैकुंठधामासि गेले । तधीं मारुती दास हे नीरवीले ॥
रघूनाथ ऊपासकाला प्रसंगें । सख्या मारुती पाव रे लागवेगें ॥ ९ ॥

१ तट म्ह० हट्ट किंवा पक्ष घेणाऱ्यांना, हट्टवाद्यांना उलथून पाडी. २ शीक, शिक्षा. ३ बाहेरगांवचा मारुती. ४ हाका मारून बोलाविला. ५ मारुती. ६ रामदासें.

प्रभूचें महावाक्य त्वां साच केलें । म्हणे दास हें प्रत्यया सत्य आलें ।
जनामाजि हें सांगतां पूरवेना । अवस्था मनीं लागली ते सरेना ॥१०॥

१३

भिम भयानक तो शिक[1] लावी । भडकला[2] सकळां भडकावी[3] ॥
वरतरू वरता तडकावी । बळकटां सकळां धडकावी ॥ १ ॥
सकळ ते रजनीचरभारे । सकट बांधत पुच्छ उभारे ॥
रडत बोलति वीरच सारे । न दिसतांचि बळें भुभुःकारे ॥ २ ॥
जळतसे त्रिकूटाचळ लंका । धरितसे रजनीचर शंका ॥
उमजती उमजे वरघाला । अवचितां बुडवी सकळांला ॥ ३ ॥
कठिण मार विरांस न साहे । रुधिरपूर महीवरि वाहे ॥
बहुत भूत भुतावळि आली । रणभुमीवरि येउनि घाली ॥ ४ ॥
अमर ते म्हणती विर आला । नवल हें पुरलें सकळांला ॥
उदित काळ बरा दिसताहे । विधिविधान विधी मग पाहे ॥ ५ ॥

॥ भीमरूपी स्तोत्रें समाप्त ॥

---

१ शिक्षा. २ खवळला. ३ ठोकून काढी.



# (१६) बारा ओव्या शतकें.

श्रीराम.

## १ वैराग्यशतक.

नमन योगिराया स्वामी दत्तात्रेया। गाईन वोविया संसारीच्या ॥ १ ॥
संसारीचें दुःख आठवलें मनीं। मागें नाना योनी भोगियेल्या ॥ २ ॥
भोगियेल्या परी नाहीं आठवण। दुःख तें कठीण विसरलों ॥ ३ ॥
विसरलों राम चित्तीं दृढकाम। तेणें गुणें श्रम थोर जाला ॥ ४ ॥
जालों कासावीस थोर गर्भवासीं। नको त्या दुःखासी सांगवेना ॥ ५ ॥
सांगवेना शीण अत्यंत कठीण। रामा तुजवीण दुःख जालें ॥ ६ ॥
दुःख जालें भारीं मातेच्या उदरीं। नवमासवरि कोंडियेले ॥ ७ ॥
कोंडियेलें मज अत्यंत सांकडीं। रामा कोण सोडी तुजवीण ॥ ८ ॥
तुजविणें मज जाहलें बंधन। जठरीं शयन जननीचे ॥ ९ ॥
जननीजठर संकोचित थोर। विष्ठा आणी मूत्र नाकीं तोंडीं ॥ १० ॥
नाकीं तोंडीं जंत वांति आणी पित्त। निर्बुजलें चित्त वायो नाहीं ॥११॥
वायो नाहीं तेथें वन्हीचा उबारा। तेणें या शरीरा दुःख होय ॥ १२ ॥
दुःख होय थोर सर्वांग आहाळे[1]। तेणें गुणें पोळे अस्थिमांस ॥ १३ ॥
अस्थीचा पंजर शिरीं वेटाळिला। नाडीं गुंडाळिला मेदमांसें ॥ १४ ॥
मेदमांस कृमी कुश्चिळ कातडीं। गळती आंतडीं लवथवित ॥ १५ ॥
ऐसें अमंगळ अत्यंत कुश्चीळ। प्राण हा व्याकूळ होय दुःखें ॥ १६ ॥
दुःखें आला त्रास तेणें कोंडे श्वास। कोंडिलें उमंस[2] घेतां नये ॥ १७ ॥
नये नये येतां सर्वथा बाहेरी। ऐसीये दार्थरीं[3] उकडीलें ॥ १८ ॥
उकडीतां प्राणी करी तळमळ। तंव जन्मकाळ आलें पुढें ॥ १९ ॥
आलें पुढें अंतकाळाचें संकट। कष्टांवरी कष्ट थोर जाले ॥ २० ॥
थोर जाले कष्ट मातेच्या उदरीं। शिणलों श्रीहरी दास तुझा ॥ २१ ॥
दास्य मी करीन ऐसें होतें ध्यान। जन्मकाळीं प्राण गेला माझा॥ २२॥
गेला माझा प्राण जालें विस्मरण। स्वामीचें चरण विसरलों ॥ २३ ॥
विसरलों सोहं मग म्हणे कोहं। जन्मकाळीं बहु दुःख जालें॥ २४॥
दुःखें दुखवलों मग म्हणे आहा। जन म्हणे टाहा फोडियेला॥ २५ ॥

---

१ पोळे. २ हुंदका. ३ उकाडा.

फोडियेला टाहो पडतां भूमीवरी । दिवसेंदिवस हरी विसरलों ॥ २६ ॥
विसरलों बुद्धि स्वहिताची शुद्धि । अज्ञानाची वृद्धि होत आहे ॥ २७ ॥
होत आहे वृद्धी दृढ देहबुद्धि । तुज कृपानिधी अंतरलों ॥ २८ ॥
अंतरलों सुख तुज विसरतां । विषयो भोगितां दुःख जालें ॥ २९ ॥
दुःख जालें फार ऐसा हा संसार । पुढें षड्विकार उद्भवले ॥ ३० ॥
उद्भवले तेणें सुखदुःख कळे । प्राण दा हा आंदोळे[1] दुःख होतां ॥ ३१ ॥
दुःख होय देहीं माता नेणे कांहीं । मज वाचा नाहीं काय करूं ॥ ३२ ॥
काय करूं दुःखें पोळे अभ्यंतर । मातेसी अंतर जाणवेना ॥ ३३ ॥
जाणवेना माझें दुःख मी अज्ञान । मग मी रुदन करीं देवा ॥ ३४ ॥
करीं देवा आतां माझी सोडवण । दुःख हें दारुण भोगवेना ॥ ३५ ॥
भोगवेना दुःख संसारींचें आतां । धांवें बा अनंता पावें वेगीं ॥ ३६ ॥
पावें वेगीं दास सोडवीं आपुले । लोभें वाहवले मायाजाळीं ॥ ३७ ॥
मायाजाळीं दृढ जालें माझें माझें । रामा नाम तुझें आठवेना ॥ ३८ ॥
आठवेना चित्तीं स्वहितांचें ज्ञान । मायबापीं लग्न केलें लोभें ॥ ३९ ॥
लोभें लग्न केलें मानिली आवडी । पांईं घोली बेडी बंधनाची ॥ ४० ॥
बंधनाची बेडी प्रबळला काम । मग कैचा राम आठवेल ॥ ४१ ॥
आठवेना राम स्वामी त्रैलोक्याचा । जालों कुटुंबाचा भार वाही ॥४२॥
भारवाही जालों रामा अंतरलों । बंधनीं पडिलों काय करूं ॥ ४३ ॥
काय करूं मज कामाचें सांकडें । संसाराचें कोडें उगवेना[2] ॥ ४४ ॥
उगवेना मन आठवे कांचन । सर्वकाळ ध्यान प्रपंचाचें ॥ ४५ ॥
प्रपंचाचें ध्यान लागलें मानसीं । चित्त अहर्निशी दुश्चंचळ ॥ ४६ ॥
चंचळ मानस संसारउद्वेगें । क्षणक्षणा भंगे चित्तवृत्ती ॥ ४७ ॥
वृत्ति कांता धन पाहे जनमान । इच्छेचें बंधन दृढावलें ॥ ४८ ॥
दृढावलें वोझें प्रपंचाचें माथां । तेणें गुणें व्यथा थोर होय ॥ ४९ ॥
थोर होय व्यथा तारुण्याच्या भरें । कामाचें काविरें[3] आवरेना ॥ ५० ॥
आवरेना क्रोध तेणें होय खेद । वृत्तीचा उच्छेद करूं पाहे ॥ ५१ ॥
करूं पाहे घात थोर पुढिलांचा[4] । मार्ग स्वहिताचा अंतरलों ॥ ५२ ॥
अंतरलों भक्ती ठाकेना विरक्ती । देवा तुझी प्राप्ती केवी घडे ॥ ५३ ॥
केवी घडे प्राप्ती मज पतितासी । जाल्या पापरासी सांगों कीती ॥ ५४ ॥
सांगों किती दोष जाले लक्षकोटी । पुण्य माझें गांठी आडळेना ॥ ५५ ॥
आडळेना पुण्य पापाचे डोंगर । करीतां संसार माझें माझें ॥ ५६ ॥
माझी माता पिता माझे बंधुजन । पुत्र कांता धन सर्व माझें ॥ ५७ ॥

१ खालवर होई. २ संकट सुटेना. ३ वेड किंवा भ्रम. ४ इतरांचा.

सर्व माझें ऐसें मानिला भर्वसा । तुज जगदीशा विसरलों ॥ ५८ ॥
विसरलों तुज वैभवाकरितां । शेखीं माता पिता राम[1] जाली ॥ ५९ ॥
राम जाली माता देखत देखतां । तऱ्ही म्हणे कांता पुत्र माझे ॥ ६० ॥
माझे पुत्र माझे स्वजन सोईरे । दृढ देहीं भरे अहंभाव ॥ ६१ ॥
अहंभाव मनीं दुःख आच्छादुनी । वर्ततसे जनीं अभिमानें ॥ ६२ ॥
अभिमान माथां वाहे कुटुंबाचा । अंतरीं सुखाचा लेश नाहीं ॥ ६३ ॥
नाहीं नाहीं सुख संसारीं पाहातां । पुरे देवा आतां जन्म नको ॥ ६४ ॥
नको नको आतां घालूं या संसारीं । पोळलों अंतरीं काय करूं ॥ ६५ ॥
काय करूं माझें नेणती स्वहित । आपुलालें हित पाहतील ॥ ६६ ॥
पाहतील हित वैभवाचीं सखीं । कोण्ही मज सेखीं[2] कामा नये ॥ ६७ ॥
कामा नये कोण्ही तुजवीणें रामा । नेईं निजधामा माहियेरा[3] ॥ ६८ ॥
माहियेर माझें अंतरलें दूरी । लोभें दुराचारी गोवियेलें ॥ ६९ ॥
गोवियेलें मज आपुलाल्या हिता । माझी कोण्ही चिंता केली नाहीं ॥ ७० ॥
केलि नाहीं चिंता लोभें गुंडाळिलें । पिळून घेतलें सर्व माझें ॥ ७१ ॥
सर्व माझें गेलें जालों निःकारण । स्वामीचें चरण अंतरलों ॥ ७२ ॥
अंतरलों देवा आयुष्य वेंचलें । अंतर पडिलें काय करूं ॥ ७३ ॥
काय करूं आतां शरीर खंगलें । मज वोसंडिलें जिवलगीं ॥ ७४ ॥
जिवलगीं मज वोसंडिलें देवा । काय करूं ठेवा प्रारब्धाचा ॥ ७५ ॥
प्रारब्धाचा ठेवा प्रपंचीं रंगला । देहे ही खंगला वृद्धपणीं ॥ ७६ ॥
वृद्धपणीं माझें चळलें शरीर । श्रवण बधीर नेत्र गेले ॥ ७७ ॥
नेत्र गेले मज पाहातां दिसेना । स्वयें उठवेना पाय गेले ॥ ७८ ॥
पाय गेले तेणें दुःख होये भारीं । तेथेंचि बाहेरी जाववेना ॥ ७९ ॥
जाववेना तेणें जालें अमंगळ । अत्यंत कुश्चीळ वांती पित्त ॥ ८० ॥
वांति पित्त जन देखोनि पळती । दुर्गंधीं गळती नवनाळीं ॥ ८१ ॥
नवनाळीं वाहे दुर्गंधी न साहे । वांति होऊं पाहे देखतांची ॥ ८२ ॥
देखती सकळ सुटले पाझर । मळमूत्रीं धर[4] धरवेना ॥ ८३ ॥
धरवेना तृषा क्षुधा आणी दिशा[5] । पराधीन आशा प्रबळली ॥ ८४ ॥
प्रबळली आशा जाली अनावर । चित्तीं तृष्णातुर सर्वकाळ ॥ ८५ ॥
सर्वकाळ चित्तीं थोर लोलंगता[6] । खायासी मागतां नेंदी कोण्ही ॥ ८६ ॥
नेंदी कोण्ही कांहीं क्षीण जालों देहीं । जिवलगीं तेहीं वोसंडीलें[7] ॥ ८७ ॥
वोसंडीलें मज वैभव गेलियां । देहे खंगलीयां दुःख जालें ॥ ८८ ॥

---

१ रामरूप झाली, मरण पावली. २ शेवटीं. ३ माहेरा मातृगृहापासून माहेर. ४ आवरेना. ५ शौच. ६ इच्छा. ७ टाकलें.

दुःख जालें थोर क्षुधा आवरेना । अन्नही जिरेना वांती होय ॥ ८९ ॥
वांती होय तेणें निर्बुजे[1] वासना । स्वादिष्ट चाववेना दांत गेले ॥ ९० ॥
दांत गेले तेणें जिव्हेची बोबडी । कंठ गडगडी बोलवेना ॥ ९१ ॥
बोलवेना अंतकाळींच्या विपत्ती । सर्वही म्हणती मरेना कां ॥ ९२ ॥
मरेना कां आतां कासया वांचला । देव विसरला नेणों यासी ! ॥ ९३ ॥
नेणों याची नाहीं मर्यादा खुंटली । सकळां लागली चिंता मनीं ॥ ९४ ॥
चिंता मनीं वाटे मृत्यूची सकळां । सर्वांसी कंटाळा आला थोर ॥ ९५ ॥
आला थोर त्रास जिवलग बोलती । देवा याची माती[2] उचलावी ॥ ९६ ॥
उचलावी माती सर्वांचे अंतरीं । सुखाचीं सोईरीं दूरी ठेलीं ॥ ९७ ॥
दूरी ठेलीं सर्व सुखाचीं चोरटीं । कोण्हीच सेवटीं सोडवीना ॥ ९८ ॥
सोडवीना कोण्ही श्रीरामावांचूनि । संकटीं धांवणी राम करी ॥ ९९ ॥
राम करीतसे दासांचा सांभाळ । भक्तांचा स्नेहाळ राम येक ॥ १०० ॥

---

## २ बंधमोक्ष शतक.

संसाराची कथा आतां सांगईन । सुखासाठीं लग्न आरंभीलें ॥ १ ॥
आरंभिलें लग्न आणिली नोवरी । रिणें[3] घरोघरीं मागतसे ॥ २ ॥
मागतसे त्यासी कोण्हीच देईना । अन्नही मिळेना खावयासी ॥ ३ ॥
खावयासी नाहीं लेवयासी नाहीं । अन्न वस्त्र नाहीं सर्वकाळ ॥ ४ ॥
सर्वकाळ गेला चिंताचि करितां । अखंड दुश्चिता श्वास सांडी ॥ ५ ॥
सांडी स्नानसंध्या सांडी नित्यनेम । रात्रंदिवस काम संसाराचें ॥ ६ ॥
संसाराचें काम पुरेना उदंड । दीसेंदीस भंड[4] आरंभलें ॥ ७ ॥
आरंभीं नोवरी म्हणे आणा आणा । रात्रदिस आणा आरंभिल्या ॥ ८ ॥
आरंभलें घर मांडला संसार । नित्य करकर भांडणाची ॥ ९ ॥
तेलमीठ आणा भाजीपालें आणा । धान्य घरा आणा कांहीं तरी ॥ १० ॥
कांहीं तऱ्हीं शेणी सर्पण जळण । पात्र सांठवण करावया ॥ ११ ॥
करावया स्वयंपाक सांठवणी । गाडगे वेळणी परियेळ[5] ॥ १२ ॥
घालावया धुण पाहिजे मांदण[6] । फुटकें रांजण धड आणा ॥ १३ ॥
धड आणा डेरे भाचरी मडकीं । कुंडाले[7] आणिखी घागरी त्या ॥ १४ ॥
घागरी दुधाणी[8] सेंदावया पाणी । आणी चिंचवणी घालावया ॥ १५ ॥
घालावया सुठी हिंग जीरें मीरें । सेणेरें पोतेरें पाहिजे कीं ॥ १६ ॥

---

१ कंटाळे. २ हा मरावा. ३ कर्ज. ४ फजिती. ५ परळ, परात. ६ रुंद मुखाचें पात्र ! ७ कुंडा. ८ दूध तापवावयाचें भांडें.

गोठे [1]दारवठे चौकटी आगळा । कड्या कोंड्या खिळा ठांई ठांई ॥ १७ ॥
ठांई [2]पडे अन्न तरी हा भाग्याचा । धोका संसाराचा रात्रंदीस ॥ १८ ॥
दिसा धोका करी रात्रीं चिंता करी । दुःख परोपरीं संसारीचें ॥ १९ ॥
संसारीचें दुःख कांहीं येक सुख । सर्वकाळ धाक वाहातसे ॥ २० ॥
वाहातसे धाका धाकतसे लोका । तोंडावरी थुंका पडेना कीं ॥ २१ ॥
पडेना कीं घर मोडलेंसें आढें । रोडकेसें घोडें हारपलें ॥ २२ ॥
हारपलें आतां पाहों कोणे वाटे । मोडताती कांटे आणी ठेंचा ॥ २३ ॥
ठेंचा तिडका द्याव्या मुमळीं सोसाव्या । रात्रंदिस शिव्या देती लोक २४
लोक लाता देती चुकतां मारिती । रिणकरी घेती वेंटाळूनि ॥ २५ ॥
वेंटाळुनी घेती मुलें घरभरी । अन्न पोटभरी मिळेना कीं ॥ २६ ॥
मिळेना कीं अन्न कोरडें भोजन । पोरें वणवण करिताती ॥ २७ ॥
करिताती चिंता तें [3]अस्त्रीपुरुषें । आहा जगदीशें काय केलें ॥ २८ ॥
केलें थोर पाप सीणावरी सीण । संसार कठीण कळों आला ॥ २९ ॥
आला गेला लोक पाहेना विचार । पाहुण्यांनीं घर बुडविलें ॥ ३० ॥
बुडविलें घर ते आणा घालिती । येती काकुळती दोघेजणें ॥ ३१ ॥
दोघेंजणें होतीं बहुजणें जालीं । भीकेसी लागलीं दारोदारीं ॥ ३२ ॥
दारोदारीं दोघें मागती उसणें । रिणें केलें दुणें द्याया नाहीं ॥ ३३ ॥
नाहीं सूप पांटी [4]पाळीं [5]काथवटी । कांहीं [6]हाटवटी मागतसे ॥ ३४ ॥
मागतसे [7]मालें नागवणेसाठीं । म्हणे देशा कांठी घेउनी जावें ॥ ३५ ॥
जावें आतां देशीं कामा नये कदा । भोगाव्या आपदा किती म्हणूं ॥ ३६ ॥
किती म्हणूं सीण करावा हव्यास । चिन्ता कासावीस रात्रंदिस ॥ ३७ ॥
करीतसे यत्न होउनी येईना । आहा रे प्राक्तना काय करूं ॥ ३८ ॥
काय करूं आतां कर्म बळिवंत । आम्हां भगवंत कोठें गेला ॥ ३९ ॥
गेला हा लौकीक आतां राहे कैसा । ऐसा दाही दिशा येकवटी ॥ ४० ॥
येकवटी सेण गोवऱ्या कराया । आणी पेटवाया शेणकाड्या ॥ ४१ ॥
शेणकाड्या तृण पानें पत्रावळी । कोण्ही नाहीं वळी गुरे [8]खासा ॥ ४२ ॥
खासा वेगा ताणी खासा आणी पाणी । मागुती [9]आइणी बोलतसे ॥ ४३ ॥
बोलतसे येक चालतसे येक । मागें पुढें लोक हांसताती ॥ ४४ ॥

---

१ उंबरठे. २ मिळालें तर. ३ अस्त्री, अस्तुरी, स्त्री. ४ पाळें, वाडगा. ५ काथवट=कटोरा. ६ हटवट=भाजीचा बाजार. ७ मालें मागणें=जप्त झालेली जमीन किंवा तुरुंगांत पडलेला आप्त सोडविण्यासाठीं किंवा जमीनसारा देण्यासाठीं गळ्यांत नांगर अडकवून भिक्षा मागणें. ८ स्वतः ९ सामर्थ्य '(हंसकोश), आवडीनें (कुंटे)' ज्ञानेश्वरी अ० १० ओवी ४५ आयणी म्ह० बुद्धि, आवड, चातुर्य (माडगांवकर).

हांसताती त्यांसीं भांडावया उठतो । भांडतां तुटतो ठांई ठांई ॥ ४५ ॥
ठांई ठांई पोरें हागती मुतती । खोंकिती वोकिती चहूंकडे ॥ ४६ ॥
चहूंकडे केर दाटला उकीर । नित्य करकर भांडणाची ॥ ४७ ॥
भांडतां भांडतां निघोनियां गेला । जाउनियां आला किती वेळ ॥४८॥
कितीवेळ व्यथा वांचला मागुता । व्यथेवरी व्यथा उद्भवल्या । ४९ ॥
उद्भवल्या व्यथा रोग परोपरीं । तेथेंचि बाहेरी बैसतसे[1] ॥ ५० ॥
बैसतसे चोर पोर जाला थोर । मारमारूं बुर[2] काढीतसे ॥ ५१ ॥
काढीतसे बुर त्या दोघां जणांचा । पाळिला पोरांचा पोरवडा ॥ ५२ ॥
पोरवडा जाला कामा नाहीं आला । अदृष्ट[3]-पोराला काय बोल ॥ ५३ ॥
बोलतां बोलतां लाविला गळफांस । अस्त्री कासावीस होत असे ॥५४॥
होत असे भंड त्या दोघां जणाचें । सुख संसाराचें बरें पाहा ॥ ५५ ॥
बरें पाहा मनीं जाणते लोकहो । वायांवीण मोहो धरीतसा ॥ ५६ ॥
धरीतसा मोहो देवेंवीण वायां । अंतीं आया बाया चावळतां ॥ ५७ ॥
चावळता कां रे देव वोळखाना । धुंडूनि काढाना कोठें तऱ्हीं ॥ ५८ ॥
कोठें तऱ्हीं देव पावेल निर्वाणी । नित्यनिरूपणीं संतसंगें ॥ ५९ ॥
संतसंगें दोष नासती विशेष । आणी जगदीश ठांई पडे ॥ ६० ॥
ठांई पडे तेव्हां जिणें धन्य जालें । सार्थकचि केलें संसाराचें ॥ ६१ ॥
संसाराचें कोण शाश्वत मानावें । म्हणोनि जाणावें परब्रह्म ॥ ६२ ॥
निरंजनीं जन जनीं निरंजन । जाणती सज्जन विवेकाचे ॥ ६३ ॥
विवेकाचे जन मिळतां संकट । व्यर्थ खटपट ठांई ठांई ॥ ६४ ॥
ठांई ठांई बंडें मांडलीं पाषांडें । सांगती उदंडें पोटासाठीं ॥ ६५ ॥
पोटासाठीं रडे कष्टती बापुडे । त्यासी कोणेकडे परलोक ॥ ६६ ॥
परलोक घडे बहुत सायासें । तेथें ऐसें कैसें बाह्याकारें[4] ॥ ६७ ॥
बाह्याकारें वांयां व्यर्थचि सीणावें । म्हणोनि जाणावें परब्रह्म ॥ ६८ ॥
परब्रह्म येक तें नव्हे आनेक । पाहातां विवेक नित्यानित्य ॥ ६९ ॥
नित्यानित्य जाणे तो साधु जाणावा । उगवील गोवा[5] बहुतांचा ॥ ७० ॥
बहुतांचा बंद सोडी निरूपणें । उत्तमें लक्षणें विवेकाचीं ॥ ७१ ॥
विवेकाचें वाक्य विवेकी जाणती । ज्ञानी वोळखती पूर्ण ब्रह्म ॥ ७२ ॥
पूर्ण ब्रह्म येक निर्मळ निश्चळ । भ्रांतीचें आभाळ तेथें नाहीं ॥ ७३ ॥
तेथें नाहीं जन्ममरणयातना । पूर्ण सनातन वोळखतां ॥ ७४ ॥

---

१ शौच करतो. २ कृतघ्न (पोराचें विशेषण) तें कृतघ्न पोर त्याला मारमारून काढी. बुर=कृतघ्न (ज्ञाने० १७-२८१). ३ नशीब. ४ वरपंग, बाहेरचा डामडौल, ढोंग. ५ गुंता, संकट, संशय.

बोळखतां देव बोळखतां भक्त । बोळखतां मुक्त होत असे ॥ ७५ ॥
होत असे मुक्त संसारापासूनि । देह विवरूनि तत्वज्ञानी ॥ ७६ ॥
तत्वज्ञानीं जरी तत्वें तत्व झडे । तरी ठांई पडे परब्रह्म ॥ ७७ ॥
परब्रह्म येक नित्य निराकार । धरिते जोजार मूळमाया ॥ ७८ ॥
मूळमाया देव चंचळ ईश्वर । विधीहरीहर तेथूनियां ॥ ७९ ॥
तेथूनियां पंचभूतें हें निर्माण । उत्पत्तिलक्षण इच्छारूप ॥ ८० ॥
इच्छारूप वृत्ती कल्पना कामना । जया पुनः पुन्हा गर्भवास ॥ ८१ ॥
गर्भवास जाण विवेकें नासती । विवेकी आसती जन्म नाहीं ॥ ८२ ॥
जन्म नाहीं ऐसें कैसेंनि जाणावें । विवेकें बाणावें समाधान ॥ ८३ ॥
समाधान जालें मीपण शोधीतां । वस्तूसी बोधितां वस्तुरूप ॥ ८४ ॥
वस्तु रूप नाहीं वस्तु नाम नाहीं । आकारचि नाहीं विवंचिता ॥ ८५ ॥
विवंचावें महावाक्याचें अंतर । नित्य निरंतर जैसें तैसें ॥ ८६ ॥
तैसेंचि असावें मीपण सांडूनी । पाहों जातां मनीं मन नाहीं ॥ ८७ ॥
मन नाहीं तेथें उन्मनही नाहीं । आतां कांहीं कांहीं उमजलें ॥ ८८ ॥
उमजलें मज मीच आडळेना । मीपणें कळेना सर्व कांहीं ॥ ८९ ॥
सर्व कांहीं मिथ्या मीपणही गेलें । आपण राहिलें पूर्णपणें ॥ ९० ॥
पूर्ण बोध जाला संदेह तुटला । संसारी सुटला येणें रीती ॥ ९१ ॥
येणें रीती आतां समाधान जालें । शरीर लागलें भजनासी ॥ ९२ ॥
भजन रामाचें त्रैलोक्य पावन । करितो चिंतन शूळपाणी ॥ ९३ ॥
शूळपाणी चिंती तें करा चिंतन । माझें तनमन दाशरथी ॥ ९४ ॥
दाशरथी देव देवांचा कैपक्षी । सर्व काळ रक्षी भक्तजना ॥ ९५ ॥
भक्तजन लीन जाले रामपदीं । सज्जन संवादीं विवरतां ॥ ९६ ॥
विवरतां जड चंचळ निश्चळ । तुटे खळखळ मीपणाची ॥ ९७ ॥
मीपण हें रामपदीं निवेदिलें । समाधान जालें रामदासीं ॥ ९८ ॥

---

## ३ ज्ञान शतक.

संताचे संगती काय प्राप्त होतें । तें आतां निरुतें[1] सांगईन ॥ १ ॥
सांगईन परी मानसीं धरावें । मग उद्धरावें संवसारीं ॥ २ ॥
संवसारीं सार जया नाश नाहीं । तेंचि पडे ठाईं संतसंगें ॥ ३ ॥
संतसंगें तुटे जननीजठर । दुस्तर संसार मायाजाळ ॥ ४ ॥
मायाजाळ तुटे तरी देव भेटे । संतसंगें आटे भवसिंधु ॥ ५ ॥

---

१ खरें, निश्चयेंकरून.

भव भयानक बुडवी सकळां । त्याहूनी वेगळा संतसंग ॥ ६ ॥
संतसंगें साधीं असाध्य वस्तूसी । जेथें अहंतेसी ठाव नाहीं ॥ ७ ॥
ठाव नाहीं जेथें जावया इतरां । अभाविकां नरां पापबुद्धी ॥ ७ ॥
पापबुद्धि झडे संतांचे संगती । नाहीं अधोगती गर्भवास ॥ ९ ॥
गर्भवास संतसंगें मुक्त होय । वेगीं धरीं सोय आलयां[1] रे ॥ १० ॥
आलया संसारीं स्वहित विचारीं । येकभावें धरीं संतसंग ॥ ११ ॥
संतसंग धरी धन्य तो संसारीं । बोलिले श्रीहरि भागवतीं ॥ १२ ॥
भागवतगीतासारनिरूपण । त्याचें विवरण संतसंगें ॥ १३ ॥
संतसंगें कळे सर्व शास्त्रभाग । आणी ज्ञानयोग अप्रयासें ॥ १४ ॥
प्रयासें साधितां कदा नये हाता । तें लाभे तत्वता साधुसंगें ॥ १५ ॥
साधूचेनि संगें अलभ्याचा लाभ । मुक्ति हे सुलभ होत आहे ॥ १६ ॥
आहे येक देव परी तो कळेना । जयासी मिळेना संतसंग ॥ १७ ॥
सतसंग नाहीं जयालागीं जनीं । तया कां जननी प्रसवली ॥ १८ ॥
प्रसवली माता शीणचि उरला । पुत्र नाहीं जाला हरिभक्त ॥ १९ ॥
हरिभक्त नर वंशाचें मंडण । दोषाचें खंडण करीतसे ॥ २० ॥
करितसे भक्ती संताचे संगती । सायुज्यता मुक्ती पावावया ॥ २१ ॥
पावावया मुक्ती हरीचें भजन । श्रवण मनन सर्वकाळ ॥ २२ ॥
सर्वकाळ होय सार्थक श्रवणें । ब्रह्मनिरूपणें संतसंगें ॥ २३ ॥
संतसंगें ब्रह्मपद वोळखावें । विवेकें पावावें निरंजना ॥ ३४ ॥
निरंजना जातां नाहीं जन वन । अंतराळीं गमन येकायेकी ॥ २५ ॥
येकायेकी देव निर्मळ निश्चळ । आतुडे प्रांजळ दुजेंवीण ॥ २६ ॥
दुजेंवीण देव येकला येकट । उभा घनदाट मागें पुढें ॥ २७ ॥
मागें पुढें सर्व देवांचा नायक । सांपडे विवेक जालियानें ॥ २८ ॥
जालियानें कृपा संतसज्जनाची । मग विवेकाची वाट फुटे ॥ २९ ॥
वाट अवघड पाहातां दिसेना । जेथें नाहीं मना समागम ॥ ३० ॥
समागमें जातां वाटचि फुटेना । संशयो तुटेना बहुविध ॥ ३१ ॥
बहुविध पंथ कोण तो धरावा । दुजेपणें देवा पाविजेना ॥ ३२ ॥
पाविजेना देव संतसंगेंवीण । मार्ग हा कठिण विवेकाचा ॥ ३३ ॥
विवेकाचा मार्ग विवेकें चालावा । मनाचा त्यागावा सर्वसंग ॥ ३४ ॥
संगत्याग करी पावसी श्रीहरी । परी येक धरी संतसंग ॥ ३५ ॥
संतसंगेंवीण त्याग हा घडेना । श्रीहरी पडेना कदा ठाईं ॥ ३६ ॥
ठाव सज्जनाचा सज्जन जाणती । तेथें नाहीं गती मीपणाची ॥ ३७ ॥

1 संसारास आलेल्या जीवा !

मीपणाची गती संगाचें लक्षण । ठाउकी हे खूण सज्जनासी ॥ ३८ ॥
सज्जनाचें वर्म सज्जना आतुडे । इतरां कुवाडें मायाजाळ ॥ ३९ ॥
मायाजाळ पाहों जातां आडळेना । सर्वथा कळेना न पाहातां ॥ ४० ॥
पाहातां संसार मायिक वेव्हार । परी निरंतर लागलासे ॥ ४१ ॥
लागला दिसेना परी निरसेना । मायिक वासना साच जाली ॥ ४२ ॥
साच जाली असे विवेकें निरसे । निरसोनि वसे जवळीच ॥ ४३ ॥
जवळीच आहे अंतरीं चोरटा । आतां कोणें वाटा धांवसील ॥ ४४ ॥
धांवसील परी वासना सरेना । सर्वथा मरेना साधुवीण ॥ ४५ ॥
साधुविणें प्राणी पडती आटणीं[1] । तपीं तीर्थाटणी नानाकर्मी ॥ ४६ ॥
नानाकर्मीं देव चुकोनी राहिला । सज्जनीं पाहिला अनुभवें ॥ ४७ ॥
अनुभव सर्व देहीं वेगळाले । कोण जाणे भले संतजन ॥ ४८ ॥
संतजन कोणे परी वोळखावे । कैसे ते जाणावे संतजन ॥ ४९ ॥
संतांची वोळखी साधु वोळखेल । येर भांबावेल मायाधारी ॥ ५० ॥
मायाधारी प्राणी जवळी चुकले । नाहीं वोळखिले संतजन ॥ ५१ ॥
संतजन कोण कैसी वोळखण । तेंचि निरूपण सांगितलें ॥ ५२ ॥
सांगितलें आहे मागें थोरथोरीं । तेंचि अवधारी आलया रे ॥ ५३ ॥
आलया रे साधु जाणावा कवणें । तयाचीं लक्षणें असंख्यातें ॥ ५४ ॥
असंख्यातें परी वोळखीकारणें । साधु धूर्तपणें सारिखाची ॥ ५५ ॥
सारिखाची दिसे जनाचियेपरी । परी तो अंतरीं वेगळाची ॥ ५६ ॥
वेगळाची ज्ञानें पूर्ण समाधानें । स्वस्वरूपीं मनें वस्ती केली ॥ ५७ ॥
वस्ती केली मनें निर्गुणीं सर्वदा । मीपणें आपदा तया नाहीं ॥ ५८ ॥
तया नाहीं काम तया नाहीं क्रोध । जया नाहीं खेद स्वार्थबुद्धी ॥ ५९ ॥
बुद्धि निश्चयाची स्वरूपीं जयाची । कल्पना ठांईची निर्विकल्प ॥ ६० ॥
निर्विकल्प मदमत्सर सारिला । आणि संहारिला लोभदंभ ॥ ६१ ॥
दंभ हा लौकिकीं विवेकें सारिला । दूरी वोसंडिला अहंकार ॥ ६२ ॥
अहंकार नाहीं दुराशा अंतरीं । ममता हे दुरी मोकलीली ॥ ६३ ॥
मोकलिली भ्रांती शरीरसंपत्ती । वैभव संतती लोलंगता ॥ ६४ ॥
लोलंगता नसे ज्ञानें धालेपणें । ऐसीं हीं लक्षणें सज्जनाचीं ॥ ६५ ॥
सज्जनलक्षणें सांगेन पुढती । अर्थी चित्तवृत्ती लांचावली ॥ ६६ ॥
लांचावली वृत्ती सज्जन सांगतां । होय सार्थकता जयाचेनी ॥ ६७ ॥
जयाचेनि ज्ञानें तरती अज्ञानें । साधु समाधानें समाधानी ॥ ६८ ॥
समाधान शांती क्षमा आणी दया । रंका आणी राया सारिखाचि ॥ ६९

[1] अडचणींत, भ्रमांत.

सारिखाचि बोध तेथें नाहीं खेद । सर्वांसी अभेद सर्वकाळ ॥ ७० ॥
सर्वकाळ गेला श्रवणमननें । सत्क्रियाभजनें हरिभक्ती ॥ ७१ ॥
हरिभक्ती करी जन तरावया । स्वधर्म विलया जाऊं नेदी ॥ ७२ ॥
जाऊं नेदि भक्ती जाऊं नेदी ज्ञान । अनुतापीं मन निरंतर ॥ ७३ ॥
निरंतर भाव सगुणभजन । येणें बहुजन उद्धरती ॥ ७४ ॥
उद्धरती जन करितां साधन । क्रियेचें बंधन आचरतां ॥ ७५ ॥
आचरतां साधुजना होय बोधु । लागतसे वेधु भक्तिभावें ॥ ७६ ॥
भक्तिभावें देवप्रतिष्ठापूजन । कथानिरूपण महोत्साव ॥ ७७ ॥
महोत्साव साधु भक्तीचें लक्षण । करी तीर्थाटण आदरेंसीं ॥ ७८ ॥
आदरेंसीं विधी करणें उपाधी । लोकिकीं सुबुद्धी लागावया ॥ ७९ ॥
लागावया भावें सत्क्रियाभजन । करितो सज्जन मुक्तिदाता ॥ ८० ॥
मुक्तिदाता साधु तोचि तो जाणावा । जेणें संपादावा लोकाचार ॥ ८१ ॥
लोकाचार करी तो जना उद्धरी । ज्ञाता अनाचारी कामा नये ॥ ८२ ॥
नये नये निंदूं जनीजनार्दन । म्हणोनि सज्जन क्रियावंत ॥ ८३ ॥
क्रियावंत साधु विरक्त विवेकी । तोचि तो लौकिकीं मान्य आहे ॥ ८४ ॥
मान्यता सत्क्रिया लौकीक सोडील । तोचि उद्धरेल जन नाहीं ॥ ८५ ॥
जना नाहीं मान्य तो सर्व अमान्य । म्हणोनियां धन्य क्रियावंत ॥ ८६ ॥
क्रियाभ्रष्ट तेणें लौकिकां सोडावें । आणी वसवावें ब्रह्मारण्य ॥ ८७ ॥
ब्रह्मारण्य सेवी तो साधु येकला । जना नाहीं आला उपेगासी ॥ ८८ ॥
उपेगासी येणें जना पूर्णपणें । तयाचीं लक्षणें निरोपीलीं ॥ ८९ ॥
निरोपिलीं येणें लक्षणें जाणावा । साधु वोळखावा मुमुक्षूनें ॥ ९० ॥
मुमुक्षूनें गुरु क्रियाभ्रष्ट केला । तरी अंतरला दोंहीं पक्षीं ॥ ९१ ॥
दोंहीं पक्षीं शुद्ध तया ज्ञानबोध । येर ते अबद्ध अनाचारी ॥ ९२ ॥
अनाचार करी कोण आहे जनीं । परी निरूपणीं बोलिजेतें ॥ ९३ ॥
बोलिजे साचार सत्य निरूपणीं । घडे ते करणीं सुखें करूं ॥ ९४ ॥
करूं नये कदा मिथ्यानिरूपण । करितां दूषण लागों पाहे ॥ ९५ ॥
पाहें पाहें बापा सत्य ते शोधूनी । ठाकेना म्हणोनि निंदूं नको ॥ ९६ ॥
निंदूं नको शास्त्र निंदूं नको वेद । तरीच स्वानंद पावसील ॥ ९७ ॥
पावसील राम जीवांचा विश्राम । अहंतेचा श्रम सांडितांची ॥ ९८ ॥
सांडितां विवेकें मिथ्या अभिमान । तरी समाधान पावसील ॥ ९९ ॥
पावसील गती शुद्धानरूपणें । रामदास म्हणे क्षमा करीं ॥ १०० ॥

## ४ उपदेश शतक.

उपदेशपद्धती आतां सांगईन । होईं सावधान आलया रे ॥ १ ॥
आलया रे सांग तूं कोण आहेसी । वेगीं आपणासी ठांई पाडी ॥ २ ॥
ठांई पाडी तुज तूंचि चुकलासी । देहाचा धरिसी अभिमान ॥ ३ ॥
अभिमान देहीं कोण्या आवेवांचा[1] । पांचा पंचकांचा स्थूळ देह ॥ ४ ॥
स्थुळ देह दृश्य याचा तूं जाणता । देह मी म्हणतां जीवदशा ॥ ५ ॥
जीवदशा गेली साक्षत्वें वर्ततां । ईश्वरु तत्वता याचें नांव ॥ ६ ॥
नांवरूप देहीं साक्षी तो विदेही । या विवेकें नाहीं देहबुद्धी ॥ ७ ॥
देहबुद्धी गेली या स्थूळ देहाची । उरी संदेहाची लिंगदेह[2] ॥ ८ ॥
लिंगदेहीं मन वासनेची वृत्ती । होतसे निवृत्ती साक्षरूपें ॥ ९ ॥
साक्षरूपें पांच पंचकें राहिलीं । जाणोनि सांडिलीं कर्णादिकें ॥ १० ॥
कर्ण प्राण आणी विषयपंचक । इंद्रियदशक पंचवीस ॥ ११ ॥
पंचवीस तत्वें या लिंगदेहाचीं । साक्षी वेगळाचि अनुभवें ॥ १२ ॥
अनुभवें साक्षी स्थूळसुक्ष्माचा । जागृतीस्वप्नाचा जाणता तूं ॥ १३ ॥
जाणता तूं कोण सांग वोळखण । नेणें मी आपण आपणासी ॥ १४ ॥
आपणासी नेणें स्वामीनें सांगावें । अज्ञान[3] जाणावें रूप तुझें ॥ १५ ॥
तुझें तूंचि बा रे नेणें म्हणतोसी । तेंचि निश्चयेंसी रूप तुझें ॥ १६ ॥
तुझें रूप तुज दृश्य होत आहे । नेणपण पाहे साक्षरूप ॥ १७ ॥
साक्षरूप मज कळेना म्हणसी । तो तूं निश्चयेंसी वेगळाची ॥ १८ ॥
वेगळाचि तींहीं देहांविलक्षण[4] । वर्तती आपण साक्षरूपें ॥ १९ ॥
साक्षरूप सर्व पदार्थ जाणता । तो कांहीं तत्वता आत्मा नव्हे ॥ २० ॥
आत्मा नव्हे जाण जाणे अंतःकर्ण । नाहीं जाणपण आत्परूपीं ॥ २१ ॥
आत्मरूप मन बुद्धी अगोचर । आठव विसर जेथें नाहीं ॥ २२ ॥
जेथें नाहीं वृत्ति सर्वांहि निवृत्ती । जाणतीं नेणती वृत्ति बापा ॥ २३ ॥
वृत्तिरूप आत्मा हें कईं घडावें । तेव्हां विघडावें निवृत्तीसी ॥ २४ ॥
निवृत्ती उन्मनी निःशब्द विज्ञान । ऐसें समाधान अनिर्वाच्य ॥ २५ ॥
अनिर्वाच्य तेथें नाहीं जाणपण । आपुलें आपण पुरातन ॥ २६ ॥
पुरातन येक प्रपंच मायिक । मिथ्याचि अनेक भासमात्र ॥ २७ ॥
भासमात्र कांहीं नसोनियां आहे । विचारुनि पाहें अनुभवें ॥ २८ ॥
अनुभवेंवीण उठे जाणपण । जाणपणें शीण वाउगाची ॥ २९ ॥

---

१ अवयवाचा. २ सूक्ष्म वासनात्मक दुसरा देह. ३ तिसरा कारणदेह अज्ञान. ४ तीन देहावेगळा.

वाउगाची शीण करीतसे मन । आत्मा ज्ञानघन म्हणोनियां ॥ ३० ॥
म्हणोनियां मुळीं अज्ञानची नाहीं । तेथें ज्ञान काई वाउगेंची ॥ ३१ ॥
वाउगेंची ज्ञान मनाची कल्पना । निर्विकल्प जाणा कल्पूं पाहे ॥ ३२ ॥
कल्पूं पाहे मन कल्पनाविषय । तरी आत्मा काय विषयांऐसा ? ॥ ३३ ॥
ऐसा नव्हे आत्मा मनासी नाकळे । मनचि मावळे पाहों जातां ॥ ३४ ॥
पाहों जातां त्यासी क्षयो पाहत्यासी । म्हणोनि मनासी अगोचर ॥३५॥
अगोचर मना तें कैसें पाहावें । मीपणासी ठावें कदा नव्हे ॥ ३६ ॥
नव्हे जाणीजेसें ऐसेंचि जाणावें । मग होय ठावें समाधान ॥ ३७ ॥
समाधान तें तूं वाक्य तत्वमसी । सोहं हंसा ऐसी मात आहे ॥ ३८ ॥
पाहे अहं ब्रह्म ऐसेंचि वचन । ब्रह्म सनातन तूंचि बापा ॥ ३९ ॥
तूंचि येक ब्रह्म येर सर्व भ्रम । दृढ धरीं वर्म अंतरींचें ॥ ४० ॥
अंतरींचें वर्म अंतरीं धरावें । विचारें करावें दृढोत्तर[1] ॥ ४१ ॥
दृढोत्तर होय श्रवणमननें । अद्वैतचि मनें विवरावें ॥ ४२ ॥
विवरावें जरी भक्तीचें लक्षण । वैराग्य तें कोण कैसें आहे ॥ ४३ ॥
आहे भक्ति ऐसी विवेकें जाणावी । आवडी धरावी शाश्वताची ॥ ४४ ॥
शाश्वताची प्रीति विषयीं विरक्ति । नाशिवंत चित्तीं जाणोनियां ॥४५॥
जाणोनियां सर्व नाशवंत ऐसें । शाश्वतीं विश्वासे मन बुद्धी ॥ ४६ ॥
बुद्धीचा निश्चयो स्वरूप जाहाला । प्राणी विश्वासला स्वस्वरूपीं ॥४७॥
स्वरूपीं आसक्ति याचें नांव भक्ति[2] । पाहातां विभक्ति जेथें नाहीं ॥ ४८
जेथें नाहीं देहबुद्धीचें अज्ञान । तया नांव ज्ञान बोलिजेतें ॥ ४९ ॥
बोलिजेतें ज्ञान सर्वसाक्षभूत । जाणावें अद्वैत तेंचि ज्ञान ॥ ५० ॥
ज्ञान आणी भक्ति येकचि असती । वैराग्याची स्थिती बोलिजेल ॥५१
बोलिजे वैराग्य त्यागाचें लक्षण । साक्षी विलक्षण जाणोनियां ॥ ५२ ॥
जाणोनी मायिक सर्वहि त्यागिलें । मन सुखावलें संगत्यागें ॥ ५३ ॥
संगत्याग केला निःसंग राहिला । सर्वही येकला येकरूप ॥ ५४ ॥
येकरूप जाले भक्ति आणि ज्ञान । वैराग्यहि जाण येकरूप ॥ ५५ ॥
येकरूप जाले भक्ति आणि ज्ञान । बुडालें साधन वैराग्याचें ॥ ५६ ॥
वैराग्यावांचूनि सर्व खंडे ज्ञान । त्यागाचें लक्षण तेथें नाहीं ॥ ५७ ॥
नाहीं भक्ति भाव सगुणाच्या ठाईं । शब्दज्ञान काई बोलोनियां ॥ ५८ ॥
बोलोनियां मुखें तैसी क्रिया करी । धन्य तो संसारीं ब्रह्मज्ञानी ॥ ५९ ॥
ब्रह्मज्ञानी भला वर्तणुकेपासीं । कोरड्या शब्दासी कोण पुसे ॥ ६० ॥

---

१ अधिक दृढ. २ 'स्वस्वरूपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते' असेंच श्रीशंकराचार्यांनीं विवेकचूडामणींत भक्तिलक्षण केलें आहे.

कोण पुसे बापा ज्ञान हें शाब्दिक । क्रिया अलोलीक सत्य जाण ॥६१॥
सत्य जाण भक्ति शरीरें करावी । आवडी धरावी सगुणाची ॥ ६२ ॥
सगुणीं आदरें देह झिजवावें । भजन करावें नवविधा ॥ ६३ ॥
नवविधा खूण श्रवणकीर्तन । नामाचें स्मरण सर्वकाळ ॥ ६४ ॥
सर्वांचें जीवन तें पादसेवन । करावें पूजन यथासांग ॥ ६५ ॥
यथासांग पूजा देवाब्राह्मणांची । प्रीती वंदनाची सर्वकाळ ॥ ६६ ॥
सर्वकाळ दास्य मानसीं आवडे । सख्यचि रोकडें सर्वांभूतीं ॥ ६७ ॥
सर्वांभूतीं मन आत्मनिवेदन । ऐसें हें भजन नवविधा ॥ ६८ ॥
नवविधा भक्ति हा देह चालतां । करावी सर्वथा सर्वभावें ॥ ६९ ॥
सर्वभावें सदा सगुणीं भजावें । कोरडें त्यागावें शब्दज्ञान ॥ ७० ॥
शब्दज्ञान भक्ति संसारीं आसक्ती । त्या नांव विभक्ती सत्य जाण ॥७१॥
सत्य जाण मनें आधार घेतला । सुखें सुखविला विषयांच्या ॥ ७२ ॥
विषयांचें सुख चोरूनि अंतरीं । त्याग दुराचारी उच्छेदीतो ॥ ७३ ॥
उच्छेदित आहे भक्ति सगुणाची । वाट साधनाची मोडतसे ॥ ७४ ॥
मोडतो आचार कर्मकुळाचार । करी भ्रष्टाकार पापरूपी ॥ ७५ ॥
पापरूपी नर जाणावा साचार । करी येकंकार शब्दज्ञानें ॥ ७६ ॥
शब्दज्ञानगाथा अहंतेच्या[1] माथा । तेणें तो सर्वथा आवरेना ॥ ७७ ॥
आवरेना तोंडीं धरितां पाषांडी । वेदाज्ञाहि मोडी अंगबळें ॥ ७८ ॥
तोंडबळें बापा क्रिया न संडावी । आसक्ति दंडावी वीतरागें ॥ ७९ ॥
वीतरागें मन मोकळें करावें । सुख न धरावें संसाराचें ॥ ८० ॥
संसारींचें सुख नाशवंत आहे । जाईजणें[2] पाहे विचारूनी ॥ ८१ ॥
विचारूनि पाहीं आसक्ती मनाची । दुर्दशा ज्ञानाची करूं नको ॥ ८२ ॥
करूं नये मुक्तक्रियेचा[3] निश्चयो । तेणें होतो क्षयो साधनाचा ॥ ८३ ॥
साधन सोडितां सिद्धपण गेलें । साधनेंसीं भलें सिद्धपण ॥ ८४ ॥
सिद्धपण अंगीं आदळों नेदावें । जाणपण द्यावें सोडूनियां ॥ ८५ ॥
सोडूनी जाणीव जाणोनि नेणता । सिद्धपणें स्वता साधक तो ॥ ८६ ॥
साधक तो आहे ब्रह्माविष्णुहर । साधनीं तत्पर सर्वकाळ ॥ ८७ ॥
सर्वकाळ त्याग करूनि उदास । योगीये तापस दिगंबर ॥ ८८ ॥
दिगंबर हर साधनीं तत्पर । त्याहूनि हे थोर जीव काय ? ॥ ८९ ॥
काय ते चुकले उदासीन जाले । त्याहूनि हे भले शब्दज्ञानी ? ॥ ९० ॥
शब्दज्ञानी भला तोचि तो जाणावा । स्वयें पालटावा जालेपणें ॥ ९१ ॥

---

१ अभिमान. २ जाणारें, नाशवंत. ३ मुक्त आहें अशा मिथ्याभिमानानें केलेलें स्वैर वर्तन.

जालेपणें भावें भजावें सगुणा । भक्ति उपासना जपध्यान ॥ ९२ ॥
जपध्यान मन भोगीं उदासीन । स्वधर्मरक्षण यथाशक्ति ॥ ९३ ॥
शक्तीहूनी[1] वाड ज्ञान बोलों नये । सांडूं नये सोय सगुणाची ॥ ९४ ॥
सगुणाची सोय सांडूं नये कदा । तीर्थक्षेत्रें सदा आवडावीं ॥ ९५ ॥
आवडावें सदा स्वयें निरूपण । श्रवणमनन निजध्यास ॥ ९६ ॥
निजध्यासें होय अंतरीचा त्याग । बाह्य वीतराग उदासीन ॥ ९७ ॥
उदासीन वृत्ति कोठें गुंडाळेना । उपाधी जडेना बाह्याकारीं ॥ ९८ ॥
बाह्यअभ्यंतरीं त्याग निरंतरीं । वैराग्य यापरी आचरावें ॥ ९९ ॥
आचरावें कर्म ज्याचा जो स्वधर्म । आणि नित्यनेम साधनाचा ॥१००॥
साधनाची वाट वोस पाडूं नये । बोलावी हे सोय[2] निरूपणीं ॥ १०१ ॥
निरूपणीं सत्य तेंचि प्रतिष्ठावें । मग आचरावें यथाशक्ति ॥ १०२ ॥
शक्तिसार स्वयें जैसा आचरतो । तेंचि प्रतिष्ठीतो मूढ जन ॥ १०३ ॥
मूढ जन तरे साधनीं लागतां । पाविजे अनंता भक्तिपंथें ॥ १०४ ॥
भक्तिपंथें जातां होय सायुज्यता । निश्चयो तत्वता दास म्हणे ॥ १०५ ॥

---

## ५ नवविधाभक्ति शतक.

पृथ्वी आप तेज वायु तें आकाश । ऐसें सर्व दृश्य नासिवंत ॥ १ ॥
नासिवंत सृष्टि पाहे ज्ञानदृष्टी । सांगतों मी गोष्टी शास्त्रमतें ॥ २ ॥
शास्त्रमतीं सृष्टि प्रळय बोलिला । विचारें पाहिला संतजनीं ॥ ३ ॥
संतजन नित्यानित्य विचारूनी । सत्य वोळखोनि सुखी जाले ॥ ४ ॥
सुखी जाले संत शोधितां अनंत । कल्पनेचा प्रांत परब्रह्म ॥ ५ ॥
परब्रह्म संतसंगें वोळखावें । बोधें विवरावें स्वस्वरूपीं ॥ ६ ॥
स्वस्वरूपीं पंचभूतें नासिवंत । देव तो शाश्वत सत्य जाण ॥ ७ ॥
सत्य मिथ्या ऐसा करावा विचार । सत्याचा निर्धार निःसंदेह ॥ ८ ॥
निःसंदेह भक्ति केल्या होय मुक्ति । दास म्हणे युक्ति सावधान ॥ ९ ॥
सावधान आतां हे वृत्ति करावी । भक्ति वोळखावी नवविधा ॥ १० ॥
नवविधा[3] भक्ति सांगईन आतां । श्रवणीं दुश्चिता राहों नको ॥ ११ ॥
राहों नको कदा श्रवणावांचूनी । सर्वकाळ मनीं विचारणा ॥ १२ ॥
विचारणा करीं श्रवणमनन । ध्यासें समाधान पाविजेतें ॥ १३ ॥

---

१ मोठें. २ मार्ग. ३ दासबोधाचा नवविधाभक्तीचा संपूर्ण चवथा दशक या शतकांत संक्षेपानें आला आहे. चतुर्विधामुक्ति व विवेकप्रळय हे आत्मनिवेदनभक्ति स्पष्ट समजण्यासाठींच येथें सांगितले आहेत.

पाविजेतें सर्व केलिया श्रवण । भक्तीचें लक्षण हेंचि बापा ॥ १४ ॥
हेचि बापा भक्ति प्रथम जाणावी । दुजी वोळखावी हरीकथा ॥ १५ ॥
हरीकथा भक्ति थोर कलायुगीं । कीर्तनाचे रंगीं देव आहे ॥ १६ ॥
देव आहे सदा तिष्ठत कीर्तनीं । भक्ति श्रेष्ठ जनीं हरिकथा ॥ १७ ॥
हरीकथा भक्ति श्रवण कीर्तन । येणें बहुजन उद्धरती ॥ १८ ॥
उद्धरले श्रोते वक्ते नेणों किती । दृढ धरा चित्तीं हरिकथा ॥ १९ ॥
कथानिरूपण श्रवण करावें । येणें उद्धरावें सर्वसारीं ॥ २० ॥
संसारीं सुटिजे केल्यानें श्रवण । कदा विस्मरण पडों नये ॥ २१ ॥
पडों नये भ्रांति नामस्मरणाची । त्रितीय भक्तीची वोळखण ॥ २२ ॥
वोळखण होय नाम उच्चारितां । उद्धार बहुतां रामनामें ॥ २३ ॥
रामनामें गती प्राणियांसी अंतीं । सांगे उमापती महादेव ॥ २४ ॥
महादेव स्वयें निवाला अंतरीं । म्हणोनियां धरी रामनाम ॥ २५ ॥
रामनामें मुक्त क्षेत्र वाराणसी । शिव उपदेसी रामनाम ॥ २६ ॥
रामनाम वाणी त्या नाहीं जाचणी । नामें बहु प्राणी उद्धरले ॥ २७ ॥
उद्धरले संत सज्जन शोधितां । हेंचि जाण आतां चौथी भक्ति ॥ २८ ॥
भक्ति सज्जनाची हे वाट मुक्तीची । येथें संदेहाची उरी नाहीं ॥ २९ ॥
उरी नाहीं दोषा सज्जन सेवितां । मुक्ति सायुज्यता पाठीं लागे ॥ ३० ॥
पाठीं लागे मुक्ति संतांचे संगतीं । उद्धरले किती सांगों आतां ॥ ३१ ॥
सांगों आतां भक्ति पांचवी अर्चन । तें पूजाविधान विधियुक्त ॥ ३२ ॥
विधियुक्त पूजा देवांब्राह्मणाची । संतसज्जनांची सर्वकाळ ॥ ३३ ॥
सर्वकाळ गोडी अर्चनीं आवडी । येणें होय जोडी ईश्वराची ॥ ३४ ॥
ईश्वराची जोडी अर्चनें होतसे । बहु जन ऐसे उद्धरले ॥ ३५ ॥
उद्धरले देवांब्राह्मणा वंदितां । साहवी ते आतां भक्ति जाण ॥ ३६ ॥
भक्ति जाण सार सर्वां नमस्कार । घाली अधिकार पाहोनियां ॥ ३७ ॥
पाहोनियां सर्व आचरतां सुख । मूर्खपणें दुःख होत आहे ॥ ३८ ॥
आहे आतां भक्ति सातवी ते कैसी । सेवा सर्वस्वेसीं दास्य जाण ॥ ३९ ॥
दास्य करूनियां देवासी पावले । ऐसे उद्धरले नेणों किती ॥ ४० ॥
नेणों किती जन या रिती तरले । दास्यें उतरले भवसिंधु ॥ ४१ ॥
भवसिंधु नाहीं हरीच्या दासांसी । दासा हृषीकेशी उपेक्षीना ॥ ४२ ॥
उपेक्षीना देव हें सत्यवचन । अष्टमी ते जाण सख्य भक्ति ॥ ४३ ॥
सख्यत्व देवाचें भाग्येंवीण कैचें । सांगावें जीवीचें देवापासीं ॥ ४४ ॥
देवापासीं सुखदुःख तें सांगावें । कैवारी करावें ईश्वरासी ॥ ४५ ॥
ईश्वरीं टाकितां संसारीचा भार । मग हा संसार सुखरूप ॥ ४६ ॥

सुखरूप भक्ति आठवी बोलिली । ऐसी गती जाली बहुतांसीं ॥ ४७ ॥
बहुतांची भक्ति पावे नारायेण । नववें लक्षण सांगईन ॥ ४८ ॥
सांगईन भक्ति सर्वांमधें सार । पावती साचार मुक्ति जेणें ॥ ४९ ॥
मुक्ति जेणें होय ते भक्ति नवमी । जेथें नाना उर्मी मावळती ॥ ५० ॥
मावळे अज्ञान होय शुद्ध ज्ञान । आत्मनिवेदन भक्ति सार ॥ ५१ ॥
भक्ति सार आहे जेथें द्वैत राहे । संतसंगें लाहे निजभक्ति ॥ ५२ ॥
निजभक्ति जेथें विभक्ति नाढळे । ऐक्यरूपें कळे ज्ञान होतां ॥ ५३ ॥
ज्ञान होतां तुटे संसार बंधन । नाहीं समाधान ज्ञानेंवीण ॥ ५४ ॥
ज्ञानेवीण शीण सर्वथा नाथिला । नाहीं वोळखिला साच देव ॥ ५५ ॥
साच देव कळे संतांचे संगती । चुके अधोगती गर्भवास ॥ ५६ ॥
गर्भवास चुके यातना यमाची । जरी शाश्वताची सोय लागे ॥ ५७ ॥
सोय लागे मनीं तोचि धन्य जनीं । आत्मनिवेदनीं तदाकार ॥ ५८ ॥
तदाकार होणें आत्मनिवेदनें । मग येणें जाणें निरसलें ॥ ५९ ॥
निरसलें दृश्य विवेकें पाहतां । स्वरूपीं राहतां स्वरूपचि ॥ ६० ॥
स्वरूपाची असे येर सर्व नासे । ऐसें हें विश्वासे गुरुमुखें ॥ ६१ ॥
गुरुवाक्यें ज्ञान होय समाधान । आत्मनिवेदन याचें नांव ॥ ६२ ॥
नांवरूप धरी ते मायासुंदरी । तये अभ्यंतरीं स्वस्वरूप ॥ ६३ ॥
स्वरूपाची प्राप्ती संताचे संगतीं । बोलिली हे भक्ति नवविधा ॥ ६४ ॥
नवविधा भक्ति केल्या होय मुक्ति । चळेना कल्पांतीं सायुज्यता ॥६५॥
सायुज्यता मुक्ती चिरंजीव आहे । येरी सर्व पाहे नासिवंत ॥ ६६ ॥
नासिवंत मुक्ति जाण चतुर्विधा । तया अनुवादा चित्त देईं ॥ ६७ ॥
चित्त देईं येकी मुक्ति सलोकता । दुजी समीपता सत्य जाण ॥ ६८ ॥
सत्य जाण मुक्ति तिजी स्वरूपता । चौथी सायुज्यता मुक्ती जाण ॥६९॥
मुक्ती जाण बापा सर्व नासिवंत । मांडतां कल्पांत भस्म होती ॥ ७० ॥
भस्म होती मुक्ती सर्व कोणेपरी । तेही अवधारीं सांगईन ॥ ७१ ॥
सांगईन बापा तेथें चित्त द्यावें । मग तूं स्वभावें बुझसील ॥ ७२ ॥
बुझसिल आतां मुक्ति सलोकता । वैकुंठीं तत्वता ठाव होय ॥ ७३ ॥
ठाव हा स्वलोकीं तेचि मुक्ति येकी । दुजी समीप कीं समीपता ॥ ७४ ॥
समीपता मुक्ति समीप असावें । स्वरूपता व्हावें स्वरूपचि ॥ ७५ ॥
स्वरूप सगुण होइजे आपण । श्रीवत्सलांछन तेथें नाहीं ॥ ७६ ॥
नाहीं मुख्य रमा तेचि स्वरूपता । आतां सायुज्यता सांगईन ॥ ७७ ॥
सायुज्यता मुक्ति ज्ञानाचेनि द्वारें । आपण निर्धारें स्वस्वरूप ॥ ७८ ॥
स्वस्वरूपीं नाहीं पूर्वींचें बंधन । तेथें मुक्ति कोण कासयासी ॥ ७९ ॥

कासयासी मुक्ति बंधनावांचूनि । मुक्तिदाता जनीं आपणची ॥ ८० ॥
आपणाचि स्वयें अचळ अढळ । निर्मळ निश्चळ आपणची ॥ ८१ ॥
आपणचि होणें मुक्ति द्यावी कोणें । मुक्ति येणें गुणें नासिवंत ॥ ८२ ॥
नासिवंत मुक्ति सज्जन जाणती । स्वरूपाची स्थिती अनिर्वाच्य ॥ ८३
अनिर्वाच्य ब्रह्मीं मुक्ति नासिवंता । प्रळयाहि आतां सांगईन ॥ ८४ ॥
सांगईन आतां सृष्टीचा संव्हार । तेणें तूं निर्धार पावसील ॥ ८५ ॥
पावसील खूण निखळ निर्गुण । तेंचि निरूपण प्रळयाचें ॥ ८६ ॥
प्रळयाचे काळीं शत संवत्सर । अनावृष्टी थोर वोढवेल ॥ ८७ ॥
वोढवे प्रळय सूर्य बारा कळी । तेणें होय होळी वसुंधरा ॥ ८८ ॥
वसुंधरा बुडे प्रळयउदकीं । जालें येकायेकी जळमय ॥ ८९ ॥
जळमय जालें तें तेजें सोरखिलें । तेज झडपीलें समीरानें ॥ ९० ॥
समीर आकाशीं सर्व वितुळला । त्याचा नाश केला तमोगुणें ॥ ९१ ।
तमोगुणा रज ग्रासुनियां जाय । रजोगुणा खाय सत्वगुणा ॥ ९२ ॥
सत्वगुणा माया माये मूळमाया । गुणसाम्य तिया निर्दाळील ॥ ९३ ॥
निर्दाळील गुणसाम्य तें निर्गुणीं । ऐसी संहारणी विवेकाची ॥ ९४ ॥
विवेकें पाहातां सर्व सृष्टी नासे । तेथें लोक कैसे वांचतील ॥ ९५ ॥
वांचती ना लोक ते महाप्रळयीं[1] । तेथें मुक्ती कायी साच होती ॥ ९६
साच होती मुक्ती हें कई घडावें । सर्व विघडावें प्रळयानें ॥ ९७ ॥
प्रळयाचे अंतीं देवचि नासती । तेथें कैच्या मुक्ती राहतील ॥ ९८ ॥
राहतील ज्ञानी आत्मनिवेदनीं । पूर्णसमाधानी स्वस्वरूपीं ॥ ९९ ॥
स्वस्वरूपीं ऐक्यरूप चिरंजीवी । जाणे अनुभवी अनुभवें ॥ १०० ॥
अनुभवी ज्ञानी तेंचि समाधानी । आत्मनिवेदनी रामदास ॥ १०१ ॥

---

## ६ निरंजनदेवशतक.

देवासी सांडूनि देऊळ पूजिती । लौकिकाची रीती काये सांगों ! ॥ १
काय सांगों आतां देखतदेखतां । देव पाहों जातां जेथें तेथें ॥ २ ॥
जेथें तेथें देव लोक वोळखेना । विचार पाहीना कांहीं केल्या ॥ ३ ॥
कांहीं केल्यां तरी देव सांपडेना । संसारें घडेना समाधान ॥ ४ ॥
समाधान नाहीं देवावांचूनियां । सर्व कर्म वाया निरर्थक ॥ ५ ॥
निरर्थक तीर्थें व्रतें तपें दानें । एका ब्रह्मज्ञानेंवांचूनीयां ॥ ६ ॥
वांचूनीयां ज्ञान तें पशुसमान[1] । अज्ञानें पतन पाविजेतें ॥ ७ ॥

---

१ ‘ ज्ञानेन हीनाः पशुभिः समानाः ’.

पाविजेतें दुःख विचार नसतां । कर्म करूं जातां कासाविस ॥ ८ ॥
कासाविस कर्में होइजे भ्रमिष्ट । देव सर्व श्रेष्ठ अंतरला ॥ ९ ॥
अंतरला देव सर्वांचें कारण । सर्व निःकारण सहजचि ॥ १० ॥
सहजचि जालें कर्मभोगें केलें । वाताहात जालें सर्व कांहीं ॥ ११ ॥
सर्वकांहीं नाहीं एका देवेंवीण । शाश्वताची खूण वेगळीच ॥ १२ ॥
वेगळीच खूण सज्जन जाणती । खुणेसी बाणती संतजन ॥ १३ ॥
संतजन बोधीं जाहले सज्जन । त्यांचा अनुमान दुरावला ॥ १४ ॥
दुरावला देव दुरी सांडूं नये । धरावा उपाय साधुसंग ॥ १५ ॥
साधुसंगें साधा सद्वस्तु विवेकें । तुम्हासी लौकिकें काय काज ॥ १६ ॥
काय काज आहे परलोकां जातां । लौकीक तत्वता इह लोकीं ॥ १७ ॥
इह लोकीं करा लोकसंपादणी । त्रैलोक्याचा धणी वोळखावा ॥ १८ ॥
वोळखावा देव नित्यनिरंजन । तया जन वन सारिखेंचि ॥ १९ ॥
सारिखेंचि ब्रह्म आहे सर्वां ठाईं । संतां शरण जाईं आलया रे ॥ २० ॥
आलया रे तुज देवचि कळेना । जेणें केले नाना सृष्टिभाव ॥ २१ ॥
सृष्टिभाव कोणें केले हें पाहावें । पाहोनि राहावें समाधानें ॥ २२ ॥
समाधान केलें संसार करितां । देवासी नेणतां जन्म गेला ॥ २३ ॥
जन्म गेला सर्व केला खटाटोप । उदंड आटोप आटोपिला ॥ २४ ॥
आटोपिला परीं देव अंतरला । अभाग्या काशाला जन्मलासी ॥ २५ ॥
जन्मलासी वाया जननी कष्टली । नाहीं उद्धरीली कुळवल्ली ॥ २६ ॥
कुळाचें मंडण ब्रह्मज्ञानी जन । जया सनातन प्रगटला ॥ २७ ॥
प्रगटला देव जयाचे अंतरीं । धन्य सृष्टीवरी तोचि येक ॥ २८ ॥
तोचि येक धन्य ब्रह्मादिकां मान्य । निर्गुणीं अनन्य सर्वकाळ ॥ २९ ॥
सर्वकाळ गेला कथानिरूपणें । अध्यात्मश्रवणें निजध्यासें ॥ ३० ॥
निजध्यास जया लागला स्वरूपीं । जाले ब्रह्मरूपीं ब्रह्मरूप ॥ ३१ ॥
ब्रह्मरूप तेथें ब्रह्मचि नाडळे । विवेकानें गळे अहंभाव ॥ ३२ ॥
अहंभाव गळे ब्रह्म-अनुसंधानें । आत्मनिवेदनें अनन्यता ॥ ३३ ॥
अनन्यता जोडे ऐसे ज्ञाते थोडे । ज्यांचेनि निवडे सारासार ॥ ३४ ॥
सारासार पाहे तो साधु पुरता । जाणे अनन्यता भक्ती करूं ॥ ३५ ॥
भक्ति करूनियां मुक्ति पाविजेते । विवेकें आइतें ब्रह्मरूप ॥ ३६ ॥
ब्रह्मरूप जाले लौकिकीं वर्तले । साधु वोळखिले साधुजनीं ॥ ३७ ॥
साधुजनीं साधु ऐसा जाणिजेतो । इतराजनां तो चोजवेना ॥ ३८ ॥
चोजवेना लीळा कैसी अंतर्कळा । असोनि निराळा जनांमधें ॥ ३९ ॥
जनांमधें आहे जनांसी कळेना । जैसा आकळेना निरंजन ॥ ४० ॥

निरंजन जनीं कळेना असोनी । तैसा साधु जनीं निरंजन ॥ ४१ ॥
निरंजन नाहीं आणिला प्रचीती । तया जना गती कोण म्हणे ॥ ४२ ॥
कोण म्हणे धन्य ते प्राणी जघन्य[1] । जयासी अनन्यभक्ती नाहीं ॥ ४३ ॥
भक्ती नाहीं मनीं त्या नांव अभक्त । संसारीं आसक्त जन्मवरी ॥ ४४ ॥
जन्मवरी लोभें सर्व स्वार्थ केला । अंतीं प्राणी गेला येकलाची ॥ ४५ ॥
येकलाचि गेला दुःख भोगूनीयां । कन्यापुत्रजाया सांडूनीयां ॥ ४६ ॥
सांडूनी स्वजन गेला जन्मोजन्मीं । अज्ञानाची उर्मी निरसेना ॥ ४७ ॥
निरसेना उर्मी अंतर्देहधर्मी । प्राणी परब्रह्मीं अंतरला ॥ ४८ ॥
अंतरला दूरी असोनि अंतरीं । तया कोण करी सावधान ॥ ४९ ॥
सावधान व्हावें आपलें आपण । सृष्टीचें कारण वोळखावें ॥ ५० ॥
वोळखावें ब्रह्म तेणें तुटे भ्रम । आणी मुख्य वर्म अज्ञानाचें ॥ ५१ ॥
अज्ञानाचें वर्म अंतरीं निरसे । जरी मनीं वसे विचारणा ॥ ५२ ॥
विचारें पाहातां सर्वत्रांचें मूळ । तेणें तें निर्मूळ ब्रह्म भासे ॥ ५३ ॥
ब्रह्म भासे ऐसें कदा ह्मणों नये । परंतु उपाय श्रवणाचा ॥ ५४ ॥
श्रवणाचा अर्थ यथातथ्य काढी । ऐसा कोण गडी सावधान ॥ ५५ ॥
सावधान मन करूनी मनन । मनाचें उन्मन होत आहे ॥ ५६ ॥
होत आहे परी केलेंचि पाहिजे । विचारें लाहिजे मोक्षपद ॥ ५७ ॥
मोक्षपद कैसें कोणासी म्हणावें । विवेकें जाणावें हेंचि येक ॥ ५८ ॥
हेंचि येक बरें पाहातां सुटका । संसार लटिका बंधनाचा ॥ ५९ ॥
बंधनाचा भाव ज्ञानें केला वाव । मोक्षाचा उपाव विचारणा ॥ ६० ॥
विचारणा करी धन्य तो संसारीं । संदेह अंतरीं आडळेना ॥ ६१ ॥
आडळेना देहो कायसा संदेहो । नित्य निःसंदेहो संतजन ॥ ६२ ॥
संतजन जेथें धन्य जन तेथें । सार्थकचि होतें अकस्मात ॥ ६३ ॥
अकस्मात देव सांपडे उदंड । दृश्याचें थोतांड नाशिवंत ॥ ६४ ॥
नाशिवंत काय विचारें पाहावें । तें सर्व राहावें सांडूनीयां ॥ ६५ ॥
सांडूनीयां दृश्य आणि मनोभास । मग जगदीश वोळखावा ॥ ६६ ॥
वोळखावें तया असावें अनन्य । तरी संतमान्य होइजेतें ॥ ६७ ॥
होइजतें कैसें ज्याचें त्यास कळे । जो कोण्ही निवळे मनामधें ॥ ६८ ॥
मनामधें मन जनांमधें जन । निर्गुणीं अनन्य निर्गुणचि ॥ ६९ ॥
निर्गुणचि नव्हे जो कोण्ही चांडाळ । त्यासी सर्वकाळ जन्ममृत्यु ॥ ७० ॥
जन्ममृत्ययमयातना दारुण । चुकवील कोण ज्ञानेंवीण ॥ ७१ ॥
ज्ञानेंवीण जिणें व्यर्थ दैन्यवाणें । वाचितो पुराणें पोटासाठीं ॥ ७२ ॥

१ अधम, लौकीक.

पोटासाठीं लोकां करी नमस्कार । होतसे किंकर किंकराचा ॥ ७३ ॥
किंकराचा दास भूषण मिरवी । सृष्टीचा गोसावी वोळखेना ॥ ७४ ॥
वोळखेना देव वोळखेना भक्त । वोळखेना संत महानुभाव ॥ ७५ ॥
महानुभाव देव कांहींच कळेना । मन ही वळेना पुण्यमार्गे ॥ ७६ ॥
पुण्यमार्ग कैसा पाप आहे कैसें । कळेना विश्वासेंवीण कांहीं ॥ ७७ ॥
कांहीं तरी येक पाहावा विचार । कैसा पैलपार पाविजेतो ॥ ७८ ॥
पाविजेतो पार होतसे उद्धार । सर्व ही ईश्वर सन्निधानें ॥ ७९ ॥
संन्निधान ज्याचें ईश्वरीं सर्वदा । संसार आपदा तया नाहीं ॥ ८० ॥
तया नाहीं जन्ममरणाची बाधा । मिळाले संवादा संतांचिया ॥ ८१ ॥
संतांचिया गुणा जे गुणग्राहक । तया नाहीं नरक येरां बाधी ॥ ८२ ॥
बाधीतसे येरा सर्वहि संसार । ज्ञानी पैलपार उतरले ॥ ८३ ॥
उतरले पार सर्व मायिकाचा । धन्य विवेकाचा उपकार ॥ ८४ ॥
उपकार जाला थोर या शब्दांचा । मार्ग निर्गुणाचा सांपडला ॥ ८५ ॥
सांपडला मार्ग धन्य सांख्ययोग । फळासी विहंग पावे जैसा ॥ ८६ ॥
पावे जैसा पक्षी फळी अकस्मात । तैसा अकल्पित ज्ञानमार्ग ॥ ८७ ॥
ज्ञानमार्ग सर्व मार्गामधें श्रेष्ठ । बोलिले वरिष्ठ ठाईं ठाईं ॥ ८८ ॥
ठाईं ठाईं मांडूनि बैसती । तेणें कांहीं मुक्ती पाविजेना ॥ ८९ ॥
पाविजेना मुक्ती भक्तिवांचुनीयां । भक्तीवीण वायां गेले लोक ॥ ९० ॥
लोक गेले वायां भक्ती न करितां । देवासी नेणतां जाणपणें ॥ ९१ ॥
जाणपणें मूर्खें आणिलें जायाचें[1] । जैसें भांडें कांचें मृत्तिकेचें ॥ ९२ ॥
मृत्तिकेचें भांडें वळेना वांकेना । सेवटीं तगेना[2] कांहीं केल्या ॥ ९३ ॥
कांहीं केल्यां लोक करीना सार्थक । होय निरर्थक सर्व कांहीं ॥ ९४ ॥
सर्व कांहीं जातें प्रचीतीस येतें । भ्रमलें मागुतें मायाजाळीं ॥ ९५ ॥
मायाजाळ तुटे जरी देव भेटे । परिसेंसीं झगटे लोहो जैसा ॥ ९६ ॥
लोहो जैसा रूपें पालटे सर्वांगीं । तैसा जाण योगी योगीसंगें ॥ ९७ ॥
योग्याचे संगती सर्वकाळ योग । कैचा मा वियोग परब्रह्मीं ॥ ९८ ॥
परब्रह्मी लोक प्रत्यक्ष वागती । परी त्याची गती चोजवेना ॥ ९९ ॥
चोजवेना गती गुरुमुखेंवीण । रामदास खूण सांगतसे ॥ १०० ॥

---

१ नाशिवंत. २ टिकेना.

## ७ कर्तृशोधनशतक.

अहो जना तुह्मी भजा निरंजना । चुकती यातना संसारीच्या ॥ १ ॥
संसारीची माया सर्व वोरंगेलें[1] । देहे हा खंगेल अंतकाळीं ॥ २ ॥
अंतकाळीं करी कोण सोडवण । सोइरे पिशुन[2] दुरावले ॥ ३ ॥
दुरावले सर्व आपुले पारिखे । तेथें कोण राखे जिवलग ॥ ४ ॥
जिवलगें जाती फिरोनिया घरां[3] । मग तुज दारा पुत्र कैचे ॥ ५ ॥
कैचे पुत्र जन आपुले पारिखे । सर्वाहि सारिखे कळों आले ॥ ६ ॥
कळों आले परि आयुष्य वेचलें । चुकोनियां गेलें सर्व कांहीं ॥ ७ ॥
सर्व कांहीं होतें संचिलें वैभव । रात्रंदिस जीव लाउनीयां ॥ ८ ॥
लाउनीयां जीव जीवें मेळविलें । तें घरीं राहिलें कांहीं ॥ ९ ॥
सर्व कांहीं नये तुज समागमें । ह्मणोनियां भ्रमें भुलों नको ॥ १० ॥
भुलों नको भ्रमें संसारीं आलया । कैसी आहे माया वोळखावी ॥ ११ ॥
वोळखावी माया आणी परब्रह्म । तेणें तुझा भ्रम नासईल ॥ १२ ॥
नासईल भ्रम श्रवण करितां । विचारें पाहतां सारासार ॥ १३ ॥
सारासार जंव नाहीं विचारणा । तंव तूं कारणा चुकलासी ॥ १४ ॥
चुकलासी देव देखतदेखतां । मुक्ती सायुज्यता अंतरली ॥ १५ ॥
अंतरली मुक्ती जाली अधोगती । निरंजन चित्तीं न धरितां ॥ १६ ॥
न धरितां दृढ सोय शाश्वताची । शीण वाउगाचि नाना कर्मीं ॥ १७ ॥
नानाकर्मीं तुज काय प्राप्त जालें । उगवे पेरिलें निश्चयेंसीं ॥ १८ ॥
निश्चयेंसीं देव धुंडितां पाविजे । येर सर्व कीजे निरर्थक ॥ १९ ॥
निरर्थक देव नेणतां सर्वही । येथें कांहीं[4] नाहीं अनुमान ॥ २० ॥
अनुमानें केलें तें तें व्यर्थ गेलें । प्रचीतीनें[5] जालें समाधान ॥ २१ ॥
समाधान घडे सज्जनसंगतीं । चुके अधोगती गर्भवास ॥ २२ ॥
गर्भवास चुके सद्गुरु करितां । विवेकें धरितां नित्यानित्य ॥ २३ ॥
नित्यानित्य जंव नाहीं विचारीलें । तंव काय केलें आलया रे ॥ २४ ॥
आलया रे पुन्हां कासया सिणावें । विवेकें पाहावें मोक्षपद ॥ २५ ॥
मोक्षपद कैसें हेंचि विचारावें । श्रवण करावें निरंतर ॥ २६ ॥
निरंतर जेथें श्रवणमनन । निजध्यासें जाण साक्षात्कार ॥ २७ ॥
साक्षात्कार जंव सिद्ध पाविजेना । तरी हे यातना चुके केवीं ॥ २८ ॥
केवीं चुके जन्ममृत्यु अनुमानें । केलें संदेहानें कासावीस ॥ २९ ॥

---

१ बेरंग होईल, जाईल. २ दुर्जन. ३ स्मशानीं पोंचवून घरीं परत जातात. ४ कांहीएक. ५ अनुभवानें.

कासावीस होतें समाधान जातें । तें जोडे मागुतें विवरतां ॥ ३० ॥
विवरतां ब्रह्म जीव माया भ्रम । देवभक्त वर्म वोळखावें ॥ ३१ ॥
वोळखावें वर्म हें मीतूंपणाचें । नित्य निर्गुणाचें निरूपण ॥ ३२ ॥
निरूपणेंवीण जें कांहीं साधन । तेंचि तें बंधन निश्चयेंसीं ॥ ३३ ॥
निश्चयेंसी बरा करावा निवाडा । तत्वें तत्वझाडा सप्रचीत ॥ ३४ ॥
सप्रचीत झाडा होतां मायिकांचा । मग कोण कैचा आपण तो ॥ ३५ ॥
आपण तो जाला विवेकानें केला । भ्रमचि उडाला सर्व कांहीं ॥ ३६ ॥
सर्व कांहीं कळे विवेकें निवळे । आपेंआप गळे मीतूंपण ॥ ३७ ॥
मीतूंपण कैचें कोठें आपणासी । होतें येके दिसीं हारपलें ॥ ३८ ॥
हारपलें जैसें आकाशीं आभाळ । तैसें तें केवळ सर्वकांहीं ॥ ३९ ॥
सर्वकांहीं मिथ्या प्रचीतीस येतें । निर्गुणानें होतें समाधान ॥ ४० ॥
समाधान जालें मीपण बुडालें । प्रबोधें उडालें सर्व कांहीं ॥ ४१ ॥
सर्वकांहीं नाहीं विवेकें पाहातां । बाणलें तें आतां पालटेना ॥ ४२ ॥
पालटेना ब्रह्मस्थिती हे आपुली । जरी कांहीं केली उठाठेवी ॥ ४३ ॥
उठाठेवी गेली शरीराच्या माथां । आपण तत्वता वस्तुरूप ॥ ४४ ॥
वस्तुरूप तो मी सज्जन सांगती । तीन्हि[1] ही प्रचिती आणूनियां ॥ ४५ ॥
आणूनियां केला वस्तुचा निश्चय । आतां हा संशय कोण धरी ॥ ४६ ॥
कोण धरी मिथ्या साच सांडूनियां । वोझें कां रे वांयां मीपणाचें ॥ ४७ ॥
मीपणाचें मूळ शोधितां सुटलें । विवेकें तुटलें मायाजाळ ॥ ४८ ॥
मायाजाळ जालें पांचाजणीं[2] केलें । तें मज लाविलें कोणेपरी ॥ ४९ ॥
कोणेपरी कैसें येतें अनुमाना । साधकु दिसेना साध्य जाला ॥ ५० ॥
साध्य जाला बोधें जाहला साधक । तयासी बाधक कोण करी ॥ ५१ ॥
कोण करी सर्व तें तरी पाहावें । पाहोनि राहावें समाधानें ॥ ५२ ॥
समाधानकर्ता कोण सर्वधर्ता । कर्तृत्वाची वार्ता कोठें लागे ॥ ५३ ॥
कोठें लागे वार्ता कर्ता जगदीश । तया केवि दोष लागों शके ॥ ५४ ॥
लागों शके दोष हें कई घडावें । सर्व केलें देवें हें तों खरें ॥ ५५ ॥
खरें आलें केलें देवाचिया माथां । मज काय आतां संबंधु हा ॥ ५६ ॥
संबंधु हा जाला या पांचा भूतांचा । अष्टधा मायेचा खेळ जाला ॥ ५७ ॥
खेळ ऐसा जाला प्रकृतीनें केला । लावितां मजला कोणेपरी ॥ ५८ ॥
कोण परी न्याय अन्याय सारिखा । ह्मणोनियां देखा गुप्त जालों ॥ ५९ ॥
गुप्त जालों आतां पाहतां दिसेना । नये अनुमाना ब्रह्मादिकां ॥ ६० ॥
ब्रह्मादिकां माझा पडिला संदेहो । तुह्मीं कां वेडीं हो वोळखाना ॥ ६१ ॥

१ गुरु–शास्त्र–आत्मप्रचीती. २ पंचभूतांनीं.

वोळखाना कर्ता कोणाला लाविता । शाहाणें दिसता ऐसे कैसे ॥ ६२ ॥
ऐसे कैसे तुह्मी येकाचें येकासी । लावितां कोणासी कर्तेपण ॥ ६३ ॥
कर्तेपण बरें शोधूनी पहारे । मग तुह्मी व्हारे कासावीस ॥ ६४ ॥
कासावीस जाले किती येक गेले । कर्तृत्व बोलिलें निर्गुणासी ॥ ६५ ॥
निर्गुणासी गुण हें कई घडावें । संदेहीं पडावें मीपणाचे ॥ ६६ ॥
तयावीण शीण कासया करिता । संदेह धरिता निर्गुणाचा ॥ ६७ ॥
निर्गुणाचा अंत पाहतां अनंत । तेथें अंतवंत लाऊं नका ॥ ६८ ॥
नका नका तुह्मी बोलों अनुमानें । तत्वें थान[1]मानें बरीं शोधा ॥ ६९ ॥
बरें शोधूं जातां देव माया जीव । या तिघां कर्तृत्व आडळेना ॥ ७० ॥
आडळेना भूतीं कर्तृत्व पाहातां । कोणीकडे आतां धुंडाळावें ॥ ७१ ॥
धुंडाळावें परी काठेंचि लागेना । कासावीस मना होत आहे ॥ ७२ ॥
होत असे परी तें पिंडीं पाहावें । देहें प्राणें जीवें किंवा ब्रह्में ॥ ७३ ॥
ब्रह्म निर्विकार त्या नाहीं आकार । जीव तो साचार अंश त्याचा ॥७४॥
त्याचा अंश देहेसमंध कल्पिलें । ब्रह्मांशानें केलें हें घडेना ॥ ७५ ॥
घडेना कीं प्राण कर्ता अप्रमाण । श्वासोच्छ्वास जाण करणें त्याचें ॥७६॥
त्याचें करणें नव्हे स्थूल अचेतन । अंतःकरण मन जाणतेंचि ॥ ७७ ॥
जाणतेंचि परी तें कांहीं करीना । वायो तो जाणेना कांहीं केल्या ॥७८॥
कांहीं केल्यां कर्ता ठांईच न पडे । आतां कोणेकडे कर्तेपण ॥ ७९ ॥
कर्तेपण नाहीं येकाचे मस्तकीं । हें बरें विवेकीं वोळखावें ॥ ८० ॥
वोळखावें करणें आहे समस्तांचें । त्रिगुण भूतांचें विचारावें ॥ ८१ ॥
विचारावें जालें बहुतांचें केलें । तें मज लाविलें कोणेपरी ॥ ८२ ॥
कोणेपरी येकावीण येक घडे । कांहींच न घडे सर्वेविण ॥ ८३ ॥
सर्वत्रांचें केलें सर्वांस लागलें । तें तुह्मी लाविलें मज कैसें ॥ ८४ ॥
कैसें माझें रूप मज सांपडेना । कांहींच घडेना माझ्या ठांईं ॥ ८५ ॥
माझ्या ठांईं मज ठावाचि नाडळे । रूप हें नाकळे माझें मज ॥ ८६ ॥
माझें मज नाहीं पाहातां मीपण । तेथें कर्तेपण वाव[2] जालें ॥ ८७ ॥
वाव जालें बरें हिशेबीं पाहातां । विवेकें राहतां समाधान ॥ ८८ ॥
समाधान देहीं असोनि विदेही । कर्तृत्वाचा नाहीं अभिमान ॥ ८९ ॥
साभिमान कैचा मेळ हा भूतांचा भूतें त्रिगुणाचा सृष्टिभाव ॥ ९० ॥
सृष्टिभाव जाला भूतांचा उद्भव । देव निरावेव जैसा तैसा ॥ ९१ ॥
जैसा तैसा देव जाण अनुभवें । दृश्य हें स्वभावें होत जातें ॥ ९२ ॥
होत जात जीव सर्व भावाभाव । कळों आली माव मायिकाची ॥ ९३ ॥

---

१ स्थान मान नीट पाहून. २ व्यर्थ.

मायिकांची माव संतीं निरोपिली । प्रत्ययासी आली जेथें तेथें ॥ ९४ ॥
जेथें तेथें राम आत्मा पूर्ण काम । योगियांचें धाम निरंतर ॥ ९५ ॥
निरंतर देव अंतरेना कदा । तुटली आपदा मीपणाची ॥ ९६ ॥
मीपणाची बुंथी[1] बोधें उगवली । जन्माची जाहली सार्थकता ॥ ९७ ॥
सार्थकता जाली रामासी भजतां । दृढ धरूं आतां उपासना ॥ ९८ ॥
उपासना भक्त होऊनि करीन । ज्ञानें उद्धरीन अज्ञानासी ॥ ९९ ॥
अज्ञानासी ज्ञान रामाचें करणें । शीघ्र उद्धरणें रामदासीं ॥ १०० ॥

---

## ८ सगुणनिर्गुण संवाद शतक.

करीं चापबाण माहेश्वरीं[2] ठाण । रूप हें सगुण राघवाचें ॥ १ ॥
राघवाचें रूप निर्गुण जाणावें । सगुण स्वभावें नाशिवंत ॥ २ ॥
नाशिवंत देव कदा ह्मणों नये । निर्गुणासी काय पाहासील ॥ ३ ॥
पाहातां निर्गुण देवासी दुर्लभ । याचा होय लाभ पूर्वपुण्यें ॥ ४ ॥
पूर्वपुण्यें लाभ ब्रह्मादिकां जाला । कैवारी जोडला रामचंद्र ॥ ५ ॥
रामचंद्र रूप नाम हें मायिक । बोलिला विवेक वेदशास्त्रीं ॥ ६ ॥
वेदशास्त्रीं भक्ती राघवाची सार । तेणें पैलपार पाविजेतो ॥ ७ ॥
पाविजेतो पार आत्मानिवेदनें । भक्तीचीं लक्षणें नवविधा ॥ ८ ॥
नवविधा भक्ति करितां तरले । जीव उद्धरले नेणों किती ॥ ९ ॥
नेणोनिया देव मायिक भजतां । मुक्ति सायुज्यता अंतरली ॥ १० ॥
अंतरली भक्ति मुक्ति मागें धांवे । राघवाच्या नावें निरंतर ॥ ११ ॥
निरंतर देव अंतरों नेदावा । विवेक पाहावा सज्जनाचा ॥ १२ ॥
सज्जन संगती चुके अधोगती । राम सीतापतीचेनि नामें ॥ १३ ॥
नाम ज्याचें घ्यावें त्यासी वोळखावें । देवासी धुंडावें आदरेंसी ॥ १४ ॥
आदरेंसी जपे रामनाम वाणी । स्वयें शूळपाणी महादेव ॥ १५ ॥
महादेवें गुरुगीता निरोपिली । तेथें मन घाली आलया रे ॥ १६ ॥
आलया संसारी रामनाम तारी । दुजें पृथ्वीवरी आडळेना ॥ १७ ॥
आडळेना परी संतसंग धरीं । तेणें तूं अंतरीं निवसील ॥ १८ ॥
निवालें अंतर रामासी भजतां । दुजें कांहीं आतां आडळेना ॥ १९ ॥
आडळेना जया संतांची संगती । तया अधोगती गर्भवास ॥ २० ॥
गर्भवास माझे राम चुकवील । मज सोडवील अनाथासी ॥ २१ ॥

---

[1] घुंगट, पांघरूण. [2] महेश्वर, शंकर—त्याचें ठाण म्ह० स्थान अर्थात् शिवाच्या प्रेमाचें स्थान.

अनाथांचा नाथ पतीतपावन । तया संतजन दाखविती ॥ २२ ॥
दाखविती वाट संत निजधामी । माझें मन रामीं विश्वासलें ॥ २३ ॥
विश्वासलें परी रामासी नेणवे । तो राम जाणवे संतसंगें ॥ २४ ॥
संतसंगें करी निःसंग होईजे । मग तो जाणिजे राम केवी ॥ २५ ॥
रामासी मिळतां संतांचे मिळणी । मग दुजेपणी उरी नाहीं ॥ २६ ॥
उरी या रामाची जन्मोजन्मी असो । मन हें विश्वासो रामपायीं ॥ २७ ॥
रामपायीं मन होतसे उन्मन । तेथें भिन्नाभिन्न ऐक्यरूप ॥ २८ ॥
ऐक्यरूप ज्ञान तें मज नावडे । गाईन पवाडे राघवाचे ॥ २९ ॥
राघवासी गुण नाहीं तो निर्गुण । ठाई पडे खुण संतसंगें ॥ ३० ॥
संतसंगतीचा निर्गुण पवाड । मज वाटे गोड रामकथा ॥ ३१ ॥
कथानिरूपण श्रवण मनन । होय समाधान संतसंगें ॥ ३२ ॥
संतसंगें बोध होय निर्गुणाचा । मोडे सगुणाचा भक्तिभाव ॥ ३३ ॥
भक्तिभावें करी निर्गुण पावावें । मग काय व्हावें सांग बापा ॥ ३४ ॥
बापमाय राम विश्वाचा आधार । भक्तां निरंतर सांभाळीतो ॥ ३५ ॥
सांभाळीतो काय प्रारब्ध वेगळें । होणार न टळे ब्रह्मादिकां ॥ ३६ ॥
ब्रह्मादिकां मान्य तो नव्हे सामान्य । असावें अनन्य सगुणासीं ॥ ३७ ॥
सगुणासी उरी उरेना कल्पांतीं । म्हणोनि सांगती संतजन ॥ ३८ ॥
संतजन ज्ञानी पूर्ण समाधानी । तेही जपध्यानी सर्वकाळ ॥ ३९ ॥
सर्वकाळ ध्यान करिती सज्जन । परी तें निर्गुण ध्यान त्यांचें ॥ ४० ॥
ध्यानीं आकळेना मनासी कळेना । तयासी कल्पना केवी धरी ॥ ४१ ॥
धरिला विश्वास साधुचे वचनीं । अवस्था उन्मनी तेणें गुणें ॥ ४२ ॥
गुणेंचि निर्गुण कळे सर्व खूण । म्हणोनी सगुण देव धरीं ॥ ४३ ॥
धरावा सगुण निर्गुणाकारणें । तयावीण येणें चाड नाहीं ॥ ४४ ॥
चाड नाहीं ऐसें कासया म्हणावें । सगुणें पावावें निर्गुणासी ॥ ४५ ॥
निर्गुणासी पावे सगुणाकरितां । सगुण पाहातां तेथें नाहीं ॥ ४६ ॥
नाहीं कां म्हणसी सद्गुरु सगुण । आणि निरूपण बहुविधा ॥ ४७ ॥
बहुविध रूप नव्हे सद्गुरुचें । निर्गुण ठाईंचें जाण बापा ॥ ४८ ॥
जाण बापा आतां तूं तरी सगुण । जालासी शरण सद्गुरुसी ॥ ४९ ॥
सद्गुरुसी गेला जो कोण्ही शरण । तयासी सगुण कोण म्हणे ॥ ५० ॥
म्हणसील काय सगुणावांचुनी । सर्वही करणी सगुणाची ॥ ५१ ॥
सगुणाची नव्हे निर्गुणाची सत्ता । निर्गुणाकरितां सर्व जालें ॥ ५२ ॥
सर्व जालें जेव्हां निर्गुणाकरितां । तेव्हां सगुणता निर्गुणासी ॥ ५३ ॥
निर्गुण हें सर्व करूनि वेगळा । ऐसी आहे लीळा निर्गुणाची ॥ ५४ ॥

निर्गुणाची लीळा वांजेची कुमरी। बोलतां चतुरी मानिजेना ॥ ५५ ॥
मानिजेना तरी सृष्टीसी रचिलें। सर्व कोणे केलें तयाविण ॥ ५६ ॥
तयाविणें दुजें काय सत्य आहे। अनुभवें पाहे आलया रे ॥ ५७ ॥
आपुला विचार निर्गुणी सर्वदा। निर्गुणासी कदा विसंभेना ॥ ५८ ॥
विसंभणें घडे सत्संग नसतां। संग विचारितां सगुण कीं ॥ ५९ ॥
सगुणाचा संग ज्ञानियांसी नाहीं। ज्ञानिया विदेही पुरातन ॥ ६० ॥
पुरातन देहीं तरीच विदेही। देहाविण नाहीं विदेहता ॥ ६१ ॥
विदेहता बोली स्वभावें लागली। निर्गुणाची खोली कोण जाणे ॥ ६२ ॥
जाणे सुखदुःख जाणे गुणागुण। तयासी निर्गुण बोलवेना ॥ ६३ ॥
बोलवेना परी निर्गुण कळावें। विवेके मिळावें निर्गुणासी ॥ ६४ ॥
निर्गुणासी गुण मिळतां संकट। व्यर्थ खटपट कां करीसी ॥ ६५ ॥
कां करीसी भक्ती सगुणदेवाची। तुज निर्गुणाची शुद्धि नाहीं ॥ ६६ ॥
शुद्धि नाहीं जाली जया आनंदाची। तया विवादाची उरी आहे ॥६७॥
उरी नाहीं कदा निर्गुणी भजतां। निर्गुण सर्वथा सार आहे॥ ६८ ॥
सार तें आकार भक्तीचा निर्धार। भक्ति पूर्वापर सगुणाची ॥ ६९ ॥
सगुणाची भक्ती अज्ञानें करावी। सज्ञानें करावी निर्गुणाची ॥ ७० ॥
निर्गुणाची भक्ती या नांव अभक्ती। अव्यक्तासी व्यक्ती लाऊं नये ॥७१॥
लाऊं नये भाव सगुणदेवासी। व्यर्थ पाषाणासी काय काज ॥ ७२ ॥
कार्य कारण हा विवेक पाहिजे। भावार्थें लाहिजे सर्व कांहीं ॥ ७३ ॥
सव कांहीं नाहीं जैसें मृगजळ। वाया खळखळ कां करीसी ॥ ७४ ॥
कां करीसी सर्व देहाचा समंध। जरी जाला बोध निर्गुणाचा ॥ ७५ ॥
निर्गुणाचा बोध संसार निरसी। तेथें अज्ञानासी रीग नाहीं ॥ ७६ ॥
रीग नाहीं जया भावार्थभजनीं। तया हृदयसुनी शून्याकार ॥ ७७ ॥
शून्याकार होय विवेकें वासना। मग समाधाना काय उणें ॥ ७८ ॥
उणें जालें दुणें निर्गुणाच्या गुणें। अभाविकां कोणें उद्धरावें ॥ ७९ ॥
उद्धरावें येका सज्जनसंगती। ऐसें वेदश्रुती बोलताती ॥ ८० ॥
बोलताती परी नाहीं आठवण। म्हणोनि सगुण आवडेना ॥ ८१ ॥
आवडेना मिथ्या मायिक भजन। असत्यासी मन विश्वासेना ॥ ८२ ॥
विश्वासेना मन सगुणासी जरी। तयासी कैवारी देव कैचा ॥ ८३ ॥
कैचा देवभक्त कल्पना आपुली। ते सर्व नाथिली ज्ञानियांसी ॥ ८४ ॥
ज्ञानियांसी देव दूरी अंतरला। संदेह पडिला अंतकाळीं ॥ ८५ ॥
अंतकाळ कैसा अनंत ठायीचा। संदेह देहाचा मिथ्याभूत ॥ ८६ ॥
मिथ्या शब्दज्ञानें माया वोसरेना। अभक्त तरेना मायापुरीं ॥ ८७ ॥

माया मोहपुर दुस्तर संसार । अद्वैतविचार जंव नाहीं ॥ ८८ ॥
जंव नाहीं भावें श्रीहरी अर्चिला । तंव नव्हे भला ज्ञानगर्वी ॥ ८९ ॥
ज्ञानगर्वी नव्हे ज्ञानियां सुलभ । जयाचेनि लाभ स्वरूपाचा ॥ ९० ॥
स्वरूप रामाचें मनीं आठवावें । नाम उच्चारावें रात्रंदिस ॥ ९१ ॥
दिस ना रजनी मन ना उन्मनी । ज्ञाता जनीं वनीं सारिखाचि ॥ ९२ ॥
सारिखाचि भाव तया भेटे देव । येर सर्व वाव शब्दज्ञान ॥ ९३ ॥
ज्ञानेंवीण सर्व व्यर्थची जाणावें । जंव नाहीं ठावें आत्मज्ञान ॥ ९४ ॥
ज्ञानदाता हरी मनीं दृढ धरी । तोचि यमपुरी चुकवील ॥ ९५ ॥
चुकवील ज्ञान सर्वही अज्ञान । पाविजे विज्ञान संतसंगें ॥ ९६ ॥
संतसंगें धरी सगुणभजन । स्वधर्मसाधन क्रियाकर्म ॥ ९७ ॥
क्रियाकर्म कैचें ज्ञानियाचे आंगीं । मुक्त ज्ञानी जगीं विचारितां ॥ ९८ ॥
विचारितां देही तो कीजे सर्वही । क्रिया कर्म कांहीं सांडूं नये ॥ ९९ ॥
सांडूं नये भक्ती स्वधर्म विरक्ती । ब्रह्मज्ञानप्राप्ती रामदासीं ॥ १०० ॥
रामदास म्हणे रामउपासकां । भक्ती सांडूं नका राघवाची ॥ १०१ ॥

---

## ९ सर्व ब्रह्म-दृश्य मिथ्या-संवादशतक.

जें जें कांहीं दिसे तें तें सर्व नासे । सर्वातीत असे परब्रह्म ॥ १ ॥
परब्रह्म आहे सर्व विस्तारलें । आकारासी आलें तेंचि येक ॥ २ ॥
तेंचि येक कैसें आकारा येईल । कल्पांतीं नासेल सर्व कांहीं ॥ ३ ॥
सर्व कांहीं जीव आणी किडा मुंगी । ब्रह्म राजयोगी बोलताती ॥ ४ ॥
बोलताती ब्रह्म कल्पनेवेगळें । श्रुतीसी नाकळे पार ज्याचा ॥ ५ ॥
पार ज्याचा कळे सज्जनसंगती । सर्व ब्रह्म श्रुती बोलतसे ॥ ६ ॥
बोलतसे श्रुती दृश्य नाशिवंत । स्वरूप तें संत सर्वकाळ ॥ ७ ॥
सर्वकाळ गेला संदेहीं पडतां । दृश्य सांडूं जातां सांडवेना ॥ ८ ॥
सांडवेना कदा द्वैताच्या संबंधें । अद्वैताच्या बोधें सर्व मिथ्या ॥ ९ ॥
सर्व मिथ्या नव्हे ब्रह्मचि साचार । ब्रह्म चराचर नांदतसे ॥ १० ॥
नांदतसे तया काळ संहारील । नाहींसें होईल चराचर ॥ ११ ॥
चराचर ऐक्यरूपा आलें जेथें । काळ कैचा तेथें भिन्नपणें ॥ १२ ॥
भिन्नपणें भिन्न नांदे सर्व लोक । तया कैसें येक ह्मणतोसी ॥ १३ ॥
ह्मणतोसी भिन्न परी तो अभिन्न । ' सर्व ब्रह्म ' ज्ञान तुज नाहीं ॥ १४ ॥
तुज नाहीं जालें ज्ञान शाश्वताचें । ध्यान या भूतांचें करितोसी ॥ १५ ॥
करितोसी वाद वाउगा विवाद । सांडवेना भेद अंतरीचा ॥ १६ ॥

अंतरींचा भेद नाहींसा होईल । जरी तो जाईल भासभ्रम ॥ १७ ॥
भास भ्रम नव्हे वस्तुचि केवळ । जीव हे सकळ ब्रह्मरूप ॥ १८ ॥
ब्रह्म रूप नव्हे अरूप ठाईचें । रूप तेथें कैसें लावितोसी ॥ १९ ॥
लावितोसी वाया कासया वाचाळी । पडावें सुकाळीं सर्वब्रह्मीं ॥ २० ॥
सर्व ब्रह्मीं बुद्धी तया कैची शुद्धी । कुबुद्धी सुबुद्धी सारिखीच ॥ २१ ॥
सारिखीच बुद्धी जालीयां अंतरीं । मग लोकाचारी काय काज ॥ २२ ॥
काय काज ऐसें ह्मणतोसी आतां । माता आणि कांता येक होती ॥ २३
येक होती काय पूर्वींच आहेती । भेद तयाप्रती काय आहे ॥ २४ ॥
काय आहे भेद ऐसें बोलों जातां । दोषचि तत्वता वाढतसे ॥ २५ ॥
वाढतसे दोष सुंदरी ते माता । येक पुत्र होतां वेद बोले ॥ २६ ॥
वेद बोले ज्ञान तें कांहीं पाहावें । देहाचेनि व्हावें कासावीस ॥ २७ ॥
कासावीस कैचें देह ब्रह्म साचें । ब्रह्मेवीण कैचें दुजेपण ॥ २८ ॥
दुजेपणें माया आकारासि आल । तें हें विस्तारलें पाहातोसी ॥ २९ ॥
पाहतोसी माया ते तुज दीसते । येरवीं हें सत्य सर्वब्रह्म ॥ ३० ॥
सर्वब्रह्म कैचें रूप हें मायेचें । दिसे तया साचें कोण मानी ॥ ३१ ॥
कोण मानी तुझें ज्ञान येकदेसी । दिसेना तयासी काय पाहों ॥ ३२ ॥
काये पाहों ऐसें वाउगें बोलणें । दृष्टीचें देखण नाशिवंत ॥ ३३ ॥
नाशिवंत आहे कल्पना आपुली । ते हे सांपडली सर्वब्रह्मीं ॥ ३४ ॥
सर्वब्रह्मीं मन कैसें विश्वासलें । अंतवंत गेलें हारपोनी ॥ ३५ ॥
हारपोनि गेलें तूप हें थिजलें । जरीं विघुरलें तऱ्हीं तूप ॥ ३६ ॥
तूप हें चळोन जाहाल पातळ । ब्रह्म हें अचळ चळेना कीं ॥ ३७ ॥
चळेना कीं तूपपण त्या तुपाचें । तैसें जाण साचें सर्व ब्रह्म ॥ ३८ ॥
सर्व नाशिवंत बोलीला वेदांत । तेथें हा दृष्टांत कोणेकडे ॥ ३९ ॥
कोणेकडे गेलें सांग सोनेंपण । आटितां कंकण सोनें आहे ॥ ४० ॥
सोनें आहे जड आणी येकदेसी । वस्तूसी कायसी उपमा हे ॥ ४१ ॥
उपमा हे सर्व ब्रह्मचि तत्वता । आटितां नाटितां सोनें जैसें ॥ ४२ ॥
हेम हेंची आहे मुळीं नाशिवंत । पीतवर्ण जात निघोनीयां ॥ ४३ ॥
निघोनीयां भ्रांती येकेकडे गेली । मृत्तिका संचली पालटेना ॥ ४४ ॥
पालटेना तुझे मातीस बोलणें । माती मिथ्या कोणें जाणीजेना ॥ ४५ ॥
जाणीजेना तरी होईं सावधान । गारेचें जीवन गार जाली ॥ ४६ ॥
गार जाली तुझी माती हे सकळ । अचळासी चळ भावितोसी ॥ ४७ ॥
भावितां तरंग कोणेकडे गेला । सागरु संचला जैसा तैसा ॥ ४८ ॥
तैसा हा विस्तार तरंगाचे परी । साच हा चतुरीं मानिजेना ॥ ४९ ॥

मानिजेना परी येकचि साचार । वृक्षाचा विस्तार मूळ येक ॥ ५० ॥
मूळ येक ब्रह्म नित्यनिराकार । वृक्षाचा विस्तार तेथें कैचा ॥ ५१ ॥
कैचा हा म्हणसी तोचि आकारला । सविता बिंबला जळीं जेवीं ॥५२॥
जळीं जेवीं दिसे जळीं प्रतिबिंब । तैसें नाहीं बिंब स्वस्वरूपीं ॥ ५३ ॥
स्वस्वरूपीं आहे सर्वही साकार । असेना आकार तयावीण ॥ ५४ ॥
तयावीण बापा सर्वही मायिक । जाण हा विवेक योगियांचा ॥ ५५ ॥
योगियांचा भाव योगीच जाणती ॥ सर्वही देखती ब्रह्मरूप ॥ ५६ ॥
ब्रह्मरूप होतां भावचि मोडला । आत्मा हा जोडला आत्मरूपें ॥ ५७ ॥
रूपें ब्रह्म जाला तया सर्व ब्रह्म । भ्रमिष्टासी भ्रम भासतसे ॥ ५८ ॥
भासतसे भास तया आहे नाश । धरीं हा विश्वास शास्त्रमत्तें ॥ ५९ ॥
शास्त्रमत्तें सर्व ब्रह्मचि बोलिलें । दृष्टीसी पडीलें जें जें कांहीं ॥ ६० ॥
जें जें कांहीं आहे दृष्टीचें देखणें । तें तें मिथ्या कोणें जाणिजेना ॥ ६१ ॥
जाणिजेना सर्व ब्रह्म ऐसी खूण । तयासी संपूर्ण ज्ञान कैचें ॥ ६२ ॥
ज्ञान कैचें आतां सर्व ब्रह्म जालें । साधन बुडालें साधकाचें ॥ ६३ ॥
साधक साधन कैचें दुजेंपण । ऐक्यरूप जाण सर्व कांहीं ॥ ६४ ॥
सर्व कांहीं भिन्न भिन्न आकारलें । ऐक्यरूप जालें कोणेपरी ॥ ६५ ॥
कोणेपरी कार्यकारणभिन्नत्व । सिद्धाचिं येकत्व भिन्नपणें ॥ ६६ ॥
भिन्नपणें येक हें कईं घडावें । संदेहीं पडावें वाउगेंची ॥ ६७ ॥
वाउगा संदेह कासया धरावा । कासवा अवेवा भेद नाहीं ॥ ६८ ॥
भेद नाहीं जया तेंचि नाशिवंत । दृढत्वाचा हेत लागों नेदी ॥ ६९ ॥
लागेना विवेक पूर्ण ब्रह्मस्थिति । येकदेसी किती सांगसील ॥ ७० ॥
सांगसील सदा सर्वब्रह्म ऐसा । स्वर्ग नर्क कैसा ऐक्यरूप ॥ ७१ ॥
ऐक्यरूपें जया बाणला विश्वास । तया भेदभास आडळेना ॥ ७२ ॥
आडळेना भास तेथें सर्व कैचें । वाउगें केव्हांचें बोलतोसी ॥ ७३ ॥
बोलतोसी परी नाहीं समाधान । तुज हें अज्ञान मागें पुढें ॥ ७४ ॥
मागें पुढें मज ब्रह्मचि आघवें । भासाचिया नावें शून्याकार ॥ ७५ ॥
शून्याकार जालें तुझें अभ्यंतर । नव्हे तें साचार पूर्णब्रह्म ॥ ७६ ॥
पूर्णब्रह्म दृश्य पदार्थ जाणसी । वांयां वोसणसी जाणपणें ॥ ७७ ॥
जाणपणें सर्व मायिक म्हणावें । दृश्य हें जाणावें कोणेपरी ॥ ७८ ॥
कोणपरी तुझें जालें समाधान । मिथ्या सावपण लावितोसी ॥ ७९ ॥
लावितोसी कैसी अद्वैतीं कल्पना । द्वैत-हे तुटेना जन्मवरी ॥ ८० ॥
जन्मवरी सर्व अभेद ह्मणसी । भेदची लाविसी सर्वकाळ ॥ ८१ ॥
सर्वकाळ गेला मिथ्या म्हणतांची । दृश्य असतांची जैसें तैसें ॥ ८१ ॥

जैसें तैसें आहे विवेकें जाणसी । वायांची ह्मणसी 'सर्व ब्रह्म' ॥ ८३ ॥
सर्व ब्रह्म ऐसें वेद बोलियेला । नेणसी कां तुला ठावें नाहीं ॥ ८४ ॥
ठावें नाहीं तुज वेदाचें वचन । सर्व मिथ्याभान नेति नेति ॥ ८५ ॥
नेति नेति श्रुति वेदा अगोचर । तें हें विश्वाकार विस्तारलें ॥ ८६ ॥
विस्तारलें सर्व मायेचें स्वरूप । माया मिथ्यारूप जाण बापा ॥ ८७ ॥
जाण बापा सर्वब्रह्माचें स्वरूप । माया मिथ्यारूप कल्पना हे ॥ ८८ ॥
कल्पनेची सृष्टी दिसताहे दृष्टी । सांडीं माझी गोष्टी वायकोळ[1] ॥ ८९ ॥
वायकोळ नव्हे सर्व तेंची पाहे । दुजें कोण आहे तयावीण ॥ ९० ॥
तयावीण नाहीं तें दिसों लागलें । तेंची ब्रह्म जालें मंदमती ॥ ९१ ॥
मंदमती नव्हे सर्वांभूतीं भाव । भूतें आणी देव भिन्न नाहीं ॥ ९२ ॥
भिन्न नाहीं जरी भूतें आणी देव । तरी भावाभाव कासयासी ॥ ९३ ॥
कासयासी माया मिथ्या हे म्हणावी । ब्रह्मची जाणावी सर्व कांहीं ॥९४॥
सर्व कांहीं मिथ्या मग सव ब्रह्म । दृश्यातीत वर्म अनिर्वाच्य ॥ ९५ ॥
अनिर्वाच्य ब्रह्म व्यतिरेकें जाण । अन्वयाची खूण सर्वब्रह्म ॥ ९६ ॥
सर्व ब्रह्म पूर्वपक्षाचें बोलणें । सिद्धांतासी येणें चाड नाहीं ॥ ९७ ॥
चाड नाहीं तेथें सिद्धांत अलक्ष । तेथें दोन्ही पक्ष आटतील ॥ ९८ ॥
आटतील परी सारासार आहे । दृश्य हें न साहे निर्मळासी ॥ ९९ ॥
निर्मळासी तेथें कांहींच न लागे । शब्द तोहि भंगे निःशब्देंसीं ॥१००॥
निशब्देंसीं शब्द जे ठायीं आटला । 'सर्वब्रह्म'-बोला कोण पूसे ॥१०१॥
कोण पुसे तेथें तुझ्या निर्मळासी । कैंचा मा शब्दासी ठाव आधीं ॥
आधीं सर्व मिथ्या होऊनीयां गेलें । मग पुढें जालें अनिर्वाच्य ॥ १०३ ॥
अनिर्वाच्य जालें ब्रह्म बोलों नये । न्यून पूर्ण काय पाहासील ॥ १०४ ॥
पाहाणें खुंटलें बोलणें तुटलें । स्वस्वरूपीं जालें ऐक्यरूप ॥ १०५ ॥
ऐक्यरूपें रामी रामदासीं जालें । बोलणें खुंटलें तेथूनियां ॥ १०६ ॥

---

## १० समाधान शतक.

पृथ्वी आप तेज वायु तें आकाश । ऐसें सर्व दृश्य कोणें केलें ॥ १ ॥
केलें हें देवानें सर्व चराचर । आपण ईश्वर वेगळाचि ॥ २ ॥
वेगळाचि आहे त्याचें रूप कैसें । हें आह्मी कळेसें निरोपावें ॥ ३ ॥
निरोपावें काय बोलिलें न जाये । अनुमाना नये पूर्ण ब्रह्म ॥ ४ ॥
पूर्ण ब्रह्म जरी तुह्मी निरोपांना । तरी काय जना पुसावें हें ॥ ५ ॥

---

१ वायफळ, वायफट.

पुसावें हें सर्व आपुल्या गुरूसी व्यर्थ कासावीसी जेथें तेथें ॥ ६ ॥
जेथें तेथें नाहीं संतासी पुसावें । पुसतां सांगावें संतजनीं ॥ ७ ॥
संतजनी काय कोणासी सांगावें । लोक कुंडभावें[1] पुसताती ॥ ८ ॥
पुसताती लोक कळेना ह्मणोनी । तया संतजनी निरोपावें ॥ ९ ॥
निरोपावें जैसें ते तया मानेना । वेवाद सरेना जन्मवरी ॥ १० ॥
जन्मवरी आह्मां कोण्हीच सांगेना । नये अनुमाना सर्व कांहीं ॥ ११ ॥
सर्व कांहीं बापा उमजेना तुला । तरी गुरु केला कासयासी ॥ १२ ॥
कासयासी केला ऐसें न ह्मणावें । पुसतां सांगावें साधुजनीं ॥ १३ ॥
साधुजनीं काय ह्मणोनि सांगावें । प्रत्ययाच्या नांवें शून्याकार ॥ १४ ॥
शून्याकार सर्व साधूनें मोडावें । विवेकें जोडावें परब्रह्म ॥ १५ ॥
परब्रह्म कैसें निरोपिलें तुज । सांग गुह्य गुज अंतरीचे ॥ १६ ॥
अंतरीच गुज शाश्वत जाणावें । संतांसीं भजावें गुरुरूपें ॥ १७ ॥
गुरुचिया रूपें कोणासी भजावें । संदेहीं पडावें जन्मवरी ॥ १८ ॥
जन्मवरी संत साधूसी भजतां । मग संदेहेता कोठें राहे ॥ १९ ॥
कोठें राहे भाव भिन्न समाधानें । साधूचीं वचनें वेगळालीं ॥ २० ॥
वेगळालीं परी अनुभवीं येक । पूर्व पक्ष लोक पाहताती ॥ २१ ॥
पाहताती लोक बहुधा निश्चयें । तेणें गुणें होय कासावीस ॥ २२ ॥
कासावीस कैचे संताचे संगती । संतसंगें गती शीघ्र काळें ॥ २३ ॥
शीघ्र काळें गती हें कैसी प्रचीति । समाधान चित्तीं कोण कैसें ॥ २४ ॥
कैसें समाधान ज्याचें तोचि जाणे । गुज तें सांगणें कोणेपरी ॥ २५ ॥
कोणेपरी कळे खरें किंवा खोटें । खोटें तेंचि मोठें वाटतसे ॥ २६ ॥
वाटतसें मनीं संतांसी पुसावें । सर्वही त्यजावें वाग्जाळ ॥ २७ ॥
वाग्जाळ जनीं त्यागणेंचि तुज । तरी गुह्य गुज अंतरलें ॥ २८ ॥
अतरलें गुज हातासी चढेल । जरी ते घडेल संतसेवा ॥ २९ ॥
संतसेवा करी विवेक अंतरीं । पाहतां संसारीं तारिजेल ॥ ३० ॥
तरिजेल सर्व कांहीं न करितां । संतांसीं भजतां सर्व काळ ॥ ३१ ॥
सर्व काळ तुवां भजनचि केलें । परी नाहीं जालें समाधान ॥ ३२ ॥
समाधान माझें सज्जनाचा पायीं । माझे मनीं नाहीं दुजाभाव ॥ ३३ ॥
दुजाभाव नाहीं संतांचे चरणीं । तरी कां वचनीं अविश्वास ॥ ३४ ॥
अविश्वासें कदा भजन घडेना । प्रत्ययोचि येना कदा काळीं ॥ ३५ ॥
कदाकाळीं प्राणी जरी विवरेना । तरी तें घडेना समाधान ॥ ३६ ॥
समाधान धरे हें तुम्हीं करावें । मज विवरावें ज्ञानमार्गी ॥ ३७ ॥

१ कुड्या भावानें, वाईट बुद्धीनें.

ज्ञानमार्गीं तुझें मनचि निघेना । तेथें विवंचना पाहिजे ते ॥ ३८ ॥
पाहिजे ते परी मज निरोपावी । चिंताचि असावी अनाथांची ॥ ३९ ॥
अनाथांची चिंता श्रीराम करील । विचार देईल सेवकांसी ॥ ४० ॥
सेवक मी सेवा अल्प करूं जाणें । सर्व कांहीं नेणें ज्ञानमार्ग ॥ ४१ ॥
ज्ञानमार्गें वीण सर्वकाळ शीण । संसार कठीण चुकेना कीं ॥ ४२ ॥
चुकेना संसार हे लज्या तुह्मांसी । मज पतितासी कोण पुसे ॥ ४३ ॥
कोण पुसे तुज माझी लज्या मज । ह्मणोनियां गुज सांगतसें ॥ ४४ ॥
सांगतसें माझा सर्व आभिप्राव । आतां अंतर्भाव वोळखावा ॥ ४५ ॥
वोळखावा ऐसा जरी ह्मणतोसी । तरी तूं मानसीं सावधान ॥ ४६ ॥
सावधानपणें म्यां काय करावें । हें मज सांगावें निश्चयेंसीं ॥ ४७ ॥
निश्चयेंसीं देव आधीं वोळखावा । निश्चयो राखावा मनामधें ॥ ४८ ॥
मनामधें कोण करावा निश्चय । आणी मनोजय कैसा घडे ॥ ४९ ॥
घडे मनोजय मनासी जाणतां । निश्चय तत्वता परब्रह्म ॥ ५० ॥
परब्रह्म कोणेपरी वोळखावें । मनांत राखावें कोणे रीती ॥ ५१ ॥
रीती या ब्रह्माची निरूपणीं कळे । सर्वही निवळे समाधान ॥ ५२ ॥
समाधान जनीं कैसें वोळखावें । जीवेंसीं धरावें काय आतां ॥ ५३ ॥
काय आहे ऐसें हें मज कळेना । नये अनुमाना माझें मज ॥ ५४ ॥
माझें मज कळे हें कांहीं पहावें । स्वरूपीं राहावें निरंतर ॥ ५५ ॥
निरंतर कैसें स्वरूपीं राहावें । निर्गुणीं पहावें काय आतां ॥ ५६ ॥
आतां येक करी तत्वविचारणा । तेणें निज खुणा पावसील ॥ ५७ ॥
पावसील खूण ऐसें ही ह्मणतां । तत्वें पाहों जातां वेगळालीं ॥ ५८ ॥
वेगळालीं तत्वें परी तो तूं कोण । पाहें वोळखण निश्चयाची ॥ ५९ ॥
निश्चयाची गोष्टी तत्वरूप सृष्टी । जनांलागी वेष्टी तत्वें तत्व ॥ ६० ॥
तत्वझाडा होतां उरतें तें काय । वेगी धरीं सोय मीपणाची ॥ ६१ ॥
मीपणाची सोय पाहतां दिसेना । तत्वीं आडळेना कांहीं केल्यां ॥ ६२ ॥
कांहीं केल्या तुज दिसेना मीपण । तरी कर्ता कोण सांग आतां ॥ ६३ ॥
आतां काय सांगों मीपण नाडळे । विचारितां गळे तत्वें तत्व ॥ ६४ ॥
तत्वें तत्व झाडा करूनी पाहावें । मीपणाच्या नावें शून्याकार ॥ ६५ ॥
शून्याकार जालें हें माझें मीपण । आतां मी तो कोण निरोपावें ॥ ६६ ॥
निरोपावें तरी तूं वस्तु आहेसी । वेगी आपणासी विभांडावें ॥ ६७ ॥
विभांडावें कोण तेंचि तें मीपण । तरी आतां खूण कैसी पावों ॥ ६८ ॥
कैसी पावों ऐसें जरी म्हणतोसी । तरी त्या हेतूसी वोळखावें ॥ ६९ ॥

१. जिंकावें.

वोळखतां हेतु अंतःकरण आहे । विचारितां राहे तत्वांमधें ॥ ७० ॥
तत्वांमधें राहे पाहे सर्व कांहीं । तरी तुज नाहीं मीतूंपण ॥ ७१ ॥
मीतूंपण नाहीं विचारें पाहातां । मज वाटे आतां समाधान ॥ ७२ ॥
समाधान आहे संगत्याग होतां । हेतूनें दुश्चिता होऊं नको ॥ ७३ ॥
नको देवा आतां हेतूची संगती । व्यर्थ अधोगती हेतुसंगें ॥ ७४ ॥
हेतुसंग सदा लागला हेतूसी । तो तूं निश्चयेंसीं वस्तुरूप ॥ ७५ ॥
वस्तुरूप होतां कृत्याकृत्य जालों । प्रत्ययें पावलों समाधान ॥ ७६ ॥
समाधान पाहे आहे तैसें आहे । निश्चय न राहे सर्वकाळ ॥ ७७ ॥
सर्वकाळ मज साधूची संगती । विचारानें गती पावईन ॥ ७८ ॥
पावईन गती हा तुझा उधार । गतीचा निर्धार होउनी पाहें ॥ ७९ ॥
होउनीयां गेला प्रचीतीस येतें । संशय धरीतें पुन्हा मन ! ॥ ८० ॥
मनाचा संशयो मनाचा निश्चयो । मनें मनजयो कामा नये ॥ ८१ ॥
कामा नये तरी मनेंवीण कैसें । मनेंची विश्वासें पाविजेतें ॥ ८२ ॥
पाविजेतें परी वृत्ति शून्य होतां । हेतु आठवितां असमाधान ॥ ८३ ॥
असमाधान घडे ऐसें न करावें । देवें उद्धरावें भक्तजना ॥ ८४ ॥
भक्तजन मुळीं विभक्त नाहींत । असमाधान तेथ आडळेना ॥ ८५ ॥
आडळेना कांहिं स्वरूपीं पाहातां । संसारीं राहातां दिसों लागे ॥ ८६ ॥
दिसों लागे कोण तूं तरी निर्गुण । निर्गुणासी गुण लाऊं नको ॥ ८७ ॥
लाऊं नको गुण हें तुम्ही म्हणता । देहसंगें व्यथा बाधीतसे ॥ ८८ ॥
बाधीतसे व्यथा देहाच्या संबंधें । विचारप्रबोधें समाधान ॥ ८९ ॥
समाधान माझें मीपण सांडितां । हें तों मज आतां कळों आलें ॥ ९० ॥
कळों आलें तुज तत्वविवरण । महावाक्यखूण पावसील ॥ ९१ ॥
पावसील मज देवा दीनानाथा । संसाराची व्यथा दुरी केली ॥ ९२ ॥
दुरी केली व्यथा ब्रह्मनिरूपणें । आतां विवरण सर्व काळ ॥ ९३ ॥
सर्व काळ आतां सार्थक जाहला । भला कळों आला नरदेह ॥ ९४ ॥
नरदेहीं ज्ञान पाहातां सुटिजे । येर सर्व कीजे निरर्थक ॥ ९५ ॥
निरर्थक काया कारणीं लागली । विवेकें भंगली देहबुद्धी ॥ ९६ ॥
देहबुद्धी गेली आत्मबुद्धी होतां । कर्त्यासी धुंडितां कार्य नाहीं ॥ ९७ ॥
कार्य नाहीं खरें कारणीं पाहातां । तद्रूप हें आतां समाधान ॥ ९८ ॥
समाधान रामी रामदासीं जालें । विचारानें केलें संगातीत ॥ ९९ ॥

---

## ११ सविवेकवैराग्यशतक.

वैराग्यापरतें अन्य नाहीं भाग्य । धन्य तें वैराग्य ज्ञानियासी ॥ १ ॥
ज्ञानीयासी काय करावें वैराग्य । ज्ञानीयास भाग्य तत्त्वबोधें ॥ २ ॥
तत्त्वबोधें होय शब्दज्ञान सोपें । परी अनुतापें त्याग घडे ॥ ३ ॥
त्यागावें तें काय सर्व तेंचि आहे । विचारूनि पाहे आलया रे ॥ ४ ॥
आलया संसारीं अनुतापेंवीण । शब्दज्ञान शीण वाउगाची ॥ ५ ॥
वाउगाची बापा कासया शीणसी । जाण निश्चयेसीं सर्व सार ॥ ६ ॥
सार जाणोनियां असार त्यागावें । तरीच भोगावें मुक्तिपद ॥ ७ ॥
पद ये मुक्तीचें तत्त्वज्ञानें जोडे । बोडके उघडे कासयासी ॥ ८ ॥
कासया करावें वैराग्याचें डंभ । सुखाचें स्वयंभ मोक्षपद ॥ ९ ॥
मोक्षपदीं काय सांडावें मांडावें । व्यर्थचि हिंडावें वनांतरीं ॥ १० ॥
वनांतरीं हिंडे तोचि येक भला । येक तो बांधला मायाजाळीं ॥ ११ ॥
मायाजाळीं कैचें कोणहासी बंधन । ज्ञानी समाधान आत्मज्ञानें ॥ १२ ॥
आत्मज्ञानें त्याग सर्वांचा करावा । मग उद्धरावा विश्व जन ॥ १३ ॥
विश्वजनीं भोग तोचि राजयोग । भोगितांचि त्याग ज्ञानीयासी ॥ १४ ॥
ज्ञानियांसी भोग तोचि भवरोग । नव्हे राजयोग-विटंबणा ! ॥ १५ ॥
विटंबणा भ्रमें होय मूढजना । ज्ञानी तो लिंपेना करूनीयां ॥ १६ ॥
करूनीयां काय मिथ्या शब्दज्ञान । नाहीं समाधान त्यागेंवीण ॥ १७ ॥
त्यागितांचि भोग भोगितांचि त्याग । ऐसा ज्ञानयोग जाण बापा ॥ १८ ॥
जाणतील सर्व त्याग करवेना । मनीं धरवेना अनुताप ॥ १९ ॥
अनुताप आहे संतापाचें फळ । वायां तळमळ कां करावी ॥ २० ॥
करावी आदरें वृत्ती उदासीन । तेणें तुटे ध्यान विषयांचें ॥ २१ ॥
विषयांचें ध्यान देहाचें जीवन । सोडी ऐसा कोण सांग बापा ॥ २२ ॥
सांग बापा कोण विषयी तरला । कोण उद्धरला भोगितांचि ॥ २३ ॥
भोगितांचि सर्व सज्जन तरले । विषय भोगिले पंचविधा ॥ २४ ॥
पंचही विषय त्यागुनी बाधक । शुद्ध तो साधक सेविताती ॥ २५ ॥
सेविताती सर्व त्यागी कोण आहे । विचारूनि पाहें आलया रे ॥ २६ ॥
आलया रे त्यागी तयासी ह्मणावें । जेणें हें जिणावें शिश्नोदर ॥ २७ ॥
उदर सुटेना कामाची कल्पना । आतां त्याग जना कोठें आहे ॥ २८ ॥
आहे त्याग बापा रसना जिंकावी । कल्पना मोडावी संतसंगें ॥ २९ ॥
संतसंगें त्याग अंतरींचा होय । बाह्याकार काय करूनियां ॥ ३० ॥
करूनियां त्याग देह्याचें दंडण । होतसे खंडण महा दोषा ॥ ३१ ॥

महा दोष केचे संतांचे संगती । पतितांसी गती संतसंगें ॥ ३२ ॥
संतसंगें बाणे विवेक वैराग्य । योगियांचें भाग्य पाठीं लागे ॥ ३३ ॥
लागतो विवेक अंतरीं धरावा । संसार करावा सुखेंनैव ॥ ३४ ॥
नावडे संसार दुःखाचे डोंगर । वासनाविस्तार आवरेना ॥ ३५ ॥
आवरेना तरी श्रवण करावें । परी न फिरावें दारोदारीं ॥ ३६ ॥
दारोदार थोर थोर पूर्वापर । योगी ऋषीश्वर भिक्षाटणें ॥ ३७ ॥
भिक्षाटण वायां कासया करावें । आश्रमीं भजावें अतीतांसी ॥ ३८ ॥
अतीतांसी भजे हें कहीं घडावें। आश्रमीं पडावें मायाजाळीं ॥ ३९ ॥
मायाजाळीं धर्म कांहीं तरी घडे । फिरे चहूंकडे उदासीन ॥ ४० ॥
उदासीन रूप देवाचें स्वरूप । होईजे निःपाप तयाचेनि ॥ ४१ ॥
तयाचेनि काय होणार होईल । तो काय देईल दातयासी ॥ ४२ ॥
दातयाचा दाता तो येक मागता । नेणिजे अतीता संवसारीं ॥ ४३ ॥
संवसारीं आतां सर्व कांहीं घडे । शिणती बापुडे उदासीन ॥ ४४ ॥
उदासीन ज्ञाता नाहीं पराधीन । विचारें स्वाधीन तीर्थाटण ॥ ४५ ॥
तीर्थाटण काय पाहसील मूढा । पाणी आणि धोंडा जेथें तेथें ॥ ४६ ॥
तेथें होत आहे पापाची बोहरी । केली थोरथोरीं तीर्थाटणें ॥ ४७ ॥
तीर्थाटणें सदा इच्छिती साधूंसी । तीर्थें साधूंपासीं शुद्ध होती ॥ ४८ ॥
होती परी साधु कोण्हासी दिसेना साधु तो असेना मायाधारी ॥ ४९ ॥
मायाधारी साधु जनांसी दिसतो । परी जाणावा तो पद्मपत्र ॥ ५० ॥
पद्मपत्राऐसें संसारीं असती । हें कदा कल्पांतीं सत्य नव्हे ॥ ५१ ॥
सत्य नव्हे कैसें दुर्वास श्रीपती । आणी चक्रवर्ती जनक येक ॥ ५२ ॥
जनक येकला दृष्टांतासी आला । नवलाव जाला येक दोनी ॥ ५३ ॥
येक दोनी नव्हे भक्त थोरथोर । तरले संसार करूनीयां ॥ ५४ ॥
करूनी संसार सुखें देशधडी । भक्तिसुखें गुढी उभारिली ॥ ५५ ॥
उभारिली गुढी संसार करितां । तया निस्पृहता कोठें होती ॥ ५६ ॥
होती निस्पृहता तेचि जाले मान्य । येर ते जघन्य लोलंगता ॥ ५७ ॥
लोलंगता नाहीं ऐसा कोण असे । कांहीं तरी असे मनामध्यें ॥ ५८ ॥
मनामधें वसे जैसें संसारिकां । तैसा नाहीं लेखा तापसाचा ॥ ५९ ॥
तापसांचा वास वनामधें घडे । विषयांचे सडे कामबुद्धी ॥ ६० ॥
कामबुद्धी ज्याची तया वाटे तेची । दोषिया दोषचि दिसतसे ॥ ६१ ॥
दिसताहे तैसें बोलावें लागतें । मन हें मागतें विषयांसी ॥ ६२ ॥
विषयांसी मागे मन हें चंचळ । देईल तो खळ पापरूपी ॥ ६३ ॥
पापरूपी मनीं परस्त्री चिंतितो । संसारीं भोगितो आपुलीच ॥ ६४ ॥

आपुलेंचि शस्त्र उरीं हाणों जातां । मरेल तत्त्वता निश्चयेंसीं ॥ ६५ ॥
निश्चयो चळतो योगितापसांचा । मग तया कैचा परलोक ॥ ६६ ॥
परलोकीं योगी पावोनी राहिले । मिथ्या देह चाले प्रारब्धानें ॥ ६७ ॥
प्रारब्धानें देह सर्वांचा चालतो । तेथें योगिया तो सारिखाची ॥ ६८ ॥
सारिखाचि योगी आणी संवसारी । बोलतां अंतरीं लाज नाहीं ॥ ६९ ॥
नाहीं तो आश्रमी साक्ष सर्वकर्मीं । तया नाहीं उर्मी अज्ञानाची ॥ ७० ॥
अज्ञानाची उर्मी लोभाचें गुंडाळें । आसक्तीच्या बळें शब्दब्रह्म ॥ ७१ ॥
ब्रह्मचि होऊनी संसारीं असावें । परी न लिंपावें कर्ममेळीं ॥ ७२ ॥
कर्मांचा मेळावा पातकांचें फळ । तरी मायाजाळ गोड वाटे ॥ ७३ ॥
गोड वाटे जया सर्व ब्रह्म माया । जन वन तया सारिखेंची ॥ ७४ ॥
सारिखेंचि नव्हे सारासार आहे । अनुभवें पाहे गुरुमुखें ॥ ७५ ॥
गुरुमुखें जालें ज्याचें समाधान । त्यासी वणवण कदा नाहीं ॥ ७६ ॥
नाहीं जया आला संसाराचा वीट । तया मोक्षवाट सांपडेना ॥ ७७ ॥
सांपडेना मोक्ष जें मन चंचळ । यालागीं निश्चळ मन करीं ॥ ७८ ॥
करीं बापा आतां संसाराची सोडी । धरूं नको गोडी आश्रमाची ॥७९॥
आश्रमाची गोडी कासया सांडावी । उपाधी मोडावी कासयासी ॥८०॥
शिकवितां ने घे तया कोण सांगे । सांगतां न लागे वीतराग ॥ ८१ ॥
वीतराग ऐसें कासया ह्मणावें । हें येक जाणावें निश्चयेंसीं ॥ ८२ ॥
निश्चयो कळला तो कदा राहेना । वैभव पाहेना कदाकाळीं ॥ ८३ ॥
कदाकाळीं प्राप्त भोगावें सुटेना । देहाची भावना वेगळाली ॥ ८४ ॥
वेगळालें प्राप्त तैसेंचि भोगावें । परी निरोपावें वीतरागा ॥ ८५ ॥
वीतरागें देहसंबंध घडेना । वैभव सोडीना कांहीं केल्या ॥ ८६ ॥
कोलियानें होतें केलेंचि पाहिजे । जें मनीं धरिजे तेंची होतें ॥ ८७ ॥
होतो प्रेत्न खरा प्रारब्धासारिखा । कांहीं पूर्वरेखा पाहिजेते ॥ ८८ ॥
पाहिजे तो यत्न आदरेंसीं केला । मग प्राप्तव्याला शब्द घडे ॥ ८९ ॥
घडे तो प्रेत्न होणारासारिखा । नाहीं तरी देखा आठवेना ॥ ९० ॥
आठवेना तरीं आलस्य नसावा । आलस्याचा हेवा करूं नये ॥ ९१ ॥
करूं नये ऐसें बोलणें बोलावें । होणार स्वभावें होत जातें ॥ ९२ ॥
होत जात परी प्रेत्नेवीण नाहीं । आधीं प्रेत्न कांहीं पाहिजेतो ॥ ९३ ॥
पाहिजेतो परी घडोनी येईना । मनाची वासना पूर्ण नव्हे ॥ ९४ ॥
नव्हे समाधान साधनावांचूनी । वायां शब्दज्ञान वाउगेंची ॥ ९५ ॥
वाउगें साधन कासया करावें । स्वरूप स्वभावें सिद्ध आहे ॥ ९६ ॥
सिद्ध आहे तरी अंतरीं बाणेना । संशयो जाणेना निश्चयेंसीं ॥ ९७ ॥

निश्चयाचें ज्ञान विवेकें संपन्न । तया हें अज्ञान बाधी केवीं ॥ ९८ ॥
केवीं बाधिजेना आसक्तीच्यामुळें । मायाजाळें काळें वोढीयेलें ॥ ९९ ॥
वोढीयेलें काळें अभक्त नरासी । नाहीं जयापासीं भक्तिभाव ॥ १०० ॥
भक्तिभाव क्रिया मोक्षाचें साधन । वीतरागी मन सर्व काळ ॥ १०१ ॥
सर्वकाळ जेथें कथानिरूपण । श्रवणमनन निजध्यास ॥ १०२ ॥
निजध्यास मन वृत्ती उदासीन । नावडे कांचन आणि कांता ॥ १०३ ॥
कांता पुत्र धन वैभव स्वजन । रामेंवीण अन्य आवडेना ॥ १०४ ॥
आवडेना भार नाथिला संसार । रामदासीं सार रामदास्य ॥ १०५ ॥

---

## १२ प्रारब्ध प्रयत्नीं प्रयत्न श्रेष्ठत्व.

प्रेत्न आहे थोर पाहावा विचार । येणें पैलपार पाविजेतो ॥ १ ॥
पाविजेतो पार प्रारब्धेंकरूनी । येत्न केल्या जनीं होत नाहीं ॥ २ ॥
होत नाहीं प्रेत्नें ऐसें काय आहे । विचारूनी पाहें आलया रे ॥ ३ ॥
आलया रे प्रेत्न करितां फळेना । होणार टळेना कांहीं केल्यां ॥ ४ ॥
कांहीं तरी केलें पाहिजे संसारीं । कांहीं च न करी ऐसा कोण ॥ ५ ॥
ऐसा कोण आहे प्रारब्धावेगळा । होणाराची कळा वेगळी ते ॥ ६ ॥
वेगळीच कळा जाण जाणत्याची । केल्याहि होतेचि विवंचना ॥ ७ ॥
विवंचना नानाप्रकारें धांवती । होणाराची गती भिन्न आहे ॥ ८ ॥
भिन्न आहे कळा धूर्त मनुष्याची । तूर्त प्रेत्नाची फळश्रुती ॥ ९ ॥
फलश्रुती कैची पूर्वदत्तावीण । वाउगाचि शीण होत असे ॥ १० ॥
व्यर्थ होतो शीण शोधिल्यावांचुनी । कांहीं केल्या जनीं होत नाहीं ॥ ११ ॥
होत नाहीं परी अदृष्ट पाहिजे । तरीच लाहिजे सर्व कांहीं ॥ १२ ॥
सर्वकांहीं प्रेत्न केलियानें होतो । आळसी पडतो सावकास ॥ १३ ॥
सावकास जरी आळसी पडिला । होणार तें त्याला होत आहे ॥ १४ ॥
होत आहे परी प्रेत्नेवीण नसे । केल्यावीण कैसे भोग होती ॥ १५ ॥
भोग हे होताती पाठीं लागताती । येत्नेंवीण होती अकस्मात ॥ १६ ॥
अकस्मात तरी प्रेत्नीच भोगील । आळसी पडेल सावकास ॥ १७ ॥
सावकास पडे तेथेंचि होईल । होणारें येईल पूर्वदत्तें ॥ १८ ॥
पूर्वदत्त केलें प्रेत्न करूनियां । वाउगेंचि वांयां बोलतोसी ॥ १९ ॥
बोलतोसी परी प्रारब्ध सोडीना । धांवतीनें जना होत नाहीं ॥ २० ॥
होत नाहीं जरी कां येत्न करिसी । खातो-जेवितोसि कासयासी ॥ २१ ॥
कासयासी आतां वाउगें बोलणें । खाणें हो जेवणें पूर्वरेखा ॥ २२ ॥

पूर्वरेखा कोणें लिहिली अद्दष्टीं । हेंचि येक गोष्टी बरी पाहें ॥ २३ ॥
पाहील कवण संचितावांचून । देहे कर्माधीन चालतसे ॥ २४ ॥
चालतसे परी चालवावें लागे । कांहीं तरी मागे कोणी येक ॥ २५ ॥
कोणी येक मागे तो कैचें देईल । होणार होईल निश्चयेंसी ॥ २६ ॥
निश्चयेंसी आतां होणार ह्मणसी । कांहींच येत्नासी करूं नको ॥ २७ ॥
करूं नको ऐसे व्यर्थचि उत्तर । पूर्वींच होणार होउनी गेलें ॥ २८ ॥
होउनी गेलें आतां तरी कां करावें । उगेंचि रहावें पडोनियां ॥ २९ ॥
पडावें मरावें कपाळासारिखें । कपाळीचें चुके ऐसें नाहीं ॥ ३० ॥
नाहीं नाहीं ऐसें त्वां तरी देखिलें । कपाळ वाचिलें कोणेपरी ॥ ३१ ॥
कोणेपरी आतां नवें होईना कीं । निर्मिलें लौकिकीं होत आहे ॥ ३२ ॥
होत आहे तो गे तोचि प्रेत्न जाण । प्रेत्नेंवीण कोण जन्मा आला ॥ ३३ ॥
जन्मा आला नादाबिंदा[1] भेटी जाली । विधीनें लिहिली वोळी तेव्हां ॥३४॥
तेव्हां विधी कोणे स्थळीं उभा होता । काशानें लिहिता होय तेथें ॥३५॥
तेथें काय होतें हें कळे कोणासी । मानवी जिवांसी काय ठावें ॥ ३६ ॥
ठावें नाहीं तरी ऐकेनासी कैसा । नेणोनि वळसा करितोसी ॥ ३७ ॥
करितोसी वांया व्यर्थ खटपट । लिहिलें अद्दष्ट पालटेना ॥ ३८ ॥
पालटेना तरी करंटें जाणावें । पापी पालटावें कोणेपरी ॥ ३९ ॥
कोणेपरी आतां अद्दष्ट चुकतें । न पेरितां होतें धान्य कैसें ॥ ४० ॥
कैसें होतें आतां पेरिल्यावांचून । बोलिलें वचन सांडूं नको ॥ ४१ ॥
सांडूं नको ऐसें पालटतें कैसें । सांगतां तें कैसें कोणेपरी ॥ ४२ ॥
कोणेपरी आतां तुजसी बोलावें । निश्चयाच्या नांवें शून्याकार ॥ ४३ ॥
शून्याकार जाला प्रारब्धानें केला । पालटितो याला कोण आतां ॥४४॥
कोण आतां करी सुदैव दुर्दैव । ब्रह्मादिक देव जोपारिले[2] ॥ ४५ ॥
जोपारिले कैसे आहे तें बोलतां । कर्म पालटितो ऐसा कोण ॥ ४६ ॥
ऐसा कोण आहे जे वर्ते विचारें । मूर्ख अविचारें वर्तताती ॥ ४७ ॥
वर्तताती काय करिती प्रारब्धा । त्यासी बोल कदा ठेऊं नये ॥ ४८ ॥
ठेऊं नये ऐसें कोणासी ह्मणावें । मूढ लोक देवें निंदियेलें ॥ ४९ ॥
निंद्य आणि वंद्य प्रारब्धाचा ठेवा । बोल काय देवा ठेउनीयां ॥ ५० ॥
ठेउनीयां बोल देवासी भजावें । पाषांड त्यजावें विषयांचें ॥ ५१ ॥
विषयो सोडूनी भजावें देवाला । देव होणाराला पालटीना ॥ ५२ ॥
पालटीना देव ऐसें म्हणों नये । देवचि उपाय भक्तजना ॥ ५३ ॥
भक्तजन कष्टी होउनीयां गेले । देवें सोडविले नाहींत कीं ॥ ५४ ॥

---

१. नाद व बिंदु २. तुच्छ केले.

नाहीं तें बोलतां अभक्त होइजे । यातना भोगिजे परोपरीं ॥ ५५ ॥
परोपरीं मज का भय सांगतां । कर्मे विघडितां देव कैचा ॥ ५६ ॥
कैचा देव ऐसें आम्हां ऐकों नये । प्राप्त होती ठाय रौरवांचे[1] ॥ ५७ ॥
रौरवाचे ठाय आपुली करणी । कर्मआचरणीं ब्रह्मप्राप्ती ॥ ५८ ॥
ब्रह्म प्राप्त होतें संतांचें संगती । येरां अधोगती गर्भवास ॥ ५९ ॥
गर्भवास होती पूर्वीच्या संचितें । आतां कांहीं येथें येत्न नाहीं ॥ ६० ॥
येत्न नाहीं कोणा ज्या नाहीं कैपक्षी । भक्तजना रक्षी देवराणा ॥ ६१ ॥
देवराणा रक्षी हें कई घडावें । संचीत जाणावें आपुलेंचि ॥ ६२ ॥
आपुलालें पाप देव सोडविता । जाण हें तत्त्वता निश्चयेसीं ॥ ६३ ॥
निश्चयेसीं देव प्रारब्धा-आधीन । येथें भक्तजन काय करी ॥ ६४ ॥
काय करितोसी भक्ताचा कंटाळा । अहा रे चांडाळा कर्मबद्धा ॥ ६५ ॥
कर्मांचे बांधले हरिहरादिक । मानवी हें रंक केवीं सुटे ॥ ६६ ॥
केवीं सुटे मूढ अभाविक जन । अपार पावन देवें केले ॥ ६७ ॥
देवासी बंधन तें कर्मा लागले । बंद सोडविले देवें कैसे ॥ ६८ ॥
कैसें बोलतोसी मर्यादा सांडूनी । रावण मारूनि मुक्त देव ॥ ६९ ॥
देव मुक्त केले या रघुनायकें । रावण कौतुकें रक्षियेलें ॥ ७० ॥
रक्षियेलें तेणें दोषेंचि बुडाला । पुरुषार्थ गेला येकायेकीं ॥ ७१ ॥
येकायेकी जातो उपजला प्राणी । कर्माची करणी ऐसी आहे ॥ ७२ ॥
आहे येत्न कर्म तोडावयालागी । मुक्तीचे विभागी भक्तजन ॥ ७३ ॥
भक्तजन दोनी प्रारब्धापासूनी । प्रारब्धावांचूनी थोर नाहीं ॥ ७४ ॥
थोर नाहीं ऐसें कैसेनि जाणावें । रूप वोळखावें उभयांचें ॥ ७५ ॥
उभयता कोण प्रारब्ध प्रयत्न । आधीं जे निर्माण तेंचि थोर[2] ॥ ७६ ॥
थोर मूळमाया निराकारीं जाली । प्रारब्धीची वोळी तेथें नाहीं ॥ ७७ ॥
नाहीं क्रियमाण तै शब्दस्फुरण । जें महाकारण ब्रह्मांडीचें ॥ ७८ ॥
ब्रह्मांडीचें महाकारण शरीर । मूळ निराकार परब्रह्म ॥ ७९ ॥
परब्रह्मीं जाली मूळी मूळमाया । पुढें गुणमाया गुण करी ॥ ८० ॥
गुण सत्त्व रज तम हें जाणावें । तेथुनी स्वभावें पंचभूत ॥ ८१ ॥
आकाशीं पवन पवनीं तो अग्न । आपोनारायण तेथूनियां ॥ ८२ ॥
तेथूनियां पुढें अवनी जाहाली । पुढें नाना वल्ली भूमिपोटीं ॥ ८३ ॥
भूमिपोटीं जाल्या औषधी निर्माण । तेथूनियां अन्न प्रगटलें ॥ ८४ ॥
प्रगटलें अन्न प्रगटलें रेत । तेथुनी जीवित्व पुरुषाचें ॥ ८५ ॥

---

१ रौरव नरकाचें स्थान. २ ह्या सिद्धांतावर पुढें प्रारब्धापेक्षां प्रयत्नाचें श्रेष्ठत्व स्थापित केलें आहे.

पुरुषापासूनी उत्पत्ती वाढली । वेदशास्त्रीं बोली ऐसी आहे ॥ ८६ ॥
ऐसी बोली सत्य वेदशास्त्रवाणी । पुढें चारी खाणी प्रगटल्या ॥ ८७ ॥
प्रगटल्या वाणी तयांची प्रारब्धें । पुढें नानाभेदें जीवसृष्टी ॥ ८८ ॥
जीवसृष्टी जाली उत्पत्ती संव्हार । प्रारब्ध वेव्हार ऐलीकडे ॥ ८९ ॥
ऐलीकडे कर्म मूळींचा तो प्रेत्न । श्रोतीं सावधान विवरावें ॥ ९० ॥
विवरावें आधीं प्रेत्न कीं प्रारब्ध । शास्त्रांतरीं भेद ऐसा आहे ॥ ९१ ॥
आहे निराकार निर्मळ निश्चळ । तेथुनी चंचळ प्रेत्न[1] जाला ॥ ९२ ॥
प्रेत्न जाला आधीं म्हणोनियां थोर । प्रारब्धविचार ऐलीकडे ॥ ९३ ॥
ऐलीकडे कर्म पाहतां भूतळीं । प्रेत्न अंतराळीं मूळारंभ ॥ ९४ ॥
आरंभापासुनी सर्वेही शोधावें । कर्म पडे ठावें विवरतां ॥ ९५ ॥
विवरतां सर्व आशंका फिटली । जाण तया भली विवंचना ॥ ९६ ॥
विवंचना अष्टदेहांची करितां । होय सार्थकता ज्ञानबोधें ॥ ९७ ॥
ज्ञानबोधें स्थूळ सूक्ष्म कारण । तो महाकारण चौथा देह ॥ ९८ ॥
विराट हिरण्य अव्याकृती जाण । मुळमाया खूण अष्टदेह ॥ ९९ ॥
अष्ट देहे ऐसे पिंडब्रह्मांडीचे । निरसितां विवंचे दृश्य माया ॥ १०० ॥
दृश्य माया मिथ्या साच परब्रह्म । दास म्हणे भ्रम मावळला ॥ १०१ ॥
मावळला भ्रम रामगुण गातां । उपासना आतां सोडूं नये ॥ १०२ ॥

---

१ 'एकोहं बहु स्याम्' हा प्रथम प्रयत्न.



# (१७) अभंगांचीं पंचकें, अष्टकें, दशकें.

## १. भक्तिपर अभंगपंचक.

१. भक्ति नलगे भाव नलगे । देव नलगे आम्हांसी ॥ १ ॥ आम्ही पोटाचे पाईक[1] । आम्हां नलगे आणीक ॥ २ ॥ आम्ही खाऊं ज्याची रोटी । त्याची कीर्ती करूं मोठी ॥ ३ ॥ रामीं रामदास म्हणे । ऐशीं मूर्खांचीं लक्षणें ॥ ४ ॥

२. आम्हां अन्न जालें पुरे । अन्नावीण काय[2] नुरे ॥ १ ॥ पोटभरी मिळे अन्न । आम्हां तेंचि ब्रह्मज्ञान ॥ २ ॥ अन्नावांचूनी दुसरा । देव आहे कोण खरा ॥ ३ ॥ भगवंताची नाहीं गोडी । काय म्हणे ते बापुडी[3] ॥ ४ ॥ रामीं रामदास म्हणे । मूर्ख बोले दैन्यवाणें ॥ ५ ॥

३. अन्न व्हावें पोटभरी । मग ते ज्ञानचर्चा करी ॥ १ ॥ ऐसें बोलती अज्ञान । ज्यांसि नाहीं समाधान ॥ २ ॥ आधीं अन्न तें पाहिजे । मग ध्यानस्थ राहिजे ॥ ३ ॥ अन्नावीण तळमळ । अन्न करितें सकळ ॥ ४ ॥ कैंचा राम कैंचा दास । अवघे पोटाचे सायास ॥ ५ ॥

४. अन्न देणार श्रीहरी । तोचि प्रतिपाळ करी ॥ १ ॥ ज्या देवाचे आज्ञेवरी । मेघ वर्षती अंबरीं[4] ॥ २ ॥ तयासि चुकलीं बापुडीं । अन्न अन्न करिती वेडीं ॥ ३ ॥ रामदास म्हणे ऐक । आदि अंतीं देव एक ॥ ४ ॥

५. देव तारी देव मारी । देव सर्व कांहीं करी ॥ १ ॥ अन्नोदक देवें केलें । सर्व तेणेंचि निर्मिलें ॥ २ ॥ तयासि चुकलीं बापुडीं । अन्न अन्न करिती वेडीं ॥ ३ ॥ रामदास म्हणे एक । देव त्रैलोक्यनायक ॥ ४ ॥

६. देव घालितो संसारीं । देव सर्व कांहीं करी ॥ १ ॥ लक्ष चौऱ्यांशीं हिंडतां । तेथें देव सांभाळिता ॥ २ ॥ तयासि चुकलीं बापुडीं । अन्न अन्न करिती वेडीं ॥ ३ ॥ दास म्हणे हो अंतर । देव कृपेचा सागर ॥ ४ ॥

७. देव एका भाग्य देतो । एका भिकेसि लावितो ॥ १ ॥ नकळे भगवंताचें करणें । राव रंक तत्क्षणें ॥ २ ॥ तयासि चुकलीं बापुडीं । अन्न अन्न करितीं वेडीं ॥ ३ ॥ रामदास म्हणे पाहीं । देवावीण कांहीं नाहीं ॥ ४ ॥

८. माया लाविली मांईक[5] । आदि अंतीं देव एक ॥ १ ॥ देव संकटीं

---

१ चाकर. २ देह, काया. ३ ते गोडी बापुडी ( व्यर्थ ) होय असें म्हणे. ४ आकाशांत. ५ मिथ्या.

पावता । देव अंतीं सोडविता ॥ २ ॥ तयासि चुकलीं बापुडीं । अन्न अन्न करितीं वेडीं । ३ ॥ रामदास नवल परी । देव सर्वांचे अंतरीं ॥ ४ ॥

९. क्षुधा लागतांचि अन्न । तृषा लागतां जीवन[1] ॥ १ ॥ निद्रा लागतां शयन । आळस येतां चुके मन ॥ २ ॥ मळमूत्र संपादणें । शौच आचमन करणें ॥ ३ ॥ खाणें लागे नानापरी । सर्वकाळ भरोवरी ॥ ४ ॥ अवघा धंदाचि लागला । दिवसेंदिवस काळ गेला ॥ ५ ॥ रामीं रामदास म्हणे । देह सुखवाडा[3] करणें ॥ ६ ॥

१०. हात धुणें पाय धुणें । नाना उपचार करणें ॥ १ ॥ सर्वकाळ लोभासंगें । करणें लागे हो अभ्यंगें ॥ २ ॥ वस्त्रें अलंकार पाहतां । पुढती घालितां काढितां ॥ ३ ॥ सदा इंद्रिय गळतां । त्यासि करावी शुद्धता ॥ ४ ॥ अवघा धंदाचि लागला । दिवसेंदिवस काळ गेला ॥ ५ ॥ रामदास म्हणे हित । कैसें घडावें स्वहित ॥ ६ ॥

११. शीतकाळींच हुताशें[5] । उष्णकाळीं वारावास[6] ॥ १ ॥ आले पर्जन्याचे दिवस । केले घराचे सायास ॥ २ ॥ नाना व्याधींचीं औषधें । पथ्य करावें निरोधें ॥ ३ ॥ विषयी जनांसि आदर । करणें लागे निरंतर ॥ ४ ॥ अवघा धंदाचि लागला । दिवसेंदिवस काळ गेला ॥ ५ ॥ दास म्हणे सांगों किती । ऐसी देहाची संगती ॥ ६ ॥

१२. धनाधान्याचें संचित । करणें लागे सावचित्त ॥ १ ॥ अर्थां[7] जातो एकला रे । कलह करावे आदरें ॥ २ ॥ नाना पशूंतें पाळावीं । नाना कृत्यें सांभाळावीं ॥ ३ ॥ सार विचार जतन । करणें लागे सावधान ॥ ४ ॥ अवघा धंदाचि लागला । दिवसेंदिवस काळ गेला ॥ ५ ॥ रामदास म्हणे देवा । जीव किती हा घालावा ॥ ६ ॥

१३. पोटधंदा जन्मवरी । करूं जातां नाहीं पुरी ॥ १ ॥ करितां संसारीं सायास । नाहीं क्षणाचा अवकाश । अन्न निर्माण कराया । सर्वकाळ पीडी काया ॥ ३ ॥ काम करितां दिवस थोडा । ऐशा कष्टा नाहीं जोडा ॥ ४ ॥ अवघा धंदाचि लागला । दिवसेंदिवस काळ गेला ॥ ५ ॥ दास म्हणे सावधान । झालें सदृढ बंधन ॥ ६ ॥

१४. शिंक जांभई खोकला । तितुका काळ व्यर्थ गेला ॥ १ ॥ आतां ऐसें न करावें । नाम जीवीं तें धरावें ॥ २ ॥ श्वास उश्वास निघतो । तितुका काळ व्यर्थ जातो ॥ ३ ॥ पात्यां पातें नलगत । तितुकें वय व्यर्थ

१ पाणी. २ भ्रमतें. ३ देहाचें सुख पाहणें. ४ पूर्ण, नीट. ५ अग्नि, ६ वारा घेणें. ७ द्रव्यप्राप्तीकरितां ८ डोळ्यांच्या पात्यास पातें लवतें न लवतें इतक्या अत्यल्प काळांत.

जात ॥ ४ ॥ लागे अवचित उचकी । तितुकें वय काळ लेखी ॥ ५ ॥ म्हणे रामीं रामदास । होतो आयुष्याचा नाश ॥ ६ ॥ श्रीराम.

---

## २. कलियुगपंचक.

१. आलें भगवंताच्या मना । तेथें कोणाचें चालेना ॥ १ ॥ जैसा कलिराजा आला । धर्म अवघाचि बुडाला ॥ २ ॥ नीति मर्यादा उडाली । भक्ति देवाची चुकली ॥ ३ ॥ दास म्हणे पाप जालें । पुण्य अवघेंचि बुडालें ॥ ४ ॥

२. विप्रीं सांडिला आचार । क्षेत्रीं[1] सांडिला विचार ॥ १ ॥ मेघवृष्टी मंदावली । पिकें भूमीनें सांडिलीं ॥ २ ॥ बहुवृष्टी अनावृष्टी । दास म्हणे केली सृष्टी ॥ ३ ॥

३. लोकें[2] दोष आचरती । तेणें दोषें भस्म होती ॥ १ ॥ जनीं दोष जाले फार । तेणें होतसे संहार ॥ २ ॥ रामदास म्हणे बळी । दिसेंदिसें पापें कळीं[3] ॥ ३ ॥

४. नाहीं पापाचा कंटाळा । येतो हव्यास[4] आगळा ॥ १ ॥ जना सुबुद्धी नावडे । मन धांवे पापाकडे ॥ २ ॥ रामीं रामदास म्हणे । पुण्य उणें[5] पाप दुणें ॥ ३ ॥

५. पुण्यक्षेत्रें तीं मोडावीं । आणि ब्राह्मण्यें पीडावीं ॥ १ ॥ पुण्यवंत ते मरावे । पापी चिरंजीव व्हावे ॥ २ ॥ रामदास म्हणे वाड[6] । विघ्नें येती धर्मा आड ॥ ३ ॥

६. लोक मिणमिणेचि[7] चालती । त्यांसि होताती विपत्ती ॥ १ ॥ धर्मप्रवृत्ती बुडावी । शास्त्रमर्यादा उडावी ॥ २ ॥ रामदास म्हणे देवें । मौन्य[8] होऊनी बैसावें ॥ ३ ॥

---

## ३. मूर्खपणपंचक.

१. येथें काय रे वाजतें । कोठें काय गजबजतें ॥ १ ॥ उगा करिती कोल्हाळ । माझें उठलें कपाळ ॥ २ ॥ हाका मारूनि वरडती । टाळ

---

१ क्षत्रियांनीं. २ लोक आपल्याच पापानें मरत असतात. ३ कलीला दिवसेंदिवस पापाचरणामुळें बळ चढत आहे. ४ नवनवे उद्योग. ५ पुण्य कमी व पाप दुप्पट ! ६ मोठाली. ७ ओशाळेपणानें वागतात, निस्पृहपणानें बोलत नाहींत. ८ मौन धरून.

अवघेचि कूटिती ॥ ३ ॥ कोठें कैंचे आले लुटे । वायां झाले टाळकुटे ॥ ४ ॥ वेडीं संसार सांडिला । व्यर्थ गलबला मांडिला ॥ ५ ॥ दास म्हणे या मूर्खाला । हरिकथेचा कंटाळा ॥ ६ ॥

२. हरिकथेचा आला राग । खेळ होतां घाली त्याग ॥ १ ॥ ऐसे प्रकारचे जन । नाहीं देवाचें भजन ॥ २ ॥ कळावंताचें तों गाणें । ऐकतांचि जीव माने ॥ ३ ॥ करिती लग्नाचा उत्साव । नाहीं देव महोत्सव ॥४॥ भूतदया नाहीं पोटीं । खाती लोभाचीं चोरटीं ॥५॥ रामीरामदास म्हणे देव धर्म कोण जाणे ॥ ६ ॥

३. स्वार्थ केला जन्मवरी । लोभें [१]राहिला श्रीहरी ॥ १ ॥ धन धान्य [२]अहर्निशीं । गाई महिषी घोडे दासी ॥ २ ॥ शेत वाडे घर ठावो । प्राणी जीवीं धरी [३]हांवो ॥ ३ ॥ माता पिता बाहिणी भ्राता । कन्या पुत्र आणि कांता ॥ ४ ॥ त्याही जांवई आपुले । इष्ट मित्र सुखी केले ॥ ५ ॥ दास म्हणे हो शेवटीं । प्राप्त झाली [४]मसणवटी ॥ ६ ॥

४. जन्मवरी शीण केला । अंतकाळीं व्यर्थ गेला ॥ १ ॥ काया स्मशानीं घातली । कन्या पुत्र [५]मुरडलीं ॥ २ ॥ घरवाडा तो राहिला । प्राणी जातसे एकला ॥ ३ ॥ धन धान्य तें राहिलें । प्राणी चर्फडित गेलें ॥ ४ ॥ इष्ट मित्र आणि सांगाती । आपुलाले घरा जाती ॥५॥ दास म्हणे प्राणी मेले । कांहीं पुण्य नाहीं केलें ॥ ६ ॥

५. दैन्यवाणा झाला प्राणी । [६]चंद्री लागलीं नयनीं ॥ १ ॥ म्हणती ऊचला ऊचला । आतां भूमी भार झाला ॥ २ ॥ घोर लागला [७]अमूप । प्राणी झाला प्रेतरूप ॥ ३ ॥ दांतखिळ बसली वाणी । ताठा भरला करचरणीं ॥ ४ ॥ डोळे विक्राळ दिसती । झांका झांका मुलें भीती ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । अवघीं सुखाचीं [८]पीसुनें ॥ ६ ॥

६. एक म्हणती कां पळावें । एक म्हणती कां बैसावें ॥ १ ॥ लोक बोलती मत्सरें । काय मानावें तें खरें ॥ २ ॥ एक म्हणती कां सोडावें । एक म्हणती कां मोडावें ॥ ३ ॥ दास म्हणे हो तत्वता । जाण अवघी बाष्कळता ॥ ४ ॥

७. नाहीं ज्ञानाचा विचार । केला अज्ञानें संचार ॥ १ ॥ मना आलें तें बोलती । चालों नये तें चालती ॥ २ ॥ अवघा स्वधर्म बुडाला । देह प्रपंचीं लाविला ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । अविद्येचीं हीं लक्षणें ॥४॥

---

१ अंतरला. २ रात्रंदिवस. ३ हांव, अनावर लोभ. ४ मृत्यु. ५ परतलीं. ६ तंद्री. ७ मोठा. ८ पिशुनें, लोभी.

८. स्नान नाहीं संध्या नाहीं । देव नाहीं धर्म नाहीं ॥ १ ॥ उगाच बसुनीयां घरीं । सज्जनाची निंदा करी ॥ २ ॥ तीर्थ नाहीं क्षेत्र नाहीं । दान नाहीं पुण्य नाहीं ॥३॥ तप नाहीं शास्त्र नाहीं । मंत्र नाहीं गायत्री नाहीं ॥४॥ पोटीं नाहीं निस्पृहता । नाहीं विद्येनें पूरता ॥ ५ ॥ रामदास सांगे खुणें । पापी सर्वांपरी उणे ॥ ६ ॥

९. कपटी कुटिळ आळसी । घरीं मिळेना खायासी ॥ १ ॥ उगाच धरितसे ताठा । पापी दरिद्री करंटा ॥ २ ॥ पोरें म्हणती काय खावें । स्त्रिया म्हणती कोठें जावें ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । अवघीं हासती पीसुनें ॥ ४ ॥

१०. स्वयें आचरावें पाप । विशेष निंदा वज्रलेप ॥ १ ॥ निद्रा मत्सर टवाळी । मायबापाशीं ढवाळी[1] ॥ २ ॥ अनाचारी परद्वारी[2] । मना आलें तेंचि करी ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । असे जिताचि मरणें ॥ ४ ॥

---

## ४. भ्रांतिपंचक.

१. गळां बांधिला पाषाण । आत्मलिंग[3] जाणे कोण ॥ १ ॥ जिवाशिवाचें स्वरूप । कोण जाणे कैसें रूप ॥ २ ॥ लिंग चुकलें स्वयंभ[4] । धरि पाषाणाचा लाभ ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । भेद जाणती शहाणे ॥४॥

२. पृथ्वी अवघी लिंगाकार । अवघा लिंगाचा विस्तार ॥ १ ॥ आतां कोठें ठेऊं भाव । जेथें तेथें महादेव ॥ २ ॥ अवघा देव विस्तारला । ऐसें देवचि बोलिला ॥३॥ राम दासा विसरला । अवघा देवचि भरला ॥ ४ ॥

३. एकविस स्वर्ग विस्तारला । देव संपुष्टीं घातला ॥ १ ॥ केलें देवासी बंधन । तेंचि पावला आपण ॥२॥ देव ठायीचा अनंत । त्यासी म्हणती अंतवंत[5] ॥ ३ ॥ रामदास म्हणे भावें । जैसें द्यावें तैसें घ्यावें ॥ ४ ॥

४. अंत नाहीं तो अनंत । त्यासि दोरी[6] करी भ्रांत ॥ १ ॥ ऐसें जनाचें करणें । कैसा संसार तरणें ॥ २ ॥ देव व्यापक सर्वांसी । त्यासि म्हणती एकदेशी ॥ ३ ॥ रामदासीं देव पूर्ण । त्यासि म्हणती अपूर्ण ॥ ४ ॥

५. देव पाषाण भाविला । तोचि अंतरीं दाविला ॥ १ ॥ जैसा भाव असे जेथें । तैसा देव वसे तेथें ॥२॥ दृश्य बांधोनीयां गळा । देव जाहला निराळा ॥ ३ ॥ दास म्हणे भावांतीत[7] । होतां प्रगटे अनंत ॥ ४ ॥

---

१ कपट. २ परस्त्रीसंग करणारा. ३ स्वरूपाची खूण. ४ स्वतः सिद्ध उघड असून. ५ नाशवंत. ६ अनंतचतुर्दशीला अनंताची दोरी करून पूजतात ती. ७ पदार्थांवेगळा.

६. अवघे पाषाण मांडिले । कोण म्हणती आपुलाले ॥ १ ॥ सर्व घटीं देव एक । भेदें भाविला अनेक ॥ २ ॥ देव निर्मळ निश्चळ । पाहती पाषाणाची खोळ ॥ ३ ॥ रामदासाचें अंतर । देवापासीं निरंतर ॥ ४ ॥

७. धान्य अवघेंचि टाकिती । बळ देखतां तोंडीं माती ॥ १ ॥ देव सर्वांचे अंतरीं । सोडूं जातां तैसी परी ॥२॥ तूप सांडुनी आपण । खाऊं पाहे सांठवण[1] ॥३॥ दास म्हणे ते रांवुळा[2] । सोडुन पूजिती देउळा ॥ ४ ॥

८. सांठवणेंवीण धान्य । धान्येंवीण सांठवण ॥ १ ॥ एकावीण एक काय । कामा न ये वायां जाय ॥ २ ॥ ज्ञानेंवीण उपासन । उपासनेवीण ज्ञान ॥ ३ ॥ रामीरामदासावीण । करी नुस्तेंचि भजन ॥ ४ ॥

---

## ५. अभिमानपंचक.

१. संसाराचें दुःख आलें । गाणें[3] अवघेंचि बुडालें ॥ १ ॥ आतां आठवेना कांहीं । पडिलों चिंतेच्या प्रवाहीं ॥२॥ गाणें नाचण सुखाचें । जिणें जाहलें दुःखाचें ॥ ३ ॥ म्हणे रामीरामदास कोण करितो सायास ॥ ४ ॥

२. नाना प्रकारींचें गाणें । मीच बाळपणीं जाणें ॥ १ ॥ काय जहालें कळेना । एक तेंही आठवेना ॥२॥ मज पाठांतर होतें । तितुकें कोणासी नव्हतें ॥ ३ ॥ रामदास म्हणे आतां । जीव जहाले दुश्चिता ॥ ४ ॥

३. वोढवलें पूर्वपाप । नानाप्रकारें संताप ॥ १ ॥ तेणें शुद्धिच उडाली । नीति अवघीच बुडाली ॥ २ ॥ केली क्रिया ते कळेना । मन विवेकें वळेना ॥ ३ ॥ भरीं भरलेंसे मन । अवघें तेंचि तें कारण ॥ ४ ॥ झोंबे विकल्पाचें श्वान । देहबुद्धी घेते रान ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । अवघीं झालीं कुलक्षणें ॥ ६ ॥

४. सात पांच गांववाट । अवघा एकचि चौहाट[4] ॥ ४ ॥ तेथें कोणेकडे जावें । अवघी वाटचि स्वभावें ॥ २ ॥ कोण दिसेना वेळेसीं । वाट पुसावी कोणासी ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । तैसें संशय बोलणें ॥४॥

---

## ६. उन्मत्तपंचक.

१. रामीं विसरला प्राणी । कामलोभें केली हाणी ॥ १ ॥ कामधेनु मोकेलिली । घरीं गाढवी बांधिली ॥२॥ उपडूनी कल्पतरू । केला शेराचा आदरु ॥ ३ ॥ सांडुनीया चिंतामणी । वेंची दहिंवराचें[6] पाणी ॥ ४ ॥ गेलें[5]

---

१ भांडें, पात्र. २ राऊळ, देव. ३ सुखाच्या गोष्टी. ४ चव्हाटा. ५ हाकून लावली. ६ दंव.

हातींचें निधान। केलें कवडीचें साधन ॥ ५॥ परिस रागें हुंडारिला[1] हातीं पाषाण घेतला ॥ ६ ॥ सार अमृत सांडिलें। दैन्यवाणें कांजी प्याले ॥ ७॥ सोनें सांडुनी आदरें। वेंचूं लागला खापरें ॥ ८॥ रत्न सांडुनियां खडे। गेले म्हणून दुःखें रडे ॥ ९ ॥ केली साखर परती । सुखें तोंडीं घाली माती ॥ १०॥ म्हणे रामीरामदास। तोडी संसाराची आस ॥ ११ ॥

२. शांति माता हे मारिली। भ्रांति तेथें प्रतिष्ठिली ॥ १ ॥ ऐसे लोक कलियुगीचे। भय न धरितां पापाचें ॥ २ ॥ विवेक गुरु तो मारिला। तेथें क्रोध प्रतिष्ठिला ॥ ३ ॥ नीति अमृत सांडिलें। असत्य मद्यपान केलें ॥ ४ ॥ दया बहिण संहारिली। निंदा मातंगी[2] पाळिली ॥ ५ ॥ पुत्र[3] विचार दवाडिला। दासीपुत्र प्रतिष्ठिला ॥ ६ ॥ सत्य ब्राह्मण मारिला। दोषी ढीवरें[4] पाळिला ॥ ७ ॥ ज्ञान पक्कान्न सांडिलें। माष[5] अज्ञान सेविलें ॥ ८ ॥ भक्ति लक्ष्मी ते त्यागिली। अभक्ति अवदसा घेतली ॥ ९ ॥ मित्र विश्वास सोडिला। शत्रु विकल्प जोडिला ॥ १० ॥ भेद चोरटे पाळिले। अभेद राजे दुरावले ॥ ११ ॥ रामीरामदास ह्मणे जळो। जळो अभक्तांचें जिणें ॥ १२ ॥

३. जेणें संसारीं घातिलें। पापी त्यासी विसरले ॥ १ ॥ श्रीसी[6] सांडोनियां दारा[7]। भजे दासीच्या डिंगरा[8] ॥ २ ॥ मायबापें दुरावलीं। चोरें आपुलीं मानिलीं ॥ ३ ॥ फोडोनियां शालिग्राम। वेश्या सेवितां अधम ॥ ४ ॥ रामीरामदास म्हणे। जळो अभक्तांचें जिणें ॥ ५ ॥

४. ज्यांच्या उदरासि आला। त्यांसी फिरोनि[9] पडला ॥ १ ॥ तोचि जाणावा चांडाळा। देवब्राह्मणाचा काळ ॥ २ ॥ झाला स्त्रियेसी लंपटु। मायबापांसि उद्धटु ॥ ३ ॥ भय पापाचें न धरी। सज्जनांची निंदा करी ॥ ४ ॥ नेणें माय कीं मावशी। कोणे सांगावें तयासी ॥ ५ ॥ रामीं रामदास म्हणे। यम केला त्याकारणें ॥ ६ ॥

५. प्राणी संसारासी आला। परि तो देवासी चुकला ॥ १ ॥ तगे नेगे तोचि तो अज्ञान। नेणे भगवंताचें ज्ञान ॥ २ ॥ देह आपुला मानिला। शेखीं सांडोनीयां गेला ॥ ३ ॥ जें जें कांहीं अशाश्वत। तें तें मानिलें शाश्वत ॥ ४ ॥ देवीं ब्राह्मणीं अभाव[10]। तेथें वर्णांगाचा भाव ॥ ५ ॥ रामदासाचें स्वहित। जेणें मानिलें अनहित ॥ ६ ॥

---

१ फेंकून दिला. २ मांगीण. ३ विचार ह्याच पुत्र. ४ कोळी. ५ उडीद. ६ लक्ष्मीसारखी. ७ स्त्री. ८ पोरास. ९ उलटून पडला. १० अश्रद्धा.

## ७. आळसपंचक.

१. श्रोतीं व्हावें सावधान । मना आलें तें गाईन ॥ १ ॥ ताल जाती एकीकडे । माझें गाणें भलतीकडे ॥ २ ॥ शेंडा मूळ तें नकळे । माझें गाणेंचि मोकळें ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । जेणें गुंतती शहाणे ॥ ४ ॥

२. राग मूर्छना कळेना । ताळ ध्रुपद वळेना ॥ १ ॥ त्यावेगळें सर्व ठावें । श्रोतीं सावधान व्हावें ॥ २ ॥ अर्थ प्रबंध विचार । नकळे नाहीं पाठांतर ॥ ३ ॥ भक्तिज्ञानाचा विश्वास । नाहीं म्हणे रामदास ॥ ४ ॥

३. निसुपणीं[1] जागवेना । काम क्रोध त्यागवेना ॥ १ ॥ इतुक्या वेगळें साधन । सांगा अवघेंची करिन ॥ २ ॥ आतां करवेना अभ्यास । तोडवेना आशापाश ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । रामनाम उच्चारणें ॥ ४ ॥

४. आम्हीं देवाचे आळशी । कांहीं न कळे आम्हांशीं ॥१॥ गोड गोड हो जेवणें । आठ दिवसा एक नाहाणें ॥ २ ॥ मऊ पलंग सुषुप्ती[2] । निद्रा पाहिजे पूरती ॥ ३ ॥ दास म्हणे लोभाविणें । करूं साक्षेप[3] भांडणें ॥ ४ ॥

५. आम्ही भगवंताचे भोळे । बाह्य अंतरीं मोकळे ॥ १ ॥ क्रोध आला तो साहवेना । उणें उत्तर पहावेना ॥२॥ आम्हां बोलों सके कोण । बोलासाठीं वेंचूं प्राण ॥ ३ ॥ दास म्हणे नीचोत्तरीं[4] । दुःख वाहूं जन्मवरी ॥४॥

६. आम्ही भगवंताचीं वेडीं । नेणों बोलाची परवडी[5] ॥ १ ॥ आम्हां घ्यावें ऐसे कळे । फिरोनि द्यावें हें नकळे ॥ २ ॥ घ्यावें एकाचें बुडवावें । तेथें वाइटपण द्यावें ॥ ३ ॥ ज्याचे तोंडावरी द्यावें । तेणें फिरोनी पडावें ॥ ४ ॥ दास म्हणे सांगों किती । लोक पाठींच लागती ॥ ५ ॥

७. पहा कलियुगाचे जन । कैसे अवघेच दुर्जन ॥ १ ॥ आप्त म्हणे मारूं जातां । त्यास वाटे परम व्यथा ॥ २ ॥ पाय देतां मानेवरी । सुखें डोळेचि वटारी ॥ ३ ॥ रामदास म्हणे मूर्ख । नेणो पराव्याचें[6] दुःख ॥ ४ ॥

---

## ८. बंधनपंचक.

१. सर्वकाळ शेंडा[7] मूळा । येत जातसे मुंगळा ॥ १ ॥ तैशा कां करिसि येरझारा । शरण जावें रघुवीरा ॥ २ ॥ हातीं धरुनियां सूत । खालीं वरती येत जात ॥ ३ ॥ दास म्हणे जळावरी । जैसी फिरली कीं भिंगोरी ॥ ४ ॥

---

१ झोपाळूपणें. २ गाढनिद्रा. ३ उठाठेवी. ४ नीचांच्या भाषणानें. ५ प्रकार. ६ दुसऱ्यानें. ७ वृक्षाच्या शेंड्यापासून मूळापर्यंत व पुन्हा उलट.

२. पायीं लाउनी दोरी। भोंगा[1] बांधिला लेंकुरीं ॥ १ ॥ तैसें पावसी बंधन। मग तुजला सोडिल कोण ॥ २ ॥ एक धरोनि वानर। हिंडविती दारोदार ॥ ३ ॥ रामदास ह्मणे पाहें। रीसें धापा देत आहे ॥ ४ ॥

३. नको करूं अभिमान। होणार तें देवाधीन ॥ १ ॥ बहु द्रव्यानें भुलले। काळें सर्वहि ग्रासिले ॥ २ ॥ जे म्हणती मी शक्त। तेणें जहाले आसक्त ॥ ३ ॥ रामदास सांगे वाट। कैसा होईल शेवट ॥ ४ ॥

४. डोळां अज्ञान झांपडी। पायीं देहबुद्धी बेडी ॥ १ ॥ असे अज्ञान पशुजना। जुंफियेले संसारघाणा ॥ २ ॥ खांदीं ओझें विषयाचें। पाठीं फटके सुखदुःखाचे ॥ ७ ॥ रामीरामदास म्हणे। व्यर्थ गेलें त्याचें जिणें ॥४॥

५. आलें संसाराचें ज्ञान। तेणें झालें समाधान ॥ १ ॥ सकळ सारा-चेंहि सार। ऐसा माझा हा संसार ॥ २ ॥ कैंचा देव कैंचा धर्म। तीर्थ-यात्रा कैंचा भ्रम ॥ ३ ॥ कैंचें ज्ञान कैंचें ध्यान। अन्न हेंचि समाधान ॥ ४ ॥ व्यर्थ गेला रे लौकिकीं। येणें पोट भरेना कीं ॥ ५ ॥ रामीराम-दास भले। आम्हां सौख्य हो मानलें ॥ ६ ॥

६. कल्पनेचे बरोबरी। मन सर्वकाळ करी ॥ १ ॥ स्वप्न सत्यचि वाटलें। दृढ जीवेंसी धरिलें ॥ २ ॥ अवघा माईक विचार। नाना मंदिर सुंदर ॥ ३ ॥ तोचि मानिला साचार। दिव्यांबर मनोहर ॥ ४ ॥ जीव सुखें सुखावला। थोर आनंद मानिला ॥ ५ ॥ रामदास म्हणे मंद। लिंग देहाचा आनंद ॥ ६ ॥

७. कांहीं कळेना विचार। अवघा झाला शून्याकार ॥ १ ॥ उमजेना सांसारिक। आठवेना परलोक ॥ २ ॥ अंध विवरीं पडियेले। अंधकारीं सांपडले ॥ ३ ॥ मायाजाळें गुंडाळले। वासनेनें वेंटाळिले ॥४॥ कामक्रोधें जाजावले[4]। मदमत्सरें पीडिले। रामीं रामदास म्हणे। अज्ञानाचीं हीं लक्षणें ॥ ६ ॥

८. अंध अंधारीं बैसले। त्यांसि हातें पालविलें[5] ॥ १ ॥ त्यांसि कळेना कळेना। त्यांची वृत्ती निवळेना ॥ २ ॥ संतसंगाचें बोलणें। संसारीक[6] काय जाणे ॥ ३ ॥ म्हणे रामीरामदास। केला नसतां अभ्यास ॥ ४ ॥

९. केला संसारअभ्यास। झाला आयुष्याचा नाश ॥ १ ॥ सदा उठतां

---

१ भुंगा, कीटक. २ अस्वल, मूर्ख. ३ सूक्ष्मदेहाचा. ४ कष्टी झाले. ५ खुणेनें बोला-वले. ६ प्रापंचिक लोक.

असतां । रामावीण केली चिंता ॥ २ ॥ नाहीं साक्षेपाचा वेग । उगाच मांडिला उद्योग ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । ऐसें जीताचि मरणें ॥ ४ ॥

## ९. पराधीनपंचक.

१. मुंगसाचे कानीं बाळी । मुंगुस हिंडे आळोआळीं ॥ १ ॥ तरि तें पाळिलें जाणावें । पराधीनचि स्वभावें ॥ २ ॥ वेडे आलेसे पाहुणे । तरि ते जगाचे मेहुणे ॥ ३ ॥ कार्यकर्ता कीर्तिवंत । त्यासी जाणती समस्त ॥ ४ ॥ कार्यकर्ता तो झांकेना । वेध लावी विश्वजना ॥ ५ ॥ दास म्हणे कुटुंबांचा[1] । तोचि पुरुष दैवाचा ॥ ६ ॥

२. निज सलगीचे जाणेना । पुढें कोणासी मानेना ॥ १ ॥ आळसी निकामी माणुस । पुढें होत कासावीस ॥ २ ॥ उगेंच नाचतें मुरडतें । कोण पुसतें तयातें ॥ ३ ॥ आपणास अवकाळिलें[2] ज्याचें त्यास कळों आलें ॥ ४ ॥ आधीं कष्टावें रगडावें । कार्य बहुतांचें करावें ॥ ५ ॥ बहुतांसीं मिळों जाणें । त्यासि मानिती शहाणे ॥ ६ ॥ बहुतां मानला तो लाख[3] । वरकड जाणावे नेल्याख[4] ॥ ७ ॥ आहे प्रगट उपाय । दास म्हणे सांगों काय ॥ ८ ॥

३. कष्ट करितां मनीं विटे । तरी तो कळेल शेवटें ॥ १ ॥ कष्टें उदंड आटोपावें[5] । तरी मग पुढें सुखी व्हावें ॥ २ ॥ असतां परधनवेडें । काय निवेल बापुडें ॥ ३ ॥ शहाणे उदंड कष्टती । वडिल उपकारें दाटती ॥४॥ बहुत राखिले लौकिक । त्यांचें जिणें अलोलिक ॥ ५ ॥ ज्यास त्यास पाहिजे तो । जनीं वाटपास येतो ॥ ६ ॥ मनोगत जाणे सूत्रें । जेथें तेथें जग मित्रें ॥ ७ ॥ न सांगतां काम करी । ज्ञान उदंड विवरी ॥ ८ ॥ स्तुती कोणाची न करी । प्राणिमात्रा लोभ करी ॥ ९ ॥ कदा विश्वास मोडीना कोणी माणूस तोडीना ॥ १० ॥ जनीं बहुतचि साहतो । कीर्तिरूपेंचि राहतो ॥ ११ ॥ दास म्हणे नव्हे दुःखी । आपण सुखी लोक सुखी ॥१२॥

४. आळसें पिंडाचें[6] पालन । परि अवघें नागवण ॥ १ ॥ देह केलें तैसें होतें । वंचिले जे करीना ते ॥ २ ॥ शक्ति आहे तों करावें । विश्व कीर्तीनें भरावें ॥३॥ पुण्यवंत तो साक्षेपी[7] । आळसी महा लोकीं पापी ॥४॥ आपलाचि घात करी । सदा कठोर वैखरी ॥ ५ ॥ माणुस राजी

१ विश्वकुटुंबी. २ अवमानिले. ३ लाखांतला माणुस किंवा लायख. ४ नालायख. ५ कार्य करावें. ६ देहाचें. ७ उद्योगी.

राखों नेणे। त्यासि न मानिती शहाणे ॥६॥ गुणें माणुस भोगतें। अवगुणें थींतें जातें ॥ ७ ॥ दास म्हणे भला भला। जेथें तेथें पवाडा केला ॥ ८ ॥

५. सुंदर आळसाची बाईल। पुढें काळ रे खाईल ॥ १ ॥ ज्याचे वडिल आळसी। कोणें सिकवावें तयासी ॥ २ ॥ घरीं खाया न जेवाया। नाहीं लेया ना नेसाया ॥३॥ पत्नी उदंडची खाती। आळसी उपवासी मरती ॥ ४ ॥ दास म्हणे सांगों काय। होतां प्रगट उपाय ॥ ५ ॥

६. ऐसें कैसें रे भजन। करितात मूर्ख जन ॥ १ ॥ गधड्यासि नमन केलें। तेणें थोबाड फोडिलें ॥ २ ॥ उंच नीच सारिखेची। दास म्हणे होते छी छी ॥ ३ ॥

---

## १०. मलिनपंचक.

१. महादर्पण खंतलें[1]। तेणें मुख आच्छादलें ॥ १ ॥ तैसी वृत्ति हे माळिन। होतां बुडे समाधान ॥२॥ धातुवरी आला मळ। तेणें लोपलें[3] निर्मळ ॥३ ॥ शेतीं न जातां आडत। तेणें आच्छादलें[4] शेत ॥ ४ ॥ मुखें न होतां उच्चार। तेणें बुडे पाठांतर ॥ ५ ॥ नाहीं दीपाचा विचार। दास म्हणे अंधकार ॥ ६ ॥

२. आत्मज्ञानी आहे भला आणि संशय उठला ॥ १ ॥ त्यासि नामचि कारण। नामें शोकनिवारण ॥ २ ॥ नानादेश केले जनीं। अनुताप आला मनीं ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे। जया स्वहित करणें ॥ ४ ॥

---

## ११ प्रस्ताविकपंचक.

१. डोळे चिरींव चांगले। वृद्धपणीं सरक्या झाले ॥ १ ॥ ओले मातीचा भरंवसा। काय मानिसी माणसा ॥ २ ॥ मुख रसाळ चांगलें। पुढें अवघें सुकुंतलें ॥ ३ ॥ रम्य नासिक सरळें। सर्वकाळ पाणी गळे कर्ण भूषणें सुंदर। पुढें जाहली बधिर ॥ ५ ॥ बरवी दंतांची पंगती। परि ते उन्मळोनि पडती ॥ ६ ॥ बरवे कर आणि चरण। परि ते झाले निष्कारण ॥ ७ ॥ अंगकांती होती बरी। झाली चिरगुटाचे परी ॥ ८ ॥ केश होताती पांढरे। लाळ गळतां नाधरे ॥ ९ ॥ बहुसाल होतें बळ[2]। पुढें जाहलें निर्बळ ॥१०॥ देह होतें जें निर्मळ। तेंचि झालें अमंगळ ॥११॥

---

१ व्यर्थ. २ पराक्रम. ३ मलिन झालें. ४ बुडालें.

सर्व तारुण्यें चांगला । प्राणी दीनरूप झाला ॥१२॥ रामीरामदास म्हणे । आतां सावधान होणें ॥ १३ ॥

२. थोंटे पांगुळे बधिर । आतां तरी होती नर ॥ १ ॥ नाहीं देहाचा भरंवसा । शरण जावें जगदीशा ॥ २ ॥ कोड कुश्चळ सर्वांगीं । एक झाले क्षयरोगी ॥ ३ ॥ एक प्राणी अंध होती । एका समंध लागती ॥४॥ नाना रोगाचे[1] उमाळे । काय होईल नकळे ॥ ५ ॥ रामदास म्हणे भावें । वेगीं सार्थक करावें ॥ ६ ॥

३. वेगीं व्हावें सावधान । ऐसें आहे वृद्धपण ॥ १ ॥ डोळे जाती कान जाती । दांत अवघेचि पडती ॥ २ ॥ हात गेले पाय गेले । देह पाझरों लागले ॥३॥ दास म्हणे शक्ती गेली । मती अवघीच खुंटली ॥ ४ ॥

४. ऐसें आहे सर्व कांहीं । चिरंजीव कांहीं नाहीं ॥ १ ॥ युक्ती जात्ये बुद्धी जात्ये । क्रिया तेही पालटत्ये ॥ २ ॥ धीर विचार बुडाला । होता विवेक तोही गेला ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । वृद्धपणाचीं लक्षणें ॥ ४ ॥

५. अंतीं एकलाची जावें । म्हणोनी राघवीं भजावें ॥ १ ॥ मातापिता बंधुजन । कन्या पुत्रही सोडून ॥ २ ॥ जन्मवरी केला भार । सर्वी सोडूनी जोजार[2] ॥ ३ ॥ म्हणे रामीरामदास । सर्व सांडोनियां आस ॥ ४ ॥

६. क़ाळ जातो क्षणक्षणा । मूळ[3] येईल मरणा ॥ १ ॥ कांहीं धांवाधांव करी । जंव तो काळ आहे दुरी ॥ २ ॥ देह आहे जाईजणें[4] । भुललासी कवण्या गुणें ॥ ३ ॥ मायाजाळीं गुंतलें मन । परि हें दुःखाचें कारण ॥ ४ ॥ सत्य वाटतें सकळ । परी जातां नाहीं वेळ ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । आतां सावधान होणें ॥ ६ ॥

७. झालें देह हो गलित । आलें संसार लंघित ॥ १ ॥ सावधान सावधान । पुढें नाहीं व्यवधान ॥ २ ॥ आतां मन आटोपावें । आपुल्या निजधामा जावें ॥ ३ ॥ राहे देवाचें स्मरण । रामीरामदास म्हणे ॥ ४ ॥

८. पुण्य पहाया कारणें । देव धाडी बोलावणें ॥ १ ॥ वाट चांगली धरावी । पुण्यसामुग्री करावी ॥ २ ॥ वाटे वेंच नाहीं जया । पुढें सुख कैंचें तया ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । बुद्धिवंत ते शहाणे ॥ ४ ॥

९. अंतकाळ येतयेतां । पुढें न ये चुकवितां ॥ १ ॥ अकस्मात लागे जावें । कांहीं पुण्य आचरावें ॥२॥ पुण्याविण जातां प्राणी । घडे यमाची जाचणी ॥ ३ ॥ रामदास म्हणे जना । कठिण यमाची यातना ॥ ४ ॥

---

1 लोट. २ पसारा, त्रास. ३ आमंत्रण. ४ नाशवंत.

१०. अभक्त भोगीत यातना । देव राखे भक्तजना ॥ १ ॥ देव भक्त दोन्ही एक । यम देवाचा सेवक ॥ २ ॥ भक्तें देव केला सखा । तोचि त्याचा पाठीराखा ॥३॥ रामीरामदास म्हणे । भक्ति करा या कारणें ॥४॥

११. लक्ष्मी आहे रे चंचल । ईस जातां नाहीं वेळ ॥ १ ॥ सत्य मानावें उत्तर । देव नित्य निरंतर ॥ २ ॥ नानावैभव समस्त । येती जाती अकस्मात ॥ ३ ॥ म्हणे रामीरामदास । काय देहाचा विश्वास ॥ ४ ॥

१२. नाना व्यथा उद्भवती । प्राणी अकस्मात जाती ॥ १ ॥ मृत्यु बांधला पदरीं । होती आयुष्याची भरी[1] ॥ २ ॥ काळ लागला सन्निधी । एक घडी लागों नेदी ॥३॥ रामदास म्हणे खुणें । भेद जाणती शहाणे ॥४॥

१३. नदी मर्यादा[2] सांडिती । उष्णकाळीं वोस होती ॥ १ ॥ तैसा तारुण्याचा भर । सर्वेंचि होतसे उतार ॥ २ ॥ भाग्य चढों लागे वेगें । सर्वेंचि प्राणी भीक मागे ॥ ३ ॥ रामदास म्हणे काळ । दानीं दिवस पर्वकाळ ॥ ४ ॥

१४. पुरें पट्टणें वसती । एक वेळे वोस होती ॥ १ ॥ तैसें वैभव सकळ । येतां जातां नाहीं वेळ ॥ २ ॥ बहु सृष्टीची रचना । होय जाय क्षणक्षणा ॥ ३ ॥ दास म्हणे सांगों किती । आले गेले चक्रवर्ती[3] ॥ ४ ॥

१५. सेवकासी भाग्य चढे । त्याचे अधीन होणें पडे ॥ १ ॥ देव करील तैसें व्हावें । काय करील तें पहावें ॥ २ ॥ वर्तमान घडे जैसें । उगेंच व्हावें लागे तैसें ॥ ३ ॥ दास म्हणे वेळ कैसी । राज्य जाहलें कलिसीं ॥ ४ ॥

१६. काम क्रोध खवळले । मद मत्सर मातले ॥ १ ॥ त्याचे अधीन लागे होणें । ऐसें केलें नारायणें ॥ २ ॥ लोभ दंभ अनावर । जाहला गर्व अहंकार ॥ ३ ॥ दास म्हणे सांगों किती । पडली ऐशांची संगती ॥ ४ ॥

१७. ऐसें कैसें रे सोवळें । शिवतां होतसे ओवळें ॥ १ ॥ स्नानसंध्या टिळे माळा । पोटीं क्रोधाचा उमाळा ॥ २ ॥ नित्य दंडितोसि देह । तरी फिटेना संदेह ॥ ३ ॥ बाह्य केली झळफळ । देहबुद्धीचा विटाळ ॥ ४ ॥ नित्य नेम खटाटोप । मनीं विषयाचा जप ॥ ५ ॥ रामदासीं दृढभाव । तेणेंविण सर्व वाव ॥ ६ ॥

१८. देह विटाळाचा गोळा । कैसा होतसे सोवळा ॥ १ ॥ तुज कळेना विचारु । ऐसियासि काय करूं ॥ २ ॥ दृढ केला अभिमान । तेणें जाहलें बंधन ॥ ३ ॥ रामदासीं स्वामीविण । केला तितुका होय शीण ॥ ४ ॥

---

१ भरती. २ नद्या पावसाळ्यांत भरून वाहतात. ३ सार्वभौम राजे.

१९. गेला संदेहाचा मळ । तेणें निःसंग निर्मळ ॥ १ ॥ बाह्य गंगा-जळस्नान । चित्तशुद्धि ब्रह्मज्ञान ॥ २ ॥ सर्वकाळ कर्मनिष्ठ । सर्वसाक्षित्वें वरिष्ठ ॥ ३ ॥ रामदासीं स्नानसंध्या । सुत करी माता वंध्या ॥ ४ ॥

२०. सर्वकाळ संतृप्तता । तृप्त केली लोलंगता ॥ १ ॥ फळ जहालें तर्पणीं । संसारासीं पडिलें पाणी ॥ २ ॥ देवराव तृप्त केले । भावें आत्म निवेदिलें ॥ ३ ॥ रामदासाचे तर्पणीं । सर्व केलें रामार्पणीं ॥ ४ ॥

२१. अनित्याचा भ्रम गेला । शुद्ध नित्य नेम केला ॥ १ ॥ नित्यानित्य हा विचार । केला स्वधर्म आचार ॥२॥ देहबुद्धी अनर्गळ[1] । बोधें फिटला विटाळ ॥ ३ ॥ रामदासीं ज्ञान झालें । आणि स्वधर्म रक्षिले ॥ ४ ॥

---

## १२. वेडसरपंचक.

१. पडसादासीं[2] करीं वाद । खळाळाशीं तो विवाद ॥१॥ तेथें चालेना मीपण । शीण पावावा आपण ॥ २ ॥ सावधानासवें जावें । प्रतिबिंबेसीं भांडावें ॥ ३ ॥ रामदास म्हणे भावें । समुद्रासीं गडगडावें ॥ ४ ॥

२. संत बोलले बहुविध । तेथें कैंचे म्हणूं सिद्ध ॥ १ ॥ कोणकोणासीं भांडावें । कोण्या पंथासीं मोडावें ॥ २ ॥ बहु यात्रा पृथ्वीवरी । बहु शब्द नानापरी ॥ ३ ॥ नाना सैन्य नाना पुरें । दास म्हणे ते उत्तरें ॥४॥

३. माया अविद्येचें बंड । नाना प्रकारीं थोतांड ॥ १ ॥ अवघें सांडु-नीयां द्यावें । एक भगवंता पहावें ॥२॥ पंचभूतांचा मेळावा । दृश्य पदार्थ आघवा ॥ ३ ॥ म्हणे रामीरामदास । दृश्य भासे मनोभास ॥ ४ ॥

४. आमचे वंशीं कैंचा राम । एक पिंडीचें निःकाम ॥ १ ॥ रामदास्य आलें हातां । अवघा वंश धन्य आतां ॥२॥ बापें केली उपासना । आह्मी लाधलों त्या धना ॥ ३ ॥ बंधु अभिलाषा टेंकला । वांटा घेउनि भिन्न झाला ॥४॥ पोर सकळां संकोचले । एक सुखा उधळले ॥ ५ ॥ रामी-रामदासीं स्थिति । पाहिली वाडिलांची रीती ॥ ६ ॥

५. माजीं[3] बांधावा भोंपळा । तैशी बांधों नये शिळा ॥ १ ॥ सारासार निवडावें । तैसें जाणोनियां घ्यावें ॥ २ ॥ रत्न खडे येर खडे । सगट देतां प्राणी रडे ॥ ३ ॥ एका ठायीं सोनें लाख । लाख देतां मारी हाक ॥ ४ ॥ मनुष्य गोड घांस घेतें । कडु अवघें सांडितें ॥ ५ ॥ दास म्हणे भक्ति सारा । नको अभक्त गव्हारा[4] ॥ ६ ॥

---

१ अमर्याद, मोकाट. २ प्रतिध्वनीशीं. ३ कमरेस. ४ मूर्खा.

६. गगन आडताचि नाहीं । तैसे निरंजन पाहीं ॥ १ ॥ चंचळगुणें सगुणें । विकार आड तो पावणें ॥२॥ सारासारनिवड नाहीं । प्रत्ययानें पाहें कांहीं ॥ ३ ॥ कडुविख आणि वावडें । तया लिगडोनि पडे वेडें ॥४॥ तैसें संसाराचें सुख । आदि अंतीं अवघें दुःख ॥ ५ ॥ सुखासारिखें दिसतें । उदंड दुःख आहे तेथें ॥ ६ ॥ दास म्हणे हा वळसा[1] । कोणें सोसावा गळसा[2] ॥ ७ ॥

७. भगवंताचे भक्तीसाठीं । थोर करावी आटाआटी ॥ १ ॥ स्वेदबिंदु[3] आले जाण । तेंचि भागिरथीचें स्नान ॥ २ ॥ वोळंगतां देवराव । सहज होतसे उपाय ॥ ३ ॥ सकळ लोकांचें भाषण । देवासाठी संभाषण ॥ ४ ॥ जें हारपलें सांडलें । देवावीण कोठें गेलें ॥ ५ ॥ जठराग्नीस अवदान । लोक म्हणती भोजन ॥ ६ ॥ एकवीस सहस्र जपं[4] । होतो न करितां साक्षेप ॥ ७ ॥ दास म्हणे मोठें चोज । देव सहजींसहज ॥ ८ ॥

८. माजीं बांधावा भोंपळा । तैसी बांधो नये शिळा ॥ १ ॥ घेऊं ये तेंचि घ्यावें । येर अवघेंचि सांडावें ॥ २ ॥ विषवल्ली अमरवल्ली । अवघी देवेंचि निर्मिली ॥ ३ ॥ अवघी सृष्टीची लगट । करूं नये कीं सगट ॥ ४ ॥ अवघेंचि केलें देवें । जें जें माने तेंचि घ्यावें ॥ ५ ॥ अवघें सगट सारिखेंची । वाट मोडे साधनाची ॥ ६ ॥ दास म्हणे हरिजन । धन्य जाणे तो सज्जन ॥ ७ ॥

९. वेधें भेदावें अंतर[5] । भक्ति घडे तदनंतर ॥ १ ॥ मनासारिखें चालावें । हेतु जाणोनी बोलावें ॥ २ ॥ जनीं आवडीचे जन । तेचि होती हो सज्जन ॥ ३ ॥ बरें परीक्षावें जना । अवघें सगट पिटवेना ॥ ४ ॥ दास म्हणे निवडावें । लोक जाणोनीयां घ्यावे ॥ ५ ॥

१०. यथातथ्य आठवेना । कांहीं हित तें घडेना ॥ १ ॥ कांता ज्याचे बंदिखाना । नव महिने पतना ॥ २ ॥ बारा वर्षें बाळपण । आंगीं होतें मूर्खपण ॥ ३ ॥ पुढें तारुण्याचे भरें । आलें कामाचें विखारें[6] ॥ ४ ॥ पुढें आलें वृद्धपण । सवें पातलें मरण ॥ ५ ॥ दास म्हणे रात्रंदिवस । नाहीं मराया अवकाश ॥ ६ ॥

११. देवें जन्मासि घातलें । नाना सुख दाखविलें ॥ १ ॥ त्यासि कैसें विसरावें । पुढें कैसेंनि तरावें ॥२॥ कुळ समूळ सांभाळिलें । नानाप्रकारीं पाळिलें ॥३॥ दास म्हणे देवावीण । दुजा सांभाळीतो कोण ॥४॥

---

१ जन्माचा फेरा. २ गळासारखा. ३ घामाचे थेंब. ४ अजपाजप. ५ वेध लावून अंतर हातीं घ्यावें. ६ कामसर्प.

१२. रात्रंदिवस दुश्चित । चारी घटिका सावचित्त ॥१॥ होउन कीर्तनीं बैसावें । भावें भगवंतासि गावें ॥ २ ॥ सदा संसारकथन । क्षण एक सावधान ॥ ३ ॥ दास म्हणे वारंवार बहुसाल खबरदार ॥ ४ ॥

१३. रात्रंदिवस गव्हार[1] । फिरतसे दारोदार ॥ १ ॥ आपलें मन आटोपावें । नाहीं तरी फजित व्हावें ॥ २ ॥ कल्पनेचे भरोवरी । करूं नये तेंचि करी ॥ ३ ॥ दास म्हणे हें वोढाळ[2] । आटोपीना तो चांडाळ ॥ ४ ॥

१४. काय करीतें हें मन । साक्षी आपुला आपण ॥ १ ॥ हित आपुलें करावें । नाहीं वीर्यलोका जावें ॥ २ ॥ काय वासना म्हणते । आपणास साक्ष येते ॥ ३ ॥ मन असे बैरगळ[3] । केल्या होतसे विव्हळ ॥ ४ ॥ सांडीन हें संसारिक । कांहीं पाहावे विवेक ॥ ५ ॥ दास म्हणे सावधान । पदरीं बांधलें मरण ॥ ६ ॥

---

## १३. क्षोभपंचक.

१. करितां सांभाळ आपुला । दुःखें जीव भांबावला ॥ १ ॥ पाहों जातां सारासार । कांहीं कळेना विचार ॥ २ ॥ लोभें वृत्ती लांचावली । क्षोभें वृत्ती जाजावली ॥३॥ रामीरामदास म्हणे । कोण उपाय करणें ॥४॥

२. संग स्वार्थाचा धरिला । तेणें काम बळावला ॥ १ ॥ थोरपणें हे मातलें । तेणें अव्हाटी[4] घातलें ॥ २ ॥ कामामागें आला क्रोध । क्रोधें केला बहु खेद ॥ ३ ॥ लोभ दंभाचें कारण । मोहें केलें विस्मरण ॥ ४ ॥ कामीं लांचावलें मन । झालें बुद्धीचें पतन ॥ ५ ॥ दास म्हणे हो सकळ । अवघें अविद्येचें मूळ ॥ ६ ॥

३. गेला प्रपंच हातींचा । लेश नाहीं परमार्थाचा ॥ १ ॥ दोहींकडे अंतरलों । थोरपणें भांबावलों ॥ २ ॥ गेली अवघी निस्पृहता । नाहीं स्वार्थही पुरता ॥ ३ ॥ पूर्ण झाली नाहीं आस । इकडे बुडाला अभ्यास ॥ ४ ॥ दास म्हणे क्रोधें केलें । अवघें लाजिरवाणें झालें ॥ ५ ॥

४. उगमीं विष कालवलें । तेंचि प्रवाहीं पडलें ॥ १ ॥ आतां कोणेकडे जावें । कोण्या प्रकारें असावें ॥ २ ॥ होता भूषणाचा ठावो । तेथें जहाला अभावो ॥ ३ ॥ मूळ अंतरीं तें वेडें । जाहलें अवघेंहि वांकडें ॥४॥ छाया शांतीची नावडे । क्रोध वणवा आवडे ॥ ५ ॥ रामदास म्हणे जल्प[5] । झाला अंतरीं विकल्प ॥ ६ ॥

---

१ मूर्ख. २ ओढाळ मन. ३ भटकणारें. ४ आडमार्गी. ५ पोकळ बडबड.

५. सन्निपातांचें[1] लक्षण । अवघें झालें कुलक्षण ॥ १ ॥ जन कोणीच नावडे । प्राणी विकल्प वावडे[2] ॥ २ ॥ अवासवाची बडबडी । होऊं पाहे देशोधडी ॥ ३ ॥ प्राणी क्रोधें पिसाळले । त्यांस कोण म्हणे भले ॥ ४ ॥ मना आलें तें करावें । बळेंचि अव्हाटीं भरावें ॥ ५ ॥ रामदास म्हणे खरें । ज्याचें त्यासी वाटे बरें ॥ ६ ॥

६. अधिक बोलोंचि नेदिती । धरुनि जीभचि कापिती ॥ १ ॥ तेथें चालेना कीं ताठा । पोटासाठीं देशवटा ॥ २ ॥ हात पाय ते कापिती । कर्ण नासिक छेदिती ॥ ३ ॥ नानाप्रकारीं यातना । अवघें श्रुत आहे जना ॥ ४ ॥ दास म्हणे सेवाचोर । साहेबाचें हरामखोर ॥ ५ ॥

---

## १४. वोसणपंचक.

१. वोसणं[3] रे वोसण रे । वोसण रे राग वोसण रे ॥ १ ॥ आढळेना आढळेना । आढळेना संत आढळेना ॥ २ ॥ उमजेना उमजेना । उमजेना पंथ उमजेना ॥ ३ ॥ कोण जाणे कोण जाणे । कोण जाणे रामदास जाणे ॥ ४ ॥

२. चालवेना चालवेना । चालवेना पंथ चालवेना ॥ १ ॥ दुःख वाटे दुःख वाटे । दुःख वाटे देहबुद्धी लोटे ॥ २ ॥ सुख नाहीं सुख नाहीं । सुख नाहीं भवसुख नाहीं ॥३॥ जड जातो जड जातो । जड जातो सत्य जडे[4] जातो ॥ ४ ॥ धरवेना धरवेना । रामदास म्हणे पेण[5] करवेना ॥ ५ ॥

३. संतापलें संतापलें । संतापलें मन संतापलें ॥ १ ॥ झिजला गे झिजला गे । झिजला गे देह झिजला गे ॥ २ ॥ सोसवेना सोसवेना । सोसवेना शीण सोसवेना ॥ ३ ॥ धीर नाहीं धीर नाहीं । दास म्हणे अंतर पाहीं ॥ ४ ॥

४. त्यागवेना त्यागवेना । त्यागवेना भाग्य त्यागवेना ॥ १ ॥ बुद्धि नाहीं बुद्धि नाहीं । बुद्धि नाहीं देहबुद्धि नाहीं ॥ २ ॥ धरवेना सोडवेना । तोडवेना मन वोढवेना ॥ ३ ॥ दास म्हणे दास म्हणे । पोटींचा निश्चय कोण जाणे ॥ ४ ॥

५. मोकल[6] रे मोकल रे । मोकल रे मना मोकल रे ॥ १ ॥ योग नाहीं याग नाहीं । त्याग नाहीं वीतराग[7] नाहीं ॥ २ ॥ भक्ति नाहीं मुक्ति नाहीं ।

---

१ तापाचें. २ भ्रमतें. ३ टाकून दे, सोड. ४ अज्ञानपणांतच मरतो. ५ निश्चय. ६ सोड. ७ वैराग्य.

देव नाहीं सानुकूळ नाहीं ॥ ३ ॥ जप नाहीं तप नाहीं । गुण नाहीं निर्गुण नाहीं ॥ ४ ॥ ज्ञान नाहीं ध्यान नाहीं । लय नाहीं साधन नाहीं ॥ ५ ॥ शम नाहीं दम नाहीं । बाह्यांतरीं मन नाहीं[1] ॥ ६ ॥ इष्ट नाहीं मित्र नाहीं । धारिष्ट नाहीं वरिष्ठ नाहीं ॥ ७ ॥ दान नाहीं पुण्य नाहीं । कर्म नाहीं स्वधर्म नाहीं ॥ ८ ॥ तीर्थ नाहीं व्रत नाहीं । शांति नाहीं विश्रांति नाहीं ॥ ९ ॥ न्याय नाहीं नीति नाहीं । दास म्हणे कांहींच नाहीं ॥१०॥

६. साधिल रे साधिल रे । साधिल रे भव साधिल रे ॥ १ ॥ काम आहे क्रोध आहे । मद आहे मत्सर आहे ॥ २ ॥ लोभ आहे दंभ आहे । क्षोभ आहे क्षेम[2] आहे ॥ ३ ॥ भेद आहे खेद आहे । वाद आहे उच्छेद आहे ॥ ४ ॥ पाप आहे दोष आहे । अंतरीं पहातां द्वेष आहे ॥ ५ ॥ अर्थ आहे स्वार्थ आहे । मान्य तें करणें अर्थ आहे ॥ ६ ॥ जाणवेना जाणवेना । दास म्हणे खुण सांगवेना ॥ ७ ॥

## १५. विवेकपंचक.

१. एक देव आहे खरा । माया नाथिला[3] पसारा ॥ १ ॥ हेंचि विचारें जाणावें । ज्ञान तयासि म्हणावें ॥ २ ॥ साच म्हणों तरि हें नासे । मिथ्या म्हणों तरी हें दिसे ॥ ३ ॥ पाहों जातां आकारलें । मुळीं कांहीं नाहीं झालें ॥ ४ ॥ कैसा देहीं देहातीत । कैसें अनंत अनंत ॥ ५ ॥ रामदासाचें बोलणें । स्वप्नामाजी जाईजणें[4] ॥ ६ ॥

२. पूर्वीं पहातां मी कोण । धुंडूं आपणा आपण ॥ १ ॥ स्वयें आपुला उगव[5] । जाणे तोचि महानुभाव[6] ॥ २ ॥ कोण कर्म आचरला । कैसा संसारासी आला ॥ ३ ॥ आले वाटे जो मुरडे[7] । देव तयासी सांपडे ॥ ४ ॥ आली वाट ती कवण । मायेचें जें अधिष्ठान ॥५॥ रामदासाची उपमा । ग्राम नाहीं कैंची सीमा ॥ ६ ॥

३. पांचा लक्षणीं पुरता । धन्य धन्य तोचि ज्ञाता ॥ १ ॥ विवेक वैराग्य सोडीना । कर्ममर्यादा सांडीना ॥२॥ बाह्य बोले शब्दज्ञान । अंतर्यामीं समाधान ॥३॥ रामीरामदास कवी । न्यायनीतीनें शिकवी ॥ ४ ॥

४. अंतर्यामीं समाधान । बाह्य सगुण भजन ॥ १ ॥ धन्य धन्य तेंचि ज्ञान । अंतर्यामीं समाधान ॥ २ ॥ निरूपणें अंतस्त्याग[8] । बाह्य संपादी वैराग्य ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । ज्ञान स्वधर्मलक्षणें ॥ ४ ॥

---

१ मन निश्चित असें कोठेंच नाहीं. २ कल्याण. ३ मिथ्या. ४ स्वप्नवत् नाशवंत. ५ सोडवणूक. ६ महात्मा. ७ मूळ उगमाकडे परततो. ८ वासनांचा त्याग.

५. कौल[1] झाला रघुनाथाचा । मेळा मिळाला भक्तांचा ॥ १ ॥ अहंभाव वरचेवरी । बळेंचि घातला बाहेरी ॥ २ ॥ क्षेत्रीं विवेक जहाला । क्रोध देशोधडी केला ॥ ३ ॥ काम देहींचा कोंडिला । मद मत्सर पाडिला ॥ ४ ॥ लोभ दंभ नागविला । अहंकार बुडविला ॥ ५ ॥ कुत्रें मीपण पळालें । उगेंच अज्ञान गळालें ॥ ६ ॥ फितवेखोर होता द्वंद्व[2] । त्याचा केला शिरच्छेद ॥ ७ ॥ तिरस्कार दावेदार । त्यास बोधें केला मार ॥८॥ मन चोरटें धरिलें । नित्यनेमें जर्जर केलें ॥ ९ ॥ आळस साक्षेपें घेतलें । पायीं धरुनि आपटिलें ॥ १० ॥ दुश्चितपण अकस्मात । निरूपणीं केला घात ॥ ११ ॥ कपट मैंद[3] सांपडलें । उभें सर्वांगीं तोडिलें ॥ १२ ॥ बंड पाखांड तुटिलें । बळेंचि धरूनि कुटिलें ॥१३॥ शब्द बांधोनी पाडिला । निःशब्द तेथें प्रतिष्ठिला[4] ॥ १४ ॥ गर्वताठा विटंबिला ॥ वाद विवेकें झाडिला ॥ १५ ॥ जेणें भावार्थ उडविला । धरुनी विकल्प बुडविला ॥१६॥ करूनि अभावाचा नाश । राहे रामीं रामदास ॥ १७ ॥

## १६. वैराग्यपंचक.

१. प्रपंच सांडुनीयां बुद्धी । जडली परमार्थउपाधी ॥ १ ॥ मना होईं सावचित्त । त्याग करणें हा उचित ॥ २ ॥ संप्रदाय समुदाव । तेणें जडे अहंभाव ॥ ३ ॥ रामदास म्हणे नेम । भिक्षा मागणें उत्तम ॥ ४ ॥

२. प्रपंच केला ताडातोडी । जडली परमार्थाची बेडी ॥१॥ सावधान होईं जीवा । त्याग केलाचि करावा ॥ २ ॥ काम क्रोध राग द्वेष । अंगीं जडले विशेष ॥३॥ रामदासें बरें केलें । अवघें जाणोनि त्यागिलें ॥ ४ ॥

३. कोण कैंचा रे भिकारी । भीक मागे दारोदारीं ॥१॥ ऐसें म्हणे तेथें जावें । सुखें वैराग्यें फिरावें ॥ २ ॥ आहे ब्राह्मण विदेशी । नाहीं ठाऊक आम्हांशी ॥३॥ रामीरामदास म्हणे । कोण आहे कोण जाणे ॥ ४ ॥

४. नको[5] वोळखीचे जन । अंगीं वाजे अभिमान ॥१॥ आतां तेथें जावें मना । जेथें कोणी वोळखीना ॥२॥ लोक म्हणती कोण काये । पुसों जातां सांगों नये ॥ ३ ॥ रामदास म्हणे पाहीं । तेथें कांहीं चिंता नाहीं ॥ ४ ॥

५. देह जावो अथवा राहो । रामें फेडिला संदेहो ॥ १ ॥ रामालागीं देशवटा । संसाराच्या बारा वाटा ॥ २ ॥ जीवालागीं आदि अंतीं । एक रामाची संगती ॥ ३ ॥ रामदासीं रामरावो । नाहीं आणीक उपावो ॥ ४ ॥

---

१ अभयपत्र. २ भेदभाव. ३ फसवेगार. ४ स्थापिला. ५ धरूं नका.

६. सांज वोसरतां सातें[1]। वायां करावा आकांत ॥ १ ॥ तैसीं सखीं जीवलगें। जाती एकामेकांमागें ॥ २ ॥ चार दिवस यात्रा भरे। सर्वोचि मागुती वोसरे ॥३॥ पूर्ण होतां महोत्सावो। फुटे[2] अवघा समुदावो ॥ ४॥ बहुत वराडी मिळाले। जैसे आले तैसे गेले ॥५॥ एक येती एक जाती। नाना कौतुक पाहाती ॥ ६ ॥ बंधु बहिणी माता पिता। कन्या पुत्र आणी कांता ॥ ७ ॥ ऋणानुबंधाचें कारण। वायां शोक निःकारण ॥८॥ एक बहुसाल जितीं[3]। एक वेळवारीं[4] जाती ॥ ९ ॥ बहुसाल दास दासी। नाना पशु गाई महिषी ॥ १० ॥ धन्य धान्याचें संचित। कांहीं होत कांहीं जात ॥ ११ ॥ रामीरामदास म्हणे। संसारासीं येणेंजाणें ॥ १२ ॥

७. कोणी पुत्र कामा नये। मित्र करितो उपाये ॥ १ ॥ कैंचें आपुलें परावें। अवघें ऋणानुबंधें घ्यावें ॥ २ ॥ जीवलगाचिये परी। मातेहुनी लोभ करी ॥ ३ ॥ आहे कोण जाणे कैंची। परि ते जीवाचे जीवींची ॥ ४ ॥ जिवलग जीव घेती। त्यांसि परावीं राक्षिती ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे। नकळे देवाचें करणें ॥ ६ ॥

८. जें जें संसारासी आलें। तें तें तितुकेंहि एकलें ॥ १ ॥ वायां आपुलीं मानिलीं। शेखीं दुरी दुरावलीं ॥ २ ॥ सखीं सांडुनियां देशीं। मृत्यु पावला विदेशीं ॥३॥ खाती व्याघ्र आणि लांडगे। तेथें कैंची जिवलगें ॥ ४ ॥ घरीं वाट पाहे राणी। आपण मेला समरांगणीं ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे। अवघीं जाणावीं पिशुनें[5] ॥ ६ ॥

९. देह बहुतांचें खाजें[6]। मूर्ख म्हणे माझें माझें ॥ १ ॥ विंचु विखारें अजगर। नाना श्वापदें अपार ॥ २ ॥ नाना पक्षी गीधँ[7] काक। श्वान मार्जार जंबुक ॥ ३ ॥ लाव लासी भूत खेत। सांगों जातां असंख्यात ॥ ४ ॥ किती सांगों वारंवार। जीव जीवाचा आहार ॥५॥ म्हणे रामीरामदास। कैंचा देहाचा विश्वास ॥ ६ ॥

१०. घात करूनि आपुला। काय रडसी पुढिलां[8] ॥ १ ॥ बहु मोलाचें आयुष्य। विषयलोभें केला नाश ॥ २ ॥ नाहीं वोळखिलें सत्या। तेणें हाते आत्महत्या ॥ ३ ॥ नरदेहाची संगती। गेली गेली हातोहातीं ॥४॥ नाहीं देहाचा भरंवसा। गेली गेली रे वयसा[9] ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे। भुलूं नको मूर्खपणें ॥ ६ ॥

---

१ ओसरतांक्षणींच. २ पांगतो. ३ जगतात. ४ योग्यवेळेस मरतात. ५ दूर राहणारीं. ६ खाद्य. ७ गृध्र. ८ दुसऱ्याच्या नांवानें. ९ वय, आयुष्य.

११. कोणें कोणासी रडावें। एकामागें एकें जावें ॥ १ ॥ एक वेळ गेली माता। एक वेळ गेला पिता ॥ २ ॥ द्रव्य दारा जाती पुत्र। जिवलगें आणि मित्र ॥ ३ ॥ प्राणी संसारासी आला। तितुका मृत्युपंथें गेला ॥ ४ ॥ पूर्वज गेले देवापासीं। तेचि वाट आपणांसी ॥ ५ ॥ रामदास म्हणे लोक। करी गेलियांचा शोक ॥ ६ ॥

१२. ज्याचें होतें तेणें नेलें। तेथें तुझें काय गेलें ॥ १ ॥ वेगीं होईल सावधान। करीं देवाचें भजन ॥ २ ॥ गती नकळे होणाराची। हे तंव इच्छा भगवंताची ॥ ३ ॥ पूर्वसंचिताचीं फळें। येती दुःखाचे होंळाळे[1] ॥ ४ ॥ पूर्वी केलें जें संचित। तें तें भोगावें निश्चित ॥ ५ ॥ दास म्हणे पूर्वरेखा[2]। प्राप्त न टळे ब्रह्मादिकां ॥ ६ ॥

१३. वाटे संसार दुस्तर। होती दुःखाचे डोंगर ॥ १ ॥ तरी श्रवण करावें। तेणें दुःख विसरावें ॥ २ ॥ पुढें काय करूं आतां। वाटे संसाराची चिंता ॥ ३ ॥ येतां उभंड[3] भरेना। मायाजाळ आवरेना ॥ ४ ॥ दुरी जाउनी विवेक। आणि आदळतो शोक ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे। दुःख जीवें धरीं उणें ॥ ६ ॥

१४. काम क्रोध मद मत्सर। जरि जाले अनावर ॥ १ ॥ त्यासि करावें साधन। सदा श्रवणमनन ॥ २ ॥ बोलाऐसें चालवेना। जीवभ्रांती हालवेना ॥ ३ ॥ दृढ लौकिक सांडेना। ज्ञानविवेक मांडेना ॥ ४ ॥ पोटीं विकल्प सुटेना। नष्ट संदेह तुटेना ॥ ५ ॥ दास म्हणे निर्बुजलें[4]। मन संसारीं बुडालें ॥ ६ ॥

---

## १७. संशयपंचक.

१. केला काशीविश्वेश्वर। श्वेतबंध रामेश्वर ॥१॥ तरी संशय तुटेना। पूर्वगुण पालटेना ॥ २ ॥ भागीरथी गोदावरी। केली कृष्णा आणि कावेरी ॥ ३ ॥ राम अयोध्येचा पती। केली कृष्ण द्वारावती ॥ ४ ॥ बद्री ओढ्या जगन्नाथ। केला स्वामी त्रिमल्लनाथ ॥ ५ ॥ मातापुर तुळजापुर। सप्तशृंगी कोल्हापुर ॥ ६ ॥ केली पंढरी नरहरी। शंभु पाहिला शिखरीं ॥७॥ मोरेश्वर भुलेश्वर। ज्वालामुखी हरेश्वर ॥ ८ ॥ सिद्ध मैराळ मारुती। देव केले नेणों किती ॥ ९ ॥ बारा लिंगें यावेगळीं। तीर्थें केलीं भूमंडळीं ॥ १० ॥ रामदास म्हणे भावें। तरी हें मन पालटावें ॥ ११ ॥

---

१ वेग, लहरी. २ प्रारब्ध. ३ उभड, उमाळा, आवेग. ४ गोंधळलें.

२. तेणें संशय तुटता । पूर्वे गुण पालटती ॥ १ ॥ एक उपासना धरीं । भक्ति भावें त्याची करीं ॥ २ ॥ सर्व नश्वर जाणुन । वृत्ति करीं उदासीन ॥ ३ ॥ सत्य वस्तु तें साचार । त्याचा करावा विचार ॥ ४ ॥ त्यागुनियां[1] अनर्गळ । सदा असावें निर्मळ ॥ ५ ॥ ध्यानें आवरावें मन । आणि इंद्रियदमन ॥ ६ ॥ अखंड वाचे रामनाम । ध्यान संध्या नित्यनेम ॥ ७ ॥ दास म्हणे सर्व भाव । जेथें भाव तेथें देव ॥ ८ ॥

३. मुख्यपूजा परंपार[2] । एकाहूनि एक थोर ॥ १ ॥ आतां कोठें ठेऊं भाव । जेथें तेथें महादेव ॥ २ ॥ माझे कुळींचीं दैवतें । पाहों जातां असंख्यातें ॥ ३ ॥ राम कृष्ण महादेव । बनशंकरी खंडेराव ॥ ४ ॥ माता सटवाई आपण । स्वामी लक्ष्मीनारायण ॥ ५ ॥ वीर बैसविला देव्हारा । माझी माता एकवीरा ॥ ६ ॥ मायराणी पांडुरंग । मुंजा नरसिंग झोटिंग ॥ ७ ॥ महालक्ष्मी रवळिया । कुळदैवत मोरया ॥ ८ ॥ मातापुरीची यमाई । सप्तशृंगी चंडाबाई ॥ ९ ॥ तुळजापुरीं तुकाबाई । घाटमांथाची[3] नवलाई ॥ १० ॥ दंडपाणी जोगेश्वरी । माता कामाक्षी कावेरी ॥ ११ ॥ ह्मैसाबाई नारायण । आग्या वेताळ कारण ॥ १२ ॥ मुंजा जोगिणी मांगिणी । बहुसाल मानाविणी ॥ १३ ॥ धोपेश्वर कोपेश्वर । सिद्धेश्वर सोमेश्वर ॥ १४ ॥ सात पांच रंगनाथ । व्यंकटेश वैजनाथ ॥ १५ ॥ अन्नपूर्णा शालिग्राम । हयग्रीव मेघश्याम ॥ १६ ॥ परशुराम कोठेश्वर । नाना शक्ती परमेश्वर ॥ १७ ॥ महिकावती भोगावती । आमुच्या देव्हारां बैसती ॥ १८ ॥ रानदेवी नारायण । ह्मैसासुर मल्लिकार्जुन ॥ १९ ॥ अग्निसारिखें दैवत । आणि मुख्य प्राणनाथ[4] ॥ २० ॥ देव तांबडे अनेक । बहुसाल केला टाक ॥ २१ ॥ तांबें देव ते नर्मदे । देव दाटले नुसदे ॥ २२ ॥ सोमकान्त सूर्यकान्त । नाग आणि चक्रांकित ॥ २३ ॥ औटहात मृत्तिकापूजन । नाना देवांचें लेखन ॥ २४ ॥ डाउ पूजा अनंत । गौरी आणि तपोईत ॥ २५ ॥ रामदासीं देव एक । येर सर्वही माईक ॥ २६ ॥

४. भाव धरीं संतापायीं । तेणें देव पडे ठायीं ॥ १ ॥ नाना देवांचें भजन । तेणें नोहे समाधान ॥ २ ॥ सकळ देवांमध्यें सार । आहे अनंत अपार ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । अवघे देव केले जेणें ॥ ४ ॥

५. आतां कोणा शरण जावें । सत्य कोणाचें मानावें ॥ १ ॥ नाना पंथ नाना मतें । भूमंडळीं असंख्यातें ॥ २ ॥ जपा तपी नाना हटी । मंत्रावळी लक्ष कोटी ॥ ३ ॥ एक मुद्रा हे लाविती । एक आसन घालिती

१ बाष्कळ. २ अपरंपार. ३ प्रतापगडची देवी. ४ मारुति.

॥ ४ ॥ एक दाविती देखणीं । एक अनस्यूत[1] ध्वनी ॥ ५ ॥ एक नासाग्रीं लक्षिती । एक हृदयीं दाविती ॥ ६ ॥ पिंडज्ञानी तत्वज्ञानी । योगाभ्यासी सिद्ध ज्ञानी ॥ ७ ॥ पंचाक्षरी धूम्रपानी । गोरांजन उपोषणी ॥८॥ दुग्धाहारी निराहारी । फळाहारी पर्णाहारी ॥९॥ एक औषधीप्रयोग । एक देती धातुमार्ग ॥१०॥ एक विभूती[2] लाविती । एका प्रिय द्वारावती ॥११॥ दंडधारी जटाधारी । एक बाळब्रह्मचारी ॥१२॥ मौनी नग्न दिगंबर । पंचाक्षरी योगेश्वर ॥ १३ ॥ एक जोशी आणि वैदिक । एक पंडित पुराणिक ॥१४॥ साधु संत मुनीश्वर । कवीश्वर ऋषीश्वर ॥१५॥ गाती हरिदास बागडे[3] । नृत्य करिती देवापुढें ॥ १६ ॥ एक म्हणती अवघें वाव । एक म्हणती अवघें देव ॥ १७ ॥ एक कळोंचि नेदिती । एक दाउनी सांगती ॥ १८ ॥ एक कर्मीच तत्पर । एक कर्मी अनादर ॥ १९ ॥ एक मानिती सगुण । एक मानिती पाषाण ॥ २० ॥ एकें केला सर्वत्याग । एक म्हणती राजयोग ॥ २१ ॥ रामदास सांगे खुण । भक्तीविणें सर्व शीण ॥ २२ ॥

६. शरण जावें संतजना । सत्य मानावें निर्गुणा ॥ १ ॥ नाना मतीं काय चाड । करणें सत्याचा निवाड ॥ २ ॥ ज्ञानें भक्तीसी जाणावें । भक्त तयासी म्हणावें ॥३॥ रामीरामदास सांगे । सर्वकाळ संतसंगें ॥४॥

७. संत कैसेनी जाणावे । साधु कैसे वोळखावे ॥ १ ॥ बहुत गोसावी असती । भले अवघेचि दिसती ॥ २ ॥ एक संसारीं गुंतले । एकें वेष पालटिले ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । कैसीं संतांचीं लक्षणें ॥ ४ ॥

८. तेचि जाणावे सज्जन । जयां शुद्ध ब्रह्मज्ञान ॥ १ ॥ जंववरि देहाची संगती । तंववरी सगुणीं भजती ॥ २ ॥ जाणोनियां सारासार । सदा श्रवणीं तत्पर ॥ ३ ॥ बाह्यत्याग संपादणें । अंतरत्याग निरूपणें ॥ ४ ॥ कर्म करिती आवडी । फळाशांची नाहीं गोडी ॥ ५ ॥ शांती क्षमा आणि दया । सर्व सख्य मानी जया ॥ ६ ॥ हरिकथा–निरूपण । सदा श्रवणमनन ॥ ७ ॥ बोलासारिखें चालणें । हींच संतांचीं लक्षणें ॥ ८ ॥ एकनिष्ठ उपासना । अतितत्पर भजना ॥ ९ ॥ स्वार्थ सांडुनियां देणें । नित्य तेंचि संपादणें ॥ १० ॥ म्हणे रामीरामदास । जया नाहीं आशापाश ॥ ११ ॥

---

१ अखंड. २ विभूती म्ह० भस्म व द्वारावती म्ह० गोपीचंदन. ३ नृत्यादि करणारे.

## १८. नीतिपंचक.

१. कामक्रोधें खवळला । तेणें सन्निपात झाला ॥ १ ॥ त्यास औषध करावें । पोटीं वैराग्य धरावें ॥ २ ॥ कुपथ्य अवज्ञेचें[1] झालें । मग तें पुढें उफाळलें ॥ ३ ॥ मर्यादेनें निर्बुजलें । वारें अभिमानें घेतलें ॥ ४ ॥ दडपणाचा घाम आला । प्राणी उठोनि पळाला ॥ ५ ॥ रामदास म्हणे भले । लोक म्हणती पिसाळले ॥ ६ ॥

२. झालें होऊनियां गेलें । आतां कैसें होय भलें ॥ १ ॥ यासि सांगतों साधन । जेणें होय समाधान ॥ २ ॥ दिवसेंदिवस व्यथा सरे । अंगीं आरोग्यता भरे ॥ ३ ॥ अनुताप दुरी गेले । कांहीं किंचित उरले ॥ ४ ॥ व्यथा हरली विशेष । अल्पमात्र उरला दोष ॥ ५ ॥ दास म्हणे जन्मवरी । पुढें विकार नानापरी ॥ ६ ॥

३. मर्यादेचे वाटे जावें । अनीति अव्हाट[3] त्यजावें ॥१॥ एक राम आहे खरा । तिकडे गुरुपरंपरा ॥ २ ॥ एकाकडे आहे जन । एकाकडे ते सज्जन ॥ ३ ॥ पुढें विवेकें वर्तावें । मागें मूळ[4] सांभाळावें ॥ ४ ॥ उदंड झाले समुदाये । तरी आदि सोडूं नये ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । जगीं मान्य तें बोलणें ॥ ६ ॥

४. अभक्तांसी निंदी जन । गुरुद्रोहिया सज्जन ॥ १ ॥ याकारणें वाटे जावें । लागे अवघेंचि करावें ॥ २ ॥ सगुण भजतां ज्ञान मोडे । ज्ञानें सगुण नावडे ॥ ३ ॥ कर्मे होतसे उपाये । कर्मठपण कामा न ये ॥ ४ ॥ शब्दें होय समाधान । कामा न ये शब्दज्ञान ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । किती सांगों मी लक्षणें ॥ ६ ॥

५. धरितां देवासी अभाव । तोंडघशीं पाडी देव ॥ १ ॥ या कारणें वाटे जावें । लागे अवघेंचि रक्षावें ॥२॥ आहे देवासी उपाये । गुरुक्षोभ कामा नये ॥ ३ ॥ होतां क्रिया अमंगळ । त्यासि निंदिती सकळ ॥ ४ ॥ एक वैराग्य त्यागितां । अंगीं वाढे लोलंगता[5] ॥५॥ रामीरामदास म्हणे । सर्व नीतीनें करणें ॥ ६ ॥

---

## १९. उपासनापंचक.

१. ज्ञातेपण आधीं सांडीं । जाणत्या नावडे पाषांडी ॥१॥ देव पतितपावन । त्यासि करी अभिमान ॥ २ ॥ ध्रुव प्रल्हाद आपले । भक्त जेणें

---

१ गुर्वाज्ञेची हेळणा. २ नीतिन्यायाच्या बंधनांला कंटाळलें. ३ आडवाट. ४ उगमाचा, परब्रह्माचा विचार. ५ विषयासक्ति.

उद्धरिले ॥ ३ ॥ बहुसाल भूमंडळीं । तारी भक्तांची मंडळी ॥ ४ ॥ जड-मूढ सांगों किती । ज्यांचीं नामें असंख्याती ॥५॥ रामीरामदास म्हणे । अंतकाळीं सोडवणें ॥ ६ ॥

२. पूजा देवाची प्रतिमा । त्याची न कळे महिमा ॥१॥ देव भक्तांचा विश्राम । त्यासि नेणे तो अधम ॥ २ ॥ नाना स्थानें भूमंडळीं । कोणीं सांगावीं आगळीं ॥ ३ ॥ ज्याचे चरणींचे उदकें । धन्य होती विश्वलोकें ॥ ४ ॥ ज्याचीं चरित्रें ऐकतां । जनीं होय सार्थकता ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । धन्य होईजे स्मरणें ॥ ६ ॥

३. देव भक्तांचा कैवारी । रक्षितसे नानापरी ॥ १ ॥ काय स्तंभीं प्रगटला । तेणें प्रल्हाद रक्षिला ॥ २ ॥ तये द्रौपदीकारणें । वस्त्रें दिल्हीं नारायणें ॥ ३ ॥ महासंकटीं रक्षिलें । गजेंद्रासीं सोडविलें ॥ ४ ॥ कूर्मरूपें धरिली धरा । झाला वराह दुसरा ॥ ५ ॥ जाणे दासाचें अंतर । लाखा-जोहरीं[1] विवर ॥ ६ ॥

४. भक्तालागीं पावे नेटें । वारी भक्तांचीं संकटें ॥ १ ॥ देव भावें लांचा-वला । त्यासि अभिमान लागला ॥२॥ आपल्या भक्तांचें जें उणें । साहेना तें कोटीगुणें ॥ ३ ॥ दास म्हणे नानापरी । देव भक्तांचा कैवारी ॥ ४ ॥

## २०. भक्तिपंचक.

१. सोडीं संसाराची आस । धरीं भक्तीचा हव्यास ॥ १ ॥ दुःखमूळ हा संसार । तयामध्यें भक्ति सार ॥ २ ॥ ग्रंथ पहातां लक्ष कोटी । जेथें तेथें भक्ति मोठी ॥३॥ जन्मा आलियाचें फळ । दास म्हणे तें सकळ ॥४॥

२. राम दासाचा कैवारी । सेवकांचा अंगीकारी ॥ १ ॥ अंगीकारिले वानर । त्यांची ख्याति झाली थोर ॥ २ ॥ स्वयें निजधामा आणें । राज्य कीजे बिभीषणें ॥ ३ ॥ भक्तां उणें देखे जेथें । स्वयें धांव घाली तेथें ॥४॥ तया वैर केलें साहे । परि भक्तांचें न साहे ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । निज भक्तांचेनि गुणें ॥ ६ ॥

३. भक्ती रामाची करावी । वंशावळी उद्धरावी ॥ १ ॥ तन मन आणि धन । सर्व लौकिक सोडून ॥ २ ॥ पांचा पंचकाचे भरें । सर्वकाळ अत्या-दरें ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । दृढ भक्तीचेनि गुणें ॥ ४ ॥

1 पांडवाच्या नाशासाठीं दुर्योधनानें बांधलेलें लाक्षागृह.

४. अरे मनुष्यें काय द्यावें । एक रघुवीरा मागावें ॥ १ ॥ उपमन्यें धांवा केला । क्षीरसिंधु त्या दिधला ॥ २ ॥ ध्रुरु शरण चक्रपाणी । अढळ शोभा तारांगणीं ॥ ३ ॥ राम म्हणतां वदनीं । गणिका बैसली विमानीं ॥ ४ ॥ बाळमित्र[1] निष्कांचन । त्याचें दरिद्र विच्छिन्न ॥ ५ ॥ कुब्जा खंगली म्हातारी । केली लावण्यसुंदरी ॥ ६ ॥ शुकमिषें रामवाणी । म्हणतां पावन कुंटिणी[2] ॥ ७ ॥ शरणागत निशाचर[3] । राज्य देऊनी अमर ॥ ८ ॥ होता बंधूनें गांजिला । तो सुग्रीव राजा केला ॥ ९ ॥ तया अंबऋषी कारणें । दहा जन्म येणें जाणें ॥ १० ॥ रामदासीं रामराव । निजपदीं दिधला ठाव ॥ ११ ॥

५. शिरीं आहे रामराज । औषधांचें कोण काज ॥ १ ॥ जो जो प्रयत्न रामावीण । तो तो दुःखासी कारण ॥ २ ॥ शंकराचें हाळाहळ । जेणें केलें सुशीतळ ॥ ३ ॥ आह्मां तोचि तो रक्षिता । रामदासीं नाहीं चिंता ॥ ४ ॥

६. विषें शंकरा जाळिलें । ज्याच्या नामें शीतळ झालें ॥ १ ॥ रामनामाची औषधी । जेणें तुटे भवव्याधी ॥ २ ॥ शिवें केली काशीपुरी । विश्व नामें मुक्त करी ॥ ३ ॥ रामनामें पुरे कोड[4] । न मने त्यासी घाली होड[5] ॥ ४ ॥ रामदासीं दृढ भाव । संदेहासी केला वाव ॥ ५ ॥

७. दास आपुलें मानावें । माझे गुण पालटावे ॥ १ ॥ काम क्रोध मद मत्सर । माझे ठायीं तिरस्कार ॥ २ ॥ राग द्वेष लोभ दंभ । नांदे अंतरीं स्वयंभ ॥ ३ ॥ रामदास म्हणे आतां । देवा तुझे गुण गातां ॥ ४ ॥

८. धन्य धन्य ते वानर । जवळी राम निरंतर ॥ १ ॥ ब्रह्मादिकां नातुडे ध्यानीं । राम वानरगोठणीं ॥ २ ॥ वेदश्रुति नेणे महिमा । तो गुज सांगे प्लवंगमां[6] ॥३॥ वानरवेष धरी देव । भाग्यें साधला केशव ॥४॥ दास म्हणे ते दैवाचे । आवडते रघुनाथाचे ॥ ५ ॥

९. ताळ वाजे मंद मंद । मुखीं हरिनामछंद ॥ १ ॥ फडके ताळी एके वेळे । घोषें नाचे हें आगळें ॥ २ ॥ रंगीं हरिदास मातले । नामघोषें आनंदले ॥ ३ ॥ उभे हरिदास रंगणीं । रामदास लोटांगणीं ॥ ४ ॥

१०. राज्य आलें रघुनाथाचें । भाग्य उदेलें[7] भक्तांचें ॥ १ ॥ कल्पतरु चिंतामणी । कामधेनूची दुभणी ॥ २ ॥ परिस जहाले पाषाण । अंगी-

१ सुदामदेव. २ गणिका. ३ बिभीषण. ४ आवडी, मनोरथ. ५ पैज. ६ वानरांस. ७ उगवलें.

कार करी कोण ॥ ३ ॥ नाना रत्नांचे डोंगर । अमृताचें सरोवर ॥ ४ ॥ पृथ्वी अवघी स्वर्णमय । कोणीकडे न्यावें काय ॥ ५ ॥ ब्रह्मादिकांचे कैवारी । रामदासाचे अंतरीं ॥ ६ ॥

११. एकादशी नव्हे व्रत । वैकुंठींचा महापंथ ॥ १ ॥ परि रुक्मांगदा-ऐसा । व्हावा निश्चय मानसा ॥ २ ॥ एकादशी उपोषणें । विष्णुलोकीं ठाव घेण ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । काय प्रत्यक्षा प्रमाणें ॥ ४ ॥

१२. रुक्मांगद होता नर । आम्हीं काय आहों खर[१] ॥ १ ॥ देव भक्त-वेलाईत[२] । राव रंक नाहीं तेथ ॥ २ ॥ तेणें नेला अवघा गांवु । आम्ही स्वयें तरी जावुं ॥ ३ ॥ रामीरामदासीं काज । धरा एकमेकां लाज ॥४॥

१३. ज्यासी हरिची प्राप्ति व्हावी । तेणें हरिदिनी करावी ॥१॥ एका-दशी त्याजिल्या अन्न । प्राप्त वैकुंठभुवन ॥ २ ॥ रामीरामदास म्हणे । हरिजागर उपोषणें ॥ ३ ॥

१४. एकादशीच्या अन्नाखालीं । भय पातकें लपालीं ॥ १ ॥ कां जीं संतीं अव्हेरिलीं । म्हणुनि तेथें थारावलीं ॥ २ ॥ म्हणे रामीरामदास । घडे[४] अंगीकारी त्यास ॥ ३ ॥

१५. दिनानाथाचा सेवक । आम्हां स्वामीहूनि अधिक ॥१॥ शरणा-गत राघवाचे । परि शरण दारिद्राचे ॥ २ ॥ जें देवांस दुःसह । तेंचि आम्हां सुखावह ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । रामकृपेचेचि गुणें ॥ ४ ॥

१६. जेथुनियां प्रबळता । केली तेथेंची अहंता ॥ १ ॥ तरी तें सर्वही जाणार । पुढें घातचि होणार ॥ २ ॥ होताहे भवाचा भार । झाली वृत्ति अनावार ॥ ३ ॥ दास म्हणे एकाकार । घडे देवासी कातर ॥ ४ ॥

१७. सकळ कळा हातीं आल्या । रिद्धिसिद्धिही वोळल्या ॥१॥ तरि आदि सांडूं नये । देवा भक्तांचा उपाये ॥ २ ॥ मनोसिद्धि वाचासिद्धि । जहाली उदंड उपाधी ॥ ३ ॥ दास म्हणे राज्य झालें । इंद्रपद हाता आलें ॥ ४ ॥

१८. आत्मज्ञानपारंगत[५] । झाला बोलका महंत ॥ १ ॥ गुरुपद हाता आलें । भूमंडळीं सत्ता चाले ॥ २ ॥ दास म्हणे ज्ञान झालें । सर्व मि-थ्यासें कळलें ॥ ३ ॥

१९. ज्ञान झालें भक्तजना । सांडूं नये उपासना[६] ॥ १ ॥ ऐका सारा-

---

१ गाढव. २ भक्तांचा अंकित. ३ साश्रय झाली. ४ देव अंगीकारी त्यास एकादशी घडे. ५ निष्णात. ६ हरिभक्ति.

चोहि सार । सर्व सांगतों विचार ॥२॥ हेंचि सर्वांचें कल्याण । मानूं नये अप्रमाण ॥ ३ ॥ दास म्हणे अनुभवलें । भजन भगवंताचें भलें ॥ ४ ॥

१०. देव असतां पाठीराखा । त्रैलोक्याचा कोण लेखा ॥ १ ॥ नाना उद्योग वाढती । नाना चिंता उद्भवती ॥२॥ स्वस्थ वाटेना अंतरीं । नाना व्यवधान करी ॥ ३ ॥ रामदास म्हणे भावें । भजन देवाचें करावं ॥ ४ ॥

## २१ कथापंचक.

१. धन्य धन्य तें नगर । जेथें कथा निरंतर ॥ १ ॥ गुण गाती भगवंताचे । तेचि मानावे दैवाचे ॥ २ ॥ स्वयें बोले जगजीवन । थोर कलियुगीं कीर्तन ॥ ३ ॥ रामदास म्हणे भले । हरिभक्ती उद्धरले ॥ ४ ॥

२. रामनामाविणें कांहीं । अंतीं सोडवण नाहीं ॥ १ ॥ गंगातीरीं योगेश्वर । अथवा प्रपंचीं इतर ॥ २ ॥ थोरपणें धरितां ताठा । तरी तो नागवं[1] करंटा ॥ ३ ॥ बहुत पूजिलीं दैवतें । योग याग नाना मतें ॥ ४ ॥ धौतिपोती हो भुजंगी[2] । लोकीं कर्म करिती योगी ॥ ५ ॥ विनवी रामीरामदास । नाना साधनीं सायास ॥ ६ ॥

३. सकळ साधनांचें फळ । रामनामचि केवळ ॥ १ ॥ जप तप अनुष्ठान । अंतीं नामचि प्रमाण ॥ २ ॥ नाना मंत्रयंत्रावळी । सोडवीना अंतकाळीं ॥ ३ ॥ महा पातकी पतित । नामें तारिले अनंत ॥ ४ ॥ नाम साराचेंहि सार । नाम सकळांसि आधार ॥ ५ ॥ दास म्हणे सांगों किती । नामाविण नाहीं गती ॥ ६ ॥

## २२. निष्ठापंचक.

१. ब्रीद आपुलें राखावें । आम्हां भक्तां सांभाळावें ॥ १ ॥ बहु नाहीं वाडांऽचार[3] । आतां एकचि निर्धार ॥ २ ॥ एथें कांहीं नाहीं व्यस्त । आतां बोल तो नेमस्त ॥ ३ ॥ रामदास म्हणे एक । आतां धरावा नेमकं[4] ॥ ४ ॥

२. नेणों भक्ति नेणों भाव । आम्हीं नेणों दुजा देव ॥ १ ॥ राघवाचे शरणागत । अहों रामनामांकित ॥ २ ॥ मुखीं रामनामावळी । काळ घालूं पायांतळीं ॥ ३ ॥ रामदासीं रामनाम । बाधूं नेणे काळ काम ॥ ४ ॥

३. राम अनाथांचा नाथ । आम्हां कैवारी समर्थ ॥ १ ॥ वनीं

१ बुडाला. २ हे शरीरशुद्धीचे हटयोगांतील प्रकार. ३ नानाविध आचार. ४ नित्य.

शिळा मुक्त केली। गणिका विमानीं वाहिली ॥२॥ राम दीनांचा दयाळ। देव सोडिले सकळ ॥३॥ रामीरामदास म्हणे। आतां आम्हां काय उणें ॥४॥

४. भूतभविष्याचें ज्ञान। जयां अमृतभोजन ॥ १ ॥ रे या देवांचा कैवारी। तोचि आमुचा सहाकारी ॥ २ ॥ कल्पतरु चिंतामणी। कामधेनूची दुभणी ॥ ३ ॥ नानारत्नांचे डोंगर। दिव्य भोग निरंतर ॥ ४ ॥ रामदासाची आवडी। अवघे देव तेहतीस कोडी ॥ ५ ॥

---

## २३. शिकवणपंचक.

१. काम क्रोध आवरावे। मद मत्सर वारावे ॥ १ ॥ सांडोनियां कुलक्षणें। शुद्ध धरावीं लक्षणें ॥ २ ॥ लोभदंभासीं लुटावें। मीपणासीं आटोपावें ॥ ३ ॥ विवेक वैराग्य विश्वास। धरणें म्हणे रामदास ॥ ४ ॥

२. हो कां मुमुक्षु अथवा मुक्त। आहे विशेष आसक्त ॥ १ ॥ विवेक वैराग्यसंग्रह। करणें लागे यावद्देह[२] ॥ २ ॥ रामीरामदास म्हणे। शांति ज्याचे दृढपणें ॥ ३ ॥

३. मना तूंचि सिकविसी। शेखीं तूंचि नायकसी ॥ १ ॥ काय सूचसी[३] पाहेरा। शरण जावें रघुवीरा ॥२॥ कां ते साचाचियेपरी। करिसी शब्दभरोवरी ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे। जळो बहिर्मुखाचें जिणें ॥ ४ ॥

४. खोडी वाउगीच वाळीं[४]। एक रामनामावळी ॥ १ ॥ प्रेम सोडीं देहबुद्धी। मांडीं श्रवणीं समाधी ॥ २ ॥ रामीरामदास म्हणे। अकस्मात लागे जाणें ॥ ३ ॥

५. ईश्वरासि कानकोंडें[५]। अंतीं जाइल कोण्या तोंडें ॥ १ ॥ लाजे हरीच्या रंगणीं[६]। जावयासि लोटांगणीं ॥ २ ॥ धर्म न करी दुराचारी। नागविले राजद्वारीं ॥३॥ ना दे फुटका कवडा। चोरें घातला दरवडा ॥४॥ म्हणे रामीरामदास। प्राणी नागवला सुखास ॥ ५ ॥

६. पूर्वभूमिका[७] सोडिली। जीव झाला दिशाभुली ॥ १ ॥ ऐसें भ्रमाचें लक्षण। भुले आपणा आपण ॥ २ ॥ द्रव्य आपण ठेविलें। त्याचें तयासि चुकलें ॥ ३ ॥ रामदास म्हणे घरीं। वाट चुकले आंधारीं ॥ ४ ॥

---

१ अहल्या. २ शरीर आहे तोंवर. ३ कल्पिशी. ४ टाक. ५ ओशाळ, पराङ्मुख. ६ कीर्तनांत. ७ मूळरूप, आत्मपद.

## २४. निश्चयपंचक.

१. देह चिरकाळ राहो। अथवा शीघ्रकाळ जावो ॥ १ ॥ आम्हीं वस्ती केली रामीं। नाहीं आस्था देहधामीं[1] ॥ २ ॥ देहा होऊ उत्तम भोग। अथवा पडो दुःखयोग ॥ ३ ॥ रामीं रामदास मीनला। देहदुःखा वेगळा झाला ॥ ४ ॥

२. आम्हीं मोक्षलक्ष्मीवंत। भवदारिद्य कैचें तेथ ॥ १ ॥ श्रीपतीचे परिजन[2]। आम्ही स्वानंदसंपन्न ॥ २ ॥ समाधान तें सभाग्य। असमाधान तें अभाग्य ॥ ३ ॥ रामीरामदासीं देव। सख्यासहित स्वानुभव ॥ ४ ॥

३. मोक्षश्री[3] ते आम्हांपाशीं। द्रव्यासिद्धी जिच्या दासी ॥ १ ॥ आम्हीं परमार्थसंपन्न। अर्थ काय परिच्छिन्न[4] ॥ २ ॥ रामीरामदास भाग्य। चढतें वाढतें वैराग्य ॥ ३ ॥

४. समर्थांचे दरिद्री सुत। त्यांचें करणें विपरीत ॥ १ ॥ परि समर्थ-लक्षण। सर्वकाळ समाधान ॥ २ ॥ समर्थांच्या विद्येलागीं। मधुकरी मागे जगीं ॥ ३ ॥ तैसें रामीरामदासीं। ब्रह्मविद्येच्या सायासीं ॥ ४ ॥

---

## २५. अलिप्तपंचक.

१. सृष्टि दृष्टीसि नाणावी। आत्मप्रचीत जाणावी ॥ १ ॥ दृश्यविर-हित देखणें। दृश्य नुरे दृश्यपणें ॥ २ ॥ सृष्टीवेगळा निवांत। देवभक्तांचा एकान्त ॥ ३ ॥ राम अनुभवासि आला। दासविवाद खुंटला ॥ ४ ॥

२. मायेभोंवते भोंवावें। तरि तिनें कुरवाळावें ॥ १ ॥ संत एकटा एकला। एकपणाहि मुकला ॥ २ ॥ त्यासि माया असोनि नाहीं। आपपर नेणे कांहीं ॥ ३ ॥ रामीरामदास गाय। व्याली नाहीं चाटिल काय ॥ ४ ॥

३. होता वृक्षाचे डाहाळीं। पक्षी गेला अंतराळीं ॥ १ ॥ तैसी माया वोलंडिली। वृत्ति स्वरूपीं राहिली ॥ २ ॥ खेळकार सूत्र सोडी। गेली आकाशीं वावडी ॥ ३ ॥ भूमंडळीं होता आला। ढग आकाशीं उडाला ॥ ४ ॥ केले सिद्धीचे साधना। पाय वेधला गगना ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे। पाहें दृष्टी तारांगणें ॥ ६ ॥

५. दृश्य सांडुनीयां मागें। वृत्ती गेली लागवेगें ॥ १ ॥ माया सांडुनि चंचल। झाला स्वरूपीं निश्चळ ॥ २ ॥ कांहीं भासचि नाढळे। वृत्ति

---

१ देहगेहाची आवड. २ सेवक. ३ मोक्षरूप लक्ष्मी. ४ द्रव्य बापुडें आम्हां-पुढें काय होय?

निर्गुणीं निवळे ॥ ३ ॥ चराचर तें सांडिलें । बहुविध वोलांडिलें ॥ ४ ॥ अवघें एकचि निर्गुण । पाहे वृत्तीतें आपण ॥ ५ ॥ रामदास सांगे खूण । वृत्ति चातुर्यलक्षण ॥ ६ ॥

---

## २६. ज्ञानपंचक.

१. आम्हीं सावधान गावें । तुम्हीं सावध ऐकावें ॥१॥ सकळ सृष्टीचा गोसावी । त्याची वोळख पुसावी ॥ २ ॥ स्वयें बोलिला सर्वेशु । ज्ञानें-विण अवघे पशु ॥ ३ ॥ दास म्हणे नाहीं ज्ञान । तया नरकीं पतन ॥ ४ ॥

२. ज्ञानेंवीण जी जी कळा । ती ती जाणावी अवकळा ॥ १ ॥ ऐसें भगवंत बोलिला । चित्त द्यावें त्याचे बोला ॥ २ ॥ एक ज्ञानचि सार्थक । सर्व कर्म निरर्थक ॥३॥ दास म्हणे ज्ञानेंवीण । प्राणी जन्मला पाषाण ॥४॥

३. जेणें ज्ञान हें नेणवे । पशु तयासि म्हणावें ॥ १ ॥ कोणें केलें चरा-चर । कोण विश्वासी आधार ॥ २ ॥ ब्रह्मादिकांचा निर्मिता । कोण आहे त्यापरता ॥ ३ ॥ अनंत ब्रह्मांडांच्यां माळा । विचित्र भगवंताची लीळा ॥ ४ ॥ रामदासाचा विवेक । सर्वांघटीं देव एक ॥ ५ ॥

---

## २७. ध्यानपंचक.

१. ध्यान लागलें रामाचें । दुःख हरलें जन्माचें ॥ १ ॥ रामपदांबुजा-वरी । वृत्ति गुंतली मधुकरी ॥ २ ॥ तनुमेघश्याममेळें[1] । चित्तचातक निवाले ॥ ३ ॥ रामचंद्र नाम येकीं । चक्षुचकोर जहाले सुखी ॥ ४ ॥ कीर्तिसुगंध तरूवरी । कुंजे कोकिळ वैखरी ॥ ५ ॥ रामीरामदास स्वामी । प्रगटले अंतर्यामीं ॥ ६ ॥

२. मुगुट किरीट कुंडलें । तेज रत्नांचें फांकलें ॥ १ ॥ ऐसा राम माझे मनीं । सदा आठवे चिंतनीं ॥ २ ॥ कीर्तिमुखें बाहुवटे । दंडीं शोभती गोमटे ॥ ३ ॥ जडित रत्नांचीं भूषणें । दशांगुळीं वीरकंकणें ॥ ४ ॥ कासे शोभे सोनसळा । कटीं सुवर्णमेखळा ॥ ५ ॥ चरणीं नेपुरांचे मेळे । वांकी गर्जती खळाळें ॥ ६ ॥ राम सर्वांगीं सुंदर । चरणीं ब्रीदाचा तोडर ॥ ७ ॥ सुगंधपरिमळ दुसरे । झेंपावती मधुकरें[3] ॥८॥ गळां पुष्पांचिया माळा । वामें शोभे भूमिबाळा[4] ॥ ९ ॥ स्वयंभ सुवर्णाची कास[5] । पुढें उभा रामदास ॥ १० ॥

---

१ करुणामेघश्याम जो राम त्याच्या संगतीनें. २ वाणी. ३ भ्रमर. ४ सीता. ५ रम्य पीतांबराची.

३. धनुष्यबाण काय केलें । कां कर कटावरी ठेविले ॥ १ ॥ हो कां धरिला अबोला । दिसे वेष पालटिला ॥ २ ॥ किलकिलाट वानरांचे । थवे दिसेना तयांचे ॥ ३ ॥ पंढरीस जहालें येणें । येक्या हनुमंताकारणें ॥ ४ ॥ दिसे हनुमंत एकला । सैन्यामधुनी फुटला ॥ ५ ॥ रामीरामदासभाव । तैसा होय पंढरीराव ॥ ६ ॥

४. जालें अजन्माचे पोटीं । मिथ्या म्हणतां फोडी घांटी[1] ॥ १ ॥ नवल नवल सावज । काय सांगों मी हें चोज ॥ २ ॥ तयासि मारूं जातां पाहें । जीवा हाणी होत आहे ॥ ३ ॥ रामीरामदास वर्म । कळेना तयाचें हो कर्म ॥ ४ ॥

५. आत्मारामाविण रितें । स्थान नाहीं अनुसरतें ॥ १ ॥ पहातां मनबुद्धिलोचन । रामेंवीण न दिसे आन ॥ २ ॥ सवडी नाहीं तीर्थगमना । रामें वेधिलें त्रिभुवना ॥ ३ ॥ रामदासीं तीर्थां भेटी । तीर्थें रामेंहुनी[2] उठी ॥ ४ ॥

६. रूप रामाचें पहातां । मग कैंची रे भिन्नता ॥ १ ॥ दृश्यअदृश्यावेगळा । राम जीवींचा जिव्हाळा ॥ २ ॥ वेगळीक पहातां कांहीं । हे तों मुळींच रे नाहीं ॥ ३ ॥ रामदासीं राम होणें । तेथें कैंचे रे देखणें ॥ ४ ॥

७. वेळे पाउस पडेना । नासकवणी उघडेना ॥ १ ॥ ऐसें कुळवाडियाचें भंड । दुःख जहालें उदंड ॥ २ ॥ बहुपडी आलें शेत । रेड्यापाड्याचें आऊत ॥३॥ कांहीं केल्यानें पिकेना । धान्य वेळेसि विकेना ॥४॥ फाळा लाविला उदंड । अवघें जहालें थोतांड ॥ ५ ॥ वारीं रोगांचीं वाजती । नाना आभाळें फिरती ॥ ६ ॥ टोळ पक्षी मूषकादिक । खाती श्वापदें आणिक ॥ ७ ॥ दावेदारांची यातना । चोराचोरा राहवेना ॥ ८ ॥ नित्य पोटाचे मजुर । वेठीखालीं निघे उर ॥ ९ ॥ घर खोपट मोडकें । एक फटकुर फाटकें ॥ १० ॥ बहु रोगें गुरें गेलीं । धारणीनें मुलें मेलीं ॥ ११ ॥ सर्वसंसार बुडाला । दास म्हणे जोगी झाला ॥ १२ ॥

८. वड पिंपळ वाढले । बहुसाल विस्तारिले ॥ १ ॥ तरी ते जाणावे निर्फळ । त्यांचें खातां न ये फळ ॥२॥ नाना वृक्ष फळेंविण । परि ते जाणा निःकारण ॥ ३ ॥ रामदास म्हणे विचार । नसतां तसे होती नर ॥ ४ ॥

९. चित्त देऊनी ऐका रे । पोहणार पडिला धारे ॥१॥ मन मुळ्याच्या शेवटें । वाहे जीवन उफराटें ॥ २ ॥ उगमासी संगम झाला । रामदासीं शब्द निवाला ॥ ३ ॥

---

१ नरडी. २ रामापासून प्रगटतात.

१०. बरें चांगलें आणि गोड । ऐकतांचि पुरे कोड ॥ १ ॥ अभिमाना पैलीकडे । मनबुद्धीसी नातुडे ॥ २ ॥ रामदास म्हणे साचें । मूळस्थान या जन्माचें ॥ ३ ॥

## २८. सख्यपंचक.

१. एक लक्ष दिनमणी[1] । तृप्त होतसे कमळिणी ॥ १ ॥ तैसा देव आहे दुरी । परि तो भक्तांचे अंतरीं ॥ २ ॥ दोन लक्ष निशापती । जेणें चकोर तृप्त होती ॥ ३ ॥ रामदास म्हणे घन । देतो चातका जीवन ॥ ४ ॥

२. बाळक जाणेना मातेसी । तिचें मन तयापासी ॥ १ ॥ तैसा देव हा दयाळ । करी भक्तांचा सांभाळ ॥ २ ॥ धेनु वत्साचेनि लागें । धांवे त्याच्या मागें मागें ॥ ३ ॥ पक्षी घेतसे गगन । पिल्यांपासीं त्याचें मन ॥ ४ ॥ मत्स्य[2] आठवितां पाळी । कूर्म दृष्टीनें सांभाळी ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । मायाजाळाचीं लक्षणें ॥ ६ ॥

३. बाळपणीं लोभ करी । माता नाहीं जन्मवरी ॥ १ ॥ तैसा देव हा दयाळ । दासपाळ सर्वकाळ ॥ २ ॥ मनासारिखें न होतां । बाळकासि मारी माता ॥ ३ ॥ दास म्हणे सांगों किती । बाप लेंकांसि मारिती ॥४॥

४. मायबाप सांभाळिती । लोभाकारणें पाळिती ॥ १ ॥ तैसा नव्हे देवराव । त्याचा कृपाळु स्वभाव ॥ २ ॥ चंद्रसूर्य मावळती । घन आकाशीं होरपळती ॥ ३ ॥ रामीरामदासीं भाव । केली संसाराची वाव ॥ ४ ॥

५. एकसहस्रकोटीवरी । जहाली अन्यायाची परी ॥ १ ॥ तरी देव उपेक्षीना । कधीं निष्ठुर होईना ॥ २ ॥ शरणागत भांबावले । भजन देवाचें चुकलें ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । सर्व गुणें भक्ति उणें ॥ ४ ॥

## २९. देवभक्तसंवादपंचक.

१. तुज कैसें पाहूं देवा । तुझी कैसी करूं सेवा ॥ १ ॥ बहु देव पाहुनि आलों । बहुरूपीं भांबावलों ॥ २ ॥ किती देवळें मोडती । किती देव भंगोनि जाती ॥ ३ ॥ बहुतांच्या बोलें गेलों । तेणें बहुत कष्टलों ॥ ४ ॥ रामीरामदास म्हणे । ऐशीं जनांचीं लक्षणें ॥ ५ ॥

२. देव म्हणे मी जात नाहीं । आतां चिंता न करीं कांहीं ॥ १ ॥ मज पाहावें संतांपासीं । सेवीं जाणत्या भक्तांसी ॥२॥ मज जाणावें विचारें । सगुणाचे भजनद्वारें ॥३॥ देव म्हणतो दासासी । रे मी आहें तुजपासीं ॥४॥

---

१ सूर्याकडे लक्ष ठेवून. २ मत्स्यी स्मरणानें व कासवी दृष्टीनें पिल्लांस पोसते.

३. माझीं ब्रीदें कां विसरतां । आणि व्यर्थ कां चेष्टतां[1] ॥ १ ॥ भक्तवत्सल दीनानाथ । तुम्हां आधार समर्थ ॥ २ ॥ भय दाखवी निवारी । तोचि सर्व चिंता करी ॥३॥ दासासमीप राहातो । योगक्षेमही वाहतो ॥४॥

४. मज गांजिलें तें साहें । परि भक्तांचें न साहें ॥ १ ॥ माझ्या भक्तां शीण व्हावा । मग मजसी त्यांसि दावा ॥२॥ मज अवतार घेणें । माझ्या भक्तांचेकारणें ॥ ३ ॥ निजदासांसी पाळावें । दुर्जनासी निर्दाळावें ॥ ४ ॥

५. आतां बोलावें तें किती । मनीं पाहावी प्रचिती ॥ १ ॥ तुम्हां संकटाचे वेळे । काय झांकितों मी डोळे ॥ २ ॥ सेवकाचा साभिमान । समर्थाचें हें लक्षण ॥ ३ ॥ देव म्हणे दासजनीं । चिंता न धरावी मनीं ॥ ४ ॥

६. रे मी भक्तांचा कोंवसा[3] । मनीं धरावा भरंवसा ॥ १ ॥ समर्थाचिये सेवका । काय करवेल रंका ॥ २ ॥ कोप येतांचि ते घडी । घेईन काळाची नरडी ॥ ३ ॥ दास सांभाळावे सदा । मज आणिक नाहीं धंदा ॥४॥

७. काय गावा रे गांव । आम्हां नाहीं सर्व ठाव ॥ १ ॥ बोधमृदंग फुटका । ताळ द्वैताचा तुटका ॥ २ ॥ दास वेडे हो बागडे । नृत्य करिती देवापुढें ॥ ३ ॥ रामभेटीचा समये । रामदासीं सांगतां न ये ॥ ४ ॥

## ३०. अर्थसार्थकपंचक.

१. पक्षी श्वापद किडा मुंगी । पराधीन जिणें जगीं ॥ १ ॥ तैसा नव्हे नरदेहो । करा भक्तीचा लवलाहो[4] ॥ २ ॥ नीच योनी चारी खाणी । अवघे पराधीन प्राणी ॥३॥ रामीरामदास म्हणे । ज्ञान ध्यान पशु नेणे ॥ ४ ॥

२. पापपुण्य समता घडे । तरिच नरदेह जोडे ॥ १ ॥ याचें सार्थक करावें । आपणासि उद्धरावें ॥ २ ॥ बहु जन्मांचे शेवटीं । नरदेह पुण्यकोटी ॥ ३ ॥ रामदास म्हणे आतां । पुढतीं न लागे मागुता ॥ ४ ॥

३. देह आरोग्य चालतें । भाग्य नाहीं त्यापरतें ॥ १ ॥ लाहो[5] घ्यावा हरिभक्तीचा । नाहीं भरंवसा देहाचा ॥ २ ॥ देह आहे क्षणभंगुर । तुम्ही जाणतां विचार ॥३॥ रामीरामदास म्हणे । अकस्मात लागे जाणें ॥ ४ ॥

४. देश काळ वर्तमान । असे अवघाचि अनुमान ॥ १ ॥ भक्ति करावी देवाची । घडी जातसे सोन्याची ॥ २ ॥ काळ वेळचि पहातो । सदा सन्निध राहतो ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । देह आहे जाईजणें[6] ॥ ४ ॥

५. पुढें होणार कळेना । समाधान आकळेना ॥ १ ॥ मनीं सावधान

१ नाना व्यापार करितां. २ भक्तछलकास. ३ आधार, कैवारी. ४ त्वरित लाभ. ५ लाभ, छंद. ६ नश्वर.

व्हावें। भजन देवाचें करावें ॥ २ ॥ रिणानुबंधाचें कारण । कोठें येईल मरण ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे। भजनें अमरचि होणें ॥ ४ ॥

## ३१. सुंदरपंचक.

१. म्हणे मी एक चांगला। शब्द ठेवी पुढिल्याला ॥ १ ॥ नाक नाहीं कान नाहीं। जिव्हा नाहीं डोळे नाहीं ॥२॥ हात लुले पाय लुले। अवघे दांत उन्मळले[1] ॥ ३ ॥ अवगुणी कुलक्षणी। दास म्हणे केली हाणी ॥ ४ ॥

२. ज्ञानाविण निर्नासिक[2]। न ये संतांचे सन्मुख ॥ १ ॥ असो इंद्रियें सकळ। काय करावीं निर्फळ ॥ २ ॥ नाहीं कथानिरूपण। हेंचि बधिर श्रवण[3] ॥३॥ नाहीं देवाचें वर्णन। तंगे[4] तेंचि मुकेपण ॥ ४ ॥ नाहीं पाहिलें देवासी। अंध म्हणावें तयासी ॥ ५ ॥ नाहीं उपकारीं लाविलें। अहो तेचि हात लुले ॥ ६ ॥ नाहीं केलें तीर्थाटण। व्यर्थ गेले ते चरण ॥ ७ ॥ नाहीं काया झिजाविली। प्रेतरूपचि उरली ॥ ८ ॥ नाहीं देवाचें चिंतन। मन हिंडे जैसें श्वान ॥९॥ नाहीं परमार्थ बोलणें। जिव्हा नाहीं तेणें गुणें ॥ १० ॥ दास म्हणे भक्तीवीण। अवघें देहीं कुलक्षण ॥ ११ ॥

३. अवघा डोंगर जळाला। आहाळोनी[5] काळा झाला ॥ १ ॥ तरी तेथें बहु रंग। तैसें अवघें हें जग ॥२॥ दुर्जनासी बरें केलें। नाना प्रकारें रक्षिलें ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे। जिणें वोवाळिलें सुणें[6] ॥ ४ ॥

## ३२. व्यर्थपंचक.

१. आतां सांभाळा आपुला। पाहूं जातां काळ गेला ॥ १ ॥ आतां हित कोण वेळे। पुढें होणार नकळे ॥ २ ॥ देहालागीं नानापरी। कष्ट केले जन्मवरी ॥ ३ ॥ केलें देहाचें भजन। परी देह झाला क्षीण ॥ ४ ॥ देहालागीं जीवेंभावें। वय वेंचलें आघवें ॥५॥ म्हणे रामीरामदास। केला आयुष्याचा नाश ॥ ६ ॥

२. वय झालें वाताहात। अविचारें केला घात ॥ १ ॥ देव नाहीं वोळखिला। पुढें विषय देखिला ॥ २ ॥ बाळपण मूर्खपण। कांहीं नेणे हो आपण ॥ ३ ॥ होतां तारुण्याचा भार। पुढें झाला कामातुर ॥ ४ ॥ वृद्धपणीं संकोचित। देह जहाला गलित ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे। जन्म गेलें मूर्खपणें ॥ ६ ॥

---

१ उखडले, पडले. २ ज्ञानरूप नासिक नाहीं असा. ३ कानाचा बहिरेपणा हाच. ४ तरी. ५ करपून. ६ व्यर्थ.

३. देहालागीं कष्ट केले । परि ते अवघे व्यर्थ गेले ॥ १ ॥ देह देवाचे कारणीं । होतां देव होय ऋणी ॥ २ ॥ प्राणी लोभें गुंडाळला । पुढें अंतकाळ आला ॥ ३ ॥ जे जे कांहीं कष्ट केले । ते ते अवघे व्यर्थ गेले ॥ ४ ॥ नाना परी सांभाळिली । पुढें काया हे जाळिली ॥ ५ ॥ दास म्हणे मूर्खपण । पुढें जन्मासी कारण ॥ ६ ॥

४. शत वर्षांची मर्यादा । तितुका व्यर्थ गेला धंदा ॥ १ ॥ देह संसारीं गोविला[1] । नाहीं देव आठविला ॥ २ ॥ काया वाचा मनोभावें । अवघें प्रपंचीं लावावें ॥ ३ ॥ नीच सेवकाचे परी । सेवा केली जन्मवरी ॥ ४ ॥ दास म्हणे विषयबेडी । अंतकाळीं कोण सोडी ॥ ५ ॥

५. देव संसारीं घालितो । अंतकाळीं सोडवितो ॥ १ ॥ तया देवासी चुकलें । प्राणी लोभें भांबावलें ॥ २ ॥ केलें जेणें चराचर । देव विश्वासी आधार ॥ ३ ॥ देव जीवाचें जीवन । देव बंधविमोचन ॥ ४ ॥ देव सर्वांचे अंतरीं । सांभाळितो निरंतरीं ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । जयाचेनि धन्य होणें ॥ ६ ॥

---

## ३३. होळीपंचक.

१. अवघेचि बोंबलती । होळीभोंवते भोंवती[2] ॥ १ ॥ मायाहोळी प्रज्वळली । सृष्टि वेढारें लाविली ॥ २ ॥ ज्याकारणें गुंडाळती । तेंचि वाचे उच्चारिती ॥ ३ ॥ होळीमध्यें खाजें[3] आहे । तें तूं विचारूनि पाहें ॥ ४ ॥ खाजें खातां सुख होय । परी कठीण हाता न ये ॥ ५ ॥ खोल दृष्टीनें पाहिलें । खाजें त्याच्या हाता आलें ॥ ६ ॥ एक उडी घालूं जाती । लंडी चुकोनी पडती ॥ ७ ॥ एक देहाचे पांगले[4] । तेंचि आगीं हुर्पळले ॥ ८ ॥ उडी अवघ्यांचीच पडे । परि तें हातास न चढे ॥ ९ ॥ एकें थोर धीर केला । खाजें घेऊनि पळाला ॥ १० ॥ एक आपणचि खाती । एक सकळांतें वांटिती ॥ ११ ॥ एक घेउनी पळाले । तंव त्यावरि पडे जाळें ॥ १२ ॥ रामीरामदास होळी । केली संसाराची धुळी ॥ १३ ॥

२. अझुनी काय रे दुश्चिता । सावधान होईं आतां ॥ १ ॥ नागविलें योनिद्वारें । म्हणुनि बोंबलती पोरें ॥ २ ॥ सकळ नाडियले वोजें[7] । अवघी एक बोंब गाजे ॥ ३ ॥ धुळी टाकिली मस्तकीं । कोणी दाद देईना कीं ॥ ४ ॥ राडीऐसे नर्क होती । म्हणोनि प्रत्यक्ष दाविती ॥ ५ ॥ झोंबी लोंबी हो घेउनी । जाती टाकिती नेउनी ॥ ६ ॥ नेघे नेघे म्हणती वळी । वळें घालिती

---

१ गुंतवला. २ फिरतात. ३ सर्पण. ४ खोंबरें. ५ गुप्त परमात्मा. ६ अंकित. ७ सहज.

पाताळीं ॥७॥ धरुनी अकस्मात नेती । अवघीं कौतुकें पहाती ॥ ८ ॥ तेथें असेना मर्यादा । थोर करिती आपदा ॥ ९ ॥ घरोघरीं फेरे[1] करिती । तैशा होती पुनरावृत्ती ॥ १० ॥

## ३४. वादपंचक.

१. ध्यान विषयाचें तुटावें । म्हणुनी हरिकथे जावें ॥ १ ॥ ऐसी हेचि कथा गावी । तरि तें धांवणें नागवी ॥ २ ॥ विषयांसि कंटाळले । म्हणुनी हरिकथे आले ॥ ३ ॥ विषयध्यान सांडावया । आलों कीर्तनाच्या ठाया ॥४॥ काम क्रोध मजपासीं । म्हणोनि आलों हरिकथेसी ॥५॥ रामीरामदास म्हणे । वाद सांडा निरूपणें ॥ ६ ॥

२. हरिकथा निरूपणें । तेणें लागलें भांडणें ॥ १ ॥ अमृताचें विष झालें । हे तों प्रचितीसि आलें ॥ २ ॥ चिंतामणी चिंता करी । परिस जाहला भिकारी ॥३॥ आनंदानें दुखविलें । कामक्रोधें नागविलें ॥४॥ कल्पतरूचा फणसा । एकाएकीं भरला कैसा ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । हानि झाली निरूपणें ॥ ६ ॥

## ३५. भ्रमपंचक.

१. झाला स्वरूपीं निश्चय । तरी कां वाटतसे भय ॥ १ ॥ ऐसें भ्रमाचें लक्षण । भुले आपणा आपण ॥ २ ॥ क्षण एक निराभास[2] । क्षण एक मी माणूस ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । देहबुद्धीचेनि गुणें ॥ ४ ॥

२. छाया देखोनि आपुली । जीव झाला दिशाभुली ॥१॥ ऐसें भ्रमाचें लक्षण । भुले आपणा आपण ॥ २ ॥ मुखें बोलतां उत्तर । तेथें जालें प्रत्युत्तर ॥३॥ डोळां घालितां आंगोळी । एकाचीं तीं दोन जालीं ॥ ४ ॥ पोटीं आपण कल्पिलें । तेंच आलेंसें वाटलें ॥५॥ दास म्हणे हे उपाधी । शंका धरितां अधिक बाधी ॥ ६ ॥

३. पोतें आहे खांद्यावरी । गेलें म्हणोनि हांका मारी ॥१॥ ऐसें भ्रमाचें लक्षण । भुले आपणा आपण ॥ २ ॥ नेणोनियां जनां पुसे । पाहों जातां हातीं असे ॥ ३ ॥ शोकें जाहला विकळ । पाहों जातां कंठीं माळ ॥ ४ ॥ वस्तु बांधोनि पदरीं । पुसतसे दारोदारीं ॥ ५ ॥ रामदास म्हणे । जनां । जवळी असोनी कळेना ॥ ६ ॥

---

१ होळीच्या गवऱ्या पांच पांच म्हणून अनेक जन्म विषयांत रमतात. २ ब्रह्मस्वरूप.

४. कांहीं दिसे अकस्मात । तेथें आलें वाटे भूत ॥ १ ॥ वायां पडावें संदेहीं । मुळीं तेथें कांहीं नाहीं ॥ २ ॥ पुढें देखतां अंधारें । तेथें आलें वाटे भरें ॥ ३ ॥ झाडझुडूप देखिलें । जिवीं वाटे कोणी आलें ॥ ४ ॥ पुढें रोविलासे झेंडा । भ्रांत्यां म्हणे कोण उभा ॥ ५ ॥ रामदास सांगे खूण । भितो आपणा आपण ॥ ६ ॥

५. वाजे पाऊल आपुलें । म्हणे मागें कोण आलें ॥ १ ॥ कोण धांवतसे आड । पाहों जातां झालें झाड ॥ २ ॥ भावीतसे[1] अभ्यंतरीं । कोण चाले बरोबरी ॥ ३ ॥ शब्दपडसाद ऊठिला । म्हणे कोणी रे बोलिला ॥ ४ ॥ रामीरामदास म्हणे । ऐसीं भ्रांतीचीं लक्षणें ॥ ५ ॥

६. आला आला रे बागुल । म्हणतां शंका धरी मूल ॥ १ ॥ परी ते शाहाणे जाणती । तैसी माया हे मानिती ॥ २ ॥ मृगें म्हणती मृगजळ । अवघें दाटलें तुंबळ ॥ ३ ॥ पाहों जातां दृष्टीचें बंधन । मूर्खा होय समाधान ॥ ४ ॥ पाहे स्वप्नींची संपत्ती । सत्य मानी मंदमती ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । ऐसीं मूर्खांचीं लक्षणें ॥ ६ ॥

## ३६. झडपणीपंचक.

१. पांचां भूतांची झडपणी । जाली जीवांसी जाचणी ॥ १ ॥ पूर्वस्मरण राहिलें[3] । प्राणी आंगीं घुमारिलें[4] ॥ २ ॥ बाधा जाहली अंतरीं । मन आळचि तें करी ॥ ३ ॥ बोलों जातां सारासार । त्यासि कळेना विचार ॥ ४ ॥ जड देहाची भावना । संतजन ओळखेना ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । सत्य बोलावें शहाणें ॥ ६ ॥

२. आले संतपंचाक्षरी । शब्द मारिती अंतरीं ॥ १ ॥ पोटीं प्रस्ताव घालिती । अनुतापें पोळविती ॥ २ ॥ दुःखमूळ हा संसार । विवेकाचे फोकें मार ॥ ३ ॥ धिक्काराचा धूर देती । तेणें होतसे विपत्ती ॥ ४ ॥ संसाराची रक्षा भली । त्याचे अंगीं बाणविली ॥ ५ ॥ दास म्हणे निगुती । प्राणियांसी बोलविती ॥ ६ ॥

३. कोण कोठील आहेसी । आम्हां सांग निश्चयेंसी ॥ १ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण । सांग तुझें कोण स्थान ॥ २ ॥ पिंडब्रह्मांडरचना । अष्टदेह[5]विवंचना ॥ ३ ॥ पिंडज्ञान तुझें स्थूळ । किंवा तत्वांचा पाल्हाळ ॥ ४ ॥

---

१ भ्रांतीनें. २ कल्पितो. ३ आत्मस्वरूप विसरलें. ४ घुमूं लागलें. ५ स्थूळ, सूक्ष्म, कारण, महाकारण, विराट्, हिरण्य, अव्याकृत व मूळमाया हे पिंडाचे चार व ब्रह्मांडाचे चार असे आठ देह आहेत.

सांग मायेचें अरण्य । किंवा तुझें ब्रह्मारण्य ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । आतां बोलावें स्मरणें ॥ ६ ॥

४. चहूं निगमांचीं[1] बीजें । कानीं फुंकिलीं सहजें ॥ १ ॥ तेणें प्राणी उमजला । पाहे विचार आपुला ॥ २ ॥ नित्यानित्य सारासार । केला विवेक विचार ॥ ३ ॥ संत असतां दाविलें । आंत अनंत भाविलें ॥ ४ ॥ नाना साधनीं सायासीं । दृढ केलें निश्चयेंसी ॥ ५ ॥ दास म्हणे निरूपणीं । केली भूतांची झाडणी ॥ ६ ॥

५. कांहीं एक उमजलें । पुन्हां संदेहीं पडलें ॥ १ ॥ म्हणे मज खाया देणें । मागे संदेह सांडणें ॥ २ ॥ आलें मीपणासरिसें । त्याच विषयें संतोषे ॥ ३ ॥ येणें निष्ठेसी मांडिलें । मग आम्हीं सांडविलें ॥ ४ ॥ देहबुद्धीचें अज्ञान । मागे संशयाचें आन ॥ ५ ॥ रामदासीं उमजलें । भूतापासूनि सोडिलें ॥ ६ ॥

६. पंचभूतांचें अज्ञान । गेलें निःशेष निघोन ॥ १ ॥ म्हणे येथें कोण आलें । जन कासया मिळाले ॥ २ ॥ मी तों आहें सावधान । मज कां केलें बंधन ॥ ३ ॥ पूर्वे स्मरण मजला । भूत लागलें जनाला ॥ ४ ॥ मी तों वस्तुचि[2] केवळ । वायां मिळाले सकळ ॥ ५ ॥ रामीरामदास म्हणे । संतकृपेचेनि गुणें ॥ ६ ॥

---

## ३७. गंधपंचक.

१. पांचांमध्यें जें पहिलें । पाहे तैसेंचि वहिलें ॥ १ ॥ तीं अक्षरीं[3] उच्चार । त्यासि माझा नमस्कार ॥२॥ सातां जनाचे शेवटीं । आट करितां होती भेटी ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । नवांमाजी पहिल्यां[4] गुणें ॥ ४ ॥

२. पहिल्या गुणें दुसऱ्या पक्षा । तेणें लक्षावें अलक्षा ॥ १ ॥ देवाजवळी चुकला । भक्तिभेद भांबावला ॥ २ ॥ पुढें सांपडतां धन । वायां करावें साधन ॥ ३ ॥ रामदास म्हणे सार । येथें पाहिजे विचार ॥ ४ ॥

---

## ३८. संतपंचक.

१. मूर्ति त्रिलोकीं संचली । दृष्टी विश्वाची चुकली ॥ १ ॥ भाग्य आलें संतजन । जालें देवाचें दर्शन ॥ २ ॥ देव जवळी अंतरीं । भेटी नाहीं जन्मवरी ॥ ३ ॥ रामदासीं योग जाला । देहीं देव प्रगटला ॥ ४ ॥

२. जन्मोजन्मींचा सांगात । भेटी झाली अकस्मात ॥ १ ॥ आतां

---

१ वेदांची. २ परब्रह्म. ३ आकाश हाच अंतरात्मा किंवा मूळमाया. ४ श्रवणभक्तीनें.

संडितां सुटेना । तंतु प्रीतीचा तुटेना ॥ २ ॥ सदा नित्य निरंतरीं । देव सबाह्य अंतरीं ॥ ३ ॥ त्याग करितां संयोग । नव्हे कल्पांतीं वियोग ॥४॥

३. देव अभक्ता चोरला । आम्हां भक्तां सांपडला ॥ १ ॥ भेटी जाली सावकाश । भक्ता न लगती सायास ॥ २ ॥ सांपडे विवेकवेत्रपाणी[1] । वरी दृष्टीची दाटणी ॥ ३ ॥ रामदासाचें अंतर । देवापाशीं निरंतर ॥ ४ ॥

४. भेटी देईना जनासी । पाठी लागे सज्जनांसी ॥ १ ॥ ऐसें प्रीतीचें लक्षण । भेटीविण नाहीं क्षण ॥ २ ॥ नसे साधनसायासीं । तो हा आम्हां अनायासीं ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । संतसंगाचेनि गुणें ॥ ४ ॥

५. देव आम्हांसी जोडिला । संतसंगें सांपडला ॥ १ ॥ कडा कपाटीं शिखरीं । धुंडिताती नानापरी ॥ २ ॥ नाना शास्त्रीं धांडोळिती । जयाकारणें कष्टती ॥ ३ ॥ रामदास म्हणे भावें । वेगीं संतां शरण जावें ॥ ४ ॥

६. ब्रह्मादिकांसी दुर्लभ । देव भक्तांसी सुलभ ॥ १ ॥ थोरपणें आढळेना । जाणपणासी कळेना ॥ २ ॥ नाहीं योगाची आटणी[3] । नाहीं तपीं तीर्थाटणीं ॥ ३ ॥ दास म्हणे साधूविण । नाना साधनांचा शीण ॥ ४ ॥

---

## ३९. स्फुट अभंग.

१. त्याचे पाय हो नमावे । त्याचें कीर्तन हो ऐकावें ॥ १ ॥ दुजियासी सांगे कथा । आपण वर्ते त्याचि पथा ॥ २ ॥ कीर्तनाचें न करी मोल । जैसे अमृताचे बोल ॥ ३ ॥ सन्मानितां नाहीं सुख । अपमानितां नाहीं दुःख ॥ ४ ॥ किंचित दिलें दातयानें । तेंहि घेत आनंदानें ॥ ५ ॥ ऐसा आहे हरिदास । लटकें न वदे रामदास ॥ ६ ॥

२. वाणी शुद्ध करीं नामीं । चित्त शुद्ध होय प्रेमीं ॥ १ ॥ नित्य शुद्ध होय नामीं । वसतांहि कामींधामीं ॥ २ ॥ कर्ण शुद्ध करी कीर्तनीं । प्राण शुद्ध करी सुमनीं[4] ॥ ३ ॥ त्वचा शुद्ध करी रज[5] । मस्तक नमितां पदांबुज ॥ ४ ॥ करशुद्धी राम पूजितां । पादशुद्धी देउळीं जातां ॥ ५ ॥ नेमें लिंग करी शुद्ध । अंतर निर्मळ करी गुद ॥ ६ ॥ रामपायीं रहातां बुद्धी । रामदासा सकळ शुद्धी ॥ ७ ॥

३. माझें सर्व जावें देवानें रहावें । देवासी पहावें भक्तपणें ॥ १ ॥ भक्तपणें मज देवचि जोडला । अभ्यास मोडला सर्व कांहीं ॥ २ ॥ सर्व कांहीं जावो एक देव राहो । माझा आर्तभावो[6] ऐसा आहे ॥ ३ ॥ जो हेत

---

१ विवेकरूप काठी हातीं धरल्यानें. २ नाना साधनांचे कष्ट करून न सांपडणारा. ३ कष्ट, सायास. ४ निर्माल्य हुंगून. ५ पायधूळ. ६ उत्कंठा.

अंतरीं देव तैसा झाला । हा दिन पाहिला कोणी एक ॥ ४ ॥ कोणी एक पुण्य जें होतें संचलें । दास म्हणे झालें समाधान ॥ ५ ॥

४. दीनाचा दयाळु कीर्ति ऐकियेली । म्हणूनि पाहिली वाट[1] तुझी ॥१॥ अनाथाचा नाथ होशील कैवारी । म्हणोनियां हरी बोभाइलें ॥२॥ तुजविण कोण जाणे हें अंतर । कोणासी जोजार[2] घालूं माझा ॥ ३ ॥ दास म्हणे आम्ही दीनाहुनी दीन । करावें पालन दुर्बळाचें ॥ ४ ॥

५. आम्हां पतितांची सांड केली जरी । आमुचा कैवारी कोण आहे ॥ १ ॥ आम्ही भरंवसा कोणाचा धरावा । सांगावें केशवा दयानिधे ॥२॥ तुजविण आम्हां नाहीं त्रिभुवनीं । धांवें चक्रपाणी दीनबंधो ॥३॥ पतित-पावन ब्रीद हें बांधिलें । तारावें वहिलें दासालागीं ॥ ४ ॥

६. पळशी तूं तरी नाम कोठें नेशी । आम्हीं अहर्निशीं नाम घोकूं ॥ १ ॥ आम्हांपासोनियां जातां न ये तुज । तें हें वर्म बीज नाम जपूं ॥२॥ देवा आम्हां तुझें नाम हो पाहिजे । मग भेटी सहजें देणें लागे ॥३॥ भोळे भक्त आम्ही चुकलोंचि कर्म । सांपडलें वर्म रामदासा ॥ ४ ॥

७. गजेंद्र सावज पडला पानवडी[3] । रामें तेथें उडी टाकियेली ॥ १ ॥ प्रल्हाद गांजितां कोण सहाकारी । स्वयेंचि मुरारी प्रगटला ॥ २ ॥ क्षत्रियें ब्राह्मणें गांजिलीं बापुडीं । रामें[4] तेथें उडी घातियेली ॥३॥ तेहतीस कोटी देव पाडिले बांदोडीं[5] । रामें तेथें उडी टाकियेली ॥ ४ ॥ दासापायीं पडली देहबुद्धीबेडी । रामें तेथें उडी टाकियेली ॥ ५ ॥ रामदास म्हणे नका करूं शीण । रामें भक्त कोण उपेक्षिले ॥ ६ ॥

८. तुजविण देव मज कोणी नाहीं । माझी चिंता कांहीं असों द्यावी ॥ १ ॥ वैराग्यें कनिष्ठ अभावें वरिष्ठ । माझे मनीं नष्ट संदेहता ॥ २ ॥ विवेकें सांडिलें ज्ञानें वोसंडिलें । चित्त हें लागलें तुझे पायीं ॥ ३ ॥ तुझें नाम वाचे उच्चारीत असें । अंतरीं विश्वास धरियेला ॥ ४ ॥ रामदास म्हणे मी तुझें अज्ञान । माझें समाधान करीं देवा ॥ ५ ॥

९. श्वानाचियां पुत्रें कल्होळ मांडिला । कलहो लागला एकसरा ॥१॥ भुंकिता गुरगुरी वासितोचि तोंड । वरती थोबाड करूनियां ॥ २ ॥ एक ते भुंकती एक ते रडती । दास म्हणे गती निंदकांची ॥ ३ ॥

१०. मेरूचिया माथां ठेवुनीयां पाव । जात असे राव कैलासींचा ॥ १ ॥ कैलासींचा राव एक देव क्षोभला । देशधडी केला लंकानाथ

---

१ हांक मारिली, आळवलें. २ भार. ३ पाण्यांत. ४ परशुरामानें. ५ बंदिखान्यांत.

॥२॥ लंकेच्या चोहटीं मांडियेला खेळ । अग्नीचा कल्होळ घरोघरीं ॥३॥ जाळियेलीं घरें सुंदर मंदिरें । पावला कैवारें जानकीच्या ॥ ४ ॥ जानकीचा शोक दुरी दुराविला । यशवंत झाला रामदास ॥ ५ ॥

११. जाणावा तो नर देवचि साचार । वाचे निरंतर राम नाम ॥ १ ॥ सगुणीं सद्भाव नाहीं ज्ञानगर्व । तयालागीं सर्व सारिखेचि ॥२॥ निंदकां-वंदकां सगट सांभाळी । मन सर्वकाळीं पालटेना ॥ ३ ॥ पालटेना मन परस्त्रीकांचनीं । निववी वचनीं पुढिल्यांसी ॥ ४ ॥ पुढिल्यांसि तोचि सुख देत आहे । उपकारीं देह लावीतसे ॥ ५ ॥ लावीतसे देह रामभजनास । रामीरामदास हरिभक्त ॥ ६ ॥

१२. भक्तपणें रामनामाचा अव्हेर । करी तो गव्हार मुक्त नव्हे॥१॥ मुक्त नव्हे काय स्वयें शूलपाणी । रामनाम वाणी उच्चारितो ॥ २ ॥ राम म्हणे शिव तेथें किती देव । बापुडें मानव देहधारी ॥३॥ नर देहधारी धन्य ते संसारीं । वाचे निरंतरीं रामनाम ॥ ४ ॥ रामनाम वाचे स्वरूप अभ्यंतरीं । धन्य तो संसारीं दास म्हणे ॥ ५ ॥

१३. मी खरा पातित तूं खरा पावन । आतां अनमान करूं नको ॥१॥ आतां कांहीं मज चिंता तीहि नसे । तुझें नाम कैसें वाचे येई ॥ २ ॥ समर्थें घेतला नामासाठीं भार । मज उपकार कासयाचा ॥ ३ ॥ रामदास म्हणे तुझें तुज उणें । सोयरीं पिशुनें हांसतील ॥ ४ ॥

१४. पतितपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥१॥ मिथ्या शब्दज्ञानें तुज अंतरलों । संदेहीं पडलों मीपणाच्या ॥ २ ॥ सदा खळखळ निर्गुणाची घडे । सगुण नातुडे ज्ञानगर्वें ॥ ३ ॥ रामदास म्हणे ऐसा मी पतित । मीपणें अनंत आतुडेना ॥ ४ ॥

१५. टाळ धरूं कथा करूं । रामालागीं हाका मारूं ॥ १ ॥ ये रे रामा ये रे रामा । तुझी आवडी लागो आम्हां ॥ २ ॥ तुजविण गाईल कोण । ऊठ सांडिलें मीतूंपण ॥ ३ ॥ रामदास पाहे वास । भेटी द्यावी सावकाश ॥ ४ ॥

१६. रामभक्तीविण आन नाहीं सार । साराचें हें सार राम एक ॥१॥ कल्पनाविस्तारु होतसे सत्वरु । आम्हां कल्पतरु चाड[1] नाहीं ॥ २ ॥ कामनेलागोन विटलेंसे मन । तेथें चाड कोण कामधेनू ॥ ३ ॥ चिंता नाहीं मनीं राम गातां गुणीं । तेथें चिंतामणी कोण पुसे ॥ ४ ॥ कदा

१ चव्हाट्यावर. २ आवड.

नाहीं नाश स्वरूप सुंदर । तेथें आम्हां हिरे चाड नाहीं ॥ ५ ॥ रामदास म्हणे रामभक्तीविणें । जाणावें तें उणें सर्व कांहीं ॥ ६ ॥

१७. सीतापति राम पतितपावन । गाती भक्तजन आवडीनें ॥१॥ राघवाच्या गुणा न दिसे तुळणा । कैलासींचा राणा लांचावला ॥ २ ॥ देवांचें मंडण भक्तांचें भूषण । धर्मसंरक्षण राम एक ॥ ३ ॥ रामदास म्हणे धन्य त्याचें जिणें । कथानिरूपणें जन्म गेला ॥ ४ ॥

१८. आम्हीं देखिला विठोबा । आनंदें विटेवरी उभा ॥ १ ॥ तेथें दृश्याची जे दाटी । तेचि रुक्मिणी गोमटी ॥ २ ॥ रामीरामदास म्हणे । जो ओळखे तोचि धन्य ॥ ३ ॥

१९. लांचावोनी भक्तिलोभा । असे वाळवंटीं उभा ॥ १ ॥ पदकीं इंद्रनीलशोभा । प्रभे उजळती शोभा ॥ २ ॥ भक्त पुंडलिकें गोंविला । जाऊं नेदी भांबाविला ॥ ३ ॥ भाग्य पुंडलिकाचें । उभें दैवत त्रिलोकींचें ॥ ४ ॥ कींजें तारूं भवसागरीं । विनटलें भीमातीरीं ॥ ५ ॥ पुंडलीकें करुनी जोडी । आम्हां दिधली कल्पकोडी ॥ ६ ॥ तुटली संसारसांकडीं । रामदास म्हणतसे ॥ ७ ॥

२०. जीवन्मुक्त प्राणी होउनीयां गेले । तेणें पथें चाले तोचि धन्य ॥ १ ॥ जाणावा तो ज्ञानी पूर्णसमाधानी । निःसंदेह मनीं सर्वकाळ ॥ २ ॥ मिथ्यादेहभान प्रारब्धाआधीन । राखे समाधान पूर्णपणें ॥३॥ आवडीनें करी कर्मउपासना । सर्वकाळ ध्यानारूढ मन ॥ ४ ॥ पदार्थाची हाणी हाता न ये कोणी । जयाची करणी बोला ऐसी ॥ ५ ॥ धन्य ते पैं दास संसारीं उदास । तयां रामदास नमस्कारी ॥ ६ ॥

२१. संसार देखीला तरी पाहे सार । वाया येरझार पाडूं नको ॥ १ ॥ पाडूं नको दुःखसागरीं आपणा । म्हणे नारायणा वोळखावें ॥२॥ वोळखावें वेगीं आपआपणासी । संसारीं सुटसी दास म्हणे ॥ ३ ॥

२२. विचारें संसार होतो देशधडी । सोनियाची घडी जात आहे ॥ १ ॥ डावा तास गेला मोक्षपंथा जातां । विवेक तत्वता याचि नांव ॥ २ ॥ सदा श्रीरामाचें भजन करितां । दास म्हणे चिंता दूर होय ॥३॥

# (१८) लघु रामकृष्णचरित्रें.

## १. लघु रामचरित्र.

वृत्त—प्रमाणिका.

तनू वितंड चंडसी । प्रचंड शुंड[1] दंडसी ।
सुरंग रंग रेखिला । घवघवीत देखिला ॥ १ ॥
नमू गणेश तो गुणी । विराजतो विभूषणीं[2] ।
जनासि सौख्यकारकू । विशाळ विघ्नहारकू ॥ २ ॥
जनांत सूमती मती । नमूनि ते सरस्वती ।
महंत संत श्रोतयां । वदोनियां गुणाळयां ॥ ३ ॥
समस्तही मनीं धरा । कथा करीनसें करा ।
लाहानसा कवी नवा । रघूत्तमासि वीनवा ॥ ४ ॥
श्रीराम राम राम हा । समर्थ पूर्णकाम हा ।
प्रतापकिरण फांकलें । प्रचंड तेज झांकलें ॥ ५ ॥
प्रिती करूनि आदरें । भजोनियां दशशिरें[3] ।
पुजून देव शंकरू । उदंड साधिला वरू ॥ ६ ॥
तया वरेंचि मातला । सधर्मकामिं रातला ।
भुमंडळीं नव्हे भला । बहुत लोक पीडिला ॥ ७ ॥
स्वधर्म सांडिला सळें[4] । अधर्म मांडिला बळें ।
पीडावलीं ऋषीकुळें । कितेक शोधिलीं मुळें ॥ ८ ॥
समस्त देव ते भले । परंतु बंदें[5] पावले ।
बहु ग्रहांसि निग्रहो । ग्रहांसि भेटला[6] ग्रहो ! ॥ ९ ॥
उदासली वसुंधरा । बहु भिती निशाचरा ।
अनीति फारसी वसे । कदापि न्याय तो नसे ॥ १० ॥
नरेंद्र[7] हो फणेंद्र हो । विधी सुरेंद्र चंद्र हो ।
वरुण वात पावकु । कुबेर यम धार्मिकु ॥ ११ ॥
प्रचंड दंड दांडिका । सटी गणेश चांडिका ।
समस्त ही विरोधली । बहू बळें निरोधली ॥ १२ ॥

---

१ सोंड. २ अलंकारांनीं शोभतो. ३ रावणानें. ४ बळानें, हट्टानें. ५ बंध, रावणाचें कारागृह. ६ नवग्रहांचा ग्रह, छलक. ७ पृथ्वीपति, पाताळाधिपति व स्वर्गाधीश इ० सर्व देव.

समीर लोटितो खडे । वरुण घालितो सडे ।
मयंक[1] साउली धरी । मळीण पावकु[2] हरी ॥ १३ ॥
विधी विधीस धाकतो । सुरेंद्र बाग राखतो ।
करावयास निग्रहो । भुमंडळासि विग्रहो ॥ १४ ॥
अखंड चाकरी करी । सदा वरुची भोंदरी[3] ।
सटी आरंधळी[4] दळी । गणेशें[5] गाढवें वळी ? ॥ १५ ॥
परोपरीं विटंबणा । वदेल कोण रावणा ।
उदंड देव पीडिले । मदें पदासि खंडिलें ॥ १६ ॥
बहु कठीण काळ हो । समस्त पावले मोहो ।
हिणादिनाचियापरी । सदा गळीत[6] अंतरीं ॥ १७ ॥
समस्त केश लांबले । कितेक व्यस्त लोंबले ।
नखेंचि योग साधले । समस्त देव गांदले[7] ॥ १८ ॥
निशाचरें बहु वसे । कठीण वर्तमानसें ।
ह्मणोनि राम पावला । बहू बळें उठावला ॥ १९ ॥
निमित्त मात्र ते सिता । विबूधपक्ष[8] पुरता ।
समर्थ तो भला भला । कुढावयासि[9] पावला ॥ २० ॥
अचाट तीं कपीदळें । असंख्य चालिलीं बळें ।
करूनि सख्य पाहिलें । परंतु सर्व राहिलें ॥ २१ ॥
हरूनियां कुळांगना । बहुत गर्व रावणा ।
विचार नाइके भला । प्रचंड राम कोपला ॥ २२ ॥
प्रभु म्हणे हरेश्वरा । त्रिकूट पालथा करा ।
उठावलीं कपीदळें । पुरीस वेढिलें बळें ॥ २३ ॥
कपी विशाळ ते गिरी[10] । गिरीच घेतले करीं ।
उठावले भुजाबळें । बळें बळेंचि तुंबळें ॥ २४ ॥
बहुत दाटले हुडे[11] । हुडा हुडा चि मेहुडे[12] ।
तयापरीच ते कपी । वितंड चंड साक्षपी ॥ २५ ॥
निशाचरांसि घातलें । बळोंचि दुर्ग घेतलें ।
असंख्य जुत्पती[13] किती । हुडांहुडांचि गर्जती ॥ २६ ॥

---

१ चंद्र. २ अग्नीचें काम 'मळिण' हरण करण्याचें ! ३ वरुची बिचारा हजाम झाला. ४ कर्कश गाणी म्हणत दळी. ५ बुद्धिदात्या गणेशाकडे गाढवांना ( मंदप्रज्ञ मूढांना ) वळवण्याचें काम आलें तें योग्यच आहे ! ६ निरुत्साह. ७ त्रासले. ८ दैवांचा कैवार. ९ रक्षण करण्यास. १० गिरितुल्य. ११ बुरूज. १२ मेघ. १३ मल्ल.

बळें कपी बळावले । उदंड दैत्य पावले ।
विरांविरांसि तांतडी । बळावली धडाधडी ॥ २७ ॥
कपी कितेक कोपले । रवीमयंक[1] लोपले ।
तडकसें तडाडिलें । नभीं गिरी घडाडिले ॥ २८ ॥
त्रिकुट तो तडाडिला । तडक वाजला भला ।
कडाडिलें खडाडिलें । बहु हुडे घडाडिले ॥ २९ ॥
त्रिकुट घेतला बळें । अचाट चालिलीं दळें ।
असंख्य वीर जातसे । धुळार गर्द[2] होतसे ॥ ३० ॥
थटाट मारिती शिरें । कितेक हाणती करें ।
निकट हो धबाधबी । रुधिरसें थबाथबी ॥ ३१ ॥
करें करासि देहुड्यां[3] । पदोपदीं आढ्यांतिढ्या[4] ।
मुखें मुखासि तोडिती । धरूनि केंश वोढिती ॥ ३२ ॥
बहू उकावले[5] बळा । गळ्यासि लाविती कळा ।
धडें धडासि ठेलिती[6] । विरांसि वीर रेलिंती[7] ॥ ३३ ॥
पडोनियां उफाळती । बळें बळी धुमाळिती ।
बुकालितातिं नीकुरें । मुर्डुप[8] लात कोंपरें ॥ ३४ ॥
बसोनियां उरावरी । नखें शिखा परोपरीं ।
कितेक वीर झोंबती । किती अडोन लोपती ॥ ३५ ॥
बहुत धीट ते हटी । कितेक ते लटापटी ।
परस्परेंचि नीकुरें[9] । धरूनि मोडिती शिरें ॥ ३६ ॥
कितेक वीर पाडिले । कितेक ते पछ्याडिले ।
बळेंचि पोट फाडिती । निशाचरा विभांडिती ॥ ३७ ॥
कितेक दैत्य झोडिले । कितेक हस्त मोडिले ।
पदीं धरूनि वोढिती । बळें भुमीस पाडिती ॥ ३८ ॥
कपी चपेट सूटले । कितेक दैत्य आटले ।
झपेटिती लपेटिती । पिटून कूटकूटिती ॥ ३९ ॥
पुरीमधें कल्होकळी[10] । तडक हाक वाजली ।
अचाट धुंद माजली । विशेष बोंब गाजली ॥ ४० ॥
त्रिकूटिचे भले भले । वितंड वीर क्षोभले ।
प्रचंड चालिलीं दळें । दळें दळेंचि तुंबळें ॥ ४१ ॥

---

१ सूर्यचंद्र. २ दाट धूळ. ३ देहुडी=चौकी. ४ रेटारेटी, हाणामारी. ५ बळानें फुरफुरले. ६ झुंज घेतात. ७ ढकलतात. ८ गुद्दे. ९ त्वेषानें. १० कलहकळी, भांडाभांडी.

[1]बळागळे भले भले । तुरंगभार चालिले ।
मना कळेचिना गती । तुफानसे उफाळती ॥ ४२ ॥
सुरंग रंग साजिरे । तुरंग रंगले बरे ।
समस्त हस्त तोलती । [2]आढाल [3]डौल डोलती ॥ ४३ ॥
कितेक हस्त मस्तसे । बहुत खस्त व्यस्तसे ।
प्रचंड दंत हाणती । महीतळास खाणती ॥ ४४ ॥
पथीं पथींच ते रथी । रथींच रथींच सारथी ।
तुरंग ते तडाडिले । रणांगणीं घडाडिले ॥ ४५ ॥
तुरें तुरें बहुवसें । विशेष घोष कर्कशें ।
अचाट भाट चालती । ब्रिदें पवाड [4]बोलती ॥ ४६ ॥
उन्मत्त मत्त ठांइचें । रथी तुरंग पांइचे ।
समस्त ही उठावले । रणांगणासि पावले ॥ ४७ ॥
कडक चालिलीं सळें । थडक जाहालीं बळें ।
विरांसि वीर हाणती । परस्परें खणाणिती ॥ ४८ ॥
गदा [5]पटीस तोमरें । [6]दुधार मारिती भरें ।
बहु खणाण सुटले । अनेक घोष उठीले ॥ ४९ ॥
असंख्य हस्त मातले । बळेंच रान घेतलें ।
चपेटिती लपेटिती । कपीकुळां झपेटिती ॥ ५० ॥
रथारुढीं निशाचरीं । कपीसि त्रासिलें शरीं ।
विशेष [7]राउतीं बळें । विदारिलीं कपीकुळें ॥ ५१ ॥
समस्त हस्त सुटले । अभंग भार फुटले ।
बळें करुनि चीरडा । रणांगणीं [8]पखारडा ॥ ५२ ॥
कितेक भार चिंबती । कितेक वीर हुंबती ।
अचाट दाटलीं रणें । दिसेतिनात कीरणें ॥ ५३ ॥
अनेक भार वावरे । समोर मार नावरे ।
कितेक वीर भेदिती । परस्परेंचि छेदिती ॥ ५४ ॥
मधेंचि येक खंडिले । कितेक ते उलंडिले ।
परोपरीं कळेवरें । तुटोनि भेदिलीं भरें ॥ ५५ ॥
कठीण मार नावरे । वीरांत वीर वावरे ।
विराश्रिया भरीं भरे । देहासि लागले झरे ॥ ५६ ॥

---

१ बळ+आगळे=विशेष बळाचे. २ आडल, वृक्ष. ३ जाडी साल. ४ भाटांचें कामच मालकाच्या बिरुदावळी व पवाडे म्ह० पराक्रमाचीं गीतें गायचें असें. ५ पट्टीस, भाला, बरची. ६ दोन धारांची. ७ घोडेस्वारांनीं ( राऊत ). ८ पखरडा, पसारा.

घसास[1] तोडिती बळें। भसास[2] टोंचिती शुळें।
थडाड थाड तोडिती। वीरांसि वीर पाडिती॥ ५७॥
कितेक वीर नीखुरें। भडाड मारिती भरें।
तडाड तूटती शिरें। उलंडलीं कळेवरें[3]॥ ५८॥
कत्तार[4] मार होतसे। रुधिरपूर जातसे।
नभीं उफाळती शिरें। रिसें गळीत वानरें॥ ५९॥
रणांगणीं मदोन्मतीं। रथीं विशेष राउतीं।
मनीं धरूनि आक्रमु। बळेंचि भंगिली चमू॥ ६०॥
कडक निकटें कटें। तुरंग हस्त शक्कटें।
कत्तार मार मारिले। रिपु समस्त हारिले॥ ६१॥
भुजाबळेंचि राउतीं। कपीदळेंचि तीं रितीं।
करूनि खस्त पाडिलीं। किती रिसें विदारिलीं॥ ६२॥
बहुत आट वानरां। जयो दिसे निशाचरां।
प्रचंड वीर कोपले। कितेक ते उठावले॥ ६३॥
कपीकळोळ चालिला। विधीभुगोळ हालिला।
चपेट मारिती बळें। लपेटिताति लांगुळें॥ ६४॥
कितेक टाकिती शिळा। कितेक झोंकिती शुळा।
गदा तडक फुटले। फणाण बाण सुटले॥ ६५॥
किराण ठाण नेटकें। धरूनि खर्व खेटकें।
फडाड हाणती बळें। बळेंचि मोडिती दळें॥ ६६॥
कडक वाजती भरें। परस्परेंचि नीकुरें।
भले भले उठावले। वीरांसि वीर पावले॥ ६७॥
पुढील भार भंगती। कितेक वीर लंघती।
सवेंचि उठती बळी। बळें चि फोडिती फळी॥ ६८॥
बळेंचि भार लाटिले। कितेक दैत्य आटले।
विराश्रिया भले भले। भलेभलेचि तुंबले॥ ६९॥
शिळा बहुत शीखरें। कितेक तें तरुवरें।
बळें उठावले कपी। अचाट धीट साक्षपी॥ ७०॥
हये हयांस ताडिती। गजें गजा पछ्याडिती।
रथें रथासि मोडिती। निशाचरांसि झोडिती॥ ७१॥
बहुत वेळ भांडले। रिपु कितेक खंडले।
सुरांसि त्रासिती बळी। उलंडले भुमंडळीं॥ ७२॥

---

१ व्यर्थ, निष्कारण. २ हवें त्या प्रकारें. ३ प्रेतें. ४ काटाकाटीचा.

वितंड मेघवर्ण तो । बलाढ्य कुंभकर्ण तो ।
दळेंचि गीळितो सळें । परंतु मारिला बळें ॥ ७३ ॥
प्रधानही भले भले । रणीं बहुत भांडले ।
परंतु यश नाडळे । देहाभिमान तो गळे ॥ ७४ ॥
सुरेंद्र जिंकिला रणीं । प्रसिद्ध राम रावणी ।
बहुत वेळ भांडले । पुढें रणीं उलंडले ॥ ७५ ॥
अनुज सुत आक्रमी । प्रधानही पराक्रमी ।
सखे समस्त मारिले । रणांगणीं विदारिले ॥ ७६ ॥
सुरां कळेचिना गती । भुमंडळासि भंगिती ।
बहूत सुर विक्रमी । उलंडले पराक्रमी ॥ ७७ ॥
बहु बलाढ्य दैत्य हो । परंतु पावले मोहो ।
कपी तुफा[1]न सुटले । असंख्य सैन्य आटलें ॥ ७८ ॥
अभंग भार भंगले । कितेक वीर रंगले ।
शरीर खस्त खंगलें । विरंगलें विरंगलें ॥ ७९ ॥
अखंड वानरा जयो । निशाचरां घडे क्षयो ।
मनीं धरूनि साक्षपु । अचाट कोपला रिपु ॥ ८० ॥
उदंड देखिलें उणें । मनीं धरूनि रावणें ।
बहु बळें उठावला । रणांगणासि पावला ॥ ८१ ॥
रथारुढें निशाचरें । बहुत नीकुरें भरें ।
असंख्य बाण सोडिले । रिपू कितेक मोडिले ॥ ८२ ॥
भरार पिच्छ तें झडी । फणाण बाण वांकडी ।
रिसें कितेक वानरें । गळीतसीं भयातुरें ॥ ८३ ॥
कितेक वीर बापुडे । पळोनि राघवाकडे ।
विशेष मंदली गती । रघूत्तमासि बोलती ॥ ८४ ॥
प्रसंग हा नव्हे भला । कृतांत काळ कोपला ।
बहुत त्रासलों जिवीं । प्रभू दिनासि वांचवी ॥ ८५ ॥
उणीव देखतक्षणीं । उठावला तत[2]क्षणीं ।
विरश्रिया भुजाबळें । असंख्य भंगिलीं दळें ॥ ८६ ॥
रणांगणीं निशाचरें । करूनि खस्त गज्जरें ।
कितेक तें भयातुरें । विलोकिलीं दशाशिरें ॥ ८७ ॥
अधीक कोपला हटी । पुढें रथास ने[3]हटी ।
उदंड सोडिली सिमा । धिक्कारिलें रघूत्तमा ॥ ८८ ॥

[1] बेभान होऊन. २ तत्काळ. ३ जोरानें हांकी.

समस्त मानिलें उणें । गिळीन काळसें ह्मणे ।
खिळीन हे वसूमती । मनुष्य राम तें किती ॥ ८९ ॥
मनीं धरूनियां पणू । समोर राम रावणु ।
हटें हटावला हटी । किलाल चोसटी सटी ॥ ९० ॥
अनेक वाजती तुरें । कितेक होत आतुरें ।
कठोर मांडलें पुरे । नभासि दाटलें धुरें ॥ ९१ ॥
सणाण विंधिती शरें । परस्परेंचि नीखुरें[1] ।
घुमघुमी घुमारलें । नभीं धुरें धुमारलें ॥ ९२ ॥
नभासि दाटली रजें । चणाणितांति नारजें ।
अचाट युद्ध माजलें । कठोर थोर गाजलें ॥ ९३ ॥
अमेध्य[2] मांस पुरतें । रणांत नाचती भुतें ।
शिरें धरूनियां पदें । गिधें कितेक श्वापदें ॥ ९४ ॥
वितंड कोपला इशु । अचाट घोष कर्कशु ।
धनुष्य वांइलें[3] गुणा । गमे वधील रावणा ॥ ९५ ॥
तडक वाजला बळें । दणाणिलीं भूमंडळें ।
कडक उठीला रणीं । भयें थरारिला फणी ॥ ९६ ॥
करकरीत कर्करी । गरगरीत गर्गरी ।
थरथरीत थर्थरी । भरभरीत भर्भरी ॥ ९७ ॥
कडकडू कडाडिलें । खडखडू खडाडिलें ।
गडगडू गडाडिलें । धडधडू धडाडिलें ॥ ९८ ॥
तडतडा तडाडिलें । थडथडा थडाडिलें ।
दडदडा दडाडिलें । धडधडा धडाडिलें ॥ ९९ ॥
कडाडिलें खडाडिलें । गडाडिलें पडाडिलें ।
तडाडिलें थडाडिलें । दडाडिलें धडाडिलें ॥ १०० ॥
विशेष आटं[4] वानरां । जयो दिसे निशाचरां ।
अचाट दाटलीं दळें । निःशंक तोडिती बळें ॥ १ ॥
कृतांत काळ कोपला । भुजाबळें उठावला ।
उदंड भार भेदिले । रिपू समस्त छेदिले ॥ २ ॥
पुन्हा सर्वेचि नीखुरें । समस्त छेदिलीं शरें ।
बळेंचि भेदिलीं कुपी । अचाट गर्जले कपी ॥ ३ ॥
रणीं वधूनि रावणा । बिभत्सता रणांगणा ।
बळें धडाडिला नभीं विशाळ देवदुंदुभी ॥ ४ ॥

---

१ नाराच, बाण. २ अपवित्र. ३ लावलें, जोडलें. ४ नाश.

निरोध बंद सूटले । समस्त देव भेटले ।
मृदूत्तरेंचिं उत्तरें । बहुस्तुती परस्परें ॥ ५ ॥
समस्त देव हर्षले । कुसूमभार वर्षले ।
जयो जयो सितापती । मुखें बहुत गर्जती ॥ ६ ॥
महेश कीर्ति बोलती । प्रताप जीव तो किती ।
चुकोन नेणता कवी । रघूत्तमासि वीनवी ॥ ७ ॥
बळें कृतांत काळ तूं । प्रभू दिना दयाळ तूं ।
मनीं धरूनियां मोहो । तुझाचि साभिमान हो ॥ ८ ॥
बिभीषणास त्रीकुटीं । बळेंचि स्थापिला पटीं ।
सुखावला बिभीषणू । अखंड रामचिंतनू ॥ ९ ॥
विराजमान जानकी । धगधगीत पावकीं ।
रघूत्तमासि भेटली । वियोगवेळ तूटली ॥ १० ॥
कितेक स्वर्गगायका । मिळोन अष्टनायका ।
विणे धरूनि तुंबरें । आलाप होतसे भरें ॥ ११ ॥
अनेक वाद्यकूसरी । बहूकळा परोपरीं ।
गुणी उदंड गातसे । घनें घमड होतसे ॥ १२ ॥
कितेक भाट दाटले । अचाट दाट थाटले ।
जिवीं सुखावले सुखें । कडक[1] बोलती मुखें ॥ १३ ॥
अनेक बंद तोडिले । समस्त देव सोडिले ।
प्रचीतिनें पाहा पाहा । प्रभू समथ राम हा ॥ १४ ॥
निरोप दीधला सुरां । समागमेंचि वानरां ।
रिसांसहित घेतलें । सपुष्पकांत[2] घातलें ॥ १५ ॥
बहुत आर्त हो तया । विशेष भेटि भ्रातयां[3] ।
समस्त लोक भेटले । महासुखें सुखावले ॥ १६ ॥
अनेक वीरकट्ट[4] तो । प्रभूसी राजपट्ट तो ।
अचाट गर्द माजला । विधीभूगोळ गाजला ॥ १७ ॥
अनेक मंत्रघोष तो । अनेक वाद्यघोष तो ।
अनेक नामघोष तो । अनेक सर्वघोष तो ॥ १८ ॥
गणील कोण वैभवा । उल्हास वाटतो जिवा ।
पहा जयाचिया मनें । समर्थ इंद्रभूवनें ॥ १९ ॥

---

१ कवितेचा एक प्रकार आहे. कडक, कडके छंद. २ पुष्पक विमानांत. ३ भरताची. ४ वीरसमुदाय.

सुखें उभारिली गुढी । बहु जनासि आवडी ।
अखंड राज्य हा करु । कवी जनांसि वीवरु ॥ २० ॥
बहुत भव्य भोजनें । अनेक वस्त्रभूषणें ।
कपीरिसासि गौरवी । श्रीरामदास तो कवी ॥ २१ ॥
समर्थ हे उपासना । जगांत आणिती मना ।
रघूत्तमा उपासिती । सखेचि तेचि वाटती ॥ २२ ॥
शरीर वीकिलें गुणीं । अनन्यभाव निर्गुणीं ।
जना उपासनागुणें । कळोनि मोक्ष पावणें ॥ २३ ॥
घवघवीतसे कवी । कवी कवीच लाघवी ।
परोपरीं भले भले । प्रबंद बंद साधले ॥ २४ ॥
विरक्त भक्त जाणते । अगम्य खूण बाणते ।
शरीर त्या घरीं पडो । मनांत राम सांपडो ॥ २५ ॥

---

## २ सीतानाथ समर्थ.

राम राज्य करी जरा दुरि करी मृत्यूसि नाहीं उरी
राजा एकशरी बळें बहु पुरी दूजी नसे अंतरी[1] ।
रामालागि सरी नसेल दुसरी श्रीराम येकोतरी
वैकुंठा नगरी समागम वरी नेली अयोध्यापुरी ॥ १ ॥
ज्याचें रूप अरूप नाम न घडे ध्यानीं मनीं नातुडे
ज्याचा पार अपार वृत्ति पाहातां स्वानंदडोहीं बुडे ।
तर्का भूलि पडे समूळ विघडे संसारमाया उडे ।
तें हें नाम म्हणा श्रीराम म्हणतां दासासि प्रेमा चढे ॥ २ ॥
ज्या नामें गणिका विमान चढली मोक्षासनीं बैसली
ज्या नामस्मरणें हळाहळ कळा क्षीणत्वता पावली ।
ज्या नामें जडमूढ पावन शिवें वाराणसी प्रेरिली
तें हें नाम म्हणा श्रीराम वदनी संजीवनी फावली ॥ ३ ॥
ज्याचें रूप विशाळ ज्वाळ नयनीं जाळूं शके मेदिनी
ज्याचा दर्प अगाध सर्पभुषणीं कंदर्प कांपे मनीं ।
ज्याचा काम विराम श्यामवदनी लावण्य पंचाननी
ते हे मूर्ति सगूण कीर्ति भजनीं वाखाणिली सज्जनीं ॥ ४ ॥

---

[1] स्त्री, एकपत्नी होता-

राजाराम सगूण श्याम बाळिया घेऊनि आले ऋषी
यज्ञीं विघ्न करूनि भग्न सकळै आनंदले मानसीं ।
पुढें चंड शिळा[1] प्रचंड पडिली उद्धार केला तये
सीतानाथ समर्थ यासि तुळणा ब्रह्मांड देतां नये ॥ ५ ॥

---

## ३ रामप्रताप.

राम हा देव देवांचा । देव प्रत्यक्ष सोडिले[2] ।
गाजली गोष्टी वैकुंठीं । माजली सचराचरीं ॥ १ ॥
बंदीचे सोडिले देव । आनंदीं घातले सदा ।
कष्टले लोक देवाचे त्यावरी फीरला[3] दिसे ॥ २ ॥
रावणु तर्टकु मोठा । त्रैलोक्य पीडिलें बळें ।
पीडिले पाळिले सर्वै । रामव्याघ्रपंचाननें ॥ ३ ॥
मातले हस्त ते मोठे । तुरंगें गोधनें बहु ।
चौताळला राम तेथें । वर्डती राक्षसें किती ॥ ४ ॥
चपेटी लपेटी दाटी । लाटालाटी करीतसे ।
मातले दैत्य ते मोठे । अन्याय कारिती बहु ॥ ५ ॥
घर्डिले चिर्डिले राजे । गागाती रणदेवता ।
देव ऋषी मुनी योगी । तापासी बहुतांपरीं ॥ ६ ॥
तुंबरु नारदादीक । देव मृदंग वाजवी ।
गाजवीतो ध्वनी नाना । दुर्जना लाजवीतसे ॥ ७ ॥
प्रस्तुतं[4] कोपला देवो । देवद्रोही पुरे पुरे ।
सर्वोहि चालिल्या फौजा । सोनाभार परोपरीं ॥ ८ ॥
देव तो चेतला आहे । भडस[5] पूर्वीतसे ।
काय होईल पाहावें । राहावें सुखभुवनीं[6] ॥ ९ ॥

---

## २. लघु कृष्णचरित्र.

हरीजनकजननी । प्रसूत कंसभूवनीं ।
श्रीकृष्ण जन्मला गुणी । करी जनांसि मोहनी ॥ १ ॥
कितेक बंदमोचनें । तैयासि[7] काय बंधनें ।
करूनि पंथ मोकळा । श्रीकृष्ण जाय गोकुळा ॥ २ ॥

---

१ अहल्या. २ सोडविले. ३ वळला. ४ समर्थांच्या काळीं. ५ हौस, मनोरथ. ६ आनंदवनभुवनीं, महाराष्ट्रांत. ७ ज्यानें अनेकांना बंधमुक्त केलें त्याला कंस काय बंधांत ठेवतो.

रिपू ह्मणे चला चला । प्रसूतकाळ सुचला ।
विशेष कंस तो हटी । पदीं धरूनि आपटी ॥ ३ ॥
बळेंचि हस्त पीळिला । तडक वाजला भला ।
ह्मणे रिपू तुझा रिपू । श्रीकृष्ण गोकुळाधिपू ॥ ४ ॥
मनांत कंस खोंचला । अपाय सूचला भला ।
उपाय कोण तो भटो । जिवांत काजळी तुटो ॥ ५ ॥
भट्ट वदे नृपापुढें । उकावला चढोवढें ।
बळेंचि पैज सारितों । तुझा रिपू विदारितों ॥ ६ ॥
बळेंचि लावितो कळी । खट्याळ भटमाभळी ।
उपाध्यें चालवी कुळा । ह्मणोनि वंद्य गोकुळा ॥ ७ ॥
बळाढ्य सुभट्ट भट्ट । भटेंचि मांडिला हट्ट ।
बसोनी नीट नीकट्ट । प्रशस्त वाचितो पट्ट ॥ ८ ॥
हटेंहटेंचि उद्धटें । कुटीळ कामलंपटें ।
उपायसा प्रयोजिला । मुलास घात योजिला ॥ ९ ॥
बहू मिळोनि सुंदरी । मुखें ह्मणे हरी हरी ।
तुम्हांस वोखटी परी । कुमार हा मुळावरी ! ॥ १० ॥
बहु मिळोनियां वधू । कराल बाळका वधू ।
तरीच वंश सावधु । यथार्थ सांगतों विधु ॥ ११ ॥
अनेक घात घातका । वदे पतीतपातकी ।
शिणे मनांत बाळकू । समस्त चित्तचाळकू ॥ १२ ॥
हळूच कृष्णनाटकें । चरित्र मांडिलें ठकें ।
उगाचि थोर मारकां । भटासि बैसला धका ॥ १३ ॥
पदार्थमात्र चालवी । भटासि पाद्य घालवी ।
हरीलिळा कळेचिंना । अचेतना सचेतना ॥ १४ ॥
मिळोनियां भले भले । अचाट पाट चालिले ।
बहू करूनि तांतडी । भटावरी धडाधडी ॥ १५ ॥
भट्ट भट्ट बळागळा । खिळी कितेक अर्गळा ।
उठावलीं सळेंसळें । लोहो कितेक मुसळें ॥ १६ ॥
साहाण खोड लाटणी । कितेक खुंट दाटणी ।
इळया पळया परोपरीं । उकावलीं भटावरी ! ॥ १७ ॥

---

१ महाबल-माबळभट. २ उपाध्येपण. ३ वाईट. ४ स्त्रिया. ५ चतुर. ६ लाथ मारवी. ७ छलानें. ८ उठलीं.

समस्त ही चढोवढी । विळे कुठार पावडी ।
पलाण[1] तंग तोबरे । लगाम जेरबंद रे ॥ १८ ॥
बहू करीतसे टिका । ह्मणोनि वाट कष्टिका ।
करून चोप चोपणी । कठीण मार खोरणी ॥ १९ ॥
सदेवं[2] पाट हालिले । समस्त देव चालिले ।
बळावली कुटाकुटी । भट्ट बहुत हिंपुटी[3] ॥ २० ॥
चरांट दोर सांकळ्या । कड्या कितेक मोकळ्या ।
वाहाण खेटरें सळें । भटासि मारिती बळें ॥ २१ ॥
कितेक मार कोरडे भटासि लागतां रडे ।
बहु चुकावितां दडे । उठोनि चांचरी[4] पडे ॥ २२ ॥
बळेंचि हस्त मोडिले । कितेक दंत पाडिले ।
फुटोन रक्त येतसे । रडोनि तोंड घेतसे ॥ २३ ॥
बहुत पुष्टि कंदली[5] । शरीरशक्ति मंदली ।
विटंबणा परोपरीं । किती क्षतें उरावरी ॥ २४ ॥
बहुतसी तडातडी । विशेष होय तांतडी
चरांट खुंट मोडिती । बळें भटासी झोडिती ॥ २५ ॥
कितेक पातळा विटा । कितेक कातळा[6] निटा ।
खडे कितेक खापरें । बहु पुजा परस्परें ॥ २६ ॥
बळें शुभां[7] धबाबिती । कितेक ढेंकं लागती ।
धुळी मुखांत मृत्तिका । पुरे पुरे नका नका ॥ २७ ॥
हरीचरित्र हें भलें । बहू जनांत शोभलें ।
हरील दुष्टदंडणा । करील जन्मखंडणा ॥ २८ ॥
श्रीकृष्ण देव द्रोहिला । जिहीं नऱ्हीं दुराविला ।
तया खळास हे गती । बळेंचि यम ताडिती ॥ २९ ॥
उदास दास तो कवी । बहू जनांस शीकवी ।
उणें कदा वदों नका । न मानितां घडे धका ॥ ३० ॥

---

विषें भरूनियां स्तना । कुटिल धात[9] पूतना ।
हरीस होय माउसी । बळेंचि सोखिली[10] कसी ॥ १ ॥

---

१ पल्याण, खोगीर. २ देवासह. ३ कष्टी. ४ दांतखिळ बसली. ५ पाठ मऊ केली. ६ पापुद्रे. ७ गोंवऱ्या. ८ मातीचीं ढेंकळें. ९ धात्री, दाई. १० शोषून मारली.

रीठा[1] सकट[2] पाडिलें । तरू धरून मोडिले ।
भुजंग रूप ताणिला । दुजा फणी[3] पलाणिला ॥ २ ॥
तृणासुरासि मारिलें । कगाबगांसि चीरिले ।
पदीं धरूनि धेनुका । गड्यांस वांटितो सखा ॥ ३ ॥
धरूनि देव गीळिला । मुखीं भुगोळ दाविला ।
रसाळ बाळ लाघवी । लिळा कळेचिना कवी ॥ ४ ॥
मनुष्य बापुडें किती । विधी सुरेंद्र नेणती ।
तिहीं प्रचीत पाहिली । उपाय शक्ति राहिली ॥ ५ ॥
गुरें समस्त वांसुरें । बहु प्रकार लेंकुरें ।
परोपरीं तनें मनें । खिलार[4] सार गोधनें ॥ ६ ॥
चतुर चोरटा विधी । प्रसंग तो निरावधी ।
समस्तही परोपरीं । स्वयेंचि जाहला हरी ॥ ७ ॥
परेश हा परत्परु । विधी तयास तस्करु ।
अनेक लोक रंजिला । वरिष्ठगर्व भंजिला ॥ ८ ॥
सुरेंद्र मेघ वोळले । कडकसें कल्लोळलें ।
बळें विजा झकाकिती । नभीं दिशा लखाखिती ॥ ९ ॥
गेडदसें परोपरीं । अचाट गर्जना करी ।
कितेक त्या घबाबिल्या । शिळा भुमी धबाबिल्या ॥ १० ॥
धुधाट वात सुटला । गमे भुगोळ फुटला ।
श्रीकृष्णनाथ गोकुळीं । गिरी धरी करांगुळीं ॥ ११ ॥
समागमेंचि गोकुळीं । बळेंचि वोणवा गिळी ।
कितेक मल्ल मारिले । बहू रिपू विदारिले ॥ १२ ॥

---

नदीतिरें[6] मनोहरें । जळें सुनीळ सुंदरें ।
डोहो कितेक मातले । अनंत जीव रातले ॥ १ ॥
नदी खळाळिती बळें । जळें बहूत चंचळें ।
फुगे चळण वाकणें । निरें विराजती गुणें ॥ २ ॥
धबाबिती घबाबिती । ध्वनी अनेक वाजती ।
बहुत रंग रंगसे । कितेक ते तरंगसे ॥ ३ ॥

---

१ रिठासुर. २ शकटासुर. ३ कालियावर आरूढ झाला. ४ गोवत्स, वांसरें. ५ अंधकार. ६ यमुनेचीं तीरें.

अनेक मत्स्य कच्छपें । कितेक सुंदरें रुपें ।
बहु जळीं चळाळिती । क्रिडाभरें उफाळिती[1] ॥ ४ ॥
कदंब[2] लंब लंबले । नदीतटाक बिंबले ।
लता लता बहू लता । तरुसमूह पुरता ॥ ५ ॥
अनेक वृक्ष दाटले । निबीड दाट थाटले ।
बनें बनें बहू बनें । अचाट दाटलीं घनें[3] ॥ ६ ॥
फळें फुलें परोपरीं । कित्येक वोघ[4] भीतरीं ।
विशाळ तें सरोवरें । विशेष तुंबलीं भरें ॥ ७ ॥
अनेक तुंब तुंबले । नदीतटाक बिंबले ।
सुरंग रंग पद्मिनी । कितेक त्या कुमुदनी ॥ ८ ॥
बहुत बोलती खगें । चमक दाविती मृगें ।
कुसुमवाटिका भरें । विगुंतलीं मधुकरें ॥ ९ ॥
तुषारसा पळेंपळु । सुगंध वात शीतळु ।
कितेक वृक्ष डोलती । अनेक जीव बोलती ॥ १० ॥
कितेक शुक सारिका । मयूरबुल्बुलादिका ।
चकोर चक्रवाक तें । बदक थीर कीर[5] ते ॥ ११ ॥
रसाळ उत्तमा किळा । ध्वनिकल्लोळ कोकिळा ।
थिरावली मनोगती । मधुर उंच कूजती ॥ १२ ॥
ध्वनीं बनीं विराजल्या । बहु प्रकार माजल्या ।
जनावरें मनोहरें । सुखें सुखावलीं भरें ॥ १३ ॥
कपी कपी बहु कपी । उलाट[6] धीट साक्षपी ।
लता अनेक औघडा[7] । बळेंचि घालिती झडा ॥ १४ ॥
कडाडिती खडाडिती । बहु तरु झडाडिती ।
कितेक झोंकती बळें । रसाळ भक्षिती फळें ॥ १५ ॥
तयामधें[8] श्रीरंग हा । त्रिभंग ठाणसें पहा ।
अनेक रंग माजवी । सुरंग वेणु वाजवी ॥ १६ ॥
ध्वनीं विगुंतलीं मनें । बहुप्रकार गोधनें ।
श्रीकृष्णवेध लागला । मनें मनू सुखावला ॥ १७ ॥
श्रीकृष्ण वेणु वाजवी । विधीभुगोळ[9] गाजवी ।
नदीतटें विराजवी । सुरेंद्र मान लाजवी ॥ १८ ॥

---

१ वर उडतात. २ कळंब वृक्ष. ३ घनदाट. ४ धांवत्या उदकाचे पाट. ५ पोपट. ६ उड्या घेणारे, बागडणारे. ७ अवघड, उंच व चढायला कठीण. ८ वर यमुनातीराचें मनोहर वर्णन केलें आहे त्या स्थळीं. ९ ब्रह्मदेवाची सारी सृष्टि, विश्व.

विशेष गौळियां कुळीं । सुढाळ बाळ गोकुळा ।
सुरंग रंग अंगना । विलासती व्रजांगना[1] ॥ १९ ॥
गुणें गुणीं गुणागळ्या[2] । समर्थ योग्य मंडळ्या ।
वयें वयें परोपरीं । क्रिडाभरें नदीतिरीं ॥ २० ॥
अनेक योषिता जनीं । रसाळ रम्यलोचनी ।
तयापरीस गोपिका । सुवर्णरंग तो फिका[3] ॥ २१ ॥
बहुत रंग रंगिणी । गुणाथिल्या[4] कुरंगिणी ।
कळाप्रवीण नाटका । विशेष वेष नेटका ॥ २२ ॥
उदार धीर गंभिरा । विलासिनी मनोहरा ।
अनर्घ्यें[5] रत्नभूषणें । विराम कामदूषणें ॥ २३ ॥
आलापिती परोपरीं । विणे मधुर किन्नरी ।
शरीर दिव्य[6] दामिणी । सयोग धूर्त कामिणी ॥ २४ ॥
आलाप होतसे मनें । वृजांगनांत गायनें ।
विणे बहुत वाजती । सुरंग रंग माजती ॥ २५ ॥
रुपें रसाळ सुंदरी । विभूषणें परोपरीं ।
भरें तरुण बाळिका । सुढाळ रत्नमाळिका ॥ २६ ॥
प्रवाळ नीळ माणिकें । बहु प्रकार आणिकें ।
सुवर्णरत्नभूषणें । सुरंग रंगलीं गुणें ॥ २७ ॥
चिरें[7] चिरें मनोहरें । बहुप्रकार सुंदरें ।
जडित जाड भूषणें । झणाणिती विभूषणें ॥ २८ ॥
घवघवीतसी कळा । विशेष लंब कुंतळा[8] ।
सुवास वास कस्तुरी । विलासती कृशोदरी ॥ २९ ॥
शरीरधात मातली । रतीपतीस रातली ।
तरुणता भरें भरु । श्रीरंग वेष नागरु[9] ॥ ३० ॥
कसी रसीकसी कळा । सड्या सुबुक पातळा ।
प्रसन्नमुख डोळसा । गुणें गुणी बहुवसा ॥ ३१ ॥
बहुत जाणती कळा । विशेष कामकुशळा ।
आवेश शुद्ध बाणती । सुनैनबाणें[10] हाणती ॥ ३२ ॥
गुणें चतुर नेटक्या । तटतटीत कंचुक्या ।
सुढाळ कांति कोमला । वधु चकित वीकळा ॥ ३३ ॥

---

१ व्रजांतल्या स्त्रिया, गोपिका. २ गुणश्रेष्ठ. ३ सुंदर, सोन्याची कांति ज्यापुढें कमी अशा. ४ गुणांनीं आथिल्या म्ह० संपन्न. ५ मोल करितां येत नाहीं अशीं, अमूल्य. ६ वीज. ७ वस्त्रें. ८ कुंतल=केश. ९ चांगला, सुंदर. १० सुनयनबाण.

विलोकितांच निकटा । मृगेंद्र लाजवी कटा ।
गतीस हंस मंदले । मृगाक्षही विनोदले ॥ ३४ ॥
सुचित्र चित्र त्यापरी । कळा विचित्र सुंदरी ।
चिरें अमूल्य त्या गुणें । उदास भास भूषणें ॥ ३५ ॥
विलासती उमा रमा । तयासमान उत्तमा ।
पवित्र शुद्ध निर्मळा । चटक दाविती कळा ॥ ३६ ॥
गुणी समस्तगायका । चाकित अष्टनायिका ।
सुरांसि सौख्यदायिका । मयंक[1] तुळितां फिका ॥ ३७ ॥
उल्लोळ ताळसी गती । कितेक त्या उफाळती ।
कल्लोळ लोळ घोळका । विलासरोळ[3] गोळका ॥ ३८ ॥
विशेष गायनी कळा । रुपें रसाळ चंचळा ।
सुलक्षणा विलक्षणा । अतर्क तर्क तीक्ष्णा ॥ ३९ ॥
मधुर तंतु वाजती । घनें घमंड गाजती ।
प्रबंध मंदले कवी । कल्लोळ ताळ माजवी ॥ ४० ॥
अनेक ताळ मूर्छना[4] । कळोचिना गुणी जना ।
कळा विशेष दाविती । परस्परें चुकाविती ॥ ४१ ॥
थकीत होतसे मनू । चिरें लपेटिल्या तनू ॥
गुणें शरीर दाटलें । विशेष बीक[5] लोटलें ॥ ४२ ॥
सुरंग रंगलीं मनें । कुचंबतातिं सुमनें ।
सुवर्ण घातलें मुसे । बहुत स्वेद[6] विलसे ॥ ४३ ॥
अखंड रूप लोचनीं । चटक लागली मनीं ।
अनेक भाव भाविती । तमाळनीळ[7] दाविती ॥ ४४ ॥
श्रीरंगरूप सांवळें । कटीं दुकूळ[8] पींवळें ।
सुरंग रंगली तनु । विगुंतलें तनु मनु ॥ ४५ ॥
नटे नटांग नाटकु । ठकार[9] ठाण[10] तो ठकु ।
मनें मनास हालवी । सुरंग नेत्र पालवी[11] ॥ ४६ ॥
मनेंचि घेतसे चवी । विशाळ नेत्र पालवी ।
अनेक भाव दावितो । बळेंचि प्रीति लावितो ॥ ४७ ॥
विवंचितो मनें मनीं । विशेष लक्ष लोचनीं ।
सवेच पाहतां रिझे । वधू खुणावितां खिजे ॥ ४८ ॥

१ चंद्र. २ अधिक. ३ रोळा=वृष्टि. ४ मूर्छना, गायनांत एकवीस स्वर तीन ग्रामाच्या धोरणानें होतात त्यांचें नांव. ५ सौंदर्य, शोभा. ६ घाम. ७ तमालनील, विष्णु. ८ रेशमी वस्त्र. ९ मनोहर. १० शरसंधानाच्या वेळची शरीराची ठेवण. ११ नेत्रानें खूण करी.

व्रजांगनामधें हरी । परोपरी क्रीडा करी ।
मधुर वेणु वाजवी । तरंग रंग माजवी ॥ ४९ ॥
वसंतकाळ पातला । सुरंग रंग मातला ।
नुरेचि देहभावना । हिरोनि घेतलें मना ॥ ५० ॥
बहूत वीकळा[1] वधु । हरी विशेष सावधु ।
क्रीडाकल्लोळ गाजला । सुरंग रंग माजला ॥ ५१ ॥
फुलें सुगंध साजिरीं । विशेष गुंफिलीं बरीं ।
परोपरीं मनोहरें । बहु सुगंध केशरें ॥ ५२ ॥
झबक[2] झेलें[3] हाणती । मनें खुणेसि बाणती ।
तनें मनें धकाधके । वधू चकीत चामके[4] ॥ ५३ ॥
सुगंध गंध लिंपिती । गुलाल लाल सिंपिती ।
हरुष मानिती मनें । वनेंवनेंचि चुंबनें ॥ ५४ ॥
सुरंग लाल लाल रे । गुलाल मस्तहाल रे ।
फुलेल[5] तेल घातलें । सुगंध गर्द मातलें ॥ ५५ ॥
गुणी समस्त सुंदरें । विलासती वधुवरें ।
अनन्य अन्यथा नसे । समस्त काम वीलसे ॥ ५६ ॥
बहुत प्रीतिच्या गुणा । असेल काय तूळना ।
जीवीच जीवीचें सये[6] । कदापि सांगता नये ॥ ५७ ॥
हरीचरित्र साजिरें । सगुण रूप गोजिरें ।
सर्वांचि वेष पालटे । अधीक कृष्ण हा नटे ॥ ५८ ॥
श्रीकृष्ण कृष्ण हें वदा । तुटोन जाति आपदा ।
नको कदा देहेमदा[7] । तरीच पावसी पदा ॥ ५९ ॥
रसिक भाव भावना । महंत आणिती मना ।
अनंत गुण लाघवी । रसाळ गातसे कवी ॥ ६० ॥

---

## ३. श्रीकृष्णरूप.

नटे नेटकें रूपलावण्य साजे । यमुनेतिरीं रम्य राजे विराजे ।
अती मृदु वेणुस्वरें रंग माजे । आळापें जळा रोध आकाश गाजे ॥ १ ॥
उभा देहुडा पाउलीं वंशपाणी । ध्वनी गौल्य रागावळीची सिराणी ।
तया खेचरें भूचरें लुब्ध जालीं । देहेभावनाहेत सुखें विरालीं ॥ २ ॥

---

१ विव्हळ. २ झुपका. ३ झेला=फुलांचा गुच्छ. ४ चमके. ५ अत्तर. ६ सखी. ७ देहाभिमान.

पदें मूर्च्छना ताळ संगीत वाचा । उठे रागकल्लोळ सप्त स्वरांचा ।
उभे सर्व गंधर्व चक्कीत जाले । कळेना लिळा वेणु हा काय बोले ॥ ३ ॥
पडे नाद कानीं तया पावयाचा । बहु जीव व्याकूळ गोपीजनांचा ।
अकस्मात हा नाद कोठूनि आला । तया नादमूळास नेऊनि घाला ॥४॥
सये चित्त हें चोरिलें वेणुनादें । मनू भेदिला साजणीं नादछंदें ।
अवस्था बहू लागली रूपवेधें । अहा रे असें काय केलें मुकुंदें ॥ ५ ॥
उदासीन या वैभवें सीण वाटे । युगासारिखा दीन कोठें न कंठे ।
त्रिभंगीं उभें सावळें रूप ज्याचें । ठसावे मनीं ध्यान सर्वोत्तमाचें ॥ ६ ॥
पदीं चक्र वामांग ठाणी विराजे । ग्रिवा वक्र बोटें ध्वनी वक्र वाजे ।
कटीं वक्रता भ्रूलता वक्र पाहे । तया देखतां जीव थक्कीत राहे ॥ ७ ॥
उभा वक्र हा देहुडा चक्रपाणी । जया शक्र भांबावला नक्र ताणी ।
सदा सेविती तक्र त्या विक्रयो ही । जगीं धन्य गौळी म्हणे दास तो ही ॥८



# (१९) रामकृष्णचरित्र शतकें.



## रामचरित्र.

नमू येकदंता माता ब्रह्मसुता । सद्गुरु समर्था दंडवत ॥ १ ॥
दंडवत माझें संतसज्जनांसी । भाविक जनांसी आलिंगन ॥ २ ॥
आलिंगिला राम सबाह्य अंतरीं । संसारसागरीं तरावया ॥ ३ ॥
तरावया रामनामाची सांगडी[1] । साधनें बापुडी शिणावया ॥ ४ ॥
शिणावया मूळ लोभचि केवळ । जाहला चांडाळ वाल्हा कोळी ॥ ५ ॥
वाल्हा कोळी लोभ सांडुनी बैसला । नामें उद्धारला रामाचेनि ॥ ६ ॥
रामाचेनि नामें वाल्हा तो वाल्मीक । तया ब्रह्मादिक जाणतील ॥ ७ ॥
जाणतील शतकोटीरामायण । भविष्य कवण दुजा करी ॥ ८ ॥
दुजा करी ऐसा नाहीं जन्मला । स्वयें विनविला सदाशिव ॥ ९ ॥
सदाशिव जाणे कवित्वाचा पार । नेणती इतर थोर थोर ॥ १० ॥
थोर थोर जरी जाले नामांकित । उपमा उचित देतां नये ॥ ११ ॥
देतां नये रामनामाचें चरित्र । जैसी ते पवित्र गोदावरी ॥ १२ ॥
गोदावरीकथा कीर्ति या रामाची । संसारश्रमाची विश्रामता ॥ १३ ॥
विश्रामता जाली रामउपासकां । जैसी ते जातका जळवृष्टि ॥ १४ ॥
जळवृष्टि केली वाल्मीक ऋषीनें । तयांचें वचनें सांगईन ॥ १५ ॥
सांगईन रामचरित्र निर्मळ । जैसें तें मंडळ मार्तंडाचें ॥ १६ ॥
मार्तंडाचे कुळीं राघव जन्मला । भाग्योदयो जाला विबुधांचा ॥ १७ ॥
विबुधांचा राव आला सोडवणें । आम्हां तेणें गुणें जोडी जाली ॥ १८ ॥
जोडी जाली थोर ऋषी संतोषले । यज्ञ सिद्धि नेले रामचंद्रें ॥ १९ ॥
रामचंद्रें बाणीं ताटिका पिटिली । शिळा उद्धरिली हेळामात्रें ॥ २० ॥
हेळामात्रें रामें त्र्यंबक[2] भंगीलें । आणी प्रणीयेलें[3] जानकीसी ॥ २१ ॥
जानकीसी रामें केला वनवास । पितयाची भाष[4] मुक्त केली ॥ २२ ॥
मुक्त करावया त्रिदश देवासी । रामें वैभवासी सोडियेलें ॥ २३ ॥

---

१ नदी उतरून जाण्यासाठीं भोपळे बांधून करितात ती सांगड, सांगडीवर बसून जाण्यांत शीण नाहीं, बुडायची भीति नाहीं. २ शिवचाप. ३ विवाह केला. ४ दशरथाला वचनांतून सोडविलें, सत्यप्रतिज्ञ केलें.

सोडियेलें सर्व जाहला तापसी । पंचवटिकेसी वास केला ॥ २४ ॥
वास केला रामें मारिले राक्षस खरदूषणास संहारिले ॥ २५ ॥
संहारिले दैत्य कुरंगा[1] पिटिले । तवं मागें नेलें जानकीसी ॥ २६ ॥
जानकीसी नेलें रावणें चोरूनि । बंधु दोघे वनीं पाहताती ॥ २७ ॥
पाहताती पुढें जटायु भेटला । रामें मुक्त केला निजहस्तें ॥ २८ ॥
निजहस्तें वनीं कबंधा मारिलें । रामें मुक्त केलें निजदासां ॥ २९ ॥
दासांचें मंडण पंपासरोवरीं । भेटला तो हरी राघवासी ॥ ३० ॥
राघवासी भावें भेटला मारुती । रामचंद्र चित्तीं संतोषले ॥ ३१ ॥
संतोषला राम बोले आशीर्वाद । काया हे अभेद राहो तुझी ॥ ३२ ॥
राहो तुझी काया सदा चिरंजीवी । तुष्टले गोसावी निजदासां ॥ ३३ ॥
निजदास रामें सुग्रीव रक्षिला । वाळी वधियेला दुष्टबुद्धि ॥ ३४ ॥
दुष्टांचा संहार धर्माची स्थापना । जानकीजीवना राघवासी ॥ ३५ ॥
राघवासी तया किष्किंधा पर्वतीं । मिळाले जुत्पती[2] असंख्यात ॥ ३६ ॥
असंख्यात कपी सुग्रीवें आणिले । जैसे उचलले कुळाचळ[3] ॥ ३७ ॥
कुळाचळ ऐसे मिळाले वानर । लंकेवरी भार चालियेले ॥ ३८ ॥
लंकेवरी कपीदळभार आला । सिंधु पाल्हाणिला[4] रामचंद्रें ॥ ३९ ॥
रामचंद्रें अपांगिला[5] बिभीषण । पुढें कपिगण धांविन्नला ॥ ४० ॥
धांविन्नले तेंहीं वेढीलें त्रिकूट । राक्षसांचे थाट चालियेले ॥ ४१ ॥
चालिले राक्षस भिडती वानर । दैत्यांचा संहार आरंभिला ॥ ४२ ॥
आरंभीं वधिला प्रहस्त प्रधान । रणीं जीवदान रावणासी ॥ ४३ ॥
रावणासी रामें दिल्हें जीवदान । मग कुंभकर्ण वधियेला ॥ ४४ ॥
वधिला इंद्रजित आणि अतिकाय । पुरुषार्थी राय लक्ष्मणें ॥ ४५ ॥
लक्ष्मणें वीर इंद्रजित् दारुण । मारिला रावण रामचंद्रें ॥ ४६ ॥
रामचंद्रें सर्व दैत्य निर्दाळिले । पूर तुंबळले शोणिताचे ॥ ४७ ॥
शोणीताचे पुर वाहती खळाळा । रामें बंदिशाळा फोडियेल्या ॥ ४८ ॥
फोडियेल्या रामें सर्व बंदिशाळा । आपुलाल्या स्थळा देव गेले ॥ ४९ ॥
देव गेले सर्व मारिला रावण । लंके बिभीषण स्थापियेला ॥ ५० ॥
स्थापियेला रामें जानकी आणिली । अग्नींतूनि आली दिव्यरूप ॥ ५१ ॥
दिव्यरूप सीता राघवा भेटली । पुष्पवृष्टि केली सुरवरीं ॥ ५२ ॥
सुरावरां मुक्त केलें राघवानें । गगनीं विमानें झळकती ॥ ५३ ॥
झळकती विमानें दिव्य महा थोर । बैसले वान्नर तयामधें ॥ ५४ ॥

---

१ सुवर्णमृग. २ जेठी, मल्ल. ३ कुलपर्वत. ४ आच्छादिला ( रुक्मिणीस्वयंवर ५–३९ ): पल्याण, खोगीर येथें ‘ सिंधु पाल्हाणिला ’ म्ह० सेतु रचून समुद्र झांकला. ५ रक्षिला.

तयामध्यें मुख्य रामलक्ष्मण । सीता सुलक्षण पतिव्रता ॥ ५५ ॥
पतिव्रता रामें वामांकीं घेतली । तेथें आज्ञा जाली सुरवरां ॥ ५६ ॥
सुरवरां आज्ञा देऊनि निघाले । आश्रमासी आले ऋषीचीया ॥ ५७ ॥
ऋषीचे आश्रमीं राम स्थिरावले । सामोरें धाडिलें हनुमंत ॥ ५८ ॥
हनुमंता जाणें भरताकारणें । नाहीं तरी प्राण वेंचईल ॥ ५९ ॥
वेंचईल प्राण भरत प्रेमळ । न लावितां वेळ राम आले ॥ ६० ॥
राम आले शीघ्र भेटों भरतासी । मात अयोध्येसी जाणवली ॥ ६१ ॥
जाणवली मात जाहला आनंद । आनंदाचा कंद राम आला ॥ ६२ ॥
राम आला तेणें सुख सर्वलोकां । गुढिया पताका उभाविल्या ॥ ६३ ॥
उभाविलीं छत्रें बांधिलीं तोरणें । वाद्यें सुलक्षणें वाजिन्नलीं ॥ ६४ ॥
वाजिन्नलीं वाद्यें आल्या नरनारी । आरतीया करीं घेऊनीयां ॥ ६५ ॥
घेऊनीयां करीं रत्नदीपताटें । वोवाळीती थाटें वनितांचीं ॥ ६६ ॥
वनितांचीं थाटें पाहाती श्रीराम । भरतासी क्षेम दिल्हें आहे ॥ ६७ ॥
दिल्हें आहे क्षेम जाहले अभिन्न । अनुक्रमें जन सुखी केले ॥ ६८ ॥
सुखी केल्या माता कौसल्या सुमित्रा । कैकयी सुंदरा सुखी केली ॥६९॥
सुखी केले रामें संत ऋषी मुनि । मंत्रघोषध्वनी आशीर्वाद ॥ ७० ॥
आशीर्वादीं राम पूजिला ब्राह्मणीं । मग सिंहासनीं आरूढला ॥ ७१ ॥
आरूढला राम दिव्य सिंहासनीं । छत्रीं सुखासनीं दाटी जाली ॥ ७२ ॥
दाटी जाली थोर मिळाले वानर । तेणें राजद्वार कोंदाटलें ॥ ७३ ॥
कोंदाटली बहु छत्रें सूर्यपानें । पताका निशाणें मेघडंब्रें ॥ ७४ ॥
मेघडंब्रावरी मत्स्य तळपती । वाद्यें वाजतातीं नानावर्णें ॥ ७५ ॥
नानावर्णें घन सुस्वर सुंदर । वाजती गंभीर शंखभेरी ॥ ७६ ॥
शंखभेरीनाद न माय अंबरीं । सिंहासनावरी देवराणा ॥ ७७ ॥
रामराणा धीर उदार सुंदर । पाहुणे वानर तयां घरीं ॥ ७८ ॥
तयाघरीं नळ नीळ जांबुवंत । सुषेण मारुत बिभीषण ॥ ७९ ॥
बिभीषण आणी वाळीचा कुमर । कपी थोर थोर नामाथीले[1] ॥ ८० ॥
नामाथीले कपी सहपरिवारें । गौरवी आदरें देवराणा ॥ ८१ ॥
देवरायें वस्त्रें भूषणें आणिलीं । भांडारें फोडिलीं अमोलिकें ॥ ८२ ॥
अमोलिकें रामें फोडिलीं भांडारें । आवडी वानरें श्रृंगारिलीं ॥ ८३ ॥
श्रृंगारिले सर्व आनंद भरित । राम बोळवीत वानरांसी ॥ ८४ ॥
वानरांसी रामवियोग साहेना । उभंड[2] धरेना कंठ दाटे ॥ ८५ ॥
कंठ दाटे तेणें आक्रंदती थोर । नयनीं पाझर पाझरती ॥ ८६ ॥

१ नामांकित, निर्दिष्ट केलेले. २ उमाळा, गहिंवर आवरेना.

पाझरती सर्व दीनरूप जाले । पोटेंसीं धरिले मायबापें ॥ ८७ ॥
मायबापें रामें सर्व सुखी केले । मग बोळवीले निजदास ॥ ८८ ॥
निजदास कपी सन्नीध राहीला । तोहि गौरविला स्तुतिवाक्यें ॥ ८९ ॥
स्तुतिवाक्य काय सांगों श्रीरामाचें । होय विश्रामाचें निजसुख ॥ ९० ॥
निजसुख जनीं नाहीं वृद्धपण । कोणासी मरण तेंहि नाहीं ॥ ९१ ॥
नाहीं नाहीं जनीं बंधनाचें पाप । सुखीं सुसरूप रामराज्य ॥ ९२ ॥
रामराज्यीं नाहीं जनासी ताडण धर्मसंरक्षण राम येक ॥ ९३ ॥
राम येकबाण येकची वचन । साधूचें पाळण राम येक ॥ ९४ ॥
राम येक राजा पुण्यपरायण । गोपिका ब्राह्मण[1] भक्ती करी ॥ ९५ ॥
भक्ती करी राम गाई ब्राह्मणांची । सीमा मर्यादेची उल्लंघीना ॥ ९६ ॥
उल्लंघीना सीमा रामगुण गातां । राघव तत्वता निष्कपटी ॥ ९७ ॥
निष्कपटी राम निर्दोष अंतरीं । आक्रा सहस्त्रवरी राज्य केलें ॥ ९८ ॥
राज्य केलें रामें सुख सर्वजना । वैकुंठभुवना पुरी नेली ॥ ९९ ॥
पुरी नेली रामें सकळांसहित । करावया मुक्त निजदासा ॥ १०० ॥
निजदास रामें मारुती ठेविला । चिरंजीव केला कल्पकोडी ॥ १०१ ॥
कल्पकोडी ऐसा देउनियां वर । निघाले सत्वर वैकुंठासी ॥ १०२ ॥
कल्प कोटी रामें केला निजरूप । माझेंचि स्वरूप तूंचि येक ॥ १०३ ॥
वैकुंठासी राम गेले विश्रांतिये । जनासी उपाय हनुमंत ॥ १०४ ॥
हनुमंतीं राम आहे निश्चयेंसीं । रामीं रामदासीं ऐक्यभाव ॥ १०५ ॥

## ( २ ) कृष्णचरित्र.

नमस्कार माझा विघ्ननाशना । शारदा आननामाजी राहो ॥ १ ॥
राहो सर्वकाळ गोविंदाचें नाम । कीर्तन उत्तम यादवांचें ॥ २ ॥
यादवांचे कुळीं गोकुळीं गोविंद । आनंदाचा कंद अवतरला ॥ ३ ॥
अवतरला पूर्ण अच्युत अनंत । आयुधें मंडित चतुर्भुज ॥ ४ ॥
चतुर्भुज हरी डोळस सांवळा । वैजयंती माळा पीतांबर ॥ ५ ॥
पीतांबरधारी प्रगटे मुरारी । मथुरेमाझारी कारागृहीं ॥ ६ ॥
कारागृहीं माता पिता वसुदेव । तेथें आले देव सोडवणें ॥ ७ ॥
सोडवणें आला वैकुंठीचा राव । येतांचि लाघव थोर केलें ॥ ८ ॥
थोर वर्म केलें सर्वा भुलवीले । स्वयें आच्छादिलें निजरूप ॥ ९ ॥
निजरूप देवें सांडूनी कौतुक । जाहला बाळक नंदजीचें ॥ १० ॥

१ स्त्रियांची व ब्राह्मणांची.

नंदजीचें बाळ करी पंथ मोकळा । जावया गोकुळा विश्रांतिये ॥ ११ ॥
विश्रांतीसी आले स्थळ पालटीलें । तंव जाणवलें कंसराया ॥ १२ ॥
कंसराव जाय मारूं आपटूनी । मणकट मोडुनी उसळली ॥ १३ ॥
उसळली म्हणे कंसा तुझा वैरी । गोकुळामाझारी वाढतसे ॥ १४ ॥
वाढतसे वैरी नंदाचिये घरीं । बोलोनी अंबरीं गुप्त जाली ॥ १५ ॥
जाली तळमळ ऐकोनी कंसासी । लागली मानसीं थोर चिंता ॥ १६ ॥
थोर चिंता करी म्हणे माझा वैरी । वाढतसे मारी कोण आतां ॥ १७ ॥
कोण आतां तरी करावा उपाव । वैरिया अपाय होय जेणें ॥ १८ ॥
होय जेणें मृत्यु तया बाळकासी । तंव आले जोशी माभळभट ॥ १९ ॥
माभळभट आले रायें सन्मानिले । तयाप्रती बोले कांहीं येक ॥ २० ॥
कांहीं येक भटो मांडलें संकट । तंव येरें पट उकलीला ॥ २१ ॥
उकलिला पट पाहिला मुहूर्त । म्हणे चिंता व्यर्थ कां करितां ॥ २२ ॥
कां करितां चिंता तया बाळकाची । वधूनी शीघ्रची येतों आतां ॥२३॥
येतों आतां ऐसें बोलोनी वचन । शीघ्रची गमन आरंभिलें ॥ २४ ॥
आरंभिलें तेणें ब्राह्मणें गमन । पावला भुवन नंदजीचें ॥ २५ ॥
'नंदजीचें बाळ आलें मुळावरी' । बैसउनी नारी सांगतसे ॥ २६ ॥
सांगतसे म्हणे हें तुम्हां वाईट । कुळाचा शेवट करूं आलें ॥ २७ ॥
करूं आलें घात सर्वांचें अनहित । वोखटें बहुत दिसतसे ॥ २८ ॥
दिसतसे दुष्ट सांगतों मी स्पष्ट । बुद्धीनें वरिष्ठ आहां तुम्ही ॥ २९ ॥
आहां तुम्ही माझी सखीं यजमानें । म्हणोनी सांगणें लागे तुम्हां ॥३०॥
लागे तुम्हां शब्द ऐसें न करावें । सत्वर वधावें लेंकुरासी ॥ ३१ ॥
लेंकुरासी क्रोध ऐकोनी वचन । मग पिढेदान आरंभीलें ॥ ३२ ॥
आरंभिलें थोर कठीण द्विजासी । उठोनी त्वरेसी पळतसे ॥ ३३ ॥
पळतस पुढें मागे पिढेदान । पृष्टीचें कंदन होत असे ॥ ३४ ॥
होतसे ताडण काष्टें चहूंकूण । कष्टला ब्राह्मण पळतसे ॥ ३५ ॥
पळतसे भय भरलें अंतरीं । म्हणे हरी हरी नारायणा ॥ ३६ ॥
नारायणा मज रक्षिलें जीवेंसीं । दावी रायापासी पृष्ठभाग ॥ ३७ ॥
पृष्टभागीं थोर जाहलें ताडण । भटो बहु शीण पावलेती ॥ ३८ ॥
पावली पूतना म्हणे काय जालें । बाळकें मारिलें ब्राह्मणासी ॥ ३९ ॥
ब्राह्मणासी जेणें दिल्हें पिडेदान । तयासी मारीन शीघ्र काळें ॥ ४० ॥
शीघ्र काळें विषें भरिले पयोधर । पावली मंदीर पूतना ते ॥ ४१ ॥
पूतनामाउसी होय गोविंदासी । ह्मणोनी वेगेंसीं पाहों आली ॥ ४२ ॥

पाहों आली परी कपट अंतरीं । भाव वरीवरी दावितसे ॥ ४३ ॥
दावीतसे भाव शब्दाचें लाघव । जाणीतली भाव बाळकानें ॥ ४४ ॥
बाळकासी पुढें घेऊनी चुंबन । देते स्तनपान आदरेंसीं ॥ ४५ ॥
आदरेंसीं हरी स्तनपान करी । पूतना अंतरीं जाजावली[1] ॥ ४६ ॥
जाजावली म्हणे पुरे बापा आतां । जाऊं दे अनंता सोडी वेगीं ॥ ४७ ॥
सोडी वेगीं आतां लोटिलें[2] श्रीमुख । निघेना बाळक चोखीतसे ॥ ४८ ॥
चोखिली पूतना आक्रंदे मानसीं । मुकली प्राणासी कृष्णमुखें ॥ ४९ ॥
कृष्णमुखें रिठासुर रगडीला । लाता विघडिला शकटासुर ॥ ५० ॥
शकटासुरा लाता हाणे बाळपणीं । वृक्ष उन्मळूनि रांगतसे ॥ ५१ ॥
रांगतां रांगतां देव गिळियेला । उदरीं दाविला विश्वलोक ॥ ५२ ॥
विश्वलोक नांदे जयाचे उदरीं । गाई राखे हरी गौळियांच्या ! ॥ ५३ ॥
गौळियांच्या गाई राखतां पावळीं[3] । खेळे चेंडुफळी गोपाळांसीं ॥ ५४ ॥
गोपाळांसीं चेंडू खेळतां उडाला । जाऊनी बुडाला डोहामध्यें ॥ ५५ ॥
डोहामधें कृष्णें टाकियेली उडी । पाहताती थडीं संवंगडे ॥ ५७ ॥
संवंगडे गेले सांगों नंदापासीं । येशोदे मातेसी सांगताती ॥ ५६ ॥
सांगताती कृष्ण बुडाला तुमचा । जेथें काळयाचा डोहो आहे ॥ ५८ ॥
डोहो आहे तेथें दाविती गोपाळ । मिळाले सकळ विश्वजन ॥ ५९ ॥
विश्वजन सर्वे पाहाती गोविंदा । आक्रंदे यशोदा दीनरूप ॥ ६० ॥
दीनरूप माता करिते रुदन । संबोखिती[4] जन यशोदेसी ॥ ६१ ॥
यशोदेसी ठाव दाविला गोपाळीं । मोडली डाहाळी कळंबाची ॥ ६२ ॥
कळंबाची छाया दिस जळावरी । बुडाला श्रीहरी तये ठाईं ॥ ६३ ॥
तये ठाईं माता घालूं पाहे उडी । धरिली देवढी[5] नगरलोकीं ॥ ६४ ॥
नगरलोक सर्व गोपाळ रुदती । गाई हुंबरती कृष्णालागीं ॥ ६५ ॥
कृष्णालागी जन सर्व आक्रंदले । मग संबोखिलें येरयेरां ॥ ६६ ॥
येरयेरां संबोखुनीयां निघाले । कृष्णें काय केलें डोहामाजी ॥ ६७ ॥
डोहामाजी क्रूर काळया विखार[6] । परस्परें थोर युद्ध जालें ॥ ६८ ॥
युद्ध जालें थोर काळया नाथिला[7] । गोकुळासी आला कृष्णनाथ ॥ ६९ ॥
कृष्णनाथें कगा बगा विदारिलें । धेनुका मारिलें आपट्टूनी ॥ ७० ॥
आपट्टूनी मांडी खेळती गोपाळ । घुमरी कल्लोळ पावयांचें ॥ ७१ ॥
पांवयाचे नाद वाजती मोर्हरी[8] । तेणें नरनारी लुब्ध होती ॥ ७२ ॥

---

१ त्रासली. २ श्रीकृष्णाचें मुख पलीकडे ढकललें. ३ झऱ्यावरः पावळ=झरा ( दास० १६-४-८ ). ४ सांत्वन करिती. ५ अधिकार ( ज्ञाने० १५-१०० ). ६ विषारी सर्प. ७ नाहींसा केला. ८ मार्गांत, वाटेंत.

लुब्ध होती नर पक्षी तृणचर । यमुनेचें तीर तुंबळलें ॥ ७३ ॥
तुंबळ गोपाळ लागला वणवा । गिळुनीयां अग्वा वधियेलें ॥ ७४ ॥
वधियेलें कृष्णें पन्नागा आवर्ता । दुष्ट तृणावर्ता मारियेलें ॥ ७५ ॥
मारियेला थोर गर्व ब्रह्मयाचा । जाहला सर्वांचा समुदाव ॥ ७६ ॥
समुदाव सर्व गोपाळ स्वजन । बळें गोवर्धन उचलीला ॥ ७७ ॥
उचलिला तळीं राखिलें गोकूळ । इंद्राचा सर्व गर्व नेला ॥ ७८ ॥
नेलें मथुरेसीं अक्रुरें कृष्णासी । मल्ल चाणूरासी वधियेलें ॥ ७९ ॥
वधियेला कस घातलें आसन । तेथें उग्रसेन बैसविला ॥ ८० ॥
बैसविला उग्रसेन नृपासनीं । चैद्यादि त्रासूनी मारियेले ॥ ८१ ॥
मारिला शिशुपाळ आणी भस्मासुर । मारिला असुर जरासंध ॥ ८२ ॥
जरासंध काळ यवन हा क्रूर । मारिले असुर थोरथोर ॥ ८३ ॥
थोर ख्याती केली अर्जुना राक्षिलें । सर्व साह्य केलें पांडवांचें ॥ ८४ ॥
पांडवांचा सखा सर्व साहकारी । संकटीं कैवारी द्रौपदीचा ॥ ८५ ॥
द्रौपदीचा सखा द्वारकेभीतरीं । सोळा सहस्त्र नारी गोपांगना ॥ ८६ ॥
गोपांगना राधा रुक्मिणी सुंदरी । सुखें राज्य करी यादवेंसीं ॥ ८७ ॥
यादवांसी शाप दिल्हा ऋषीश्वरीं । मांडली बोहरी तेणें मिसें ॥ ८८ ॥
तेणें मिसें सर्व आटले यादव । ते काळीं उद्धव उपदेशिला[1] ॥ ८९ ॥
उपदेशिला दास श्रीकृष्णें आपुला । अवतार जाला पूर्ण आतां ॥ ९० ॥

---

## ( ३ ) राम–कृष्ण एकरूप.

करा रे जनीं भक्ति या राघवाची । करीता मनीं व्यर्थ चिंता भवाची ।
करी बाण कोदंड हें ठाण देखा । मनीं चिंतितां दुर्जना कोण लेखा ॥ १ ॥
खरा कृष्ण हा विष्णु पूर्णावतारी । चतुर्भुज पीतांबरू चक्रधारी ।
गरुडध्वज पावतो लागवेगें । दिनाकारणें सर्व सांडूनि मागें ॥ २ ॥
गळां वैजयंती रुळे कंठमाळा । कटीं किंकिणी मेखळा ज्वाळमाळा ।
गुणी राम हा गुणरत्नें अमोघें । प्रभा फांकली दुथडी कीर्तिवोघें ॥ ३ ॥
घरें सुंदरें द्वारका पुण्यभूमी । तयेमाजी हा कृष्णजी निजधामीं ।
गुणें आगळा वर्णितां वर्णवेना । लिळावेश ब्रह्मादिकांही कळेना ॥ ४ ॥
नसे युयोद्धच तेणेंचि नामें अयोध्या[2] । प्रतापें बळें आगळा राम योद्ध्यां ।
रणीं प्राणहर्ता बलाढ्य विरांचा । महासंकटीं कार्यकर्ता सुरांचा ॥ ५ ॥

---

१ भागवत स्कंध ११ पहा. २ जेथें कोणी योद्धा म्ह० युद्धास उभा असा शत्रूच नाहीं शत्रुहीन समबुद्धीची अयोध्या.

चरित्रें विचित्रें करी गोपिनाथु । क्रिडा कौतुकें नाटकी तो समर्थु ।
यमूनातिरीं गोपिगोपाळ वत्सें । ध्वनी लोधलीं ऊर्ध्वा वाहूनि पुच्छे ॥६॥
छर्वीने बहू छेत्र माही निशाणें । महाराज हा वर्णिजे यासि कोणें ।
दुजी ऊपमा रामचंद्रा न साजे । सुरारीवरी तोडरी ब्रीद गाजे ॥ ७ ॥
जेणें पर्वताचे तळीं गोकुळासी । बळे राखिलें नाथिलें काळयासी ।
जेणें घेतलें सर्व ही भुक्तवोझें । रणीं घेतलीं पांडवालागि झुंजें ॥ ८ ॥
झळाळीत गंडास्थळें कुंडलें तें । उणें बोलिजे सर्वही उपमेतें ।
जेणें घेतलें सर्व लावण्य जायां । नमस्कार माझा तया रामपायां ॥ ९ ॥
यमाया यमातें भजा उत्तमातें । त्यजा आणिकें दैवतें सर्वमत्तें ।
धरा मानसीं कृष्ण वा प्रेम–सांटी । त्रिभंगीं उभा रूपलावण्यपेटी ॥१०॥
टिळा रेखिला कस्तुरीकेशराचा । लपेटा सिरीं रम्य दिव्यांबरांचा ।
तुळेना समारंगणीं शक्ति लाटी । उभा राम तूणीर बांधोनि पाठी ॥११॥
ठकोरें उभा देहुडा पाउलीं हा । बळें नेतसे चित्त चोरूनि पाहा ।
मनीं लागलीं सर्वही कृष्णगोडी । जनीं सोडितां सर्वथा ही न सोडी ॥१२॥
डंगा टाकितां दैत्य बाहेर दीसे । तयालागि बिभीषणा राग पूसे ।
पुढें राघवें वाइला चंड मेढा । रणीं झोडिला पाडिला दैत्य गाढा ॥१३॥
ढळेना प्रिती लागली माधवाची । उभी साजिरी मूर्ति हे चित्सुखाची ।
कृपाळू हरी अंतरीं सर्व जाणे । तया देखतां सर्वही सूख बाणे ॥ १४ ॥
नसे दुःख ना दंड ना मृत्यमारु । नसे शोक ना लोकनिंदाधिकारु ।
नसे काळ दुष्काळ उद्वेग चिंता । नसे शब्दकापट्य हे रामसत्ता ॥ १५ ॥
तनू सांवळी वेणु वाहे त्रिभंगीं । क्रिडाकौतुकी गोपिगोपाळ संगीं ।
स्वयें जाहला कृष्ण हा विश्वसत्ता । धरीं रे मना गोपिनाथा समर्था ॥१६॥
थरारी धरा सप्त पाताळ जेव्हां । करारी बळें चंड कोदंड तेव्हां ।
सुरांकारणें पेटला राम द्वंद्वा । चपेटातळीं मस्तकें होति चेंदा ॥ १७ ॥
दयासागरें नागरें गोपिवेषें । बहू दैत्य संहारिले बाळतोषें ।
जयाची अती खोल कौशल्य बुद्धी । विचारें महामत्त तो दैत्य साधी॥१८॥
घिटा वाजटा किंकिणी चापबंदीं । झणत्कारती डोलती रामछंदीं ।
अतीधीर गंभीर तो राम नेणा । बळें सोडिले देव तो देवराणा ॥ १९ ॥
नसे तूळणा तूळितां यादवांसी । महावीर ते धीर हे सोमवंशी ।
जयांच्या प्रतापें सदा काळ कांपे । धरा घालिती पालथी सर्व कोपें॥२०॥

---

१ छत्री. २ नाहींसें केलें. ३ जाया घेणें म्ह० आंदण घेणें, आपल्याकडे. ४ प्रेमाचा मोबदला देऊन. ५ मनोरम. ६ दीड पायावर. ७ भय. ८ चापटीबरोबर.

पळाले बळें पीटिले मारुतानें । दडाले पुरीमाजि ते थोर मानें ।
भयें कांपिती लोपती देति धापा । वृथा बोलती कापिती व्यार्थ[1] लापा ॥
फटी फावली वानरां येक वेळां । चळी कांपती सर्व राजे चळाळां ।
बळें नाथिला काळ लंबी विलंबी । लिळा खेळतां द्रूमस्तंभीं कदंबीं ॥२२॥
बळें आगळा मारुती कोटिगूणें । जया रोमरंध्रीं निघे सैन्य दूणें ।
दडे मत्स्यमूखीं पडे कृष्ण लोभा । चढे विक्रमू आगळी दिव्य शोभा ॥२३॥
भला मारुती जिंकिला कृष्णनाथें । रणीं रक्षिलीं पांडवें तीं अनाथें ।
ध्वनीं लाविला विक्रमें पूर्णकामें । यदूनायकें सत्यनेमें विरामें ॥ २४ ॥
मनीं सर्वदा सर्व कापट्य जागे । दिनाचे परी याचकू भीक मागे ।
नटाचे परी पालटी कृष्ण काया । करी संकटीं थोर शत्रू जिणाया ॥२५॥
येणें राघवें मारिला व्यर्थ वाळी । नव्हे नीति हे सर्व केली धुमाळी[3] ।
विरोधेंविणें सर्वही राज्य हारी । नव्हे निर्मळू राम कापट्यधारी ॥ २६ ॥
रघूनंदनें दुष्टसंव्हार केला । अती आदरें धर्म तो रक्षियेला ।
तया वाळिचेंही बरें हीत केलें । कृपाळूपणें मोक्षपंथासि नेलें ॥ २७ ॥
लघूंचेपरी[4] व्यर्थ आरण्यपंथें । करुणास्वरें आळवी जानकीतें ।
तया राघवा धीर कैसें म्हणावें । जयां अस्त्रियांचेनि[5] कामें जिणावें ॥२८॥
वनीं लाघवी शैल्यजा वेषधारी । सितेसारिखी येकली दिव्य नारी ।
परी अंतरीं नूठिजे काम लेशें । सितेवीणही राज्य केलें सुरेशें[6] ॥ २९ ॥
सवे लागली देवकीनंदनाची । महामल्ल चाणूर हो कंदनाची ।
तयावीण आणीक कांहीं दुराशा । तयाचे कृपेची बहूसी पिपासा[7] ॥३०॥
शवा ऊठवीलें रघुनायकानें । कृपासागरें सूमतीदायकानें ।
कपीसर्व ही सेवटीं तो सुवासी । बळें आणिलें त्या लघूब्राह्मणासी ॥३१॥
समस्तामधें सार गोपाळकाला । तया देखतां चाखतां जीव धाला ।
स्वयें संगड्या वांटितो कृष्ण पाहा । गडी खेळती तोचि आनंद माहा ३२
हरें जाणिजे राम कोदंडपाणी । अहिल्या शिळारूप लावण्यखाणी ।
जन सर्व आनंदले राज्य केलें । पुढें ग्रामही मोक्षपंथासि नेलें ॥ ३३ ॥
क्षमा सर्वदा ऐक्यरूपें करावी । पर्था[8] आदरें सार्थकाची धरावी ।
म्हणे दास द्वैतास हो नातळावें । जळाचेपरी सर्व भूतीं मिळावें ॥ ३४ ॥

---

१ बाता, गप्पा. २ दुप्पट. ३ गोंधळ. ४ सामान्य माणसाप्रमाणें ५ स्त्रियांचे, अस्तुरींचे. ६ रामानें. ७ पिण्याची आशा, लोभ. ८ मार्गाला, पंथाला.

# (२०) राजकारण व राजकारणी पुरुष आणि प्रसंग.

## १. कुळदेवी तुळजाभवानीचीं स्तोत्रें.

देखिली तुळजा माता । निवालों अंतरीं सुखें ।
तुटली सर्व हि चिंता । थोर आधार वाटला ॥ १ ॥
संसार पाहातां मागें । पाळिलें सर्वही कुळां ।
प्रस्तुत प्रत्ययो आतां । रक्षितें बहुतांपरीं ॥ २ ॥
पूर्विते कामना सर्वै । ईच्छा पूर्ण मनोगतें ।
धन्य हा देव लोभाळु । सांभाळ करितो सदा ॥ ३ ॥
आघात संकटें वारी । निवारी दुष्ट दुर्जना ।
संकटीं भर्वसा मोठा । तत्काळ काम होतसे ॥ ४ ॥
लालची चुकतें वेडें । कृपाळु जननी खरी ।
लक्ष कीं कोटी अन्यायें । बहुत क्षमिले खरे ॥ ५ ॥
वन्ही हो सर्प हो विंचु । बाळकु घेतसे बळें ।
सर्वही चुकवी माता । पोर लाबाड नेणतें ॥ ६ ॥
लोभाळु बायका माया । त्यामध्यें मुख्य जननी[1] ।
बाळका वाढवी माता । मातेला मुख्य जननी ॥ ७ ॥
शर्वही बाळकें जीत्रीं । त्रैलोक्यजननी पाहा ।
साक्षिणी सर्व लोभाळू । मर्यादा कोण रे करी ॥ ८ ॥
अनंत रूपिणी माया । काया रक्षी परोपरीं ।
विचित्र महिमा आहे । कळला न वचे कदा ॥ ९ ॥
सर्वांचे मूळ हे माया । मूळमाया ह्मणोनियां ।
सृष्टीची आदि शक्ती हे । आदिशक्ती ह्मणोनियां ॥ १० ॥
रामउपासना आहे । हे रामवरदायिनी ।
सख्य तें चालतें सर्वै । प्रउर्तीनिवृतीकडे ॥ ११ ॥

(२)

सर्वारंभीं मुळारंभीं । वंदिजे गणनायकु ।
विद्या सुबुद्धी देताहे । सर्वत्र तो भुमंडळीं ॥ १ ॥
चतुर्भुजा वेदमाता । वीणापुस्तकधारिणी ।
वंदितां अंतरीं वाढे । स्फूर्तिरूपें प्रकाशते ॥ २ ॥

---

१ मूळमाया हीच तुळजामाता. ही सर्वांची मूळ जननी, मूळमाया.

मुळीची मुळमाया ते । आदिशक्ति परमेश्वरी ।
आमुची कुळदेव्याहे । म्हैसासुरासिं[1] मर्दिनी ॥ ३ ॥
शक्तीरूपें जगन्माता । वर्तते जगदंतरीं ।
त्रिलोकीं जितुके प्राणी । शक्तीविण वृथा वृथा ॥ ४ ॥
प्रसिद्ध तुळजा माता । श्रीरामवरदायिनी ।
कुळासी पाळिलें मुळीं । आतां आह्मांसि पाळिते ॥ ५ ॥
चुकतां शक्ति नेताहे । सामर्थ्य ते[2] केचें पुढें ।
कृपाळु जननी वोळे । तत्काळ मनकामना ॥ ६ ॥
बहुतांचे[3] कुळीं आहे । पहा प्रचीत रोकडी ।
कृपेनें रंक ते राजे । सामर्थ्ये वर्तती जनीं ! ॥ ७ ॥
चुकतां क्षोभते नेटें । राजे रंक करी पुन्हा ।
आरोग्या रोग लावीते । फोडी सर्वांग खांडकें ॥ ८ ॥
थबथबां गळती काया । वोल्याकुष्टेंचि नासती ।
शुभ्र सर्वांग होताहे । नायटे फुटती बळें ॥ ९ ॥
हात जाती पाय जाती । जिव्हा जाती फुटोनियां ।
वोळतां तुळजा माता । पुन्हा सर्वांग नेटकें ॥ १० ॥
श्रोत्र जाती नेत्र जाती । वाचा जाती न बोलवे ।
उदंड रोग व्याधी त्या । किती ह्मणोनि सांगणें ॥ ११ ॥
धडासी विघडी रागें । दयेनें नीट होतसे ।
संपन्न मागती भिक्षा । चालेना तीजवेगळें ॥ १२ ॥
बोलिले चुकती प्राणी । त्यासी दंडी परोपरीं ।
पिशाच्चें खेळती अंगीं । फेंपरीं भरती बळें ॥ १३ ॥
प्रचीत ये चमत्कारें । तोषतां जगदेश्वरी ।
नेसती निवारे कीती । यती ते लोटांगणीं ॥ १४ ॥
बगाडें[4] खेळती नौसें । जिव्हा कापून वाहाती ।
कुलुपें घालिती तोंडीं । येक ते शीर वाहाती ॥ १५ ॥
पुन्हा ते लागती शिरें । जिव्हा येती करांगुळ्या ।
सामर्थ्यें जागतें मोठें । जागती जगज्योति हे ॥ १६ ॥
कामनेसारिखी वाचा । गोविती बहुतांपरी ।
तुष्टतां तुळजा माता । पुरती मनकामना ॥ १७ ॥

१ महिषासुरमर्दिनी. सप्तशतींत हिचें चरित्र पहावें. उपासक राज्यभ्रष्ट असले तर हिच्या प्रसादानें राज्य पुन्हा मिळतें. २ तीपुढें कोणाचें सामर्थ्य टिकणार ? ३ समर्थांची तशीच शिवरायाची कुळस्वामिनी हीच. ४ खांबाला टांगून हेलकावे खाणें.

चुकतां दावितें साक्षी । कोण्हीयेकें चुकों नये ।
बाळका जननी पाळी । तैसी ते पाळिते जना ॥ १८ ॥

कृपाळु जननी मोठी । अन्याय क्षमणें बहु ।
मागिणी जोगिणी पत्रें । कुमारी सुवासिणी बऱ्या ॥ १९ ॥

गोंधळ भोग घालावे । बोलिलें तें चुकों नये ।
असोनि वंचणें खोटें । अभावें बुडती घरें ॥ २० ॥

वंशाची बुडती लोकीं । ऐशा उदंड ख्यानंती[1] ।
देउं जाणे घेउं जाणे । भक्ती ते पाहिजे बरी ॥ २१ ॥

शिवकळा सिद्ध देव्हारे । तेथें पुसोन पाहाणें ।
चुकलें पडतें ठाई । सद्य प्रचीत रोकडी ॥ २२ ॥

आनंद वाढवी लोकीं । आनंदी याचकारणें ।
तुळजा बोळली घ्यावी । पुजावी बहुतांपरीं ॥ २३ ॥

वेसणी घालिती नाकीं । जावळीं जटे[2] राखती ।
लेकुरें वाहाती देवा । वैभवें बहुतांपरीं ॥ २४ ॥

पूजितां तुळजा माता । तेणें सुखाचि होतसे ।
विध्युक्त होम विधानें । नवरात्र घटस्थापना ॥ २५ ॥

मेहुणें पूजिती भावें । नाना पदार्थ देउनी ।
संतुष्ट कुमारी कीजे । तेणें संतुष्ट होतसे ॥ २६ ॥

बोलके नेटके पक्षी । नानारंगें नानागुणी ।
तैसीचि स्वापदें नाना । देवाळई परोपरी ॥ २७ ॥

कुमरी कुमर द्रव्यें । नाना आळंकार नेटके ।
नाना रंगें नाना वस्त्रें । अमूल्यें बहुजिन्नसी ॥ २८ ॥

विलास भोग देवाचे । किती ह्मणोनि सांगणें ।
संगीत गीत वाद्यें तें । सुगंध बहुतांपरी ॥ २९ ॥

तांबूल भोजनें नाना । नाना पुष्पें फळें बहु ।
उत्तमें शयनें यानें । वैभवा तूळणा नसे ॥ ३० ॥

रामदास ह्मणे माझी । माता ही जगदीश्वरी ।
ऐश्वर्य सर्व शक्तीचें । विवेकें प्रत्ययें पहा ॥ ३१ ॥

शक्तीनें मिळतें सर्वें । शक्तीनें भोग होतसे ।
पूजिली बात्तिसा श्लोकीं । आदिशक्ति नारायणी ॥ ३२ ॥

---

१ ख्याती. २ जटा.

( ३ )

जगदात्मा जगदेश्वरी । परमात्मा परमेश्वरी ।
उमा लक्षुमी गाईत्री । सावित्री ते इंद्रायणी ॥ १ ॥
अहिल्या द्रौपदी सीता । तारा मंदोदरी दरी ।
दमयंती दुसरी तारा । गंगा भागीरथी उखा ॥ २ ॥
नाना प्रकृतिचीं नामें । पुलोमा रेणुका उखा ।
स्वर्गस्था किन्नरी कोपी । गंधर्वी गायनी कळा ॥ ३ ॥
देव ऋषी मुनी योगी । ज्ञानी भक्त वहुविधा ।
नारद तुंबरादीक । ध्रुव प्रल्हाद अंबऋषी ॥ ४ ॥
उपमन्यु अन्य नामें । भक्त मुक्त महा तपी ।
सर्वसंगपरीत्यागी । आगामी अघोरी हटी ॥ ५ ॥
दंडधारी जटाधारी । आधारी भस्मलेपनी ।
विलेपनें सुगंधें नाना । अन्नभोग विलासती ॥ ६ ॥
सारंग नौरंग नाना । मानामानें स्वरास्वरें ।
ताळप्रबंधाचें गाणें । नाचणें वाद्य सर्वही ॥ ७ ॥
सिद्धची सर्वही आहे । उमा रमा विलासती ।
पूजिती तुळजा माता । सदा आनंद गोंधळी ॥ ८ ॥
त्रैलोक्यपूजनासाठीं । वाढती मोडती किती ।
रामवरदायिनी माता । हे आझी कुळस्वामीणी ॥ ९ ॥
पाळिती सर्वही क्षेत्रें । वंधू तो क्षेत्रपाळ हा ।
विखार चिर्डिले सर्वै । काळसर्प परोपरी ॥ १० ॥

( ४ )

प्रसन्नमूख सुंदरा । तुझेन हे वसुंधरा ।
धराधरें फणीवरें । तुलाचि भाविलें खरें ॥ १ ॥
कळेचिना तुझी कळा । श्रुती चतुर वीकळा ।
अनंत भाविनी लिळा । अगम्य तूंचि नीवळा ॥ २ ॥
तुझेनि सर्व बोलणें । तुझेनि सर्व चालणें ।
तुझेनि योगधारणें । तुझेनि राजकारणें ॥ ३ ॥
तुझेंच नांवरूप हो । तुझें दिसे स्वरूप हो ।
विधीभूगोळचाळके । अनंत लोकपाळके ॥ ४ ॥
तुझीच चालते सत्ता । बुझले तोचि पूरता ।
तुझी करूनि आस तो । फिरे उदास दास तो ॥ ५ ॥

( ५ )

अघटीत तें तें उदंड केलें । विवंचतां तें समजोन गेलें ।
आतां दया कां नुपजे मनासी । तुळजे दयाळे दयाळ कैसी ॥ १ ॥
दयाळ होसी करिसी कुढावा । समजोन गेला सामर्थ्य यावा ।
थोडें जिणें हें वय व्यर्थ गेलें । जगदेश्वरी तां सनाथ केलें ॥ २ ॥
अन्याय माझे बहुसाल जाले । समजोनियां ते क्षमाच केले ।
अज्ञान ते बाळक काय जाणे । जननी करी तें कांहींच नेणें ॥ ३ ॥
सन्नीध माता परि वोळखेना । वदवीतसे तें कांहीं कळेना ।
रडोंच जाणे समजोंच नेणें । मातेविणें तें मग दैन्यवाणें ॥ ४ ॥
अनाथनाथें जगदैकनाथें । संसारकोडें उगवी समर्थें ।
निवेदनें मानस ऊगवीलें । भूमंडळीं त्वां मज धन्य केलें ॥ ५ ॥
मी काय फेडूं उपकार तूझा । तुझिये दयेचा संसार माझा ।
तुजवीण माझें कांहींच नाहीं । यथार्थ आहे समजोन पाहीं ॥ ६ ॥

( ६ )

दुखदारिद्रउद्वेगें । लोक सर्वत्र पीडिले ।
मुळीची कुळदेव्या हे । संकटीं रक्षिते बळें ॥ १ ॥
रामउपासाना माझी । त्रैलोक्य सुख पावलें ।
सोडिले देव इंद्रादी । तोडिलीं बंधनें बळें ॥ २ ॥
कीर्तिसी तुळणा नाहीं । प्रतापें आगळा[1] बहु ।
न्याय नेमस्त हे । लीळा न भूतो न भविष्यति ॥ ३ ॥
उन्मत्त रावणें येणें । त्रैलोक्य पीडिलें बळें ।
देव ते घातले बंदीं । कैपक्षी[2] राम पावला ॥ ४ ॥
रावणें चोरिली सीता । मावकापट्य[3] साधिलें ।
धुंडितां धुंडितां सीता । शुद्धी[4] कोठें न संपडे ॥ ५ ॥
रामसौमित्र हे बंधू । उदास धाकुटे वयें ।
श्रीमंत लक्षणें मोठीं । दिसती मुख्य देवसे ॥ ६ ॥
मूर्ख ते नेणती चिन्हें । जाणत्या वेधु लागला ।
दिसती थोर सामर्थ्यें । श्रीहरी भगवान् ते ॥ ७ ॥
फिरती थोर आरण्यें । कर्कशें गिरिकंदरें[5] ।
कपाटें विवरें झांडीं । झोतवे[6] दर्कुटे[7] कडे ॥ ८ ॥

---

१ अधिक, विशेष. २ कैवारी. ३ मायेचें कपट. ४ शोध न लागे. ५ गुहा. ६ झोतावे= पाण्याचे लोट, धबधबे किंवा धबधब्याच्या खालील तुटलेले कडे. ७ पर्वताचे तट.

अरण्या हिंडता तेथें । कुमारी देखिली वनीं ।
कुमारी बाळलीळा ते । दिसे त्रैलोक्यजननी ॥ ९ ॥
रूप तें नेटकी बाळा । लावण्य बाणलें असे ।
देदीप्य खेचरी[1] लीळा । पार्वती लक्षुमी जसी ॥ १० ॥
यक्षिणी अप्सरा देव्या । शेषगंधर्वकूमरी ।
काय कीं कोण कीं आहे । कांहीं केल्या कळेचिना ॥ ११ ॥
चंचळा चमके नेटें । मोहिनी मनमोहिनी ।
ते सूर्यवंशिचे राजे । विख्यात भुवनत्रयीं ॥ १२ ॥
नेमस्त न्यायनीतीचे । करिती धर्मस्थापना ।
परस्त्री नाणिती दृष्टी । ब्रह्मचारी फणीवरु[2] ॥ १३ ॥
येकांतीं त्या वनामधें । देखिले त्या कुमारीनें ।
कुमारी देखिली त्यांनीं । बोलती ते परस्परें ॥ १४ ॥
कैचीं तूं कोण तूं काई । नाम तें कोणतें तुझें ।
म्हणे रे ' मीच तूं काई ' । जा तुम्हां वर दीधला ! ॥ १५ ॥
मनाच्या कामना होती । सीताशुद्धी करा तुह्मी ।
सूर्यवंशी महाराजे । बोलती ते कुमारीसी ॥ १६ ॥
वरु त्वां दीधला आम्हां । सत्य कैसेनि जाणिजे ।
येथुन दाविसी लंका । तरीच वरु हा खरा ॥ १७ ॥
वृक्षारूढें सुमित्रानें । लंका तों देखिली पुढें ।
झळकले कळस लंकेचे । हारीनें गोपुरें किती ॥ १८ ॥
झरोंके उंच माड्यांचे । झर्झर नभ रेखिलें ।
मार्तंडमंडळाऐसीं । देदीप्यें देखिलीं पुढें ॥ १९ ॥
झांपडी पडिली नेत्रीं । ' उदो[3] उदो ह्मणे ' फणी ।
रामराजा महाराजा । वरु हा दिधला तया ॥ २० ॥
जननी रामवरदानी । तधीपासुनी बोलिजे ।
उद्दंड ऐकिलें होतें । प्रचीत मजला नसे ॥ २१ ॥
प्रतापगिरीचे[4] ठाईं । आदिशक्ती विराजते ।
कामना पुरती तेथें । प्रचीती रोकड्या जनीं ॥ २२ ॥
तुळजापुरीची माता । प्रतापींच प्रगटली ।
आदिशक्ती महामाया । कुळीची कुळस्वामिणी ॥ २३ ॥

---

१ भूतप्रेतादि गगनसंचारी प्राण्याप्रमाणें. २ लक्ष्मण. ३ उदय, उदय. ४ तुळजापुराहून ही प्रतापगडीं आली. पुढील स्तोत्र पहा.

कुळची पाळिलें आम्हां । रक्षिलें बहुतांपरी ।
बाळकू काय मातेचें । उत्तीर्ण होउं पाहातें ॥ २४ ॥
तैसा मी किंकरु तीचा । विचारें ठावाहे नसे ।
तीचि ते वैष्णवी माया । तारिते मारिते जनीं ॥ २५ ॥
शक्तीनें पावती सुखें । शक्ती नस्तां विटंबणा ।
शक्तीनें नेटका प्राणी । वैभवें भोगितां दिसे ॥ २६ ॥
कोण पुसे अशक्ताला । रोगीसें बराडो दिसे ।
कळा नाहिं कांती नाहीं । युक्ती बुद्धी दुरावली ॥ २७ ॥
साजिरी शक्ती तों काया । काया मायाचि वाढवी ।
शक्ती तों सर्वही सुखें । शक्ती आनंद भोगवी ॥ २८ ॥
सार संसार शक्तीनें । शक्तीनें शक्ती भोगिजे ।
शक्त तो सर्वही भोगी । शक्तीवीण दरिद्रता ॥ २९ ॥
शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें यत्न होतसे ।
शक्ति युक्ति जये ठाई । तेथं श्रीमंत धांवती ! ॥ ३० ॥
युक्ती ते जाडकळा । विशक्तीसी तुळणा नसे ।
अचुक चुकेना कोठें । त्याचीं राज्यें समस्ताहे ! ॥ ३१ ॥
युक्तीनें चालती सेना । युक्तीनें युक्ति वाढवी ।
संकटीं आपणा रक्षी । रक्षी सेना परोपरी ॥ ३२ ॥
उदंड खस्तीचीं कामें । मर्द मारुनि जातसे ।
नामर्द काय तें लंडी । सदा दुश्चित्त लालची ॥ ३३ ॥
फित्व्यानें बुडती राज्यें । खबदारी असेचिना ।
युक्ति ना शक्ति ना वेगीं । लोक राजी असोचिना ॥ ३४ ॥
बेदादी बेकैद सेना । कारबारीच चोरटे ।
धण्यासी राखणें राजी । कदाकाळीं घडेचिना ॥ ३५ ॥
चोरटी होरटीं तुंदें । नासकें लांच इच्छिती ।
लौंडीचे दुर घालावे । मारावे राजकारणें ॥ ३६ ॥
सेवकां आवरूं नेणें । तो राजा मूर्ख जाणिजे ।
मूर्खाचें राज्य राहेना । कोणाचें कोण ऐकतो ॥ ३७ ॥
लोकांसी राखणें राजी । तें राज्य प्रबळे बळें ।
बंद बेबंद जाणावे । तावे तीवे परोपरी ॥ ३८ ॥

---

१ ‘ यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ’ ह्या गीता श्लोकाचा भावार्थ हाच. श्रीमंत म्ह० परमात्मा. शक्ति म्ह० धनुर्धर पात्र व युक्ति म्ह० योगेश्वर कृष्ण. २ वेळेला, त्वरित. ३ दाद नाहीं अशी. ४ शिस्त नाहीं अशी ५. लाचखाऊ. ६ दंडादी. ७ गर्विष्ठ. ८ समुदाय.

खंळें खोंचर काढावें। तंदुळासारिखे खडे।
खरें तें आदरें घ्यावें। खोटें सर्वत्र टाकिती॥ ३९॥
सगट सारिखें जेथें। तेथें होते बराबरी।
सारंगार कळेना कीं। जाणते नेणते जनीं॥ ४०॥
कांहीं येक परीक्षावें। शोधावें बहुतांपरी।
नेटकें कार्य साधावें। रोधावें कुटिळा जना॥ ४१॥
असो हें बोलणें जालें। युक्तीवीण कामा नये।
युक्तीला पाहिजे शक्ती। तस्मात शक्ती प्रमाण हे॥ ४२॥
मुक्त केल्या देवकोडी। सर्वही शक्तिच्या बळें।
समर्थ भवानी माता। समर्थी वर ‍ दीधला॥ ४३॥
मला तो प्रत्ययो नाहीं। मानेना याचकारणें।
मानेना अनुमानेना। काय कैसें कळेचिना॥ ४४॥
अंतरीं कल्पना केली। येकांतीं बोलिलों बहू।
रक्षिता देव देवांचा। त्याचा उत्साव इच्छिला॥ ४५॥
इच्छा पूर्ण करी माता। वाढवी बहुतांपरी।
दयाळू मयाळू माता। स्वभावें जाणती कळा॥ ४६॥
जीवीचा पुरला हेतु। कामना मनकामना।
घमंड जाहलें मोठें। घबाड साधलें बळें॥ ४७॥
रामवरदायिनी माता। दासें धुंडून काढिली।
वोळखी पाडितां ठायीं। भिन्न भेद अ ‍ ोचिना॥ ४८॥
तुझा मी मी तुझा माते। ऐसें हें बोलणें नव्हे।
तुझी तूं तूं तुझी माता। जगज्योती कृपाळुवे॥ ४९॥
उदो उदो तुझा उदो। जाहला सचराचरीं।
गोंधळू घातला देवीं। ब्रह्माविष्णुमहेश्वरीं॥ ५०॥
सख्य हें जाहालें मोठें। आवडी सांगतां नये।
असो हें जीवीचें जीवीं। सुखानंद चहूंकडे॥ ५१॥
वोळतां भवानी माता। महींद्र दास्य इच्छिती।
बोलणें हें प्रचीतीचें। अन्यथा वाउगें नव्हे॥ ५२॥
भक्त ते पावती खुण। माता सर्वांस वाढवी।
वाढवो आपल्या लोभें। मायाजाळें परोपरीं॥ ५३॥
मुलांची लाज मातेला। सिकवी सरसें करी।
लोभें लोभेंचि शृंगारी। आपुलीं भूषणें तया॥ ५४॥

१ दोंव पाहण.र, कुंवर. २ खरेंखोटें. ३ धीरानानें. ४ समाळा.

जीव त्या बाळकापासीं । अखंड लाविला असे ।
स्वहित कळेना त्याला । शिकवीते बहूबहू ॥ ५५ ॥
मातेसी काय चोरावें । सर्वहि ठाउकें तिला ।
उत्तीर्ण व्हावया नाहिं । तेचि ते सचराचरीं ॥ ५६ ॥
बोलणें चालणें तीचें । देखणें चाखणें सदा ।
अखंड खेळते अंगीं । प्राणीमात्रांचिये पाहा ॥ ५७ ॥

( ७ )

प्रपंचीं आमचे कुळीं[1] । तुळजा कुळदेवता ।
नेणतां ऐकिलें होतें । जाणतां स्मरलें मनीं ॥ १ ॥
श्रेष्ठांची[2] कामना होती । पुर्विली मनकामना ।
नौस जो नौसिला होता । तो त्यापासुनी चूकला[3] ॥ २ ॥
पुत्रची घेतला त्याचा । जोगी करुनि सोडिला ।
ख्यांनाति[4] दाविली मोठी । न्यायनीति चुकेचिना ॥ ३ ॥
वैराग्य घेतलें पोटीं । सर्व संसार सांडिला ।
तुझिया दर्शना आलों । कृपादृष्टी नवाजीलों[5] ॥ ४ ॥
तुझा नवाजीला आहे । महंत म्हणती जनीं ।
तुझेंचि सर्वही देणें । सर्वही तुजपासुनि ॥ ५ ॥
संसारीं मोकळें केलें । आनंदी ठाव दिधला ।
तोडिली सर्वही चिंता । तूं माया सत्य जाहलें ॥ ६ ॥
पुर्विलें काय मी सांगों । इच्छा पूर्ण परोपरीं ।
मागील आठवेनासें । केलें आश्चर्य वाटलें ! ॥ ७ ॥
सदानंदीं उदो जाला । सुख संतोष फावला ।
पराधीनता गेली । सत्ता उदंड चालिली ॥ ८ ॥
उदंड ऐकिलें होतें । रामासी वरु दीधला ।
मी दास रघुनाथाचा । मजही वरदायिनी ॥ ९ ॥
श्रेष्ठांचा नौस जो होता । तो मी फेडीनसें म्हणें ।
पुष्प देउनि उतराई । ऐसें हें कल्पिलें मनीं ॥ १० ॥
तुळजापुर ठाकेना । चालिली पश्चिमेकडे ।

१ प्रतापगडीं नवस फेडण्याकरितां श्रीसमर्थ गेले होते, त्या वेळीं त्यांनीं देवीचें [illegible] केलें होतें. २ समर्थांच्या वडील बंधूंनीं नवस केला होता. ३ सुटले. ४ ख्याती, [illegible] ५ नांवालौकिकास चढलों.

पारघाटीं[1] जगन्माता । सद्य येउनी राहिली ॥ ११ ॥
ऐसें हें ऐकिलें होतें । हेत तेथेंचि पावला ।
पुष्पाची कल्पना होती । तेथें पुष्पचि दिधलें ॥ १२ ॥
ऐसी तूं दयाळु माता । हेमपुष्पचि घेतलें ।
संतुष्ट भक्तिभावानें । त्रैलोक्यजननी पाहा ॥ १३ ॥
थोड्यानें श्लाघ्यता केली । थोर संतोष पावलों ।
उत्तीर्ण काय म्यां व्हावें । तुझे कृपेसी रोकडें ॥ १४ ॥
तुझेंचि तुजला दील्हें । म्यां हें कोठूनि आणिलें ।
संकटें वारिलीं नाना । रक्षिलें बहुतांपरी ॥ १५ ॥
जीवीचें जाणते माता । तूं माता मज रोकडी[2] ।
लोकांच्या चुकती माता । अचुक जननी मला ॥ १६ ॥
येकचीं मागणें आतां । द्यावें तें मजकारणें ।
तुझा तूं वाढवी राजा । सीघ्र आह्मांचि देखतां ! ॥ १७ ॥
दुष्ट संव्हारिलें मागें । ऐसें उदंड ऐकतों ।
परंतु रोकडें कांहीं । मूळ सामर्थ्यें दाखवी ! ॥ १८ ॥
देवांचीं राहिलीं सत्वें । तूं सत्व[4] पाहसी किती ।
भक्तासीं वाढवीं वेगीं । इच्छा पूर्ण परोपरीं ॥ १९ ॥
रामदास म्हणे माझें । सर्व आतुर बोलणें ।
क्षमावें तुळजे माते । इच्छा पूर्णचि ते करी ॥ २० ॥

( ८ )

बाळका वाढवी माता । जेथें तेथें परोपरीं ।
स्वभावें जीविचें जाणे । अंतरीं विवरे सदा ॥ १ ॥
बाळका बोलतां येना । हीत तेंही कळेचिना ।
हेंकाड बावळें वेडें । मातेला प्रिय होत असे ॥ २ ॥
अन्याई अवगुणी खोडी । कुश्चिळ रडतें सदा ।
अंतस्थें माय लोभाळू । लोभें गुणांसी वाढवी ॥ ३ ॥
नागिवें उघडें लोळे । हागे वोकी अव्हासव्हा ।
तैशास नेटकें दावी । लेववी नेसवी सदा ॥ ४ ॥

---

१ तुळजापुराहून देवी पश्चिमेकडे असलेल्या प्रतापगडावर येऊन राहिली. पारघाट प्रतापगडाच्या पायथ्याशीं आहे. समर्थांनीं देवीस अर्पिलेलें 'पुष्प' ही तेथें पाहण्यास मिळतें. २ प्रत्यक्ष. ३ माझा शिवाजी राजा तुझाच आहे; त्याचें राज्य व वैभव आमच्या डोळ्यां देखत वाढीव हें एकच मागणें आहे माझ्यासाठीं कांहींच मागणें नाहीं. तें तूं सर्व पुरविलें आहे. गुरुशिष्याचें अलौकिक प्रेम यावरून स्पष्ट दिसतें. ४ परीक्षा.

मातेचा कळवळा मोठा । लोभासी तुळणा नसे ।
आळसेना विसंभेना । कंटाळेना कदापीही ॥ ५ ॥
त्रैलोक्य बाळका पाळी । वाढवी शाहाणें करी ।
कुळाची पाळिली किती । कुळदव्या म्हणोनियां ॥ ६ ॥
त्रैलोक्यीं पुरली आहे । त्रैलोक्यजननी पहा ।
तेचि हे तुळजामाता । भक्तांसी पाळिते सदा ॥ ७ ॥
वोळखी सांडिली बाळें । तिला तों सांडितां नये ।
लोभांचे पाळणें लागे । नानादेहीं भरोनियां ॥ ८ ॥
मातृकुळ पितृकुळ । सर्वांसी पाळिते सदा ।
आद्यंत ठाउकें आहे । कुळमूळाग्र सर्वही ॥ ९ ॥
उपजली वाढली कोठें । हिंडलीं फिरलीं किती ।
भाग्याचे करंटे जाले । मूर्ख व्युत्पन्न सर्वहीं ॥ १० ॥
विश्वाची साक्षिणी माता । विश्वमाता म्हणोनियां ।
श्रीमंत करंटें तीनं । रक्षिले पाळिले किती ॥ ११ ॥
तीचा लो[1] लागला आहे । त्रैलोक्य सकळै जना ।
तीवीण विषयो कैचा । जगजोती चहुंकडे ॥ १२ ॥
जीणें तीं[2] लागलें आहे । ज्ञातं हो समजा बरें ।
शक्तीनं चालतो देहो । शक्ती नसतां देहे पडे ॥ १३ ॥
शक्ती ते सर्व शक्ती ते । आदिशक्ती पुरातना ।
दासासी पाळते लीळा । ध्यानमूर्ति ठसावली ॥ १४ ॥

## ( १ ) बुद्धियोगपूर्वक यत्न.

यत्नाचा लोक भाग्याचा । यत्नेंवीण दरिद्रता ।
उमजला लोक तो धाला । उमजेना तो हपापिला[3] ॥ १ ॥
हिंडता शाहाणें होतें । बोलतां बोल सीकतें ।
वाचितां लिहितां येतें । तेणें तें मान्य होतसे ॥ २ ॥
घरींच बैसतां खोटें । ब्राह्मणू हिंडतां बरा ।
आळसी घातघेणा[4] तो । कष्टला[5] ह्मणिजे बरा ॥ ३ ॥
भुकाळू[6] ह्मणिजे खोटा । धीराचा पाहिजे नरु ।
तार्किक[7] असावा प्राणी । सावधान चहूंकडे ॥ ४ ॥

---

१ छंद. २ तिजकडे. ३ नुसता हांवभरी झाला. ४ आत्मघातकी. ५ प्रयत्न उद्योग केला. ६ लोभीष्ट. ७ तर्काचा, विवेचकशक्तीचा उपयोग करणारा.

प्रसंग वर्ततां आलें । यथातथ्यचि सूचलें ।
मनुष्य राखिलें राजी । तो प्राणी शाहाणा वरा ॥ ५ ॥
समर्थीं धीर सांडीना । यत्नीं[1] यत्न वरा करी ।
हिंडतां पारखी[2] लोकां । कार्यकर्ता जिवीं धरी ॥ ६ ॥
मैत्रिकीही विटों नेदी । सर्वांसी सारिखा दिसे ।
विचार जाणतो मोठा । दक्ष तो जाणता जनीं ॥ ७ ॥
उदंड वोळखी होतां । उदंड भाग्य होतसे ।
उदंड कळहा होतां । उदंड लाथ खातसे ॥ ८ ॥
विचारें गोड बोलावें । बहुतां मान्यसें बरें ।
भांडतां पुरवेना कीं । मैत्रिकी करितां बरें ॥ ९ ॥
बोलावें उसिणें[3] द्यावें । वर्ततां उसिणें निघे ।
कुटितां कुटिती लोक । वोढतां वोढती जनीं ॥ १० ॥
करावें तेंची पावावें । हें आलें आपणाकडे ।
आपलें आपणापाशीं । जनासीं काय बोल हा ॥ ११ ॥
आपला मित्र कां शत्रु । जैसें करी तैसें घडे ।
दिसते गोष्टी ते ऐसी । पल्लवीं[4] पडिलीं पहा ॥ १२ ॥
झाडिल्यां झाडितां येना । झडेना गुण आपुला ।
आपणा विसरावेना । घडीघडी क्षणक्षणां[5] ॥ १३ ॥
आपली चुकी जाणावी । सांडावी ते येकीकडे ।
विवेकें साजिरा जाला । येर उदंड मीळती ॥ १४ ॥
वेषानें कार्य साधना । विवेकें कार्य साधतें ।
विवेकी मानितां ज्याला । धन्य तो ब्राह्मण् जनीं ॥ १५ ॥
पराचें कार्य कर्ता जो । त्याचें कार्य कसें नव्हे ।
तांतडीत तडी[6] धांवे । बरेपणें मनोगतें ॥ १६ ॥
पराचें कार्य कर्ता जो । उभाउभी खडाखडी ।
कळलें पाहिजे सर्वै । लिहितां वाचितां कळे ॥ १७ ॥
भल्याची संगती व्हावी । स्नानसंध्या पवित्रता ।
परोपकारिणी काया । नित्यानित्यविचारणा ॥ १८ ॥
स्नानसंध्या टिळे माळा । उदास तापसी फिरे ।
उत्तम् तो नये वाट्या । जेथें तेथें विराजतो ॥ १९ ॥

---

१ यत्नानें यत्न, एका उद्योगांत दुसरा. २ परीक्षी. ३ परत फेड. ४ पदरांत. ५ 'रात्रंदिस मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दीस जागृतीचा' ( तुकोबा ). ६ परकार्यार्थ कळकळीनें धांवतो.

येके स्थळीं स्थिरावेना । नित्य नूतन साजिरा ।
कीर्ति ते दिगंतीं धांवे । नेमस्त राहातां जनीं ॥ २० ॥
श्लाघ्य दुर्लभ तें जाणें । कोड कौतुकहोतसे ।
विख्यात होतसे योगी । धुंडितां सांपडों नये ॥ २१ ॥
येकांत सांपडे मोठा । बुद्धियोग ठाईं पडे ।
इहलोकपरलोकीं । बुद्धियोगची पाहिजे ॥ २२ ॥
बुद्धियोगें देवयोगें । कर्मयोगें चुके जनीं ।
वियोगेंवीण जो योग । त्या योगें देव साधला ॥ २३ ॥
कृत्याकृत्य जिणें जालें । देव सांपडतां जनीं ।
धन्य तो कुळ तो जन्म । ज्ञानें सार्थक जाहला ॥ २४ ॥

## ( २ ) करंटे मिळाले सर्वे !

भाग्यासी काय उणें रे । यत्नावांचुनि राहिलें ।
यत्न तो करावा कैसा । हेंचि आधीं कळेचिना ॥ १ ॥
मुख्य यत्न विचारावा । त्यावरी बोलणें बरें ।
चालणें सत्य नेमाचें । नीतिन्याय चुकों नये ॥ २ ॥
गलबला[1] बुद्धि नासतो । नाना निश्चय सांगती ।
ऐकावें कोणकोणाचें । बोलताहे बहुचकी[2] ॥ ३ ॥
सांगोंचि जाणती सर्वै । कर्ता कोणही दिसेचिना ! ।
जाणते नेणते सांगों । स्वभाव लागला जनीं ॥ ४ ॥
शास्त्र हो लोक हो कोण्ही । नीती हो न्यायें हो न हो ।
दाटुनी[3] सांगती वेडे । आदरें हो अनादरें ॥ ५ ॥
मिथ्याच सांगती वार्ता । नेटें[4] पोटें बळाविती ।
ऐसे हे लोक सृष्टीचे । प्रवाहीं पडिले पहा ॥ ६ ॥
करंटे मिळाले सर्वे । जो तो बुद्धीच सांगतो ।
सांगावें तें आपणाला । आपणू करितां बरें ॥ ७ ॥

## ( ३ ) गचाळ राजा व हुषार राजा.

लोकांचे गोष्टीनें वर्ते । प्रत्यय पाहिल्याविणें ।
आळसें चाळणा[6] नाहीं । स्वता बुद्धी कळेचिना ॥ १ ॥

---

१ मतामतांचा गलबला. २ पुष्कळजण किंवा बोहोचक. ३ दुसऱ्यांनीं न विचारितांही, आपण होऊन बळेंच. ४ आग्रहानें. ५ अधिकारानें, प्रत्यंतरानें. ६ विचार, मनन.

हीत ते आपली बुद्धि। शोधुनी पाहणें बरें।
पाहिल्यांवीण जो कर्ता। त्याचें कार्य बरें नव्हे ॥ २ ॥
सांगती लोक ते कैसे। आपणू ऐकतो कसा।
स्वयें जो परीक्षा नेणे। लोकांचें ऐकिलें करी ॥ ३ ॥
श्वानासी लावितां लागे। तैसा तो जाणिजे नरु।
खरें खोटें विचारीना। लोकांचें शिकविलें करी ॥ ४ ॥
हिसेबी कोण पाहातो। धामधूम चहूंकडे।
नीति ते राहिले पर्तीं। तेथें कैंची विवंचना ॥ ५ ॥
मोठें तें पाप लोकांचें। प्रभू तो जाणता नव्हे।
वर्ततो सिकविल्या बोलें। तो काय ह्मैसमंगळु ॥ ६ ॥
खर्चतें काम तें ऐसें। रचतें काम तें नव्हे।
कारबार बुडाला तो। कोण कोणास पूसतें ॥ ७ ॥
लाच चोरी बहु जाली। घालाघाली परस्परें।
धण्याला नेणवे कांहीं। वेंदाडी नगरी पहा ॥ ८ ॥
धणी तो राहिला मागें। कारबारीच नासिती।
पाप हें थोर लोकांचें। सांगावें कवणापुढें ॥ ९ ॥
प्रपंच नासतो ऐसा। भाग्य जातें निघोनियां।
यालागीं सर्व सांभाळी। तोचि साहेब नेटका ॥ १० ॥
खबर्दार बरा राजा। विवेक सर्वसाक्षपी।
आज्ञेनें सर्व हि चाले। तेणें सौख्य बहु जना ॥ ११ ॥
पोरांला माय जाणेना। तीं पोरें वाचतीं कशीं।
गुराखा राखतो गुरें। धणी दोहींस पाळितो ॥ १२ ॥
अरत्र बोलिलें ऐसें। येणें न्यायें परत्रही।
प्रत्ययो शोध शोधावा। सावधान चहूंकडे ॥ १३ ॥
सर्वत्र राखणें राजी। सुखदुःख जाणोनियां।
सर्वांची वाहवी चिंता। बुद्धिवंत करावया ॥ १४ ॥

---

१ 'आत्मबुद्धिर्हितार्थाय.' २ पलीकडे, दूर. ३ मङ्ङ. ४ फसणारें. ५ होणारें. ६ दाद लागत नाहीं अशी, अन्यायाची. ७ धनी, मालक. ८ ह्या दृष्टांत केलेलें वर्णन आजच्या बहुतेक राजामहाराजांस लागू पडणारें आहे. ९ सर्व प्रकारचे उद्योग करणारा. १० फारच सुंदर तत्त्व. गुराखी गुरांना राखतो पण धणी गुरें व गुराखी या दोघांस पाळितो, तसे ल्हान मोठे अधिकारी प्रजेवर राजसत्तेनें अंमल चालवितात पण प्रजा व अधिकारी या दोघांना राजानें दक्षतेनें वागवून जरबेच्या प्रेमांत ठेवलें पाहिजे. धणी जागा नसेल तर गुरांना गुराखीच छळील!

लोक ते शाहाणे केले । जन्मापासूनि सोडिले[1] ।
प्रचीती समस्तां लोकां । भक्तिमार्ग प्रतिष्ठिला ॥ १५ ॥

## ( ४ ) परोपकाराची दीक्षा.

लिहितां जोडितां येना । व्यासंग करितां नये ।
जड संसार सांडना । चालिला सर्व सांडुनी ॥ १ ॥
स्वदेश राहिला मागें । विदेश लागला पुढें ।
आचार राखणें आधीं । स्नानसंध्या पवित्रता ॥ २ ॥
अचूक शुद्ध ल्याहावें । वाचावें नीटनेटकें ।
साकल्य अर्थ सांगावा । यथातथ्य प्रचीतीनें ॥ ३ ॥
बोलावें न्यायनीतीनें । मर्यादा राखणें जनीं ।
अभ्यास करावा आधीं । ताळबंध पाठांतरें ॥ ४ ॥
प्रसंगमान जाणावे । बाणावे बहुतांपरीं ।
भक्तिभाव असो द्यावा । घालावा भार ईश्वरीं ॥ ५ ॥
प्रत्यहीं मागणें भिक्षा । मिळाली न मिळे तरी ।
नित्य नूतन हिंडावें । धुंडावे भक्त प्रेमळ ॥ ६ ॥
कथा ते करावी आधीं । बाधी ते दुराशा नको[2] ।
उपाधी आतळावे[3] ना । जावे ना वैभवाकडे[4] ॥ ७ ॥
सर्वत्र लोक शोधावे । बोधावे भक्तिच्या गुणें ।
रहावें दुर्बळाचेथें[5] । देवाल्यें कां नदीतिरीं ॥ ८ ॥
पर्वतीं उदकापासीं । संन्निधची यकीकडे ।
फार येकांत सेवावा । अभ्यास नित्यनूतनु ॥ ९ ॥
सहावीं सीतउष्णादि । पहावीं रम्यसीं स्थळें ।
करावे आपण कष्ट । बांधावीं तें हळूहळू ॥ १० ॥
वोळखी कराव्या दाटा । येके ठाइ स्थिरों नये ।
वादवेवाद तो खोटा । दाटावा[6] मद मत्सर ॥ ११ ॥
उद्धट बोलणें खोटें । बोला मृदु उत्तरें ।
नेटकी पाहिजे दीक्षा । रक्षावी भक्ति आदरें ॥ १२ ॥
वर्णावी कीर्तिचीं द्वारें । अद्भूत बहुतांपरी ।
प्रबंद जाड बोलावे । चालावें योग्य मानसें ॥ १३ ॥

---

१ जन्ममरणापासून सोडविलें. २ निरपेक्षतेनें कथा करावी. ३ उपाधीला स्पर्शू—शिवूं नये. ४ श्रीमंतांकडे. ५ गरीबाचे घरीं, देवालयांत किंवा नदीतीरीं मुक्काम ठेवावा. ६ आवरावा.

भक्तिज्ञान असों द्यावें । शुद्ध वैराग्य नेटकें ।
धरावीं कीर्तिचीं द्वारें । तरावीं भाविकें बहु ॥ १४ ॥
तगावें बहुतां ठाईं । उपाधी नस्तां बरें ।
सद्गुण सार घ्यावे ते । नेघावे अवगुण ते ॥ १५ ॥
भक्तीस लोक लावावे । पावावे परपार ते ।
उपाधी पाहतां नाहीं । पाहों जातां उदंडही ॥ १६ ॥
परंतु सव देवाच । आपलें तनाहि नसे ।
मनांत वावरे देवो । देवदेव चहूंकडे ॥ १७ ॥
अत्यंत साक्षपी व्हावें । न व्हावें आळसी कदा ।
घ्यावा या देहाचा लाहो । जांयाचें हें म्हणोनियां ॥ १८ ॥
मरोनि कीर्ति उरवावी । नुरवावी अपकीर्ति ते ।
धन्य धन्य म्हणे लोक । सत्क्रिया करितां बरी ॥ १९ ॥
पुण्यमार्ग प्रतिष्ठावा । लावावी धर्मवासना ।
देवालयें करावीं मोठीं । वापी कूप सरोवरें ॥ २० ॥
वाटिका वृक्ष लावावे । पुष्पें फळें परोपरी ।
करावी कपाटे टाकी । भुयरीं विवरें गव्या ॥ २१ ॥
वृंदावनें दीपमाळा । धर्मशाळा बहुविधा ।
पायऱ्या वोवऱ्या वोटे । यात्रा धक्के हरिकथा ॥ २२ ॥
सावधू सकळां ठायीं । न्यायनीती चळों नये ।
सकळांसी सख्य राखावें । वर्तावें तें मनोगतें ॥ २३ ॥
वैभव सर्व देवाचें । वाद्यें छत्रें परोपरीं ।
किती ह्मणोनि सांगावीं । सांभाळावीं समस्तही ॥ २४ ॥
दास्य तें करावें ऐसें । यामध्यें घडेल तसें ।
देव सांग करी सर्वै । भावार्थ पाहिजे बरा ॥ २५ ॥

## ( ५ ) निष्कामी व कामी.

गणेश पुजावा आधीं । विद्याबुद्धि प्रदायकु ।
पूजितां तुटती चिंता । भजतां विघ्न नीरसे ॥ १ ॥
शारदा स्तवितां भावें । स्फूर्ति देती जनीं सदा ।
परा पश्यंती मध्यमा । वैखरी ते अंतर्कळा ॥ २ ॥

1 टिकावें. २ न घ्यावे. ३ तनु, देह. ४ छंद. ५ नश्वर. ६ नमो शारदा मूळचत्वार वाचा । ( मनोबोध ).

ते कळा चेतवावी हो । विद्या बुद्धी शिकोनियां ।
उमजतां उमजतां सवैं । समजतां समजतां बरें ॥ ३ ॥
उगी[1] तो करंटा होतो । बोलतां चालतां नये ।
बोलणें चालणें जाणें । कार्यभागीं चुकेचिना ॥ ४ ॥
चुकतां निकामी होतो । करंटा तो म्हणोनियां ।
मूर्ख श्रेष्ठांस मानेना । दरिद्री साक्षपी नव्हे ॥ ५ ॥
शरीर आसुदें[2] राखे । कष्टवीना कदापिही ।
जेवणें खेळणें माने । हासणें निजणें सदा ॥ ६ ॥
संगती मूर्ख पोरांची । थोरां सन्मुख नाडळे ।
कामास चुकवी जो तो । गयाळी मोकळा सदा ॥ ७ ॥
खादाड गोडखा पापी । कळकटा चोरटा बहू ।
खोडी तो न संडी पापी । रडतां जन्म घालवी ॥ ८ ॥
भला तो खोडि सांडीतो । श्रीमंत सर्व साक्षपी ।
भल्यांस निवडूं जाणे । कार्यभाग परोपरीं ॥ ९ ॥
कामासी पाहिजे कामी । नीकामी नलगे जनीं ।
कार्यभाग करावा रे । कार्यकर्ताची धन्य तो ॥ १० ॥
कार्यभाग करूं जाणे । लोक राजी समस्तही ।
सर्वांसी पाहिजे ऐसा । अभ्यासें होतसे नरु ॥ ११ ॥

## ( ६ ) शहाणपणाचा अभ्यास.

आभ्यास कोण तो कैसा । तो आतां बोलिला पुढें ।
वाचुनी[3] जाणतां वर्ते । नेणता तो जसा तसा ॥ १ ॥
ज्याचा जो आभ्यास जैसा । तैसा व्यापार पाहाणें ।
पाहातां पाहातां जाणे । जाणतां जाणतां कळे ॥ २ ॥
कळतां कळतां शिके । शिकतां शिकतां करी ।
करितां करितां वाढे । वाढतां वाढतां भला ॥ ३ ॥
ल्याहावें शुद्ध वाचावें । जाणावें तदनंतरें ।
जाणतां कळतां बिंबे । बिंबतां स्फूर्ति होतसे ! ॥ ४ ॥
प्रत्ययें बोलतां आलें । अचूक न चुके जनीं ।
सत्य मिथ्या कळों आलें । जाणता त्यास बोलिजे ॥ ५ ॥
चुकेना ठकेना कामीं । प्रसंग जाणता बरा ।
यथातत्य त्वरा जाणे । ज्याचें त्याचें परोपरीं ॥ ६ ॥

१ कांहीं न करणारा, आळशी. २ आयदीपणाचें. ३ ग्रंथ वाचून, पढून.

कार्य तें नेमितां येना । प्रसंग बहुतांपरी ।
म्हणोनि जाणता व्हावा । जाणजाणों वर्तावया ॥ ७ ॥
उणीव येउं देना तो । कळहो न करी कदा ।
जनाचें मन तो राखे । युक्तीनें काम चालवी ॥ ८ ॥
युक्ती ते सांगतां येना । रिझतां भिजतां कळे ।
काळ तो विस्कटों नेदीं । भेदिते दीर्घसूचना ॥ ९ ॥
सूचना चाळणा जाणे । बोलिला नित्य नूतनु ।
मानतां मानतां माने । सत्यवादीच नेमकु ॥ १० ॥
ऐसा तो शाहाणा लोकीं । तयाची संगती बरी ।
धरितां सख्य होताहे । प्रवृत्तिनिवृत्तीकडे ॥ ११ ॥

## ( ७ ) वन्ही तो चेतवावा रे !

वन्ही तो चेतवावा रे । चेतवितांच चेततो ।
विवेक जाणिजे तैसा । वाढवितांच वाढतो ॥ १ ॥
संग तो साक्षपीयाचा । धरीतां साक्षपु घडे ।
साक्षपें[1] साक्षपु वाढे । पुरती मनकामना ॥ २ ॥
कष्टतां सौख्य मानावें । कष्टीं[2] फळचि पाविजे ।
आळसें सुख वाटे तें । दुःख ब्रह्मांड भोगवी ॥ ३ ॥
केल्यानें होत आहे रे । आधीं केलेंची पाहिजे ।
यत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥ ४ ॥
अचूक येत्न तो देवो । चुकणें दैत्य जाणिजे ।
न्याय तो देव जाणावा । अन्याय राक्षसी क्रिया ॥ ५ ॥
सावधू देव जाणावा । उन्मतू दैत्य बोलिजे ।
होरट्या[3] दैत्य जाणावा देव तो सौख्यदायकु ॥ ६ ॥
साक्षपी अंश देवाचे । आळशी वंश दानवी ।
राक्षसी दैत्य तो मोठा । अन्यायें दैत्य जाहाला ॥ ७ ॥
देव सर्वांस सांभाळी । तदंश जाणिजे तसा ।
दैत्य ते पीडिती लोकां । तदंश त्याचसारिखे ॥ ८ ॥
दंभ दर्प साभिमानें । कर्कशें वचनें मुखीं ।
कोपी ते दैत्य जाणावे । निष्ठुर परघातकी ॥ ९ ॥
हीत तें देव कर्ता तो । कृपाळु भक्तवत्सलु ।
पाळकू देव जाणावा । चाळकू जगदंतरें ॥ १० ॥

---

१ उद्योगी पुरुषाच्या संगतीनें उद्योग वाढतात. २ शरीरकष्ट, श्रम. ३ हट्टी, वडबड्या.

तो देव जाणिजे ज्ञानें । ज्ञानी त्यासीच बोलिजे ।
विज्ञानी ब्रह्मयोगी तो । वृत्तिशून्य पुरातनु ॥ ११ ॥

( ८ )

गीरीचे मस्तकीं गंगा । तेथुनि चालिली बळें ।
धबाबां लोटल्या धारा । धबाबां तोये आदळे ॥ १ ॥
गर्जतो मेघ तो सिंधु । ध्वनीकल्लोळ उठीला ।
कड्यासी आदळे धारा । वातआवर्त होतसे ॥ २ ॥
तुशार उठती रेणु । दुसरे रज मातलें ।
वातमिश्रीत ते रेणु । सीतामिश्रीत धुकटें ॥ ३ ॥
दराच तुटला मोठा । झाडखंड परोपरीं ।
निबीड दाटली छाया । त्यामधें वोघ वाहाती ॥ ४ ॥
गर्जती श्वापदें पक्षी । नाना स्वरें भयंकरें ।
गडद होतसे रात्रीं । ध्वनिकल्लोळ उठती ॥ ५ ॥
कर्दमु निवडेना तो । मनासीं सांकडें पडे ।
विशाळ लोटली धारा । तीखालें रम्य विवरें ॥ ६ ॥

( ९ ) नेणता व जाणता.

प्रपंच नेणतां वेडा । जाणतां देव बोलिजे ।
चतुर ईश्वरा वाटे । ज्ञानी तो सर्व दुर्लभु ॥ १ ॥
उत्तमु जाणता ज्ञानी । मध्यमु जाणता भला ।
अधमु जाणता वेडा । मूर्ख सर्वत्र नेणती ॥ २ ॥
पुसता सांगतां येना । बोलतां चालतां नये ।
जाणवेना सिकवेना । धारणा धरितां नये ॥ ३ ॥
मिळेना येकमेकांसी । बोलणं चुडुचांचडु ।
प्रचीतीवेगळीं अंधें । बोलती चालती कशीं ! ॥ ४ ॥
नेणतें ऐकेना तें । नेणते वाद घालेती ।
सर्वांसी नीवऊं जाणे । धन्य तो जाणता गुणी ॥ ५ ॥
शस्त्र उंच मालाचें । परंतु हाणतां उडे ।
बहूत नेटका ज्ञानी । पुसतां संकटीं पडे ॥ ६ ॥
प्रत्ययें बोलतां येना । बळेंचि बंड वाढवी ।
भांडतें तंडतें वक्ते । श्रोतेही मूढ तामसी ॥ ७ ॥
बोलतां बोलतां तेथें । थोर कळहोच ऊठिला ।
बळेंचि मारिती हाका । मारामारीस उठिले ॥ ८ ॥

कुटिती येकमेकांला । शंखनाद परोपरीं ।
हांसती लोक संसारी । शुद्धि त्याला असेचिना ॥ ९ ॥
नेणतां बोलणें खोटें । नेणतां कळहो उठे ।
नेणतां विस्कटे विद्या । नेणतां फस्कटे सभा ॥ १० ॥
मानेना त्यास सांगावें । हव्यास धरिला मनीं ।
बधिरासी बोधितां मुकं । बोधमिसें विटंबणा ॥ ११ ॥
आग्रहो निग्रहो होतो । निग्रहें वाद वाढतो ।
वादखेद उठे लोकीं । लोकही खेदिती तया ॥ १२ ॥
प्रत्ययें बोधितां बोधे । विवेकें शोधितां कळे ।
कळतां निवळे विद्या । कुविद्या आत्मघातकी ॥ १३ ॥
ल्याहावें शुद्ध वाचावें । शोधावें प्रत्ययें बरें ।
बोधावें विवेकें न्यायें । प्रचीत सकळां कळे ॥ १४ ॥
लीहिना वाचीना शोधी । अनुमानेंचि बाधितो ।
पुसतां पुसतां क्रोधी । खेदितो सकळै जना ॥ १५ ॥
जग हें जगदीशाचें । जाणतें बहुतांपरी ।
उगेंचि अनुमानेना । पाहिजे जाणतो कळा ॥ १६ ॥
लोक हे राखतां राजी । सर्व राजीच होतसे ।
अंतरें चुकतां तेथें । सर्व भोंजीच होतसे ॥ १७ ॥
जन हें वोळतु जेथें । अंतरात्माचि वोळला ।
जन हें खौळलें जेथें । अंतरात्माचि खौळला ॥ १८ ॥
करावें आपणासाठीं । बरें वाईट वोखटें ।
करावें तेंचि पावावें । द्यावें घ्यावेंचि ऊसिणें ॥ १९ ॥
अरे कारे अहो कांहो । बोलती सकळै जनीं ।
समजावें उमजावें । जाणावें मानिचे मनीं ॥ २० ॥
बऱ्यानें बरवें होतें । दुःखें दुःखाचि वाढत ।
सर्वही आपणापासीं । लोकांसीं ह्मणतां नये ॥ २१ ॥
तावितां तप्त होताहे । भांडतां भांडता बहु ।
सुखेंचि सौख्य जोडावें । सौख्यें सौख्याचे होतसे ॥ २२ ॥
ऐसीं हें वक्तयापासीं । बोलावीं अमृतोत्तरें ।
प्रत्ययो नीति न्यायाचा । मर्यादेचा परोपरीं ॥ २३ ॥
स्तवावें बहुतां लोकां । मानावें बहुतांपरी ।
विध्युक्त विश्व वंदावें । निंदा हे आत्मघातकी ॥ २४ ॥

१ घोटाळा.

सत्याची राखतां सोये । सकळां मानतां बरें ।
असत्य नावडे लोकां । अधिकारेंचि वर्तणें ॥ २५ ॥
अधिकार सोडितां खोटें । अधिकार राखतां बरें ।
प्रसंग साधितां साधे । प्रसंग चुकतां कळे ॥ २६ ॥
विवेकीनें[1] चुकावेंना । घडीघडी क्षणक्षणा ।
चुकतां साम्यता कैची । अत्र हो परत्र हो ॥ २७ ॥
येकांत सेवितां आधीं । चाळणा करितां बरी ।
अभ्यासीं लावितां बुद्धि । अकस्मातचि संभवे ॥ २८ ॥
शिकले शब्द ते थोडे । जिव्हाळा पाहिजे बरा ।
जिव्हाळयावीण तें आटे । जिव्हाळा आसतां तगे ॥ २९ ॥
गलबला होंचि नेदावा । गलबला बुद्धि भ्रष्टवी ।
मुळींच नेणतें व्हावें । जाणत्यानेणत्यांमधें ॥ ३० ॥
महत्व वेगळें आहे । महत्व जाणती कळा ।
नेणत्याला मिळों जाणे । पुढें सांगे हळु हळु ॥ ३१ ॥

## ( १० ) धीर धरा, धीर धरा !

खलेलें खेकटीं खब्रीं । खलखला खर्खरें खरें ।
खबर्दारी खुसी खासा । जेथें तेथें विटेचिना ॥ १ ॥
धीर्धरा[3] धीर्धरा तकवा । हडबडूं गडबडूं नका ।
काळ देखोनि वर्तावें । सांडावें भय पोटींचें ॥ २ ॥
धरावा धीर तो मोठा । विचारें पाहतां बरें ।
अधीर माणसें खोटीं । काम कांहीं कळेचिना ॥ ३ ॥
धाकेंचि चळचळां कांपे । भेणेंचि फळफळां मुते ।
बोबडी पडिली तोंडीं । घाबिरें चाचरें[4] पडे ॥ ४ ॥
खादाड आळसी मंदू । सूचना ते कळेचिना ।
प्रसंगीं चळचळां कांपे । तो प्राणी आत्मघातकी ॥ ५ ॥

## ( ११ ) सत्संगीं बुद्धि वाढवून इहलोक साधावा.

आरंभीं जन्मला प्राणी । त्यासी कांहीं कळेचिना ।
अत्यंत कोंवळी काया । तर्क जाणीव वासना ॥ १ ॥
तोंडांत घालणें कांहीं । बोलतां चालतां नये ।
उठतां बैसतां येना । लोळे अज्ञान बाळकु ॥ २ ॥

१ विवेकी मनुष्यानें. २ उद्दाम, त्रासदायक, गप्पिष्ट, त्रस्त, दुःखदायक, कठोर, ( असें नसावें ) व सावध, समाधानी, अवीट ( असें असावें ). ३ धीर धरा. ४ बोबडी वळते.

वाढतां वाढतां वाढे । शरीर वासना नवी ।
बैसतां रांगतां आलें । दंतही निघती पुढें ॥ ३ ॥
बोलतां चालतां आलें । वोळखों लागलें जना ।
वडिलें वाढवीताती । मायाजाळें करुनियां ॥ ४ ॥
वासना मायबापाची । रमतां येक जाहाली ।
आवडी राहिली पोटीं । रक्तरेतें तनु घडे ॥ ५ ॥
आदिक काम मातेचा । तेणें कन्याच होतसे ।
आधीक काम पित्याचा । तेणें नराचि होतसे ॥ ६ ॥
स्थुळाचें बीज तें रेत । सुक्ष्मी बीज वासना ।
उभयता तनू वाढे । दिसेंदीस हळुहळु ॥ ७ ॥
चत्वार खाणीचे प्राणी । वाढती ते येणे रीती ।
न्यूनपूर्ण नरनारी । समान काम नपुंशकु ॥ ८ ॥
जे जे यातीमधें जन्म । ते ते तैसेची शीकती ।
शीकती शीकवीताती । नानायत्नें परोपरीं ॥ ९ ॥
येक ते शीकती विद्या । येक ते मूर्ख वाढती ।
तेणें ते करंटे होती । युक्ती बुद्धी कळेचिना ॥ १० ॥
जाणता लोक भाग्याचा । नेणता दरिद्री सदा ।
दरिद्री आळसी मोठा । भाग्याचा यत्न वाढवी ॥ ११ ॥
संगतीसारिखे होती । नाना लोक भूमंडळीं ।
सुबुद्धी संगतीयोगें । कुबुद्धी संगतीगुणें ॥ १२ ॥
कर्मानुसार या लोकां । संगती सांपडे बरी ।
यहलोकपरलोकीं । सत्संग पाहिजे बरा ॥ १३ ॥
जन्मती करंट्यापोटीं । तें तों करंटे खरें ।
सेवितां लोक भाग्याचा । सेवनें भाग्य भोगिती ॥ १४ ॥
सेवकु येकयेकांचा । प्रत्यक्ष दिसतें जनीं ।
यालागी संग भाग्याचा । प्रत्यक्ष भाग्य भोगवी ॥ १५ ॥
कितेक लोक भाग्याचे । करंटें होतसे पुढें ।
बुद्धिचा भ्रंश होताहे । यालागी भाग्य जातसे ॥ १६ ॥
भाग्याचे करंटे होती । करंटे भाग्य भोगिती ।
प्रत्यक्ष दिसतें लोकीं । पाहतां पाहतां कळे ॥ १७ ॥
बुद्धीचे गुंथाडे मोठें । दक्ष धूर्तांचि जाणती ।
जाणोनी काय होतें रे । वर्तणें खस्त पाहिजे ॥ १८ ॥

लोक हे लालची मोठे । गफ्‍ती होतसे सदा ।
भाग्य हें चुकतां जातें । आळसें काम नासतें ॥ १९ ॥
बुद्धी हे येहलोकीची । अल्पसी बोलिली असे ।
प्रचीत पाहातां आहे । जाणते जाणती गुणी ॥ २० ॥

॥ इति श्री यहलोक ॥

## ( १२ ) सद्गुरुसंगतींत परलोक साधावा.

संसारें कष्टला प्राणी । त्रासला बहुतांपरीं ।
संगती चालिले गेले । वैराग्य भरलें मनीं ॥ १ ॥
तीर्थयात्रा करी नाना । ऐकिलें बहुतांपरीं ।
गुरुवीण मार्ग नाहीं । म्हणोनि गुरु पाहिला ॥ २ ॥
गुरूची परीक्षा नेणे । येकाकी पडिला दिसे ।
गुरु तो जाणता नाहीं । ज्ञानवैराग्यदुर्बळु ॥ ३ ॥
नेणतां ठकला तेथें । आतां तो सांडितां नये ।
लौकिक सांकडी मोठी भावार्थें रक्षितो बळें ॥ ४ ॥
दरिद्रें पीडिला प्राणी । चाकरी ठेविला ठकें ।
पावेना सांडितां येना । दांत चाऊन राहिला ॥ ५ ॥
साहेब जोडतां मोठा । भाग्य तत्काळ पाविजे ।
धणी तो करंटा आहे । सेवक रडतो सदा ॥ ६ ॥
तैसाचि ज्ञानियां योगी । विश्वविख्यात पाहिजे ।
लाहिजे प्रत्ययो तेथें । नेमस्त परलोकिचा ॥ ७ ॥
बहुतां मान्य मानावें । बहुतां वंद्य वंदिजे ।
निंद्य तें वंदितां खोटें । हांसती सकळै जनीं ॥ ८ ॥
जाणोनि घेईजे नाणें । खरं खोटें परीक्षुनी ।
परीक्षा नेणतां प्राणी । सहजं ठकला असे ॥ ९ ॥
नित्यानित्यविवेकानें । सारसारावेचारणा ।
आत्मशास्त्रगुरुवाक्य । ऐक्यता घडतां बरें ॥ १० ॥
पिंडब्रह्मांडिचे देहे । तत्वें तत्वाविवंचना ।
पंचीकरण महावाक्यें । समाधानाचि पाविजे ॥ ११ ॥
विवरणें प्रत्यया येतां । जनीं धन्याचि होईजे ।
सांडितां अष्टहि देहे । देहातीतचि होईजे ॥ १२ ॥
देहींच विदेही राजा । जनकु जगज्जनकु ।
कर्ता ना अकर्ता तेथें । कृत्यकृत्यचि होईजे ॥ १३ ॥

श्रवणें सार शोधावें । मननें मन मावळे ।
निवळा निवळे सर्वें । साध्य साध्यचि होईजे ॥ १४ ॥
निःसंग शोधितां आत्मा । स्वयें निसंग होईजे ।
उदास तापसी ज्ञानी । सर्वही जाणता गुणी ॥ १५ ॥
देव तो शिव कां विष्णु । इतर देव ते किती ।
सर्वही भजती सर्वां । आपुलाले यथामती ॥ १६ ॥
पांचवं भूत तें कैसें । त्रिगुणीं बरवें पाहा ।
त्रिगुणातीत जे वस्तु । मनरूप असोचिना ॥ १७ ॥
नामरूप सांडितां मागें । पुढें कैसी विवंचना ।
वृत्तिशून्य माहांयोगी । निश्चयो पावला मनीं ॥ १८ ॥
मुख्य ते नवमी भक्ती । आत्मनिवेदनी कळा ।
कळांचि विकळा होती । वाचातीत निरंजनु ॥ १९ ॥
दृश्य ना भास भासेना । साधकू साध्य जाहाला ।
देहसंदेह तो कैंचा । मोक्ष मोक्षचि जाहाला ॥ २० ॥

॥ इति श्री परलोक ॥

## ( १३ ) जीवांत जीव घालावा, लोक वोढावे कसे ?

पाडवा आडवा आला । मन घाला अभ्यासितां ।
विवरणें अंतःकर्णें हो । सांगणें अर्थ येथिचा ॥ १ ॥
गाळावें ना घालावें ना । पल्लवीचें[1] कांहीं तरी ।
नेमस्त बोलिला कैंचा । कळेसें सांगणें जना ॥ २ ॥
अभ्यासें होत आहे रे । आभ्यास करणें सदा ।
उदंड बोलणें लागे । यथातथ्य हळू हळू ॥ ३ ॥
तेव्हां ते समजती प्राणी । कोण्हा मानूं नये कदा ।
जीवांत जीव घालावा । चालावा भक्तिमार्ग हा ॥ ४ ॥
दुसऱ्यास कळेसें करणें । विवरणें जाणती मनीं ।
ते लाभ मानिती मोठा । गोंटा[2] लोक गमाविती ॥ ५ ॥
सर्वही पेरणें विद्या । लोकांमधें हळू हळू ।
नेणते जाणते करणें । कथानिरूपणें सदा ॥ ६ ॥
निश्चय बिंबवावे ते । प्रत्यय सद्य रोकडे ।
उकलुनी सांगणें सोपें । क्षणक्षणा पुनःपुन्हा ॥ ७ ॥

१ पदरचें. २ हट्टी.

कंटाळा दूरि टाकावा । मनामधें त्रासों नये ।
सांगतां सांगतां हांसे । हांसे खेळे अहर्निशी ॥ ८ ॥
झिंजी हे सर्व लोकांची । चुकतां झीडकूं नये ।
मनापासून वोढावें । ज्यासी त्यासी क्षणक्षणा ॥ ९ ॥
लोक हे आभारें भारें । विचारें दाटले बहू ।
अखंड सर्वस्वें राजी । नवाजीतो मृदूत्तरें ॥ १० ॥
मैत्रिकी सर्वलोकांसीं । मनापासून जाहली ।
वेध हा लागला मोठा । लोक भाटचि जाहले ॥ ११ ॥
अंतरीं लागली माया । परस्परें सुटेचिना ।
मित्र ते जाहले भागी । विभागी परलोकींचे ॥ १२ ॥
कंठेना येक येकाला । अंतरें मिळाली वरीं ।
साक्षपी नेटके जाले । मानलें जगदंतरें ॥ १३ ॥
कथानिरूपणें चर्चा । थोरथोरांस मानली ।
कंठेना लोक येताती । कोठकोठून चालिले ॥ १४ ॥
सर्वांसी राखणें राजी । सर्वकाळ मृदूत्तरें ।
येकचि जीव सर्वांचा । कट्टबंद ढळेचिना ॥ १५ ॥
सर्वांस सुख होताहे । ज्याचे त्याचे परी सदां ।
विचित्र साज सामे ते । किती म्हणोनि सांगणें ॥ १६ ॥
सोईऱ्या धाईऱ्या लोकां । सवेचि लागली सदां ।
राजकी भोवत येती । तेंहि त्यासीच मीळती ॥ १७ ॥
धाकुटी थोरली मुलें । वृद्ध तारुण्य सारिखें ।
उदंड वृद्ध म्हाताऱ्या । मुलें घेऊन धांवती ॥ १८ ॥
सर्वत्र वोढती तेथें । विचित्र न कळे कळा ।
स्थळ ते माजलें मोठें । माजलें वाद्यगायना ॥ १९ ॥
भक्तीचा जिव्हाळा मोठा । खोटा मार्ग असेचिना ।
रामदास म्हणे माझा । राम त्रैलोक्यनायकु ॥ २० ॥

## ( १४ ) प्रयत्नाइतका लाभ !

अखंड सावधान रे । प्रयोग [1]प्रेत्न मान रे ।
प्रसंग हा [2]तुफान रे । नकोचि वेवधान रे ॥ १ ॥

---

१ गर्दी. २ जूट.

मनीं धरूनि धारणा । करा बरी विचारणा ।
प्रेत्न मूळ कारणा । अतर्क्य ते विचारणा ॥ २ ॥
बहु विधीविधान हो । परंतु सावधान हो ।
प्रमाण जाण उत्तरें । प्रत्युत्तरें निरुत्तरें ॥ ३ ॥
अहो जना अहो जना । मनें मना विवंचना ।
अरत्र हो परत्र हो । प्रचीत पाववी मोहो ॥ ४ ॥
म्हणे उदास दास हा । बरें पाहा बरें पाहा ।
करील प्रेत्न जीतुका । तयास लाभ तीतुका ॥ ५ ॥

## ( १५ ) अखंड सावधानता.

करील व्याप तो भला । बहुत भाग्य लाधला ।
नसेल व्याप तो हळु । पडेल रे पळेंपळु ॥ १ ॥
अरत्र हो परत्र हो । विचित्र काळसूत्र हो ।
अखंड सावधानता । सभाग्य तो नव्हे रिता ॥ २ ॥
अनेक भाव भावना । सदा मनीं विवंचना ।
विशेष धारणा धरीं । उदंड चाळणा करीं ॥ ३ ॥
सखोल तो कळेंचिना । कदा लिळा तुळेचिना ।
परांतरासि जाणता । दिसे जनास नेणता ॥ ४ ॥
कवी म्हणे बहु बरें । करील देव तें खरें ।
बरी धरूनि वासना । धरा मनीं उपासना ॥ ५ ॥

## ( १६ ) धरा मनीं उपासना.

श्री राम राम राम रे । समर्थ योगधाम रे ।
दयाळ तो दया करी । कवी जनांसि वीवरी ॥ १ ॥
कदापि जें घडेचिना । जनासि सांपडेचिना ।
करी तयापुढें दया । अपाय जाय वीलया ॥ २ ॥
धनुष्यबाणधारकु । हरी जनासि तारकु ।
प्रचंड ध्यान तें धरा । मनांतरींच वीवरा ॥ ३ ॥
अखंड पार्वतीपति । रघूत्तमासि चिंतिती ।
प्रचीत बाणली मना । उपाय सूचला जना ॥ ४ ॥
जसा तसाचि काळ हो । मनीं धरा दयाळ हो ।
तुम्हांसि तो दया करु । अनन्यभाव वीवरु ॥ ५ ॥
महंत हो नका नका । बहुत वैभवें धका ।
उदास दास तापसी । फिरे लिळा जसी तसी ॥ ६ ॥

प्रसंग हा तडतडी । करा विवेक तांतडी ।
सुचीत व्हा घडी घडी । प्रबोध घ्या खडाखडी ॥ ७ ॥
पहा पहा बरें बरें । करील देव तें खरें ।
अहंमती अनावरें । विवेकहीण पामरें ॥ ८ ॥
करील तो करील रे । तुम्हांसि काय बोल रे ।
उरों नका म्हणे कवी । उदास दास सीकवी ॥ ९ ॥

## ( १७ ) कठिण काळाला भिऊ नका.

कितेक जीव जन्मती । कितेक मृत्यु पावती ।
कितेक होत जातसे । मना प्रचीत येतसे ॥ १ ॥
कितेक वृक्ष वाढती । कितेक वृक्ष मोडती ।
कितेक पाहातां रचे । कितेक मागुतें खचे ॥ २ ॥
पुरें कितेक पट्टणें । कळे समस्त अट्टणें ।
कितेक होत दाटणी । स्थळें न येत वांटणी ॥ ३ ॥
ऋणानबंद तो घडे । पुन्हा सर्वेंचि वीघडे ।
कितेक काळ तों वसे । सर्वेंचि सर्व नीरसे ॥ ४ ॥
कितेक देश लागला । कितेक देश भंगला ।
कितेक नृपती भले । परंतु मृत्यु पावले ॥ ५ ॥
कितेक उत्पती स्थिती । कितेक पावती गती ।
तुम्ही समस्त देखता । कठीण काळ धाकता[1] ॥ ६ ॥
जना प्रत्यक्ष हें दिसे । तयासि संशयो नसे ।
रचेल तें खचेल रे । दिसेल नीरसेल रे ॥ ७ ॥
दिसेल भास तो भ्रमू । भ्रमें जनांसि विभ्रमू ।
असार सार तें पहा । कळोनियां सुखें रहा ॥ ८ ॥
स्वहित जाणतां खरें । न जाणतां नव्हे बरें ।
क्षराक्षरासि वीवरा । विचार हा बरा करा ॥ ९ ॥
असार सार वाड रे । क्षिरा निरा[2] निवाड रे ।
करील राजहंस तो । जनांमधें विशेष तो ॥ १० ॥
भुतें भुतांसि पाहाती । भुतें भुतांत राहाती ।
भुतां सबाह्य अंतरीं । विचार सार[3] तो धरीं ॥ ११ ॥

---

१ हें सर्व डोळ्यांनीं पाहून काळ कठिण आला म्हणून धाक बाळगतां ? २ दूध व पाणी. ३ पंचभूतातीत परमात्मा.

अरे अनन्यभक्त हो। जना-अतीत मुक्त हो।
स धन्य धन्य धन्य रे। विचार सार मान्य रे॥ १२॥

## ( १८ ) कलह व पक्षभेद मोडून अनन्य भक्त व्हा.

कदा कळ्होचि लागला। श्रुतीं कळ्हो विभागला।
अनंत पंथ आगमी। कळ्हो उदंड नीगमी॥ १॥
प्रकुर्तिं[1]चा कळ्हो उठे। जनीं प्रकुर्ति वोहटे।
प्रकुर्तिमूळ भांडणें। कळ्हो उदंड मीपणें॥ २॥
कळ्हो अनादि हा असे। विवंचितांचि नीरसे।
अहंमं[2]ती विरेचिना। तरी कळ्हो सरेचिना॥ ३॥
अभेद[3]भक्तिचा ठसा। अनन्यभाव तो कसा।
निवेदनेंचि वोळखा। अहंपणें झकों नका॥ ४॥
विकारलेश जों उरे। अहंपणें भरीं भरे।
तयासि पाहातां बरें। विरोन राहातां खरें॥ ५॥
कदापि वीवरेचिना। तरी मनु[4] थिरेचिना।
अहंपणेंचि पातकी। उरेल तोचि घातकी॥ ६॥
उरेल[5] तो अभक्त रे। नुरेल तोचि भक्त रे।
उगारला अहंपणें। तयासि काय सांगणें॥ ७॥
बरें कळेल तें करा। परंतु हेत वीवरा।
अहेत तो अहेत रे। धरूनि काय हेत रे॥ ८॥
अनन्यभाव ही तरे। उरेल तो पतीत रे।
प्रत्यक्ष वेगळा पडे। अहंपणेंचि नीवडे॥ ९॥
धरून पक्ष काय रे। उपाय तो अपाय रे।
तुम्ही तुम्हांस वीवरा। स्वहित तें मनीं धरा॥ १०॥
जनीं उदंड पाहिलें। कळ्हो करीत राहिलें।
अनन्यदेव भेटला। कळ्हो तयास तूटला॥ ११॥
कळ्हो करील शब्द रे। अनंत तो निःशब्द रे।
तुम्ही अनंत[6] कां न व्हा। वेवादतां अव्हासव्हा॥ १२॥

---

१ प्रकृति. २ मीपणानें कलह होतात, मीपण जात नाहीं तोंवर कलह मिटायचे नाहींत. ३ अभेद भक्तीनें जीव जीवांत घालायला शिका, कलह मिटतील. ४ मन स्थिर होत नाहीं. ५ वेगळेपणानें राहील तो पापी, समरसेल तोच भक्त. ६ शब्दांमुळें कलह होतात, देव निःशब्द आहे तुम्ही तसेच व्हा; अचावाचा बोलून नाना पक्ष उभारून, वादांत पडूं नका, निवांत व्हा.

अनंत ब्रह्म तें असे । तयास पक्षही नसे ।
संत संत संत रे । निवांत रे निवांत रे ॥ १३ ॥
स्वयेंचि तोचि होइजे । पदीं मिळोनि जाइजे ।
उरेल तो कळहो करूं । उदंड पक्ष ही धरूं ॥ १४ ॥
उदंड हो बरें बरें । तुम्ही म्हणाल तें खरें ।
कळेल तें सुखें करा । धराल तें सुखें धरा ॥ १५ ॥
उडेल तो पडेल रे । पडेल तो रडेल रे ।
उडेचिना पडेचिना । रडेचिना दडेचिना ॥ १६ ॥
वितंड वाद घालणें । वितंड शब्द बोलणें ।
वितंड बंड ही नुरे । उरेल तेंचि तें नुरे ॥ १७ ॥
अनेक शब्दभावना । किती करूं विवंचना ।
जनीं म्हणेल जें जसें । तयांसि मानिजे तसें ॥ १८ ॥
हितार्थ सांगणें घडे । विवंचिता तिढा पडे ।
जना प्रचीत नावडे । कुळाभिमान तो जडे ! ॥ १९ ॥
अनन्यता परोपरीं । उदास दास वीवरी ।
कळहो जनासि वाटला । मनु बळें उचाटला ॥ २० ॥

## ( १९ ) अनेक पक्षांध लोकांत एक जाणता काय करील ?

परीक्षवंत तो मिळे । तयास वोळखी कळे ।
बहुत लोक नेणता । करील काय जाणता ॥ १ ॥
असत्य तें चि सत्य रे । प्रचीत ते असत्य रे ।
स्वधर्म तो अधर्म रे । अधर्म युगधर्म रे ॥ २ ॥
नसेच न्याय पाहातां । तयांत शीण राहातां ।
न ये चि आणि नायके । अहंपणें वृथा झके ॥ ३ ॥
आढ्यं[१] साभिमानसा[२] । अमानसा गुमानसा[३] ।
प्रचीत वाउगी करी । बळेंचि ते भरे भरीं ॥ ४ ॥
उगाच पक्ष घेतला । बळेंचि वाद घातला ।
यथार्थ अर्थ व्यर्थ रे । अनर्थ रे अनर्थ रे ॥ ५ ॥
करील काय तो भला । बहु चेकींत[५] येकला ।
विभक्त चोर फारसे । क्वचित साहुकारसे[६] ॥ ६ ॥

१ भेद. २ संपन्नता. ३ गर्व. ४ वेपर्वा. ५ बोहोचक मंडळींत. ६ बहुतेक आपापल्या स्वार्थ पाहणारे चोर, साव एखादा.

सुधा परंतु वायसां । घडेल भोग कायसा ।
विवेकहीण त्या जना । घडे कसी विवंचना ॥ ७ ॥
प्रचीत न्याय वीलसे । दुराभिमान त्या नसे ।
विचारसार वीवरी । जनासि धन्य तो करी ॥ ८ ॥
प्रचीत सत्य सत्य रे । असत्य तें असत्य रे ।
निवेदनीं टळेचिना । बरी लिळा कळेचिना ॥ ९ ॥
विशेष संतसंग तो । विरंग रंग भंगतो ।
अनन्य हो मनीं धरा । विचारणा बरी करा ॥ १० ॥

## ( २० ) मनें मनास राखणें.

तनास भेटलीं तनें । मनास चुकली मनें ।
चुकी चुकी बहु चुकी । परस्परें चुकामुकी ॥ १ ॥
मढ्यास[१] भेटलें मढें । करी काय बापुडें ! ।
मनें मनाचिया खुणा । वुझेल लोभ त्या दुणा[२] ॥ २ ॥
उगेंचि वेचलें वयें । मनास भेटतां नये ।
मनें मनास राखणें । सुखें सुखास चाखणें ॥ ३ ॥
न संगतांच जाणणें । खुणेसि खुण बाणणें ।
प्रसंग मान पूरतें । कदापि तें नव्हे रितें ॥ ४ ॥
विकल्प दुरी तों कळे । अखंडन्याय नीवळे ।
प्रमाण खुण जाणतो । नव्हेचि अप्रमाण तो ॥ ५ ॥
प्रसंग धारणा धरे । मनें मनांत वीवरे ।
कदा भरीं भरेचिना । महत्व[३] तें सरेचिना ॥ ६ ॥
क्षमा बहुत साहणें । आढ्यातिढ्या न राहणें ।
जनामधें विटेचिना । बरेपणें तुटेचिना ॥ ७ ॥
भरीं भरेल दुसरें । जना कळेल तें खरें ।
भलाचि तो भलाभला । बहू जनास मानला ॥ ८ ॥
खरेंचि तें सदा खरें । बरेंचि तें बहू बरें ।
समस्त लोक जाणती । भले प्रमाण बाणती ॥ ९ ॥
प्रमाण तो भलाभला । बहु जनांत शोभला ।
भलेचि मानिती तया । विमूढ जाय वीलया ॥ १० ॥
बहु जनांत शीकती । तया गुणेंचि वीकती[४] ।
परंतु शीकतां नये । तयास लावणें नये ॥ ११ ॥

---

१ मनामनाशी मिळणी ( आंतलें ऐक्य ) न होतां नुस्तीं शरीरें एकत्र येणें म्हणजे तें मढ्यामढ्यांची भेट होय ! २ दुप्पट. ३ त्याचें महत्व नष्ट होत नाहीं. ४ मोल पावतात.

परांतरास राखणें । अचूक सुख चाखणें ।
परंतु संग तो मिळे । तरी जनास नीवळे ॥ १२ ॥

## ( २१ ) अचूक यत्न.

अंतरींच सावधान । उत्तरीं अवेवधान ।
सांवरी प्रसंगमान । यावरी विधीविधान ॥ १ ॥
प्रेत्न पुरता करी । सदा विचार वीवरी ।
चतुर तो परोपरीं । तया सरी मनोहरी ॥ २ ॥

## ( २२ ) परांतरास राखणें.

विवीध वर्म लोचनीं । कदा नसो वसे जनीं ।
दुःखास लागतां ढका । पुरें पुरें नका नका ॥ १ ॥
बहु प्रकार बोलणें । बहु प्रकार चालणें ।
मनास लागतां ढका । पुरे पुरे नका नका ॥ २ ॥
परांतरास राखणें । समस्त सूख चाखणें ।
कदापि अंतरा पडे । तरीच सख्य वीघडे ॥ ३ ॥
गुणी मिळेल पुरता । वदेल मौन देवता ।
तयापरी परांतरें । चुकोन राहाती खरें ॥ ४ ॥
प्रवीण जे महा भले । भलेभलेंचि गुंतले ।
कवीस बोबडी वळे । पहा चतुर चावळे ॥ ५ ॥

## ( २३ ) तनें मनें झिजा.

तनें झिजेल त्या मनें । मनें झिजेल त्या तनें ।
तनें मनें विशेषता । झिजेल तो चि पुरता ॥ १ ॥
मनें प्रसंग वीवरी । तनें प्रसंग जो करी ।
तन मनें चुकेचिना । तया उणीव येचिना ॥ २ ॥
मनें बहुत चंचळें । विशेष गुण आडळे ।
प्रचीत मानली मना । तरीच आवडे जना ॥ ३ ॥
रुपें विशेषता दिसे । परंतु गुण तों नसे ।
तयास मानितीलसे । सभा समस्त वीलसे ॥ ४ ॥
उडेल पांभळें बळें । गुणीस मोल आगळें ।
तगेल रंग तो खरा । बरे चतुर वीवरा ॥ ५ ॥
रुपें रसाळ तो गुणी । तयास आवडी दुणी ।
रुपें गुणें विशेषता । करील तोचि पुरता ॥ ६ ॥

१ नाशिवंत, तुच्छ.

विशेष वेष साजिरा । उदंड गुण तो बरा ।
प्रचीतिनें खरा खरा । चढेल कोण दुसरा ॥ ७ ॥
उदास दास तो धरी । परोपरीं क्रिया करी ।
गुणें गुणी गुणाथिला । भला भला भला भला ॥ ८ ॥
प्रताप सूर्यसा तपे । तयास कोण रे जपे ।
अनंत गुण उत्तमा । कदा कळेचिना सिमा ॥ ९ ॥
करी न्याहाल[1] सेवका । समर्थ वीसरों नका ।
विशेष हा रघूत्तमु । भजेल उत्तमोत्तमु ॥ १० ॥

## ( २४ ) मनें मनासि मीळणी.

चकोर चातकें दुखी । चतुर ही बहु दुखी ।
मना मना मिळेचिना । विशेष तें कळेचिना ॥ १ ॥
गुणाविषीं भला भला । परंतु हंस येकला ।
विशेष तो कळेचिना । विहंगमीं मिळेचिना ॥ २ ॥
गुणी गुणास जाणती । गुणी खुणेसि बाणती ।
उगाचि लोक आडळे । गुणी विशेष नाडळे ॥ ३ ॥
गुणासि गुणग्राहिकें । न मीळतां दिसे फिकें ।
विशेष वस्तु केंडली[2] । सुवस्तिही नव्हे भली ॥ ४ ॥
विशेष पेंठ पाहाणें । तयेमधें चि राहणें ।
तरीच सुख पाविजे । अनंत गुण भाविजे ॥ ५ ॥
मनें मनासि मीळणी । तयासि मानिती गुणी ।
परांतरासवें भरे । प्रसंग मान वीवरे ॥ ६ ॥
फुटेल वेगळाचि तो । सदा मिळेल तोचि तो ।
फुटेचिना तुटेचिना । मिळोन वेगळेचिना ॥ ७ ॥
तदंश तोचि बोलिजे । प्रसंगमान जो भिजे ।
रिझेल त्यापरी रिझो । झिजेल त्यापरी झिजो ॥ ८ ॥
विभक्त दीसती खरें । परंतु येक अंतरें ।
अनन्य येकि धारणा । मिळों न जाय कारणा ॥ ९ ॥
मिळोन जाय अंतरा । तदंश तोचि तो खरा ।
विचार येक धारणा । मिळोन जाय कारणा ॥ १० ॥
जनांत चाळणा घडे । तयापरीचि वावडे ।
शरीर पाहातां घडे । उपाधि योग वीघडे ॥ ११ ॥

१ संगोपन. २ केंडणें=अडथळा करणें.

बरी विचारणा सखी । परांतरास पारखी ।
समस्त हेत नीरखी । तयास नाडळे मखी ॥ १२ ॥
अखंड सावधानता । मनीं विधी विधानता ।
समस्त धारणा धरी । सदा विचारणा करी ॥ १३ ॥
प्रसंग चाळणा घडे । खट्याळ लोक तो दडे ।
सदा उणें हळु पडे । पदोपदींच सांपडे ॥ १४ ॥

## ( २५ ) जिवीं जिवाचिया खुणा.

कदा चुकेचिनापदा । जनांस लाधली सदा ।
उण्यासि धाक सोडिला । समर्थ राम जोडिला ॥ १ ॥
उदंड जंत्रकु फिरे । तयामधेंचि वीवरे ।
पाहावयासि अग्रजा । विशेष स्फुरती भुजा ॥ २ ॥
अखंड प्रीतिच्या गुणा । कदा न सोसवे जना ।
प्रभू सदा परोपरीं । उदास दुसरी सरी ॥ ३ ॥
अनुज सेवकापरी । बहु मनु तयावरी ।
मनोगतेंचि बोलणें । मनोगतेंचि चालणें ॥ ४ ॥
जिवीं जिवाचिया खुणा । बुझेल तोचि शाहाणा ।
प्रचीत बोलणें घडे । बरा विचार सांपडे ॥ ५ ॥
करूनि सर्व बावळा । उगावलाच फावला ।
मनें मनु बुझावला । जनास राम फावला ॥ ६ ॥

## ( २६ ) उपासना उपासना.

प्रसंग हा कठीण हो । बहुत पावले मोहो ।
परंतु येत्न पाहाती । सुखेंचि तेचि राहाती ॥ १ ॥
विवेक पाहाणें बरा । बरा विचार तो करा ।
उपासकांसि सुचना । उपासना उपासना ॥ २ ॥

## ( २७ ) कोणाचाही काळ एकरूप राहत नाहीं.

श्रीकृष्ण देव नाटकु । जनांत सीतरु[1] ठकु ।
तयास बैसला धका । मनुष्य नेति गोपिका ॥ १ ॥
भुपाळ ही भलेभले । जनीं उदंड जाहले ।
ऱ्हासकाळ सेवटीं । विसंचितां लुटालुटी ॥ २ ॥
सभाग्य रावणादिकां । बहु कठीण काळ कां ।
महीवरी परोपरीं । उदंड हे भरोवरी ॥ ३ ॥

---

१ फसवी.

भरे सर्वांचि मागुतें। उगेंचि होतसे रितें।
कदापि नावरे जना। बरी करा विवंचना॥ ४॥
नदी भरोन वोहरे[1]। तळें भरोन तें फुटे।
तयापरीच संपदा। जनीं न निश्चळे कदा॥ ५॥
बहुत भोगिती जयें। भले न पाहाती तये।
ठकी ठकून जातसे। सुरंग भंग होतसे॥ ६॥
बहुत चाखती चवी। सुरेंद्र दैत्य मानवी।
ह्मणे कवी नका नका। समस्त पावले धका॥ ७॥
रुणानुबंद तों घडे। पुढें समस्त वीघडे।
पशु मनुष्य संपदा। घडोन वीघडे सदा॥ ८॥
भरोंच लागतां भरे। भरे कदापि नावरे।
सर्वोचि वोसरे सरे। सरें चि तें कदा नुरे॥ ९॥
बरीच वेळ लागतां। घडोन ये न भागतां।
उगाच काळ विषमु। पराक्रमुच तो श्रमु॥ १०॥
बराचि काळ तो बरा। न भागतांचि ये घरा।
बळेंचि लोक बोलती। सुखें सुखी कल्लोळती॥ ११॥
उदास राहतां गती। भले विवेक सांगती।
घडेल तें सुखें घडो। पडेल तें सुखें पडो॥ १२॥

## ( २८ ) परांतरासि जाणणें.

नसोन जाणती कळा। कळा समस्त वीकळा।
परांतरासि नेणवे। तयासि काय जाणवे॥ १॥
परांतरासि जाणता। नसेल तो मुळीं रिता।
सिकोन काय सीकलें। विकोन काये वीकलें॥ २॥
भला भला विचक्षणु। प्रवीण योग्य तीक्षणु।
खुणावितां खुणावला। मनें खुणेसि पावला॥ ३॥
बहुत धूर्त तो भला। खुणेसि तूर्त पावला।
न सांगतां जया कळे। निरोपितां चि नीवळे॥ ४॥
अखंड हेत पालटे। कळेचिना मनु विटे।
सुरंग ना विरंगसे। उगेचि रंग भंगसे॥ ५॥
बहुत जाणती कळा। कळाचि होत वीकळा।
कळोन ही कळेचिना। वळोन ही वळेचिना॥ ६॥

१ ओहटी लागते.

## (२१) शिवराय व मंत्री यांस प्रासंगिक उपदेश.

### (१) शिवरायाचें गौरव आणि प्रोत्साहन.

(शके १५७१ त शिवाजीमहाराजांस वाई येथें समर्थांकडून पत्र गेलें तें)

निश्चयाचा महामेरु[1]। बहुत जनांसी आधारु। अखंडस्थितीचा निर्धारु। श्रीमंत योगी ॥ १ ॥ परोपकाराचिया राशी। अखंड घडती जयासी। तयाचे गुणमहत्त्वासी। तुळणा कैंची ? ॥ २ ॥ नरपति हयपति गजपति। गडपति भूपति जळपति। पुरंदर आणि छत्रपति। शक्ति पृष्ठभागीं ॥ ३ ॥ यशवंत कीर्तिवंत। सामर्थ्यवंत वरदवंत। पुण्यवंत नीतिवंत। जाणता राजा ॥ ४ ॥ आचारशीळ विचारशीळ। दानशीळ धर्मशीळ। सर्वज्ञपणें सुशीळ। सकळां ठायीं ॥ ५ ॥ धीर उदार गंभीर। शूर क्रियेसी तत्पर। सावधपणें[2] नृपवर। तुच्छ केले ॥ ६ ॥ तीर्थक्षेत्रें मोडिलीं। ब्राह्मणस्थानें भ्रष्ट जालीं। सकळ पृथ्वी आंदोळली[3]। धर्म गेला ॥ ७ ॥ देव धर्म गोब्राह्मण। करावया संरक्षण। हृदयस्थ जाला नारायण। प्रेरणा केली ॥ ८ ॥ उदंड पंडित पुराणिक। कवीश्वर याज्ञिक वैदिक। धूर्त तार्किक सभानायक। तुमच्या ठायीं ॥ ९ ॥ या भूमंडळाचे ठायीं। धर्म रक्षी ऐसा नाहीं। महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं। तुम्हांकरितां ॥ १० ॥ आणीकही धर्मकृत्यें चालती। आश्रित होऊन कित्येक राहती। धन्य धन्य तुमची कीर्ति। विश्वीं विस्तारली ॥ ११ ॥ कित्येक दुष्ट संहारिले। कित्येकांस धाक सुटले। कित्येकांस आश्रय जाले। शिव कल्याण राजा ॥ १२ ॥ तुमचे देशीं वास्तव्य केलें। परंतु वर्तमान नाहीं घेतलें। ऋणानुबंधें विस्मरण जालें। काय नेणूं ॥ १३ ॥ सर्वत्र मंडळी धर्ममूर्ति। सांगणें काय तुम्हांप्रति। धर्मस्थापनेची कीर्ति। संभाळली पाहिजे ॥ १४ ॥ उदंड राजकारण तटलें। तेणें चित्त विभागिलें। प्रसंग नसतां लिहिलें। क्षमा केली पाहिजे ॥ १५ ॥

### (२) राजधर्म.

नमो मंगळमूर्ति विघ्नहरु। सरस्वतीस नमस्कारु। सद्गुरु संत कुलेश्वरु। दाशरथी ॥ १ ॥ श्रोतीं मानेल तरी ध्यावें। अथवा दाटूनि सांडावें।

---

१ ह्या गुणग्राहक विशेषणांनी गौरव केलें आहे. २ स्वतःच्या हुषारीनें राजांस व पातशहास पराजीत केलें. ३ हादरून गेली.

प्रपंचाकारणें स्वभावें । बोलिलों मी ॥ २ ॥ सावधपणें प्रपंच केला । तेणें सुखचि पावला । दीर्घ प्रयत्नें मांडला । कार्यभाग साधे ॥ ३ ॥ आधीं मनुष्य ओळखावें । योग्य पाहून काम सांगावें । निकामी[1] तरी ठेवावें । एकीकडे ॥ ४ ॥ पाहोन समजोन कार्य करणें । तेणें कदापि न ये उणें । कार्यकर्त्या[2]च्या गुणें । कार्यभाग होतो ॥ ५ ॥ कार्यकर्ता प्रयत्नीं जाडे । कांहींएक असला हेका[3]डे । तरी समर्थपणें पाठवाड[4] । केली पाहिजे ॥ ६ ॥ अमर्याद फितवेखोर । यांचा करावा संव्हार । शोधिला पाहिजे विचार । यथातथ्य ॥ ७ ॥ मनुष्य राजी राखणें । हींचि भाग्याचीं लक्षणें । कठिणपणें दुरी धरणें । कांहीं एक ॥ ८ ॥ समयीं मनुष्य कामा येतें । तयाकारणें सोशिजे तें । न्याय सांडितां मग तें । सहजचि खोटें ॥ ९ ॥ न्यायसीमा उल्लंघूं नये । उल्लंघितां होतो अपाय । न्याय नसतां उपाय । होईल कैंचा ॥ १० ॥ उपाधीस जो कंटाळला । तो भाग्यापासून चेवला[5] । समयीं धीर सांडिला । तोही खोटा ॥ ११ ॥ संकटीं कंटाळों नये । करावे अत्यंत उपाये । तरी मग पाहतां काये । उणे आहे ॥ १२ ॥ बंध बांधावे नेटके । जेणें करितां चतुर तुके । ताव न होतां फिके । कारभार होती ॥ १३ ॥ धुरेनें युद्धासी जाणें । अशीं नव्हेत कीं राजकारणें । धुरा[6]च करोनि सोडणें । कित्येक लोक ॥१४॥ उदंड मुंडें असावीं । सर्वही एक न करावीं । वेगळालीं कामें द्यावीं । सावधपणें ॥ १५ ॥ मोहरा पेटला अभिमाना । मग तो जिवास पाहेना । मोहरे मिळवूनि नाना । वरी चपेटे करी ॥ १६ ॥ देखोनि व्याघ्राचा चपेटा । मेंढरें पळती बारा वाटा । मस्त जो तो रेडा मोठा । काय करावा ॥ १७ ॥ रायांनीं करावे राजधर्म । क्षत्रीं करावे क्षात्रधर्म । ब्राह्मणीं करावे स्वधर्म । नाना प्रकारें ॥ १८ ॥ तुरंग शस्त्र आणि स्वार । पहिला पाहावा विचार । निवट्टे जातां थोर थोर । शत्रु पळती ॥ १९ ॥ ऐसा प्रपंचाचा विवेक । स्वल्प बोलिलों कांहींएक । एका मनोगतें स्वामी सेवक । असतां वरें ॥ २० ॥

## ( ३ ) क्षात्रधर्म.

अल्पस्वल्प संसारधर्म । मागां बोलिलों राजधर्म । आतां ऐका क्षात्रधर्म । परम दुर्लभ जो ॥१॥ जयास जिवाचें वाटे भये । त्यानें क्षात्रधर्म करूं नये । कांहीं तरी करूनि उपाये । पोट भरावें ॥ २ ॥ विन्मुख मरणीं नर्क होती । वांचून येतां मोठी फजिती । इहलोक परलोक जाती । पहाना कां

१ कुचर, कामास अयोग्य. २ श्रेष्ठ. ३ हेकट. ४ पाठराखपण. ५ ढोलतो. ६ पुढारी. ७ वीरश्रीचा पुरुष.

॥३॥ मारितां मारितां मरावें। तेणें गतीस पावावें। फिरोन येतां भोगावें। महद्भाग्य ॥ ४ ॥ नजर करारी राखणें। कार्य पाहुनि खतल करणें। तेणें रणशूरांचीं अंतःकरणें। चकित होती ॥ ५ ॥ जैसा भांड्यांचा गलोला[1]। निर्भय भारामध्यें पडिला। तैसा क्षत्री रिचवला[2]। परसैन्यामध्यें ॥ ६ ॥ निःशंकपणें भार फुटती। परिवीरांचे तवके[3] तुटती। जैसा बळिया घालूनि घेती। भेरी[4] उठतां ॥ ७ ॥ ऐसे अवघेच उठतां। परदळाची कोण चिंता। हरणें लोळवी चित्ता। देखत जैसा ॥ ८ ॥ मर्दे तकवा[5] सोडूं नये। म्हणजे प्राप्त होतो जय। कार्य प्रसंग समय। ओळखावा ॥ ९ ॥ कार्य समजेना अंतरें। तें काय झुंजेल विचारें। युद्ध करावें खबरदारें। लोक राजी राखतां ॥ १० ॥ दोन्ही दळें एकवटें। मिसळताती लखलखाटें। युद्ध करावें खणखणाटें। सीमा सांडुनी ॥ ११ ॥ देवमात्र उच्छेदिला। जित्यापरीस मृत्यु भला। आपुला स्वधर्म बुडविला। ऐसें समजावें ॥ १२ ॥ मराठा तितका मेळवावा। आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा। येविषयीं न करितां तकवा। पूर्वज हांसती ॥ १३ ॥ मरणहाक तो चुकेना। देह वांचवितां वांचेना। विवेक होऊनि समजाना। काय करावें ॥ १४ ॥ भले कुळवंत म्हणावें। तेंहीं वेगीं हजीर व्हावें। हजीर न होतां कष्टावें। लागेल पुढें ॥ १५ ॥ एक जाती दोन जाती पावला। तो कैसा म्हणावा भला। तुम्हां सकळांस कोप आला। तरी क्षमा केली पाहिज ॥ १६ ॥ देवद्रोही तितुके कुत्ते। मारूनि घालावे परते। देवदास पावती फत्ते। यदर्थीं संशय नाहीं ॥ १७ ॥ देव मस्तकीं धरावा। अवघा हलकल्लोळ करावा। मुलुखबडवा कां बुडवावा। धर्मसंस्थापनेसाठीं ॥ १८ ॥ विवेक विचार सावधपणें। दीर्घ प्रयत्न केलाचि करणें। तुळजावराचेनि गुणें। रामें रावण मारिला ॥ १९ ॥ अहो हे तुळजा भवानी। प्रसिद्ध रामवरदायिनी। रामदास ध्यातो मनीं। यन्निमित्त ॥ २० ॥

## ( ४ ) सेवकधर्म. ( समास १ ला )

ऐका प्रपंचविचार। आपली करणी उतरे पार। येथें नाहीं उत्तर। श्रेष्ठांकडे ॥१॥ पूर्वीं दरिद्रें पीडिले। ते समर्थें अंगीकारिले। शिकवुनि शिकवूनि शहाणे केले। नाना प्रकारें ॥ २ ॥ पहिला होता लाचार[6]। श्रेष्ठीं वाढवोनि केला थोर। या वचनीं अनादर। होतां बरवें नव्हे ॥ ३ ॥ जो आपुलें हित न करी। तो आपुला आपण वैरी। येथें कांहीं कोणावरी।

---

१ तोफेचा गोळा. २ शिरला. ३ धीर गळतो. ४ नगारा वाजतांचे. ५ तणावा. ६ गरीब, निराधार.

शब्द नाहीं ॥ ४ ॥ श्रेष्ठांचें मनोगत राखेना । बळेंच करी वलगना । युक्ति प्रयुक्ति नाना । प्रकारें करी ॥ ५ ॥ श्रेष्ठांचें केलें मोडावें । आपुलेंचि पुढें प्रतिष्ठावें । तरी मग लागे भ्रष्टावें । वैभवापासुनि ॥ ६ ॥ पुढें पुढें काम करी । मागें कांहींच न करी । कार्यातें नासतां उरी । कांहींच पुढें ॥ ७ ॥ उगाच गर्वें मेला । मागील दिवस विसरला । स्वार्थचि करूं लागला । म्हणजे गेलें ॥ ८ ॥ वडिलांस बुद्धि शिकवी । युक्तिबळें जाणीव दावी । तया मूर्खासी पदवी । प्राप्त कैंची ॥ ९ ॥ जो सदांचा चोरटा । जो सदांचा कळकटा । कठिण शब्दें बारा वाटा[3] । मनुष्यें केलीं ॥ १० ॥ आपला इतबार[4] राखावा । मग तो सर्व धणी जाणावा । उदंड वैभवाचा हेवा । करूं नये ॥ ११ ॥ कार्य करितां कांहीं न मागे । तयाचि चिंता प्रभूस लागे । ऐसें जाणूनि विवेक जागे । म्हणिजे बरें ॥ १२ ॥ आपणास जपूं लागला । श्रेष्ठांचे मनींचा उतरला । येणें कोण स्वार्थ जाला । विचारावा ॥ १३ ॥ स्वामींनीं जें जें बोलावें । तेंचि सेवकीं प्रतिष्ठावें । वेळ चुकवूनि बोलावें । विनीत होऊनी ॥ १४ ॥ श्रेष्ठांपुढें शहाणपण । हेंचि केवळ मूर्खपण । मूर्खपणें नागवण[5] । आली घरा ॥ १५ ॥ कळेल तरी सांगूं नये । वडिलांसी बुद्धि शिकवूं नये । नेणपणेंचि उपाय । विवेकीं करावा ॥ १६ ॥ पुढें पुढें निघूं नये । आज्ञेवेगळें वर्तूं नये । न मानितां अपाय । नेमस्त आहे ॥ १७ ॥ आधीं वडिलांसी पुसावें । किंवा आपणचि करावें । समय पाहूनि वर्तावें । विवेकी पुरुषें ॥ १८ ॥ आधीं निश्चय करितो । मग उगेंचि पुसतो । इतका विचार करी तो । शहाणा कैंचा ॥ १९ ॥ मी करितां ऐसें पुसणें । तें पुसणें न पुसणें । करूं न करूं हें विचारणें । हें उत्तमोत्तम ॥ २० ॥ मी शहाणा ऐसें कळलें । तरी स्वतंत्र पाहिजे केलें । स्वतंत्र होतां मिरवलें । न शहाणपण ॥ २१ ॥ हें मनींचें मनीं समजावें । प्रकट कासया करावें । घेऊं ये तरी घ्यावें । चातुर्यासी ॥ २२ ॥ न्याय मानील तो न्यायी । न्याय न मानील तो अन्यायी । दगलबाज चिंडाई । सुटेल कैसी ॥ २३ ॥ ज्याचे अंतरीं स्वार्थबुद्धि । तेथें कैंची असेल शुद्धि । बुद्धि सांडितां अवधि । दुःखासी होय ॥ २४ ॥ ज्याकरितां प्राणी वाढले । त्यासीच अडवूं लागले । ते कैसे म्हणावे भले । नीतिवंत ॥ २५ ॥ सेवकीं सेवाचि करावी । स्वामी आसूदकी[6] द्यावी । तरीच पाविजे पदवी । कांहींएक ॥ २६ ॥ समर्थांचें मनोगत । तैसेंचि वर्तणें उचित । तेथें चुकतां आघात । नेमस्त आहे ॥ २७ ॥ सेवक तोचि अडेना । शब्द भुईस[7] पडेना । काम चुकलें हें

१ प्रौढीचीं भाषणें. २ शहाणपण. ३ हाकून दिलीं. ४ बुडवणूक. ५ हलकेपण. ६ विशेष श्रमाशिवाय बक्षिसी. ७ तत्काळ काम फत्ते करून दाखवितो.

घडेना । कदाकाळीं ॥ २८॥ उंच अश्व वेळेस अडे । तरी पादछेदन करणें घडे । ऐसें कळोनियां वेडें । अडोंचि लागे ॥ २९ ॥ मनोगत राखतां श्रेष्ठ वोळे । मनोगत चुकतां खवळे । ऐसें जयासी न कळे । तो जाणता कैसा ॥ ३० ॥ स्वामीस जें अवश्य व्हानें । तैसें सेवकें न व्हावें । होऊनी अड-वावें । कोण्या विचारें ॥ ३१ ॥ आपस्वार्थ उदंड करणें । आणि स्वामि-कार्य बुडविणें । ऐसीं नव्हेत कीं लक्षणें । सेवकाचीं ॥ ३२ ॥ सेवक-पणाचें मुख्य धर्म । कांहीं नसावें कृत्रिम[1] । कृत्रिम केलिया संभ्रम[2] । कैंचा पुढें ॥ ३३ ॥ धन काजीं जितुका सावधान । सर्वकाळ परिछिन्न । त्यासी चोरितां निदान । बरें नव्हे ॥ ३४ ॥ थोडी बहूत लालुच करणें । आणि महत्कृत्य बुडविणें । महत्व जातां लाजिरवाणें । जनांमध्यें ॥ ३५ ॥ ऐसें बहुत ऐकिलें । कांहीं दृष्टीस देखिलें । देखत ऐकत चुकलें । तें मनुष्य कैसें ॥ ३६ ॥ कार्य करितां उदंड देतो । चुकतां तो महत्त्व घेतो । ऐसें कळोनि वर्ते तो । प्राणी कैसा ॥ ३७ ॥ सेवक विश्वास दाविती । वैरियाकडे मिळोनि जाती । त्या चांडाळांसी[3] गति । कोठेंचि नाहीं ॥ ३८ ॥ सकळ लोक स्वामियाचे । मागें पुढें अवज्ञेचे । सेवक उगेचि मूर्ख नाचे । शब्द बोले ॥ ३९ ॥ धूर्तपणें अंतरसाक्षी । नानाप्रकारें परीक्षी । दूरी गेला परी लक्षी । सर्व कांहीं ॥ ४० ॥ म्हणोनि ऐसें न करावें । करणें ते नेमस्त करावें । नानाकारणें धरावें । अंतर प्रभूचें ॥ ४१ ॥ इति प्रथमः समासः ॥१॥

## ( ५ ) सेवकधर्म. ( समास २ रा )

सुचित्त करूनि अंतःकरण । आतां करावें राजकारण । प्रमाण आणि अप्रमाण । समजलें पाहिजे ॥ १ ॥ आकल म्हणजे कल नाहीं । अन्या-याचा साभिमान नाहीं । न्याय नीति समर्थ पाहीं । आप्त आणि परावे ॥ २ ॥ किती चुकती चांचू घेती । पदरीं घालितां न घेती । अन्याय करूनि म्हणती । अन्याय नाहीं ॥ ३ ॥ उदंड हांसती दुसऱ्यासी । तोचि गुण आपल्यापाशीं । अखंड वर्णिती आपल्यासी । समर्थादेखतां[4] ॥ ४ ॥ मागील दिवस विसरती । उगेचि तालदारी[5] आणिती । अखंड चुकती लालुची करिती । परम अन्यायी ॥ ५ ॥ आपणावेगळें कार्य न व्हावें । अवघें आपणचि असावें । आपलें केलें न मोडावें । ऐशी वासना ॥ ६ ॥ व्याप आटोप करावा । समर्थ वेळेस आडवावा । आपुला हेका वाढ-वावा । अत्यादरें ॥ ७ ॥ स्वयें आपणासी कळेना । समर्थें सांगितलें ऐकेना । सत्य असलें तरी मानेना । अभिमानें ॥ ८ ॥ वैरियाकडे सख्य

१ खोटेपण, ढंग. २ वैभव. ३ फितूर लोकांस. ४ धण्यासमोर, श्रेष्ठापुढें. ५ डौल.

लावी। समर्थांचें काम बुडवी। व्यर्थ लालुच उठाठेवी। उद्दंड करी ॥ ९ ॥ इष्ट मित्र शरीरसंबंधी । व्यापकपणें सूत्रें साधी । वैरीवरी हिताळू कुबुद्धि। अंतरीं वसे ॥ १० ॥ आज्ञेप्रमाणें असतां । बहुत दुःख वाटे चित्ता। आपले इच्छेनें वर्ततां । बरें वाटे ॥ ११ ॥ आपले अवगुण लपवी। श्रेष्ठापुढें जाणीव दावी। धीटपणेंचि दटावी । कोणी एकासी ॥ १२ ॥ जें समर्थासी पाहिजे। तें आपणासि न पाहिजे । आपणासी मानेल तें कीजे। कांहीं एक ॥१३॥ काम सांगतांचि अडे। मिसें[1] करूनि वेळेसी दडे। कुकर्मीं आदरें पवाडे। नाना यत्नें ॥ १४ ॥ समर्थां अडानी ताल केला। गव लेखीना कोणाला। काम नासूनिं उडाला। एकीकडे ॥ १५ ॥ जें पाहिजे समर्थासी। त्यासी करणें वरकसी । त्याची गोष्टी हरीकसी। हळु पाडी ॥ १६ ॥ आपले ठायीं वोठांणी आणिती। श्रेष्ठांसि मागें तुच्छ करिती। कठीण वेळेसि मिळोनि जाती। शत्रूकडे ॥ १७ ॥ समर्थासी बळेंचि करणें । मर्यादा सांडूनि चालणें। मना ऐसें न होतां करणें। अप्रमाद[3] ॥ १८ ॥ मज वेगळें काम न चाले । ऐसें मागें पुढें बोले। कित्येक लोकाचि ते फोडिले। आपणांकडे ॥ १९ ॥ समर्थांसि कांहीं कळेना। मी सांगतों ऐकेना। शहाणपण दाखवी जना । नाना-प्रकारें ॥ २० ॥ श्रेष्ठ समजोनि न पाहे। मजवेगळें कोण आहे। निकामी मिळवूनी काय हे। गळंगा अवघा ॥ २१ ॥ अवघें ढाळें[5] भाग्यें चालतें। येरवीं मुख्यास काय कळतें। आम्हां लोकांकरितां वळतें । सकळ कांहीं ॥ २२ ॥ आम्हांप्रमाणें काय जाणे । प्रभू होय परी कांहीं नेणे। आम्हांवेगळें कोण शहाणें। आहे येथें ॥ २३ ॥ पोटासाठीं सेवा करणें। उगेचि फुगती रिकामे। थोरपण दिधलें कोणें। समर्थासी ॥ २४ ॥ ऐसे प्रकारींचे लोक। त्यांस कैसा असेल विवेक। मूर्खपणें अविवेक। रक्षिती बळें ॥ २५ ॥ समर्थांसि सांडून सेवकजन । सेवकाकडे लाविती मन। ते जाणावे परम हीन। नीच काठीचे ॥ २६ ॥ ऐसें नेणतां चूक पडती। जाणते अवघेचि जाणती। निकामी आणि गर्व करिती। मूर्खपणें॥२७॥ सेवकजनावरी विश्वासिला। तो सेवकीं जेर केला । समर्थ पराधीन जाला। हेंही अपूर्व ! ॥ २८ ॥ कामाकारणें ठेविले। काम पाहूनि वाढविले। तेही उगेच गर्वें फुगले। कोण्या हिशोबें ॥ २९ ॥ याकारणें बदलीत जाणें। सेवक आज्ञेच्या गुणें। तरीच समर्थपण जाणे। समर्थासी ॥ ३० ॥ काम नासलें तरी नासावें। परी सेवकाधीन न व्हावें । दास म्हणे स्वभावें। बोलिलों न्याय ॥ ३१ ॥ न्याय अन्यायासी मानेना।

---

१ निमित्त. २ प्रतिष्ठा. ३ प्रमाद, चुकी. ४ घोंटाळा. ५ सहज.

विवेक अविवेक्या कळेना । पुण्यमार्ग आवडेना । पापी जनासी ॥ ३१ ॥ सेवक बहुतांसी असती । परी पाहों नये हे प्रचीती । तथापि हे क्षमा श्रोतीं । केली पाहिजे ॥ ३३ ॥ इति द्वितीयः समासः ॥ २ ॥

## ( ६ ) सावधताप्रकरण.

( राज्याच्या सनदा शिवबानें झोळींत टाकल्या तेव्हांचा उपदेश ).

कोणाचा भरंवसा न धरावा । आपुला आपण विचार पहावा । तकावा उदंड धरावा । हाही एक विषयीं ॥ १ ॥ देहदुःखें कदरों नये । उदंडचि करावे उपाय । मग सर्व सुखासी काय । उणें आहे ॥ २ ॥ एकांतीं चाळणा करावी । धारणा उदंड धरावी । नाना विचारणा करावी । अरिमित्रांची ॥ ३ ॥ प्रयत्नीं चुकों नये । सुखवासी कामा नये । सुचावे नाना उपाय । अनेक विषयीं ॥ ४ ॥ धुरेनें धीर सोडूं नये । मुख्य प्रसंग चुकों नये । उद्योगरहित कामा नये । पशू जैसे ॥ ५ ॥ उपाधीस कंटाळला । विचाराचा आळस आला । म्हणजे जाणावा चेवला । बुद्धीपासूनी ॥ ६ ॥ खबरदारी आणी वेगीं । तेणें सामर्थ्य चढे अंगीं । नानाप्रसंगीं कार्यभागीं । अंतरचि न पडे ॥ ७ ॥ कार्यकर्ते दूरी करावे । प्रसंगें सवेंचि हातीं धरावे । परंतु शोधोनि पाहावे । कपटाविषयीं ॥ ८ ॥ जेथें बहु विचार । तेथें ईश्वरअवतार । मागें जाले थोर थोर । धके चपेट सोसोनी ॥ ९ ॥ आपल्या मनासी रोधावें । परांतर शोधावें । क्षणक्षणां सांभाळावें । बदलेल म्हणुनी ॥ १० ॥ पाहिलेंचि पाहावें । केलेंचि करावें । शोधिलेंचि शोधावें । राज्यकारण ॥ ११ ॥ इशारतीचें बोलतां नये । बोलायाचें लिहूं नये । लिहावयाचें सांगूं नये । जबाबीनें ॥ १२ ॥

---

## ( ७ ) अफझुलखानास प्रतापगडीं मारून यशस्वी होऊन आले तेंव्हां शिवरायाचे गुणगौरव केलें ( दासबोध द० १८ स० ६ ).

---

## ( ८ ) धूर्तपणाचें राजकारण ( दासबोध द० १९ स० ९ ).

---

## ( ९ ) संभाजीस पत्र.

( शके १६०३ मध्यें पौषमासीं पाठविलेलें )

अखंड सावधान असावें। दुश्चित कदापि नसावें। तजविजा करीत बसावें। एकांत स्थळीं ॥ १ ॥ कांहीं उग्र स्थिति सांडावी। कांहीं सौम्यता धरावी। चिंता लागावी परावी। अंतर्यामीं ॥ २ ॥ मागील अपराध क्षमावे। कारभारी हातीं धरावे। सुखी करूनि सोडावे। कामाकडे ॥ ३ ॥ पाट[1]वणी तुंब निघेना। तरी मग पाणी चालेना। तैसें सज्जनांच्या मना। कळलें पाहिजे ॥ ४ ॥ जनाचा प्रवाह चालिला। म्हणजे कार्यभाग आटोपला। जन ठायीं ठायीं तुंबला। म्हणजे खोटें ॥ ५ ॥ श्रेष्ठीं जें जें मिळविलें। त्यासाठीं भांडत बसलें। मग जाणावें फावलें। गलिमांसी[2] ॥ ६ ॥ ऐसें सहसा करूं नये। दोघे भांडतां तिसऱ्यासी जय। धीर धरोन महत्कार्य। समजून करावें ॥ ७ ॥ आधींच पडला धास्ती। म्हणजे कार्यभाग होय नास्ती। याकारणें समस्तीं। बुद्धि शोधावी ॥ ८ ॥ राजी राखितां जग। मग कार्यभागाची लगबग। ऐसें जाणोनियां सांग। समाधान राखावें ॥ ९ ॥ सकळ लोक एक करावे। गलीम निवटून काढावे। ऐसें करितां कीर्ति धांवे। दिगंतरीं ॥ १० ॥ आधीं गाजवावे तडाके। मग भूमंडळ धाके। ऐसें न होतां धक्के। राज्यास होती ॥ ११ ॥ समय प्रसंग ओळखावा। निपटून काढावा। आला तरी कळों न द्यावा। जनांमध्यें ॥ १२ ॥ राज्यामध्यें सकळ लोक। सलगी देऊन करावे सेवक। लोकांचे मनामध्यें धाक उपजोंचि नये ॥ १३ ॥ बहुत लोक मिळवावे। एक विचारें भरावे। कष्टें करोनि घसरावें। म्लेंच्छावरी ॥ १४ ॥ आहे तितुकें जतन करावें। पुढें आणिक मिळवावें। महाराष्ट्रराज्य करावें। जिकडे तिकडे ॥ १५ ॥ लोकीं हिंमत धरावी। शर्तीची तरवार करावी। चढती वाढती पदवी। पावाल येणें ॥ १६ ॥ शिवराजास आठवावें। जीवित्व तृणवत् मानावें। इहलोकीं परलोकीं राहावें। कीर्तिरूपें ॥ १७ ॥ शिवरायाचें आठवावें रूप। शिवरायाचा आठवावा प्रताप। शिवरायाचा आठवावा साक्षेप। भूमंडळीं ॥ १८ ॥ शिवरायाचें कैसें चालणें। शिवरायाचें कैसें बोलणें। शिवरायाची सलगी देणें। कैसें असे ॥ १९ ॥ सकळ सुखांचा त्याग।

---

१ तुंबलेल्या पाण्यास पाट फोडला नाहीं तर. २ शत्रूंस.

करूनि साधिजे तो योग । राज्यसाधनाची लगबग । कैसी असे ॥२०॥
त्याहूनि करावे विशेष । तरीच म्हणावे पुरुष । याउपरी आतां विशेष ॥
काय लिहावें ॥ २१ ॥

## ( १० ) आनंदवनभुवन. *

जन्मदुःखें जरादुःखें । नित्य दुःखें पुनः पुन्हाः ।
संसार त्यागणें, जाणें । आनंदवनभुवना ॥ १ ॥
वेधलें चित्त जाणावें । रामवेधीं निरंतरीं ।
रागें हो वीतरागें हो । आनंदवनभुवना ॥ २ ॥
संसार वोढितां दुःखें । ज्याचें त्यासीच ठाउकें ।
परंतु येकदां जावें । आनंदवनभुवना ॥ ३ ॥
न सोसे दुःख तें होतें । दुःख शोक परोपरी ।
येकाकी येकदां जावें । आनंदवनभुवना ॥ ४ ॥
कष्टलों कष्टलों देवा । पुरे संसार जाहला ।
देहत्यागासि येणें हो । आनंदवनभुवना ॥ ५ ॥
जन्म ते सोसिले मोठे । अपाय बहुतांपरीं ।
[१]उपायें धाडिलें देवें । आनंदवनभुवना ॥ ६ ॥
[२]स्वप्नीं जें देखिलें रात्रीं । तें तें तैसेंची होतसे ।
हिंडतां फिरतां गेलों । आनंदवनभुवना ॥ ७ ॥

---

* श्रीशिवाजीमहाराजांचा अवतार संपत आला, परंतु धर्मस्थापनेचें कार्य अजून बरेंच अपूर्ण राहिलें आहे, तें कसें पूर्ण व्हावें असा प्रश्न शके १६०१ माघ शु. १५ स उद्धवस्वामींनीं केल्यावरून श्रीसमर्थ म्हणाले कीं, “ शिवबाहि आतांच पूर्व स्थळास जातो असें घडत नाहीं. पुन्हां याच कुलांत उत्पन्न होऊन म्लेंच्छांचें निवारण करून कांहीं दिवस ऐश्वर्य भोगून पुनरपि ब्राह्मण जन्म घेऊन बद्रिकाश्रमीं योगसाधन करून नंतर पूर्व स्थळास जाईल. यांत संशय नाहीं. आणि श्रीनींहि नाशिकापासून करवीरपर्यंत राहण्याचें सांगितलें आहे. यास्तव या स्थानास ‘ आनंदवन भुवन ’ असें नांव दिलें आहे. आणि सांप्रत श्रीनीं पंचवटींत वास्तव्य धरिलें आहे. यास्तव या स्थानाचें आम्ही पूर्वीच वर्णन करून ठेविलें आहे. + + + हें निःसंशय होणार यांत संशय नाहीं. हें ऐकणार ऐकतील व पाहाणार पाहातील + + + तें ऐक. ”—हनुमंतस्वामींकृत श्रीसमर्थचरित्र. १ परराज्यजन्य सर्व अपायांवर देवानें उपाय धाडिले आहेत. २ पुढें होणाऱ्या गोष्टी समर्थांना पंचवटीस तपश्चर्येंत असतांनाच स्वप्नांत दिसल्या होत्या तसतशाच घडत आल्याचें ते सांगत आहेत.

हे साक्ष देखिली दृष्टी । किती कल्लोळ[1] उठिले ।
विघ्नघ्ना प्रार्थिलें गेलों । आनंदवनभूवना ॥ ८ ॥
स्वधर्माआड जें विघ्नें । तें तें सर्वत्र उठीलीं ।
लाटिलीं कुटिलीं देवें । दापिलीं कापिलीं बहू ॥ ९ ॥
विघ्नाच्या उठिल्या फौजा[2] । भीम[3] त्यावरी लोटला ।
घर्डिलीं चिर्डिलीं रागें । रडविलीं बडविलीं बळें ॥ १० ॥
हाकिलीं टांकिलीं तेणें । आनंदवनभुवनीं ।
हांकबोंब बहू जाली । पुढें खतल्ल[4] मांडिलें ॥ ११ ॥
खोळले[5] लोक देवाचे । मुख्य देवची उठीला ।
कळेना काय रे होतें । आनंदवनभुवनीं ॥ १२ ॥
स्वर्गींची लोटली जेथें । रामगंगा महानदी ।
तीर्थासि तुळणा नाहीं । आनंदवनभुवनीं ॥ १३ ॥
ग्रंथीं जे वर्णिली मागें । गुप्तगंगा महानदी ।
जळांत रोकडे प्राणी । आनंदवनभुवनीं ॥ १४ ॥
सकळ देवची साक्षी । गुप्त ऊदंड भूवनें ।
सौख्यचिपावणें जाणें । आनंदवनभुवना ॥ १५ ॥
त्रैलोक्य चालिलें तेथें । देव गंधर्व मानवी ।
ऋषी मुनी महायोगी । आनंदवनभुवनीं ॥ १६ ॥
अक्का अक्का बहु आक्का । काय अक्का[6] कळेचिना ।
गुप्त तें गुप्त जाणावें । आनंदवनभुवनीं ॥ १७ ॥
त्रैलोक्य चालिल्या फौजा । सौख्य बंदविमोचनें ।
मोहीम मांडली मोठी । आनंदवनभुवनीं ॥ १८ ॥
सुरेश उठिला आंगें । शूरसेना परोपरी ।
विकटें कर्कशें यानें । शस्त्रपाणी महाबळी ॥ १९ ॥
देव देव बहू देव । नाना देव परोपरीं ।
दाटणी[7] जाहाली मोठी । आनंदवनभुवनीं ॥ २१ ॥
दिग्पती चालिले सर्वै । नाना सेना परोपरीं ।
वेष्टीत चालिले सकळै । आनंदवनभूवनीं ॥ २१ ॥
मंगळें वाजती वाद्यें । महागणासमागमें ।
आरंभीं चालिला पुढें । आनंदवनभुवनीं ॥ २२ ॥

---

१ धामधुमी. २ अनेक विघ्नें. ३ मारुतिराय. ४ कत्तली. ५ संतापले. ६ तें ' अक्कांचें ' गूढच आहे. ७ गर्दी.

राशभें राखिलीं मागें । तेणें रागेंची चालिलों[1] ।
सर्वत्र पाठीसीं फौजा । आनंदवनभुवनीं ॥ २३ ॥
अनेक वाजती वाद्यें । ध्वनीकल्लोळ उठीला ।
छबीनें डोलती ढाला । आनंदवनभूवनीं ॥ २४ ॥
विजई दीस जो आहे । ते दीसीं सर्व ऊठती[2] ।
अनर्थ मांडला मोठा । आनंदवनभूवनीं ॥ २५ ॥
देवची तुष्टला होता । त्याचे भक्तीस भुलला ।
मागुता क्षोभला दुखें । आनंदवनभुवनीं ॥ २६ ॥
कल्पांत मांडला मोठा । म्लेंच्छदैत्य बुडावया ।
कैपक्ष[3] घेतला देवीं । आनंदवनभूवनीं ॥ २७ ॥
बुडाले सर्व ही पापी । हिंदुस्थान[4] बळावलें ।
अभक्तांचा क्षयो जाला । आनंदवनभुवनीं ॥ २८ ॥
पूर्वीं[5] जे मारिले होते । तेचि आतां बळावले ।
कोपला देव देवांचा । आनंदवनभुवनीं ॥ २९ ॥
त्रैलोक्य गांजिलें मागें । ठाउकें विवेकीं जना ।
कैपक्ष घेतला रामें । आनंदवनभूवनीं ॥ ३० ॥
भीमची धाडिला देवें । वैभवें धांव घेतली ।
लांगूळ[6] चालिलें पुढें । आनंदवनभूवनीं ॥ ३१ ॥
येथून वाढला धर्मु । रमा[7]धर्म समागमें ।
संतोष मांडला मोठा । आनंदवनभुवनीं ॥ ३२ ॥
बुडाला औरंग्या पापी । म्लेंच्छसंहार जाहला ।
मोर्डलीं मांडलीं क्षेत्रें । आनंदवनभुवनीं ॥ ३३ ॥
बुडाले भेदवांही[9] ते । नष्ट चांडाळ पातकी ।
ताडिले पाडिले देवें । आनंवनभूवनीं ॥ ३४ ॥
गळाले पळाले मेले । जाले देशधडी पुढें ।
निर्मळ जाहाली पृथ्वी । आनंदवनभुवनीं ॥ ३५ ॥
उदंड जाहलें पाणी । स्नान संध्या करावया ।
जप तप अनुष्ठानें । आनंदवनभुवनीं ॥ ३६ ॥

---

१ गणेश 'गाढवें वळीं' ( लघुराम चरित्र १५ ). २ विजयादशमीच्या मुहूर्तानें मराठ्यांच्या फौजा मुलुखगिरीस बाहेर पडत. ही पद्धत शिवबांच्या वेळींही होती असें यावरून स्पष्ट होतें. ३ बाजू, कैवार. ४ हिंदु संस्कृतीचा विजय झाला. ५ रामावतारांतले राक्षस ६ मराठ्यांचा राज्यविस्तार होत चालला. ७ लक्ष्मीचें ऐश्वर्य. ८ मोडलेलीं क्षेत्रें पुन्हां उभारलीं. ९ फितवेखोर.

नाना तपें पुरश्चरणें । नानाधर्म परोपरीं ।
गाजली भक्ति हे मोठी । आनंदवनभुवनीं ॥ ३७ ॥
लिहिला प्रत्ययो आला[१] । मोठा आनंद जाहाला ॥
चढता वाढता प्रेमा । आनंदवनभुवनीं ॥ ३८ ॥
बंड पाषांड उडालें । शुद्ध अध्यात्म वाढलें ।
राम कर्ता राम भोक्ता । आनंदवनभुवनीं ॥ ३९ ॥
देवालयें दीपमाळा । रंगमाळा बहूविधा ।
पूजिला देव देवांचा । आनंदवनभुवनीं ॥ ४० ॥
रामवरदायिनी माता । गर्द[२] घेउनी उठिली ।
मार्दिले पूर्विचे पापी । आनंदवनभुवनीं ॥ ४१ ॥
प्रत्यक्ष चालिली राया । मूळमाया समागमें ।
नष्ट चांडाळ ते खाया[३] । आनंवनभुवनीं ॥ ४२ ॥
भक्तांसी रक्षिलें मागें । आतांही रक्षिते पहा ।
भक्तांसी दीधलें सर्वै । आनंदवनभुवनीं ॥ ४३ ॥
आरोग्य जाहाली काया । वैभवें सांडिली सिमा ।
सार सर्वस्व देवाचें । आनंदवनभुवनीं ॥ ४४ ॥
देव सर्वस्व भक्तांचा । देव भक्त दुजें नसे ।
संदेह तुटला मोठा । आनंदवनभुवनीं ॥ ४५ ॥
देव भक्त एक जाले । मिळाले जीव सर्वहि ।
संतोष पावले तेथें । आनंदवनभूवनीं ॥ ४६ ॥
सामर्थ्ये यशकीर्तीचीं । प्रतापें सांडिली सिमा ।
ब्रीदेंचि दीधलीं सर्वै । आनंदवनभुवनीं ॥ ४७ ॥
राम कर्ता राम भोक्ता । रामराज्य भूमंडळीं ।
सर्वस्व मीच देवाचा । माझा देव कसा ह्मणों ॥ ४८ ॥
हेंचि शोधूनि पाहावें । राहावें निश्चळीं सदा ।
सार्थक श्रवणें होतें । आनंदवनभुवनीं ॥ ४९ ॥
वेद शास्त्र धर्मचर्चा । पुराणें महात्में किती ।
कवित्वें नूतनें जीर्णें । आनंदवनभुवनीं ॥ ५० ॥
गीत संगीत सामर्थ्यें । वाद्यकल्लोळ ऊठीला ।
मिळाले सर्व अर्थार्थी । आनंदवनभूवनीं ॥ ५१ ॥

---

१ ' संभवामि युगे युगे ' हें वचन खरें झालें. २ खड्ग. ३ दुष्टांचा संहार करण्याकरिता श्रीशिवरायाबरोबर मूळमाया भवानी प्रत्यक्ष चालली आहे.

वेद तो मंद जाणावा । सिद्ध आनंदवनभुवनीं ।
अतुळ महिमा तेथें । आनंदवनभुवनीं ॥ ५२ ॥
मनासी प्रचीत आली । शब्दीं विश्वास वाटला।
कामना पुरती सर्वै । आनंदवनभुवनीं ॥ ५३ ॥
येथुनी वांचती सर्वै । ते ते सर्वत्र देखती ।
सामर्थ्य काय बोलावें । आनंदवनभुवनीं ॥ ५४ ॥
उदंड ठेविलीं नामें । आपस्तुतीच मांडिली ।
ऐसें हें बोलणें नाहिं । आनंवनभुवनीं ॥ ५५ ॥
बोलणें वाउगें होतें । चालणें पाहिजे बरें ।
पुढें घडेल तें खरें । आनंदवनभुवनीं ॥ ५६ ॥
स्मरलें लिहिलें आहे । बोलता चालता हरी ।
काय होईल पाहावें । आनंदवनभुवनीं ॥ ५७ ॥
महिमा तो वर्णवेना । विशेष बहुतांपरीं ।
विद्यापीठ तें आहे । आनंदवनभुवनीं ॥ ५८ ॥
सर्वसद्या कळा विद्या । न भूतो न भविष्यति ।
वैराग्य जाहालें सर्वै । आनंदवनभुवनीं ॥ ५९ ॥

# ( २३ ) प्रासंगिक प्रकरणें.

## १ भूत लागलें !

( समर्थ घर सोडून गेले ते शके १५६६ त जांबेस मातोश्रींस व बंधूस भेटावयास आले, तेव्हां ' बाळा ! तुला कोणतें भूत लागलें रे ' असें आईनें विचारलें त्यास उत्तर )

### पद.

होतें वैकुंठींचे कोनीं । शिरलें अयोध्याभुवनीं । लागे कौसल्येचे स्तनीं । तेंचि भूत गे माय ॥ १ ॥ जातां कौशिकराउळीं[1] । अवलोकितां भयंकोळी[2] । ताटिका ते छळोनि[3] मेली । तेंचि० ॥ २ ॥ मार्गी जातां वनांतरीं । पाय पडला दगडावरी । पाषाणांची[4] जाली नारी । तेंचि

१ विश्वामित्राचे आश्रमांत. २ भयंकर. ३ रामाला छळल्यामुळें. ४ ' अहल्या शिळा राघवें मुक्त केली ' ( मनोबोध ).

भूत० ॥ ३ ॥ जनकाचे अंगणीं गेलें । शिवाचें धनु भंगिलें । वैदेहीअंगीं संचरलें । तेंचि भूत० ॥ ४ ॥ जेणें सहस्रार्जुन वधिला । तोही[1] तत्काळचि भ्याला । धनु देऊनि देह रक्षिला । तेंचि भूत० ॥ ५ ॥ पितयाचे भाकेसी । कैकेयीचे वचनासी । मानुनि गेलें अरण्यासी । तेंचि भूत० ॥ ६ ॥ चौदा संवत्सर तापसी । अखंड हिंडे वनवासी । सांगातें भुजंग[2] पोसी । तेंचि भूत० ॥ ७ ॥ सुग्रीवाचें पालन । वाळीचें निर्दालन । तारी पाण्यावरी पाषाण । तेंचि भूत० ॥ ८ ॥ रक्षी मरणीं बिभीषण । मारी रावण कुंभकर्ण । तोडी अमरांचें बंधन । तेंचि भूत गे० ॥ ९ ॥ वामांगीं स्त्रियेला धरिलें । धांवूनि शरयूतीरा आलें । तेथें भरतासी भेटलें । तेंचि भूत० ॥ १० ॥ सर्वां भूतांचें हृदय । नाम त्याचें रामराय । रामदास नित्य गाय । तेंचि भूत० ॥ ११ ॥

## २ संतांस आत्मचरित्र सांगितलें तें.

### अभंग.

नमो अधिष्ठाता विष्णु मुख्य साधु । तेथूनियां बोधु विधीलागीं[3] ॥ १ ॥
विधीपासुनियां ज्ञान विधिसुतां[4] । तेंचि ज्ञान प्राप्त वसिष्ठासी ॥ २ ॥
वसिष्ठें उपदेश केला रामचंद्रा । तोचि महारुद्रा हनुमंता ॥ ३ ॥
हनुमंत कलीमाजी चिरंजीव । जाले देव सर्व बौद्धरूप ॥ ४ ॥
बौद्ध नारायण होऊनी बैसला । उपाव बोलिला व्यास मुनी ॥ ५ ॥
व्यास मुनि बोले भविष्यपुराण । जग उद्धरणें कलीमाजी ॥ ६ ॥
कलीमाजी गोदातीरीं पुण्य क्षेत्र । तेथें वातपुत्र अवतरे ॥ ७ ॥
अवतरे अभिधानी रामदास । कृष्णातीरीं वास जगदुद्धारा ॥ ८ ॥
जगदुद्धारासाठीं श्रीरामा साकडें । केलें वाडेंकोडें भक्तिपंथें ॥ ९ ॥
भक्तिपंथें मोठा केला श्रीरामानें । जंबू[5] अभिधानें ग्राम तेथें ॥ १० ॥
तेथें ब्रह्मनिष्ठ अधिष्ठाता पूर्ण । सूर्यनामा जाण द्विजवर्य ॥ ११ ॥
द्विजवर्य सूर्य जैसा तपोधन । अद्भुत विद्वान जालें तेथें ॥ १२ ॥
जाली रामनवमी मध्य अष्टमीसी । अर्धरात्रीं त्यासी दूत आले ॥ १३ ॥
दूत आले पुढें घालोनि चालिले । महाद्वारां आले भीम जेथें ॥ १४ ॥
भीमदेवालयीं नेऊनी तयासी । तेथें उभयतांसी देखियेलें ॥ १५ ॥
देखियेलें राजपुत्र[6] सूर्यवंशी । झांपड नेत्रांसी पडे तेव्हां ॥ १६ ॥
पडे तेव्हां जसा दंडवत भूमी । मग अंतर्यामीं बोलाविलें ॥ १७ ॥

१ परशुराम. २ शेषमूर्ति लक्ष्मण. ३ ब्रह्मदेव. ४ नारद. ५ जांब. ६ राम.

बोलावूनि माथां ठेवी सव्य पाणि । मंत्र सांगे कर्णीं रामनाम ॥ १८ ॥
नाम सांगुनियां ताम्रमूर्ति रम्य । पट्टाभिश्रीराम दिधला तया ॥ १९ ॥
तया दिला वर तुज पुत्र होतील । ध्वज उभारतील रामदास्यें ॥ २० ॥
रामदास्य जालें धन्य वंशोद्धार । बोलोनि सत्वर गैब[1] जाले ॥ २१ ॥
जाला रामनवमीमहोत्सव थोर । मध्यान्हीं सत्वर जन्म जाला ॥ २२ ॥
जन्म जाला जाला देव वंशा आले । उपासना चाले राघवाची ॥ २३ ॥
राघवाची भक्ति सुखाची विश्रांति । पितयाची शांति[2] जाली पुढें ॥२४॥
पुढें ज्येष्ठ बंधु न सांगेचि कांहीं । सुखें देवालयीं निद्रा केली ॥ २५ ॥
निद्रा केली तेथें श्रीरामें उठवूनी । तोचि मंत्र कानीं सांगितला ॥ २६ ॥
सांगितला बोध रामीरामदासा । गुरूच्याही वंशा निरोपिलें ॥ २७ ॥

## ३ डफगाणें.

( चांफळामध्यें रामाचें देवालय बांधून उत्सव सुरू केला, तें वर्णन. )

भोंवता डोंगराचा फेर । मध्यें देवाचें शिखर । पुढें मंडप सुंदर । नव खणांचा ॥ १ ॥ चहुं खांबांवरी रचना । वर त्याच वीस कमाना । काम कटाव नयना । समाधान ॥ २ ॥ नाना तरु आंबे बनें । दोहींकडे वृंदावनें । वृंदावनें जगज्जीवनें । वस्ती केली ॥ ३ ॥ पुढें उभा कपिवर । पूर्वेकडे लंबोदर । खालीं दाटलें दरबार । ठायीं ठायीं ॥ ४ ॥ दमामे चौघडे वाजती । धडाके भांड्यांचे होती । फौजा भक्तां साजती । ठायीं ठायीं ॥ ५ ॥ महिमरातबे निशाणें । मेघडंबरें सूर्यपानें । पताका छत्र्या सुखासनें । दिंड्या विंझणे कुंचे ॥ ६ ॥ काहळें कर्णे बुरुंग बांकें । नानाध्वनीं गगन झांके । बहु वाद्यांचे धबके[3] । परोपरी ॥ ७ ॥ टाळ मृदंग उपांग । ब्रह्मविणे चुटक्या चंग । तानमानें माजे रंग । हरिकथेसी ॥ ८ ॥ घंटा घांटा शंख भेरी । डफडीं पांवे वाजंतरीं । भाट गर्जती नागरी । परोपकारी ॥ ९ ॥ उदंड यात्रेकरू आले । रंगीं हरिदास मिळाले । श्रोते वक्ते कथा चाले । भगवंताची ॥ १० ॥ नाना पुष्पमाळा तुरे । पाहों जातां भडस[4] पुरे । रंग स्वर्गींचा उतरे । ठायीं ठायीं ॥ ११ ॥ गंध सुगंध केशरें । उदंड उधळिती धूसरें[5] । जगदंतरीं हरिहरें । वस्ती केली ॥ १२ ॥ दिवट्या हिलाल चंद्रज्योती । नळे अरडत ऊठती । बाण हवाया झरकती । गगनामध्यें ॥ १३ ॥ उदंड मनुष्यांचे थाटे । दिसताती लखलखाटें । एकमेकांसी बोभाटें[6] । बोलाविती ॥ १४ ॥ उदंड उजळिल्या

१ गुप्त. २ मृत्यु. ३ थापा. ४ हौस. ५ अबीर, बुक्का वगैरे. ६ ओरडून.

दीपिका । नामघोष करताळिका । कित्येक म्हणती ऐका ऐका । ऐसे शब्द होती ॥ १५ ॥ खिरापतीची वांटणी । तेथें जाहलीसे दाटणी । पैस नाहीं राजांगणीं । दाटी जाहली ॥ १६ ॥ रंगमाळा निरांजनें । तेथें वस्ती केली मनें । दिवस उबावला सुमनें । कोमाइलीं ॥ १७ ॥ रथ देवाचा ओढिला । यात्रेकरां निरोप जाला । पुढें जावयाचा गलबला । ठायीं ठायीं ॥ १८ ॥ भक्तजन म्हणती देवा । आतां लोभ असूं द्यावा । धन्य सुकृताचा ठेवा । भक्ति तुझी ॥ १९ ॥ दास डोंगरीं राहतो । यात्रा देवाची पाहतो । देव भक्तासवें जातो । ध्यानरूपें ॥ २० ॥

## ४ पंढरीहून मातोश्रीस पत्र.

सकळ गुणांचा निधी । निर्गुणाची कार्यसिद्धी । विवेकाची दृढबुद्धि । तुझेनिं गुणें ॥ १ ॥ तूं भवसिंधूचें तारूं । तूं भक्तांचा आधारू । तूं अनाथाचे अवसरू । वैष्णवी मांया[1] ॥ २ ॥ तूं भावार्थाची जननी । तूं विरक्तां संजीवनी । तूं परमार्थाची खाणी । भजनशीळ ॥ ३ ॥ तूं सर्व सुखांची मूस । तूं आनंदरत्नांची मांदूस[3] । तुझेनि चुकती सायास । संसारींचे ॥ ४ ॥ तूं परमार्थाविषयीं अग्रगण्य । सद्गुरू दासाचें मंडण । समाधानाची खूण । अंतरीं वसे ॥ ५ ॥ सत्संगासी सादर । भक्तिमार्गासी तत्पर । धूर्त कुशळ अति सादर । परोपकारी ॥ ६ ॥ श्रीगुरुभजनीं तत्पर । स्वामिकृपा निरंतर । म्हणोनि शुद्ध क्रियेचा उद्धार । तुमचे ठायीं ॥ ७ ॥ आत्मचर्चेसीं मुगुटमणी । अत्यंत सादरता निरूपणीं । बोलणें अमृतवाणी । मृदुवचनीं ॥ ८ ॥ विवेकनिधि केवळ । अंतर शुद्ध निर्मळ । ज्ञानदीप प्रबळ । तुमचे ठायीं ॥ ९ ॥ क्रियाशुद्धि निर्मळ मन । निरभिमानी परम सज्जन । निरंतर अनुसंधान । अंतरीं वसे ॥ १० ॥ भावार्थाचें आगरू । प्रबळ शांतीचा सागरू । पाहतां उपमे मेरू । तोही उणा[4] ॥ ११ ॥

## ५ पंढरीहून श्रेष्ठांस पत्र.

सकळ तीर्थांचें माहेर । सकळ गुणांचें भांडार । सकळ विद्येचा सागर । स्वरूप तुमचें ॥ १ ॥ तूं धीरपणें मेरू । तूं उदारपणें जळधरू । तूं गंभीरपणें सागरू । पीयूषाचा ॥ २ ॥ तूं पवित्रपणें वैश्वानरू । तूं समर्थपणें ईश्वरू । तूं प्रतापाचा दिनकरू । धगधगायमान ॥ ३ ॥ तूं सकळ तीर्थांचें यश । तूं उंच आकाश । तूं मायेचा मूळपुरुष । सकळ-

१ गर्दी. २ मूळमाया. ३ पेटी. ४ प्रकरण अपुरें दिसतें.

कर्ता ॥ ४ ॥ तूं विष्णूचें मूलस्थान। तूं योगियांचें ध्यान। तूं वेदशास्त्रांचें मथन। सार वेदांताचें ॥ ५ ॥ तूं सकल सत्तेचा साक्षी । अनंत माया तुझे कुक्षीं। तुमचें निजरूप लक्षी । ऐसा कवणू ॥ ६ ॥ झंझावायूसि आकळावें। गगन ओलांडूनि जावें। महातेजासि आच्छादावें। कवणे परी ॥ ७ ॥ सप्त पाताळां तळवटीं। एकवीस स्वर्गांचे शेवटीं। पवांडा[1] करीन ऐशी पोटीं । हांव कैंची ॥ ८ ॥ वसुंधरा ही एकसरी। घालोनियां मस्तकावरी । अंतरिक्ष गमन करी । ऐसा कवण असे ॥ ९ ॥ आवर्णोदकाचा अंत । कैसा ध्यावा तो अद्भुत। तुमचे स्वरूपाचा निश्चितार्थ। कवण करी ॥ १० ॥

## ६ बागप्रकरण.

( परळीवर मठ स्थापन केला त्याप्रसंगीं सांगितलेलें. )

प्रसंग निघाला स्वभावें । बागेमध्यें काय लावावें। म्हणूनि घेतलीं नांवें। कांहींएक ॥ १ ॥ कांटी रामकांटीं फुलेंकांटी । नेपती सहमुळी कारमाटी । सावी चिलारी सागरगोटी । हिंवर खैर खरमाटी ॥ २ ॥ पांढरफळी करवंदी तरटी । आळवी तोरणी चिंचोरटी । सिकेकाई वाकेरी घोंटी। करंज विळस समुद्रशोक ॥ ३ ॥ अव्हाटी बोराटी हिंगणबेटी। विकळी टांकळी वाघांटी। शेर निवडुंग कारवेटी। कांटेशेवरी पांगेरे ॥ ४ ॥ निरगुडी येरंड शेवरी। कासवेद कासळी पेरारी। तरवड उन्हाळ्या कुसरी। शिबी तिव्हा अंबोटी ॥ ५ ॥ कांतुती काचकुहिरी सराटी। उतरणी गुळवेल चित्रकुटी। कडोची काटली गोमाटी। घोळ घुगरी विरभोटी ॥ ६ ॥ भोंस बरू वाळा मोळा। ऊंस कास देवनळा। लव्हे पानि पारोस पिंपळा। गुंज कोळसरे देवपाळा ॥ ७ ॥ वेत कळकी चिवारी। ताड माड पायरी पिंपरी। उंबरी अंबरी गंभिरी । अडुळसा मोही भोंपळी ॥ ८ ॥ साव सिसवे सिरस कुड । कोळ कुंभा धावडा मोड। काळकुडा भुता बोकडा। कुरंडी हिरंडी लोखंडी ॥ ९ ॥ विहाळ गिळी टेंभुरणी। अविट एणके सोरकिन्ही। घोळी दालचिनी। कबाबचिनी जे ॥ १० ॥ निंबारे गोडे निंब । नाना महावृक्ष तळंब । गोरक्षचिंच लातंब। परोपरीची ॥ ११ ॥ गोधनी शेलवंटी भोंकरी । मोहो बिब्बा रायबोरी। बेल फणस जांब भरी। चिंच अंबसोल अंबाडे ॥१२॥ चांफे चंदन रातांजन। पतंग मैलागर कांचन । पोपये खेलेले खपान। वट पिंपळ उंबर ॥ १३ ॥ आंबे निंबें साखरनिंबें । रेकण्या खरजूरी तुतें

[1] स्तुति.

दाळिंबें । तुरडे विडे नारिंगें । शेवे कविट अंजीरं सीताफळें ॥ १४ ॥ जांब अननस देवदार । सुरमे खासे मंदार । पांढरे जंगली लाल पुरे । उद्रे चित्रकीं ॥ १५ ॥ केळी नारळी पोफळी । आंवळी रायआंवळी जांभळी । कुणकी गुगुळी सालफळी । वेलफळी माहाळुंगी ॥ १६ ॥ भुईचांफे नागचांफे मोगरे । पारिजातक वटमोगरे । शंखासुर काळे मोगरे । सोनतरवड सोनफुले ॥ १७ ॥ जाई सखजाई पीतजाई । त्रिविध शेवती मालती जुई । पाडळी बकुळी अबई । नेवाळी केतकी चमेली ॥ १८ ॥ सूर्यकमळिणी चंद्रकमळिणी । जास्वनी हनुमंतजास्वनी । केशर कुसुंबी कमळिणी । बहुरंग निळयाती ॥ १९ ॥ तुळसी काळी त्रिसंदरी । त्रिसिंगी रायचचु रायपेटारी । गुलखत निगुलचिन कनेरी । नानाविध मखमाली ॥ २० ॥ काळा वाळा मरुवा नाना । कचोरे गवले दवणा । पाच राजगिरे नाना । हळदी करडी गुलटोप ॥ २१ ॥ वांगी चाकवत मेथी पोकळर । माठ शेपु खोळ बसळा । चवळी चुका वेल सबळा । अंबु जिरें मोहरी ॥ २२ ॥ कांदे मोळकांदे माईणमुळें । लसूण आलें रताळें । कांचन कारिजे माठमुळें । सुरण गाजरें ॥ २३ ॥ भोंपळे नानाप्रकारचे । लहान थोर पत्रवेलीचे । गळयाचे पेढ्या सांगडीचे । वक्र वर्तुळ लंबायमान ॥ २४ ॥ गंगाफळ काशीफळें क्षीरसागर । सुगरवे सिंगाडे देवडांगर । दुधे गंगारूढे प्रकार । किनऱ्या रुद्रविण्याचे ॥ २५ ॥ वाळक्या कांकड्या चिवड्या । कोहाळे सेंदण्या सेंदाड्या । खरबुजा तरबुजा कलंगड्या । द्राक्षी मिरवेली पानवेली ॥ २६ ॥ दोडक्या पारोशा पडवळया । चवळया कारल्या तोंडल्या । घेवड्या कुहिऱ्या खरसमुळ्या । वेली अळूचमकोरे ॥ २७ ॥ अठराभार वनस्पती । नामें सांगावीं किती । अल्प बोलिलों श्रोतीं । क्षमा केली पाहिजे ॥ १८ ॥ इति.

## ७ कारखानेप्रकरण (समास १ ला)

(सामनगडावर किल्ला बांधण्याचें काम चाललें होतें तेथें सांगितलेलें)

ऐका विटांचा प्रसंग । लांबी रुंदी यथासांग । चौक नेमस्त व्यंग । असोंचि नये ॥ १ ॥ वीट लांबी नऊ तसू । आणि रुंदी सात तसू । उंची जाणिजे तीन तसू । पाठपोट नेमस्त ॥ २ ॥ खालीं बरड वरी खळगा । ती वीट कामा न ये गा । धारेकोरेपाशीं दगा । काया न ये ॥ ३ ॥ भूमीपासूनि नीट करावी । कलबुताची कळाशी धरावी । आंतपावेतों नेमस्त भरावी । खिळे मारुनी ॥ ४ ॥ खडे खापरी कामा नये । थोडें कमावणें कामा नये । थोडी लीद कामा न ये । आणि बहुत ॥ ५ ॥ राख कोंडा

बुळग्या दाणे । घालूं नये दैन्यवाणें । अथवा कांहीं अधिक उणें । करूंचि नये ॥ ६ ॥ घट्ट चिखल कामा नये । पातळ तरी असूंचि नये । दडपितां कळाशी वाहूं नये । ना थर बुजे ॥ ७ ॥ खणखणीत वाळवाव्या । झणझणीत भाजाव्या । भट्ट्या नेमस्त कराव्या । आणि दरी ॥ ८ ॥ ओलें सरपण कामा नये । कावळकाठ्या कामा नये । मोठे ढोण कामा नये । नेमस्त असावे ॥ ९ ॥ जाळ घालावा नेमस्त । उमास करूं नये व्यस्त । ठाव असावा प्रशस्त । समान भूमि ॥ १० ॥ पूजाविधि चुकों नेदावी । भटी बरी निवूं द्यावी । वीट हळू उतरावी । टाकूं नये ॥ ११ ॥ पहिलेपासून शेवटवरी । अंतःकरण बरें विवरी । आळस करील तो वैरी । कामा नये ॥ १२ ॥ कामकर्त्यास गमूं देऊं नये । काम घेतां त्रासूं नये । कठीण शब्द बोलूं नये । क्षणक्षणां ॥ १३ ॥ दिवस उगवल्यावरी येऊं देऊं नये । गमित[1] माणूस कामा नये । अशक्त पोर कामा नये । आणि म्हातारे ॥ १४ ॥ बळकट लोक निवडावे । काम पाहूनि लावावे । सगट[2] मुशारे करावे । हें मूर्खपण ॥ १५ ॥ जेवणापुरते बसों द्यावे । सर्वेचि कामास लावावे । दिवस धारे सांभाळावे । क्षणक्षणां ॥ १६ ॥ वेळ गमूंचि नेदावा । खोटा रुका बदलून द्यावा । मुशारा रेवूंचि न द्यावा । तमक खोटा ॥ १७ ॥ हिशेब बरा राखीत जावा । लिहिण्याचा आळस नसावा । मुबदला करीत जावा । उपसामुग्री ॥ १८ ॥ खिळे कुऱ्हाडी पायळ्या । पाहरा संबळ कुदळ्या । सन फावडे लेरसळ्या । तरफा असाव्या ॥ १९ ॥ नाडे साले काथे दोर । काढवणे कळके ढोलर । उथाळ्या चालण्या डाळ्या थोर । तक्ते बळकट काथवटी ॥ २० ॥ मांदणें डेरे घागरी । रांजण गाडगीं भारी । पाळीं बहुता परोपरी । दांडे असावे ॥ २१ ॥ धोंडे गुंडे चिपा चिपरे । खरुस चुना वाळू कंकरे । पाटे वरवंटे बरे । कामगार असावे ॥ २२ ॥ पोशिंदे असावे सावधान । हुन्नरवंदी तुफान । दोघांचें एकचित्त मन । कामा नये ॥ २३ ॥ तिकट्या सूत्रें ओळंबे । काम पाहूनियां मनुष्य झोंबे । तरी मग इमारती खेबडंगे । उभे राहती ॥ २४ ॥

## ८ कारखानेप्रकरण ( समास २ रा )

यादी इमारतीकारणें । काय काय लागे करणें । श्रोतीं अवधान देणें । म्हणे वक्ता ॥ १ ॥ द्रव्य पारपत्य[3] खबरदारी । सत्ता सामर्थ्य वेठ बेगारी । गवंडी पाथरवट लोणारी । बेलदार कोळी ॥ २ ॥ लोहार सुतार कुंभार ।

१ गमणारे, चुकार. २ सारखे. ३ समाचार.

कामगार लहान थोर । मांग महार चांभार । नाना याती ॥ ३ ॥ घन कुदळी संबळ । कुराळी पारा गुठी गोल । टांक्या हातोडे लोळ । लोहपोलादाचे ॥ ४ ॥ विळे पायळे कुराडी । खुरपीं थाप्या धांवा वेडी । खिळे हलके गांधे गाडी । खोरें सनभ पावडीं ॥ ५ ॥ तर्फा दांडे मुंगळ्या नाटा । चोपणीं बडवणीं धुमस खाटा । चाळण्या पांट्या बंधली साठा । नाना प्रकारींचे ॥ ६ ॥ सर कोंडके कळक चिवे । फळ्या चांफ चौफळे व्हावे । चवरंग चवक्या पाट करावे । नाना गिलाव्याचे ॥ ७ ॥ जांतीं शिळा वाटणीं । चाटू डंगारणीं घांटणीं । तस्तें पाळीं लाटणीं । कळक मापें तराजू ॥ ८ ॥ कोळसे भट्ट्या लांकडें । शिरटी फेस झाडेंझुडें । नाना इमारतीचें सांकडें । करतां जाणे ॥ ९ ॥ चुना चिरे वाळू कंकरे । पारड्या चिपा लहान थोर । धोंडे गुंडे माती नीर । रांजण डेरे घागरी ॥ १० ॥ मडकीं कुंडालीं गाडगें । परळ वेळण्या मांदण मोघे । विटा चुना खरुस लागे । झेल इमारतीसी ॥ ११ ॥ गूळ कात हिरडे ताग । उडीद नाचण्या डीक याग । वजन हिशेबें यथासांग । केलें पाहिजे ॥ १२ ॥ तीळ राळे आणि भात । चिकणा माती आरक्त । राख लीद बळग्या मिश्रित । कमावून विटा कराव्या ॥ १३ ॥ तिकोन्या चौकोन्या लहान थोर । भाजून भिजवून सुंदर । तिकया ओळंबे धरून सूत्र । इमारती कराव्या ॥ १४ ॥ चौकट्या मेहरबा ताकबंदी । विटेबंदी चिरेबंदी । लोहबंदी शिसेबंदी । नीट नेमस्त उभार ॥ १५ ॥ कांचबंदी पाचबंदी । नाना रत्नें सुवर्णबंदी । नाना दर्पणें विचित्र बंदी । नाना चित्रलेखन ॥ १६ ॥ तोंड रचाया बळ कुसरी । चित्रविचित्र वोवरी । कमळें पानें परोपरी । एकाहूनि एक ॥ १७ ॥ कलबुद लावण्या बळकट । जालंधरें झरोके सोनवट । घोटघोटोनि लखलखाट । सुरु सनाबदाचे ॥ १८ ॥ धाबें देउळें शिखरें । उंच गोपूरें मनोहरें । वापी पोखरणी सरोवरें । हमामे स्थान कारंजीं ॥ १९ ॥ गड कोट महाल मठ्या । गुप्तद्वारें अंतरशिड्या । छत्र्या लादण्याच्या तवकड्या । नाना भुवरीं विवरें ॥ २० ॥ धनधान्य रसखाने । दारूखाने जामदारखाने । नाना अठरा कारखाने । घुमट मशीदी मनोहर ॥ २१ ॥ चित्रशाळा नाटकशाळा । भोजनशाळा होमशाळा । पाठशाळा धर्मशाळा । नाना इमारती ॥ २२ ॥ ओटे चौथरे वृंदावनें । कुंचे दारवटे भुवनें । नाना प्रकारचीं स्थानें । चांदवा पट कोट भडकले ॥ २३ ॥ धरणें सांकू कालवे । नदीतीरीं पंथ बांधावे । दीपमाळा चौक बांधावे । हुडे खानगे मदालसा ॥ २४ ॥

गढ्या गुंफा कपाटें लेणीं । देवदैत्यमानवकरणी । समाधीमाझारीं धरणी । कोणें पाहिली ॥ २५ ॥

## ९ श्रेष्ठांस दुसरें पत्र.

( शके १५७३ त चाफळाहून पाठविलें तें. )

सकळ तीर्थांचें सार । सत्यस्वरूप निर्विकार । तुमचें चित्त तदाकार । निरंतर ॥ १ ॥ विमल ब्रह्मपरायण । सगुणभक्ति संरक्षण । विशेष वैराग्यलक्षण । तुमचे ठायीं ॥ २ ॥ मुक्तक्रियेचा अनादरु । स्वधर्मकर्मीं अत्यादरु । आग्रहनिग्रहांचा विचारु । तोहि नसे ॥ ३ ॥ नसे कामनेचा लेश । जयंत्या पर्वांचा हव्यास । अंतरीं माने विशेष । हरिकथानिरूपण ॥ ४ ॥ तुमचें देह सार्थकाचें । सर्वदा परोपकाराचें । भगवंतें निर्मिलें बहुतांचें । समाधान ॥ ५ ॥ तुमचोने वाग्विलासें । बहु पाखंड नासे । संशयातीत प्रकाशे । विमळ वस्तु ॥ ६ ॥ सन्मार्गांचा कैपक्षी । अनमार्ग करणें अलक्षी । लोक पावती प्रत्यक्षीं । समाधान ॥ ७ ॥ दक्षता आणि चातुर्यता । व्युत्पन्नता आणि लीनता । उत्तम गुण सर्वज्ञता । तुमचे ठायीं ॥ ८ ॥ तुमचें स्वरूप वर्णवेना । म्हणोनि देहाची वर्णना । युक्त अयुक्त मित्रजना । क्षमा केली पाहिजे ॥ ९ ॥

## १० उद्धवगोसावी यांस उत्तर.

( त्यांनीं भेटीच्या इच्छेनें लिहिलेल्या पत्रावर. )

चिरंजीव तें निश्चळ । निश्चळीं जाहलें चंचळ । चंचळीं जाणावें निश्चळ । निश्चळरूपी ॥ १ ॥ सदासर्वदा निश्चळ । निश्चळींच पाहावें सकळ । सकळ पाहतां केवळ । आपणच वस्तु ॥ २ ॥ वस्तुरूप आपण । अधिष्ठानीं पाहतां कोण । पाहतां पाहणें ज्यालागून । तोचि तो आत्मा ॥ ३ ॥ आत्मारामीं आत्मा पाहा । जाणूनियां सुखी राहा । स्वानंदामृत सेवूनि पाहा । निखिल निजरूपा ॥ ४ ॥ रूप तेंचि पाहतां सगूण । सगुण तेंचि आपण । आपणापरतें ज्ञान । वेगळें नाहीं ॥ ५ ॥ वेगळेपणें पाहावें । मग तें वेगळेंचि जाणावें । मग मिळेना स्वभावें । मुक्त जैसें[1] ॥ ६ ॥ म्हणुनि वेगळें न साहे । न साहे म्हणणेंचि बाह्य । बाह्याबाह्य ते अबाह्य । जाण बापा ॥ ७ ॥ ऐसें जें अधिष्ठान । तेथें जावया जाण । जाण जाणोनि परिछिन्न । आपणाचि ॥ ८ ॥ शरण जावें सद्गुरूसी । म्हणजे कळे आपणासी । आपपर नाहीं त्यासी । दास म्हणे ॥ ९ ॥

१ स्वच्छंद वागण्याचा. २ चंचळानिश्चळाचा विवेक दासबोधांत सांगतला आहेच.

## ११ ब्रह्मपिसा.

( शिष्यांची निष्ठा कसून पाहावी या हेतूनें तरवार घेऊन शिष्यमंडळीवर स्वामी धांवले त्या प्रसंगीं केलेलें पद. )

पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळी । रामनामें हांक देउनि डोइ खांजोळी ॥ ध्रु० ॥ वृत्तिशेंडी बंधनेंविण सदा मोकळी । संसाराची धुळी करुनी अंगीं उधळी ॥ १ ॥ प्रपंचउकरड्यावर बैसणें ज्याचें । भोंवता पाळा फिरून पाहे जन अविद्येचे ॥ २ ॥ धांवूनि बैसे उठोनि पळे दृश्य वाटतें अदृश्याचें । राहणें घेतां न चले कोणाचें ॥ ३ ॥ औट हात गज नवा ठायीं वितुळले । दहावा ठाव म्हणोनि तेथें ठिगळ दिधलें ॥ ४ ॥ ऐसें मन हें चंचल वृत्तींत गुंतलें । परतोनि आलें म्हणउनि जिवेंच मारिलें ॥ ५ ॥ मीपणाचें शहाणपण जळालें माझें । कोण वाह देहबुद्धिवस्त्राचें ओझें ॥ ६ ॥ नलगे आम्हां मानपानाचें ओझें । तुझी शुद्धि घेतां गेलें मीपण माझें ॥ ७ ॥ आम्ही जन धन देखोनी वार करितों । आपणाऐसें म्हणउनी उमज धरितों ॥ ८ ॥ आतें भेटों येती त्यांस वेड लावितों । रामीरामदास ऐसें अबद्ध बोलतो ॥ ९ ॥

## १२ शाहीरांस प्रश्न.

( कोणे एके समयीं समर्थ परळीहून चाफळास येण्याकरितां निघाले. मार्गीं येतांना पालीस आले. तेथें पौषमासीं जत्रा भरली होती. त्यांत नागेशवाले व हरदासवाले शाहीर यांचा फड पडून एकमेकांवर चढ करीत बसले होते. तेथें समर्थ येतांच ते सर्व उठून साष्टांग नमस्कार व दंडवत करून उभे राहिले. त्यांनीं विनंती केली कीं, ' आम्ही दोन पक्षांचे शाहीर आहों. एकमेकांवर चढ टाकून एकमेकांची परीक्षा करीत आहों. ' हें ऐकून आम्ही तुम्हां दोघांवर चढ टाकितों, त्याचें दोघेहि मिळून उत्तर द्या, असें म्हणून समर्थांनीं हें डफगाणें केलें आहे. )

किती पृथ्वीचें वजन । किती अंगोळ्या गगन । सांग सिंधूचें जीवन । किती टांक ॥ १ ॥ किती आकाशींचा वारा । किती पर्जन्याच्या धारा । तृण भूमीवरी चतुरा । संख्या सांग ॥ २ ॥ वायुसरसे उडती । सांग अणुरेणु किती । लक्षचौऱ्याशींची उत्पत्ती । संख्या सांग ॥ ३ ॥ अठराभार वनस्पती । भूमंडळीं पाणी किती । पुष्पें फळें जाती किती । संख्या सांग ॥ ४ ॥ बीज वडीं आणि पिंपळीं । किती आहे भूमंडळीं । सर्व धान्यांची मोकळी । संख्या सांग ॥ ५ ॥ सर्व सरितांची वाळू किती । सिंधुसागरीं वाळू किती । हरखूं आहे किती । संख्या सांग

॥ ६ ॥ सांग माझें डफगाणें । कीं डफ ठेवीं शहाणपणें । देहबुद्धीचें लक्षण । सोडवीन ॥ ७ ॥ ऐक जें जें पुशिलें तुज । तें तें आतां सांगें मज । अनंत ब्रह्मांडें बेरीज । किती जाहली ॥ ८ ॥ रामदासाचा विनोद । सांडीं अहंतेचें बीज । मग स्वरूपीं आनंद । सुखी राहें ॥ ९ ॥

## १३ श्रेष्ठांच्या मुलांस उपदेश.

( श्रेष्ठ परंधामास गेले तेव्हां पाठविलेलें )

( भुजंगप्रयात )

बरें सत्य बोला यथातथ्य चाला । बहू मानिती लोक येणें तुम्हांला ॥ धरा बुद्धि पोटीं विवेकें मुलें हो । बरा गुण तो अंतरामाजि राहो ॥ १ ॥ सदा दांत घांसोनि तोंडा धुवावें । कळाहीन तें शूद्रमूखी नसावें ॥ सदा सर्वदा यत्न सोडूं नये रे । बहूसाळ हा खेळ कामा नये रे ॥ २ ॥ दिसामाजि कांहीं तरी तें लिहावें । प्रसंगीं अखंडीत वाचीत जावें ॥ गुणश्रेष्ठ ऊपास्य त्यांचें करावें । बरें बोलणें सत्य जीवीं धरावें ॥ ३ ॥ बहू खेळ खोटा सदालस्य खोटा । समस्तांसि भांडेल तोची करंटा ॥ बहुतां जनांलागिं जीवीं भजावें । भल्यासंगती न्याय तेथें भजावें ॥ ४ ॥ हिशोबीं सदा न्याय सांडूं नये रे । कदाचीत अन्याय होतां धका रे ॥ जनीं सांडितां न्याय रे दुःख होतें । महासूख तेंही अकस्मात जातें ॥ ५ ॥ प्रचीतीविणें बोलणें व्यर्थ वायां । विवेकेविणें सर्वही दंभ जाला ॥ बहू सज्जला नेटका साज केला । विचाराविणें सर्वही व्यर्थ गेला ॥ ६ ॥ वरी चांगला अंतरीं गोड नाहीं । तया मानवाचें जिणें व्यर्थ पाहीं ॥ वरी चांगला अंतरीं गोड आहे । तयालागिं कोणी तरी शोधिताहे ॥ ७ ॥ सदा अंतरीं गोड तें सांडवेना । कदा अंतरीं ओखटें देखवेना ॥ म्हणूनी बरा गुण आधीं धरावा । महाघोर संसार हा नीरसावा ॥ ८ ॥ भला रे भला बोलती तें करावें । बहुतां जनांचे मुखें येश घ्यावें ॥ परी शेवटीं सर्व सोडोनी द्यावें । मरावें परी कीर्तिरूपें उरावें ॥ ९ ॥ बरा ओखटा सर्व संसार जाला । अकस्मात येईल रे काळघाला ॥ म्हणोनी भले संगतीं सत्य चाला । जनीं दास तो बोधिताहे मुलांला ॥ १० ॥

# २३ श्लोकबद्ध विविध प्रकरणें.



## १ जन्म सार्थकीं कसा लावावा.

आमुची बोली देवाची । वाचीना त्या कळेचिना ।
रामउपासना माझी । त्रैलोक्यव्यापिनी पहा ॥ १ ॥
सोडिले देव बंदीचे । पापी राक्षस मारिले ।
प्रताप पाहतां मोठा । ज्ञानी सर्वत्र जाणती ॥ २ ॥
इतरां कळेना लोकां । जाणती कामनाभरें ।
आदिनारायणी माता । परमात्मा परमेश्वरी ॥ ३ ॥
मुळींची कुळदेव्या ते । कुमारी बहुरूपिणी ।
कुमारी आमुची माता । पिता ब्रह्मचारी[1] सदा ॥ ४ ॥
ईश्वरु म्हणती त्याला । षड्गुण खुण ते पहा ।
माता पिता एकरूपी । पिंडब्रह्मांड वोळखा ॥ ५ ॥
कल्पनारूप ते दोघे । कन्या निर्माण तीसरी ।
देवत्रयांची माता । ते गुणक्षोभिणी बोलिजे ॥ ६ ॥
ब्रह्माविष्णुमहेशादि । पुढें उत्पन्न जाहाले ।
विष्णूची वैष्णवी माया । भले सर्वज्ञ जाणती ॥ ७ ॥
विधी तो पुत्र विष्णुचा । शारदा ब्रह्मकुमरी ।
बोलिलें हें दासबोधीं । मानपंचकीं बरें पाहा ॥ ८ ॥
सृष्टिक्रमें सृष्टी जाली । अनुक्रमें बरें पहा ।
देवता ते साभिमानें । साभिमान चहूंकडे ॥ ९ ॥
सर्वही शास्त्र शोधावें । ज्ञानी व्युत्पन्न संगती ।
अध्यात्मीं तो गुरु व्हावा । वीतरागी विचक्षणु ॥ १० ॥
कर्म उपासना ज्ञानें । सर्व संदेह तुटती ।
संध्येमधें पाहाना कां । गायत्री पूज्य ब्राह्मणा ॥ ११ ॥
गायत्री ते महावाक्यें । त्रिपदी अर्थ पाहाणें ।
अर्थार्थी लक्ष लावावें । प्रज्ञावंतचि पाहिजे ॥ १२ ॥
वेद वेदांत सिद्धांतें । धादांत प्रचीत पाहा ।
वाच्यांशें लक्ष शोधावें । लक्ष्यांशीं शब्द खुंटला ॥ १३ ॥

---

१ 'ऐसा गे माय कैसा हा योगी' हें ज्ञानेश्वरांचें पद पहा. त्यांतहि 'माय कुमारी बाप ब्रह्मचारी' असेंच आहे.

पिपिलिकामार्ग लांबीचा । विहंगमेंचि धांवणें ।
चर्मचक्षु बहु थोडे । ज्ञानचक्षु महाबळी ॥ १४ ॥
सद्गुरु दृष्टि उघडीतो । पुढें फळची पावणें ।
पूर्वपक्षें लोक जाती । सिद्धांत ठाउका नव्हे ॥ १५ ॥
सिद्धांत पाहिल्याविणें । मोक्ष हा तों घडेचिना ।
वेदांती बोलिले सर्वै । पुढें मौनाचि राहिला ॥ १६ ॥
तो अर्थ पाहाण आधीं । मोनगर्भविचारणा ।
तें वर्म सद्गुरुपासा । वेदशास्त्रें कळेचिना ॥ १७ ॥
वेदानें रुधिलें लोकां । ज्ञानी पैलाड राहिला ।
लोकांला जाउं देईना । द्वारपाळ महाबळी ! ॥ १८ ॥
बहुतां शासना केली । बहुत लोक पीडिला ।
रायाला गर्जवेना कीं । वर्जितां स्थान भ्रष्टति ॥ १९ ॥
दंडिती बहुतां लोकां । राजा तो राजमंदिरीं ।
तैसाचि विवेकी ज्ञाता । मुख्यपदासी पावला ॥ २० ॥
विधिनिषेध त्या कैचा । उदास पाहिजे भला ।
वैराग्येंवीण जो डांभा । तो डांभा भ्रष्टवी जना ॥ २१ ॥
सर्वसंगपरित्यागी । महायोगी विवंचला ।
जनांत पाहातां वर्ते । प्रतापें धर्मस्थापना ॥ २२ ॥
ईश्वरु बोलिजे त्याला । ऐश्वर्य सांडितो बळें ।
धुंडितां सांपडेना कीं । षड्लक्षणी वोळखा ॥ २३ ॥
द्रष्टा साक्षीच सर्वज्ञु । सर्वांसी सारिखा असे ।
स्वतंत्र सांपडे कैचा । संगत्याग समागमी ॥ २४ ॥
नृपती सांडिती राज्यें । धुंडिती परमेश्वरा ।
ते वंद्य जाहले शास्त्रीं । ज्ञानदेहीं विदेहता ॥ २५ ॥
संसार देखिला जेहीं । तेहीं अध्यात्म साधणें ।
अध्यात्म पाहिल्यावीण । चुकेना यमयातना ॥ २६ ॥
विवेकी दक्ष जो कोणी । पुरुषार्थी धमरक्षकु ।
अमोल्य जन्म हा तेणें । व्यर्थची दवडूं नये ॥ २७ ॥
संसारीं दोनि साधावीं । इहलोक परत्रहीं ।
इहलोक साधिती सर्वे । शक्त्यनुसार घरोघरीं ॥ २८ ॥
परलोक हातिचा गेला । कुटिला तो म्हणोनियां ।
परलोक साधिल्यावीण । प्राणी गेले अधोगती ॥ २९ ॥

पाप ऊदंड जाहलें । जळेना सद्गुरुविणें ।
सद्गुरु पाहतां नाहीं । पुण्य ऊदंड पाहिजे ॥ ३० ॥
पुण्याचें रूप तें कैसें । हेंचि आधीं कळेचिना ।
सर्वही निर्णयो जेथें । तोचि ग्रंथ बरा पहा ॥ ३१ ॥
कळेना ऐकिल्यावीण । इहलोक परत्रही ।
परत्र पावना देवा । दीननाथा रघूत्तमा ॥ ३२ ॥

## २ व्यर्थ संसार जातसे.

कटकटी खटखटी रागें । चटपटी वटवटी सदा ।
चुचुरी चुर्मुरी रागें । व्यर्थ संसार जातसे ॥ १ ॥
कर्करी खर्खरी रागें । गर्गरी भर्भरी मदें ।
पर्परी घर्घरी अंतीं । व्यर्थ संसार जातसे ॥ २ ॥
फुंजती थिंकिती दुःखें । हांसती रडती सदा ।
बोंबलीती महाजाळें । व्यर्थ संसार जातसे ॥ ३ ॥
घडघडी तडपडी लोभें । मायाजाळें सुटेचिना ।
तळतळी तळमळी खेदें । व्यर्थ संसार जातसे ॥ ४ ॥
हटाटे पटाटे मोठे । थोर संसारसांकडी ।
शोक चिंता अहर्निशीं । व्यर्थ संसार जातसे ॥ ५ ॥
तीर्थ नाहीं यात्रा नाहीं । नाहीं कथानिरूपण ।
तृप्त हे वासना नाहीं । व्यर्थ संसार जातसे ॥ ६ ॥

## ३ धन्य संसार होतसे.

स्नानसंध्या टिळे माळा । अंतरनिष्ठ उपासना ।
नित्यानित्यविवेकानें । धन्य संसार होतसे ॥ १ ॥
मर्यादा न्यायनीतीची । अन्याय न घडे कदा ।
सन्मार्ग योग देवाचा । धन्य संसार होतसे ॥ २ ॥
देवाल्यें शिखरें रम्यें । धर्मशाळा परोपरीं ।
परत्र साधकां लोकां । धन्य संसार होतसे ॥ ३ ॥
अन्नोदकवस्त्रदानें । धन्य धन्य ब्राह्मणीं भजे ।
उदासवृत्तीनें लोकीं । धन्य संसार होतसे ॥ ४ ॥
बावी सरोवरें टांकीं । मठवृक्ष परोपरीं ।
उपकार समस्तै लोकां । धन्य संसार होतसे ॥ ५ ॥

१ दासबोध द. १० स. १० ओंवी ५३ ते ६६ पहा.

पराचें जीविचें जाणे । अस्ती नस्ती विचारणा ।
अत्यंत सर्व भूतांसीं । धन्य संसार होतसे ॥ ६ ॥
कदापी सत्य सोडीना । नित्य नेमस्त बोलणें ।
वोढतो बहुतां लोकीं । धन्य संसार होतसे ॥ ७ ॥
होम याग पुरश्चरणें । निरूपणें हरिकथा ।
ब्रह्मसंतर्पणें यात्रा । धन्य संसार होतसे ॥ ८ ॥
वेदपारायणें चर्चा । पुराणें माहात्म्यें शुभें ।
नित्य उत्साव देवाचा । धन्य संसार होतसे ॥ ९ ॥
नवविधा भक्ति देवाची । मुख्य कोण विचारणें ।
अध्यात्म शोधितां सर्वै । धन्य संसार होतसे ॥ १० ॥
पंचीकरण महावाक्यें । श्रवणें मननें सदा ।
सत्संगें निःसंग होतां । धन्य संसार होतसे ॥ ११ ॥
दासाचें बोलणें ऐसें । सर्वज्ञ जाणते तुम्ही ।
आम्ही तुम्ही विचारावें । धन्य संसार होतसे ॥ १२ ॥
शब्देंचि लाभती रत्नें । शब्दरत्नें अमोल्य कीं ।
कोंदणामाजि तें सोनें । तैसा अर्थ प्रचीतीचा ॥ १३ ॥

### ४ चंचळ असार, निश्चळ सार.

विचार सार शोधितां । प्रबोध बोध बोधितां ।
अखंड खंडता नसे । स्वयें प्रचीत वीलसे ॥ १ ॥
बरी विवंचितां तनू । दिसे[1] प्रभंजनु मनू ।
परंतु येकरूप हो । जनास पाववी मोहो ॥ २ ॥
बहुत वात मातला । जनीं समस्त रातला ।
अनेक सृष्टि चाळकु । अनंत जीवपाळकु ॥ ३ ॥
मनांत जाणती[2] कळा । चळे अखंड चंचळा ।
जनासि पाळितो सदा । सतंत हेत सर्वदा ॥ ४ ॥
सहेत वात येक रे । पुढें मिळे अनेक रे ।
परंतु सार तोचि तो । भला जनीं बुझेल तो ॥ ५ ॥
चळेल तोचि चाळकु । पळेल तोचि पाळकु ।
करील तो विकारला । विकारवंत[3] हारला ॥ ६ ॥
अखंड देव निर्मळु । तयास काय रे मळु ।
अचंचळासि चंचळु । म्हणेल कोण तो खळु ! ॥ ७ ॥

१ तनूचा विचार करितां मन व पवन यांचा सारा खेळ आहे. २ अंतरात्मा. ३ शेवटीं विकारवंत अंतरात्माही लीन होतो.

गुणारहित निर्गुणा । चुकोन सांगती खुणा ।
बळेंचि गुण लाविती । सगुण ब्रह्म भाविती ॥ ८ ॥
समस्त कार्यमूळ हें । विकारलें समूह हें ।
अनंत निर्विकार तो । नव्हेचि रे विकार तो ॥ ९ ॥
अखंड येत जातसे । अखंड होत जातसे ।
अखड जे विकारली । नसे[1] कदापि थारली ॥ १० ॥
अतर्क तर्क वेचिना । अलक्ष लक्ष वेचिना ।
अनंत तो अनंत रे । प्रपंच अंतवंत रे ॥ ११ ॥
चळेचिनांचि[2] तो चळे । निरोपिताति आंधळे ।
उगेंचि शब्द वाउगे । वदोनि मूर्ख तें फुगे ॥ १२ ॥
कदा न येचि प्रत्ययो । तयास काय तो जयो ।
पतीत तोचि पातकी । विनाप्रचीत घातकी ॥ १३ ॥
नसे प्रचीत तें सुणें । उगेंचि काय भुंकणें ।
स्वयें प्रचीत तो वरु[3] ।उगाचि सिंतरु खरु ॥ १४
निरंजना म्हणे करी । बळेंचि गुण थावरी ।
अलिप्त त्यास भावना । करी म्हणेल तो उणा ॥ १५ ॥
प्रचीत पूसतां कळे । चुकोन व्यर्थ चावळे ।
मनू चहुंकडे पळे । कितेक लोक आंधळे ॥ १६ ॥
उदास दास राहतो । प्रतीत सत्य पाहतो ।
कळेल त्या सुखें कळो । वळेल त्या सुखें वळो ॥ १७ ॥

### ५ देहदेवालयांतला देव पद्य.

देहेदेवालयामध्यें । पाहाणें देव तो बरा ।
देव सांडूनि देवाल्यें । वर्णिती सर्वही कवी ॥ १ ॥
कवीला शिकवी कोण । देवची वदतां बरें ।
देवाल्यें चालवी देवो । प्रत्येक्ष सचराचरीं ॥ २ ॥
अंतरीं विवरी नाना । सद्य गद्य नव्हे कदा ।
देवँळें चालवी नाना । तनाना होतसे पुढें ॥ ३ ॥
वदाना त्यास कां आधीं । तो देव येकला दिसे ।
येकला बहुतां ठाईं । उंच नीच विभागला ॥ ४ ॥
दिसेना लोचनाला रे । घाला रे मन त्यामधें ।
येकला सर्व देवाळीं । गुप्त नाना परीं वसे ॥ ५ ॥

---

१ मूळमाया. २ अचळ ब्रह्म चळतें, विकारवंत सगुण होतें असें ज्ञानहीन म्हणतात. ३ श्रेष्ठ.

अनंत कोटि देवाल्यें । त्यामधें येकला प्रभू ।
दीपानें दिसेना नाहिं । त्यानें त्यासचि पाहणें ॥ ६ ॥
उजेडें दिसेना नाहिं । अंधारें गुप्त होय ना ।
कदा हातासि लागेना । सर्वथा पूजितां नये ॥ ७ ॥
पूजितां सर्व देवाल्य । तेणें तो तृप्त होतसे ।
प्रत्यक्ष वतत आतां । पाहा रे विवेकी तुह्मी ॥ ८ ॥
देवाल्यें वर्णिती ज्ञाते । ते ज्ञाते नव्हती कदा ।
देव वर्णील तो ज्ञाता । ज्ञान मोक्षचि पावतो ॥ ९ ॥
थोर लहान देवाल्यें । देव तो त्यामधें असे ।
देवदेवाळयेंवीण । कोणीच न दिसे जनीं ॥ १० ॥
देव तो येक देवाल्यें । अनेक दिसती पाहा ।
भेद देवाळयांमध्यें । अभेद देव पाहतां ॥ ११ ॥
कोणकोणासि सांगावें । सर्वही भ्रांत जाहल ।
भ्रांत देवाळयासाठीं । देवची सांडिती जनीं ॥ १२ ॥
कळेना आणि ऐकेना । धांवती दीसत्याकडे ।
दीसतें नासतें जातें । दिसेना तें कळेचिना ॥ १३ ॥
कळेना वळेना कांहीं । कांहीं बाहीं तऱ्हीं करूं ।
देवाल्यें पूजितां देवो । संतुष्ट होतसे सदा ॥ १४ ॥
आपदा ते चुकेना कीं । देवासीं चुकतां जनीं ।
गुप्त लिंग कळेना कीं । सन्नीध असतां सदा ॥ १५ ॥
मोडलीं जीर्ण देवाल्यें । ताचि लाकांसि मानती ।
भांडती देवळासाठीं । देव चुकोनि राहिला ॥ १६ ॥
शरीरमात्र देवाल्यें । जीर्ण सांडुनी जातस ।
नूतनें रम्य देवाल्यें । त्यांमध्यें देव नाटकु ॥ १७ ॥
ठकु रे ठकु रे मोठा । ठाकितो जनमानवी ।
मानवी दानवी काया । काया माया पहा बरी ॥ १८ ॥
थोर देवाल्य मूळींचें । ईश्वरु जगदेश्वरु ।
देवदेव्या बहुरूपा । अर्धनारीनटेश्वरु ॥ १९ ॥
त्यापुढें तीन देवाल्यें । ब्रह्मा विष्णु महेश्वरु ।
तया अभ्यांतरीं देवो । तो देव सत्य जाणिजे ॥ २० ॥
तो ची जो तो हा जाणा । नाना देवाळयामध्यें ।
अवतरे देवळांमध्यें । त्यासी अवतार बोलजे ॥ २१ ॥

आतां म्यां काय सांगावें । सांगावें त्या परमेश्वरा ।
अखंड अंतरीं ध्यावें । जावें रे निश्चळाकडे ॥ ११ ॥
अढ तें सर्व देवाल्यें । देव तो चंचळु असे ।
निश्चळु निर्विकारी तो । मुख्य देवो निरंजनु ॥ १३ ॥
नांव रूप जया नाहिं । कार्य कारण तो नव्हे ।
महाकारण ही खोटें । देवाल्य मुळीचें मुळीं ! ॥ १४ ॥
अनन्य दास देवाचा । वाचा रे मन घालुनी ।
पाहतां कोण तो कैचा । भेदाचा ठाव नाडळे ॥ १५ ॥

## ६ अनुतापयुक्त प्रार्थना.

नेणतां जन्मलों आम्हीं । चुकतां दुख पावलों ।
फावलों बहुतां लोकां । कावलों मनिच्या मनीं ॥ १ ॥
स्वतंत्र ईश्वरु जाणा । पराधीनचि मानवी ।
विषयवासनेसाठीं । पराधीनची जाहाले ॥ २ ॥
सांगती सर्वहि काम । आपुलालीं परोपरीं ।
उसंत[1] घ्यावया नाहिं । चुकतां गांजिती सदा ॥ ३ ॥
गांजिती मारिती सर्वै । ज्याचें त्याचें किती करूं ।
कष्टलों भागलों माझें । दुःख कोणीच नेणती ॥ ४ ॥
धाकची वाहातां गेलें । व्यर्थ आयुष्य वेचलें ।
विषयो पुरता नाहिं । मना ऐसें घडेचिना ॥ ५ ॥
विद्या नाहिं बुद्धि नाहिं । भाग्य नाहिंच देखिलें ।
वैभव संपदा कैची । अन्न वस्त्र मिळेचिना ॥ ६ ॥
बोलतां चालतां येना । विसरणें चुकणें सदा ।
हारणें गाहाळे कांहीं । मारामारी धवाधवी ॥ ७ ॥
रडावें बोंबलावेना । लाता बुक्या परोपरीं ।
उदंड ताडणें होती । दुःखशोक विटंबणा ॥ ८ ॥
आधार पाहातां नाहिं । कैपक्षी[2] तों असेचिना ।
देहेत्याग बरा वाटे । दुःख ब्रह्मांड जाहालें ॥ ९ ॥
सांगावें हें तरी कोणा । सख्य नाहिं भुमंडळीं ।
विसांवा सुटिका नाहिं । दुःख जालें परोपरां ॥ १० ॥
ऐसी हें सोसिलीं दुःखें । जन्मोजन्मीं बहुविधें ।
जन्मदुःख पुरे आतां । मायबापा रघूत्तमा ॥ ११ ॥

१ विसांवा. २ कैवारी.

अनाथ रंक मी तुझें । जन्मापासुनि सोडवीं ।
पतीतपावना देवा । सांभाळीं गा दयानिधी ॥ १२ ॥
तूं भक्तवत्सला देवा । भक्तीहि करितां नये ।
कोंवसा[1] सकळै लोकां । धांव पाव कुडावया[2] ॥ १३ ॥
प्रल्हाद रक्षिला देवें । नाना विघ्नें निवारिलीं ।
गजेंद्र सोडिला नेटें । येकायेकीच धांवणी ॥ १४ ॥
अजामेळ माहापापी । स्मरणें तारिले तया ।
रक्षिलें उदंडां भक्तां । दयाळु भक्तवत्सलु ॥ १५ ॥
ब्रीदेंही चालती तुझीं । पवाडे[3] ऐकिले बहु ।
समर्थें पाहावी चिंता । मी तुझा शरणांगतु ॥ १६ ॥
संकटीं भर्वसा तुझा । भक्तांसी वज्रपंजरु[4] ।
वोळला मेघ सुखाचा । आनंद सचराचरीं ॥ १७ ॥
बुद्धीनें शोधिला देवो । भावें तत्काळ पावला ।
पाहिली भक्ती हे नौमी[5] । योगें वियोग तुटला ॥ १८ ॥
देवाचा योग तो योगी । वियोगी योगिया नव्हे ।
विभक्तीनें नव्हे भक्ती । जाणती भक्त जाणते ॥ १९ ॥
ब्रीद तें प्रत्यया आलें । सत्य जालें प्रचीतिनें ।
धन्य गा पावना देवा । भावना उरली नसे ॥ २० ॥
बुद्धि देतो सेवकाला । बुद्धीनें पार पाववी ।
अनंत गुण देवाचे । पाहतां पार नाडळे ॥ २१ ॥
वेदविधीफणी[6] नेणे । अनंत महिमा कसा ।
जाणतो तोचि तो देवो । त्यावीण जाणता नसे ॥ २२ ॥
ज्ञान तो जाणिजे देवो । ज्ञानें परत्र पावणें ।
प्रवृत्ति निवृत्ति ज्ञानें । ज्ञानें मोक्षचि पाविजे ॥ २३ ॥
पिपिलिकामार्ग ठाकेना । सोपा मार्ग विहंगमु ।
अनन्यभक्तिच्या योगें । धन्य धन्यची होईजे ॥ २४ ॥

## ७ देवाभक्तांची अन्योन्यप्रीति.

भक्तांचा देव लोभाळु । भक्तांचे मनीचें करी ।
हारद्र[7] जीवीचें जाणे । राजा त्रैलोक्यनाथ कीं ॥ १ ॥
भक्तांसी त्याविणें नाहिं । त्यासही भक्त दुल्लभु ।
विदेशी येक ते दोघे । वेगळे नव्हती कदा ॥ २ ॥

---

१ आधार. २ रक्षण करण्यास. ३ कीर्ति. ४ वज्राचा पिंजरा; बळकट आधार. ५ नवमी आत्मनिवदन. ६ वेद ब्रह्मा व शेष. ७ अंतरंग, गुह्य.

सांपडे भक्त जा जैसा । तैसा तो होतसे तया ।
सर्वहि आपणापासीं । मनासी पुसणें बरें ॥ ३ ॥
देव तो दयाळु मोठा । अन्याय क्षमणें बहु ।
भक्तांचा साभिमानी तो । बुद्धिदाता परोपरी ॥ ४ ॥
कोण रे चालवी ऐसें । न्यून तें पुरतें करी ।
उभाचि पाठिसी देवो । जेव्हां तेव्हां क्षणक्षणा ॥ ५ ॥
साहेब[1] जाहाला मोठा । कोण वेळेसी पावतो ।
धणी ते लालची मोठे । चोरटे सेवक जनीं ॥ ६ ॥
विश्वास येकमेकाचा । कदापी न घडे जनीं ।
जपती येकमेकांला । परस्परेंची घातकी ॥ ७ ॥
मारिती वीष देताती । स्वामी सेवक ते पाहा ।
आडोन चालते सृष्टी । विपट पाडिलें सदा ॥ ८ ॥
देवासी तुळणा कैंची । पाहों जातां भुमंडळीं ।
भक्त होईल देवाचा । संसार सर्व सांडुनी ॥ ९ ॥
त्यास वोढेल हे सृष्टी । यदर्थीं संशयो नसे ।
प्रत्यय वाक्य नेमाचें । कीतेक जाणते जनीं ॥ १० ॥
भक्तांला काय उणें रे । देव त्रैलोक्य वर्तवी ।
तो देव आपुला जाला । वैभवा कोण पूसतें ॥ ११ ॥
टाकितां लावितो मागें । देव दाताचि जाहला ।
घ्यावें तें कोण तें कीती । त्रैलोक्य भरलें असे ॥ १२ ॥
आपण सर्व देवाचा । देवाचें आपणाकडे ।
किती घ्यावें किती न्यावें । भोगावें कोण तें किती ॥ १३ ॥
दाता अनंत भुजांचा । भडसा पुरवीतसे ।
पुरे पुरे पुरे आतां । देव देतां विटेचिना ॥ १४ ॥
भक्त तो घेईना कांहीं । देवें त्रैलोक्य दीधलें ।
सर्वही सांडिलें दोघीं । येकमेकासि लाविती ॥ १५ ॥
ऐसी हे प्रीती दोघांची । चढती वाढती सदा ।
दोघेहि तापसी योगी । वियोगी नव्हती कधीं ॥ १६ ॥
भक्तानें अंतरीं देवो । जाणोनि धरिला बळें ।
देवही विसंभेना कीं । सोडीना भक्तवत्सल ॥ १७ ॥
भक्तांचें न्यून सोसीना । न्यून तें पुरतें करी ।
भक्ताचा भारवाही तो । ब्रीदेंचि चालिली असे ॥ १८ ॥

१ लौकिकांतले मालक.

अभावें भर्वसा नाहिं । मूढाला निश्चयो नसे ।
दया हे थोर देवाची । भक्ताला वज्रपंजरु ॥ १९ ॥
रामदास म्हणे माझा । राम स्वामी दयानिधी ।
सोडिले बंद देवाचे । तो हा त्रैलोक्यनायकु ॥ २० ॥

## ८ असारास भुलूं नका, सार पहा.

देश काळ वर्तमान । सर्व ही अवेवधानें[1] ।
कोणतें विधीविधान । सावधान सावधान ॥ १ ॥
मनास लागली सवे[2] । विधीविधान तें नव्हे ।
चुकोन हेत जातसे । जनांस घात होतसे ॥ २ ॥
उदंड धंड दंडिलें । उगेंचि मुंड मुंडिलें ।
अनेक मत्त[3] वेष हो । रिपूंसि ही न हो न हो ॥ ३ ॥
शरीरवेष पालटे । परोपरीं नटे नटे ।
परंतु[4] काय साधिलें ? । अगम्य कोण शोधिलें ? ॥ ४ ॥
उदंड हो नका नका । समस्तही पडे चुका ।
गृहेंचि पाहातां वरी । परंतु कोण अंतरीं ॥ ५ ॥
बहु गृहांतरीं गृहें । शरीरनाम निग्रहें ।
परंतु कोण निग्रही[5] । उदंड मत्त आग्रही ॥ ६ ॥
तया प्रभूसि नेणता । उगेंचि व्यर्थ शीणता ।
प्रसंगमान जाणिजे । परी खुणेंसि बाणिजे ॥ ७ ॥
शरीरमात्र तें भलें । तयांत कोण शोभलें ।
न जाणतां नव्हे भलें । सिणोन काय उगलें ॥ ८ ॥
समस्तदेहधारकु । समस्तसौख्यकारकु ।
बहु तनूंत येकला । परोपरीं विभागला ॥ ९ ॥
कितेक ते भले भले । तयामधेंच गुंतले ।
विचार सार[6] जागवा । तुह्मी तुह्मांस उगवा ॥ १० ॥
कितेक दृश्य जुळलें । विचारितां वितुळलें ।
अलक्ष लक्षितां नये । अनन्यता मनोजये ॥ ११ ॥

---

१ सर्वत्र व्यग्रतेनें अनवधानानें व गतात, एकाग्र विचार नाहीं. २ संवय. ३ बाह्य वेषानेंच कृतार्थता मानणारे. ४ वेष पालटण्यानें काय मिळतें, कोणतें अगम्यत्व आकळतें ? ५ गृहांना निग्रह करणारा कोण, गृहरूप देवालयांत देव कोण तो अंतरात्मा. ६ पलीकडे निर्गुण ओळखा.

समस्त मान मानिसी । तरी जनास मानसी ।
अलीकडे पलीकडे । विभक्त भक्त नावडे ॥ १२ ॥

## ९ वेद, विधिविधान, कर्म, दृश्य ओलांडून पल्याड चला.

विना प्रचीत मर्गळा । तयास वेद अर्गळा[1] ।
स्वयेंचि जो भुपाळ कां । तयास द्वारपाळ कां[3] ॥ १ ॥
कितेक लोक आळिले । कितेक द्वार पाळिले ।
तयास ही नका नका । उठेल काय सेवका ॥ २ ॥
भ्रमें भुलेल चोर तो । तथा हरामखोर तो ।
तयास हाल हाल रे । झडेल बालबाल रे ॥ ३ ॥
अनेक भास नावरी । मदार ठेविला सिरीं ।
घबाड[4] अर्थ जातसे । भलाच भूस खातसे ! ॥ ४ ॥
आभास भूस भासलें । विचारितां विनासलें ।
विशेष मानवा रसु । भुसास खाय तो भुसु ॥ ५ ॥
अनेक देश हिंडतां । अनेक भास धुंडितां ।
सुशब्द तो अनेक रे । परंतु अर्थ येक रे ॥ ६ ॥
विचारितां विवंचना । विधी शरीरभावना ।
विचार पाहातां नसे । देहे विदेह नीरसे ॥ ७ ॥
निरास पंचभूतिकां । प्रपंच हा दिस फिका ।
तयांत सर्व आटलें । परंतु दृश्य लोटलें ॥ ८ ॥
विधीविधान वर्ततां । जनामध्यें प्रवर्ततां ।
विचार सार अंतरीं । विधी नसे तदंतरीं ॥ ९ ॥
विधीविधान तो गुणा । घडल कोण निर्गुणा ।
गुणांत गोविला गळा । विवेकपंथ मोकळा ॥ १० ॥

## १० कर्म उपासना ज्ञान, व विज्ञान.

त्रिकांड वेद बोलिला । उदंड अर्थ चालिला ।
बुझेल तो भला भला । जनीं महंत शोभला ॥ १ ॥
देहासि कर्म लागलें । विध्युक्त चालतां भलें ।
बहूत कर्म शोभलें । भलें तयास लाभलें ॥ २ ॥

---

१ अडाणी. २ अडसर, अडथळा. ३ वेद द्वारपाळासारखा आहे, त्याला बाहेर ठेवून वेदगर्भ शोधा, तुम्ही स्वतःच धनी स्वात्मागम आहांत ४ विश्वास. ५ स्वानंद टाकून बाह्य विधिविधानांत-कर्मकांडांत अडकतां, भूस ( कर्मफळ ) खातां, दृश्य सगुण ओलांडून पल्याड जा, निर्गुण पहा.

प्रमीत[1] शौच आचमनें । विध्युक्त स्नान तर्पणें ।
त्रिकाळ सांग मार्जनें । दिनेषु वन्हिपूजनें ॥ ३ ॥
स्वधर्मकर्म सांग तें । नसे कदापि व्यंग तें ।
चुकों नये चुकों नये । चुकीस प्रत्यवाय ये ॥ ४ ॥
स्वहा स्वधा परोपरीं । अखंड शास्त्र विवरी ।
सुशीळ न्यायवंत तो । बहू जनांसि मान्य तो ॥ ५ ॥
प्रयोग याग वेदिका । प्रसंग जाणता निका ।
यथाविधी परायणू । समर्थ तोचि ब्राह्मणू ॥ ६ ॥
यजनयाजनादिकें । आधेन तें अध्यापकें ।
स्वदान हो प्रतिग्रहो । विशेष नेमनिग्रहो ॥ ७ ॥
उदंड शास्त्र संमती । बहू पुराण व्युत्पती ।
पाहातसे श्रुतिस्मृती । अचूक धारणा धृती ॥ ८ ॥
सुमंत्र यंत्र जे जया । विशुद्ध आगमीं क्रिया ।
कितेक वायुधारणा । अगत्य कार्यकारणा ॥ ९ ॥
अपार कर्ममार्ग हा । घडेचिनाच सांग हा ।
कचाट कर्मसूचना । पुढें असे उपासना ॥ १० ॥
स्वधर्म चूकतां जनू । हरी पतीतपावनु ।
दुजा जनीं असेचिना । म्हणोनियां उपासना ॥ ११ ॥
उदंड देवदेवता । जनीं बुझेल पूरता ।
ऋणानबंद जीकडे । भजेल लोक तीकडे ॥ १२ ॥
उदंड देव ते जनीं । उदंड भक्त पूजनीं ।
विधीविधान वेगळें । माहात्म्य चालिलें बळें ॥ १३ ॥
अनेक मंत्र देवता । अनेक भक्त भाविता ।
स्वयेंच वेद बोलिला । म्हणोन लोक चालिला ॥ १४ ॥
जयास जेंचि पाहिजे । तयास तेंचि वाहिजे ।
फळें फुलें परोपरीं । नैवेद्य खाद्यकूसरी ॥ १५ ॥
सुगंध गंधलेपनें । बहूविधा विलेपनें ।
तिथीच वार वांटले । जया तया विभागले ॥ १६ ॥
जयास जे सदा प्रिती । बहुत लोक नौसिती ।
भुमंडळीं परोपरी । विधीविधानकूसरी ॥ १७ ॥
अनेकदेव पूजनें । अनेकमंत्र सुमनें ।
अनेकनाम चिंतनें । अनेक तें उपोषणें ॥ १८ ॥

१ नियमित.

भुमंडळीं भले भले । बहुत देव स्थापिले ।
किती म्हणोन बोलणें । विधीविधान चालणें ॥ १९ ॥
उदंड वाम सव्य हा । विचार आगमी पहा ।
द्वितीय कांड बोलिलें । उपासकां निरोपिलें ॥ २० ॥
समस्त देव ते मुळीं । बहुविधा भुमंडळीं ।
परंतु वासना लिळा । स्वभाव जाणती कळा ॥ २१ ॥
समस्त ही मनोगतीं । रूपं समीर वर्तती ।
विचित्र देहभावना । तयापरीच कल्पना ॥ २२ ॥
बहुत सुक्षमें रूपें । स्थुळें धरून साक्षपें ।
देहे कदा दिसेचिना । कितेक दाविती जना ॥ २३ ॥
बहुविधा परोपरीं । प्रचीत चालते खरी ।
उपाय कामना पुरे । जनांत देव वावरे ॥ २४ ॥
कितेक स्वप्न देखती । कितेक देव भाविती ।
कितक लागती सळें । उदंड मागती बळें ॥ २५ ॥
न पावतांच यातना । परोपरीं बहु जना ।
कितेक देव धांवती । मनोगतांच पावती ॥ २६ ॥
कितक ते भले भले । कितेक साक्ष पावले ।
पदोपदींच चालणें । पदोपदींच बोलणें ॥ २७ ॥
प्रत्यक्ष देव रक्षिती । प्रत्यक्ष देव भक्षिती ।
प्रत्यक्ष देव ते किती उभाउभी करामती ॥ २८ ॥
बहु जनीं प्रसन्नता । प्रत्यक्ष चालते सत्ता ।
चुकों नये चुकों नये । चुकावितां महद्भये ॥ २९ ॥
कळे तया उदंड हें । म्हणोन ज्ञानकांड हें ।
समूळ सर्व जाणणें । तयास ज्ञानसें म्हणें ॥ ३० ॥
भजन तें बहुविधा । तयांत मुख्य नवविधा ।
तयांत हे निवेदनी । जनीं पतीतपावनी ॥ ३१ ॥
प्रचीतिनेंचि सूटका । प्रबोध सांपडे निका ।
प्रपंच होतसे फिका । निःशब्द गूज हें शिका ॥ ३२ ॥
विचारसार पाहातां । विवंचनेंत राहातां ।
पुढें समस्तही कळे । विशुद्ध बोध नीवळे ॥ ३३ ॥

१ दासबोध १०-३-९।१० पहा. २ आग्रहानें.

विचार तत्व बोधितां । चतुर्य[1] वाक्य शोधितां ।
सद्दश्यत्वेंचि जातसे । भुतीक[2] व्यर्थ होतसे ॥ ३४ ॥
देहेसमंध अष्टधा[3] । कळे विचार पष्टधा ।
तनुचतुष्टनिदर्शनें । अगम्य होत दर्शनें ॥ ३५ ॥
अचंचळींच चंचळा । बळें बळावली बळा ।
मुळींच कल्पना दिसे । विचारतांच नीरसे ॥ ३६ ॥
द्विधा तनुचतुष्टही । ब्रह्मांड पिंड अष्ट ही ।
शरीर निरसनांतरें । उरेल काये तें खरें ॥ ३७ ॥
अनंत तें अपार तें । अलक्ष थोर सार तें ।
मनासि होय उन्मनी । अनन्य तो निरंजनी ॥ ३८ ॥
निःशब्द शब्द खुंटला । विवादवाद तूटला ।
निवृत्ति वृत्तिशून्य हो । नुरेचि पापपुण्य हो ॥ ३९ ॥
तुटोनि मोक्षबंधनें । अभेद भेद साधनें ।
न सिद्ध रे न बद्ध रे । विभक्त भक्त उद्धरे ॥ ४० ॥

## ११ निरंजन देव.

सामान्य देव केले ते । अंतरात्मा विशेष तो ।
परंतु सेवटीं जातो । धन्य देव निरंजनु ॥ १ ॥
चळेना ढळेना देवो । रुळेना मळेना कदा ।
तुटेना फुटेना कांहिं । आदीं अंतीं जसा तसा ॥ २ ॥
दोनी पुरुष ये लोकीं । क्षराक्षरची बोलिजे ।
क्षर तें सर्वही भूतें । साक्षी कूटस्थ अक्षरु ॥ ३ ॥
उत्तमू ईश तो अन्य । परमात्मा बोलिजे तया ।
नाम रूप नसे तेथें । निर्विकारी गुणातीतु ॥ ४ ॥
छेदेना छेदितां शस्त्रें । जळेना पावकें कदा ।
उदकानें कालवेना तो । शोषेना वात लागतां ॥ ५ ॥
भुमी ना आप ना वन्ही । वायो चंचळ तो नव्हे ।
भुतें गुण अंतरात्मा । याहुनि वेगळा असे ॥ ६ ॥
देहे चत्वार ब्रह्मांडीं । पंचीकर्णची बोलिलें ।
ते देहनिरसनीं कैसें । कोण तें सार ऊरलें ॥ ७ ॥
निर्गुणीं गांठी घालावी । त्रिगुणीं बरवें नसे ।
गुणातीत परब्रह्म । संतसंगेंचि पाविजे ॥ ८ ॥

---

१ चार वेदांतील चार महावाक्यें. २ पंचभौतिक. ३ पिंडब्रह्मांडाचे अष्ट.

सारासार विचारावें । नित्यानित्यविवेक हा ।
दृश्य हें नासतें जातें । क्षणक्षणा काळांतरीं ॥ ९ ॥
अदृश्य दृश्य हें दोनी । निराभासीं न भासती ।
दृष्टिभासीं मनोभासीं । कल्पना कळहो करी ॥ १० ॥
निर्विकल्प परब्रह्मीं । कल्पना पाहतां नसे ।
कळेना आकळेना तें । अनिर्वाच्य म्हणोनियां ॥ ११ ॥
जाणसी तितुकें मिथ्या । सांगसी तितुकें नव्हे ।
सर्वसंगपरित्यागें । वृत्तिशून्य महामुनी ॥ १२ ॥
निवृत्तिउन्मनीमधें । काय वाच्यांश बोलणें ।
लक्षांश कल्पना लक्षी । निर्विकल्पीं असेचिना ॥ १३ ॥
पंचीकरण महावाक्यें । देह चत्वार निरसनें ।
अहं सोहं नुरे तेथें । मुख्य स्थिती बरी पाहा ॥ १४ ॥
पाहणें बोलणें कोणें । साधकु गुप्त जाहाला ।
बोलिजे कळायासाठीं । कळतां कळणें नसे ॥ १५ ॥
जड तें जाणती सर्वे । कोणी ते चंचळाकडे ।
निश्चळीं लक्ष लावीसा । विरुळा पाहतां जनीं ॥ १६ ॥
उत्तमु प्रत्ययज्ञानी । मध्यमु शास्त्रनिश्चयी ।
अधमु लोकधाटीचा । पाषांडी अधमाधमु ॥ १७ ॥
उत्तमु कल्पनातीतु । मध्यमु शब्दबोलिका ।
अधमु नेणता गर्वी । पापी तो अधमाधमु ॥ १८ ॥
उत्तमु मुख्यज्ञानी तो । मध्यमु तो उपासकु ।
अधमु संशयी कर्मी । कर्मभ्रष्ट अधमाधमु ॥ १९ ॥
धन्य जो सर्वही जाणे । सार शोधून घेतसे ।
प्रत्ययेंवीण मानीना । तो ज्ञाता दुल्लभु जनीं ॥ २० ॥
राम तो कोण तो जाणा । दास तो कोण तो कसा ।
भक्ती निवेदनी कैसी । ऐसें हें जाण साधका ॥ २१ ॥

## १२ कर्ता देव.

नेणतां जन्मती प्राणी । जाणतां जन्म चुकती ।
नेणतां जन्मदारिद्री । जाणतां भाग्य होतसे ॥ १ ॥
जाणणें जाणत्यापासीं । नेणत्याला कसें कळे ।
सावधीं संग शोधावा । कळतां कळतां कळे ॥ २ ॥
जाणणें नीतिन्यायाचें । सत्य नेमस्त बोलणें ।
यत्नाचा साक्षपी प्राणी । तो येक भाग्य मेळवी ॥ ३ ॥

बुद्धीनें सर्वही होतें । बुद्धीदाता नारायणु ।
आधीं तो आपुला कीजे । लक्ष्मी चरणीं वसे ॥ ४ ॥
विष्णु तो कोण तो कैसा । पाळीतो कवणेपरी ।
त्रैलोक्य पाळकु येकु । धन्य लीळा न वर्णवे ॥ ५ ॥
देहाच्या घेतल्या बुंथी[1] । प्राणिमात्रांसी वर्तवी ।
कर्तृत्व दिसतें डोळां । कर्ता कोठेंचि नाडळे ॥ ६ ॥
धन्य रे धन्य कर्ता तो । रंगरूपें बहुगुणी ।
केलें तें पाहावेना कीं । ऐकिलें नवचे कदा ॥ ७ ॥
कोण कोणे घटीं कैसा । चालवी बोलवी पाहा ।
नाना विद्या कळा युक्ती । स्वयें देवचि जाणता ॥ ८ ॥
येकला पुर्वला कैसा । हेची येक अपूर्वता ।
अनंत भेद योनीचे । सांग साहित्य दाखवी ॥ ९ ॥
होय रे सूत्रधारी हा । नाना सूत्रें बहुविधा ।
नाचवी खेळवी सर्वै । त्रैलोक्य सचराचरीं ॥ १० ॥
तो देव वोळखावा रे । लोक हो विसरों नका ।
भक्त जो तोचि जाणावा । यदर्थीं संशयो नसे ॥ ११ ॥

## १३ गायनी विद्या.

संगीत गायनी विद्या । सर्व सद्या मनोरथा ।
विदेश पाहातां नाहिं । धन्य ते गायनी कळा ॥ १ ॥
आवडी सकळां लोकां । प्रीतीनें भजती जनीं ।
इच्छिलें पुरविती सर्वै । धन्त ते गायनी कळा ॥ २ ॥
वेधिली सर्वही चित्तें । बोधिली लोक भाविकें ।
अद्भुत गुण देवाचे । धन्य ते गायनी कळा ॥ ३ ॥
येकाकी महंती येते । उदंड कीर्ति वाढते ।
विख्यात सकळै लोकीं । धन्य ते गायनी कळा ॥ ४ ॥
राहती लोक ते राजी । आवडी उपजे मनीं ।
वर्णितां कीर्ति देवाची । धन्य ते गायनी कळा ॥ ५ ॥
दुसरी भक्ती देवाची । जगोद्धाराचि होईजे ।
घमंड गाजतें मोठें । धन्य ते गायनी कळा ॥ ६ ॥
बारीक उठती कीळा[2] । नाना तंत परोपरीं ।
ऐकतां गुदगुल्या होती । धन्य ते गायनी कळा ॥ ७ ॥

---

१ घुंगट, आवरण. २ गायनांत एकवीस स्वर तीन ग्रामाच्यां धोरणानें होतात यांचें नांव.

बाळकें श्वापदें पक्षी । लोधती वेधती मनीं ।
चित्त निश्चित होताहे । धन्य ते गायनी कळा ॥ ८ ॥
संगीत मूर्छना ताळें । मुर्कुंडी होतसे बळें ।
विताळ पाहातां नाहिं । धन्य ते गायनी कळा ॥ ९ ॥
प्रबंदें कीर्ति देवाची । जाड दृष्टांत नेटके ।
रसाळ गौल्यता मोठी । धन्य ते गायनी कळा ॥ १० ॥
नाना प्रकारीचीं मानें । कीर्ती प्रताप होतसे ।
अतूळ तूळणा नाहीं । धन्य ते गायनी कळा ॥ ११ ॥
भक्तीची आवडी मोठी । करुणाकीर्तनें बरीं ।
भक्तांची आवडी भक्तां । धन्य ते गायनी कळा ॥ १२ ॥

## १४ चमत्कारेंचि धांवणें.

नक्रानें शक्र हस्तीचा[१] । पानेडी[२] धरिला बळें ।
तत्काळ सोडिला देवें । चमत्कारेंची धांवणी ॥ १ ॥
अरिष्टें निर्मिलीं नाना । पिता पुत्रास मारवी ।
प्रल्हादाकारणें तेथें । चमत्कारेंची धांवणी ॥ २ ॥
कापट्य कौरवीं केलें । पंडुपुत्रासी जिंकिलें ।
द्रौपदीकारणें तेथें । चमत्कारेंची धांवणी ॥ ३ ॥
कोपली सापत्न माता । लेंकुरासी धिक्कारिलें ।
त्या ध्रुवाकारणें तेथें । चमत्कारेंची धांवणी ॥ ४ ॥
दुर्बळां दुग्ध मिळेना । दाखविलें देवाकडे ।
उपमन्याकारणें तेथें । चमत्कारेंची धांवणी ॥ ५ ॥

## १५ मैत्री.

माझें माझें तुझें माझें । ऐसी हे मैत्रिकी जनीं ।
माझें तुझें तुझें तुझें । ऐसें हें न घडे कदा ! ॥ १ ॥
आशेची मैत्रिकी खोटी । दुराशा विटंबी पुढें ।
परोपकारणी मैत्री । ते मैत्री न विटे कदा ॥ २ ॥
अविश्वासें वस्ती केली । विश्वास हृदईं नसे ।
विकल्पें चालते मैत्री । ते मैत्री आत्मघातकी ॥ ३ ॥
मित्र हा गोत्रजु बंधु । आपलें पारिखें जनीं ।
विकल्पेंवीण जें सख्य । तें सख्य सुख दाखवी ॥ ४ ॥

१ गजेंद्र. २ पानिवडा, पानवडा, पानोडा=पाणवाट, स्नानाची व धुण्याची जागा. ज्ञाने० ६-४०७ पहा.

अडोनी[1] मैत्रीकी केली । ते मैत्री कार्यवादिणी ।
न होतां कार्य तें तुटे । विस्कटे सख्य मागुतें ॥ ५ ॥
मित्र ते मिळाले दोघे । दोघेहि शठ लालची ।
टोणपे तामसी वेडे । करंटे आळसी सदा ॥ ६ ॥
ऐसी ते काय ते मैत्री । व्यर्थची वय वेचलें ।
अभ्यास नाडळे जेथें । मोठें पाप सरेचिना ॥ ७ ॥
मित्र तो पाहिजे ज्ञानी । विवेकी जाणता भला ।
श्लाघ्यता पाहिजे तेथें । येहलोक परत्र हि ॥ ८ ॥
उगाची वेळ घालाया । नासके मित्र पाहिले ।
कुबुद्धी कुकर्मी दोषी । त्याचें फळ भोगावया ॥ ९ ॥
सारीचे[2] मित्र नारीचे । चोरीचे चोरटे खवी[3] ।
मस्तीचे चोरगस्तीचे[4] । कोडगे लात पावती ॥ १० ॥
संगदोषें महादुखें । संगदोषें दरिद्रता ।
संगतीनें महद्भाग्य । प्राणी प्रतक्ष पावती ॥ ११ ॥
संग तो श्रेष्ठ शोधावा । नीच सांगात कामा नये ।
न्यायवंत गुणग्राही । यत्नाचा संग तो बरा ॥ १२ ॥

## १६ तो प्राणी ह्मैसमंगळु.

विवेकें निश्चळू जाला । सर्व संदेह तूटला ।
मागुता संदेह बाधी । तो प्राणी ह्मैसमंगळु[5] ॥ १ ॥
दृश्य मिथ्या कळों आलें । संगत्यागें निरंजनु ।
जनाच्या दंडकें भूले । तो प्राणी ह्मैसमंगळु ॥ २ ॥
पंचीकरण महावाक्यें । निर्धारें मुक्त जाहाला ।
ढांसळे जनाच्या बोलें । तो प्राणी ह्मैसमंगळु ॥ ३ ॥
शास्त्रें पाहातो वेडा । मागुता संशयीं पडे ।
पराधीन जिणें ज्याचें । तो प्राणी ह्मैसमंगळू ॥ ४ ॥
विरागें त्याग होईना । बराडी बापुडा दिसे ।
शुचि नाहीं कळा नाहीं । तो प्राणी ह्मैसमंगळु ॥ ५ ॥
पोटासाठीं फिरे वेडा । बडबडी ज्ञान सर्वदा ।
प्रपंचीं हांसती ज्याला । तो प्राणी ह्मैसमंगळु ॥ ६ ॥
मुळींचा श्रेष्ठ कुळींचा । आतांचि भ्रष्टला दिसे ।
सांग तो नीच यातीचा । तो प्राणी ह्मैसमंगळु ॥ ७ ॥

१ अडवून. २ सारीपाटाचे, सोंगट्याचे. ३ दुष्ट ? ४ चोराच्या कामांतले. ५ मठ्ठ.

विपारा हांसतो लोकीं । हांसतां भांडतो जनीं ।
ळालची तामसी वेडा । तो प्राणी ह्मैसमंगळु ॥ ८ ॥
ग्रंथ नाहीं कथा नाहीं । नाहीं ज्ञान उपासना ।
निश्चयो येकही नाहीं । तो प्राणी ह्मैसमंगळु ॥ ९ ॥

## १७ सरस्वती.

जिवामधील जाणती । कळाचि ते सरस्वती ।
मनांतरीं वसे सदा । प्रसंन्न रूप शारदा ॥ १ ॥
कळा कळाचि वीकळा । समर्थ जाणती कळा ।
अचंचळाचि चंचळा । निचंचळा दुचंचळा ॥ २ ॥
अनेक सौख्यदायका । अनेक लोकनायका ।
अनेक धारणा धरी । अनेक चाळणा करी ॥ ३ ॥
अनेक पंथ चालवी । अनेक मत्त हालवी ।
निशब्द खूण पालवी । मनें मनास मालवी ॥ ४ ॥
उरेचिना सरेचिना । पुरेचिना धरेचिना ।
असेचिना नसेचिना । वसेचिना दिसेचिना ॥ ५ ॥
अगम्य गम्य गम्य रे । प्रणम्य नम्य नम्य रे ।
असो जसी तसी असो । मदांतरींच वीलसो ॥ ६ ॥
चतुर जाणते जनीं । करा विचारणा मनीं ।
सरस्वतीस वोळखा । उगे भरीं भरों नका ॥ ७ ॥
कसी कसी कितेकसी । पाहाचनाच कोणसी ।
आँहाच पाहातां नये । विचारितां प्रचीत ये ॥ ८ ॥
प्रचीति ये तिची तिला । उगाचि काय गल्बला ।
दुभाव भासतो पाहा । समस्त व्यापिनी महा ॥ ९ ॥
असेल तें सुखें असो । नसेल तें सुखें नसो ।
कळेल त्या सुखें कळो । वळेल त्या सुखें वळो ॥ १० ॥
उदास दास बोलणें । उदास दास चालणें ।
उदास याचिकारणें । नव्हे मनासि पारणें ॥ ११ ॥
गणेश वेष पूजिती । गणांतरीं सरस्वती ।
जना उफारटें दिसे । परंतु सत्य हें असे ॥ १२ ॥
उफारटें सुफारटें । नटे विचार नीवटे ।
नसोन शारदा वदा । उगेंचि सीणता सदा ॥ १३ ॥

---

प. २ सरस्वती म्ह० प्राणिमात्रांतील जाणती कळा, मूळमाया. ३ करकर. जाणीव.

अहो जना ह्मणे कवि । तुह्मांस कोण सीकवी ।
बहुत गुंतले दिसा । करा विचार नीरसा ॥ १४ ॥
तुह्मांस कोण बोलवी । तुह्मांस कोण चालवी ।
तुह्मांस कोण हालवी । समस्तही लव्हा[1]ळवी ॥ १५ ॥
जनामधें प्रभंजनु । प्रभंजनामधें मनु ।
मनांतरींच शारदा । समस्त जाणते सदा ॥ १६ ॥
खडेंच सार भूतळीं । पियूषसार ते जळीं ।
रवीच सार पावकीं । जनास हा उपाव कीं ॥ १७ ॥
प्रभंजनांत जाणती । कळाचि ते सरस्वती ।
नभांत ब्रह्म सार हो । करा बरा विचार हो ॥ १८ ॥
तनूंत मानवी तनु । तयांत सार आननु ।
शिरांत सार लोचनु । सुलोचनीं प्रभंजनु ॥ १९ ॥
प्रभंजनांत वासना । विचार येउं द्या मना ।
समस्त जाणती कळा । बरे चतुर नीवळा ॥ २० ॥
किती करूं विवेचना । हरीजनासि सूचना ।
समीर सर्वसार हो । तयांत ही विचार हो ॥ २१ ॥
विचाररूप जाणणें । खुणेसि खुण बाणणें ।
स्वभाव चालिला बळें । वदोन काये पां[2]वळें ॥ २२ ॥
मनास मानला जये । जनास कां कळों नये ।
वडील कोण माईका । कदापिही वदों नका ॥ २३ ॥
समस्त स्वप्न वोसरे । तरीच जागतें खरें ।
कळावयास बोलणें । विशेष तें अबोलणें ॥ २४ ॥
सगुण भक्ति वोळली । उपासना कलोळली ।
शरीर भावना भरे । जना समस्त हें खरें ॥ २५ ॥

## १८ खरा देव तो आदरें वोळखावा.

जनीं लोचनीं पाहतां दीसताहे । तया नाश काळांतरीं होत आहे ।
अवीनाश[3] तो कोण आधीं पहावा । खरा देव तो आदरें वोळखावा ॥१॥
जनीं धुंडितां देव नानापरीचे । बहू धातु पाषाण कां मृत्तिकेचे ।
जया खेवं[4] तो देव कैसा म्हणावा । खरा देव तो आदरें वोळखावा ॥२॥
बहू देव ते जन्मले आणि मेले । असंख्यात होणार होऊनि गेले ।
जया नाश तो जाण मिथ्या म्हणावा । खरा देव तो आदरें वोळखावा ३

१ चळवळ. २ तुच्छ. ३ अविनाश, शाश्वत. ४ अपाय, नाश.

जगीं धुंडितां धुंडितां आडळेना । कदा सद्गुरूवीण ठाईं पडेना ।
सदा सर्वदा तोचि धुंडीत जावा । खरा देव तो आदरें वोळखावा ॥ ४ ॥
जयावीण कोठें रिता ठाव नाहीं । तया शोधितां तोचि होऊनि राहीं ।
म्हणे दास विश्वास भावें धरावा । खरा देव तो आदरें वोळखावा ॥ ५ ॥

## १९ प्रपंचाचें वेड.

बाबा काका माउसा मित्र मामा । दादा नाना मेहुणा पुत्र शामा ।
ताता जीजी गोत ज्यामात साडू । नातू भाचे पूतणे हा पवाडू[1] ॥ १ ॥
आया बाया माउशा पूतणीया । काक्या माम्या सासुवा मेहुणीया ।
आज्या आता भाचिया आणि सूता । सूना कांता गोत्रजी त्या बहूता २
ऐसीयांचीं सोइरीये प्रपंचीं । नांवें घेती सर्व नानापरीचीं ।
लोभें लोभें गुंतलें चित्त येथें । कोणही नाहीं राघवेंवीण तेथें ॥ ३ ॥
छत्र्या घोड्या वैभवें फार जालीं । त्यांचे भेटी सोइरीं सर्व आलीं ।
सालीं धालीं कैचकैचीं मिळालीं । वाखा होतां सर्व सेखीं पळालीं ॥४॥
येका पोटाकारणें सर्व कांहीं । ये संसारीं पाहतां सूख नाहीं ।
देवा देवा काय होईल कैसें । ऐसें तैसें लागलें हें चि पीसें ॥ ५ ॥

## २० कोणाचें कोणाशीं पटत नाहीं !

बहू आंतुरां[2] चांतुरांही[3] पडेनां[4] । कदा कातरां वार्तरां ही पडेना ।
बहू निंदकां वादकां ही पडेना । बहू साधकां बाधकां ही पडेना ॥ १ ॥
कदा देवदैत्यांमधें सख्य नाहीं । जिवांमानवांही मधें सख्य नाहीं ।
स्वजातीविजातींमधें सख्य नाहीं । महंतां महंतांमधें सख्य नाहीं ॥ २ ॥
कळहो लागला पंडितां पंडितांला । कळहो लागला ज्ञानियां ज्ञानियाला ।
कळहो लागला योगियां योगियांला । कळहो लागला तापसां तापसांला ३
यती भीइती भांडती दीर्घद्वेषें । सदा निंदिती येकमेकां निशेषें ।
बळें बोलती हाकिती घोरघोषें । अहंतागुणें सांडितां ज्ञानतोषें ॥ ४ ॥
बहू जाणते बोलती शास्त्रमत्तें । जनीं दाविती आपुले व्युत्पतीतें ।
उणें बोलती शीघ्रकोपें बहूतें । बळें मारिती येकमेकांसि हातें ! ॥ ५ ॥

## २१ रडक्यांचा रडका संसार.

नसे आंथराया नसे पांघराया । नसे धार्म ना दृढ छाया निजाया ।
नसे अन्न खाया नसे रम्य जाया । वृथा सीण संसार कर्ती रडाया ॥१॥

---

१ विस्तार. २ उतावीळ, भावनाप्रधान. ३ तर्कप्रधान, दक्ष. ४ पडत नाहीं. ५ भित्रा. ६ हट्टी. ७ कलह. ८ घर, सत्तेचें खोपटही.

नसे द्रव्य कांहीं घरीं धान्य नाहीं । बहू वेष्टिला कामक्रोधादि देहीं ।
पराधीनता वेळ नाहीं मराया । वृथा शीण संसार कर्तीं रडाया ॥ २ ॥
मनासारिखा मित्र तोही मिळेना । परत्रीक[1] तें ज्ञान पोटीं वसेना ।
सदा कोपआरोपसंततप्तकाया[2] । वृथा सीण संसार कर्तीं रडाया ॥ ३ ॥
मनासारिखा सोइराही मिळेना । मनीं पाहतां चित्तशुद्धी असेना ।
उणें बोलती सर्व कांहीं छळाया । वृथा शीण संसार कर्तीं रडाया ॥४॥
म्हणे दास हे आस कैसी पहा हो । सुखाची बहू होतसे श्लाघ्यता हो ।
पुढें जाहली सर्व काया पडाया । वृथा सीण संसार कर्तीं रडाया ॥ ५ ॥

## २२ देहभूत.

स्वभावेंचि जालें गुणा सर्व आलें । किती वाढलें मोडलें तें निमालें ।
किती होत गेले किती जात गेले । किती येक ते देह गेलेचि गेले ॥ १ ॥
म्हणे दास रे वास जेथें भुतांचा । भुतें सांडुनी शोध घ्या अद्भुताचा ।
नसे भूत अद्भूत[3] त्यातें म्हणावें । विवेकें देहेभूत सर्वैं जिणावें ॥ २ ॥

## २३ संचित.

जनीं संचितें पिंड निर्माण जाला । मनीं तेंचि भोगावया जीव आला ।
शुभाशूभ होणार कांहीं कळेना । पुढें प्राप्त ब्रह्मादिकांही टळेना ॥ १ ॥
जिवा ऊगमीं देहनिर्माणकाळीं । विधी वोळि[4] लेहोनि गेला कपोळीं ।
शुभाशूभ होणार कांहीं कळेना । पुढें प्राप्तब्रह्मादिकांही टळेना ॥ २ ॥
समुद्रासि लंघून पैलाड गेले । परी भोगणें तें पुढें सिद्ध ठेलें ।
शुभाशूभ होणार कांहीं कळेना । पुढें प्राप्त ब्रह्मादिकांही टळेना ॥ ३ ॥
जनीं वैभवें थोर सायास केले । परी जीव हे मृत्यमार्गींच गेले ।
शुभाशूभ होणार कांहीं कळेना । पुढें प्राप्त ब्रह्मादिकांही टळेना ॥ ४ ॥
म्हणे दास विश्वास नामीं धरावा । मनीं शोक अत्यंत तोही नसावा ।
शुभाशूभ होणार कांहीं कळेना । पुढें प्राप्त ब्रह्मादिकांही टळेना ॥ ५ ॥

## २४ अनादिअनंत काळ.

सदा सर्वदा होतसे दीनरात्री[5] । किती येक मन्मंतरें होत जाती ।
बहू काळ गेला न ये मागुता तो । पुढें बोलतां चालतां सर्व जातो ॥१॥

---

१ परलोकीचें, परमार्थविषयक. २ कोप अनावर झाल्यामुळें शरीर=मस्तक नेहमीं तापलेलें! ३ पंचभूतांचा जेथें वारा नाहीं तें अद्भूत, तें महद्भूत. ४ ओळी, अक्षरें. ५ दिवस आणि रात्र.

पहातों जनाला किती येक जाती । तनू टाकिताहे पुढें ते पहाती ।
गताच्या कथा काढितों अल्प कांहीं । पुढें लोक ते काढिती आमुच्या ही
जितां तों किती घालमेली करावी । बहूतांपरीं कल्पना ते धरावी ।
कितीयेक तें आपुलें तें परावें । जनीं सर्व सांडूनि शेखीं मरावें ॥ ३ ॥
अहा रे मना हें तुला कां कळेना । वृथा शीणसी लोभ तूझा ढळेना ।
जिणें सर्व जाईजणें दों दिसांचें । विचारीं जनीं आपुलें काय कैचें ॥४॥
म्हणे दास ऊदास होईं मना रे । बहूसाल चिंता नको कामना रे ।
स्वभावेंचि होणार तें होइना कां । अकस्मात जाणार तें जाइना कां ॥५॥

## २५ गेलेली घडी.

सतीला पती दूसरा शोधवेना । दुजा जन्मकू बोलणें हें घडेना ।
जनीं सद्गुरूसारिखा कोण आहे । मनीं मानवा तूं चि शोधूनि पाहे ॥१॥
पहा तूटला तंत तो मंद वाजे । मनीं शोधितां चोरटें चित्त लाजे ।
पुन्हा सांदितां वेगळा सर्व सांदा । मुखें बोलणें व्यर्थ वादा वेवादा ॥२॥
स्नेहे तूटला तो कदाही जडेना । पुढें भेटि कल्पांतकाळीं घडेना ।
मनीं तूटला तंत कैसा जडावा । पुन्हा मागुता योग कैसा घडावा ॥३॥
सुखाकारणें थोर अन्याय केला । महालाभ तो लालचीनें बुडाला ।
बरें स्वप्नसूखासि वायां शीणावें । मनीं व्यर्थ मागील कां वोसणावें ॥४॥
बहू सोसितां सोसितां शीण जाला । महां मूर्ख मी कष्टवीलें तुम्हांला ।
म्हणे दास मानेल तैसें करावें । बरें वोखटें सर्वही वीसरावें ॥ ५ ॥

## २६ वर्षाकालीन वनश्री.

पसरले सरले गिरि साजरे । सरवटें[1] धुकटें भरितें भरे ।
बहुत वात झडांत झडाडितो । वरें[2] तरू वरताचि कडाडितो ॥ १ ॥
झिरपती झरती झरती झरे । न धरितां धरतां निरें[3] वावरे ।
बहुत पाभळ[4] वोघ महीतळीं । नभकटें[5] धुकटें कटपाभळी[6] ॥ २ ॥
सरस रम्य रसाळ वनांतरा । हरित[7] रंग सुरंग दिसे बरा ।
दिसतसे रमणीय वसुंधरा । नुतन पल्लव हा तरु साजिरा ॥ ३ ॥
द्रुम लता समता द्रुण मातलें । सुख मनीं सुमनीं मन रातलें ।
परम सुंदर ते खग बोलती । गमतसे वसती कमळापती ॥ ४ ॥
विमळ सूशिळ तें स्थळ पाहतां । सुखविशेष घडे पळ राहतां ।
वरदराज विराजतसे वनीं । विनटला जटला रत सज्जनीं ॥ ५ ॥

---

१ झिमझिम पाऊस. २ मोठा. ३ नीर पाणी. ४ पावळ, झरे. ५ मेघ. ६ कड्या-वरून जोरानें पाणी पडणें. ७ हिरवा.

## २७ नानागुणांचे लोक.

महीमंडळीं लोक नाना गुणाचे । असंभाव्य लीळा कळा कूसरीचे ।
किती येक साधे किती येक बोधे[1] । किती येक ते देखिले मंदबोधे ॥ १ ॥
किती येक लांताड लाबाडवाणे । किती येक पापी पुराणे पुराणे ।
किती येक कापट्य तोंडाळ ऊणे । कुशब्दी किती येक वाचाळ सूंणे ॥२॥
करंटे कुरूपी विकारी भिकारी । किती येक ते तामसी दुखकारी ।
किती येक ते पातकी पापरूपी । किती येक ते दक्ष पुण्यस्वरूपी ॥ ३ ॥
किती येक ते लोक नाना गुणाचे । किती येक ते उत्तमा लक्षणाचे ।
किती येक तारुण्य लावण्यखाणी । किती येक दीक्षा बरी रम्यवाणी ४

## २८ गर्व.

बहू थोर मी शूर मी शाहणा मी । बहू दक्ष मी धूर्त मी जाणता मी ।
बहू नाटकू नेटकू चाळकू मी । बहूतांमधें मान्यसौजन्य तो मी ॥ १ ॥
बहू बोलणें नीट नेमस्त माझें । बहू चालणें सत्य नेमस्त माझें ।
बहूसाल संगीत कर्तृत्व माझें । बहूतांमधें गोड हें सर्व माझें ॥ २ ॥
बहू चांगली वांगली नेटकी मी । बहू जाणती जाण चातुर्य ते मी ।
बहू बोलकी चालकी सुग्रिणी मी । बहू भाग्य सौभाग्य लावण्य ते मी ३
बहूसाल हें गोजिरें मूल माझें । बहू सासुरें थोर माहेर माझें ।
बहूतांमधें उंच तें कूळ माझें । बहू गोत माझें बरें सर्व माझें ॥ ४ ॥
मि माझें मि माझेंचि हें सौख्य वाटे । विटे गर्व काळांतरीं सौख्य आटे ।
म्हणे दास विश्वास हा कासयाचा । जनीं सार तें काय ऐसें विवंचा ५

## २९ कविप्रबंद.

हरीकथेसि चउडंत[4] जावें । सज्जनसंगति जूडत जावें ।
निरूपणीं मग बुडत जावें । चटकचेटककूड त्यजावें ॥ १ ॥
परमसुखावरि रीझत जा रे । षड्रिपूवरि खीजत जा रे ।
हरिगुणावरि रीझत जा रे । विवरणें मग भीजत जा रे ॥ २ ॥
शीणतसा परि लाज त्यजाना । अहंमतीवरि वाजत जाना ।
हरिजनीं मग गाजत जाना । हरिरसें करीं माजत जाना ॥ ३ ॥
विवरणें श्रम हारित जा हो । निरूपणें भ्रम सारित जा हो ।
षड्रिपूवरि मारित जा हो । बहू जना मग तारित जा हो ॥ ४ ॥
कड(क)तोकडकें घन गाजे । बहुत वाद्यकळा घन गाजे ।
कविप्रबंद जनीं घन गाजे । वरि प्रताप घनीं घन गाजे ॥ ५ ॥

---

१ हुशार. २ पायपोसखाऊ. ३ श्वानवत्. ४ चवड्यावर चालत.

## ३० ग्रंथिचा अर्थ काढा.

वंदूनि आधीं वर मोरया रे । तो भक्तिभावें करितो दया रे ।
तेणें गुणें उतरतो रया रे । होतें बहु सार्थकता वया रे ॥ १ ॥
हंसासनी सुंदर ते विराजे । ध्याती जयेला बहुसाल राजे ।
अर्थांतरीं ते मधुरा गिरा जे । अघटीत माया चिदंबरा जे ॥ २ ॥
निशीमध्यभागीं जाणें उतारा । दिसती जळीं त्या बहुसाल तारा ।
दुधगा धरी तो आत्यं(त)तारा । नौका कराया हटका सुतारा ॥ ३ ॥
वरा प्रत्ययें ग्रंथिचा अर्थ काढा । प्रसंगीं तुम्हीं ग्रंथिचा अर्थ काढा ।
करी मोकळा ग्रंथिचा अर्थ काढा । पदें तीन ये ग्रंथिचा अर्थ काढा ॥४॥

## ३१ जन्मसफलता.

निरुपणीं बरवें मन घाला । विवरतां अभिमान निघाला ।
षडरिपूवरता वरघाला । उरि पहा न दिसे चि अघाला ॥ १ ॥
भव भवीं सगळा बुडवावा । आळस तो अवघा दवडावा ।
निरुपणें भ्रम तो बडवावा । मन मनें मननें चढवावा ॥ २ ॥
अगणिता गणितां गणवेना । गणिनसें सहसा म्हणवेना ।
अवघडी सिणतां सिणवेना । वरकसा जिणितां जिणवेना ॥ ३ ॥
कविप्रबंद बरे तरि वाचा । विगळितें गळितें चि न वाचा ।
सिणविता उगली वर वाचा । वदतसें महिमा गुरुवाचा ॥ ४ ॥
अत्यंत खोट्या हिण पातरा रे । तेणें प्रपंची वर कातरा रे ।
संसार थोडा बुझ चातुरा रे । बहु दुःखकारी भव हा तरा रे ॥ ५ ॥
संसार हा दुर्लभ लाभला रे । विवेकयोगें बहु शोभला रे ।
नेणे तयां ईश्वर क्षोभला रे । भक्तीभरें जाइल तो भला रे ॥ ६ ॥
जनीं जनाला बहु सांगताती । कांहीं तरीं वीषय मागताती ।
आशेच मागें जन लागताती । देहांतकाळीं मग भागताती ॥ ७ ॥
प्रपंचरंगें बहु रंगलों रे । कठीण काळें मन भंगलों रे ।
गळीतसें वीकळ लंघलों रे । वृधाप्यकाळीं वरि खंगलों रे ॥ ८ ॥
निघोनि जावें कठिणा वनाला । अखंड गावें मग पावनाला ।
ऋणी करावें जगजीवनाला । प्रीती धरावी पदसेवनाला ॥ ९ ॥

## ३२ उमज.

भज भरें भव हा उतराया । समजतां सकळैक तराया ।
समजतां मुळ हे नुतराया । सकळही वदतों उतराया ॥ १ ॥
समजतां सकळैक तरावें । उमजतां सकळै उतरावें ।
नुमजतां सहसा नुतरावें । न भजतां म्हणती कुतरावें ॥ २ ॥

भ्रम नको सहसा गचकाया । भय नको सहसा विचकाया ।
गुढ नको सहसा दचकाया । तम नको सहसा वचकाया ॥ ३ ॥
न भरितां भरितां भरताहे । न धरितां धरितां धरताहे ।
न वरितां वरितां वरिताहे । उदित काळ तरी सरताहे ॥ ४ ॥
न करितां करितां करवेना । न भरितां भरितां भरवेना ।
न धरितां धरितां धरवेना । कठिण काळ तरी तरवेना ॥ ५ ॥
उमजतां सकळै उमजावें । समतां सकळै समजावें ।
उमजल्यावरि कां नुमजावे । समजलें तरि हें तम जावें ॥ ६ ॥
करितसे करतां करितो रे । धरितसे धरितां धरितो रे ।
हरितसे हरितां हरितो रे । भरितसे भरितां भरितो रे ॥ ७ ॥

## ३३ आत्मनिवेदन भक्ति.

आटवे[1] वनीं भूवनीं राम आहे । जनीं वीजनीं राम सर्वत्र पाहे ।
दिशा दाटल्या राम संपूर्ण जाला । विवेकेंचि तो दास रामीं मिळाला १
सदा सर्वदा सेवकेंवीण स्वामी । भले जाणती भक्ति हे मुख्य नौमी ।
स्वरूपीं भरावें बरें वीवरावें । विवेकें नुरावें जना उधरावें ॥ २ ॥
दिसे सर्व माया नसे सत्य कांहीं । विवेकें तुला तूं चि शोधूनि पाहीं ।
किती पाहसी तूजला ठाव नाहीं । देहेभावना सर्व सांडून राहीं ॥ ३ ॥
जनीं सांडणें मांडणें या मनाचें । मनीं मूळ शोधी बरें उन्मनाचें ।
परी शोधितां कल्पनारूप होसी । स्वयें संत आनंत सांडूनि जासी ॥४॥
अरे तूजपासीं तुझें तूं नसावें । मनांतील मी सर्व कांहीं पुसावें ।
निराकार तू मानि रे सत्य भावें । जनीं सर्व ही होत जातें स्वभावें ॥५॥

## ३४ जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ।

मनासारिखी सुंदरा ते अनन्या । मनासारिखे पुत्र ज्यामात कन्या ।
सदा सर्वदा बोलती रम्य वाचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा १
मनासारिखे दीर भर्तार भावे । मनासारिखें सासुर तें असावें ।
सुखें बोलती लेश नाहीं गमाचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा २
भलीं मायबापें भले मित्र बंधु । भले सोइरे राखती स्नेहवादु ।
मुलें लेंकुरें येक मेळा सुखाचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥३॥
भले धाकुटे थोरले सर्व कांहीं । भले गोत्रजु भिन्न भावार्थ नाहीं ।
अखंडीत हा काळ जातो सुखाचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥४
गुरें वांसुरें शिंगुरें[2] दास दासी । गुराखे सुणीं मंर्जेरें[3] गुणरासी ।
समां[4] चालतो लेश नाहीं तमाचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ५

१ अटवि=अरण्य. २ कुत्रीं. ३ मांजरें. ४ समता, ऐक्य.

धनें धान्य पात्रें अळंकार चीरें[1]। विसोरे घरें सुंदरें रम्य सारें।
देहे चालतो सर्व आरोग्य ज्याचा। जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ६
यहलोकिंचे लोक ते ही गुणाचे। परत्रीक ते ही बहू लक्षणाचे।
समुदाव उछाव येका मनाचा। जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥७॥
मनासारिखे ग्राम ग्रामाधिकारी। मनासारिखे लोक शोकापहारी।
मनासारिखा संग साधुजनाचा। जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥८॥
मनासारिखें चिंतिता देव पावे। मनासारिखे भक्त भावें मिळावे।
सदा बोलती बोल सारांश वाचा। जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ९
म्हणे दास सायास केल्यां घडेना। विकल्पें जनीं येक ठाईं पडेना।
घडे योग होतां विवेकी जनाचा। जनीं जाणिजे योग हा सुकृताचा १०

## ३५ अद्वैत चर्चा.

अद्वैतचर्चा कैसी करावी। चर्चे चि ऐसी क्रीया धरावी।
शब्दीं कळालाघव बोलिजेतें। रहणी मयोरापरि नृत्य होतें॥ १ ॥
सगूण तो सद्गुरु मोकलावा। सगूण तो देव चि गोफणावा।
तरी च ज्ञातेपण ख्यात जालें। न बोलतां तें सकळै बुडालें॥ २ ॥
अद्वैतचर्चा कंटाळवाणी। रहणी पहातां सकळैक घाणी।
तेणें गुणें मानस लाजताहे। होऊनियां सावध तूं चि पाहें॥ ३ ॥
सगूण भक्तीविण जो पसारा। ज्ञातेपणें घालित वोरबारा।
सगूण हें दुल्लभ थोरथोरां। तें दूरि ठेलें शाब्दीक चोरां॥ ४ ॥
क्षण येक गूणीं सप्रेम दाटे। क्षण येक ज्ञातेपण तें अव्हाटे।
दास्यत्वनामांकित आळ आला। सगूण प्रेमा सकळै बुडाला॥ ५ ॥
सगूणभक्ती विषईं विरक्ती। स्वधर्म रक्षी येथानशक्ती।
सर्वांपरी दुल्लभ तो चि ज्ञाता। वाचाळता माइक तत्त्वचिंता॥ ६ ॥
अद्वैतचर्चा अति श्लाघ्यवाणी। सांडूं नका रे वदली पुराणीं।
अद्वैतशास्त्रीं ठेवा प्रभूचा। अलभ्य हा रे सकळांसि कैचा॥ ७ ॥
अद्वैतशास्त्रें हृदईं निवावें। वादांग तें सोडुनि सर्व द्यावें।
वाच्यांश रे माइक तो तजावा। लक्षांश तो लक्ष जीवीं धरावा॥ ८ ॥
अद्वैतचर्चा द्वैतास मोडी। अद्वैतचर्चा वादास तोडी।
अद्वैतचर्चा माया विभांडी। अद्वैतचर्चा जाणीव फेडी॥ ९ ॥
अद्वैतचर्चा मुखें करावी। जाणीव पोटीं सुखें धरावी।
हें वाक्य ज्याचें तया कळेना। जाणीव देवा माझी गळेना॥ १० ॥

---

१ वस्त्रें. २ दंभ.

## ३६ परनिंदा.

बहुतां दिसांच्या वयावृध मूला । जनीं बायकोच्या गुणें जन्म तूला ।
तये जन्ननीच्या कुळा निंदितोसी । वृथापुष्ट तूं मानवांमाजि होसी ॥ १ ॥
किती दीस तें वाइले पोटवोझें । पुढें जन्मतां खंडिलें नाळ तूझें ।
जिवीं दीस मागील ते आठवावे । जनीं कष्ट कुश्चीळ कैसे करावे ॥ २ ॥
मळीं लोळतां घोळतां कष्टलासी । किती हागसी मूतसी वोकिलासी ।
खंतें खांडकें दुःख उदंड जालें । बहुतां प्रकारें तुला वाढवीलें ॥ ३ ॥
बहू जन्ननीनें तुझे कष्ट केले । बरें वोखटें सर्व साहोनि नेलें ।
मनामाजि मागील कां आठवेना । देहे पुष्ट हा वेर्थ तुझा झिजेना ॥ ४ ॥
मुढा वोंगळा वोंगळीं जन्मलासी । तुझी जन्ननी ते तुझे कष्ट सोसी ।
जनीं पाळिती सर्व नारी नरांला । तया निंदिती शुधि नाहीं खराला ५
स्वयें निंद्य तूं निंदिसी कोणकोणां । जनीं सर्व संसार हा दैन्यवाणा ।
देहे मोधळा कोथळा वांति विष्टा । किती येक दुर्गंधि वर्ती प्रतिष्टा ॥ ६ ॥
देहमात्र हा निंद्य तुला कळेना । सदा सर्वदा ताठ तुझा गळेना ।
देहातीत होतां बरें सूख आहे । मनामाजि हें तूं विचारूनि पाहें ॥ ७ ॥
म्हणे वंद्य मी निंद्य सर्वै परावे । तया कश्मळालागि रे काय ठावें ।
भल्यानें जनीं आपनिंदा करावी । नको रे नको वेर्थ निंदा परावी ॥ ८ ॥
पहा मास हाडें देहे कातड्याचें । भले निंदिती वंद्य कैचें मढ्याचें ।
मिळालीं मडीं बापुडीं दैन्यवाणीं । जनीं बाळ तारुण्य होती पुराणीं ॥९
देहेबुधि तों ज्ञान कांहीं पहावें । देहे नीरसावें नसावें नसावें ।
देहातीत आनंत शोधीत जावा । वृथा गर्व हा सर्व मागें तजावा ॥१०॥

## ३७ निरूपणें मानस आवरावें.

संसार माया ममता नसावी । नैराशता दुल्लभ ते असावी ।
आनंदरूपी भजनीं भरावें । निरूपणें मानस आवरावें ॥ १ ॥
कल्याणकारी भवशोकहारी । सत्संगती मानव मूढ तारी ।
ग्रंथांतरीं अंतर वीवरावें । निरूपणें मानस आवरावें ॥ २ ॥
परात्रिचें साधन सार आहे । नाना प्रकारीं तुळणा न साहे ।
अद्वैतबोधें श्रवणें तरावे । निरूपणें मानस आवरावें ॥ ३ ॥
सदा फिरे चंचळ वेशधारी । मनासत्रें आसन हें थरारी ।
निरंजनीं माइक तें पहावें । निरूपणें मानस आवरावें ॥ ४ ॥
पहावयातें नयनीं दिसेना । तये प्रसंगीं पळ ही वसेना ।
तया विवेकें करी पालटावें । निरूपणें मानस आवरावें ॥ ५ ॥

१ क्षत, जखम. २ पाप्याला.

नानापरी हें धरितां धरेना । कल्पीतसे तें सरतां सरेना ।
दृष्टेपणें आपण ही नुरावें । निरूपणें मानस आवरावें ॥ ६ ॥
नामाथिलें साधन साधिताहे । कडाकपाटीहुन जात आहे ।
ज्ञातेपणें मीपण वोसरावें । निरूपणें मानस आवरावें ॥ ७ ॥
ब्रह्मादिकां मानस आवरेना । नाना उपाई मरतां मरेना ।
तें निर्गुणीं पांगुळतां मरावें । निरूपणें मानस आवरावें ॥ ८ ॥
जाले तिन्ही देव तिहीं गुणांचे । निसंग होती तरि निर्गुणाचे ।
निरावलंबीं मज मी हरावें । निरूपणें मानस आवरावें ॥ ९ ॥
जनीं मनावांचुनि सूख नाहीं । मनें चि लाभे गुज सर्व कांहीं ।
परंतु तें स्वाधेन हो करावें । निरूपणें मानस आवरावें ॥ १० ॥

## ३८ परम सुंदर तें पद पावसी.

बहुत सार विचार करीं मना । दृढ धरीं रघुनाथउपासना ।
रघुविरा भजतां चि सुखावसी । परम सुंदर तें पद पावसी ॥ १ ॥
तनु मनु धनु या रघुनायेका । निरवणें धरणें सुखदायका ।
भवभयासि बळें भडकाविसी । परम सुंदर तें पद पावसी ॥ २ ॥
न करितां करितां करणें घडे । न धरितां धरितां धरणें पडे ।
विवरतां सरतां सरसावसी । परम सुंदर तें पद पावसी ॥ ३ ॥
बहुत आठवलें जिविचा जिवीं । परि कदापि नये सुखपालवी ।
वरदराम तरी बळकावसी । परम सुंदर तें पद पावसी ॥ ४ ॥
सुख बहूविध हें मन मागतें । झडकरी करितें हरि सांगतें ।
मग मनीं उगला चि उकावसी । परम सुंदर तें पद पावसी ॥ ५ ॥
अभय दे हरि बोलत बोलतां । अभय दे हरि चालत चालतां ।
अभय सूख विळास विळाससी । परम सुंदर तें पद पावसी ॥ ६ ॥
सपनिचें मनिचें जनिचें घडे । अवचितें दुचितें सुख सांपडे ।
हुडकितां बहुतांसि न फावसी । परम सुंदर तें पद पावसी ॥ ७ ॥
न घडतें घडवी रघुनंदनु । नुपरतें पुरवी भवकंदनु ।
निच नवा सकळां मनि भावसी । परम सुंदर तें पद पावसी ॥ ८ ॥
न तरते उदकीं जड तारिले । वनचरीं रजनीचर मारिले ।
विभिषणासारिसा च नवाजसी । परम सुंदर तें पद पावसी ॥ ९ ॥
सुरपती सुरबंदविमोचना । भज मना भजतां सुख सज्जना ।
सगुण दास म्हणे मग धांवसी । परम सुंदर तें पद पावसी ॥ १० ॥

## ३९ भवाचा वीट.

मना चाल ऊठीं वना दुर्गमातें। न गुंते भवागार दारादिकांतें।
विवेकें विचारें विवंचूनि पाहीं। जनीं पाहतां सर्वथा ऊरि नाहीं ॥ १ ॥
अती दुष्करें क्लेश कीजेत देहीं। तथापी तरी वीषयो प्राप्त नाहीं।
कदापी जरी लाहिजे प्राप्ति याची। तरी इंद्रियांलागि संतृप्ति कैचो ॥२॥
दुराशा करी किंकरी कोण आतां। निराशा धरी अंतरीं मुक्तिकांता।
त्यजीं अंत्यजी वृत्ति हे दुःखकामी। भजें निवृती सौख्यदाती श्रीरामी ३
बहू वीट आला भवाचा न सावे। अटव्यांत देऊनियां हाक जावें।
मनातें दमावें श्रीरामीं रमावें। दिगांतीं फिरावें जना न स्मरावें ॥ ४ ॥
जरी प्रत्यगावृत्तितें चित्त आलें। तरी वृक्षपक्षादिकीं सौख्य केलें।
उदार तपस्वी उदासीन मोठे। तयाचे गतीं संगतीं वेळ कंठें ॥ ५ ॥
सुषुप्तीअवस्थेसि भूमीं निजावें। उसें रामपाद स्मरोनी धरावें।
दिशांचा माहां पःट तो पांघरावा। सिताकारणें साह्य वन्ही करावा ॥ ६
यथावीध देहो वनामाजि जावा। तथागारगारादिकींहीं पिडावा।
श्रीरामोस्मि बोधें स्मरावा स्मरावा। रामी रामदास्यें स्वशांती निवावा ७

## ४० स्फूर्ति.

हवाया नळे बाण भांडीं[1] अनंतें। बळें सोडितां जाति आकाशपंथें।
बती लागतां वेळ नाहीं उठाया। तयाचे परी स्फूर्ति दे देवराया ॥ १ ॥
वरी पाहतां दृष्टि हे दूरि धांवे। तयाच्या सवें कल्पना हे उठावे।
उठे मारुती वेळ नाहीं उडाया। तयाचे परी स्फूर्ति दे देवराया ॥ २ ॥
फिरे वावरे वात सर्वांत जैसा। चळे नीवळे ही कळे स्पष्ट तैसा।
धरीतां बळें संधि नाहीं धराया। तयाचे परी स्फूर्ति दे देवराया ॥ ३ ॥
विवेकी विवंचूनियां लागवेगें। पळे सर्व ही दृश्य सांडूनि मागें।
उपायेंचि तो जाय लंघून माया। तयाचे परी स्फूर्ति दे देवराया ॥ ४ ॥
असावें तरी सर्व कांहीं असावें। नसावें तरी लेश तें ही नसावें।
परब्रह्म तें वीवराया वराया। तयाचे परी स्फूर्ति दे देवराया ॥ ५ ॥
म्हणे दास रे वास भूतीं भुतांचा। तयाचे परी निर्गुणीं निर्गुणाचा।
विचारेंचि वीनासती अष्टकाया। तयाचे परी स्फूर्ति दे देवराया ॥ ६ ॥

## ४१ ग्रंथ कोट्यानुकोटी.

जगीं पाहतां ग्रंथ कोट्यानुकोटी। किती संस्कृतें देशभाषा मऱ्हाठी।
कितेकीं किती निश्चयो होत आहे। परी तूळणा ज्ञानमार्गा न साहे ॥१॥

---

१ तोफा.

तया ज्ञानमार्गामधें प्रत्ययाचें । पाहतां बरें बोलणें स्पष्ट कैंचे ।
कितीयेक ग्रंथीं गथागोवि जाली । बहू निश्चयो येक बुद्धी उडाली ॥२॥
जनीं साधकें पाहतां काये घ्यावें । सदा संशयामाजि कीती पडावें ।
खरा देव तो मुख्य ठाईं पडेना । म्हणोनि जगोधार तेणें घडेना ॥ ३ ॥
जगीं अल्प ते चुकती कारणाला नसे धारणा सर्व साधारणाला ।
किती येक नानापरीचीं पुराणें । ठके लोक मतांतरीं साभिमानें ॥ ४ ॥

## ४२ अद्वैतचर्चा.

अद्वैतचर्चा जंव हे कळेना । विकल्प भ्रांती तंव हे टळेना ।
प्रत्ययेविणें तों मन तें वळेना । श्रीराम भक्तीविण आकळेना ॥ १ ॥
कर्ण घ्राण विषय इंद्रिय पंचकें । पंच भूत गुण पांच पंचकें ।
पिंड देहे द्वय तत्व बोलिजे । ब्रह्म कोश समतुल्य जाणिजे ॥ २ ॥
अद्वैतचर्चा कंटाळवाणी । सांडूनि वर्णा कोदंडपाणी ।
कैळासवासी ठेवा प्रभूचा । अलभ्य हा रे सकळांसि कैचा ॥ ३ ॥
अद्वैतचर्चा गुरुगम्य आहे । कळे म्हणे तो सहसा न लाहे ।
चोरूनि जागे हृदईं अहंता । कळे म्हणे त्या न कळे चि भ्रांता ॥४॥

## ४३ प्रसंग बरा वाईट.

न जावें चि तेथें चि लागेल जावें । न खावें चि जें तें चि लागेल खावें ।
वदावें चि ना तें चि लागे वदावें । स्वभावें चि निर्माण केलें चि देवें ॥ १ ॥
प्रसंगें घडे तें चि मानून घ्यावें । अहंतागुणें दुखशोका न घ्यावें ।
पुढें काय होईल तें तें पाहावें । विवेकें चि ज्ञानें चि सुखें राहावें ॥ २ ॥
देहेभोग होणार कांहीं सुटेना । जनाच्या मना सांगतां ही तुटेना ।
म्हणे दास उदास कांहीं न व्हावें । बरें वोखटें सर्व साहोनिं न्यावें ॥३॥

## ४४ हरिकीर्तन.

कळीमाजि भूमंडळीं सार आहे । हरीकीर्तनें दोष कोठें न राहे ।
पवित्रें चरित्रें रघुनायेकाचीं । धरावीं मनीं आदरेंसीं फुकाचीं ॥ १ ॥
हरिकथाश्रवणें हरि सांपडे । सकळ सारकथा श्रवणीं पडे ।
परम दुल्लभ तें पाहाणें घडे । अहंमता ममता मग वीघडे ॥ २ ॥

## ४५ इति श्री.

इति श्री पुढें पंचभूतांसि होते । इति श्री त्रिगुणासि होऊनि जाते ।
इति श्री समस्तांसि होणार आहे । इति श्री नव्हे तें चि शोधूनि पाहें ॥

इति श्री नव्हे तें जनीं वोळखावें। विवेकें विचारूनि जाणोनि घ्यावें।
नव्हे जाणिजेसें नव्हे नेणिजेसें। निराकार तें ब्रह्म आकार जैसें॥ १॥

## ४६ सायोज्यतेची वाट.

अती क्रोध त्या बोध होणार नाहीं। अती बोध त्या क्रोध येणार नाहीं।
अती शांति त्या भ्रांति येईल कैची। अती लीनता वाट सायोज्यतेची॥
अती आदरें शांति होईल नेमें। अती शांति त्या दंडळीना विरामें।
अती खोल तो बोल बोलेल कैचा। असा आंखिला मुक्तिसायोज्यतेचा १

## ४७ गुह्य.

येकांत गुव्हा निर्वात जेथें। चर्चा करावी अद्वैत तेथें।
संसर्ग खोटा इतरां जनांचा। जयांस नाहीं वर सज्जनाचा॥ १॥
सत्संगती ज्या नरांसि नाहीं। ते पापरूपी पडती प्रवाहीं।
संदेह चीतीं सहसा टळेना। सीधांत साधुविण आकळेना॥ २॥

## ४८ स्फुट श्लोक.

अरे उधवा[1] माधवा काये केलें। हरीवीण कां वेर्थ आयुष्य गेलें।
कळेना तुला ज्ञान तुझें जळालें। तुझे प्रीतिचें सौख्य कोठें बुडालें॥१॥
अभागी किती लोक भाग्यासि आले। कितीयेक ते भाग्य निर्भाग्य जाले।
कितीयेक ते सुकृती वाढताती। कितीयेक ते पातकी मोडताती॥ २॥
आला आला जीव जन्मासि आला। जाला जाला वाढला थोर जाला।
केला केला व्याप उदंड केला। गेला गेला बापुडा वेर्थ मेला॥ ३॥
अकस्मात मागें भुमीकंप जाला[2]। नभामाजि तारेंसि सेंडा निघाला।
तदारभ्य भूमंडळीं धुंदि जाली। नसे न्याय ना नीति सर्वै बुडाली॥ ४॥
अनेक शास्त्रीं पाहातां पडेना। आयुष्य थोडें पाहाणें घडेना।
विश्वास येके वचनीं धरावा। संसार हा दुस्तर नीरसावा॥ ५॥
असे अर्थ तें सार्थकें धन्य होतें। नसे अर्थ तें बोलणें वेर्थ जातें।
कणेंवीण काबाड तें वेर्थ जाणा। बरें शोधितां ही नसे येक दाणा॥६॥
उठे घोष ज्या मंदिरीं रामनामें। जळो संपदा जाळि ते हेमधामें।
जळो बोल ते फोल वाचाळज्ञानी। नसे मानसीं राम कैवल्यदानी॥७॥

---

१ उद्धव हे श्रीसमर्थशिष्य व माधव हे उद्धवांचे शिष्य, त्या उद्धवमाधवांना श्रीसमर्थ उपदेशितात. २ श्रीसमर्थांच्या पूर्वकालीं भूमिकंप केव्हां झाला होता व शेंडें नक्षत्र केव्हां निघालें होतें याचा शोध केला पाहिजे. ३ "उठे" पाहिजे.

कल्याणकारी निजहीतकारी। आनंदकारी अतिसौख्यकारी।
परोपकारी निज निर्विकारी। कोदंडधारी लीळावतारी ॥ ८ ॥

करें पूजन राघवाचें करावें। पदें राघवा आश्रमासी च जावें।
बरें कर्णबीळीं कथे ऐकवावें। सदा सर्वदा साधुसंगीं बसावें ॥ ९ ॥

कळेना पुढें काय होणार आहे। कळेना देहे कोठपरियित राहे।
कळेना मरावें स्वदेशीं विदेसीं। कळेना पुढें वेळ येईल कैसी ॥ १० ॥

खळांळा[1] सवें हुंबरी[2] घालवेना। निगुर्‍यां[3] सवें बोलतां पुरवेना।
खुणा दावितां चक्षुहीना कळेना। बळें लावितां सत्य पंथीं मिळेना ॥ ११ ॥

घरें सुंदरें मंदिरें रम्य दारा। ह्मणी आपुलीं मानिसी रे गव्हारा[4]।
जिवा जन्मतां निर्मिलें तें टळेना। क्षणा काय होईल ऐसें कळेना ॥ १२ ॥

जगीं गाढवें राखतां जन्म गेला। नव्हे भोग्य हें तुछ्य वाटे तयाला।
मुळींचा करंटा तया योग्य कैचें। महद्भाग्य हें देखवेना जनाचें ॥ १३ ॥

जनामाजि होणार हें जैसजैसें। प्रसंगें घडों लागतें तैसतैसें।
घडीनें घडी वेर्थ चिंता करावी। कृपा सज्जनाची बरी वीवरावी ॥ १४ ॥

जनाचार संपादितां जन्म गेला। येथासांग रे सर्व लोकीक केला।
जप ध्यान पूजा मनामाजि नाहीं। वृथा निश्चयेंवीण तें सव कांहीं ॥ १५ ॥

दरे दुर्कुटें झाडखंडें अनेकीं। कपाटें कडे वीवरें आणि टांकीं।
वनीं पावनीं पांडवीं वास केला। गिरी देखिला दास संतुष्ट जाला ॥ १६ ॥

नसे भक्ति उपासना येक भावें। नसे कर्म साहित्य तें आचरावें।
नसे दान ना धर्म ना पुण्य गांठीं। वृथा वाउगी चाउटी ते चि मोठी १७
पिके सेत रे हेत तेथें चि लागे। पिकेना तरी चीत रंगे विरंगे।
तयाचे परी सार विचार होतां। पिके अर्थ निरूपणीं अर्थ घेतां ॥ १८ ॥
बहु देश भाषा रिती वेगळाल्या। महीं मंडळीं त्या असंभाव्य जाल्या।
जनीं वर्ततां येक येकां न माने। समुदाव तो त्यास त्यातें चि माने ॥ १९ ॥
बहु पाप होतां चि दारिद्र येतें। बहु पुण्य होतां चि तें भाग्य येतें।
बरें कोण मानेल तैसें करावें। मनीं थोर पाहोन हातीं धरावें ॥ २० ॥
ब्रह्मादिकां दुर्लभ ध्यान रंगीं। तो हा सदा सुलभ भक्तसंगीं।
जाणे कळा अंतरभावगोडी। देखोनियां राघव सीघ्र सोडी ॥ २१ ॥
भद्रीं शोभे राम लावण्यखाणी। पुष्टीं भाता बाण कोदंडपाणी।
वामे सीता दक्षणे शेष बंधु। पुढें उभा मारुती वीरसिंधु ॥ २२ ॥

---

१ अत्यन्त दुष्ट. २ खेळ, वाद. ३ गुरुविरहित. ४ मूर्खा.

मानें मानें चालती सर्व मानें। यानें यानें चालवीती गुमानें।
हा हा हो हो होतसे दों दिसांची। चीचि चीचि सेवटीं सर्व चीचि॥२३॥
लोकामधें लोकलाजेसि भ्यावें। नाना देसीं दंडकें आचरावें।
कोण्ही येकें मूळ शोधूं नये हो। मिथ्या वादें लाविला धाक पाहो॥२४॥
वयें थोर ते चोर भावार्थ नाहीं। विकल्पें बुडाले अहंभावडोहीं।
अहंता नसे हो तया लेंकुरासी। म्हणोनी बहु आवडी रामदासीं॥२५॥
सदा तेल आणा सदा मीठ आणा। सदा धान्य आणा सदा द्रव्य आणा।
सदा वस्त्र आणा सदा शाख आणा। सदा सर्वदा सर्व आणा चि आणा॥
सदा मागता दास देवा न साहे। न मागे तयाची रमा दासि होये।
असे आस तो दास जाला जगाचा। नसे आस तो ईशु ब्रह्मादिकांचा १७
स्वधामासि जातां माहां रामराजा। हनुमंत तो ठेविला या च काजा।
सदा सर्वदा रामदासांसि पावे। खळीं गांजितां ध्यान सांडूनि धावे॥२८
संपन्न तारुण्य लावण्य नारी। कौशल्यता वैभव चित्तहारी।
येकांतकाळीं पडतां समंधु। अभिळाष न करी तो धन्य साधु॥ २९॥



# (२४) स्फुट ओव्या ऊर्फ अभंग.

## १

॥ श्रीरामसमर्थ ॥

राम माझा स्वामी राव अयोध्येचा । त्रिदश देवांचा कैवारी ॥ १ ॥
कैवारी थोर सामर्थ्यें आगळा । तारिलें चांडाळा वाल्मीकासी ॥ २ ॥
वाल्मीकासी फळ जाहालें नामाचें । चरित्र रामाचें शतकोटी ॥ ३ ॥
शतकोटी रामचरित्र बोलिला । अवतार जाला नाहीं तोंचि ॥ ४ ॥
नाहीं तोंचि रामचरित्र बोलिला । श्रावण वधिला दशरथें ॥ ५ ॥
दशरथ राजा तया पुत्र नाहीं । पुत्रशोक पाहीं शाप त्यासी ॥ ६ ॥
श्रापाचा आनंद थोर तया जाला । तेणें पोटा आला रामचंद्र ॥ ७ ॥
रामचंद्रें वनीं ताटिका वधीली । सर्व सुखी केलीं ऋषिकुळें ॥ ८ ॥
ऋषी संतोषले कार्य सिद्धी जालें । तंव पत्र आलें जनकाचें ॥ ९ ॥
जनकाचे घरीं मांडलें सैंवर । तेथें ऋषीश्वर पाचारीले ॥ १० ॥
पाचारीले तेथें मार्गीं अवलीळा । रामें चंडशीळा उद्धरीली ॥ ११ ॥
उद्धरीली रामें गौतमाची वधू । पुढें कृपासिंधू स्वयेंवर ॥ १२ ॥
स्वयंवर पण त्र्यंबक कठीण । राम सुलक्षण सकुमार ॥ १३ ॥
सकुमार बाळा जनकनंदिनी । राम चिंती मनीं अहर्निशी ॥ १४ ॥
अहर्निशी पाहे राम जगजेठी । राजे लक्ष कोटी सांडूनीयां ॥ १५ ॥
सांडूनी विक्रम सर्वहि निवांत । धनुष्य अद्भूत देखीयेलें ॥ १६ ॥
देखीयेलें कोण्ही कोण्हासी न बोले । तंव राव बोले धिक्कारूनी ॥ १७ ॥
धिक्कारूनी बोले जनक सर्वांसी । म्हणे 'पृथ्वीयेसी वीर नाहीं !' ॥१८॥
वीर नाहीं ऐसें विदेही बोलीला । ऐकोनी उठिला लक्षुमण ॥ १९ ॥
लक्षुमण उभा सर्वांगें वीरश्री । तंव ऋषेश्वरीं वारीयेलें ॥ २० ॥
वारीयेलें मग दैत्य क्रूरबुद्धी । क्रोधें गर्वनिधी उकावला ॥ २१ ॥
उकावला थोर गर्वें लंकापती । भ्रष्टला हांसती सर्व राजे ॥ २२ ॥
राजे राजेश्वर पाहाती समस्त । रावणा देहांत काळ आला ॥ २३ ॥
काळ आला थोर धनुष्य वाहातां । मग कृपावंता उठविलें ॥ २४ ॥
उठविती ऋषी ते काळीं रामासी । देई रावणासी जीवदान ॥ २५ ॥

---

१ वाल्मीकीच्या पूर्वचरित्रांत ते वाल्हा कोळी होते. २ स्वयंवर. ३ विश्वामित्र. ४ उठला, भरला.

दान देई ऐसें ऋषी बोलीयेले । मग उचलीलें वामांगुष्टीं ॥ २६ ॥
वामांगुष्टें धनुष्य काढुनी टाकीलें । मग चढउनी वाईयेलें[1] ॥ २७ ॥
वाईयेलें बळें वोढितां कडाडी । पर्वत घडाडी मेरुशृंग ॥ २८ ॥
मेरुशृंगीं थोर कडकाविझाला । सैंवरीं[2] जिंकीला पण रामें ॥ २९ ॥
रामें भग्न केलें धनुष्य कठोर । सव ऋषीश्वर संतोषले ॥ ३० ॥
संतोषला राव मांडिला उत्साव । सर्व समुदाव आनंदला ॥ ३१ ॥
आनंदले सर्व वाद्य येकवेळां । माळ घाली बाळा जनकाची ॥ ३२ ॥
जनकाची बाळा सैंवर सोहळा । शीघ्र रघुकुळा मूळ गेलें ॥ ३३ ॥
मूळ गेलें शीघ्र पाचारूं विवाहा । लगबग राया जनकासी ॥ ३४ ॥
जनकासी थोर आनंद जाहाला । जावाई जोडला रामराणा ॥ ३५ ॥
रामराणा शोभे सर्वांगें सुंदर । वामे सकुमार भूमीबाळा[3] ॥ ३६ ॥
भूमीबाळा राम शोभे सिंहासनीं । विप्र वेदध्वनी गर्जताती ॥ ३७ ॥
गर्जताती भाट ब्रीदें वाखाणीती । बासींगी फांकती रत्नकीळा ॥ ३८ ॥
रत्नकीळां[4] बहू भूषणें सुंदरें । दिव्य मकराकारें तळपताती ॥ ३९ ॥
तळपताती माळा पदकीं रत्नकीळा । कासे सोनेसळा[5] कासीयेला ॥४०॥
कासीयेली कास कींकीणी वाजटा । वरी क्षुद्र घंटा झणत्कार ॥ ४१ ॥
झणत्कार वांकीं मुर्डीव नेंपुरें । गर्जती गजरें आंदु पाईं ॥ ४१ ॥
पांई चंडशीळा जाली दिव्य नारी । जानकी न करी दंडवत ॥ ४३ ॥
दंडवंती होती बहुसाल बाळा । म्हणोनी भांगटीळा काढीयेला ॥ ४४ ॥
काढीयेला मग केला नमस्कार । लावण्य वोहर[6] रम्य शोभा ॥ ४५ ॥
रम्य शोभा आली मंडपीं वोहरें । चारी मनोहरें शोभताती ॥ ४६ ॥
शोभती मंडपीं मुक्ताफळ घोष । माळा बहुवस कुसुमाच्या ॥ ४७ ॥
कुसुमाचे हार शोभती अपार । परिमळ धुसर पुष्पयाती ॥ ४८ ॥
पुष्पयाती दिव्य पंचक मालती । जाई जुई सेवंती पारीजात ॥ ४९ ॥
पारिजात गभ केतकी कोंवळें । मोगरे नव्हाळे बकुळ पुष्पें ॥ ५० ॥
पुष्पें सुवर्णाचीं करवीर कमळांची । परिमळ द्रव्यांची दिव्य गंधें ॥५१॥
दिव्य गंधें माळा सर्वांस सोहळा । सुरंग आगळा तुषाराचा ॥ ५२ ॥
दिव्यान्नें भोजनें तृप्त सर्वा जना । सर्वांसी पूजन उपचार ॥ ५३ ॥
उपचार जाले अंबरीं पूजीले । रायें नीरवीले दुहितेसी ॥ ५४ ॥
सर्व येकसरें निघाले गजरें । अंबरें धूसरें पूर्ण जाले ॥ ५५ ॥
पूर्ण चंद्राकारें त्राहाटीलीं[7] छत्रें । थरकती अपारें मेघडंब्रें ॥ ५६ ॥

---

१ दोरीला लावलें. २ स्वयंवरांत ३ सीता. ४ कीलप्रभा. ५ सोनसळा, पीतांबर. ६ वधुवर. ७ सिद्ध केलीं.

मेघडंब्रें माही निशाणें थरकती । रोमांच फरकती देखतांची ॥ ५७ ॥
देखतांची मार्गें जातां गजभार । निशाणीं अंबर आछ्यादीलें ॥ ५८ ॥
आछ्यादिलें मार्गें जातां भूमंडळ । रथवारुदळभार चाले ॥ ५९ ॥
भार चाले पुढें दिव्य सुखासनें । शिबिका आंदणें चौर डोल ॥ ६० ॥
चौर डोल जाती मालती कुंजरें । हिंसती गजरें तुरंगम ॥ ६१ ॥
तुरंग उसाळें जाती अंतराळें । उफाळती बळें दोंचि पांई ॥ ६२ ॥
दोनी दळें मार्गें जातांची थोकलीं । तेथें आज्ञा जाली विदेहासी ॥६३॥
रायें लोटांगण घालुनी समस्तां । म्हणे माझी सीता तुम्हापासीं ॥ ६४ ॥
ऐसें बोलोनीयां उद्वेगला चित्तीं । वियोगें गळती अश्रुपात ॥ ६५ ॥

---

## २

काया माया छ्याया हे कांहिं तगेना । वैभव जगेना जन्मवरी ॥ १ ॥
जन्मवरी लोक देखत आहेती । किती येक जाती सांडुनीयां ॥ २ ॥
सांडुनीयां जाती कन्या पुत्र धन । सर्व साभिमान लोकिकांचा ॥ ३ ॥
लोकिकांचा भाव लोकिकीं राहिला । प्राणीमात्र गेला येकलाची ॥ ४ ॥
येकलाची येतो येकलाची जातो । मध्येंची भुलतो मायाजाळें ॥ ५ ॥
मायाजाळ माया हें कांहीं सुटेना । नाचती वासना अनावर ॥ ६ ॥
अनावर मन कदा आवरेना । धरितां धरेना अनुमानें ॥ ७ ॥
अनुमानें कांहिं नव्हे समाधान । जंव आत्मज्ञान पाविजेना ॥ ८ ॥
पाविजेना मोक्षा तुटेना बंधन । श्रवण मनन जेथें नाहिं ॥ ९ ॥
जेथें नाहिं सारासार विचारणा । या जन्म मरणा ठाव तेथें ॥ १० ॥
तेथें ठाव जाला देहे संदेहासी । होती पापराशी अनुमानें ॥ ११ ॥
अनुमानें पाप अनुमानें पुण्य । अनुमानें धन्य होईजेना ॥ १२ ॥
होईजेना धन्य विचारणेवीण । लोकिकाचा शीण वेर्थ जातो ॥ १३ ॥
वेर्थ जातो शीण देखत देखतां । लोकिक तत्वता राखवेना ॥ १४ ॥
राखवेना परी राखीला पाहिजे । मनामधें कीजे विचारणा ॥ १५ ॥
वीचारणा कीजे या देवांभक्तांची । कर्ता कोण तोची वोळखावा ॥१६॥
वोळखावा कर्ता सर्वत्र सृष्टीचा । मी तो कोण कैचा धुंडाळावें ॥ १७ ॥
धुंडाळावें महावाक्यपंचीकरण । तत्वांचें विवरण यथासांग ॥ १८ ॥
यथासांग व्यंग पडोंची नेंदावें । अत्यंतची व्हावें सावधान ॥ १९ ॥
सावधानपणें देवासी पाहाणें । नासीवंत जाणें सांडुनीयां ॥ २० ॥
सांडुनीयां सर्व अष्टधा प्रकृती । विवेकाची गती वोळखावी ॥ २१ ॥

वोळखावी मुख्य सज्जनाची कृपा । तेणें पुण्यपापा नातळावें[1] ॥ २२ ॥
नातळावें कदा दृश्य पदार्थासी । असोनी देहासी लिंपों नये ॥ २३ ॥
लिंपों नये जैसें पद्मिणीचें पत्र । देहे डिंबमात्रें[2] चालतसे ॥ २४ ॥
चालतसे सर्व तत्वांचें गांठोडें । तेथें काये वेडें गुंडाळतें ॥ २५ ॥
गुंडाळतें वेडे देहेसंबंधासी । भ्रमें विवेकासी सांडुनीयां ॥ २६ ॥
सांडुनीयां सार घेईल असार । ऐसा अनावर भ्रम आहे ॥ २७ ॥
भ्रम आहे जया अंतरीं माजला । तोचि तो गांजला संवसारीं ॥ २८ ॥
संवसारी येक सुटोनीयां गेले । येक ते बांधले संकल्पानें ॥ २९ ॥
संकल्पानें सुटे ऐसा कोण आहे । ईश्वरासी पाहे शोधुनीयां ॥ ३० ॥
शोधुनीयां पाहे तोची देव लाहे । येर तो न राहे देवापासीं ॥ ३१ ॥
देवापासीं राहे बहुतां सुकृतें । लोकिकांसी भूतें झडपीती ॥ ३१ ॥
झडपीती भूतें सत्यची मानीतां । देव पाहों जातां भूतें मिथ्या ॥ ३३ ॥
भूतें मिथ्या ऐसें हृदईं बिंबलें । तेव्हांची जाहलें समाधान ॥ ३४ ॥
समाधान आहे मायातीत होतां । नाथिली अहंता घेऊं नये ॥ ३५ ॥
घेऊं नये पक्ष कदा असत्याचा । वेगीं या सत्याचा पंथ धरा ॥ ३६ ॥
पंथ धरा जेणें परत्र पाविजे । देवासीं लाविजे संनिधान[3] ॥ ३७ ॥
संनिधानेमात्रें तरे बहुजन । पावनें पावन होइजेतें ॥ ३८ ॥
होईजे पावन तेंची तें स्वहीत । सोडीतां पतीत होईजेतें ॥ ३९ ॥
होईजेतें कष्टी तेंचि कां धरावें । वेगीं उद्धरावें आपणासी ॥ ४० ॥
आपणासीं वैर कदा करूं नये । अंतीं सर्व जाये निघोनीयां ॥ ४१ ॥
निघोनीयां जाये त्याचें घेसी काये । वेगीं धरीं सोये शाश्वताची ॥ ४२ ॥
शाश्वताची सोये सांडुनी करंटा । वेर्थ बारा वाटा धांवतसे ॥ ४३ ॥
धांवतसे चहुंकडे अनुमानें । तया समाधानें मोकलीले[4] ॥ ४४ ॥
मोकलीलें मन ऐसें हीं कळेना । मातला वळेना मनासंगें ॥ ४५ ॥
मनासंगें कदा निःसंगता नये । अपाये उपाये मानीतसे ॥ ४६ ॥
मानीतसे मनें जें जें वोळखीलें । स्वरूप राहिलें मनातीत ॥ ४७ ॥
मनातीत होतां होये सार्थकता । मनासवें जातां अधोगती ॥ ४८ ॥
अधोगती चुके तें कांहिं करावें । मनासवें व्हावें कासावीस ॥ ४९ ॥
कासावीस पंचभौतिकीं राहातां । भूतांसी पाहतां भूतलोक ॥ ५० ॥
भूतलोक वेगीं सांडुनीयां जावें । विचारें पाहावें परब्रह्म ॥ ५१ ॥
परब्रह्म तेंचि आपणची आहें । दास म्हणे पोहें अनुभवें ॥ ५२ ॥

---

१ स्पर्शू नये. २ आभासमय. ३ निकटपणा, लगट. ४ सोडिले.

३

अज्ञानजनांचे देव नानापरी । त्यांची संख्या करी कोण आतां ॥ १ ॥
कोण आतां देव पावेल तयासी । जन्मरणासी चुकवीता ॥ २ ॥
चुकविला देव पाहतां दिसेना । निश्चयो असेना येके ठाईं ॥ ३ ॥
येके ठाईं भाव येके ठाईं देव । चुकला उपाव सार्थकाचा ॥ ४ ॥
सार्थकाचा देव तरीच सांपडे । जरी कांहिं घडे संतसेवा ॥ ५ ॥
संतसेवा भाव करितां तरले । जन उद्धरले नेणों किती ॥ ६ ॥
नेणों किती जन साधूचे संगती । आपुले प्रचीती मुक्त जाले ॥ ७ ॥
मुक्त जाले ज्ञानें विचारें पाहतां । स्वरूपीं राहतां निरंतर ॥ ८ ॥
निरंतर देव फुटेना तुटेना । चळेना ढळेना कदा काळीं ॥ ९ ॥
कदा काळीं देव रचेना खचेना । येईना जाईना निरंजन ॥ १० ॥
निरंजन देव पाहातां दिसेना । परी तो नासेना कल्पकोटी ॥ ११ ॥
कल्पकोडी गेले देवासी नेणतां । यातना भोगितां जन्मोजन्मीं ॥ १२ ॥
जन्मोजन्मीं देव जवळी चुकला । प्राणी भांबावला मायाजाळीं ॥ १३ ॥
मायाजाळें कांहिं उमजत नाहीं । देव ठांई ठांई कल्पनेचे ॥ १४ ॥
कल्पनेचे देव कल्पांतीं नासती । ऐसें वेदश्रुती बोलतसे ॥ १५ ॥
बोलतसे श्रुती दृश्य नासिवंत । जाणिजे शाश्वत परब्रह्म ॥ १६ ॥
परब्रह्म आहे सर्वत्र व्यापक । तेंचि पाहें येक गुरुमुखें ॥ १७ ॥
गुरुमुखें ब्रह्मविचार पाहावा । निश्चयो राहावा निर्गुणाचा ॥ १८ ॥
निर्गुणाचा ध्यास निर्गुण करील । मग उद्धरील आपणासी ॥ १९ ॥
आपणासी पाहे जो कोण्ही शोधूनी । तो जन्मापासुनी मुक्त जाला ॥२०
मुक्त जाला देहेसमंध सोडीतां । निर्गुण धुंडीतां निर्गुणची ॥ २१ ॥
निर्गुणची स्वयें जो कोण्ही जाहला । तोचि येक भला समाधानी ॥ २२
समाधानी साधु जोडतां संकट । मिथ्या खटपट जेथें तेथें ॥ २३ ॥
जेथें नाहिं माया जो मायेवेगळा । ऐसा तो विरळा संतजन ॥ २४ ॥
संतजन तोचि जो स्वयें देवची । तेथें ये मायेची वार्ता नाहीं ॥ २५ ॥
वार्ता नाहिं ऐसें सज्ञान जाणती । अज्ञान नेणती कांहिं केल्यां ॥ २६ ॥
कांहिं केल्यां पापी पुण्य आचरेना । संसार सरेना दुःखमूळ ॥ २७ ॥
दुःखमूळ जन्म ज्ञानें निरसावा । विवेकें पाहावा सारासार ॥ २८ ॥
सार निराकार असार आकार । निकारें पार पाविजेतो ॥ २९ ॥
पाविजेतो परी अर्थीं विवरावें । विवेकें विरावें स्वस्वरूपीं ॥ ३० ॥
स्वस्वरूपीं ज्ञाते जे कोण्ही विराले । स्वरूपची जाले आत्मबोधें ॥ ३१ ॥
आत्मबोधस्थितिं बाणलीसे जया । मग तया माया आतळेना ॥ ३२ ॥

आतळेना मायाममता अंतरीं । नित्य निरंतरीं निरंतर ॥ ३३ ॥
निरंतर असे परी तो न दिसे । गुप्त जाला भासे भासमात्र ॥ ३४ ॥
भासमात्र देहे तया ज्ञानियांचा । अंतरीं सुखाचा सुखमूर्ती ॥ ३५ ॥
सुखमूर्ती सुखदुःखाविरहित । बोलियेलों हेत कळावया ॥ ३६ ॥
कळावया हेतु शब्द निःशब्दाची । लक्षें अलक्षाची सोय लाये ॥ ३७ ॥
सोय लागे तेथें लक्ष ना अलक्ष । देहे पूर्वपक्ष बोलियेला ॥ ३८ ॥
बोलियेलों शब्द अनिर्वाच्य वाचे । जाणती मुक्तीचे वांटेकरी ॥ ३९ ॥
वांटेकरी जाले अवस्थेवेगळे । श्रुतीसी ना कळे पार ज्यांचा ॥ ४० ॥
पार ज्याचा नाहीं अपार विदेही । देहातीत पाहीं समाधान ॥ ४१ ॥
समाधान राहे निःसंग राहतां । संग पाहों जातां कासावीस ॥ ४२ ॥
कासावीस जाले संगाचेनी गुणें । निःसंगची होणें सर्वकाळ ॥ ४३ ॥
सर्वकाळ संग सोडावा आपुला । मीपणाच्या बोला लागों नये ॥ ४४ ॥
लागों नये कदा मनामागेंमागें । कल्पनेच्या त्यागें समाधान ॥ ४५ ॥
समाधान राहे संतांचे संगती । वस्तुची प्रचीती वस्तुरूप ॥ ४६ ॥
वस्तुरूप जाला जो कोण्ही साधक । धन्य तोचि येक लोकांमधें ॥४७॥
लोकांमधें परलोकचि साधावा । भगवंत शोधावा नानापरी ॥ ४८ ॥
नानापरी सांगे रामीरामदास । भाविकें विश्वास सोडूं नये ॥ ४९ ॥

---

## ४

संसार करितां होय सायुज्यता । ऐसें कांहीं आतां सांगा स्वामी ॥ १ ॥
सांगा स्वामी कोण स्थिती जनकाची । राज्य करितांची मुक्त कैसा॥२॥
मुक्त कैसा होता देहींच विदेही । कैसा लिप्त नाहीं करुनीयां ॥ ३ ॥
करुनीयां सर्व आपण वेगळा । सांगा तेचि कळा आम्हांलागी ॥ ४ ॥
आम्हांलागी सांगा त्याचें समाधान । रामदास खुण पुसतसे ॥ ५ ॥
पुसतसे आतां पाहिजे बोलिलें । कैसें राज्य केलें विदेहानें ॥ ६ ॥
विदेहानें सत्य स्वामीचें वचन । तेथें विश्वासोन वर्ततसे ॥ ७ ॥
वर्ततसे जनीं अहंता सांडुनी । आदीकारणी प्रकृती हें ॥ ८ ॥
प्रकृतीचा प्रांत आद्य मद्य अंत । तेंचि तें निवांत रूप तुझें ॥ ९ ॥
रूप तुझें सदा सर्वदा संचलें । वेदाचेनि बोलें महावाक्य ॥ १० ॥
महावाक्य तें तू स्वरूप आहेसी । जाण निश्चयेंसीं आपणासी ॥ ११ ॥
आपणा पाहातां जाली तन्मयता । सोहं हें तत्वता मनीं धरीं ॥ १२ ॥
मनीं धरीं सोहं आत्मा हें वचन । तेणें समाधान पावसील ॥ १३ ॥

पावसील निज स्वरूप आपुलें । जरी विश्वासलें मन तेथें ॥ १४ ॥
मन तेथें जाये वचनासरिसें । तवं मनीं नसे मनपण ॥ १५ ॥
मनपण गेलें स्वरूप पाहातां । तैसेंची राहातां समाधान ॥ १६ ॥
समाधान बाणे त्यागितां संगासी । जनकें शुकासी सांगितलें ॥ १७ ॥
सांगितलें ' संगंत्यक्त्वा सुखी भव ' । मग अनुभव शुक पाहे ॥ १८ ॥
शुक पाहे संग काय म्यां धरीला । विवरों लागला स्वस्वरूपीं ॥ १९ ॥
स्वस्वरूपीं शुक नामरूप नाहीं । जनक विदेही आडळेना ॥ २० ॥
आडळेना तुटी तेथें कैंची भेटी । आठवण पोटीं स्वरूपाची ॥ २१ ॥
स्वरूपीं आठविं आपुला विसरु । शुक योगेश्वरु संगातीत ॥ २२ ॥
संगातीत जाला निःसंगा पाहतां । येणें रीती आतां समाधान ॥ २३ ॥
सनाधान बाणे सज्जनसंगती । तिन्हींहि प्रचीती[1] ऐक्यरूप ॥ २४ ॥
ऐक्यरूप वेद स्वामीचें वचन । आपुलेंहि मन सत्य मानी ॥ २५ ॥
सत्य मानी ब्रह्म येर सर्व भ्रम । अहंतेचो सीम वोलांडिली ॥ २६ ॥
वोलांडिली सीमा देहेसमंधाची । जालें असतांचि स्वप्न जैसें ॥ २७ ॥
स्वप्न जैसें मनीं जागृती आठवे । परी ते जाणावें मिथ्याभूत ॥ २८ ॥
मिथ्याभूत माया सद्गुरुवचनें । देह प्रारब्धानें वर्ततसे ॥ २९ ॥
वर्ततसे परी देह तूं नव्हेसी । विश्वास मानसीं दृढ धरीं ॥ ३० ॥
दृढ धरीं अहं ब्रह्म ऐसी खुण । देहाचें कारण प्रकृतीचें ॥ ३१ ॥
प्रकृतीचें रूप नव्हे तूं स्वरूप ॥ पुण्य आणि पाप देहसंगें ॥ ३२ ॥
देहसंग बापा निःसंगासी कैचा । वृतीनिवृतीचा शून्याकार ॥ ३३ ॥
शून्याकार देहो काईसा संदेहो । वृतीशून्य पाहो संतजन ॥ ३४ ॥
संतजन तेणें सुखें सुखावले । तेंचि हें बोलील वोवीमीसें ॥ ३५ ॥
वोवीमीसें गुप्त पंथ हा सांपडे । गुज ठाईं पडे योगियांचें ॥ ३६ ॥
योगियांचें गुज योगीच जाणती । जेथें नेति नेति वेद बोले ॥ ३७ ॥
वेद बोलियेला त्रिविध वचन । कर्म उपासना आणि ज्ञान ॥ ३८ ॥
ज्ञानाचा निश्चयो बोलीला वेदांतीं । आणि शास्त्रमतीं बहुसाल ॥ ३९ ॥
बहुसाल शास्त्रें पाहातां सरेना । आयुष्य पुरेना जन्मवरी ॥ ४० ॥
जन्मवरी वाया संदेहीं पडावें । केधवां घडावें समाधान ॥ ४१ ॥
समाधान घडे साधूचे संगती । गीताभागवतीं हेंची आहे ॥ ४२ ॥
हेंचि आहे सार जाणावें साचार । करावा विचार शाश्वताचा ॥ ४३ ॥
शाश्वताचा भाव सर्व ठाईं पडे । जरी भावें घडे संतसंग ॥ ४४ ॥
संतसंगें देव पाविजे तत्वता । शास्त्रें धांडोळितां आडळेना ॥ ४५ ॥

---

[1] शास्त्र, गुरु व अनुभव.

आडळेना जनीं दिसेना लोचनीं । तें या साधुचेनी पाविजेतें ॥ ४६ ॥
पाविजेतें निज स्वरूप आपुलें । मन भांबावलें जये ठाईं ॥ ४७ ॥
जये ठाईं तुटे सर्वही आशंका । तेंचि लाभे येका गुरुमुखें ॥ ४८ ॥
गुरुमुखें सत्य मानावें अंतरीं । वेगीं सोय धरीं आलया रे ॥ ४९ ॥
आलया रे संग साधूचा धरावा । संसार तरावा साधुसंगें ॥ ५० ॥
साधुसंगें ज्ञान रामदासीं जालें । शरीर लागलें भक्तीमार्गें ॥ ५१ ॥

---

५

गणेश नमावा आणी सरस्वती । मारुती गभस्ती चंद्रमौळी ॥ १ ॥
विष्णु खंडेराव भगवती भैरव । पांडुरंगीं भाव शामराज ॥ २ ॥
हरिदिनीं निऱ्हार[1] पापाचा संव्हार । व्रतें सोमवार थोर आहे ॥ ३ ॥
गोमुख गोकर्ण गोमय गोमुत्र । गोशृंग पवित्र तर्पणासी ॥ ४ ॥
तुळसी काळोत्री बेल गंगावती । रुद्राक्ष विभूती पापनाशी ॥ ५ ॥
विष्णु द्वारावती तुळसीच्या माळा । पाहिजे गोपाळा दहिंभात ॥ ६ ॥
आषाडी कार्तिकीं आंवळीचीं वनें । घालावीं भोजनें ब्राह्मणांसीं ॥ ७ ॥
ब्राह्मणांच्या तीर्थें पापक्षय होतो । जन उद्धरतो विप्रवाक्यें ॥ ८ ॥
लिंगाची लाखोली लिंगा अभिषेक । येणेंही विवेक पाविजेतो ॥ ९ ॥
अश्वत्थाची पूजा आणि प्रदक्षणा । ध्यावा क्षणक्षणा नारायण ॥ १० ॥
शालीग्रामीं पुण्य बहुतची जोडे । नर्मदे रोकडे हनुमंत ॥ ११ ॥
बाण चक्रांकित सोमसूर्यकांत । तांदळे दुरित नाशितातीं ॥ १२ ॥
अन्न ब्रह्म आहे विचारूनि पाहे । शरीर हें राहे तयाचेनी ॥ १३ ॥
आपोनारायण सकळांचें जीवन । कारण पर्जन्य पाहिजे तो ॥ १४ ॥
चंदनाचीं काष्टें आणी बेलकाष्टें । थोर दंड काष्टें पळसांचीं ॥ १५ ॥
मृगाचें कातडें डुकराचे केश । कमळाक्ष भद्राक्ष पुण्यमाळा ॥ १६ ॥
भूमंडळीं तीर्थें तें किती सांगावीं । सर्वहि फिरावीं कोण्ही येकें ॥ १७ ॥
आघाडा दुरुवा कोमळा अपूर्वा । तेणेंचि पूजावा लंबोदर ॥ १८ ॥
रुई मांदाराचीं फुलें कन्हेराचीं । आणि जास्विनीची आरंगुंद[2] ॥ १९ ॥
भूमंडळावरी थोर शिलोदकें । नासती पातकें ततक्षणीं ॥ २० ॥
कांउंजी भींउंजी पांठोरेपीठोरे[3] । हती गा पुजा रे येक भावें ॥ २१ ॥
डाउते आनंत थोर शाकाव्रत । द्विदळे नेमस्त सेऊं नये ॥ २२ ॥

---

१ निराहार, उपवास. २ (?) ३ श्रावण शुद्ध प्रतिपदेला चौसष्ट योगिणींचीं चित्रें काढून जी पूजा करितात ती.

भोजनाचे वेळे येकवाढी करा । आणी मौन्य धरा स्वपाकी हो ॥ २३ ॥
स्नानसंध्या प्रदक्षिणा नमस्कार । श्राद्ध पक्ष थोर सांडूं नये ॥ २४ ॥
ब्राह्मणांसी वैश्वदेवे उपासना । करावें तर्पण आदरेंसीं ॥ २५ ॥
करावीं आलोढ्यें[1] वेद आणी शास्त्रें । मंत्र स्तुतिस्तोत्रें नानापरी ॥ २६ ॥
तपें पुरश्चर्णें ध्यानस्त बैसावें । सांग संपादावें देवार्चनें ॥ २७ ॥
धरणी पारणी नित्य उपोषणें । तेणें होती क्षीण महा दोष ॥ २८ ॥
काव्यें अभ्यासावीं पुराणें सांगावीं । कवित्वें करावीं सावकास ॥ २९ ॥
फाल्गुनमाहात्में तेंहि संपादावीं । देवकें पुजावीं वीलगेटें[2] ॥ ३० ॥
मांगिणी जोगिणी राहाण[3] गोंधळ । डांकाचे कुल्लाळ जेऊं घालावे ॥ ३१ ॥
बुलगावा मुंज्या नरसीयां झोटिंग । पूजा कीजे सांग देवतांची ॥ ३२ ॥
देवतें तें भूतें सिद्धशिवकाळा । पुजावा आगळा पंचाक्षरी ॥ ३३ ॥
नाना तीर्थें व्रतें सांग संपादावीं । अघोरें करावीं नाना कर्में ॥ ३४ ॥
बगाडें कुलुपें राडी आणी बेडी । कामना रोकडी पुरतसे ॥ ३५ ॥
गळहिं टोंचावें निंबही नेसावें । खोडेही घालावें हातीं पांई ॥ ३६ ॥
गुगुळ जाळावे पोतही खेळावे । जोगी ते पुजावे भैरवांचे ॥ ३७ ॥
दया दानधर्म करावा स्वधर्म । चुकवावें वर्म संसाराचें ॥ ३८ ॥
संसाराचें वर्म तोडितां तुटेना । मार्गची फुटेना विवेकाचा ॥ ३९ ॥
विवेकाचा मार्ग संतसंगें कळे । उदंड निवळे विवेकानें ॥ ४० ॥
भ्रष्ट शाक्त मुक्त अविवेकी नसावा । केवळ दंडावा अनाचारु ॥ ४१ ॥
अनाचारें ज्ञान कदा निवळेना । इहलोक कळेना परलोक ॥ ४२ ॥
परलोक माया सांडूनी पाहावा । अष्टधेचा[4] गोवा घालूं नये ॥ ४३ ॥
घालूं नये वाद वाउगा वेवाद । तेणें गुणें खेद होत आहे ॥ ४४ ॥
होत आहे पुढें जयास कल्पांत । सर्व नाशिवंत सांडा मागें ॥ ४५ ॥
सांडा मागें बंड पाषांड थोतांड । चिंतावा अखंड गुणातीत ॥ ४६ ॥
गुणातीत देव त्रिगुणापरता । तेथें तूं सरता होईं बापा ॥ ४७ ॥
बापमाये सखे कोणही कामा नये । धुंडाळावी सोये मूळाकडे ॥ ४८ ॥
मुळाकडे फळ फळाकडे मूळ । मूळचि[5] निर्मूळ भक्तियोगें ॥ ४९ ॥
भक्तियोगें ज्ञान वैराग्य पाहिजे । परत्र लाहिजे दास म्हणे ॥ ५० ॥

---

१ पारंगत. २ वेगवेगळीं. ३ अंगांत दैवत आणवून बोलावणें त्याचें नांव. ४ अष्टधा प्रकृतीचा गोंधळ. ५ मूळमायाच नाहीं होते.

६

पहिले प्रथम मुळीं परब्रह्म । व्यापक सूक्ष्म जेथें तेथें ॥ १ ॥
जेथें तेथें वस्तु आहे निराकार । शुद्ध व्योमाकार प्रगटित ॥ २ ॥
प्रगटित आहे दिसेना ना नासे । विचारें विलसे ज्ञानियांसी ॥ ३ ॥
ज्ञानियांसी ज्ञान कळे निरंजन । आणी जन वन सारिखेंचीं ॥ ४ ॥
सारिखेंची आहे देवा वोळखतां । जेथें तेथें जातां देव भासे ॥ ५ ॥
देव भासे मनीं नित्य निरंतर । बाह्याभ्यांतर व्यापूनीयां ॥ ६ ॥
व्यापूनीयां आहे सर्वांचें अंतरीं । अनुभवें हरी वोळखावा ॥ ७ ॥
वोळखावा परी वोळखतां नये । म्हणोनी उपाये साधुसंग ॥ ८ ॥
साधुसंग धरी श्रवण विवरी । सारासार करी विचारणा ॥ ९ ॥
विचारणा करी देवांब्राह्मणांची । आणी सगुणाची उपासना ॥ १० ॥
उपासना कर्म हें आधीं पाळावें । मग सांभाळावें ब्रह्मज्ञान ॥ ११ ॥
ब्रह्मज्ञान नसे ते जन आंधळे । सन्मार्गीं पांगुळे क्रियाभ्रष्ट ॥ १२ ॥
क्रियाभ्रष्ट कर्म उपासनेवीण । नेणतां निर्गुण सर्व मिथ्या ॥ १३ ॥
सर्व मिथ्या जंव ब्रह्मज्ञान नाहीं । क्रिया कर्म कांहीं सोडवीना ॥ १४ ॥
सोडवीना कर्म या कर्मापासुनी । भगवंतावांचुनी तारांबळी[१] ॥ १५ ॥
तारांबळी जाली देवासी नेणतां । कर्मी गुंडाळतां देव कैचा ॥ १६ ॥
देव कैचा भेटे कर्म उफराटें । संशयोची वाटे सर्वकाळ ॥ १७ ॥
सर्व काळ गेला संशई पडतां । नित्य चोखाळितां[२] कळेवर ॥ १८ ॥
कळेवर काये नित्य धूत गेला । लावितो कोणाला उपकार ॥ १९ ॥
उपकार कैचा सेवक देहाचा । आणी कुटुंबाचा भारवाही ॥ २० ॥
भारवाही जाला देवासी चुकला । लोकिकची केला जन्मवरी ॥ २१ ॥
जन्मवरी केलें अंतीं व्यर्थ गेलें । कासावीस जालें वांयांवीण ॥ २२ ॥
वांयांवीण काळ गेला कीं निर्फळ । कर्म हें सबळ सुटेना कीं ॥ २३ ॥
सुटेना कीं कर्म कोण सोडविता । सांडुनी अनंता कर्म केलें ॥ २४ ॥
कर्म केलें देह चालतां निर्मळ । खंगतां[३] वोंगळ देह जालें ॥ २५ ॥
देह जाला क्षीण सदा हागवण । मृत्तिकेचा सीण कोण करी ॥ २६ ॥
कोण करी तेव्हां कर्मांचें पाळण । जाली भणभण शरीराची ॥ २७ ॥
शरीराची जाली जेव्हां भणभण । तेव्हां नारायण भजों पाहे ! ॥ २८ ॥
भजों पाहे तेव्हां नारायण कैचा । गेला अभाग्याचा सर्व काळ ॥ २९ ॥
सर्व काळ गेला देवा न भजतां । देहे चोखाळीतां चोखाळेना ॥ ३० ॥

---

१ धांदल. २ शुद्ध करितां. ३ वृद्धपणीं थकतां.

चोखाळेना देहे वाढवी संदेहे । अंतकाळीं पाहे दैन्यवाणा ॥ ३१ ॥
दैन्यवाणा देह देवा न भजतां । लेटतुला आतां कोण सोडी ॥ ३२ ॥
कोण सोडी देव धुंडिल्यावांचुनी । म्हणोनी भजनीं सावधान ॥ ३३ ॥
सावधानपणें देवासी शोधावें । तेणेंची साधावें परलोक ॥ ३४ ॥
परलोक साधे संतांचे संगती । चुके अधोगती गर्भवास ॥ ३५ ॥
गर्भवास चुके ज्ञान अभ्यासितां । वस्तुसी पाहतां वस्तुरूप ॥ ३६ ॥
वस्तुरूप होणें विवेकाच्या गुणें । नित्यनिरूपणें सारासार ॥ ३७ ॥
सारासारें घडे असाराचा त्याग । योगिये निःसंग सहजची ॥ ३८ ॥
सहजचि कर्मापासुनी सुटला । बोध निवटला परब्रह्मीं ॥ ३९ ॥
परब्रह्मीं हेतु लागतां अहेतु । देहीं देहातीतु रामदास ॥ ४० ॥

---

## ७

देव निराकार त्या नाहीं आकार । आकारा संव्हार होत आहे ॥ १ ॥
होत आहे जें जें तें सर्व जाणार । जाणार होणार सर्व माया ॥ २ ॥
सर्व माया दिसे हें पंचभौतिक । आत्मा आहे येक निरंजन ॥ ३ ॥
निरंजनीं जन वन कांहिं नसे । दृश्यभास भासे कल्पनेसी ॥ ४ ॥
कल्पनेसी भासे तें सर्व कल्पितां । कल्पनेरहित परब्रह्म ॥ ५ ॥
परब्रह्म नाहीं ऐसा ठाव कैचा । धन्य तो दैवाचा आत्मज्ञानी ॥ ६ ॥
आत्मज्ञानी नर पाहे सारासार । पुढें तदाकार होत आहे ॥ ७ ॥
होत असे जन्म सार्थक तयाचा । जेथें सज्जनाचा अनुग्रहो ॥ ८ ॥
अनुग्रह घडे बहुतां सुकृतें । साक्षात्कार जेथें रोकडाची ॥ ९ ॥
रोकडाची मोक्ष साधूचे संगती । चुके अधोगती आत्मज्ञानें ॥ १० ॥
आत्मज्ञानें होतें आत्मनिवेदन । भक्तीचें लक्षण नवविधा ॥ ११ ॥
नवविधा भक्ति श्रवणें करावी । धारणा धरावी श्रवणाची ॥ १२ ॥
श्रवणाची स्थिती ब्रह्मनिरूपण । श्रवण मनन निजध्यास ॥ १३ ॥
निजध्यास जनीं वस्तूचा धरावा । विचार करावा आपुलाची ॥ १४ ॥
आपुलाची ठाव ज्ञानें होतो वाव । जाणीजे उपाव श्रवणाचा ॥ १५ ॥
श्रवणाचा भाव जाणते जाणती । तिन्हीहि प्रचीती ऐक्यरूप ॥ १६ ॥
ऐक्यरूप देव भक्त नामांकित । अनन्या अनंत जैसा तैसा ॥ १७ ॥
तैसा आहे लाभ श्रवणभक्तीचा । जेथें विभक्तीचा ठाव नाहीं ॥ १८ ॥
ठाव नाहीं ऐसें श्रवणें जाणावें । कीर्तन करावें हेंचि आतां ॥ १९ ॥
हेंचि हें कीर्तन नित्य निरंतर । ग्रंथाचें अंतर विवरावें ॥ २० ॥

विवरावें जेणें तोचि तो जाहाला । रंक तो पावला राज्यपद ॥ २१ ॥
पदीं पद प्राप्त जालें संतसंगें । सद्य अंतरंगें समाधान ॥ २२ ॥
समाधान जालें श्रवणकीर्तनें । रामाच्या स्मरणें चित्तशुद्धी ॥ २३ ॥
चित्तशुद्धी जाली तेणें तें धरावें । सेवन करावें सद्गुरूचें ॥ २४ ॥
सद्गुरु करावा तें पादसेवन । सद्गुरूनें ज्ञान होत आहे ॥ २५ ॥
होत आहे ज्ञान सद्गुरु करितां । होये सार्थकता गुरुचेनी ॥ २६ ॥
गुरुचेनी परलोक ठांई पडे । सार तें निवडे प्रत्ययेंसीं ॥ २७ ॥
प्रत्ययेंसीं बोले तेंचि तें बोलणें । अर्चन करणें गुरुदेवा ॥ २८ ॥
गुरुदेवालागी करीं नमस्कार । साहावा विचार भक्ति ऐसी ॥ २९ ॥
सर्व दास्य कीजे ते भक्ति सातवी । सख्य ते आठवी भक्ति जाण ॥३०॥
नौमीचें लक्षण आत्मनिवेदन । सर्वदा अभिन्न परब्रह्मीं ॥ ३१ ॥
परब्रह्म स्वयें आपणची होणें । ऐसीं हें लक्षणें सार्थकाचीं ॥ ३२ ॥
सार्थक भजन आत्मनिवेदन । विवेकें अभिन्न देव भक्त ॥ ३३ ॥
देव भक्त कैसे हें आधीं पाहावें । स्थितीनें राहावें सर्व काळ ॥ ३४ ॥
सर्व काळ वस्तु आहे जैसी तैसी । देह प्रारब्धासी समर्पिला ॥ ३५ ॥
समर्पिला त्यासी होणार होईल । जाणार जाईल पंचभूत ॥ ३६ ॥
पंचभूत माया माईक दिसते । होते आणि जाते स्वप्नाकार ॥ ३७ ॥
स्वप्नाकार माया आपण वेगळा । असोनि निराळा सर्वांमध्यें ॥ ३८ ॥
सर्वांमध्यें आहे त्यासी सर्व पाहे । आहे तैसा आहे सदोदित ॥ ३९ ॥
सदोदित वस्तु तेंचि ते आपण । रामदास खूण सांगतसे ॥ ४० ॥

---

८

सप्रचीत वॆली मिथ्या कोण केरी । धन्य तो विवरी विवेकानें ॥ १ ॥
विवेकाचे जन भेटतां संकटें । ज्याची खटपट सुखरूप ॥ २ ॥
सुखरूप संत सत्य साभिमानी । तयासीच मानी येरां नाहीं ॥ ३ ॥
येरां नाहीं गती सत्यावांचूनीयां । असत्याचा पायां कोण पडे ॥ ४ ॥
कोण पडे आतां संदेहाचे डोहीं । कोणावीण नाहीं चाड आम्हां ॥ ५ ॥
आम्हां नाहीं चाड ते कोणीं येकाची । दृढ राघवाची कास धरूं ॥ ६ ॥
कास धरूं जेणें पावनची केलें । तेथें माझें जालें समाधान ॥ ७ ॥
समाधान जालें प्रत्ययासी आलें । धन्य तें पाउलें राघवाचीं ॥ ८ ॥
राघवाचीं पदें मानसीं धरीन । विश्व उद्धरीन हेळामात्रें ॥ ९ ॥

---

१ बोल, शब्द. २ प्रचीतीचे बोल मिथ्या कोण करील? ३ दुर्घट, दुर्लभ. ४ लीलेनें.

हेळामात्रें मुक्त करीन या जना । तरीच पावना राघवाचा ॥ १० ॥
राघवाचा दास मी जालों पावन । पतीत तो कोण उरों शके ॥ ११ ॥
उरों शके ऐसें कल्पांतीं घडेना । जो कोण्ही पुसेना त्यासी उणें ! ॥१२॥
उणें न सगतां माझ्या सूर्यवंशा । कोण्हाची दुराशा नाहीं आम्हा ॥१३॥
आम्हां नाहीं उणें राघवाच्या गुणें । ब्रीदची राखणें पावनाचें ॥ १४ ॥
पावनाचें ब्रीद आम्हां प्राप्त जालें । प्रचीतीस आलें कितीयेकां ॥ १५ ॥
कितीयेक जन ज्ञानें उद्धरीले । कृतकृत्य जाले तत्काळची ॥ १६ ॥
तत्काळची मोक्ष हें ब्रीद रामाचें । होत आहे साचें येणें काळें ॥ १७ ॥
येणें काळें मोक्ष जरी मी देईना । दास म्हणवीना राघवाचा ॥ १८ ॥
राघवाचा वर पावलों सत्वर । जनाचा उद्धार करावया ॥ १९ ॥
कराया समर्थ राम सूर्यवंसी । मज कासयासी रागेजता ॥ २० ॥
रागेजतां राग येईल समर्था । हे तों कांहिं सत्ता[2] माझी नव्हे ॥ २१ ॥
माझी सर्व चिंता जानकीजीवना । आतां मी लेखीना ब्रह्मादिकां ॥२२॥
ब्रह्मादिक माये जानकीपासूनी । तयासी व्यापूनी राम आहे ॥ २३ ॥
राम आहे जनीं राम आहे वनीं । राम निरंजनीं सारिखाची ॥ २४ ॥
सारिखाची राम सृष्टी पाहों जातां । तोची पहा आतां निरंतर ॥ २५ ॥
निरंतर राम कांहो अंतरीतां । सोडूनीयां जातां येकेकडे ॥ २६ ॥
येकीकडे जातां तेथेंहि तो राम । सांडुनीयां भ्रम बरें पाहा ॥ २७ ॥
बरें पाहा तुम्ही आतांची पावाल । पावनची व्हाल रामरूप ॥ २८ ॥
रामरूपें सर्व रूपें निवारलीं । असतची जालीं नाहीं ऐसीं ॥ २९ ॥
नाहीं ऐसीं रूपें भित्ती[1] चित्राकार । तैसा हा आकार स्वप्न जैसें ॥ ३० ॥
स्वप्नीचा आकार कल्पनेसी भासे । रामरूप असे निर्विकल्प ॥ ३१ ॥
निर्विकल्प राम कल्पितां होईजे । मिळोनी जाईजे रामरूपीं ॥ ३२ ॥
रामरूपीं सर्व समाधान जालें । पावनची केलें पावनानें ॥ ३३ ॥
पावन हा राम जो कोण्ही पावेल । रामची होईल निजध्यासें ॥ ३४ ॥
निजध्यास नीज वस्तूचा धरावा । श्रवणें करावा साक्षात्कार ॥ ३५ ॥
साक्षात्कार होतां सत्य निर्गुणाचा । मग या गुणाचा पांग नाहीं ॥३६॥
पांग नाहीं ऐसें नेमस्त जाणीजे । शीघ्रची सुटीजे संवसारीं ॥ ३७ ॥
संवसारीं सुटिजे संसार करीतां । सर्वही भोगीतां भोगातीत ॥ ३८ ॥
भोगातीत जैसा श्रीकृष्ण दुर्वास । आत्मज्ञानी तैसा सर्वकाळ ॥ ३९ ॥
सर्वकाळ देहीं असतां विदेही । रामदासीं नाहीं जन्ममृत्यु ॥ ४० ॥

---

१ भित. २ सत्ता, अधीनपण.

९

सर्वांगें सुंदरु कासे पीतांबरु । विद्येचा सागरु वंदियेला ॥ १ ॥
वंदियेली मनीं सरस्वती माता । सद्गुरु समर्था दंडवत ॥ २ ॥
दंडवत माझें संतसज्जनांसी । भाविक जनांसी आळिंगन ॥ ३ ॥
आळिंगनीं माझें निवालें सर्वांग । भाविकांचा संग देईं देवा ॥ ४ ॥
देईं देवा तुझें नाम अहर्निशी । आठवे मानसीं रूप तुझें ॥ ५ ॥
तुझाची आधार मज अनाथासी । [१]झणी अव्हेरीसी मायबापा ॥ ६ ॥
मायबाप बंधु स्वजन सांगाती । तूंची आदि अंतीं माहियेर[२] ॥ ७ ॥
माहियेर माझें पुण्यपरायेण । योगीयां मंडण स्वामी माझा ॥ ८ ॥
स्वामी माझा राम अंतरला दुरी । अवस्था अंतरीं वाटतसे ॥ ९ ॥
वाटतसे खंती[३] सर्वकाळ चित्तीं । केव्हां कृपामूर्ति भेटईल ॥ १० ॥
भेटईल केव्हां राम माझी माता । जीव हा दुश्चीता सर्वकाळ ॥ ११ ॥
सर्वकाळ माझे मनीं आठवण । युगांसम क्षण जात आहे ॥ १२ ॥
जात आहे वय वेचोनीयां माझें । रूप रामा तुझें दिसेना कीं ॥ १३ ॥
दिसेना कीं रूप सांवळें सुंदर । कासे पीतांबर कासियेला ॥ १४ ॥
कासियेली आंगीं चंदनाची उटी । मुक्तमाळा कंठीं डोल देती ॥ १५ ॥
डोल देती माळा पदकीं रत्नकीळा । मृग नाभीं टीळा रेखीयेला ॥ १६ ॥
रेखीयलें भाळीं सुगंध परीमळ । लोधले आळिकुळ[४] झुंकारती ॥ १७ ॥
झुंकारती वास घेती सावकाश । राम राजाधीश शोभतसे ॥ १८ ॥
शोभतसे माथां मुगट रत्नकीळ । कीरीटी तेजाळ रम्य शोभा ॥ १९ ॥
रम्य नीमासुर[५] श्रीमुख साजिरें । दिव्य मकराकारें तळपताती ॥ २० ॥
तळपती कुंडलें बाहीं बाहुंवटे । दोर्दंड गोमटे चाप बाण ॥ २१ ॥
चाप बाण करीं नवरत्नें भूषण । आणी वीरकंकण कीर्तिमुखें ॥ २२ ॥
मुख मुरडुनी सिंह जाती वनीं । जघन देखोनी संकोचले ॥ २३ ॥
संकोचले दैत्य पुतळे तोडरीं । गर्जती गजरीं अंदू वांकीं ॥ २४ ॥
आंदु वांकीं पाईं शोभे वीरासन । माझे मनीं ध्यान आठवलें ॥ २५ ॥
आठवलें रामचंद्रध्यान चित्तीं । सन्मुख मारुती उभा असे ॥ २६ ॥
उभा असे सर्व बंधु समुदाव । त्रिकुटीचा राव बिभीषण ॥ २७ ॥
बिभीषण आणी किष्किंधेचा राव । सर्व समुदाव वानरांचा ॥ २८ ॥
वानरांसहीत राम अयोध्येसी । आनंद जनांसी थोर जाला ॥ २९ ॥
जाला यशवंत राम सूर्यवंसी । रामी रामदासीं भेटी जाली ॥ ३० ॥

---

१ कदाचित, नको. २ माहेर, मूळ, उगम. ३ उत्कंठा, हुरहुर. ४ भृंगसमूह. ५ सुंदर.

## १०

कायें सांगों मी या मारुतीचें बळ । गिळिलें मंडळ मार्तंडाचें ॥ १ ॥
मार्तंड गिळिला येणें बाळपणीं । देवादिकां रणीं पिटीयेलें ॥ २ ॥
पिटीले राक्षस विध्वंसिलें वन । लंकेचें दहन क्षणमात्रें ॥ ३ ॥
क्षणमात्रें आला जानकी शोधुनी । सिंधु वोलांडूनी अवळीला ॥ ४ ॥
अवलीळा जेणें द्रोणाद्री आणीला । राक्षस वधिला काळनेमी ॥ ५ ॥
काळनेमी आणी मारिली विवसी । उद्धार तयेसी जीवदान ॥ ६ ॥
जीवदान दिल्हें तया लक्षुमणा । आणी कपीगणा सकळीकां ॥ ७ ॥
सकळीकां कपीकुळांचें मंडण । वांचविले प्राण बहुतांचे ॥ ८ ॥
बहुतां मधुनी तया राघवासी । नेलें पाताळासी निशाचरीं ॥ ९ ॥
निशाचरीं राम पाताळासी नेला । मागें धाविन्नला हनुमंत ॥ १० ॥
हनुमंतें उडी घातली संकटीं । सोडिलें सेवटीं स्वामीयांसी ॥ ११ ॥
स्वामीयासी सोडी धन्य तो सेवक । कीर्ति अलोलीक मारुतीची ॥१२॥
मारुतीनें तये जानकीकारणें । नगरची नेणें उचलूनि ॥ १३ ॥
उचलूनि माथां तये जानकीसी । वाटे कुंभकासी वधावया ॥ १४ ॥
वधूनीया कुंभकर्णाचा नंदनु । पुन्हा बिभीषणु राज्यीं बैसे ॥ १५ ॥
बैसला मारुती तये सिंधुतीरीं । हुंडारीलें दुरी गरुडासी ॥ १६ ॥
गरुडाची हांव सर्वही यादव । फेडियेला गर्व येकसरा ॥ १७ ॥
येकसरा नामें रूपें पालटीला । मग रक्षीयेला कृष्णनाथ ॥ १८ ॥
कृष्णनाथ रूपें जाहला ब्राह्मण । वांचविले प्राण अर्जुनाचे ॥ १९ ॥
अर्जुनाचें सैन्य रोमावळीअंत । महानदीप्रांत उतरीलें ॥ २० ॥
उतरीलें येणें आर्जुनादिकांतें । गेले दुंदुभीतें वधावया ॥ २१ ॥
वधावया गेले तेणें हुंडारीलें । सागरीं राखिले मारुतीनें ॥ २२ ॥
मारुतीचें बळ वर्णितां सबळ । वाचा हे विबळ[1] होत आहे ॥ २३ ॥
होत आहे साना होत आहे थोर । कोण जाणे पार स्वरूपाचा ॥ २४ ॥
रूप वज्रदेही पुछ्य वज्र ते हिं । रामदासीं नाहीं जन्म मृत्य ॥ २५ ॥

---

## ११

नमस्कार आतां देवा गणनाथा । चरणकमळीं माथा ठेउनीयां ॥ १ ॥
शारदा सुंदरी ते ब्रह्मकुमरी । राजहंसावरी शोभतसे ॥ २ ॥
उमा महेश्वेर शंभूचें शिखर । येती निरंतर विश्वजन ॥ ३ ॥

---

१ निर्बळ, कुंठित.

विश्वासी आधार सुर्यनारायण । तया पंचप्राण वोवाळीन ॥ ४ ॥
स्तंभ फोडुनीयां आला गडगडीत । भक्तांसी रक्षीत नरहरी ॥ ५ ॥
नाना पूजा नाना नैवेद्य विळास । नांदे त्रिमलेश वेंकटेश ॥ ६ ॥
कटावरी कर उभा निरंतर । भक्तांसी आधार पांडुरंग ॥ ७ ॥
तुळजापुरीं माझें कुळींचें दैवत । तुळजा विख्यात भूमंडळीं ॥ ८ ॥
काशीपुरीमध्यें विश्वनाथ राजा । अंतकाळीं वोजा रक्षीतसे ॥ ९ ॥
न करी अव्हेरु कृपेचा सागरु । जानकीचा वरु रामराजा ॥ १० ॥
द्वारकेचा कृष्ण पांडवांचा सखा । बंधु पाठीराखा द्रौपदीचा ॥ ११ ॥
उधळलें भंडार पाली पेंबरीस । नित्य मल्हारीस हळदी लागे ॥ १२ ॥
साटी पत्रशाखा होय शाखांबरी । ते वनशंकरी भक्तमाता ॥ १३ ॥
आउदीये माई मातापुरा गेली । चंडिका देखिली सप्तशृंगीं ॥ १४ ॥
रासीनीरासाई आंबा जोगेश्वेरी । नांदे कोल्हापुरीं महालक्ष्मी ॥ १५ ॥
स्वामीयाचे[2] यात्रे विश्वजन जाती । सप्त जन्म होती भाग्यवंत ॥ १६ ॥
पंचवटीकेसी रामसीतापती । देव हा मारुती जेथें तेथें ॥ १७ ॥
कावेरीचें तीरीं नांदे रंगनाथ । वोड्या जगन्नाथ पूर्वभागीं ॥ १८ ॥
उडुपेचा कृष्ण बद्रीनारायण । भगवंत आपण बारसीचा ॥ १९ ॥
वैकुंठीचा विष्णू कैलासीं शंकर । मुख्य निराकार परब्रह्म ॥ २० ॥

---

## १२ ( रामदासी संप्रदायाचीं वीस लक्षणें. )

प्रथम लिहीणें दुसरें वाचणें । तिसरें सांगणें अर्थांतर ॥ १ ॥
आशंकानिवृत्ति ऐसी चौथी स्थिति । पांचवी प्रचीती अनुभवें ॥ २ ॥
साहावें तें गाणें सातवें नाचणें । ताळी वाजवणें आठवें तें ॥ ३ ॥
नवां अर्थभेद दाहावा प्रबंद[3] । आक्रावां प्रबोध प्रचीतीसीं ॥ ४ ॥
बारावें वैराग्य तेरावा विवेक । चौदावा तो लोक राजी राखे ॥ ५ ॥
पंध्रावें लक्षण तें राजकारण[4] । सोळावें तें जाण अव्यग्रता[5] ॥ ६ ॥
प्रसंग जाणावा हा गुण सत्रावा । काळ समजावा सर्वां ठांईं ॥ ७ ॥
आठ्रावें लक्षण वृत्ती उदासीन । लोलंगता जाण तेथें नाहीं ॥ ८ ॥
येकोणीसावें चिन्ह सर्वांसी समान । राखे समाधान ज्याचें त्याचें ॥ ९ ॥
विसावें लक्षण रामउपासना । वेध लावी जना भक्तिरंगें ॥ १० ॥
भक्तिरंगें देव देवाल्यें शिखरें । वोटे[6] मनोहरें वृंदावनें ॥ ११ ॥

---

१ उत्तमप्रकारें. २ कार्तिकस्वामीचे. ३ काव्यरचना. दा० द० १४ स० ३ पहा. ४ दा० द० १९-९. ५ सावधानता. ६ ओटे.

बावी पोखरंणी रम्य सरोवरें । मंडप विवरें धर्मशाळा ॥ १२ ॥
धर्मशाळा नाना नाना दीपमाळा । तेथें रविकुळा वाखाणावें ॥ १३ ॥
तरुवर पुष्पवाटिका जीवनें । पावनें भुवनें होमशाळा ॥ १४ ॥
उदंड ब्राह्मण ब्रह्मसंतर्पण । पुराणश्रवण आध्यात्मीक ॥ १५ ॥
जन्मासी येउनी अध्यात्म साधावें । नित्य विवरावें सारासार ॥ १६ ॥
असार संसार येणें साधे सार । पाविजेतो पार भवसिंधु ॥ १७ ॥
आयुष्य हें थोडें फार आटाआटी । कठीण सेवटीं वृद्धपण ॥ १८ ॥
येकलेंची यावें येकलेंची जावें । मध्येंची स्वभावें मायाजाळ ॥ १९ ॥
मायाजाळ तुटे तरी देव भेटे । दास म्हणें खोटें भक्तीहीण ॥ २० ॥

---

## १३

संसार करावा जीवें सर्व भावें । तुज विसंभावें[3] अंतरंगा ॥ १ ॥
ऐसें मज नको करूं रे राघवा । माझा सावाधावा तूंची येक ॥ २ ॥
स्वयें महापापी पापची वर्तावें । सज्जना निंदावें सावकास ॥ ३ ॥
दोष राहाटणें या पोटाकारणें । सज्जनाचें उणें काढूं पाहे ॥ ४ ॥
कर्म करवेना धारणा धरवेना । भक्ती उपासना अंतरली ॥ ५ ॥
विषयांचें ध्यान लागलें अंतरीं । दंभ लोकाचारी खटाटोप ॥ ६ ॥
निष्ठा भ्रष्ट जाली स्नानसंध्या गेली । दुराशा लागली कांचनाची ॥ ७ ॥
देव धर्म घडे ते ठाईं वेंचीना[4] । पुण्य तें सांचीना कदाकाळीं ॥ ८ ॥
स्वधर्म बुडाला परिग्रहें नेला । वेवादीं दार्दुला[6] भंडरूपी ॥ ९ ॥
अशक्त दुर्जन पाहे परन्यून । अभिलाषीं मन गुंतलेंसें ॥ १० ॥
कीर्तनीं बैसला पाहे परनारी । परद्रव्यावरी मन गेलें ॥ ११ ॥
न दिसे अंतरीं देवाची आवडी । पापरूपी जोडी पापरासी ॥ १२ ॥
काम क्रोध दंभ लोभ मोहो माया । कीर्तनाच्या ठाया समागम ॥ १३ ॥
घातला उदकीं न भिजे पाषाण । हृदय कठीण तयापरी ॥ १४ ॥
स्वयें नेणे हित श्रवणीं दुश्चित । चंचळ हे चित्त स्थिर नाहीं ॥ १५ ॥
तुझीये रंगणीं राहे अभीमान । नाहीं समाधान दास म्हणे ॥ १६ ॥

---

## १४

देहे हें असार कृमींचें कोठार । परी येणें सार पाविजेतें ॥ १ ॥
लागवेग करी लागवेगं[7] करी । स्वहित विचारी आलया रे ॥ २ ॥

---

१ पुष्करिणी. २ रामवंशास. ३ विसारवें. ४ खर्च करीना किंवा झिजेना ५ संसारानें. ६ वादशूर. ७ त्वरा.

देहेसंगें घडे संसारयातना । परी हा भजना मूळ देहो ॥ ३ ॥
देहाचेनि संगें हिंपुटी होईजे । विचारें पाविजे मोक्षपद ॥ ४ ॥
जन्मास कारण मूळ देहबुद्धी । परी ज्ञानसिद्धी देहसंगें ॥ ५ ॥
देहेसंगें वाटे स्वयें अभिमान । आणी समाधान देहेसंगें ॥ ६ ॥
देहेसंगें उठे स्वयातीमत्सर । आणी पैलपार देहेसंगें ॥ ७ ॥
देहेसंगें जीव होतसे चांडाळ । आणी पुण्यसीळ देहेसंगें ॥ ८ ॥
देहेसंगें प्राणी अधोगती जाती । आणी धन्य होती देहेसंगें ॥ ९ ॥
देहेसंगें बद्ध देहेसंगें मुक्त । देहेसंगें भक्त होत असे ॥ १० ॥
देहेसंगें देव आणी भावाभाव । पाप पुण्य सर्व देहेसंगें ॥ ११ ॥
देहेसंगें वृत्ती होतसे निवृत्ती । गती अवगती देहेसंगें ॥ १२ ॥
देहेसंगें भोग देहेसंगें रोग । देहेसंगें योग साधनाचा ॥ १३ ॥
देहेसंगें देही विदेही संसारी । सद्भाव अंतरीं देहेसंगें ॥ १४ ॥
देहेसंगें तारी देहेसंगें मारी । संतसंग धरी देहेसंगें ॥ १५ ॥
देहेसंगें गती रामदासीं जाली । संगती जोडली राघवाची ॥ १६ ॥

---

## १५

संसार करीतां म्हणती हा दोषी । न करीतां आळसी पोटपोसा ॥ १ ॥
ऐसा हा लोकीक कदा राखवेनां । पतितपावना देवराया ॥ २ ॥
भक्ती करूं जातां म्हणती हा पसारा । न करीतां नरा निंदिताती ॥३॥
आचारें आसतां म्हणती नाक धरी । येर अनाचारी पापरूपी ॥ ४ ॥
सत्संग धरीतां म्हणती हा उपदेसी । येर अभाग्यासी ज्ञान कैचें ॥ ५ ॥
अभाग्यासी म्हणती ठाईंचा करटा । समर्थासी ताठा लावीतसे ॥ ६ ॥
बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ । न बोलतां सकळ म्हणती गर्वी ७
भेटीस नवजातां म्हणती हा निष्ठुर । जातां म्हणती घर बुडवीलें ॥८॥
धर्म न करीतां म्हणती हा सांचीतो । करीतां काढीतो दिवाळें कीं ॥९॥
लग्न करूं जातां म्हणती हा मातला । न करीतां जाला नपुंसक ॥ १० ॥
निपुत्रिकां म्हणती पाहा हा चांडाळ । पातकांचें फळ पोरवडा ॥ ११ ॥
मुखें नाम घेतां करीती टवाळी । ने घेतां ढवाळी सर्वकाळ ॥ १२ ॥
दिसां मरों नये रात्री मरों नये । कदां सरों नये मागांपुढां ॥ १३ ॥
मर्यादा धरीतां लाजाळु चोखट । न धरीतां धीट म्हणती लोक ॥ १४ ॥

---

१ याच अर्थाचा तुकारामांचा अभंग. २ कुचेष्टा.

लोक जैसा वोक धरीतां धरेना । अभक्ती सरेना अंतरीची ॥ १५ ॥
दास म्हणे मज तुझाची आधार । दुस्तर संसार तरीजेल ॥ १६ ॥

## १६

होणार तें कांहीं आतां पालटेना । तरी चिंता मना कां करीसी ॥ १ ॥
नादाबिंदां[1] भेटी जाली जये काळीं । तेव्हांची कपाळीं लीहीयेलें ॥ २ ॥
हानी मृत्यु लाभ होणार जाणार । सर्वही संसार संचीताचा ॥ ३ ॥
ललाटीं लीहिलें होउनियां गेलें । संचीत भोगीलें पाहिजे तें ॥ ४ ॥
त्यागूनीयां देश सेवीला विदेश । तरी सावकास भोगप्राप्ती ॥ ५ ॥
सुखाचा आनंद दुखें होये खेद । ऐसे दोनी भेद पुरातन ॥ ६ ॥
देहाचें निमीत्य चुकवितां नये । आतां चिंता काये करुनियां ॥ ७ ॥
त्रैलोक्य त्यागावें तऱ्हीं तें भोगावें । प्राचीन सांगावें कोणापासीं ॥ ८ ॥
प्राल्ब्ध चुकेना ब्रह्मादिकांचेनी । सर्व देवयानि भोगीयेलें ॥ ९ ॥
भोगीयेलें देव दानव मानव । किन्नर गंधर्व लोकपाळ ॥ १० ॥
प्राप्त पालटाया बहु प्रेत्न केले । परी पालटीले नाहींत कीं ॥ ११ ॥
रावण वोहर[2] आणी कंसासुर । परी तें होणार होत आहे ॥ १२ ॥
पुत्राचेनी सळें[3] जालीं नागकुळें । सुटेना कपाळें परीक्षीती ॥ १३ ॥
ऐसे थोर थोर सांगतां अपार । भोगीलें साचार होणारातें ॥ १४ ॥
होणार तें आहे देहाचा समंध । रामदासीं बोध देहातीत ॥ १५ ॥

## १७

कोणाचें हें घर काणाचा संसार । सांडुनी जोजार जाणें लागे ॥ १ ॥
जाणें लागे अंतीं येकलें सेवट । व्यर्थ खटपट सांडुनीयां ॥ २ ॥
जन्मवरी देहे संसारीं गोविलें । नाहिं कांहिं केलें आत्महित ॥ ३ ॥
आत्महित गेलें संसाराचे वोढी । अंतीं कोण सोडी रामेंवीण ॥ ४ ॥
रामेंवीण कोण्ही सोडविना अतीं । वायांची रडती जिवलगें ॥ ५ ॥
जिवलगीं राम दुरी दुऱ्हाविला । विचार आपुला जाणवेना ॥ ६ ॥
जाणवेना पूर्व सुकृतावांचुनी । पापीयाचे मनीं राम कैचा ॥ ७ ॥
राम कैचा तया लोकिकांची चाड । पुरविती कोड संसाराचें ॥ ८ ॥
संसाराचें कोड तेंचि वाटे गोड । जया नाहिं वाड अनुताप ॥ ९ ॥
अनुतापी जाले संसारीं सुटले । राजे राज्य गेले सांडुनीयां ॥ १० ॥

---

१ नाद आणि बिंदु. २ वधूवर, मेहूण. ३ सळ=आग्रह; बळ.

सांडुनीयां गेले वैभव संपत्ती । पुढें यातायातीचेनि भेणें ॥ ११ ॥
भेणें ते शरण रीघाले देवासी । नेले वैकुंठासी भक्तराज ॥ १२ ॥
भक्तराज भावें भेटले देवासी । रामीरामदासीं धन्य वेळा ॥ १३ ॥

---

## १८

अनुमानें रान घेतसे वाजट[1] । तयासी चावट कोण बोले ॥ १ ॥
बोलतां बोलतां सीणची होतसे । संतोष जातसे अंतरीचा ॥ २ ॥
अंतरीचा देव अंतरीं पाहावा । मीपण हें देवा समर्पावें ॥ ३ ॥
समर्पावें भावें तन मन धन । आत्मनिवेदन कैसें आहे ॥ ४ ॥
कैसे आहे सोहं कैसे आहे हंसा । वाक्या आमोसा[2] वोळखावा ॥ ५ ॥
वोळखतां तेथें तत्वेंची सरती । नाहीं अहंकृती कांहिं येक ॥ ६ ॥
कांहिं तरी येक वृत्ती कामा नये । घडतो अपाय बहुविध ॥ ७ ॥
बहुविध आग्र करावा येकाग्र । सुक्षम समग्र विवंचावें ॥ ८ ॥
विवंचावे चळ चंचळ सर्वदा । तुटती आपदा संसारीच्या ॥ ९ ॥
संसारीक लोक त्या नाहिं विवेक । मुख्य देव येक विसरलीं ॥ १० ॥
विसरलीं तेणें पुनरागमन । श्रवण मनन केलें नाहिं ॥ ११ ॥
केलें नाहिं हित आपु स्वहित । सर्व अंतवंत लोकिक हा ॥ १२ ॥
लोकिकाकरितां कांहींच घडेना । अंतरीं जडेना समाधान ॥ १३ ॥
समाधान होये साधुचे संगती । पाविजेते गति दास म्हणे ॥ १४ ॥

---

## १९

देव सर्व जेणें घातले बांदोडीं[3] । त्याची[4] मुरकुंडी रणांगणीं ॥ १ ॥
ऐसा काळ आहे सर्वां गिळीताहे । विचारूनि पाहें आलया[5] रे ॥ २ ॥
इंद्रजीतनामें इंद्रासी जिंकीलें । त्याचें शीर नेलें गोलांगुळीं[6] ॥ ३ ॥
देवां दैत्या वाळी बळी भूमंडळीं । तया येका काळीं मृत्यु आला ॥ ४ ॥
देवासी पिटीलें तया जाळांधरें । तोडीलें शंकरें शीर त्याचें ॥ ५ ॥
करें भस्म करी नामें भस्मासुर । तयाचा संव्हार विष्णु करी ॥ ६ ॥
प्रल्हादाचा पिता चिरंजीव होता । नृसिंह मारिता त्यासी होये ॥ ७ ॥
विरोचनाघरीं विष्णु जाला नारी । तया यमपुरी दाखविली ॥ ८ ॥
गजासुर गेला दुंदुंभी निमाला । प्रताप राहिला वैभवाचा ॥ ९ ॥

---

१ वाचाळ, वादप्रिय. २ अंमळसा. ३ बंदिखान्यांत. ४ रावणाची. ५ जन्मास आलेल्या प्राण्या ! ६ वानरांनीं.

ऐसे थोर थोर प्रतापी अपार । गेले कळेवर सांडुनीयां ॥ १० ॥
शरीर संपत्ती सर्व गेली अंतीं । सोसील्या विपत्ती येकायेकी ॥ ११ ॥
म्हणोनि वैभवा कदा भुलों नये । क्षणा होये काये तें कळेना ॥ १२ ॥
रामदास म्हणे स्वहित करणें । निर्धारें मरणें मागें पुढें ॥ १३ ॥

---

## २०

दृश्य हे काशाचें कोणें उभारिलें । मज निरोपीलें पाहिजे हें ॥ १ ॥
पाहिजे हें दृश्य भूतपंचकाचें । उभारलें साचें मायादेवी ॥ २ ॥
मायादेवी कैसी कोण वोळखावी । आणी हे त्यागावी कोणेपरि ॥ ३ ॥
परी हे मायेची कैसी वोळखावी । जाणोनि त्यागावी ज्ञानबोधें ॥ ४ ॥
ज्ञानबोधें माया जाणोनि त्यागिली । परी नाहीं गेली काय कीजे ॥ ५ ॥
कीजे निरूपण संतांचे संगतीं । तेणें शुद्ध मती होत असे ॥ ६ ॥
होत असे परी तैसेंचि असेना । निश्चयो वसेना मनामध्यें ॥ ७ ॥
मनामध्यें सदा विवेक धरावा । निश्चयो करावा येणें रीती ॥ ८ ॥
रीती विवेकाची पाहातां घडीची । जातसे सवेंची निघोनीयां ॥ ९ ॥
निघोनीयां जाये विवेक आघवा । तो संग त्यागावा साधकानें ॥ १० ॥
साधकानें संग कोणाचा त्यागावा । सद्दढ धरावा कोण संग ॥ ११ ॥
संग हा आदरें धरीं सज्जनाचा । त्यागीं दुर्जनाचा दास म्हणे ॥ १२ ॥

---

## २१

आपुल्या भजनें पोटही भरेना । लागे उपार्जना[1] दुसऱ्याची ॥ १ ॥
दुसऱ्याची सेवा करितां वेतन । पाविजेतें अन्न लोकामधें ॥ २ ॥
लोकामधें उपासितां देहदारा । मागावा मुषारा कोणापासीं ॥ ३ ॥
कोणापासीं कोणें काये हो सांगावें । कैसेनि मागावें वेतनासी ॥ ४ ॥
वेतनासी जनीं तरीच पाविजे । जरी सेवा कीजे स्वामीयाची ॥ ५ ॥
स्वामीयाची सेवा करितां उत्पन्न । स्वामी सुप्रसन्न होत असे ॥ ६ ॥
होत असे देव संतुष्ट भजतां । मुक्ति सायुज्यता तेणें लाभे ॥ ७ ॥
लाभे नवविधा तेणें चतुर्विधा । पुसावें सुबुद्धा सज्जनासी ॥ ८ ॥
सज्जनासी पुसा देहासी भजतां । भार भगवंता कैसा पडे ॥ ९ ॥
कैसा पडे भार देहाच्या भजनें । भक्तीचेनि गुणें देव पावे ॥ १० ॥
देव पावतसे भजतां देवासी । सेवितां देहासी देव कैचा ॥ ११ ॥
देव कैचा देव सेविल्यावांचुनी । तत्वविवंचनी दास म्हणे ॥ १२ ॥

---

[1] सेवा.

## २२

येतां संसारासी जाल्या दुःखरासी । कोणाला असोसी[1] कासयाची ॥१॥
पात्र कोण्ही येक भरला वमंक[2] । खायाचा विवेक तेथें कैचा ॥ २ ॥
विषय नासका कळला असका[3] । सुख नाहीं येका देवेंविण ॥ ३ ॥
देवेंवीण येका सर्व कांहिं फोल । वासना गुंतेल कोणे ठाईं ॥ ४ ॥
कोणे ठाईं आतां असोसी राहिली । वासना गुंतली रामपाईं ॥ ५ ॥
रामपाईं जन्म मृत्यु आडळेना । दास म्हणे मना सावधान ॥ ६ ॥

## २३

सावधानपणें कांहिंच नुरावें । त्वरें उद्धरावें कोण्ही येकें ॥ १ ॥
कोण्ही येकें इच्छा देवाची मानावी । आपुली नाणावी वासना हे ॥ २ ॥
वासनेसी मनापासूनि कंटाळा । जन्मासी वेगळा सहजची ॥ ३ ॥
सहजची आतां मन कंटाळलें । पोंचट वाटलें सर्व कांहिं ॥ ४ ॥
सर्व कांहिं दीसे मिथ्या वोडंबरी । साचाचीये परी कोण मानी ॥ ५ ॥
मानेसेंहि नाहीं असोसीही नाहीं । दास कांहिं नाहिं राम येक ॥ ६ ॥

## २४

सर्व कांहि चिंता केली भगवंतानें । आपुले चिंतेनें काय होतें ॥ १ ॥
काय होतें देव कांहीं कां करीना । विश्वासानें मना उर्ध्वगती ॥ २ ॥
उर्ध्वगती हे तों बुद्धीच्या वैभवें । उत्तराई व्हावें काय आतां ॥ ३ ॥
काय आतां द्यावें काय आहे माझें । मीपणाचें वोझें कासयासी ॥ ४ ॥
कासयासी चित्त दुश्चित्त करावें । संसारीं तरावें देवाचेनि ॥ ५ ॥
देवाचेनि नामें हरतील कर्मे । परी नित्यनेमें जपध्यान ॥ ६ ॥
जपध्यान पूजा आखंड करावी । बुद्धी विवरावी देवदेणें ॥ ७ ॥
देवदेणें बुद्धी तेणें सव सिद्धी । गती निरवधी होत असे ॥ ८ ॥
होत असे गती देवीं विश्वासतां । चिंता नाहीं आतां कासयाची ॥ ९ ॥
कासयाची चिंता कासया करावी । भक्ती हे धरावी राघवाची ॥ १० ॥
राघवाची भक्ती तेणें होये मुक्ती । भक्तीविण युक्ती कामा नये ॥ ११ ॥
कामा नये युक्ती धरावा विश्वास । सांगतसे दास प्रचीतीनें ॥ १२ ॥

---

१ हाव. २ कोणी एक भांडभर ओकला. ३ संपूर्ण.

## २५

करावें तें काये तेणें होतें काये । अनुमानें काये प्राप्त होतें ॥ १ ॥
प्राप्त होतें काये ऐसेंही कळेना । नये अनुमाना सर्व कांहिं ॥ २ ॥
सर्व कांहिं येका आत्मज्ञानेंविण । दिसताहे सीण वाउगाची ॥ ३ ॥
वाउगाची लाभ प्रचीतीवेगळा । उगाचि आगळा दीसताहे ॥ ४ ॥
दिसताहे फळ लोकचि म्हणती । आपुली प्रचीती कांहिं नाहिं ॥ ५ ॥
कांहिं नाहिं पूर्वजन्माचें स्मरण । होये विस्मरण सर्व कांहिं ॥ ६ ॥
सर्व कांहिं मागें जाहलें कळेना । म्हणोनी फळेना केलें कर्म ॥ ७ ॥
केलें कर्म कोणें कोणासी पुसावें । अनुमानें व्हावें कासावीस ॥ ८ ॥
कासावीस जाला कर्में जाजावला । व्यर्थ भ्रमें गेला अंतकाळीं ॥ ९ ॥
अंतकाळीं गेला सर्व सांडूनीयां । भ्रमला प्राणी या विस्मरणें ॥ १० ॥
विस्मरण जाये सद्गुरुकरितां । दास म्हणे आतां गुरु करीं ॥ ११ ॥

---

## २६

आतांची ये देहीं मुक्ति पाविजेना । तरी कां सज्जना शरण जावें ॥ १ ॥
शरण जातां भावें सज्जनचि व्हावें । सीघ्र उद्धरावें निरूपणीं ॥ २ ॥
निरूपणें निजस्वरूप सांपडे । गुज ठाईं पडे अकस्मात ॥ ३ ॥
अकस्मात ठाव न दिसे आपुला । निरंजनीं जाला निरंजन ॥ ४ ॥
निरंजन जाला ये लोकीं असोनी । उन्मनीगीन्मनी नाडळती ॥ ५ ॥
नाडळती जेथें कांहिं देहभाव । तत्वज्ञानें वाव देहबुद्धी ॥ ६ ॥
देहेबुधी गेली देखत देखतां । मी हें कोण आतां सांपडेना ॥ ७ ॥
सांपडेना शुद्धी मीपण पाहातां । मीपण तें जातां वस्तुरूप ॥ ८ ॥
वस्तुरूप बोधें अरूप होईजे । विवेकेंचि कीजे विचारणा ॥ ९ ॥
विचारणा जाली रामीरामदासीं । आतां या जन्मासी ठाव नाहीं ॥१०॥
ठाव नाहिं ऐसें राघवाचें देणें । थोराहुनि होणें थोर स्वयें ॥ ११ ॥

---

## २७

प्रातःकाळ जाल्या राम आठवावा । हृदईं धरावा क्षण येक ॥ १ ॥
क्षण येक राम हृदईं धरीजे । संसारीं तरीजे हेळामात्रें ॥ २ ॥
हेळामात्रें रामनामें होय गती । भाग्यवंत घेती सर्व काळ ॥ ३ ॥
सर्व काळ राम मानसीं धरावा । वाचे उचारावा नामघोष ॥ ४ ॥
नामघोष वाचे श्रवण कीर्तन । चरणीं गमन देवाळया ॥ ५ ॥

देवाळयां जातां सार्थक जाहालें । कारणीं लागलें कळेवर ॥ ६ ॥
कळेवर त्वचा जोडुनी हस्तक । ठेवावा मस्तक रामपांईं ॥ ७ ॥
रामपांईं शिळा जाली दिव्यबाळा । तैसाची सोहळा मानवांसीं ॥ ८ ॥
मानवांसी अंतीं रामनामें गती । सांगे उमापती महादेव ॥ ९ ॥
महादेव सांगे जप पार्वतीस । तोची तो विश्वास रामदासीं ॥ १० ॥

---

## २८

धन्य त्याचें कुळ धन्य त्याचा वंश । जे कुळीं हरिदास अवतरला ॥१॥
धन्य ते जननी धन्य तीची कुसी । जे हरीप्रियासी प्रसवली ॥ २ ॥
धन्य ते संबंधी संतांचे सोईरे । संसर्गें उद्धरे कुळ त्यांचें ॥ ३ ॥
धन्य तो पै ग्राम धन्य तो पै देश । जेथें हरिवास वैष्णवाचा ॥ ४ ॥
धन्य त्यांचे सखे वैष्णवी सर्वदा । ते सर्व गोविंदा जीवलग ॥ ५ ॥
धन्य ते भाविक वंदिती हरिदास । तया हृषीकेश वंदितसे ॥ ६ ॥
धन्य ते निंदक निंदिती सज्जन । येणें भावें ध्यान घडे त्यांचें ॥ ७ ॥
धन्य दासदासी सज्जनसेवेसी । ते सुरवरांसी वंद्य होती ॥ ८ ॥
धन्य पशु श्वान वैष्णवा गृहिंचें । कळिकाळ त्यांचे पाय वंदी ॥ ९ ॥
रामदास म्हणे तरीच धन्य होणें । जरी संग लाधणें सज्जनाचा ॥ १० ॥

---

## २९

रामाचें चरित्र सांगतां अपार । जाहला विस्तार तींहीं लोकीं ॥ १ ॥
तींहीं लोकीं हरें वांटुनी दीधलें । तें आम्हां लाधलें कांहिं येक ॥ २ ॥
कांहिं येक भाग्य होतें पूर्वजांचें । पापियासी कैचें रामनाम ॥ ३ ॥
रामनामें कोटी कुळें उद्धरती । संशय धरीती तेचि पापी ॥ ४ ॥
पापीयाचें पाप जळे येकसरें । जरी मनीं धरे रामनाम ॥ ५ ॥
रामनाम काशीं शिव उपदेसी । आधार सर्वांसी सर्व जाणे ॥ ६ ॥
सर्व जाणे अंतीं रामनामें गती । आणी वेदश्रुती गर्जताहे ॥ ७ ॥
गर्जती पुराणें आणी संत जन । करावें भजन राघवाचें ॥ ८ ॥
राघवाचें ध्यान आवडे कीर्तन । तोची तो पावन लोकांमध्यें ॥ ९ ॥
लोकांमध्यें तरे आणी जना तारी । धन्य तो संसारी दास म्हणे ॥१०॥

---

## ३०

ऐसें आत्मज्ञान उद्धरी जगासी । पाहेना तयासी काय करूं ॥ १ ॥
काय करूं जना जन विवरेना । नेणतां सरेना जन्ममृत्यु ॥ २ ॥
जन्म मृत्यु बाधी मानीना तयासी । कल्पतरु ज्यासी तुच्छ वाटे ॥ ३ ॥
तुच्छ वाटे देव तोची तो निर्दैव । तयासी सदेव कोण करी ॥ ४ ॥
कोण करी येका राघवावांचुनी । राम धरा मनीं सर्वकाळ ॥ ५ ॥
सर्वकाळ गेला दरिद्र भोगीतां । वैराग्य पाहातां तेथें नाहिं ॥ ६ ॥
नाहिं भक्तिज्ञान परमार्थाचें सुख । संसारींही दुःख दरिद्राचें ॥ ७ ॥
दरिद्राचें दुःख केलें देशधडी । रामराज्यगुढी उभविली ॥ ८ ॥
उभविली गुढी भक्तिपंथें जावें । शीघ्रची पावावें समाधान ॥ ९ ॥
समाधान रामीरामदासीं जालें । सार्थकानें केलें सार्थकची ॥ १० ॥

## ३१

जाणे सुखदुःख राम माझा येक । येर तें माईक वैभवाचीं ॥ १ ॥
वैभवाचीं सखीं वोरंगोनि जाती । आत्माराम अंतीं जीवलग ॥ २ ॥
जीवलग नाहिं श्रीरामावांचुनी । हाची माझे मनीं दृढभाव ॥ ३ ॥
भाव अन्यत्रांचा आहे वरपंगाचा । रामेंवीण कैचा अंतरंग ॥ ४ ॥
अंतरीची व्यथा श्रीरामा समर्था । जाणवल्या चिंता दूरी करी ॥ ५ ॥
करी प्रतिपाळ शरण आलियांचा । राम त्रैलोक्याचा मायबाप ॥ ६ ॥
मायबाप धन सज्जन सोयरा । येका रघुवीरावीण नाहिं ॥ ७ ॥
नाहिं मज चिंता श्रीराम असतां । संकटीं बोहातां उडी घाली ॥ ८ ॥
उडी घाली मज अनाथा कारणें । राम सर्व जाणे अंतरीचें ॥ ९ ॥
अंतरीचें गुज राम सर्वबीज । रामदासीं नीज प्रगटलें ॥ १० ॥

## ३२

ऐका नव रस सुंदर सरस । जेणें होय रस सर्व काळ ॥ १ ॥
प्रथम शृंगार दुसरा तो हास्य । तिसरा तो रस करुणेचा ॥ २ ॥
रौद्र तो चतुर्थ वीर तो पांचवा । रस तो साहवा भयानक ॥ ३ ॥
मोहो तो सातवा वीभत्स आठवा । लज्या तो नववा रस जाण ॥ ४ ॥
रसीक बोलणें रसीकची गाणें । रसीक वाचणें प्रसंगीत ॥ ५ ॥
ज्याचें त्याचें परी आवडीसारीखें । बोलतां आरिखें लुब्ध होती ॥ ६ ॥

१ दुर्दैवी. २ धांवा करितां. ३ आर्ष.

लुब्ध होती तरी मृदुची बोलावें । नेमस्त चालावें नीतिन्यायें ॥ ७ ॥
नीतिन्यायें बहुतेकांसी मानतो । व्याप करील तो भाग्यवंत ॥ ८ ॥
भाग्यवंत नर यत्नासी तत्पर । अखंड विचार चाळणेचा ॥ ९ ॥
चाळणेचा यत्न यत्नाची चाळणा । अखंड शहाणा तोची येक ॥ १० ॥
प्रवृत्तीं निवृत्तीं चाळणा पाहिजे । दास म्हणे कीजे विचारणा ॥ ११ ॥

---

## ३३

नमूं वागीश्वरी शारदा सुंदरी । श्रोता प्रश्न करी वक्तयासी ॥ १ ॥
वक्तयासी पुसे जीव हा कवण । शिवाचें लक्षण सांगा स्वामी ॥ २ ॥
सांगा स्वामी आत्मा कैसा तो परमात्मा । बोलिजे अनात्मा तो कवण ३
कवण प्रपंच कोणें केला संच । मागुता विसंच कोण करी ॥ ४ ॥
कोण ते अविद्या सांगिजे जी विद्या । कैस आहे आद्याचें स्वरूप ॥ ५ ॥
स्वरूप तें माया कैसी मूळमाया । ईस चाळावया कोण आहे ॥ ६ ॥
आहे कैसें शून्य कैसें तें चैतन्य । समाधान अन्य तें कवण ॥ ७ ॥
कवण जन्मला कोणा मृत्यु आला । बद्ध मुक्त जाला तो कवण ॥ ८ ॥
कवण जाणता कोणाची हे सत्ता । मोक्ष हा तत्वता कोण सांग ॥ ९ ॥
सांग ब्रह्मखूण सगुण निर्गुण । पंचवीस प्रश्न[1] ऐसे केले ॥ १० ॥

---

## ३४

सत्य राम येक सर्वहि माईक । जाणावा विवेक योगियांचा ॥ १ ॥
योगियांचा देव तया नाहिं खेवं[2] । जेथें जीवशिव ऐक्यरूप ॥ २ ॥
ऐक्यरूप जेथें हें पिंडब्रह्मांड । तें ब्रह्म अखंड निराकार ॥ ३ ॥
निराकार ब्रह्म बोलताती श्रुती । आद्य मध्य अंतीं सारिखेंची ॥ ४ ॥
सारिखेंची ब्रह्म नभाचीये परी । सबाह्य अंतरीं कोंदलेंसे ॥ ५ ॥
कोंदलेंसे परी पाहतां दिसेना । साधुवीण येना अनुभवा ॥ ६ ॥
अनुभवा येना ब्रह्म हें निश्चळ । जया तळमळ संसाराची ॥ ७ ॥
संसाराचें दुःख सर्वहि विसरे । जरी मन भरे स्वस्वरूपीं ॥ ८ ॥
स्वस्वरूपीं नाहिं सुख आणी दुःख । धन्य हा विवेक जयापासीं ॥ ९ ॥
जयापासीं ज्ञान पूर्ण समाधान । त्याची आठवण दास करी ॥ १० ॥

---

१ वरील प्रश्न बरोबर पंचवीसच आहेत. २ अपाय, घोर ( दा० ६-६-३२ ).

## ३५

ऐसा हा मत्सर लागलासे पाठीं । देवा तुझी भेटी केविं घडे ॥ १ ॥
भक्तांसी निंदिती अभक्त दुर्जन । दुर्जनासी जन निंदिताती ॥ २ ॥
भिन्न उपासना भिन्न संप्रदाव । येकमेकां सर्व निंदीताती ॥ ३ ॥
क्रियेसी निंदीती क्रियाभ्रष्ट ज्ञानी । क्रियाभ्रष्टां जनीं निंदीताती ॥ ४ ॥
निस्पृहां निंदीती संसारीक जन । संसारीकां जन निंदीताती ॥ ५ ॥
पंडितां पंडितां वेवाद लागला । पुराणिकां जाला कळ्हो थोर ॥ ६ ॥
वैदिकां वैदिक भांडती निकुरें । योगी परस्परें भांडताती ॥ ७ ॥
प्रपंचीं परमार्थीं भांडण तुटेना । लोभ हा सुटेना तेणें गुणें ॥ ८ ॥
स्मार्त ते वैष्णव शाक्त आणी शैव । निंदीताती सर्व परस्परें ॥ ९ ॥
स्वजाती विजाती भांडण लागलें । दास म्हणें केलें अभिमानें ॥ १० ॥

---

## ३६

बहुसाल शीण होतसे कठीण । देवासी जतन करावया ॥ १ ॥
करावया भक्ति भावें महोत्साव । देवासाठीं राव वोळगावा ॥ २ ॥
वोळगावा[१] राव राखावया देव । देवासी उपाव मनुष्याचा ॥ ३ ॥
मनुष्याचा देव पूजीतां कष्टलों । कासावीस जालों वाउगाची ॥ ४ ॥
वाउगाची देव पाषाणाचा केला । भाव हा लागला तयापासीं ॥ ५ ॥
तयापासीं मन अखंड लागलें । तों तया फोडीलें कोण्ही येकें ॥ ६ ॥
कोण्ही येकें बरा विवेक पाहावा । देवा[२]आदिदेवा वोळखावें ॥ ७ ॥
वोळखावें देवा निर्मळा निश्चळा । निर्गुणा केवळा निरंजना ॥ ८ ॥
निरंजना देवा कोण्ही उच्छेदीना । फुटेना तुटेना कदाकाळीं ॥ ९ ॥
कदाकाळीं देव पडेना झडेना । दृढ उपासना रामदासीं ॥ १० ॥

---

## ३७

वोकीतां वोकीतां मन कंटाळलें । राखेनें झांकीलें सावकास ॥ १ ॥
सावकाश तया कोण अभिलाषी । कोणाला असोसी कासयाची ॥ २ ॥
कासयाची आतां वासना धरावी । गोडी विवरावी विषयांची ॥ ३ ॥
विषयांची गोडी कंटाळलें मन । नागवले जन असोसीचे[३] ॥ ४ ॥
असोसीचे जन ते जन्म घेईल । जीवची देईल विषयांसी ॥ ५ ॥

---

१ लाभ करून घ्यावा, जोडावा. २ मुख्य देवास. ३ हाव बाळगणारे.

विषयांसी वीट मनापासूनीयां । निर्वासना तया जन्म नाहिं ॥ ६ ॥
जन्म नाहिं ऐसें केलें देवरायें । वासना उपायें सोडविली ॥ ७ ॥
सोडविली देव धन्य दयानिधी । तुटली उपाधी सर्व कांहिं ॥ ८ ॥
सर्व कांहिं नाहिं हेंची हें प्रमाण । दास म्हणे खूण देव जाणे ॥ ९ ॥
देव जाणे सर्व राहिला विकार । ब्रह्म निर्विकार दास म्हणे ॥ १० ॥

---

## ३८

ब्रीद साच केलें भक्तां उद्धरीलें । प्रचीतीस आलें मनाचीये ॥ १ ॥
मनाची प्रचीती जाली निर्वासना । लेशहि असेना विषयांचा ॥ २ ॥
विषयांचा लेश संसारदायक । जानकीनायक चुकवीतो ॥ ३ ॥
चुकवितो जन्ममृत्यु सेवकाचा । विचार हा काचा कदा नव्हे ॥ ४ ॥
कदा नव्हे कांहिं वाक्य अप्रमाण । धरावे चरण राघवाचे ॥ ५ ॥
राघवाचे दास सर्वस्वें उदास । तोडी आशापाश देवराणा ॥ ६ ॥
देवराणा भाग्यें जालीयां कैपक्षी[1] । नानापरी रक्षी सेवकांसी ॥ ७ ॥
सेवकांसी कांहिं नलगे साधन । करितो पावन ब्रीदासाठीं ॥ ८ ॥
ब्रीदासाठीं भक्त तारिले अपार । आतां वारंवार किती सांगों ॥ ९ ॥
किती सांगों देव पतीतपावन । करावें भजन दास म्हणे ॥ १० ॥

---

## ३९

स्वप्नीच्या सुखें सुखावला प्राणी । थोर जाली हाणी जागृतीसी ॥ १ ॥
जागृतीसी नाहिं स्वपनीचें सुख । तेणें जालें दुःख बहुसाल ॥ २ ॥
बहुसाल खेद मानीला अंतरीं । वांयां झडकरी जागा जालों ॥ ३ ॥
जागा जालों म्हणे वायां अवचीता । निजोनि मागुता सुख पाहे ॥ ४ ॥
सुख पाहे पुन्हा स्वप्नींचें न दिसे । भयानक दिसे प्राणीयासी ॥ ५ ॥
प्राणीयासी दुःख जाहालें मागुतें । जागा जालियातें सर्व मिथ्या ॥ ६ ॥
मिथ्या सुखदुःख स्वप्नाचा वेव्हार । तैसा हा संसार नाथिलाची ॥ ७ ॥
नाथिलाचि जाय क्षण आनंदाचा । सर्वेची दुःखाचा क्षण जाये ॥ ८ ॥
क्षण येक मना राघवीं सावध । तेणें नव्हे खेद दास म्हणे ॥ ९ ॥

---

१ कैवारी.

## ४०

देव हे समर्थ आणी देहेधारी । कष्टी परोपरीं ब्रह्मादिक ॥ १ ॥
ब्रह्मादिक तया रावणाचे बंदीं । दैत्य उणी संधी पाहाताती ॥ २ ॥
पाहाताती येकीं केल्या हज्यामती । रासभें राखती येक देव ॥ ३ ॥
देवची गादले[1] बहु दगदले । कासाविस जाले कारागृहीं ॥ ४ ॥
कारागृही देहेसंबंधानें होती । विवेकें राहाती देहातीत ॥ ५ ॥
देहातीत दुःख सांडुनि संसार । येथें काय सार सांपडलें ॥ ६ ॥
सांपडलें नाहिं कष्ट जन्मवरी । दीनाचीयेपरी दैन्यवाणे ॥ ७ ॥
दैन्यवाणे देव जाले संवसारीं । मनुष्याचा करी कोण लेखा ॥ ८ ॥
लेखा नाहिं ऐसें कासया करावें । निश्चळची व्हावें दास म्हणे ॥ ९ ॥

---

## ४१

जीव येकदेसी शीव येकदेसी । याचेनी सायासीं कांहिं नव्हे ॥ १ ॥
हित करवेना आपुलें आपण । त्यासी कर्तेपण घडे केवि ॥ २ ॥
देहे त्याचा त्याला न जाय राखीला । निमित्यें भक्षिला अकस्मात ॥३॥
काळ आवर्षण पडतां कठीण । तेव्हां पंचप्राण सोडूं पाहे ॥ ४ ॥
जीवा जीवपण देता नारायण । तयावीण कोण करूं शके ॥ ५ ॥
राया करी रंक रंका करी राव । तेथें धरीं भाव आलया रे ॥ ६ ॥
आलया रे जना भावासीं कारण । येर निःकारण सर्व कांहिं ॥ ७ ॥
सर्वही हे देहे देवाचीपासुनि । तयाचे भजनीं रामदास ॥ ८ ॥

---

## ४२

छत्र सुखासनी अयोध्येचा राजा । नांदतसे माझा मायबाप ॥ १ ॥
माझा मायबाप त्रिलोकीं समर्थ । सर्व मनोरथ पूर्ण करी ॥ २ ॥
पूर्ण प्रतापाचा कैवारी देवांचा । नाथ अनाथांचा स्वामी माझा ॥ ३ ॥
स्वामी माझा राम योगियां विश्राम । सांपडलें वर्म थोर भाग्य ॥ ४ ॥
थोर भाग्य ज्याचें राम त्याचें कुळीं । संकटीं सांभाळी भावबळें ॥ ५ ॥
भावबळें जेंहीं धारिला अंतरीं । तया क्षणभरी विसंबेना ॥ ६ ॥
विसंबेना कदा आपुल्या दासासी । रामी रामदासीं कुळस्वामी ॥ ७ ॥

---

[1] पिडावले.

४३

काया हे काळाची घेउनी जाणार । तुझेनी होणार काय बापा ॥ १ ॥
काय बापा ऐसें जाणोनी नेणसी । मी माझें म्हणसी वायावीण ॥ २ ॥
वायावीण शीण केला जन्मवरी । दंभ लोकाचारी नागवण ॥ ३ ॥
नागवण आली परलोका जातां । लौकिक तत्वता येहीं लोकीं ॥ ४ ॥
केली नाहिं चिंता नामीं कानकोडें । आतां कोण्या तोंडें जात आहे ॥५॥
जात आहे सर्व सांडूनि करंटा । जन्मवरी ताठा धरुनीयां ॥ ६ ॥
धरुनीयां ताठा कासया मरावें । भजन करावें दास म्हणे ॥ ७ ॥

४४

पूर्ण समाधान इंद्रियदमन । श्रवण मनन निरंतर ॥ १ ॥
निरंतर ज्याचे हृदईं विवेक । उपासना येक तोची धन्य ॥ २ ॥
धन्य तोची येक संसारीं पाहातां । विवेकें अनंता ठाईं पाडी ॥ ३ ॥
ठाईं पाडी निजस्वरूप आपुलें । असोनी चोरलें जन्मोजन्मीं ॥ ४ ॥
जन्मोजन्मीं केलें पुण्य बहुसाल । तरीच घडेल संतसंग ॥ ५ ॥
संतसंग जया मानवा आवडे । तेणें गुणें घडे समाधान ॥ ६ ॥
समाधान घडे सज्जनाच्या संगें । स्वरूपाच्या योगें रामदासीं ॥ ७ ॥

४५

साधु आणी भक्त व्युत्पन्न विरक्त । तपोनिधी शांत अपूर्वता ॥ १ ॥
अपूर्वता जनीं शुद्ध समाधानी । जनाचे मिळणीं मिळों जाणें ॥ २ ॥
मिळों जाणे जना निर्मळवासना । अंतरिं असेना निंदाद्वेष ॥ ३ ॥
निंदाद्वेष नसे जनीं लक्ष असे । जेथें कृपा वसे सर्वकाळ ॥ ४ ॥
सर्वकाळ जेणें सार्थकीं लाविला । वंश उद्धरीला नामघोषें ॥ ५ ॥
नामघोष वाचे उच्चारीं सर्वदा । संतांच्या संवादा वांटेकरी ॥ ६ ॥
वांटेकरी जाला सायुज्यमुक्तीचा । धन्य तो दैवांचा दास म्हणे ॥ ७ ॥

४६

विश्रांतीचें स्थळ स्वरूप केवळ । द्वैततळमळ जेथें नाहिं ॥ १ ॥
जेथें नाहिं काया नाहिं मोह माया । रंका आणी राया सारिखेंची ॥२॥
सारिखेंची सदा सर्वदा स्वरूप । तेंची तुझें रूप जाण बापा ॥ ३ ॥
जाण बापा स्वयें तूंची आपणासी । सोहंस्मरणासी विसरतां ॥ ४ ॥
विसरतां सोहं स्मरण आपुलें । मग गुंडाळलें मायाजाळीं ॥ ५ ॥
मायाजाळीं तुझा तूंची गुंतलासी । यातना भोगिसी नेणोनीयां ॥ ६ ॥
म्हणोनीयां होईं सावध अंतरीं । सोहं दृढ धरीं दास म्हणे ॥ ७ ॥

४७

आम्हां तुम्हा मुळीं जाली नाहिं तुटी । तुटीवीण भेटी ईच्छीतसा ॥ १ ॥
ईच्छीतसा योग नसतां वियोग । तुम्हां आम्हां योग सर्वकाळ ॥ २ ॥
सर्वकाळ तुम्ही आम्ही येकेस्थळीं । वायां मृगजळीं बुडों नये ॥ ३ ॥
बुडों नये आतां सावध असावें । रूप वोळखावें जवळीच ॥ ४ ॥
जवळीच आहे नका धरूं दुरी । बाह्यअभ्यंतरीं असोनीयां ॥ ५ ॥
असोनि सन्निध वियोगाचा खेद । नसोनीयां भेद लाऊं नये ॥ ६ ॥
लाऊं नये भेद माईक संबंधी । रामदासीं बोधीं भेटी जाली ॥ ७ ॥

४८

तुम्ही आम्ही करूं देवाचा निश्चयो । जया नाहीं लयो तोची देव ॥ १ ॥
देव हा अमर नित्य निरंतर । व्यापूनी अंतर देव आहे ॥ २ ॥
देव आहे सदा सबाह्य अंतरीं । जीवा क्षणभरी विसंबेना ॥ ३ ॥
विसंबेना परी देवासी नेणवे । म्हणोनियां धांवे नाना मती ॥ ४ ॥
नाना मती देव पाहतां दिसेना । जंव तें वसेना ज्ञान देहीं ॥ ५ ॥
ज्ञान देहिं वसे तया देव दिसे । अंतरीं प्रकाशे ज्ञानदृष्टी ॥ ६ ॥
ज्ञानदृष्टीं होतां पाविजे अनंता । हा शब्द तत्वता दास म्हणे ॥ ७ ॥

४९

अनंताचा अंत पाहावया गेलों । तेणें विसरलों आपणासि ॥ १ ॥
आपणा आपण पाहतां दिसेना । रूप गंवसेना दोहिंकडे ॥ २ ॥
दोहींकडे देव आपणची आहे । संग हा न साहे माझा मज ॥ ३ ॥
माझा मज भार जाहला बहुत । देखत अनंत कळों आला ॥ ४ ॥
कळों आला भार पाहिला विचार । पुढें सारासारविचारणा ॥ ५ ॥
विचारणा जाली रामीरामदासीं । सर्वही संगासी मुक्त केलें ॥ ६ ॥
मुक्त केलें मोक्षा मुक्तीची उपेक्षा । तुटली अपेक्षा कोणी येक ॥ ७ ॥

५०

पूर्वपक्ष भेद सिद्धांत अभेद । संवाद विवाद समागमें ॥ १ ॥
समागमें आहे सर्व अनुमान । कल्पनेचें रान जेथें तेथें ॥ २ ॥
जेथें तेथें पूर्ण ब्रह्म कोंदाटलें । दृश्यहि दाटलें कल्पनेचें ॥ ३ ॥
कल्पनेचें दृश्य करि कासाविस । नाहिं सहवास सज्जनाचा ॥ ४ ॥
सज्जनाचा वास संदेहाचा नास । विचारें विलास जेथें तेथें ॥ ५ ॥
जेथें तेथें आहे देव निरंजन । तन मन धन त्यासी पावो ॥ ६ ॥
तन मन धन तो जगजीवन । आत्मनिवेदन रामदासीं ॥ ७ ॥

## ५१

कोण्ही येकें आधीं देवासी भजावें । तेणें पडे ठावें सर्व कांहिं ॥ १ ॥
सर्व कांहिं चिंता देवची करीतो । स्वयें उद्धरीतो सेवकासी ॥ २ ॥
सेवकासी काय कळे देवेंविण । साधनाचा शीण वाउगाची ॥ ३ ॥
वाउगाची शीण हें आलें प्रचीती । देव आदिअंतीं सांभाळितो ॥ ४ ॥
सांभाळितो देव तेथें जाला भाव । देवची उपाव सेवकांसी ॥ ५ ॥
सेवकांसी कांहिं न चले उपाये । दाखविली सोये साभिमानें ॥ ६ ॥
साभिमानें सोये देव धन्य होये । सहज उपाये दास म्हणे ॥ ७ ॥

## ५२

देवा त्वां घेतला मत्स्यअवतार । कासव डुकर कासयासी ॥ १ ॥
कासयासी देवें कपट करावें । खुजटची व्हावें बळीचेथें ॥ २ ॥
बळीचेथें नाना कपट करावें । मातेसी मारावें कासयासी ॥ ३ ॥
कासयासी वाळी उगाची मारिला । मिथ्या शोक केला वनांतरीं ॥ ४ ॥
वनांतरीं शोक चोरी घरोघरीं । देव परद्वारी म्हणताती ॥ ५ ॥
म्हणताती बोध्य जाला निःसंगळ[1] । कलंकी दुरुळ दास म्हणे ॥ ६ ॥

## ५३

निरूपणीं जनीं लाभे सर्व कांहिं । दुजें ऐसें नाहिं पाहों जातां ॥ १ ॥
साराचेंही सार वेदां अगोचर । ते लाभे साचार निरूपणें ॥ २ ॥
दाखवीतां नये बोलिलें न जाये । त्याची कळे सोये निरूपणें ॥ ३ ॥
मनासी नाकळे मीपणा नाडळे । तें गुज निवळे निरूपणें ॥ ४ ॥
व्युत्पत्तीचें कोडें तर्कांचें सांकडें । तें जोडे रोकडें निरूपणें ॥ ५ ॥
मन हें चंचळ तें होय निश्चळ । साधनाचें फळ दास म्हणे ॥ ६ ॥

## ५४

तूं काय जालासी अगा निरंजना । आह्मां भक्तजना सांभाळावें ॥ १ ॥
सांभाळावें सदा बाह्यअभ्यंतरीं । आम्हां क्षणभरी सोडूं नये ॥ २ ॥
सोडूं नको वायां गुप्त कां जालासि । देवा देखिलासी संतसंगें ॥ ३ ॥
संतसगें गुप्त होउनी पाहिलें । संगत्यागें जालें दरुशण ॥ ४ ॥
दरुशण जालें तेची ते जाणती । नसोनी असती कल्पकोडी ॥ ५ ॥
कल्पकोडी जोडी जाली निर्गुणाची । दास म्हणे कैची देहेबुद्धी ॥ ६ ॥

---

१ निर्लज्ज.

५५

माणसाचें ब्रह्म होतें कोणेपरी । ऐसें तूं विचारीं आलया रे ॥ १ ॥
आलया माणुस हें कोणा म्हणावें । बरें हें जाणावें शोधूनियां ॥ २ ॥
शोधूनियां पाहतां स्थूळाचा चाळक । सूक्ष्माचा येक मनप्राण ॥ ३ ॥
मनप्राणेंविण हें कांहिं घडेना । हेंची आणा मना विवेकी हो ॥ ४ ॥
विवेकी हो तुम्ही विवेक पाहावा । संसाराचा गोवा कोण करी ॥ ५ ॥
कोण करीतसे सर्वहि करणी । दास निरूपणीं सावधान ॥ ६ ॥

५६

सावधान व्हावें विवेका पाहावें । वायोच्या स्वभावें सर्व कांहिं ॥ १ ॥
सर्व कांहिं घडे वायोची करीतां । वायो पाहों जातां आडळेना ॥ २ ॥
आडळेना वायो आकाशीं विराला । कर्ता काय जाला अंतरीचा ॥ ३ ॥
अंतरीचा सर्व विवेक पाहातां । ब्रह्मरूप आतां सहजची ॥ ४ ॥
सहजची जालें विचारानें केलें । माणूस पाहीलें शोधुनीयां ॥ ५ ॥
शोधुनीयां जीत माणूस पाहावें । वर्म पडे ठावें दास म्हणे ॥ ६ ॥

५७

अलभ्याचा लाभ अकस्मात जाला । देव हा वोळला येकायेकीं ॥ १ ॥
येकायेकीं सुख जाहलें येकट । व्यर्थ खटपट साधनाची ॥ २ ॥
साधनाची चिंता तुटली पाहातां । वस्तुरूप होतां वेळ नाहिं ॥ ३ ॥
वेळ नाहिं मज देवदरुशना । सन्मुखची जाणा चहूंकडे ॥ ४ ॥
चहूंकडे मज देवाचें स्वरूप । तेथें माझें रूप हारपलें ॥ ५ ॥
हारपलें चित्त देवासी चिंतीतां । दास म्हणे आतां कोठें आहे ॥ ६ ॥

५८

रामभक्तीवीण अंनु[1] नाहिं सार । साराचेंही सार रामनाम ॥ १ ॥
कल्पनाविस्तारु होतसे संव्हारु । आम्हां कल्पतरु चाड नाहिं ॥ २ ॥
कामनेलागुनि विटलासे मंनु[2] । तेथें कामधेनु कोण काज ॥ ३ ॥
चिंता नाहिं मनीं राम गातां गुणी । तेथें चिंतामणी कोण पुसे ॥ ४ ॥
कदा नाहीं नाश स्वरूप सुंदरे । तेथें काये हिरे नासीवंत ॥ ५ ॥
रामदास म्हणे रामभक्तीविणें । जाणावें हें उणें सर्व कांहिं ॥ ६ ॥

५९

नमूं वक्रतुंडा स्वरूपें प्रचंडा । स्थूळ हें ब्रह्मांडा विराटाचें ॥ १ ॥
विराटाचें सत्य पाताळीं चरण । तेथें अधिष्टान त्रिविक्रमा ॥ २ ॥

---

१ आन, अन्य; अनु=अणु. २ मन.

त्रिविक्रम स्थूळ तें सप्तपाताळ । कट महितळ विराटाचें ॥ ३ ॥
विराटाचें रोम गुल्मलता द्रुम । सर्व नद्या नेम नाडीचक्रें ॥ ४ ॥
नाडीचक्र नद्या सप्तही सागर । जाणावें उदर विराटाचें ॥ ५ ॥
विराटाचा पोटीं क्षुधेचा प्रबळ । तोची दावानळ सागरीचा ॥ ६ ॥

६०

कर्ता येक देव तेणें केलें सर्व । तयापासीं गर्व कामा नये ॥ १ ॥
देहे हें देवाचें वित्त कुबेराच । तेथें या जीवाचें काय आहे ॥ २ ॥
देता देवविता नेता नेवविता । कर्ता करविता जीव नव्हे ॥ ३ ॥
निमित्ताचा धणी केला असे प्राणी । पाहातां निर्वाणीं जीव कैचा ॥ ४ ॥
लक्षुमी देवाची सर्व सत्ता त्याची । त्याविण जीवाची उरी नाहिं ॥ ५ ॥
दास म्हणे मना सावध असावें । दुश्चीत नसावें सर्व काळ ॥ ६ ॥

६१

आलया देवाची वाट चुकलासी । म्हणोनी आलासी संवसारा ॥ १ ॥
संवसारीं दुखें करीसी रुदन । चुकलें भजन राघवाचें ॥ २ ॥
राघवाची भक्ती नेणतां विपत्ती । तुज अधोगती जन्म जाला ॥ ३ ॥
जन्म जाला परी वेगीं सोये धरीं । सत्वर संसारीं मोकळीक ॥ ४ ॥
मोकळीक होये भक्तिपंथें जातां । वाक्य हें तत्वता दास म्हणे ॥ ५ ॥

६२

माझा स्वामी आहे संकल्पापरता । शब्दीं कैसी आतां स्तुती करूं ॥ १ ॥
स्तुती करूं जातां अंतरला दुरी । मीतूंपणा उरी उरों नेंदी ॥ २ ॥
उरों नेंदी उरी स्वामीसेवकपण । येकाकी आपणा ऐसें केलें ॥ ३ ॥
केलें संघटण कापुरें अग्नीसी । तैसी भिन्नत्वासी उरी नाहीं ॥ ४ ॥
उरी नाहिं कदा रामी रामदासा । स्वयें होय ऐसा तोची धन्य ॥ ५ ॥

६३

जेथें तेथें देव नाहीं रिता ठाव । ऐसा माझा भाव अंतरीचा ॥ १ ॥
अंतरीचा देव अंतरीं जोडला । विकल्प मोडला येकसरा ॥ २ ॥
येकसरा लाभ जाला अकस्मात । ब्रह्म सदोदीत सर्वा ठायीं ॥ ३ ॥
सर्वा ठांईं ब्रह्म पंचभूत भ्रम । साधुसंगें वर्म कळों आलें ॥ ४ ॥
कळों आलें वर्म आत्मनिवेदनें । ज्ञानें समाधान रामदासीं ॥ ५ ॥

---

१ झाडेंझुडपें.

६४

संसारींचें दुःख बहुसाल होतें । तें जालें परतें विचारानें ॥ १ ॥
विचारानें सर्व संग वोरंगला । रामरंग जाला असंभाव्य ॥ २ ॥
असंभाव्य सुख मर्यादेवेगळें । विचाराच्या बळें तुंबळलें ॥ ३ ॥
तुंबळलें सर्व चंचळ निश्चळ । द्वैत तळमळ तेथें नाहिं ॥ ४ ॥
तेथें नाहिं दैन्य वस्तु सर्वमान्य । तयासी अनन्य देवदास ॥ ५ ॥

६५

माया हे असार वस्तु आहे सार । कळे विचार साधुसंगें ॥ १ ॥
साधुसंगें संग भंगे साधकांचा । सिद्ध साधकाचा होत आहे ॥ २ ॥
होतसे साधक बरें विवरतां । विवेकें थिरतां[1] परब्रह्मीं ॥ ३ ॥
परब्रह्मीं माया पाहातां दिसेना । येर निरसेना कांहीं केल्यां ॥ ४ ॥
कांहिं केल्यां तरी कांहिं होत नाहिं । आत्मज्ञानें पाहिं दास म्हणे ॥५॥

६६

माझीया देहाचें सांडणें करीन । तुज वोवाळीन चारी देहे ॥ १ ॥
चारी देहे त्यांची व्यर्थ थानमानें । कुर्वंडी करणें देवराया ॥ २ ॥
देवराया जीवें प्राणें वोवाळीन । हृदई धरीन रात्रंदिस ॥ ३ ॥
रात्रंदिस मज देवाची संगती । तेची मज गती सर्वकाळ ॥ ४ ॥
सर्वकाळ माझा सार्थक जाहला । देव सांपडला भक्तपणें ॥ ५ ॥

६७

माझा देहे तुज देखतां पडावा । आवडी हे जीवा फार आहे ॥ १ ॥
फार होती परी पुरली पाहातां । चारी देहे आतां हारपले ॥ २ ॥
हारपले माझे सत्य चारी देहे । आतां निःसंदेहे देहातीत ॥ ३ ॥
देहातीत जाले देवा देखतांची । चिंतीलें आतांची सिद्ध जालें ॥ ४ ॥
सिद्ध जालें माझें मनीचें कल्पीलें । दास म्हणे आलें प्रत्ययासी ॥ ५ ॥

६८

उतावेळ चित्त भेटीचें आरत । पुरवीं मनोरथ मायबापा ॥ १ ॥
रात्रंदिस जीव लागलास झासा[2] । उच्चाट[3] मानसा वाटतसे ॥ २ ॥
पराधीन जीणें काये करूं रामा । नेई निजधामा माहियेरा ॥ ३ ॥
तुजवीण रामा मज कोण आहे । विचारुनी पाहे मायबापा ॥ ४ ॥
रामी रामदास बहु निर्बुजला[4] । मीतूपणा ठेला वोळउनी ॥ ५ ॥

---

१ स्थिर होतां. २ झासा लागणें=भीति घालणें. ३ उतावीळपणा. ४ कंटाळला.

६९

राघवाचें घरीं सदा निरूपण । श्रवण मनन निजध्यास ॥ १ ॥
निजध्यासें सत्य प्रचीत बाणली । साक्षात्कारें जाली सायुज्यता ॥ २ ॥
सायुज्यता मुक्ती विवेकें पाहावी । अंतरीं राहावी विचारणा ॥ ३ ॥
विचारणा सारासार थोर आहे । अनुभवें पाहें साधका रें ॥ ४ ॥
साधका रे साध्य तूंची तूं आहेसी । रामी रामदासीं समाधान ॥ ५ ॥

७०

ज्ञाता ज्ञान ज्ञेये ध्याता ध्यान ध्येये । बोधें साध्य होये साधक तो ॥१॥
साधकु तो वस्तु होउनी राहिला । दृश्य द्रष्टा गेला हारपोनी ॥ २ ॥
हारपोनी गेलें कार्य तें कारण । चुकलें मरण येणें जाणें ॥ ३ ॥
येणें जाणें गेलें निरूपणासरिसें । ब्रह्म निजध्यासें ब्रह्मरूप ॥ ४ ॥
ब्रह्म रूपातीत अच्युत अनंत । दास म्हणे संतसंग धरा ॥ ५ ॥

७१

राजा सांडूनीयां प्रजांचा सेवक । त्यासी कोणी येक रागिजेल ॥ १ ॥
रागेजेना कोण्ही राव वोळगतां । तैसें भगवंता वोळगावें ॥ २ ॥
वोळगावें भावें देवा निर्गुणासी । भजतां गुणासी नाश आहे ॥ ३ ॥
नाश आहे गुणा पाहावें निर्गुणा । योगियांच्या खुणा वोळखाव्या ॥ ४ ॥
वोळखतां खूण श्रवण मननें । आत्मनिवेदनें दास म्हणे ॥ ५ ॥

७२

सर्व धर्म कर्म हातींचें सांडावें । सत्वर धुंडावें शाश्वतासी ॥ १ ॥
शाश्वतासी ठाईं पाडावें विवेकें । निरूपणें येकें साधुसंगें ॥ २ ॥
साधुसंगें बोध साधूनीयां घ्यावा । वेगची करावा चमत्कार ॥ ३ ॥
चमत्कारें आतां प्रचीत बाणावी । स्थिती वोळखावी सज्जनाची ॥ ४ ॥
सज्जनाचा स्थिती सज्जन जाणती । साधकांसी गती दास म्हणे ॥ ५ ॥

७३

तीर्थें व्रतें तपें ज्यालागी शिणावें । त्यासी कां नेणावें विवेकानें ॥ १ ॥
विवेकानें अविवेकची करावा । निश्चयो धरावा बहुविधा ॥ २ ॥
बहुविध जरी बाणला निश्चयो । त्यासी होये लयो वेळ नाहिं ॥ ३ ॥
वेळ नाहिं बहु रूप संव्हारतां । शाश्वत पाहातां आडळेना ॥ ४ ॥
आडळेना जंव दिसेना लोचना । ठाउकें सज्जना दास म्हणे ॥ ५ ॥

## ७४

सृष्टीची रचना सर्वत्र पाहाती । विवेकें राहाती ऐसे थोडे ॥ १ ॥
ऐसे थोडे जन जया आत्मज्ञान । नित्य निरंजन वोळखीला ॥ २ ॥
वोळखीला देव वोळखीला भक्त । वोळखीला मुक्त योगीराज ॥ ३ ॥
योगीयांसी योग आहे निरंतर । वियोगें इतर वर्तताती ॥ ४ ॥
वर्तताती ऐसें कदा न करावें । सार्थक करावें दास म्हणे ॥ ५ ॥

## ७५

सृष्टी नांदताहे सर्व लोक पाहे । तयांतरीं आहे परब्रह्म ॥ १ ॥
परब्रह्म आहे निर्मळ निश्चळ । चंचळ चपळ सृष्टी नांदे ॥ २ ॥
सृष्टी नांदे तेंची शोधावें अंतर । नित्य निरंतर वोळखावें ॥ ३ ॥
वोळखावें निजगुज वेदबीज । सहजीं सहज सदोदीत ॥ ४ ॥
सदोदित देव येर सर्व माव । ऐसा अभिप्राव दास म्हणे ॥ ५ ॥

## ७६

माझा कुळस्वामी कैलासीचा राजा । भक्तांचीया काजा पावतसे ॥ १ ॥
पावतसे दश भुजा उचलून । माझा पंचानन कईवारी ॥ २ ॥
कैवारी देव हा व्याघ्राच्या स्वरूपें । भूमंडळ कोपें जाळूं शके ॥ ३ ॥
जाळूं शके सृष्टी उघडितां दृष्टी । तेथें कोण गोष्टी इतरांची ॥ ४ ॥
इतरांची शक्ती शंकराखालती । वांचविली क्षिती दास म्हणे ॥ ५ ॥

## ७७

आरंभी वंदीन अयोध्येचा राजा । भक्तांचीया काजा पावतसे ॥ १ ॥
पावतसे महासंकटीं निर्वाणीं । रामनाम वाणी उच्चारीतां ॥ २ ॥
उच्चारीतां राम होय पापक्षय । पुण्याचा निश्चय पुण्यभूमी ॥ ३ ॥
पुण्यभूमी पुण्यवंतांसी आठवे । पापीया नाठवे कांहिं केल्यां ॥ ४ ॥
कांहिं केल्यां तुझें मन पालटेना । दास म्हणे जना सावधान ॥ ५ ॥

## ७८

द्रव्य दारा जनी कदा नव्हे धणी । तैसें नाम वाणी असों द्यावें ॥ १ ॥
रात्रंदिवस द्रव्यदारेचें चिंतन । तैसें लावी मन राघवासी ॥ २ ॥
राघवासी मन लावितां आनंद । तेणें तुटे खेद संसारीचा ॥ ३ ॥
संसारीचा खेद संसारिकां होय । जया नाहिं सोय राघवाची ॥ ४ ॥
राघवाची सोय पूर्वपुण्यें होय । अंतीचा उपाय दास म्हणे ॥ ५ ॥

## ७९

देवाचीये पोटीं आयुष्याच्या कोटीं । ऐशा किती सृष्टी होती जाति ॥१॥
होती जाती किती रंक जीव जंतु । परी तो अनंतु जैसा तैसा ॥ २ ॥
जैसा तैसा देव आम्हां सांपडला । संदेह तुटला फुटायाचा ॥ ३ ॥
फुटायाचा भाव फुटोनियां गेला । थोर लाभ जाला शाश्वताचा ॥ ४ ॥
शाश्वताचा लाभ रामीं रामदासीं । कल्पांतीं तयासी भय नाहिं ॥ ५ ॥

## ८०

धन्य माझें भाग्य जालें सफळीत । देव सप्रचीत जेथें तेथें ॥ १ ॥
जेथें तेथें देव येर सर्व माव । माझा अंतर्भाव निवळला ॥ २ ॥
निवळला भाव निर्गुणीं लागतां । विवेकें जाणतां नित्यानित्य ॥ ३ ॥
नित्यानित्य बरें शोधूनि पाहिलें । मन हें राहिलें समाधानें ॥ ४ ॥
समाधानें मन जाहालें उन्मन । शुद्ध ब्रह्मज्ञान रामदासीं ॥ ५ ॥

## ८१

माझें मीतूंपण विवेकानें नेलें । देवाजीनें केलें समाधान ॥ १ ॥
मी देह म्हणतां केल्या येरझारा । चुकविला फेरा चौऱ्यासीचा ॥ २ ॥
आपुल्या सुखाचा मज दिल्हा वांटा । वैकुंठीच्या वाटा कोण धांवे ॥ ३ ॥
दवासी नेणतां गेले बहु काळ । सार्थकाची वेळ येकायेकी ॥ ४ ॥
येकायेकी येक देव सांपडला । थोर लाभ जाला काय सांगों ॥ ५ ॥

## ८२

कुग्रामीचा वास आयुष्याचा नाश । विद्येचा अभ्यास तेथें कैचा ॥ १ ॥
तेथें कैचा देव कैचा तेथें धर्म । कैसें कर्माकर्म कळेचीना ॥ २ ॥
कळेना परीक्षा चातुर्यमर्यादा । लागतसे सदा पोटधंदा ॥ ३ ॥
पोटधंदा नीच जनाची संगति । तेथें कैची गती विवेकाची ॥ ४ ॥
विवेकाची गती सज्जनसंगती । दास म्हणे स्थिती पालटावी ॥ ५ ॥

## ८३

देवा तुझी पागा थोर देते दगा । धान्यें वस्त्रें कीं गा नासीयेलीं ॥ १ ॥
नासीयेलीं घरें पाडिली विवरें । घरांत उकीरें ढीग केलें ॥ २ ॥
ढीग केले रानीं वनीं ते पर्वतीं । मोकाटें हिंडती चहुंकडे ॥ ३ ॥
चहुंकडे तया वेर्थ बाळगीसी । तुंहि लवंडसी क्षणक्षणा ॥ ४ ॥
क्षणक्षणा देवा रागाहि येतोसी । दास म्हणे ऐसी स्थिती नव्हे ॥ ५ ॥

८४

पिंपळाची भक्ती केल्यां नव्हे मुक्ती । उगेची फिरती दुराशेनें ॥ १ ॥
दुराशेची फेरी घेती नानापरी । कामना अंतरीं धरूनीयां ॥ २ ॥
धरूनीयां भाव माईकाची माव । तेणें मुख्य देव अंतरला ॥ ३ ॥
अंतरला देव असोनी अंतरीं । दंभ लोकाचारी लोकलाज ॥ ४ ॥
लोकलाज कांहिं सेवट करीना । जन्म चुकवीना दास म्हणे ॥ ५ ॥

८५

शिमग्याचा खेळ बोंबेचा सुकाळ । बोलणें बाष्कळ जेथें तेथें ॥ १ ॥
जेथें तेथें भंड उभंड वाचाळी । राख माती धुळी शेणकाला ॥ २ ॥
शेणकाला पाणी तडक मारिती । तेथें न्यायनीती कोठें आहे ॥ ३ ॥
आहे तेथें आहे विचारूनि पांहे । बाष्कळ न साहे नेमकासी ॥ ४ ॥
नेमकाचा संग भाग्याचा उदयो । दास म्हणे जयो प्राप्त होतो ॥ ५ ॥

८६

संसारासी आलें देवासी चुकलें । प्राणी आलें गेलें वायांविण ॥ १ ॥
वायांविण सीण केला जन्मवरी । मायामोहपुरी वाहोनियां ॥ २ ॥
वाहोनियां जीवें भोगिली आपदा । आत्महित कदा केलें नाहिं ॥ ३ ॥
केलें नाहिं आतां ऐसें न करावें । विवेकें भरावें निरूपणीं ॥ ४ ॥
निरूपणीं सारासार विचारणें । दास म्हणे येणें समाधान ॥ ५ ॥

८७

श्रवण ह्मणिजे ऐकतची जावें । बरें विवरावें ग्रन्थांतरीं ॥ १ ॥
ग्रन्थांतरीं कळे तें मुखें बोलावें । कीर्तन जाणावें याचें नांव ॥ २ ॥
नांव घ्यावें साचें सर्वदा देवाचें । तिसरें भक्तीचें लक्षण हे ॥ ३ ॥
लक्षण चौथीचें तें ऐसें जाणावें । पाउलें सेवावे सद्गुरूचे ॥ ४ ॥
गुरुदेवपुजा तेची ते अर्चन । साहवें वंदन नमस्कार ॥ ५ ॥
नमस्कार कीजे सर्व दास्यभावें । भक्तीचें जाणावें लक्षण हें ॥ ६ ॥
लक्षण हें सख्य आठवे भक्तीचें । सांगावें जीवीचें देवापासीं ॥ ७ ॥
देवापासीं होतां उरेना मीपण । आत्मनिवेदन रामदासीं ॥ ८ ॥

८८

आरंभीं वंदीन विघ्नविनायक । मुख्य देव येक कळावया ॥ १ ॥
कळावया कांहिं आपुलें स्वहीत । सत्क्रिया विहित वेदाधारें ॥ २ ॥
वेदाधारें क्रिया ज्ञान प्रचीतीचें । तरीच मनाचें समाधान ॥ ३ ॥

समाधान होतें श्रवणमननें । सगुणभजनें अनुतापें ॥ ४ ॥
अनुतापें त्याग तोची येक योग । देवाचा संयोग दास म्हणे ॥ ५ ॥

८९

जाणावा तो ज्ञानी पूर्ण समाधानी । निसंदेह मनीं सर्वकाळ ॥ १ ॥
मिथ्या देहभान प्रारब्धा आधीन । राखे समाधान पूर्णपणें ॥ २ ॥
आवडीनें करी कर्मउपासना । सर्वकाळ ध्यानारूढ मन ॥ ३ ॥
जाणे ब्रह्मज्ञान स्वयें उदासीन । मानितो वमन द्रव्यदारा ॥ ४ ॥
पदार्थाची हाणी होतां नये कोंणी । जयाची करणी बोलाऐसी ॥ ५ ॥
दास म्हणे धन्य सर्वांसी जो मान्य । जयाचा अनन्य समुदाव ॥ ६ ॥

९०

जाणावा तो योगी सदा वीतरागी । अहंभाव त्यागी अंतरींचा ॥ १ ॥
स्वजन स्वदेश सांडुनि उदास । तेणें आशापाश तोडियेला ॥ २ ॥
रमा सरस्वती वैभव व्युत्पत्ती । ज्ञानबळें चित्तीं चाड नाहीं ॥ ३ ॥
पूर्णीं पूर्णकाम तेणें जो निःकाम । विषयांचा श्रम तुच्छ केला ॥ ४ ॥
विवेकाचें बळ जाहलें प्रबळ । बाह्य मायाजाळ त्यागियेला ॥ ५ ॥
धन्य तो पैं दास संसारीं उदास । तया रामदास मानितसे ॥ ६ ॥

९१

लाज हे पापिणी लागलीसे पाठीं । तेणें नव्हे भेटी राघवाची ॥ १ ॥
राघवाची भेटी तरीच लाहिजे । कीर्तनीं राहिजे क्षण येक ॥ २ ॥
क्षण येक मन राघवीं असावें । दुश्चित्त नसावें सर्वकाळ ॥ ३ ॥
सर्वकाळ गेला देवा न भजतां । कैसे परी आतां परलोक ॥ ४ ॥
परलोकीं पुण्यशीळ होती धन्य । रामदासी मान्य हरिभक्ती ॥ ५ ॥

९२

दुर्जना दुर्जना होय समाधान । येकांमेकां मानें भेटताती ॥ १ ॥
दुधगा[२] चालीला वृंदावना[३] भेटी । काळकुट पोटीं भरुनियां ॥ २ ॥
आगीयाचे भेटी मिरगोंड चालिलें । येकमेकां आलें प्रेम दुणें ॥ ३ ॥
आरांटीं बोरांटी रिंगणी सराटीं । काचकुहिरी भेटी भेटों आल्या ॥ ४ ॥
सेबी सागरगोटी निवडुंग वाघांटी । कांटी आली भेटी दास म्हणे ॥ ५ ॥

---

१ क्लेश. २ गाईच्या दुधापासून वासरांना होणारा "दुधगा" नांवाचा एक रोग आहे. ३ कडु फळ.

## ९३

सोहं हंसा म्हणिजे तो मी तो मी ऐसें। हें वाक्य विश्वासें विवरावें ॥१॥
विवरावें अहं ब्रह्मास्मि वचन। ब्रह्म सनातन तूंचि येक ॥ २ ॥
तूंचि येक ब्रह्म हेंचि महावाक्य। परब्रह्मीं ऐक्य अर्थबोध ॥ ३ ॥
अर्थबोध रामी रामदास जाला। निर्गुण जोडला निवेदनें ॥ ४ ॥

## ९४

राघवाची कथा पतीतपावन। गाती भक्तजन आवडीनें ॥ १ ॥
राघवाच्या गुणा न दिसे तुळणा। कैलासीचा राणा लांचावला ॥ २ ॥
देवांचें मंडण भक्तांचें भूषण। धर्मसंरक्षण राम येक ॥ ३ ॥
रामदास म्हणे धन्य त्यांचें जीणें। कथानिरूपणें जन्म गेला ॥ ४ ॥

## ९५

संगती सज्जन कथानिरूपण। सगुणें निर्गुण पाविजेतें ॥ १ ॥
सगुणाची भक्ती केल्या होय मुक्ती। ऐसें वेदश्रुती बोलतसे ॥ २ ॥
भक्तीविणें ज्ञान कदा पाविजेना। हें वाक्य सज्जना अंतरीचें ॥ ३ ॥
रामदास म्हणे साराचेंहि सार। सर्वांसी आधार भक्तिभाव ॥ ४ ॥

### श्लोक

घडेना नसे भाव त्या भक्ति कांहीं।
नसे भक्ति त्या मुक्ति होणार नाहीं ॥
म्हणोनी मना भक्ति ते सार आहे।
विवेकें अती शांति होऊनि राहे ॥ १ ॥

## ९६

भावेंविण भक्ती भक्तीविण मुक्ती। मुक्तीवीण शांति आडळेना ॥ १ ॥
भावें भक्ती सार भक्ती भावें सार। पावे पैलपार विश्वजन ॥ २ ॥
भावभक्तीविण उद्धरला कोण। यालागी सगुण भक्तीभाव ॥ ३ ॥
रामदास म्हणे दक्ष ज्ञानी जाणे। भक्तीचीये खुणे पावईल ॥ ४ ॥

### श्लोक

भजनरहित ज्ञानें मोक्ष होणार नाहीं।
सकळ निगम त्यांचें सार शोधूनि पाहीं ॥
सगुणभजन मार्गें रक्षिलें थोरथोरीं।
अधम नर तयांचें ज्ञान संदेहकारी ॥ १ ॥

९७

भक्तीविण ज्ञान त्या नांव अज्ञान । जाणती सज्ञान संतजन ॥ १ ॥
पायाविणें थोर केलें दामोदर[1] । पावतां संव्हार वेळ नाहिं ॥ २ ॥
तारुविण नांव तो नव्हे उपाव । ठाकवेना ठाव पैलथडी ॥ ३ ॥
रामदास म्हणे शुद्ध उपासनें । विश्रांती पावणें केवी घडे ॥ ४ ॥

श्लोक

भजन रघुविराचें पाहतां सार आहे ।
अगणित तुळणा हें सर्व कांहीं न साहे ॥
भुषण हरिजनाचें ध्यान योगीजनाचें ।
स्वहित मुनिजनाचें गूज हें सज्जनाचें ॥ १ ॥

९८

राघवाची भक्ती ज्ञानाचें मंडण । भक्तांचें भूषण राम येक ॥ १ ॥
नलगे पिंडज्ञान नलगे तत्त्वज्ञान । राघवाचें ध्यान आठवितां ॥ २ ॥
शब्दज्ञान पोथी वाचितां प्रबळे । मागुतें मावळे क्षण येका ॥ ३ ॥
रामीरामदासी राघवाची भक्ती । तेथें चारी मुक्ती वोळंगती ॥ ४ ॥

श्लोक

स्मरण स्मरारिपूचें[2] वीषहर्तें वपूचें
निज बिज निगमाचें[3] सार सर्वागमाचें[4] ।
मथन त्रिभुवनाचें गूज योगीजनांचें
जिवन जड जिवांचें नाम या राघवाचें ॥ १ ॥

९९

त्रैलोक्याचें सार वेदा अगोचर । मथुनी साचार काढियेलें ॥ १ ॥
ते हे संत जन सांगती सज्जन । अन्यथा वचन मानूं नये ॥ २ ॥
जें या विश्वजना उपेगासी आलें । बहुतांचें जालें समाधान ॥ ३ ॥
रामी रामदासीं राघवीं विश्वास । तेणें गर्भवास दुरी ठेला ॥ ४ ॥

श्लोक

नको गद्यपद्यादिकें शब्दज्ञानें
नको तर्क साहित्य देहाभिमानें ।
नको मंत्रयंत्रादि पूजाविधानें
नको योगयागादिकें धूम्रपानें ॥ १ ॥

---

१ रत्नखचित मंदिर. २ मदनारि शंकराचें. ३ वेदांचें. ४ सर्व आगमांचें म्हणजे शास्त्रांचें.

चढे वैभवें फुंज ज्ञातेपणाचा
तेणें अंतरे स्वामि लोकत्रयाचा।
म्हणोनी बहू आवडी त्या जनाची
जेथें सावडी भक्ति सर्वोत्तमाची ॥ २ ॥

१००

तत्त्वमसि महावाक्याचा उपदेश। पाहिला निरास चौं देहांचा ॥ १ ॥
तयामधें सार मानली साचार। भक्ती निरंतर राघवाची ॥ २ ॥
कुंडलिनी गोल्हाट श्रीहट त्रिकुट। आणि मूळपीठ ब्रह्मरंध्र ॥ ३ ॥
मंत्र तंत्र मुद्रा आसन समाधी। दास म्हणे बुद्धी देखण्यांची[1] ॥ ४ ॥

१०१

ठकाराचें[2] ठाण करीं चापबाण। माझें ब्रह्मज्ञान ऐसें आहे ॥ १ ॥
रामरूप देहो जाला निःसंदेहो। माझे मनीं राहो निरंतर ॥ २ ॥
मुखीं रामनाम चित्तीं घनश्याम। होतसे विश्राम आठवितां ॥ ३ ॥
रामदास म्हणे रामरूपावरी। भावें मुक्ती चारी वोवाळीन ॥ ४ ॥

१०२

जीव शिव पिंडब्रह्मांडरचना। उभारुनी पुन्हां संव्हारावी ॥ १ ॥
सर्व खटपट सांडुनियां मागें। भक्तीचेनि योगें समाधान ॥ २ ॥
वेदीं कर्मकांड बोलिलें उदंड। आटणीचें दंड आटाआटी[3] ॥ ३ ॥
व्रतें तपें दानें योग धूम्रपानें। नाना तीर्थाटणें दास म्हणे ॥ ४ ॥

१०३

ब्रह्मादिक देव ब्रह्मज्ञाना आड। करीती पवाड विघ्नरूपें ॥ १ ॥
यालागी सगुण भावें उपासना। करीजे निर्गुणा पावावया ॥ २ ॥
सगुणाकरितां इंद्राचा आघात। होती वाताहात येकसरां ॥ ३ ॥
रामी रामदासी विश्वासी सगुण। सगुणें निर्गुण कळों आलें ॥ ४ ॥

श्लोक

इंद्रनीळरंग राम श्यामधाम योगियां।
नाम पूर्णकाम सार फार भवरोगियां ॥

---

१ ह्या सर्व योगमार्गांतल्या खुणा देखणा म्ह० साक्षी होऊन पाहावयाच्या आहेत, पण सांक्षित्वही जेथें मावळतें अशा देहातीत रामाची भक्ति सर्वश्रेष्ठ आहे. २ ठकार म्ह० मनोहर अशा रामाचें. ३ दगदग.

## १०४

रामाचें भजन तेंची माझें ज्ञान । तेणें समाधान पावईन ॥ १ ॥
रामासी वर्णितां देहीं विदेहता । जाली तन्मयता सहजची ॥ २ ॥
राघवाचें रूप तें माझें स्वरूप । तेणें सुखरूप निरंतर ॥ ३ ॥
रामदास म्हणे मज येणें गती । राम सीतापतीचेनि नामें ॥ ४ ॥

## १०५

संसारीचें दुःख मज वाटे सुख । राघवाचें मुख पाहतांचि ॥ १ ॥
माझें सुख माझ्या राघवाच्या पाईं । तेणें मी हृदईं निवईन ॥ २ ॥
आम्हां नाहिं चिंता संसारीं असतां । वाचे गुण गातां राघवाचे ॥ ३ ॥
रामदास म्हणे राम सीतापती । तेथें मी विश्रांती पावईन ॥ ४ ॥

### श्लोक

जगीं धन्य जो रामसूखें निवाला ।
कथा ऐकतां सर्व तल्लीन जाला ।
देहेभावना रामबोधें उडाली
मनोवासना रामरूपीं बुडाली[1] ॥ १ ॥

## १०६

ध्यान करूं जातां मन हारपलें । सगुणी जाहालें गुणातीत ॥ १ ॥
जेथें पाहे तेथें राघवाचें ठाण । करीं चापबाण शोभतसे ॥ २ ॥
रामरूपीं दृष्टी जाऊनी बैसली । सुखें सुखावली न्याहाळीतां ॥ ३ ॥
रामदास म्हणे लांचावलें मन । जेथें तेथें ध्यान दिसतसे ॥ ४ ॥

## १०७

कथानिरूपणें समाधी लागली । वासना त्यागिली अंतरींची ॥ १ ॥
नाहिं आपपर कीर्तनीं तत्पर । मनीं सारासारविचारणा ॥ २ ॥
अर्थारूढ मन श्रवण मनन । होय समाधान निजध्यास ॥ ३ ॥
रामी रामदासीं कथेची आवडी । लागलीसे गोडी नीचें[2] नवी ॥ ४ ॥

## १०८

रामनामकथा श्रवणीं पडतां । होय सार्थकता श्रवणाची ॥ १ ॥
मुखें नाम घेतां रूप आठवलें । प्रेम दुणावलें पाहावया ॥ २ ॥
राम माझे मनीं शोभे सिंहासनीं । येकायेकीं ध्यानीं सांपडला ॥ ३ ॥
रामदास म्हणे विश्रांती मागेन । जीवीचे सांगेन राघवासी ॥ ४ ॥

---

१ मनाच्या श्लोकांपैकीं १२७ वा श्लोक. २ नित्य.

१०९

अंतरीचा भाव अंतरें जाणावा । देव वोळखावा सर्वांघटीं ॥ १ ॥
सर्वांघटीं देव येकलाची पुरे । पुरोनी वावरे वायुचक्रीं ॥ २ ॥
वायुचक्रीं दृश्य सर्वही सांडूनी । हरी निरंजनीं येकलाची ॥ ३ ॥
येकलाची हरी कोठें पवाडला । दास म्हणे जाला निरंजन ॥ ४ ॥

११०

देव दैत्य बंधु लागला विरोधु । तैसाची संबंधु गोत्रजांसीं ॥ १ ॥
ऐसा हा मत्सर लागलासे पाठीं । देवा तुझी भेटी केवी घडे ॥ २ ॥
ब्राह्मणा यवना लागलासे कळहो । आस्त्रियां[1] विग्रहो लागलासे ॥ ३ ॥
लागलासे कळहो सर्वत्र जीवांसी । नाहिं सज्जनांसी दास म्हणे ॥ ४ ॥

१११

बहुरूपी दिसती बहुरूपें दिसेना । खेळवीतो नाना बहुरूपें ॥ १ ॥
खेळ तो मांडिला उणें कांहिं नाहिं । खेळकार पाहीं आलया रे ॥ २ ॥
बोलवी चालवी सोंगसंपादणी । जयाची करणी तो शोधावा ॥ ३ ॥
रामदास म्हणे सोंगेंची दिसती । खेळत्याचे गती तोची जाणे ॥ ४ ॥

११२

बहुरूप मांडलें यासी नाहिं जोडा । पाहणार थोडा भूमंडळीं ॥ १ ॥
त्याग करवेना धारणा धरवेना । वृत्ती हे पुरवेना पाहावया ॥ २ ॥
अखंड तमासा पाहाना आमासा । वाउगी वयसा वेचीतसे ॥ ३ ॥
रामदास म्हणे सर्वांचे अंतरीं । नित्य निरंतरीं वर्ततसे ॥ ४ ॥

११३

समर्थाचें उणें सेवका मरण । तेणें गुणें शीण होत असे ॥ १ ॥
संसारीचें दुःख सांडुनीयां आतां । मज तुझी चिंता वाटतसे ॥ २ ॥
पतीतपावन नाम कैसें राहे । कासाविस होये जीव माझा ॥ ३ ॥
रामदास म्हणे भलतें करावें । आधीं उद्धरावे सेवकासी ॥ ४ ॥

११४

माझें सर्व जावो तुझें नाम राहो । हाची माझा भावो अंतरीचा ॥ १ ॥
पतीतपावन नाम हें जाईल । मग कोण राहिल तुजपासीं ॥ २ ॥
यालागी राघवें भक्तां उद्धरावें । आपुलें राखावें ब्रीद देवा ॥ ३ ॥
रामदास म्हणे देवा तुझी आण । ब्रीदासाठीं प्राण देईजेतो ॥ ४ ॥

---

१ स्त्रियांना.

११५

संभवामि युगे युगे हें वचन । येणें समाधान होत नाहिं ॥ १ ॥
होत नाहिं देवा श्लाघ्य येणें जिणें । कर्म हें भोगणें दीनाऐसें ॥ २ ॥
दीनाऐसें कदाकाळीं हें न व्हावें । समर्थची व्हावें मुख्यपद ॥ ३ ॥
मुख्यपद दृढ धरूनीयां देवें । निश्चळची व्हावें दास म्हणे ॥ ४ ॥

११६

कां वो राममाये ! दुरी धरीयेलें । कठीण कैसें जालें चित्त तुझें ॥ १ ॥
देउनी आळिंगन प्रीतीपडीभरें[1] । कैं मुख पीतांबरें पुससील ॥ २ ॥
घेउनी कडीये धरुनी हनुवटी । कैं गुजगोष्टी सांगसील ॥ ३ ॥
रामदास म्हणे केव्हां संबोखिसी । प्रेमपान्हा देसी जननीये ॥ ४ ॥

११७

सोडवी जो देव तोची देवराव । येर जाण नांव नाथीलेंची[2] ॥ १ ॥
नाथीलेंची नांव लोकामधें पाहे । ठेवीजेत आहे प्रतापाचें[3] ॥ २ ॥
प्रतापाचें नांव येक राघवासी । रामी रामदासीं देवराव ॥ ३ ॥

११८

मुख्य समाधान आत्मनिवेदन । निर्गुणी अनन्य होतां बरें ॥ १ ॥
होतां बरें वस्तुरूपची केवळ । दृश्य तळमळ जेथें नाहिं ॥ २ ॥
जेथें नाहिं चिंता होणाराची आतां । तोची तो तत्वता दास म्हणे ॥ ३ ॥

११९

पतीतपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु ॥
वैराग्याचा लेश नाहिं माझा आंगीं । बोलतसें जगीं शब्दज्ञान ॥ १ ॥
देह हें कारणीं लावावे नावडे । आळस आवडे सर्व काळ ॥ २ ॥
रामदास म्हणे लाज तुझी तुज । कोण पुसे मज अनाथासी ॥ ३ ॥

१२०

पतीतपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु ॥
भक्तीची आवडी नाहिं निरंतर । कोरडें अंतर भावेंविण ॥ १ ॥
माझें मीतूंपण गेलें नाहिं देवा । काय करूं ठेवा संचिताचा ॥ २ ॥
रामदास म्हणे पतीताचें उणें । पतीतपावनें सांभाळावे ॥ ३ ॥

---

१ प्रीतीच्या उत्कटपणानें. २ लटकें, असत्य. ३ नांव प्रताप पण प्रताप शून्य.

१२१

पतीतपावना जानकीजीवना। वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु ॥
मुखें बोले ज्ञान पोटीं अभिमान पाहे परन्यून सर्वकाळ ॥ १ ॥
दृढ देहबुद्धी तेणें नाहिं शुद्धी। जाहालों मी क्रोधी अनावर ॥ २ ॥
रामदास म्हणे ऐसा मी अज्ञान। सर्व ब्रह्मज्ञान बोलोनीयां ॥ ३ ॥

१२२

पतीतपावना जानकीजीवना। वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु ॥
मिथ्या शब्दज्ञान तुज अंतरलों। संदेहीं पडलों मीपणाचे ॥ १ ॥
सदा खळखळ निर्गुणाची घडे। सगुण नावडे ज्ञानगर्वें ॥ २ ॥
रामदास म्हणे ऐसा मी पतीत। मीपणें अनंत पाहों जातां ॥ ३ ॥

१२३

श्रोत्रीं अंतःकर्ण त्वचेमधें मन। चक्षुमधें जाण बुद्धी आहे ॥ १ ॥
जिव्हेमधें चित्त नाना स्वाद पाहे। घ्राणामधें आहे अहंकार ॥ २ ॥
सुक्षमाचें मूळ शोधूनि पाहावें। वर्म पडे ठावें दास म्हणे ॥ ३ ॥

१२४

राम माझी माये कै भेटईल। वोरसें देईल आलिंगन ॥ १ ॥
संसारीचें दुःख दाटलें मानसीं। तें मी तुजपासीं सांगईन ॥ २ ॥
उतावेळ चित्त उभारुनी बाहे। रामदास पाहे वाट तुझी ॥ ३ ॥

१२५

स्वप्न वाटे सार तैसा हा संसार। पाहातां विचार कळों लागे ॥ १ ॥
स्वप्न वेगीं सरे संसार वोसरे। लालुचीच उरे दोहिंकडे ॥ २ ॥
दास म्हणे निद्राकाळीं स्वप्न खरें। भ्रमिष्टासी बरें निद्रासुख ॥ ३ ॥

१२६

गर्भवासीं दुःख होय वनितासीं। काय पुरुषासी दुःख नाहिं ॥ १ ॥
दुःख नाहिं नरा त्रिविध तापाचें। किवा मरणाचें दुःख नाहिं ॥ २ ॥
दुःख नाहिं ऐसा कोण आहे जन। सर्व पराधीन दास म्हणे ॥ ३ ॥

१२७

सोरठीचा देव[1] माणदेशा[2] आला। भक्तीसी पावला सावकास ॥ १ ॥
सावकास जाती देवाचे यात्रेसी। होती पुण्यरासी भक्तिभावें ॥ २ ॥
भक्तिभावें देव संतुष्ट करावा। संसार तरावा दास म्हणे ॥ ३ ॥

---

१ सोरटीसोमनाथ. २ पंढरपुरास.

## पंचीकरणादि अभंग.

१२८ ओवीचे आरंभीं वंदू विनायक। बुद्धिदाता एक लोकांमध्यें॥१॥ लोकांमध्यें बुद्धीवीण कामा नये । बुद्धीचा उपाये सर्वत्रांसीं ॥ २ ॥ सर्वत्रांसी बुद्धि देतो गणनाथ । करितो सनाथ अनाथासी ॥ ३ ॥ अनाथा नाथाचा नाथ केला जनीं । तो हा धरा ध्यानीं लंबोदर ॥ ४ ॥ लंबोदर विद्यावैभवें पुरता । दास म्हणे माता सरस्वती ॥ ५ ॥

१२९ नमूं योगेश्वरी शारदा सुंदरी। श्रोता प्रश्न करी वक्तयासी ॥ १ ॥ वक्तयासी पुसे जीव हा कवण। शिवाचें लक्षण सांगा मज ॥ २ ॥ सांगा मज आत्मा कैंचा परमात्मा । बोलिजे अनात्मा तो कवण ॥ ३ ॥ कवण प्रपंच कोणें केला संचें[1] । मागुता विसंचें[2] कोण करी ॥ ४ ॥ कोण ते अविद्या सांगिजोजी विद्या । कैसें आहे आद्यस्वरूप तें ॥ ५ ॥ स्वरूप ते माया कैसी मूळमाया । ईसी चाळावया कोण आहे ॥ ६ ॥ आहे कैसें शून्य कोण तें चैतन्य । समाधान अनन्य तें कवण ॥ ७ ॥ कवण जाणता कवणाची सत्ता । मोक्ष हा तत्वता कोण सांगा ॥ ८ ॥ सांगा ब्रह्मखूण सगुण निर्गुण । पंचवीस प्रश्न दासें केले ॥ ९ ॥

१३० नमूं वेदमाता नमूं त्या अनंता । प्रश्न सांगों आतां श्रोतयाचे ॥ १ ॥ श्रोतयाचे प्रश्न जीव हा अज्ञान । जया सर्व ज्ञान तोचि शिव ॥ २ ॥ शिवापर[3] आत्मा[4] त्यापर परमात्मा । बोलिजे अनात्मा अनिर्वाच्य ॥ ३ ॥ वाच्य हा प्रपंच माईक जाणावा । घडामोडी देवापासुनीयां ॥४॥ विषय अविद्या त्यागावी ते विद्या । निर्विकल्प आद्या तेंचि रूप ॥ ५ ॥ कल्पना हे माया सत्व मूळमाया । इसी चाळावया चैतन्यचि ॥ ६ ॥ नकार तें शून्य व्यापक चैतन्य । ईश्वर अनन्य समाधान ॥ ७ ॥ जीव हा जन्मला जीवा मृत्यु आला । बद्ध मुक्त जाला तोहि जीव ॥ ८ ॥ ईश्वर जाणता ईश्वराची सत्ता । मोक्ष हा तत्वता ईश्वरची ॥ ९ ॥ ईश्वर निर्गुण ईश्वर सगुण । हेचि ब्रह्मखूण दास म्हणे ॥ १० ॥

१३१ सत्य राम एक सर्वहि मांईक । जाणावा विवेक योगियांचा ॥१॥ योगियांचा देव तया नाहिं खेव । जेथें जीवशिव ऐक्यरूप ॥ २ ॥ ऐक्यरूप जेथें हें पिंडब्रह्मांड । तें ब्रह्म अखंड निराकार ॥ ३ ॥ निराकार ब्रह्म बोलताती श्रुती । आदि मध्य अंतीं सारिखेंची ॥ ४ ॥ सारिखेंची ब्रह्म नभाचीये परी । बाह्य अभ्यंतरीं कोंदाटलें ॥ ५ ॥ कोंदाटलें परी पाहतां

---

१ उभारणी. २ संहारणी. ३ शिवापलीकडचा, शिवाहून थोर. ४ अंतरात्मा. ५ धोका, नाश.

दिसेना। साधूविण येना अनुभवा ॥ ६ ॥ अनुभवा येतां तें ब्रह्म निश्चळ। जाय तळमळ संसाराची ॥ ७ ॥ संसाराचें दुःख सर्वेही विसरे। जरी मन भरे स्वस्वरूप ॥ ८ ॥ स्वस्वरूपीं नाहीं सुख आणि दुःख। धन्य हा विवेक जयापाशीं ॥ ९ ॥ जयापाशीं ज्ञान पूर्ण समाधान। त्याची आठवण दास करा ॥ १० ॥

१३२ मन हें विवेकें विशाळ करावें। मग आठवावें परब्रह्म ॥ १ ॥ परब्रह्म मनीं तरीच निवळे[1]। जरी बोधें गळे अहंकार ॥ २ ॥ अहंकार गळे संतांचे संगतीं। मग आदि अंतीं समाधान ॥ ३ ॥ समाधान घडे स्वरूपीं राहतां। विवेक पहातां निःसंगाचा ॥ ४ ॥ निःसंगाचा संग दृढ तो धरावा। संसार तरावा दास म्हणे ॥ ५ ॥

१३३ तुम्ही आम्ही करूं देवाचा निश्चय। जया नाहीं लय[3] तोचि देव ॥ १ ॥ देव हा अमर नित्य निरंतर। व्यापूनि अंतर देव राहे ॥ २ ॥ देव राहे सदा सबाह्य अतरीं। जीवा क्षणभरी विसंबेना ॥ ३ ॥ परी विसंबेना जीवासि नेणवे। म्हणोनियां धांवे नानामतीं ॥ ४ ॥ नानामतीं देव पाहतां दिसेना। जंव तें वसेना ज्ञान देहीं ॥ ५ ॥ ज्ञान देहीं वसे तया देव दिसे। अंतरीं प्रकाशे ज्ञानदृष्टि ॥ ६ ॥ ज्ञानदृष्टि होतां पाविजे अनंता। हा शब्द तत्वतां दास म्हणे ॥ ७ ॥

१३४ रात्रंदिवस मन राघवीं असावें। चिंतन नसावें कांचनाचें ॥ १ ॥ कांचनाचें ध्यान परस्त्रीचिंतन। जन्मासी कारण हींच दोन्ही ॥ २ ॥ दोन्ही नको धरूं निंदा नको करूं। तेणें हा संसारु तरसील ॥ ३ ॥ तरसील भवसागरीं बुडतां। सत्याचि अनंताचेनि नामें ॥ ४ ॥ नामरूपातीत जाणा तो अनंत। दास म्हणे संतसंग धरा ॥ ५ ॥

१३५ ब्रह्मा विष्णु रुद्र जयाचे अवतार। तोचि देव थोर जाण बापा ॥ १ ॥ जाण बापा देव देहासी निर्मिता। तो देव तत्वतां ठाईं पाडीं ॥ २ ॥ ठाईं पाडीं देव साधूचे संगती। दास म्हणे गती पावसील ॥ ३ ॥

१३६ चंदना संगती चंदनचि होती। होय काळी माती कस्तुरिका ॥ १ ॥ कस्तुरिका होय कस्तुरीच्या योगें। साधूचेनि संगें साधुजन ॥ २ ॥ साधुजन होती संगति धरितां। मिळणी मिळतां गंगाजळीं ॥ ३ ॥ जेवितां अमृत अमर होइजे। अचळ[4] पाविजे साधुसंगें ॥ ४ ॥ साधुसंगें देव आपणचि होय। लक्षण अद्वय बाणलिया ॥ ५ ॥ बाणलिया तया निःसंगाचा[5] संग। होइजे निःसंग आपणचि ॥ ६ ॥ आपणचि ध्यानीं

१ स्वच्छ दिसे. २ परब्रह्माचा. ३ नाश. ४ निश्चळ ब्रह्म. ५ ब्रह्माचा.

बैसला आसनीं । जनीं आणि वनीं देव भासे ॥ ७ ॥ देव भासे तेणें आपण भुलला । तेणें गुणें जाला देव अंगें ॥ ८ ॥ देवाचे संगती देवचि होईजे । चतुर्भुज राजे वैकुंठींचे ॥ ९ ॥ वैकुंठींचे राजे ध्याती अहर्निशीं । वंदिती साधूसि दास म्हणे ॥ १० ॥

१३७ दुर्जनसंगती कदा धरूं नये । घडती अपाये बहुविध ॥ १ ॥ बहुविध जाले अपाय बहुतां । तेचि सांगों आतां सावकाश ॥ २ ॥ कुसंग हे माया धरितां संगती । गेले अधोगती नेणों किती ॥ ३ ॥ चांडाळा संगती होइजे चांडाळ । होय पुण्यशीळ साधुसंगें ॥ ४ ॥ कुरुंदा[1]संगती झिजला चंदन । कुसंगें जीवन नासतसे ॥ ५ ॥ खाराचे संगतीं नासे मुक्ताफळ । होतसे तात्काळ कळाहीन ॥ ६ ॥ लाखेच्या संगती सोनें होय उणें । दुग्ध हें लवणें नासतसे ॥ ७ ॥ दुर्जनसंगती सज्जन ढांसळे । क्रोध हा प्रबळे अकस्मात ॥ ८ ॥ दास म्हणे संग त्यागीं दुर्जनाचा । धरा सज्जनाचा आदरेंसीं ॥ ९ ॥

१३८ साधुसंगें साधु भोंदुसंगें भोंदु । वादुसंगें वादु होत असे ॥ १ ॥ होत असे लाभ भल्याचे संगतीं । जाय अधोगती दुष्टसंगें ॥२॥ दुष्टसंगें नष्ट जाला महापापी । होतसे निःपापी साधुसंगें ॥ ३ ॥ संग जया जैसा लाभ तया तैसा । होतसे आपैसा अनायासें ॥ ४ ॥ अनायासें गति चुके अधोगती । धरितां संगती सज्जनाची ॥ ५ ॥ सज्जनाची कृपा जयालागीं होय । तयालागीं सोय परत्रींची ॥ ६ ॥ परत्रींची सोय भक्तीचे उपायें । चुकती अपाये दास म्हणे ॥ ७ ॥

१३९ दुर्जनाचे संगें होय मनोभंग । सज्जनाचा योग सुख करी ॥ १ ॥ सुख करी संग संतसज्जनाचा । संताप मनाचा दुरी ठाके ॥ २ ॥ दुरी ठाके दुःख होय सर्व सुख । पाहों जातां शोक आढळेना ॥ ३ ॥ आढळेना लाभ तेथें कैंचा क्षोभ । अलभ्याचा लाभ संतसंगें ॥ ४ ॥ संतसंगीं सुख रामीरामदासीं । देहसंबंधासी उरी[3] नाहीं ॥ ५ ॥

१४० साधु आणि भक्त व्युत्पन्न[4] विरक्त । तपोनिधि । शांत अपूर्व तो ॥ १ ॥ अपूर्व तो जनीं शुद्ध समाधानी । जनाचे मिळणी मिळूं जाणे ॥ २ ॥ मिळों जाय जना निर्मळ वासना । अंतरीं असेना निंदाद्वेष ॥ ३ ॥ निंदा द्वेष नसे मनीं लय[5] असे । तेथें कृपा वसे सर्वकाळ ॥ ४ ॥ सर्वकाळ जेणें सार्थकीं लाविला । वंश उद्धरिला नामघोषें ॥ ५ ॥ नामघोष वाचे उच्चारी सर्वदा । संताच्या संवादा वाटेकरी ॥ ६ ॥ वाटेकरी जाला सायुज्यमुक्तीचा । धन्य तो दैवाचा दास म्हणे ॥ ७ ॥

१ एक दगड. २ पाणी. ३ सुखाचा लाभ. ४ पंडित, शास्त्रज्ञ. ५ एकाग्रता.

१४१ ऐसा कोण संत जो दावी अनंत । संदेहाचा घात करूं जाणे ॥ १ ॥ करूं जाणे साधकांचें समाधान । जया भिन्नाभिन्न आढळेना ॥२॥ आढळेना जया आपुलें पारिखें । ऐक्यरूपें सुखें सुखावले ॥ ३ ॥ सुखावला ज्याचे संगती साधक । साधु तोचि एक धन्य जगीं ॥ ४ ॥ धन्य तेचि जगीं जे गुण बोलिले । दास म्हणे जाले पुरुष तेचि ॥ ५ ॥

१४२ संतांचेनि संगें देव पाठी लागे । सांडूं जातां मागें सांडवेना ॥ १ ॥ सांडवेना सदा देव समागमीं । बाह्य अंतर्यामीं सारिखाचि ॥ २ ॥ सारिखाचि कडे कपाट शिखरीं । गृहीं वनांतरीं सारिखाचि ॥ ३ ॥ सारिखाचि तीर्थीं सारिखाचि क्षेत्रीं । दिवस आणि रात्रीं सारिखाचि ॥ ४ ॥ सारिखाचि अंत नाहीं तो अनंत । रामदासांकित मावळला ॥५॥

१४३ दिसे तें नासल सर्वत्र जाणती । या बोला व्युत्पत्ती काय काज ॥ १ ॥ कार्य कारण हा विवेक पाहिजे । तरीच लाहिजे शाश्वतासी ॥२॥ शाश्वतासी येणें जाणेंचि न घडे । साकार हें मोडे दास म्हणे ॥ ३ ॥

१४४ निर्गुणस्वरूपीं मूळमाया जाली । तिच्या पोटीं आली गुणमाया ॥ १ ॥ गुणमायेपोटीं जाला सत्वगुण । सत्वीं रजोगुण उद्भवला ॥ २ ॥ उद्भवला रजोगुणीं तमोगुण । तमोगुणीं जाण व्योम जालें ॥३॥ व्योमापोटीं वायु वायुपोटीं तेज । तेजीं तें सहज आप जालें ॥ ४ ॥ आपापासूनिया भूमंडळ होणें । शास्त्रींचीं वचनें दास म्हणे ॥ ५ ॥

१४५ मायेचें स्वरूप ब्रह्मीं उद्भवलें । तिच्या पोटा आलें महत्तत्व ॥१॥ महत्तत्वीं सत्व सत्वीं रजोगुण । तिजा तमोगुण रजापोटीं ॥ २ ॥ पोटीं पंचभूतें तमाचिया आलीं । दास म्हणे जाली सृष्टि ऐसी ॥ ३ ॥

१४६ शून्यापासूनियां जन्म आकाशासी । आकाश वायूसि प्रसवलें ॥ १ ॥ प्रसवला वायु तया तेज जालें । तेजाचिया आलें पोटा आप ॥२॥ आपापासुनियां सृष्टि ते जन्मली । ऐसी विस्तारली मायादेवी ॥ ३ ॥ मायादेवी वेळे शून्याकडे पळे । ते काळीं खवळे पंचभूत ॥ ४ ॥ जें जें जया व्यालें तें तेणें भक्षिलें । अंतीं तें उरलें शून्य एक ॥ ५ ॥ शून्याचें स्वरूप पाहतां कांहीं नाहीं । तें शून्य सर्वही जेथें आटे ॥ ६ ॥ आहे हें आटलें त्याचें शून्य जालें । शून्यहि विरालें जे स्वरूपीं ॥ ७ ॥ स्वरूप पाहातां काळ वेळ गेली । निजठेवी लाधली प्राणियासी ॥ ८ ॥ प्राणियाचें हित आहे संतांपायीं । वेगीं शरण जायीं आलियातें ॥९॥ आलिया रे संतसंगें मुक्त होसी । रामीरामदासीं हेंचि वर्म ॥ १० ॥

---

१ 'यद्दष्टं तन्नष्टं' इति श्रुतिः. २ शास्त्राचे आधार कशाला हवेत ? ३ आकाश.

१४७ पृथ्वीतळीं व्याळ व्याळातळीं जळ । त्यातळीं अनळ[3] सत्य जाण ॥ १ ॥ सत्य जाण तयातळीं तो अनिळ[3] । त्यातळीं पोकळ व्योम[4] आहे ॥ २ ॥ व्योमातळीं अहंकार तो केवळ । तेणें ब्रह्मगोळ धरियेला ॥ ३ ॥ धरियेला पुढें महत्तत्व असे । सप्तावरण ऐसें निरोपिलें ॥ ४ ॥ दशगुणीं थोराहुनी थोर एक । हे सप्तकंचुक दास म्हणे ॥ ५ ॥

१४८ अनावृष्टि धरा शत संवत्सर । तेणें जीवमात्र संहारती ॥ १ ॥ संहारती कोणी नसे भूमंडळीं । सूर्य बारा कळीं तपईल ॥ २ ॥ तपईल तेणें जळेल धरणी । काद्रवेयांची[5] फणी पोळईल ॥ ३ ॥ पोळईल तेणें विषांचे हळाळ । मार्तंडाचे ज्वाळ एक होती ॥ ४ ॥ होती गिरिशृंगें सर्व भस्मरूप । तयालागीं आप बुडवील ॥५॥ बुडवील धरा जळचि निखळ । तयासि अनळ विझवील ॥ ६ ॥ शोषियेलें जळ उरला अनळ । तयासी अनिळ शोषूं पाही ॥ ७ ॥ विझविता होय वायु त्या वन्हीसी । विश्रांती[6] वायूसि नभापोटीं ॥ ८ ॥ नभापोटीं चारी भूतें मावळलीं । नभाकार जाली वृत्ति तेव्हां ॥ ९ ॥ वृत्ति नभें ऐसा नटला अन्वय । पांचवा प्रळय दास म्हणे ॥ १० ॥

१४९ म्हणे हें जाणावें आकाशासारिखें । मायाही ओळखे वायूऐसी ॥ १ ॥ वायूऐसी माया चंचळ चपळ । ब्रह्म तें निश्चळ निराकार ॥ २ ॥ निराकार ब्रह्म नाहीं आकारलें । रूप विस्तारिलें मायादेवी ॥ ३ ॥ मायादेवी जाली नांव आणि रूप । शुद्ध चित्स्वरूप वेगळेंचि ॥ ४ ॥ वेगळेंचि परि आहे सर्वांठायीं । रिता ठाव नाहीं तयाविण ॥ ५ ॥ तयाविण ज्ञान तेंचि तें अज्ञान । नाहीं समाधान ब्रह्माविण ॥ ६ ॥ ब्रह्माविण भक्ती तेचि पैं अभक्ती । रामदासीं मुक्ती ब्रह्मज्ञान ॥ ७ ॥

१५० ब्रह्म हें निर्गुण मुळीं निराकार । तेथें चराचर कैसें जालें ॥ १ ॥ जालें निराकारीं अहंतास्फुरण । एकीं एकपण प्रगटलें ॥ २ ॥ प्रगटलें कैसें आकार नसतां । निर्गुण अहंता कोणें केली ॥ ३ ॥ कोणीं नाहीं केली सर्वेही मायिक । निर्गुण तें एक जैसें तैसें ॥ ४ ॥ जैसें तैसें सर्व मायिक रचिलें । निराकारीं जालें कोणेपरी ॥ ५ ॥ परी हीं नाथिलीं साच मानूं नये । नाहीं त्यासि काये पुससील ॥ ६ ॥ पुससील काय वांझेचीं लेंकरें । मृगजळपूरें भांबावसी ॥ ७ ॥ भांबावसी काय मूळाकडे पाहीं । मूळीं तेथें कांहीं जालें नाहीं ! ॥ ८ ॥ नाहीं कां म्हणतां प्रत्यक्ष दिसतें । सत्यत्वें भासतें चराचर ॥ ९ ॥ चराचर सत्य हें केविं घडेल ।

१ शेष. २ अग्नि. ३ वायु. ४ आकाश. ५ शेषाची. ६ लय.

अंधारीं बुडेल रविबिंब ॥ १० ॥ बिंब साहें मनीं दिसतें लोचनीं । तें कैसें वचनीं मिथ्या होय ॥ ११ ॥ मिथ्या होय स्वप्न जागृती आलिया तेंचि निजलिया सत्य वाटे ॥ १२ ॥ सत्य वाटे मिथ्या मिथ्या वाटे सत्य । ऐसें आहे कृत्य अविद्येचें ॥१३॥ अविद्येचें कृत्य तुम्हीच सांगतां। मागुते म्हणतां जालें नाहीं ॥ १४ ॥ नाहीं जालें कांहीं दृष्टीचें बंधन । तैसें हें अज्ञान बाधतसे ॥ १५ ॥ बाधतसे परि सर्वथा नाथिलें। कांहीं जालें नाहीं ज्ञानियासी ॥१६॥ ज्ञानियासी दृश्य दिसतें कीं नाहीं। देहींच विदेही[1] कैसे जाले ॥ १७ ॥ जाली विदेहिता देहींच असतां । दिसते पहातां परि मिथ्या ॥ १८ ॥ मिथ्या हे सकळ मज कां वाटेना । संशय तुटेना अंतरींचा ॥ १९ ॥ अंतरींचा संशय तुटे संतसंगें । कृपेचेनि योगें दास म्हणे ॥ २० ॥

१५१ दश हे काशाचे कोणें उभारिले। मज निरोपिलें पाहिजे हें ॥१॥ पाहिजे हे दश भुज पंचकाचे। उभारिले साचे मायादेवी ॥ २ ॥ मायादेवी कोण कैसी ओळखावी । जाणोनि त्यागावी ज्ञानबोधें ॥ ३ ॥ परी हे मायेची मिथ्या ओळखावी । आणि ती त्यागावी कोणेपरी ॥ ४ ॥ ज्ञानबोधें माया जाणोनि त्यागिली । परि नाहीं गेली काय कीजे ॥ ५ ॥ कीजे निरूपण संताचे संगती । तेणें शुद्ध मति होत असे ॥ ६ ॥ होत असे परि तैसीच असेना । निश्चळ वसेना मनामध्यें ॥ ७ ॥ मनामध्यें सदा विवेक धरावा । निश्चय करावा येणें रिती ॥ ८ ॥ रिती विवेकाची पाहतां घडीची । जातसे सर्वेचि निघोनियां ॥ ९ ॥ निघोनियां जाय विवेक आघवा । तो संग त्यागावा साधकानें ॥ १० ॥ साधकानें संग कोणाचा त्यागावा । दृढ तो धरावा कोण संग ॥ ११ ॥ संग हा आदरें धरीं सज्जनाचा । त्यागीं दुर्जनाचा दास म्हणे ॥ १२ ॥

१५२ कुमारीच्या[3] पोटा ब्रह्मचारी[4] आला । विचारिता जाला बाप तिचा ॥ १ ॥ बापचि पुरुष[5] ते तो मायाराणी । शब्द विचक्षणीं विचारावा ॥ २ ॥ विचारितां होय नातुहि जामातु । प्रपिताहि मातु मिथ्या नोहे ॥ ३ ॥ मिथ्या नव्हे कदा हा देहसंबंधु । विस्तारे[2] विविधु सोयरीक ॥ ४ ॥ सोइरे संबंधु नाहीं त्या निर्गुणा । शाश्वताच्या खुणा दास म्हणे ॥ ५ ॥

१५३ हिरियाच्या[6] पोटीं मांडुसाच्या कोटी । सुवर्णाच्या ताटीं काचखडे ॥ १ ॥ काचखडे हेमीं तैसें दृश्य रामीं । स्वरूपविश्रामीं भ्रम माया ॥ २ ॥ माया हे असार स्वरूप तें सार । पाहिला निर्धार रामदासीं ॥३॥

---

१ देहभावविरहित. २ प्रकार. ३ मायेच्या. ४ दासबोध द० १३ स० ५ काहणी पहा. ५ अंतरात्मा. ६ पेटी.

१५४ ताकहि पांढरें दूधाहि पांढरें। चवी जेवणारें जाणिजे ते ॥ १ ॥ जाणिजेते चवी गुळा साखरेची । पाहा तो तेथेंचि भेद आहे ॥ २ ॥ भेद आहे तैसा अभेदाचे परी। जाणिजे चतुरीं दास म्हणे ॥ ३ ॥

१५५ वृक्षाविण छाया गुणाविण माया । बिंबाविण वाया प्रतिबिंब ॥ १ ॥ प्रतिबिंब भासे सिंधुविण लहरी। सोन्याविण परी अळंकार ॥२॥ अळंकार कृत्य कर्त्याविणें कैंवी । कैंची गेथागोंवी[1] निर्गुणाची ॥ ३ ॥ निर्गुणासि गुण हेंचि मूर्खपण। दृश्याविण खुण दृष्टांताची ॥ ४ ॥ दृष्टांताची खुण परब्रह्मीं घडे। वेद मौन्य पडे कासयासी ॥ ५ ॥ कासयासी तेव्हां अद्वैत पाहावें। द्वैतचि स्वभावें ब्रह्म जालें ॥ ६ ॥ जालें परब्रह्म अत्यंत सुगम। ब्रह्म आणि भ्रम एकरूप ॥ ७ ॥ एकरूप आहे दूध आणि ताक। हंसेविण काक बोलताती ॥ ८ ॥ बोलताति सर्व ब्रह्म ऐसें बंड। सर्वही थोतांड सत्य जाणा ॥ ९ ॥ सत्य जाणा ब्रह्म। निर्मळ निश्चळ। मायेचा विटाळ जेथें नाहीं ॥ १० ॥ जेथें नाहीं गुण त्या नांव निर्गुण। गुरुमुखें खुण ठाईं पडे ॥ ११ ॥ ठाईं पाडी सत्य शाश्वत स्वरूप । मग आपेंआप बुजसील ॥ १२ ॥ बुजसील साच धरितां विश्वास । ओवी रामदास सांगतसे ॥ १३ ॥

१५६ रत्नपारखिया रत्नचि परीक्षी। अलक्षातें लक्षी ऐसा नाहीं ॥१॥ ऐसा नाहीं कोणी देवाचा पारखी। आपली ओळखी ठाईं पाडी ॥ २ ॥ ठाइ पाडी निज स्वरूप आपुलें। असोनि चोरिलें जवळीच ॥ ३ ॥ जवळी ना दुरी पाताळीं ना वरी । सबाह्य अभ्यंतरीं कोंदलेंचि ॥ ४ ॥ कोंदलेंचि असे परि तें न दिसे। जवळीच कैसें आढळेना ॥ ५ ॥ आढळेना अंगीं असोनी सर्वांगीं। जयालागीं योगी धुंडिताती ॥ ६ ॥ धुंडिताति कडीकपाटीं शिखरीं। समागमें हरी चोजवेना[2] ॥ ७ ॥ चोजवेना एका सद्गुरूवांचुनी। निश्चय हा मनीं पाविजेतो ॥ ८ ॥ पाविजे निश्चयो दृढ स्वरूपाचा। तिहीं प्रतीतींचा[3] एक भाव ॥ ९ ॥ ऐक्यभाव भक्ति रामीं-रामदासीं। विभक्ति विश्वासी दुरी ठेली ॥ १० ॥

१५७ बाह्य नारिकेळ भीतरीं[4] नरोटी। तैशापरि दृष्टी स्वस्वरूपीं ॥१॥ स्वस्वरूपीं माया जैसी द्रुमीं[5] छाया। कां ते भासे वायां मृगजळ ॥ २ ॥ मृगजळ भासे मार्तंडाकारितां। स्वरूपीं पहातां बिंब नाहीं ॥ ३ ॥ नाहीं जेथें बिंब कैंचें प्रतिबिंब। एकचि स्वयंभ स्वस्वरूपीं ॥ ४ ॥ स्वस्वरूपीं भास नाथिला आभास। धरिजे विश्वास दास म्हणे ॥ ५ ॥

---

१ घोटाळा. २ आकळत नाहीं. ३ स्वतःची, शास्त्राची व गुरूची प्रतीति. ४ आंत. ५ वृक्षास.

१५८ जडत्व कठिण ते ते पृथ्वी जाण । मृदु ओलेपण असे आप ॥ १ ॥ आप नाना रस धातु नानारस । उष्णता तैजस तेंचि तेज ॥ २ ॥ वायु स्तब्ध चळ आकाश निश्चळ । माईक सकळ दास म्हणे ॥ ३ ॥

१५९ पृथ्वी आणि तेज वायु आणि आकाश । पांचांचे हे ऐसे पंचवीस ॥ १ ॥ अस्थि मांस त्वचा नाडी आणि रोम । पाचांचें हें वर्म सांगईन ॥ २ ॥ शुक्लित शोणित लाळ आणि मूत्र । स्वदेहीं निश्चित पंचतत्त्वें ॥ ३ ॥ क्षुधा तृषा जाण आळस शयन । पांचवें मैथुन तेजाचेंचि ॥ ४ ॥ चळण वळण आणि प्रसरण । वायुनिरोधन आकुंचन ॥ ५ ॥ काम क्रोध शोक मोह आणि भये । स्थूळदेहाचिये पंचवीस ॥६॥ पंचवीस तत्त्वीं स्थूळदेह वर्तत । ऐकें सावचित्त लिंगदेह ॥ ७ ॥ अंतःकरण मन बुद्धि आणि चित्त । पांचवा निश्चित अहंकार ॥ ८ ॥ प्राण आणि अपान व्यान आणि उदान । समानही जाण पांच वायु ॥ ९ ॥ चक्षु श्रोत्र जिव्हा आणि घ्राण त्वचा । अंश हा तेजाचा ज्ञानेंद्रियें ॥१०॥ वाचा आणि पाद शिश्न आणि गुद । पांच हीं प्रसिद्ध कर्मेंद्रियें ॥ ११ ॥ शब्द स्पर्श रूप रस आणि गंध । पांचहि प्रसिद्ध विषय हे ॥ १२ ॥ ऐसे पंचवीस लिंगदेहीं असे । ऐसीं पंचवीसें तत्वें जालीं ॥ १३ ॥

१६० काम क्रोध शोक मोह आणि भय । पंचधा अन्वय[3] आकाशाचा ॥ १ ॥ धावण चळण आणि आकुंचन । वायुप्रसरण निरोधन ॥ २ ॥ चक्षु श्रोत्र जिव्हा मैथुन आळस । तेजाचे हे अंश पंचविध ॥ ३ ॥ लाळ मूत्र शुक्र रक्त आणि मज्जा । आप जाण वोजा[3] पंचविध ॥ ४ ॥ अस्थि त्वचा मांस नाडी रोम अंश । दास म्हणे वास देहातीत[4] ॥ ५ ॥

१६१ अंतःकरण मन बुद्धि आणि चित्त । पुढें सावचित्त अहंकार ॥ १ ॥ व्यान तो समान उदान तो प्राण । पांचवा अपान वायु जाण ॥ २ ॥ श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा आणि घ्राण । तेजाचेहि गुण पंचविधा ॥ ३ ॥ वाचा पाणि पाद शिश्न आणि गुद । आपाचे प्रसिद्ध पांच गुण ॥ ४ ॥ शब्द स्पर्श रूप रस आणि गंध । पृथ्वीचे हे विशद दास म्हणे ॥५॥

१६२ विष्णु चंद्र ब्रह्मा नारायण रुद्र । आकाशाचे थोर अंश पाहें ॥ १ ॥ ब्रह्मांडीं व्यापक लोकांक वरुण । रुद्र वायु जाण चाळक तो ॥ २ ॥ दिशा वायु रवि वरुणाचा हेत । अश्विनी दैवत तेजअंश ॥ ३ ॥ वह्नि इंद्र तिजा जाणावा उपेंद्र । ब्रह्मा आणि सार नैर्‌ऋती तो ॥ ४ ॥ शब्द स्पर्श रूप रस आणि गंध । तन्मात्रा विशद दास म्हणे ॥ ५ ॥

---

१ हे सर्व विषय दासबोधांत सविस्तर आले आहेत. २ संबंध. ३ सहज. ४ आत्म्याचा वास देहापलीकडे आहे.

१६३ विष्णु चंद्र जाण ब्रह्मा नारायण । पार्वतीरमण सदाशिव ॥ १ ॥ दिशा वायु सूर्य ज्ञानेंद्रियान्वयें । वरुण निश्चयें अरुण तो ॥ २ ॥ तोचि इंद्र वह्नि वामन प्रजापती । पांचवा नैर्ऋती गुदस्थानीं ॥ ३ ॥ स्थानीं वायु एक विषयहि एक । जाहालें कौतुक विषयांचें ॥ ४ ॥ सूक्ष्मीं तो सूक्ष्म एक आत्माराम । रामदासीं वर्म सांपडलें ॥ ५ ॥

१६४ भूतपंचकाचे पंचवीस गुण । त्याचें स्थूळ जाण उभारलें ॥ १ ॥ उभारलें स्थूळ पांचापंचकांचें । तेंचि तूं हें साचें घडे केवीं ॥ २ ॥ घडे केंवि द्रष्टा दृश्य एकरूप । द्रष्टयाचें स्वरूप वेगळेंचि ॥ ३ ॥ वेगळेंचि जाण अस्थि मांस त्वचा ।विस्तार भूतांचा जाणताहे ॥ ४ ॥ जाणताहे द्रष्टा स्थूळाचा जाणता । विदेही तत्वतां दास म्हणे ॥ ५ ॥

१६५ कर्णमनादिक सूक्ष्म पंचक । याचा साक्षी एक तूंचि जाण ॥१॥ जाण पंच प्राण साक्षी विलक्षण[1] । विषयांचा जाण तूंचि एक[2] ॥ २ ॥ तूंच एक साक्षी दशइंद्रियांचा । पांचा पंचकांचा लिंगदेह ॥ ३ ॥ लिंग-देह दृश्य द्रष्टा तूंचि एक । बोलिला विवेक सूक्ष्माचा ॥ ४ ॥ सूक्ष्माचा तो साक्षी सूक्षमावेगळा । दास अवलीळा देहातीत ॥ ५ ॥

१६६ देहद्वयसाक्षी नेणे आपणासी । कारण तयासी बोलिजेतें ॥ १ ॥ देहद्वय जाणे आपणासी नेणे । पुसों जातां म्हणे कळेना कीं ॥ २ ॥ कळेना कीं मज माझेंचि स्वरूप । जाला साक्षरूप सहजचि ॥ ३ ॥ सह-जचि जाला करणांचा साक्षी । स्वयें नेणण्यासि जाणताहे ॥ ४ ॥ जाण ताहे सूक्ष्म स्थूळासि कारण । साक्षी विलक्षण दास म्हणे ॥ ५ ॥

१६७ विदेहासि कैंचें देहाचें बंधन । बोलिलें अज्ञान निरसावया ॥१॥ निरसोनिं माया वांझेची कुमारी । मृगजळपूरीं उतरावें ॥ २ ॥ उतरावें विष स्वप्नींच्या सर्पाचें । आणि निःसंगाचें संगदुःख ॥ ३ ॥ मग दुःख तुटे अजन्माचा जन्म । नाथिलाचि भ्रम बाधितसे ॥ ४ ॥ बाधितसे भ्रम संतसंगेंविण । रामदासीं खुण साधुसंगें ॥ ५ ॥

१६८ स्वरूप सांडोनि देह मीच[3] भावी । तो जीव रौरवीं बुडवील ॥१॥ पचवील नरकीं देहाचे संबंधें । सज्जनाच्या बोधें सांडवलें ॥२॥ सांडोनि विवेक भेद महावाक्य । जीवशिवऐक्य जयाचेनि ॥ ३ ॥ जयाचेनि तुटे संसारबंधन । तयाचें वचन दृढ धरा ॥ ४ ॥ दृढ धरा मनीं अहंब्रह्म[4] ऐसें । सांगतो विश्वासें रामदास ॥ ५ ॥

---

१ निराळा. २ इंद्रियांचा. ३ मानतो. ४ मी ब्रह्म आहें.

१६९ मुक्त निःसंदेही बाधतो संदेही । संदेहाचा देही कामा न ये ॥१॥ कामा न ये चित्त दुश्चित सर्वदा । लागती आपदा संशयाच्या ॥ २ ॥ संशयाच्या संगें समाधान भंगें । खेद आंगीं लागे अकस्मात ॥ ३ ॥ अकस्मात सुखीं दुःख कालवलें । साधकासि नेलें संदेहानें ॥ ४ ॥ संदेहाचा घात होय एकसरा[1] । दास म्हणे करा निरूपण ॥ ५ ॥

१७० चारी देह पिंडीं चत्वार ब्रह्मांडीं । अष्ट देह प्रौढी बोलिजेल ॥१॥ बोलिजेल श्रोतां सावधान व्हावें । दुश्चित नसावें निरूपणीं ॥ २ ॥ निरूपणीं अष्ट देह ते कवण । स्थूळीं लिंग जाण कारण तो ॥ ३ ॥ चौथा देह जाण तो महाकारण । पांचवें लक्षण विराटाचें ॥ ४ ॥ हिरण्यगर्भ हे आणि अव्याकृत । आठवी निश्चित मूळमाया ॥ ५ ॥ जन्म अष्ट देहीं साक्षी तो विदेही । रामदासा नाहीं जन्ममृत्यु ॥ ६ ॥

१७१ मीच ब्रह्म ऐसा अभिमान धरी । जाणावा चतुरीं चौथा देह ॥ १ ॥ चौथा देह आणि सर्व साक्षी अवस्था । ऐसी हे व्यवस्था चौदेहांची ॥ २ ॥ चौदेहांची गांठी सुटतां सुटली । विवेकें तुटली देहबुद्धी ॥ ३ ॥ देहबुद्धी नाहीं स्वरूपीं पाहतां । चौथा देह आतां कोठें आहे ॥ ४ ॥ कोठें आहे अहंब्रह्म ऐसा हेत । देहीं देहातीत रामदास ॥ ५ ॥

१७२ कल्पनेचे पोटीं अष्टविधा सृष्टी । तेचि आतां गोष्टी सांगईन ॥१॥ सांगईन गोष्टी एक काल्पनिक । दुजी ती शाब्दिक शब्दसृष्टी ॥ २ ॥ शब्दसृष्टी दुजी तिजी ती प्रत्यक्ष । चौथी जाण लक्ष चित्रलेप ॥ ३ ॥ चित्रलेप चौथी पांचवी स्वप्नींची सृष्टि गंधर्वाची सहावी ते ॥४॥ सहावी ती सृष्टि गंधर्वनगर । सातवी नवज्वर सृष्टि जाणा ॥ ५ ॥ सृष्टि जाणा दृष्टिबंधन आठवी । सर्वाहि मानवी काल्पनिक ॥ ६ ॥ काल्पनिक अष्टसृष्टीचें[2] स्वरूप । शुद्ध सत्स्वरूप निर्विकल्प ॥ ७ ॥ निर्विकल्प देह कल्पनेरहित । जाणिजे स्वहित तेंचि बापा ॥ ८ ॥ तेंचि बापा तुझें संतांचे संगती । चुके अधोगती दास म्हणे ॥ ९ ॥

१७३ पांचाहि प्रळय[3] सांगईन आतां । जाणिजे तत्वता दोन्ही पिंडीं ॥ १ ॥ दोनी पिंडीं दोनी ब्रह्मांडप्रळय । पांचवा अन्वय विवेकाचा ॥२॥ विवेकाचा पंथ विवेकें जाणावा । योगियांचा ठेवा निरूपण ॥ ३ ॥ निरूपणीं निद्राप्रळय बोलिला । दुजा मृत्यु जाला प्राणियासी ॥ ४ ॥ प्राणियासि पिंडीं हे दोनी प्रळयो । ब्रह्म निद्रा क्षयो ब्रह्मयाचा ॥५॥ ब्रह्मयाचा

---

१ एकदम, पूर्ण. २ दासबोधांत अष्टसृष्टि पहा ( द० ६ स० ६–५०–५४ ). ३ पंचप्रळय दास० द० १० स० ५ पहा.

क्षयो तो ब्रह्मप्रळये । व्यतिरेकान्वयो विवेकाचा ॥ ६ ॥ विवेकाचा अर्थ माईक सर्वही स्वस्वरूपीं नाहीं चराचर ॥ ७ ॥ चराचर मूर्ति मायिक प्रसिद्ध । हा विवेक सिद्ध सज्जनाचा ॥ ८ ॥ सज्जनाचा भाव सर्व दृश्य वाव । दृश्यातीत देव जैसा तैसा ॥ ९ ॥ जैसा देव आहे तैसा ओळखावा । प्रळय पांचवा दास म्हणे ॥ १० ॥

१७४ कण सांडोनियां घेऊं नये भूस । गर्भेविण फणस घेऊं नये ॥१॥ घेऊं नये नारिकेळाची नरोटी । सालपटें खोटीं डाळिंबाचीं ॥ २ ॥ डाळिंबाची त्वचा चवड उंसाचा । स्तंभ कर्दळीचा कामा न ये ॥ ३ ॥ खातां न ये नाना फळांची आटोळी[1] । असो हे वाचाळी वाउगीच ॥४॥ वाउगें सांडोनि सार तेंचि घ्यावें । येर तें सांडावें मिथ्याभूत ॥ ५ ॥ मिथ्याभूत जें जें तत्व[2] दृष्टी पडे । म्हणोनियां घडे त्याग त्याचा ॥ ६ ॥ त्याग त्याचा कीजे तें मनीं कल्पावें । मग अनुभवें जाणिजेल ॥ ७ ॥ जाणिजेल सार त्यागितां असार । बोलावा विस्तार कासयासी ॥ ८ ॥ कासयासी आतां धरावा संदेहो । कल्पनेचा देहो नाशिवंत ॥ ९ ॥ नाशिवंत आहे नांव आणि रूप । पाहें आपेंआप दास म्हणे ॥ १० ॥

१७५ खोटें निवडितां खरें नाणें ठरे । तसेंचि विस्तारें तत्त्वज्ञान ॥१॥ तत्वज्ञान खोटें जाणोनि सांडावें । मग ओळखावें परब्रह्म ॥ २ ॥ परब्रह्म बरवें संतसंगें कळे । विवेकें निवळे मार्ग कांहीं ॥ ३ ॥ मार्ग कांहीं कळे परीक्षा जाणतां । दिशाभुली होतां वाट चुके ॥ ४ ॥ वाट चुके मीन ऐसें न करावें । सार्थक करावें दास म्हणे ॥ ५ ॥

१७६ जें जें कांहीं दिसें तें तें सर्व नासे । अविनाश असे आत्मरूप ॥१॥ आत्मरूपीं दृष्टि घालितां निवळे । आपेंआप कळे मिथ्या माया ॥ २ ॥ मिथ्या माया वाटे साचाचे सारिखी । स्वरूपा ओळखी जंव नाहीं ॥३॥ जंव नाहीं जाली संदेहा निवृत्ती । तंव हे प्रचीती जाणवेना ॥ ४ ॥ जाणवेना मनीं निश्चयावांचुनी । निश्चयो श्रवणीं दास म्हणे ॥ ५ ॥

१७७ देहबुद्धि बहु काळाची जुनाट । नवी आहे वाट सार्थकाची ॥ १ ॥ सार्थकाची वाट भ्रांतीनें लोपली । जवळी चुकली असोनियां ॥ २ ॥ असोनियां देव जवळी चुकला । प्राणी भांबावला मायाजाळें ॥ ३ ॥ मायाजाळ दृश्य तुटे एकसरें । जरि मनीं धरे[3] स्वस्वरूप ॥ ४ ॥ स्वरूपनिश्चयें समाधान होय । रामदासीं सोय स्वरूपाची ॥ ५ ॥

---

१ आंतील बीं, आठोळी. २ तत्वसंख्या कळणें. ३ स्थिरता पावे.

१७८ बहुकाळ गेले देवासी धुंडितां । देव पाहों जातां जवळीच ॥ १ ॥ जवळीच असे पाहतां न दिसे । सन्निधचि असे रात्रंदिवस ॥ २ ॥ रात्रंदिवस देव सबाह्याभ्यंतरीं । जीवा क्षणभरी विसंबेना ॥ ३ ॥ विसंबेना परी जीव हे नेणती । जाती अधोगती म्हणोनीयां ॥ ४ ॥ म्हणोनियां सदा सावध असावें । विन्मुख नसावें राघवासी ॥ ५ ॥ राम पूर्वपुण्यें झालिया सन्मुख । मग तो विन्मुख होऊं नेदी ॥ ६ ॥ होऊं नेदी राम सर्वांगें सुंदर । नित्य निरंतर मागें पुढें ॥ ७ ॥ मागें आणि पुढें सन्मुख चहूंकडे । भेटी हे निवाडे राघवाची ॥ ८ ॥ राघवाची भेटी झाल्या नाहीं तुटी । मग कल्पकोटी चिरंजीव ॥ ९ ॥ चिरंजीव होय राघवीं मिळतां । तेथें पाहों जातां मृत्यु नाहीं ॥ १० ॥ नाहीं जन्म मृत्यु नाहीं येणें जाणें । स्वरूपीं राहणें सर्वकाळ ॥ ११ ॥ सर्वकाळ मन तदाकार होय । जरि राहे सोय श्रवणाची ॥ १२ ॥ श्रवणाची सोय संताचेनि संगें । विचारेंचि भंगें अहंभाव ॥ १३ ॥ अहंभावें राम भेटला नवजाय । जवळची होय दूरि कैसा ॥ १४ ॥ दूरि कैसा होय अहंभावें करी । जवळीच चोरी आपणासी ॥ १५ ॥ आपणासी चोरी सबाह्य अंतरीं । आणि सृष्टीभरी नांदतसे ! ॥ १६ ॥ नांदतसे अंत नाहीं तो अनंत । जाणतील संत अनुभवी ॥ १७ ॥ अनुभवी जाणे तेथींच्चिये खुणे । येर विटंबणें वाढवील ॥ १८ ॥ वाढवील सुख संतसज्जनासी । रामीरामदासीं भेटी जाली ॥ १९ ॥

१७९ योगियांचा देव मज सांपडला । थोर लाभ जाला एकाएकीं ॥ १ ॥ एकाएकीं देव त्रैलोक्यनायक । देखिला सन्मुख चहूंकडे ॥ २ ॥ चहूंकडे देव नित्य निरंतर । व्यापुनी अंतर समागमें ॥ ३ ॥ समागम मज रामाचा जोडला । वियोग हा केला देशधडी ॥ ४ ॥ देशधडी केला विवेकें वियोग । रामदासीं योग सर्वकाळ ॥ ५ ॥

१८० जेथें जावें तेथें राम समागमीं । आतां कासया मी खंती करूं ॥ १ ॥ खंती करूं ज्याची तो समागमेंचि । पाहातां सुखाची घडी होय ॥ २ ॥ अहो देव खरा भूमंडळवासी । जातां दिगंतासी सारिखाचि ॥ ३ ॥ सारिखाचि जनीं वनीं वनांतरीं । तों गिरिकंदरीं सारिखाचि ॥ ४ ॥ सारिखाचि देव कदा पालटेना । राहे त्रिभुवना व्यापुनीयां ॥ ५ ॥ व्यापुनीयां दासासन्निधचि वस । विचार विलसे रामदासीं ॥ ६ ॥

१८१ रामेंविण देश तोचि तो विदेश । विदेशाचा देश राम करी ॥ १ ॥ राम भेटे ज्यासि तो नव्हे विदेशी । सर्व देश त्यासि आपुलेचि ॥ २ ॥ आपुलेच देश या रामाकरितां । होय सार्थकता जेथें तेथें ॥ ३ ॥ जेथें

तेथें राम देखतां विश्राम। संसारींचा श्रम आठवेना ॥ ४ ॥ आठवेना जेथें आठव विसर। दास निरंतर जैसा तैसा ॥ ५ ॥

१८२ कल्पनेचा प्रांत[1] तो माझा एकांत। तेथें मी निवांत बैसईन ॥१॥ बैसईन सुखरूप क्षण एक। पाहेन विवेक राघवाचा ॥ २ ॥ राघवाचा पार अनंत अपार। नाहीं पारावार स्वरूपासी ॥ ३ ॥ स्वरूप रामाचें अत्यंत कोमळ। जेथें नाहीं मळ मायिकाचा ॥ ४ ॥ मायिकाचा मळ जाय ततक्षणें। रामाचे दर्शनें दास म्हणे ॥ ५ ॥

१८३ विश्रांतीचें स्थळ स्वरूप केवळ। द्वैत तळमळ जेथें नाहीं ॥ १ ॥ जेथें नाहीं काया[2] नाहीं मोह माया। रंका आणि राया सारिखेंचि ॥२॥ सारिखेंचि सदा सर्वदा स्वरूप। तेंचि तुझें रूप जाण बापा ॥ ३ ॥ जाण बापा स्वयें तूंचि आपणासी। सोहं[3] स्मरणासि विसरतां ॥ ४ ॥ विसरतां सोहं स्मरण आपुलें। मन गुंडाळलें मायाजाळीं ॥ ५ ॥ मायाजाळीं तुझा तूंच गुंतलासी। यातना भोगिसी म्हणूनीयां ॥६॥ म्हणूनियां होईं सावध अंतरीं। सोहं[3] दृढ धरीं दास म्हणे ॥ ७ ॥

१८४ स्वरूपाची भेटी तेथें नाहीं तुटी। वायांचि हिंपुटी[4] होत असां ॥ १ ॥ होतसां हिंपुटी नसतां वियोग। असतां संयोग सर्वकाळ ॥ २ ॥ सर्वकाळ ऐक्य स्वरूपीं आलिंगन। जेथें मीतूंपण हारपलें ॥ ३ ॥ हारपलें दुःख द्वैताचें पाहतां। सुखरूप आतां समाधान ॥ ४ ॥ समाधान चळे ऐसें न करावें। विवेकें भरावें स्वस्वरूपीं ॥ ५ ॥ स्वस्वरूपीं नाहीं संयोग वियोग। सर्वकाळ योग सज्जनाचा ॥ ६ ॥ सज्जनाचा योग सर्वकाळ आहे। विचारूनि पाहे अनुभवें ॥ ७ ॥ अनुभवें जाली आम्हां तुम्हां भेटी। तुटीविणें भेटी दास म्हणे ॥ ८ ॥

१८५ तुम्हां आम्हां मुळीं जाली नाहीं तुटी। तुटीविण भेटी इच्छितसां ॥ १ ॥ इच्छितसां योग नसतां वियोग। तुम्हां आम्हां योग सर्वकाळ ॥ २ ॥ सर्वकाळ तुम्ही आम्ही एके स्थळीं। वायां मृगजळीं बुडूं नये ॥ ३ ॥ बुडूं नये आतां सावध असावें। रूप ओळखावें जवळीच ॥ ४ ॥ जवळीच आहे नका धरूं दुरीं। बाह्य अभ्यंतरीं असोनियां ॥ ५ ॥ असोनि संनिध वियोगाचा खेद। नसोनियां भेद लाऊं नये ॥ ६ ॥ लाऊं नये भेद मायिक संबंधी। रामदासीं बुद्धि भेटी जाली ॥ ७ ॥

१८६ नमन लंबोदरा शारदा सुंदरा। सद्गुरु माहेरा संतजना ॥ १ ॥ संतसंग करी निःसंग होइजे। स्वरूप पाविजे आपुलेंचि ॥ २ ॥ आपुलें

१ शेवट, निर्विकल्पस्थिति. २ देहभान. ३ 'तें ब्रह्म मी आहे' असें स्मरण. ४ कष्टी.

स्वरूप आपणा नेणवे । तयासि जाणवे राम केविं ॥ ३ ॥ राम केविं कळे नाकळे वेदांसी । संगें तयापाशीं पाविजेना ॥ ४ ॥ पाविजेना जंव हा देहसंबंधु । राघवाचा बोधु देहातीत ॥ ५ ॥ देहातीत संत जाणती अनंत । प्रकृतीचा प्रांत निजानंद ॥ ६ ॥ निजानंद पूर्वपक्षाचें बोलणें । सिद्धांतासि उणें आणविलें ॥ ७ ॥ आणविलें उणें शब्दसमुद्रासी । निःशब्द तें ग्रासी मौन्यमुद्रा ॥ ८ ॥ मौन्यमुद्रा ध्यान आणि ती समाधी । अविद्या उपाधि मावळली ॥ ९ ॥ मावळली सर्व दासाची आशंका । जाण विनायका देखतांचि ॥ १० ॥

१८७ प्रथम ते नमूं संत साधुजन । जयां आत्मज्ञान प्रांजळितें[1] ॥ १ ॥ प्रांजळित ज्ञान आत्मनिवेदन । हेंचि समाधान योगियांचें ॥ २ ॥ योगियांचें गुज तेंचि सर्व बीज । एकचि सहज आदि अंत ॥ ३ ॥ आदि अंत सदा निर्मळ निश्चळ । जैसें तें केवळ चिदाकाश ॥ ४ ॥ चिदाकाश बाह्य अंतरीं कोंदलें । तैसें तें एकलें स्वस्वरूप ॥ ५ ॥ स्वस्वरूपीं मिथ्या मायेचें पडळ[2] । जैसें तें आभाळ नाथिलेंचि[3] ॥ ६ ॥ नाथिलेंचि दिसे साचाचिये परी । जैसी बाजीगरी सत्य वाटे ॥ ७ ॥ सत्य वाटे स्वप्न जैसें निजलिया । तेंचि चेवलिया मिथ्याभूत ॥ ८ ॥ मिथ्याभूत माया साच तो ईश्वर । श्रोतीं हा विचार विवरावा ॥ ९ ॥ विवरावा ऐसें रामदास म्हणे । सद्गुरुवचनें चोजवलें ॥ १० ॥

१८८ प्रथम नमन संत साधुजना । संवादाचे ज्ञाना बोलावया ॥ १ ॥ बोलावया सार वस्तूचा विचार । जेणें निरंतर सुख वाटे ॥२॥ सुख वाटे मनीं संवाद सज्जनीं । तेणें ध्यानीं मनीं स्वस्वरूप ॥ ३ ॥ स्वस्वरूप मना कदा आकळेना । सुलभ सज्जनाचेनि संगें ॥ ४ ॥ संगें साधूचिया समाधान जालें । स्वरूप लाधलें रामदासीं ॥ ५ ॥

१८९ सरस्वती विद्या लक्ष्मी अविद्या । दोहींतीत आद्या स्वस्वरूप ॥ १ ॥ स्वरूपीं लक्ष्मी नाहीं सरस्वती । संपत्ति विपत्ति दोनी नाहीं ॥ २ ॥ नाहीं शिव-शक्ति नाहीं नर-नारी । अंतरीं विचारीं दास म्हणे ॥३॥

१९० आमुचे सज्जन संत साधुजन । होय समाधान तयांचेनि ॥ १ ॥ तयांचेनि संगें पाविजे विश्रांती । साधु आदिअंतीं सारिखेचि ॥ २ ॥ सारखेचि सदा संत समाधानी । म्हणोनियां मनीं आवडती ॥ ३ ॥ आवडती सदा संत जिवलग । सुस्वरूप संग सज्जनाचा ॥ ४ ॥ सज्जनाचा संग पाप तें संहरी । म्हणोनियां धरी रामदास ॥ ५ ॥

१ प्रांजळ, स्वच्छ. २ पडदा. ३ मिथ्या असून भासणारें.

१९१ संतसंगें जन्म चुकती यातना । आणि जनार्दना भेटि होय ॥१॥ भेटि होय संतसंगें राघवाची । आणिक भवाची शांति होय ॥ २ ॥ शांति होय काळ शांति होय वेळ । मन हें निर्मळ जरी राहे ॥ ३ ॥ जरि राहे भाव राघवीं सर्वदा । संसार आपदा तया नाहीं ॥ ४ ॥ तया नाहीं दुःख तया नाहीं शोक । दास म्हणे एक राम ध्यातां ॥ ५ ॥

१९२ संतसंगें तुज काय प्राप्त जालें । सांग पां वहिलें[1] मजपाशीं ॥१॥ मजपाशीं सांग कोण मंत्र तुज । काय आहे गुज अंतरींचें ॥ २ ॥ अंतरींचें गुज काय समाधान । मंत्र जप ध्यान कैसें आहे ॥ ३ ॥ कैसें आवाहन कैसें विसर्जन । कैसें पिंडज्ञान सांगें मज ॥ ४ ॥ सांगें मज आतां काय उपासन । मुद्रा ते आसनें सांग आतां ॥ ५ ॥ सांग पंचीकरण चित्तचतुष्टय । कैसे ते अद्वय जीव शिव ॥ ६ ॥ जीव शिव ऐक्य जालें कोणे रीती । सांग मजप्रती अष्टदेह ॥ ७ ॥ अष्टदेह पिंडब्रह्मांड रचना । तत्वविवंचना सांग मज ॥ ८ ॥ सांग मज भक्ति कैसी ती विरक्ति । सायुज्यता मुक्ति ते कवण ॥ ९ ॥ कोण तें साधन कोणाचें भजन । ऐस केले प्रश्न रामदासा ॥ १० ॥

१९३ संतसंगें मज काय प्राप्त जालें । सांगतों[2] वहिलें तुजपाशीं ॥ १ ॥ मंत्र हा तारक रामनाम एक । गुण हरादिक चिंतिताती ॥ २ ॥ ज्ञानें समाधान सगुणाचें ध्यान । निर्गुण अभिन्न आपणाचि ॥ ३ ॥ दृश्य आवाहन दृश्य विसर्जन । तेथें पिंडज्ञान आढळेना ॥ ४ ॥ उपासना हरी मुद्रा अगोचरी । सिद्धासनावरि समाधान ॥ ५ ॥ पंचीकरणें पिंडब्रह्मांड आवरण । साक्ष तो आपण एकलाचि ॥ ६ ॥ जीवशिवऐक्य जालें येणें रीती । प्रकृतीचे प्रांतीं[3] द्वैत कैंचें ॥ ७ ॥ अष्ट देह स्थूळ सूक्ष्म कारण । चौथा महाकारण देह जाण ॥ ८ ॥ विराट हिरण्य आणि अव्याकृत । आठवी प्रकृती मूळमाया ॥ ९ ॥ एक तत्व जाणे त्याचें नांव भक्ति । जाणावी विरक्ति संगत्याग ॥ १० ॥ सायुज्यता मुक्ति तेचि ते अचळ । साधनाचें फळ गुरुदास्य ॥ ११ ॥ गुरुदास्यें चुके संसारयातना । अनुभवें खुणा जाणतील ॥ १२ ॥ अनुभवेंवीण होय सर्व शीण । निरसले प्रश्न दास म्हणे ॥ १३ ॥

१९४ रिसांचियेपरी[4] व्हावें एकचित्त । ध्यानीं भगवंत सोडूं नये ॥१॥ सोडूं नये सर्वकाळ निजध्यास । श्रवण अभ्यास असों द्यावा ॥ २ ॥

१ अगोदर. २ मागील अभंगांतील प्रश्नांस उत्तरें या अभंगांत दिलीं आहेत. ३ शेवटीं. ४ अस्वलाचे.

असों द्यावा सदा सन्निध विवेक । तेणें देव एक चोजवेल[1] ॥ ३ ॥ चोजवेल देव श्रवणमननें । कुबुद्धि साधनें पालटावी ॥ ४ ॥ पालटावी सर्व देहेचि हे अहंता । शोधावी तत्वतां देहबुद्धी ॥ ५ ॥ देहबुद्धी सर्व ज्ञानें शोधूं जातां । निःसंगा अनंता भेटि होय ॥ ६ ॥ भेटि होय ज्ञानें निर्गुणदेवाची । मग नाहीं छिंछी[2] संसाराची ॥ ७ ॥ संसाराची छिछी यातना यमाची । चुकवील तोचि धन्य एक ॥ ८ ॥ धन्य एक जनीं तोचि तो पहातां । मुक्ति सायुज्यता जया लाभे ॥ ९ ॥ जया लाभे मुक्ति सगुणाची भक्ति । दास म्हणे शक्ती आगळा तो ॥ १० ॥

१९५ ब्रह्म हें जाणावें निर्मळ निश्चळ । व्यापक पोकळ व्योमाकारं[3] ॥ १ ॥ व्योमाकार ब्रह्म बोलताती श्रुति । पाहों जातां मति तदाकार ॥ २ ॥ तदाकार मति श्रवणें होईल । संदेह जाईल अंतरींचा ॥ ३ ॥ अंतरींचा भाव निर्मळीं लागतां । होईजे तत्वता निर्मळचि ॥ ४ ॥ निर्मळचि होणें निर्मळाचे गुणें । श्रवणमननें दास म्हणे ॥ ५ ॥

१९६ नमोजी अनंता तूंचि मातापिता । तुझी सर्व सत्ता तूंचि एक ॥ १ ॥ तूंचि एक ऐसा निश्चय मानसीं । झालिया मुक्तीसी काय उणें ॥ २ ॥ काय उणें मुक्ति जया तुझी भक्ति । संसारीं विरक्ति सर्वकाळ ॥ ३ ॥ सर्वकाळ जया श्रवणीं आवडी । साधका तांतडी तुझी देवा ॥४॥ तुझी देवा चाड त्यासि नाम गोड । पुरे सर्व कोड दास म्हणे ॥ ५ ॥

१९७ जोडलासि बापा धरिलासी भावें । आतां तुज जीवें विसंबेना ॥ १ ॥ विसंबेना देवा नित्य निरंतर । मेलिया विसर पडों नेदी ॥ २ ॥ पडों नेदी वाचा रामनामाविण । देव हा सगुण रामदासीं ॥ ३ ॥

१९८ ओवीचेनि मिसें देव आठवावा । हृदयीं धराबा सर्वकाळ ॥ १ ॥ सर्वकाळ मना स्वरूपाचा छंद । तेणें भवकंद[4] तुटतील ॥ २ ॥ तुटेल ती व्याधि या जन्मकर्माची । जरि राघवाची भक्ति घडे ॥३॥ भक्ति घडे भावें सगुणा देवाची । संगति देहाची जंव आहे ॥ ४ ॥ आहे देव तव सगुणीं भजावें । स्वस्वरूप व्हावें आपणचि ॥ ५ ॥ आपणचि देव आपणचि भक्त । संतसंगें मुक्त आपणचि ॥६॥ आपणचि सर्व आपणचि वाव । मीपणाचा ठाव आपणचि ॥ ७ ॥ आपण तूंपण जयाचे अंतरीं । तंव भक्ति करीं सगुणाची ॥ ८ ॥ सगुणाची भक्ति लोभाची विरक्ती । निर्गुणाची भक्ति सायुज्यता ॥ ९ ॥ सायुज्यता मुक्ति फिटला संदेहो । बंधनचि वावो रामदासीं ॥ १० ॥

---

१ कळेल. २ फजीती. ३ गगनोपम. ४ संसाराचीं बीजें.

१९९ ओवीचेनि मिसें स्वरूपासि जावें । सत्वर पावावें समाधान ॥ १ ॥ समाधान नाहीं स्वरूपाबांचोनी । म्हणोनियां मनीं तेंचि असो ॥ २ ॥ तेंचि असो रूप निर्गुण रामाचें । सुख विश्रामाचें समाधानी ॥ ३ ॥ समाधानी योगी तो हें सुख भोगी । मनीं वीतरागी[1] याचि सुखें ॥ ४ ॥ याचि सुखें नर जो नाहीं निवाला । तोचि आहाळाला दुःखशोकें ॥ ५ ॥ दुःख शोक नाहीं राम आठवितां । अमृत सेवितां मृत्यु नाहीं ॥ ६ ॥ नाहीं जन्ममृत्यु अभेदभक्तासी । रामीरामदासीं अनुभव ॥ ७ ॥

२०० सगुण हा देव धरावा निश्चित । तरि नाशवंत विश्व बोले ॥ १ ॥ विश्व बोले एका भजावें निर्गुणा । परि लक्षवेना काय कीजे ॥ २ ॥ काय कीजे आतां निर्गुण दिसेना । सगुण असेना सर्वकाळ ॥ ३ ॥ सर्वकाळ गेला संदेहीं पडतां । कोणे वेळे आतां मोक्ष लाभे ॥ ४ ॥ मोक्ष लाभे एका सद्गुरूपासून । आत्मनिवेदन रामदासीं ॥ ५ ॥

२०१ जें पंचभूतिक तें सर्व मायिक । बोलती विवेक संतजन ॥ १ ॥ संतजनीं सर्व मायिक बोलावें । तरि कां फिरावें तीर्थाटणा ॥ २ ॥ तीर्थाटणें देव मायिकाचे पोटीं । तरि आटाआटी कां करावी ॥ ३ ॥ कां करावी पूजा सांडूनि परमात्मा । मूर्खस्य प्रतिमा हें वचन ॥ ४ ॥ हें वचन मिथ्या कसें हो करावें । काय हो धरावें आतां आम्हीं ॥ ५ ॥ आतां आम्हीं वाक्य मिथ्या म्हणों नये । देवधर्म काये मोकलावा[2] ॥ ६ ॥ मोकलावा देव ऐसें म्हणों नये । तरि वाक्य काये मिथ्या आहे ॥ ७ ॥ मिथ्या नव्हे वाक्य मिथ्या नव्हे देव । पडिला संदेह काय कीजे ॥ ८ ॥ कीजे दृढ भाव सगुण देवासीं । जंव कल्पनेसी उरी आहे ॥ ९ ॥ कल्पनेचें रूप विवेकें विरालें । मग सर्व जालें गंगाजळ ॥ १० ॥ गंगाजळ जालें निर्विकल्प केलें । सगुण राहिलें सहजचि ॥ ११ ॥ सहजचि कीजे उपाधि न कीजे । एकांतीं बोलिजे गुरुगम्य ॥ १२ ॥ गुरुगम्य आहे कल्पनेवेगळें । कल्पनेच्या मुळें वाद उठे ॥ १३ ॥ वाद उठे जनीं ऐसें न करावें । त्रिकाळ भजावें वेदवाक्य ॥ १४ ॥ वेदवाक्य बोले कर्म उपासना । अंती शुद्ध ज्ञान बोलियेलें ॥ १५ ॥ बोलियेला पूर्वपक्ष तो सिद्धांत । केला निश्चयार्थ संतजनीं ॥ १६ ॥ संतजनीं दृढ विश्वास धरावा । मग विसरावा संदेह तो ॥ १७ ॥ संदेह धरिते कल्पना आपुली । निर्विकल्प केली साधुजनीं ॥ १८ ॥ साधुजनीं केला निश्चयो धरावा । तेथें अहंभावा उरी नाहीं ॥ १९ ॥ उरी नाहीं संतसंगें संदेहासी । रामीरामदासीं निःसंदेह ॥ २० ॥

---

१ वैराग्यशील. २ पोकळा.

२०२ दृश्य हे दिसेना अंधासि पहातां । परि तया ज्ञाता म्हणों नये ॥ १ ॥ म्हणों नये तैसें अज्ञाना विज्ञान । पूर्ण समाधान वेगळेंचि ॥ २ ॥ वेगळेंचि कळे क्षीरनीर हंसा । दास म्हणे तैसा अनुभव ॥ ३ ॥

२०३ ज्ञानाचें लक्षण क्रियासंरक्षण[1] । वरि विशेषेण[2] रामनाम ॥ १ ॥ रामनाम वाचे विवेक अंतरीं । अनुताप वरी त्यागावया ॥ २ ॥ त्यागावया भोग बाह्य लोलंगता । पाविजे तत्वता अनुतापें ॥ ३ ॥ अनुतापें त्याग बाह्यात्कारीं जाला । विवेकानें केला अंतरींचा ॥ ४ ॥ अंतरींचा त्याग विवेकीं करावा । बाह्य तो धरावा अनुतापें ॥ ५ ॥ अनुतापें भक्ति विवेक वैराग्य । घडे त्याचें भाग्य काय सांगों ॥ ६ ॥ काय सांगों भाग्य अचळ चळेना । महिमा कळेना ब्रह्मादिकां ॥ ७ ॥ ब्रह्मादिकां लाभ ज्ञानाचा दुर्लभ । तो होय सुलभ साधुसंगें ॥ ८ ॥ साधुसंगें साधु होइजे आपण । सांगतसे खुण रामदास ॥ ९ ॥

२०४ मुक्तपणें[3] रामनामाचा अव्हेरु । करी तो गव्हारु[4] मुक्त नव्हे ॥ १ ॥ मुक्त नव्हे काय स्वयें शूळपाणी । रामराम वाणी उच्चारितो ॥ २ ॥ उच्चारितो शिव तेथें किती जीव । बापुडें मानव देहधारी ॥ ३ ॥ देहधारी नर धन्य तो साचार । वाचे निरंतर रामनाम ॥ ४ ॥ रामनाम वाचे रूप अभ्यंतरीं । धन्य तो संसारीं दास म्हणे ॥ ५ ॥

२०५ नाम घेतां रामरूप ठायीं पडे । गुज तें सांपडे योगियांचें ॥ १ ॥ योगियांचें गुज सर्वांठायीं असे । परि तें न दिसे ज्ञानाविण ॥ २ ॥ ज्ञानाविण योग ज्ञानाविण भोग । ज्ञानाविण त्याग वाउगाचि ॥ ३ ॥ वाउगाचि धर्म वाउगाचि कर्म । गर्भगीता वर्म बोलियेली ॥ ४ ॥ बोलियेली वर्म ज्ञान हें सार्थक । येर निरर्थक सर्व धर्म ॥ ५ ॥ सर्वधर्म त्यागीं मज शरण येईं । अष्टादशाध्यायीं[5] बोलियेलें ॥ ६ ॥ बोलियेलें ज्ञान आगम-निगमीं । ज्ञानेंविण ऊर्मी निरसेना ॥ ७ ॥ निरसेना ऊर्मी आत्मज्ञानें-विण । ज्ञानाचें लक्षण निरूपणें ॥ ८ ॥ निरूपणें ज्ञान अंतरीं प्रकाशे । विवेकें निरसे मायाजाळ ॥ ९ ॥ मायाजाळीं जन आत्मज्ञानी जाले । दास म्हणे गेले सुटोनियां ॥ १० ॥

२०६ नाना रंग सेवटीं[6] होताती वोरंग[7] । सर्वदा सुरंग रामरंग ॥ १ ॥ रामरंग कदाकाळीं वोरंगेना । तेथें राहें मना रंगोनियां ॥ २ ॥ रंगोनियां राहें तद्रूप होवोनी । मग जनीं वनीं समाधान ॥ ३ ॥ समाधान घडे

---

१ स्वधर्मकर्माचें पाळण. २ मुख्यतः आदरेंकरून. ३ मी मुक्त अशा अहंकारानें. ४ मूर्ख. ५ ‘सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज’—गीता. ६ शेवटीं. ७ विरंग.

राघवीं मिळतां । मग दुर्मिळता कदा नाहीं ॥ ४ ॥ कदा नाहीं खेद सर्वही आनंद । सुखाचा संवाद संतसंगें ॥ ५ ॥ संतसंगें जन्म सार्थक होईल । राम सांपडेल जवळीच ॥ ६ ॥ जवळीच राम असोनि चुकलों । थोर भांबावलों मायिकासी ॥ ७ ॥ मायिकासी प्राणी सत्यचि मानिती । सत्य ते नेणती जाणपणें ॥ ८ ॥ जाणपणें मनीं अज्ञान थारलें । तेंचि विस्तारलें ज्ञानरूपें ॥ ९ ॥ ज्ञानरूपें भ्रांति सामावली चित्तीं । संशयनिवृत्ति नव्हे तेणें ॥ १० ॥ नव्हे तेणें रूप ठाउकें रामाचें । जें कां विश्रामाचें माहियेर ॥ ११ ॥ माहेयेरें घडे संशयनिवृत्ती । राम सीतापतीचेनि नामें ॥ १२ ॥ रामनामें रूप[1] सर्वही निरसे । जो कोणी विश्वासे रामनामीं ॥ १३ ॥ रामनामीं चित्त ठेवूनि असावें । दुश्चित नसावें सर्व काळ ॥ १४ ॥ सर्वकाळ गेला सार्थकीं जयाचा । धन्य तो दैवाचा दास म्हणे ॥ १५ ॥

२०७ दर्पणीं पाहातां दिसे सर्व अंग । परि पृष्ठभाग आढळेना ॥ १ ॥ आपलीच पाठी आपणा न दिसे । ऐसे बोलतसे सर्व जन ॥ २ ॥ आपशुद्धि[2] नेणे त्या काय करावें । म्हणोनि जाणावें आपणासीं ॥ ३ ॥ आपणासी जाणे संताचे संगतीं । जया अधोगती जन्म नाहीं ॥ ४ ॥ जन्म नाहीं मृत्यु नाहीं येणें जाणें । स्वरूपीं राहणें दास म्हणे ॥ ५ ॥

२०८ भयानक स्वप्न जया वाटे भये । तेणें निजों नये सर्वकाळ ॥ १ ॥ सर्वकाळ जागा विवेकसंगतीं । तयासि कल्पांतीं भय नाहीं ॥ २ ॥ भय उठे देहीं तूं तंव विदेही । देहातीत पाहीं आपणासी ॥ ३ ॥ आपणा नेणतां वाटे नाना चिंता । म्हणोनि दुश्चिता राहूं नये ॥ ४ ॥ राहूं नये कदा या देहसंबंधीं । मनीं धरी शुद्धी स्वरूपाची ॥ ५ ॥ स्वरूपाची शुद्धी जया ठाईं पडे । तया नरा घडे समाधान ॥ ६ ॥ समाधान घडे देव आठवितां । रामदासीं चिंता दूर ठेली ॥ ७ ॥

२०९ जंव आहे तुज हा देहसंबंधु । तंव नव्हे बोधु राघवाचा ॥ १ ॥ राघवाचा बोध या देहावेगळा । देहकळवळा[3] तेथें नाहीं ॥ २ ॥ नाहीं सुखदुःख नाहीं येणेंजाणें । चिरंजीव होणें रामरूपीं ॥ ३ ॥ रामरूपें होय जन्ममृत्यु वाव । विश्रांतीचा ठाव राम एक ॥ ४ ॥ राम एकरूपी सर्वरूपीं आहे । अनुभवीं पाहे आपुलिया ॥ ५ ॥ आपुल्या अंतरीं बाह्य निरंतरीं । सर्वसृष्टीभरी नांदतसे ॥ ६ ॥ नांदतसे सदा जवळी कळेना । कदा आकळेना साधूविण ॥ ७ ॥ साधूविण राम धांडोळितां श्रम ।

---

१ नामरूप, दृश्य. २ आपला शोध, आत्मप्राप्ति. ३ देहाची ममता.

नव्हेचि विश्राम साधूविणें ॥ ८ ॥ साधूविण राम कदा आकळेना । संदेह तुटेना कांहीं केल्या ॥ ९ ॥ कांहीं केल्या नव्हे साधुसंताविण । रामदास खुण सांगतसे ॥ १० ॥

२१० लागलासे मुळीं हा देहसंबंधु । करितसे खेदु अहंभावें ॥ १ ॥ अहंभावें कदा नये पुरवला । भवभ्रम जाला दुःखराशी ॥ २ ॥ दुःखराशी जाल्या देहाचे संबंधें । सर्व ज्ञानबोधें तुटतील ॥ ३ ॥ तुटती संबंध संतांचे राहणी । होईल झाडणी पंचभूतां ॥ ४ ॥ पंचभूतां लयो स्वरूप-अन्वयो । तुटला संशयो संबंधाचा ॥ ५ ॥

२११ पाहातां दिसेना तेंचि बरें पाहे । तेथें रूप आहे राघवाचें ॥ १ ॥ राघवाचें रूप जाणावें अरूप । शुद्ध सत्स्वरूप निराकार ॥ २ ॥ निराकार राम देखतां विश्राम । दूरि ठाके श्रम संसारींचा ॥ ३ ॥ संसारींचा श्रम राघवीं असेना । परि तो दिसेना राम डोळां ॥ ४ ॥ राम डोळां आहे अनुभवें पाहें । मीपण न साहे रामरूपीं ॥ ५ ॥ रामरूपीं नाम रूप दोनी नाहीं । तेथें मना राहीं सर्वकाळ ॥ ६ ॥ सर्वकाळ रामदर्शन होतसे । निर्गुणीं विश्वासे मन माझें ॥ ७ ॥ मन माझें रामस्वरूपीं संचरे । तेणें देहीं भरे विदेहता ॥ ८ ॥ विदेहता देहीं अलक्ष लक्षावें । निःशब्दा बोलावें संतसंगें ॥ ९ ॥ संतसंगें घडे निःसंगाचा संग । राघवीं संयोग राम-दासा ॥ १० ॥

२१२ ओळखतां ज्ञान ओळखी[1] मोडली । भेटी हे जोडली आपणासि ॥ १ ॥ आपणासी भेटी जाली बहुतां दिसां । तुटला वळसा मीपणाचा ॥ २ ॥ मीपणाचा भाव भावें केला वाव । दास म्हणे देव प्रगटला ॥ ३ ॥

२१३ प्रगटला देव जयाचे अंतरीं । तया नाहीं उरी मीपणाची[2] ॥ १ ॥ मीपणाची उरी तूंपणा[3] भेटतां । आपणा पहातां वाव जाली ॥ २ ॥ वाव जाली देव देखतां दाटणी । दास म्हणे वाणी वेडावली ॥ ३ ॥

२१४ वेडावली वाणी देवचि बोलतां । देव बोलूं जातां अनिर्वाच्य ॥१॥ अनिर्वाच्य देव वाचा बोलूं गेली । जिव्हाहि चिरली भूधराची[4] ॥२॥ भूधराची जिव्हा झालीसे कुंठित । दास म्हणे अंत अनंताचा ॥ ३ ॥

२१५ नित्य निरंतर सर्वांचे अंतरीं । तोचि निराकारी बोलिजेतो ॥१॥ बोलिजेतो संत महंत जाणती । खुणेसि बाणती विवंचितां ॥ २ ॥ विवं-चितां राम रामचि होइजे । ये गोष्टीची कीजे विचारणा ॥ ३ ॥ विचा-रणा सार विचारें उद्धार । साधु योगेश्वर विचारेंचि ॥ ४ ॥ विचारेंचि जनीं होतसे सार्थक । धन्य हा विवेक दास म्हणे ॥ ५ ॥

---

१ जगाची ओळख. २ ईश्वररूपास. ३ देवाचें पूर्णत्व, सर्वव्यापित्व पाहतां. ४ शेषाची.

२१६ करीं घेतां न ये टाकितां न जाये। तैसें रूप आहे राघवाचें ॥१॥ राघवाचें रूप पाहतां न दिसे । डोळां भरलेंसे सर्वकाळ ॥ २ ॥ सर्वकाळ भेटी कदां नाहीं तुटी । रामदासीं लुटी स्वरूपाची ॥ ३ ॥

२१७ तत्वंमसि जाण अहंब्रह्म ऐसें । जाण हें विश्वासें महावाक्यें ॥१॥ अहं आत्मा ब्रह्म आणि ब्रह्मज्ञान । दास म्हणे वर्म वेदवाक्यें ॥ २ ॥ वेदवाक्यें रामीरामदास पाहे । मुख्य पद लाहे निवेदनें ॥ ३ ॥

२१८ तूंचि ब्रह्म ऐसें वेदाचें वचन । तेंचि संतजन दृढ करी ॥ १ ॥ दृढ करी साधु तूंचि ब्रह्म ऐसें । तरी कां विश्वासें धरिजेना ॥ २ ॥ धरिजेना मनीं साधूचें वचन । विदेही[3] अमान्य कां करावा ॥ ३ ॥ कां[4] करावा निश्चय स्वयें स्वरूपाचा । तिहीं प्रचितींचा ऐक्यभाव ॥ ४ ॥ ऐक्यभाव जरि संतांचे वचनीं । तरी समाधानीं पाविजेल ॥ ५ ॥ पाविजेस निजस्वरूप आपुलें । जरि विश्वासलें मन तेथें ॥ ६ ॥ मनाचा विश्राम तोचि आत्माराम । रामदासीं वर्म संतसंगें ॥ ७ ॥

२१९ गीताभागवतीं उपदेश केला । अर्जुना दाविला देव कृष्णें ॥ १ ॥ कृष्णें दाखविला देव तो वेगळा । बोलिजे आगळा सर्वांहुनि ॥ २ ॥ सर्वांहुनी सार देव तो साचार । दास म्हणे पार कल्पनेचा ॥ ३ ॥

२२० कल्पनेचा वेव कल्पनेची पूजा । तेथें कोणी दुजा आढळेना ॥ १ ॥ आढळेना देव आढळेना भक्त । कल्पनेरहित काय आहे ॥ २ ॥ आहे तैसें आहे कल्पना न साहे । दास म्हणे पाहें अनुभवें ॥ ३ ॥

२२१ अनुभव वाचे बोलिला न जाय । भाव नेणें काय भावूं आतां ॥१॥ भावूं आतां देव कैसा निरावेव । म्हणोनीयां भाव सगुणासी ॥ २ ॥ सगुणासी भाव लावितां स्वभाव । पालटे अभाव दास म्हणे ॥ ३ ॥

२२२ भावनेचा देव भावार्थ भाविला । देव भक्त जाला भावनेचा ॥१॥ भावनेचा देव भावनेचा भक्त । भावनेनें मुक्त भावितसे ॥ २ ॥ भावितसे मन त्याहुनि तें भिन्न । दास म्हणे ज्ञान वोळखावें ॥ ३ ॥

२२३ माझा स्वामी असे संकल्पापुरता । शब्दीं काय आतां स्तुति करूं ॥ १ ॥ स्तुति करूं जातां अंतरला दुरी । मीतूंपणा उरी उरों नेदी ॥ २ ॥ उरों नेदी उरी स्वामीसेवापण । एकाकी आपण काय केलें ॥ ३ ॥ केलें संघटण कापुरअग्नीसी । जैसी भिन्नत्वासि उरी नाहीं ॥ ४ ॥ तैसी नाहीं उरी रामीरामदासा । स्वयें होय ऐसा तोचि धन्य ॥ ५ ॥

---

१ 'तें ब्रह्म तूं आहेस.' २ आत्मनिवेदनानें. ३ निरिच्छ देहातीत संत. ४ काय. ५ देव निर्विकल्प.

२२४ प्रवृत्ति सासुरें निवृत्तिं माहेर । तेथें निरंतर मन माझें ॥ १ ॥ माझें मनीं सदा माहेर तुटेना । सासुरें सुटेना काय करूं ॥ २ ॥ काय करूं मज लागला लौकिक । तेणें हा विवेक दूरी जाय ॥ ३ ॥ दूरि जाय हित मजचि देखतां । प्रयत्न करूं जातां होत नाहीं ॥ ४ ॥ होत नाहीं यत्न संतसंगाविण । रामदास खुण सांगतसे ॥ ५ ॥

२२५ अर्थाविणें पाठ कासया करावें । व्यर्थचि मरावें घोकोनियां ॥१॥ घोकुनियां काय वेगीं अर्थ पाहें । अर्थरूप राहें देखोनियां ॥ २ ॥ देखोनियां अर्थ सार्थक करावें । रामदास भावें सांगतसे ॥ ३ ॥

२२६ वस्तूचा[१] निर्धार होय अपरंपार । साधनाचें सार निरूपण ॥ १ ॥ निरूपणाऐसें साग नाहीं दुजें । जेणें सर्व बीजें हाता येती ॥ २ ॥ हाता येती बीजें ज्ञानाचीं सहजें । निःसंदेह[३] भोजें[४] नाचतसे ॥ ३ ॥ नाचतसे सदा विवेक अंतरीं । मायामोहपूरीं बुडों नेदी ॥ ४ ॥ बुडों नेदी कदाकाळीं निरूपण । रामदासीं खुण संतसंगें ॥ ५ ॥

२२७ निरूपण सार अद्वैत करावें । तेणें उद्धरावें निश्चयेंसी ॥ १ ॥ निश्चयेंसि पाहें आपुली वोळखी । तोचि एक सुखी जनांमधें ॥ २ ॥ जनांमधें सुखी परत्र[५] साधनें । संसार बंधनें तया नाहीं ॥ ३ ॥ तया नाहीं देहबुद्धीची अहंता । देहीं विदेहता वस्तुरूप ॥ ४ ॥ वस्तुरूप होय मीपण त्यागितां । शाश्वत भावितां दास मुक्त ॥ ५ ॥

२२८ निरूपणें भक्ति निरूपणें ज्ञान । अनुताप पूर्ण निरूपणें ॥ १ ॥ निरूपणें योग योगाचा संयोग । निरूपणें त्याग घडतसे ॥ २ ॥ घडतसे सर्वकांहीं निरूपणें । बाणती लक्षणें सज्जनाचीं ॥ ३ ॥ सज्जनाचीं मतें सज्जन जाणती । येर तें नेणती जाणपणें ॥ ४ ॥ जाणत्या नेणत्या होय समाधान । करावें मनन दास म्हणे ॥ ५ ॥

२२९ पूर्ण समाधान होय निरूपणें । परि जाणपणें[६] बुडविलें ॥ १ ॥ बुडविलें देहातीत समाधान । देह-अभिमान वाढविला ॥ २ ॥ वाढविला तर्क वायां निरूपणीं । जाणिव पापिणी काय केलें ॥ ३ ॥ काय केलें ऐसें जाणत जाणतां । स्वरूपीं अहंता कामा न ये ॥ ४ ॥ कामा न ये देहबुद्धीचें जाणणें । दास निरूपणें सावधान ॥ ५ ॥

२३० गतीचें लक्षण हेंचि हें प्रमाण । श्रवण मनन सवकाळ ॥ १ ॥ सर्वकाळ सारासारविचारणा । वस्तूची चाळणा निरंतर ॥ २ ॥ निरंतर

१ परमात्म्याचा. २ श्रेष्ठ. ३ संदेहरहित ब्रह्म. ४ आवडीनें. ५ परलोकीच्या. ६ अहंकारानें.

भ्यास लागला अंतरीं। धारणाही धरी निर्गुणाची ॥ ३ ॥ निर्गुणासंगती निर्गुण होईजे। प्रत्यांवृत्ति[1] कीजे निरूपणें ॥ ४ ॥ निरूपणें होय अलभ्याचा लाभ। साधन सुलभ दास म्हणे ॥ ५ ॥

२३१ निरूपणाऐसें नाहीं समाधान। आणिक साधन आढळेना ॥१॥ भक्ति ज्ञान घडे वैराग्य आतुडे। भावार्थ सांपडे निरूपणें ॥ २ ॥ शांति दया क्षमा नैराश्यता मनीं। आतुडे उन्मनी[2] तेणें गुणें ॥३॥ रिद्धि सिद्धि दासी होती निरूपणें। श्रवण मननें निजध्यासें ॥ ४ ॥ भ्रांतीचा संदेह तुटे एकसरा। दास म्हणे करा निरूपण ॥ ५ ॥

२३२ निरूपणें निज लाभे सर्व कांहीं। दुजें ऐसें नाहीं पाहों जातां ॥१॥ साराचेंहि सार मना-अगोचर[3]। तें लाभे साचार निरूपणें ॥ २ ॥ दाखवितां न ये बोलिलें न जाय। त्याची कळे सोय निरूपणें ॥ ३ ॥ मनासि न कळे मीपणा नाढळे। तें गुज निवळे निरूपणें ॥ ४ ॥ वित्पत्तीचें[4] कोडें तर्कांचें सांकडें। तें जोडे रोकडें निरूपणें ॥ ५ ॥ मन हें चंचळ तें होय निश्चळ। साधनाचें फळ दास म्हणे ॥ ६ ॥

२३३ केलेंचि करावें पुन्हा निरूपण। तरि बाणे खूण कांहीं एक ॥१॥ कांहीं एक काळ निरूपणें गेला। तोचि एक भला समाधानी ॥ २ ॥ समाधानी भला निरूपणीं राहे। पाहिलेंचि पाहे निरूपणें ॥ ३ ॥ निरूपणें पाहे श्रवण मनन। होय समाधान निजध्यास ॥ ४ ॥ निजध्यास निज वस्तूचा धरावा। संसार तरावा दास म्हणे ॥ ५ ॥

२३४ एकदां जेवितां नव्हे समाधान। प्रतिदिनीं अन्न खाणें लागे ॥१॥ तैसें निरूपण केलेंचि करावें। परि न करावें उदासीन ॥ २ ॥ प्रति दिनीं अन्न प्रत्यहीं जीवन। देहसंरक्षण करावया ॥ ३ ॥ प्रत्यहीं संसारीं बोलावें लागतें। कांहीं केलिया ते सुटेना कीं ॥ ४ ॥ प्रतिदिनीं देह पाळावा लागतो। शुद्ध करावा तो रात्रंदिवस ॥ ५ ॥ प्रत्यहीं देहानें भोगिलें भोगावें। त्यागिलें त्यागावें दास म्हणे ॥ ६ ॥

२३५ आपुल्या भोजनीं पोट हें भरेना। लागे उपार्जना[5] दुसऱ्याची ॥ १ ॥ दुसऱ्याची सेवा करितां वेतन। पाविजेतें अन्न लोकांमध्यें ॥ २ ॥ लोकांमध्यें उपासितां देह-दारा। मागावा मुशारा कोणापासीं ॥ ३ ॥ कोणापाशीं कोणें काय हें सांगावें। कैसेनि मागावें वेतनासी ॥ ४ ॥ वेतनासी जनीं तरिच पाविजे। जरि सेवा कीजे स्वामियाची ॥ ५ ॥

१ पुनः पुन्हां स्वरूपी जाणें. २ निःसंकल्प अवस्था. ३ मन जेथें कुंठतें तें. ४ शास्त्राला दुर्गम. ५ सेवा.

स्वामियाची सेवा करितां उत्पन्न । स्वामी तो प्रसन्न होत असे ॥ ६ ॥ होत असे देव संतुष्ट भजतां । मुक्ति सायुज्यता तेणें लाभे ॥ ७ ॥ लाभे नवविधा तेणें चतुर्विधा[1] । पुसावें सुबद्धा सज्जनासी ॥ ८ ॥ सज्जनासीं पूजा देहासि भजतां । भार भगवंता कैसा पडे ॥ ९ ॥ कैसा भार पडे देहाचे भजनें । भक्तीचेनि गुणें देव पावे ॥ १० ॥ देव पावतसे भजतां देवासी । सेवितां देहासी देव कैंचा ॥ ११ ॥ देव कैंचा देव सेविल्या-वांचुनी । तत्वविवंचनीं दास म्हणे ॥ १२ ॥

१३६ शौच केलें तेणें शुचिर्भूत जाला । जळस्नानें गेला मळ त्याचा ॥ १ ॥ मळत्यागें जालें शरीर निर्मळ । अंतरींचा मळ कैसा जातो ॥ २ ॥ कैसा जातो काम क्रोध लोभ दंभ । नांदती स्वयंभ अंतर्यामीं ॥ ३ ॥ अंतर्यामीं आधीं होईजे निर्मळ । तेणें तुटे मूळ संसाराचें ॥ ४ ॥ संसा-राचें मूळ सूक्ष्मीं गुंतलें । मनहि गुंतलें विभ्रमासी[2] ॥ ५ ॥ विभ्रमासि बरें शोधोनि पहावें । अंतरीं रहावें निष्ठावंत ॥ ६ ॥ निष्ठावंत ज्ञान पूर्ण समाधान । मग संध्यास्नान सफळित ॥ ७ ॥ सफळित संध्या संदेह नसतां । निःसंदेह होतां समाधान ॥ ८ ॥ समाधान नाहीं स्नानसंध्या कांहीं । लौकिकाचे ठाईं लोकलाज ॥ ९ ॥ लोकलाजे सर्व लौकिकचि केला । देव दुरावला वरपणें[3] ॥ १० ॥ वरपणें देव कदा सांपडेना । निष्ठेचा घडेना भक्तिभाव ॥ ११ ॥ भक्ति ते मायेची भाव तो जायाचा । कर्म लौकिकाचा खटाटोप ॥ १२ ॥ खटाटोपें देव कदा पाविजेना । निश्चय घडेना शाश्वताचा ॥ १३ ॥ शाश्वताचा शोध अंतरीं असतां । सर्व कांहीं पहातां निरर्थक ॥ १४ ॥ निरर्थक तीर्थें निरर्थक व्रतें । दास म्हणे जेथें ज्ञान नाहीं ॥ १५ ॥

१३७ अनंताचा अंत पहावया गेलों । तेणें विसरलों आपणासीं ॥१॥ आपणा आपण पहातां दिसेना । रूप गवसेना दोहींकडे ॥ २ ॥ दोहीं-कडे देव आपणचि आहे । संग हा न साहे माझा मज ॥ ३ ॥ माझा मज भार जाहला बहुत । देखत देखत कळों आला ॥ ४ ॥ कळों आला भार पाहिला विचार । पुढें सारासार विचारणा ॥ ५ ॥ विचारणा जाली रामीरामदासीं । सर्वहि संगासि मुक्त केली ॥ ६ ॥ मुक्त केली मोक्षा मुक्तीची उपेक्षा । तुटली अपेक्षा कोणीएक ॥ ७ ॥

१३८ पहिले प्रथम. मूळीं परब्रह्म । व्यापक सूक्षम जेथें तेथें ॥ १ ॥ जेथें तेथें वस्तू आहे निराकार । शुद्ध व्योमाकार प्रगटित ॥ २ ॥ प्रगटित

१ नवविधा भक्तीनें चतुर्विधा मुक्ति. २ भ्रम, मूळमाया. ३ वरपंगपणें, बाह्यात्कारें.

असे दिसेना ना भासे । विचार विलसे ज्ञानियासी ॥ ३ ॥ ज्ञानियासा ज्ञान कळे निरंजन । आणि जन वन सारिखेंचि ॥ ४ ॥ सारिखेंचि आहे देव ओळखतां । जेथें तेथें जातां देव भासे ॥ ५ ॥ देव भासे मनीं नित्य निरंतर । बाह्य अभ्यंतर व्यापुनियां ॥ ६ ॥ व्यापुनियां आहे सर्वांचे अंतरीं । अनुभवें हरी ओळखावा ॥ ७ ॥ ओळखावा परि ओळखतां न ये । म्हणोनि उपाये साधुसंग ॥ ८ ॥ साधुसंग धरी श्रवण विवरीं । सारासार करीं विचारणा ॥ ९ ॥ विचारणा करी देवा निर्गुणाची । आणि सगुणाची उपासना ॥ १० ॥ उपासना कर्म हो आधीं पाळावें । मग सांभाळावें ब्रह्मज्ञान ॥ ११ ॥ ब्रह्मज्ञान नसे तें जन आंधळें । सन्मार्गें पांगुळें क्रियाभ्रष्ट ॥ १२ ॥ क्रियाभ्रष्ट कर्मउपासनेविण । नेणतां निर्गुण सर्व मिथ्या ॥ १३ ॥ सर्व मिथ्या जंव ब्रह्मज्ञान नाहीं । क्रिया कर्म कांहीं सोडवीना ॥ १४ ॥ सोडवीना कर्म या कर्मापासोनी । भगवंतावांचोनी तारांबळी ॥ १५ ॥ तारांबळी जाली देवासि नेणतां । कर्मीं गुंडाळितां देव कैंचा ॥ १६ ॥ देव कैंचा भेटे कर्म उरे पुढें । संशयचि वाढे सर्वकाळ ॥ १७ ॥ सर्व काळ गेला संदेहीं पडतां । नित्य चोखाळितां कलिवर ॥ १८ ॥ कलिवर काय नित्य धूत गेला । लावितो कोणाला उपकार ॥ १९ ॥ उपकार कैंचा सेवक देहाचा । आणि कुटुंबाचा भारवाही ॥ २० ॥ भारवाही जाला देवासी चुकला । लौकिकचि केला जन्मवरी ॥ २१ ॥ जन्मवरी केलें अंतीं व्यर्थ गेलें । कासाविस जालें वायाविण ॥ २२ ॥ वायाविण काळ गेला कीं निर्फळ । कर्म हें सबळ सुटेना कीं ॥ २३ ॥ सुटेना कीं कर्म कोण सोडविता । सोडुनी अनंता कर्में केलीं ॥ २४ ॥ कर्में केलीं देह चालतां निर्मळ । खंगतां ओंगळ देह जाला ॥ २५ ॥ देह जाला क्षीण सदा हगवण । मृत्तिकेचा शीण कोण करी ॥ २६ ॥ कोण करी तेव्हां कर्माचें पाळण । जाली भणभण शरीराची ॥ २७ ॥ शरीराची जेव्हां जाली भणभण । तेव्हां नारायण भजों पाहे ॥ २८ ॥ भजों पाहे तेव्हां नारायण कैंचा । गेला अभाग्याचा व्यर्थ काळ ॥ २९ ॥ व्यर्थ काळ गेला देवा न भजतां । देह चोखाळितां चोखाळेना ॥ ३० ॥ चोखाळिला देहो वाढला संदेहो । अंतकाळीं पाहे दैन्यवाणा ॥ ३१ ॥ दैन्यवाणा पाहे देवा न भजतां । पाहा तुला आतां कोण सोडी ॥ ३२ ॥ कोण सोडी देव धुंडिल्यावांचुनी । म्हणोनी भजनीं सावधान ॥ ३३ ॥ सावधानपणें देवासि शोधावें । तेणेंचि साधावें परलोका ॥ ३४ ॥ परलोक साधे संतांचे संगती । चुके अधोगती गर्भवास ॥ ३५ ॥ गर्भवास चुके ज्ञान अभ्यासितां । वस्तुसि

पाहतां वस्तुरूप ॥ ३६ ॥ वस्तुरूप होणें विवेकाच्या गुणें । नित्य निरूपणें सारासार ॥ ३७ ॥ सारासार घडे असाराचा त्याग । योगिया निःसंग सहजचि ॥ ३८ ॥ सहजचि कर्मापासुनी सुटला । बोधें[1] निवटला परब्रह्मीं ॥ ३९ ॥ परब्रह्मीं हेतु लागतां अहेतु[2] । देहें देहातीतु रामदास ॥४०॥

२३९ कर्में चित्तशुद्धि होऊनियां गेली । मग उपार्जली उपासना ॥ १ ॥ उपासनामिसें देव ठाईं पडे । संदेहचि उडे एकसरा ॥ २ ॥ एकसरा पंथ सांपडे सुगम । जैसे विहंगम[3] फळावरी ॥ ३ ॥ फळावरी झड जातां अनायासीं । निर्फळ असोसी[4] वायांविण ॥ ४ ॥ वायांविण शीण कासया करावा । निर्फळ जाणावा संसार हा ॥ ५ ॥ संसाराचा सोस कर्मीं निजध्यास । तेणें जगदीश अंतरला ॥ ६ ॥ अंतरला देव अंतरों न द्यावा । विवेक पाहावा सज्जनांचा ॥ ७ ॥ सज्जनांचा योग सर्वांचा वियोग । आणि त्याचा त्याग चमत्कारें ॥ ८ ॥ चमत्कारें त्याग तत्त्वविवरणें । शीघ्रचि पावणें मोक्षपदीं ॥ ९ ॥ मोक्षपदीं ज्ञान रामदासीं जालें । बंधन तुटलें संशयाचें ॥ १० ॥

२४० संशयाचें कर्म संशयीं पडिलें । तें कोणें सोडिलें ज्ञानेंविण ॥१॥ ज्ञानेंविण देव कैंचा ठायीं पडे । अज्ञानें बापुडे गुंडाळले ॥ २ ॥ गुंडाळले सर्व लौकिकाकरितां । लौकिक पाहतां उद्धरेना ॥ ३ ॥ उद्धरेना लोक हे कोणी कोणासी । व्यर्थचि देवासी अंतरावें ॥ ४ ॥ अंतरावें व्हावें बहुतां आधीन । बहुतांचें मन राखवेना ॥ ५ ॥ राखवेना मन बहुतां जनाचें । आणि सज्जनाचें वर्म चुके ॥ ६ ॥ वर्म चुके कर्म आडवेंचि आलें । नाहीं वोळखिलें आत्मयासी ॥ ७ ॥ आत्मयासी जाणे तोचि एक भला । संसारीं सुटला विवेकानें ॥ ८ ॥ विवेकानें लाभ पावावा आपुला । लौकिकें देवाला सोडूं नये ॥ ९ ॥ सोडूं नये ज्ञान सगुणीं भजणें । भक्ति निवेदनें वोळखावी ॥ १० ॥ वोळखावी भक्ति सायुज्यता मुक्ती । येणें होय गती दास म्हणे ॥ ११ ॥

२४१ अस्थीचा[5] विटाळ होतां स्नान केलें । चुडे दांतवलें[6] कासयासी ॥ १ ॥ आचमन करावें शूद्राच्या विटाळें । हाटाचे[7] चौढाळे कोण जाणे

१ मिळाला. २ सर्व हेतु मावळतात. ३ पक्षी. 'देखे उत्प्लवनासरिसा पक्षी फळासि झोंबे जैसा' (ज्ञानेश्वरी ३-४१) ज्ञानमार्ग हा विहंगममार्ग व कर्ममार्ग हा पिपीलिकामार्ग. पहिल्यानें शीघ्रप्राप्ति, दुसऱ्यानें सावकाश गति. ४ खटपट. ५ हाडांचा. ६ हाडांचे चुडे गरीब मारवाडी वगैरे बाया हातांत घालतात व दात मुलाच्या गळ्यांत अडकवतात. ७ बाजाराच्या, चव्हाट्यावर गर्दीत.

॥ २ ॥ नदीचे प्रवाहा आंत पाहों नये । स्नान संध्या होये अग्रोदकीं[1] ॥ ३ ॥ ओले चर्मीं दूध होत आहे हिंग । स्वयंपाकीं सांग सेविताती ॥ ४ ॥ रामदास म्हणे हें कोणी न पाहे । देह मुळीं आहे विटाळाचा ॥५॥

२४२ विटाळाचा देह विटाळें वाढला । तुवां शुद्ध केला कोणे परी ॥ १ ॥ पातकाचा देह पातकें वाढला । विचारितां आला प्रत्ययासी ॥ २ ॥ अस्थीचा पंजर चर्में गुंडाळिला । विष्ठेनें भरला मळमूत्रें ॥ ३ ॥ जंत किडे ओक आंतडीं कातडीं । बाह्यात्कारीं वेडीं भादरलीं ॥ ४ ॥ भादरले केश मागुती निघती । पुन्हा भादरती लागवेगें ॥ ५ ॥ भादरिली डोयी[2] घेत प्रायश्चित्त । अपानीं घासीत मृत्तिकेसी ॥ ६ ॥ भादरिली डोई पळाला विटाळ । मागुता चांडाळ भादरितो ॥७॥ बरा शुद्ध केला पुन्हा पापी जाला । पुन्हा भादरिला सावकाश ॥ ८ ॥ सावकाश कांहीं विचार पहावा । जेणेंकरीं[3] देवा पाविजेतो ॥ ९ ॥ पाविजेतो देवा भक्ति निवेदनें । शुद्ध ब्रह्मज्ञानें रामदासीं ॥ १० ॥

२४३ पोट भरावया मांडिला उपास । जाला कासाविस रामाविणें ॥ १ ॥ राजा पहावया प्रजा धुंडाळितो । कासाविस होतो वाउगाचि ॥ २ ॥ द्रव्य साधावया निर्द्रव्याचा संग । तेथें कैंचें मग द्रव्य मिळे ॥३॥ ब्रह्म साधावया कर्मामागें गेला । तंव कर्में केला कासाविस ॥४॥ सुटिका व्हावया बंधनाचि केलें । तेणें तें सुटलें केविं घडे ॥ ५ ॥ केविं घडे दृढ रोगें आरोग्यता । कुपथ्यानें व्यथा वाढतसे ॥ ६ ॥ एका व्यथा एकीं औषध घेतलें । दास म्हणे जालें तयापरी ॥ ७ ॥

२४४ चित्त आहे कैसें मळिण तें कैसें । शुद्ध होतें कैसें विचारावें ॥ १ ॥ वैद्य ओळखीना रोगहि कळेना । औषध मिळेना प्रचीतीचें ॥२॥ अनुमानें देव अनुमानें भक्त । अनुमानें मुक्त अनुमानी ॥ ३ ॥ अनुमानें केलें अनुमानें कल्पिलें । निर्फळ जाहलें सर्व कांहीं ॥ ४ ॥ सर्व कांहीं बरें प्रचीत आलिया । दास म्हणे वायां अप्रचीती ॥ ५ ॥

२४५ प्रचीतीचा देव प्रचीतीचा भाव । करावा उपाव सप्रचीत ॥ १ ॥ प्रचीतीचा वैद्य प्रचीतीची मात्रा । प्रचीतीच्या मंत्रा पाठ कीजे ॥ २ ॥ प्रचीतीनें कोणीएक तें पाहावें । जन ओळखावे प्रचीतीनें ॥ ३ ॥ प्रचीतीनें इष्ट प्रचीतीनें मित्र । प्रचीतीनें सूत्र कोणीएक ॥ ४ ॥ कोणीएक काय प्रचीती उपाय । दास म्हणे सोय प्रचीतीची ॥ ५ ॥

२४६ प्रचीतीवेगळें मिथ्या सर्व कांहीं । निर्फळाचि पाहीं अप्रचीती ॥ १ ॥ अप्रचीती जेथ फळ कैंचें तेथ । निर्फळचि व्यर्थ कासाविस ॥२॥

---

१ वरच्या पाण्यांत. २ डोकें, मस्तक. ३ या हातांनीं.

प्रचीतीची रीज[1] जया अंगीं नसे। व्यर्थ हेंचि पिसें लोभाविणें ॥ ३ ॥ लोभाविणें लाभ मानिला सुलभ । लाभ नाहीं क्षोभ प्रगटला ॥ ४ ॥ प्रगटला लोभ केलें निरर्थक । प्रचीती सार्थक दास म्हणे ॥ ५ ॥

२४७ होते आठवण तेंचि अंतःकरण। आतां सावधान मन ऐका॥१॥ संकल्प विकल्प होय नव्हे वाटे । तेंचि मन खोटें काल्पनिक ॥ २ ॥ होय नव्हे ऐसा अनुमान जाला । निश्चयचि केला तेचि बुद्धी ॥ ३ ॥ निश्चयचि केला तयाचें चिंतन । तेंचि चित्त जाण निश्चयेंसी ॥ ४ ॥ अहंकारासवें देह चालताहे। दास म्हणे पाहें अनुभवें ॥ ५ ॥

२४८ करावें तें काय तेणें होतें काय। अनुमानें काय प्रत्यय होतो ॥१॥ प्रत्यय होतो काय ऐसेंहि कळेना। न ये अनुमाना सर्व कांहीं ॥२॥ सर्व कांहीं एका आत्मज्ञानाविण । दिसताहे शीण वाउगाचि ॥ ३ ॥ वाउगाचि लाभ प्रचीतीविगळा। उगाचि आगळा दिसताहे ॥ ४ ॥ दिसताहे फळ लोकचि म्हणती। आपुले प्रचीती कांहीं नाहीं ॥ ५ ॥ कांहीं नाहीं पूर्वजन्मींचें स्मरण । होय विस्मरण सर्व कांहीं ॥ ६ ॥ सर्व कांहीं मागें जाहलें कळेना। म्हणोनि फळेना केलें कर्म ॥ ७ ॥ केलें कर्म कोणें कोणासि पुसावें। अनुमानें व्हावें कासाविस ॥ ८ ॥ कासाविस जाला कर्में जाजावला । व्यर्थ श्रम गेला अंतकाळीं ॥ ९ ॥ अंतकाळीं गेला सर्व सोडूनियां। भ्रमला प्राणिया विस्मरणें॥१०॥ विस्मरणें जाय सद्गुरु करितां। दास म्हणे आतां गुरु करीं॥ ११ ॥

२४९ प्रत्ययाचें ज्ञान तेंचि तें प्रमाण। येर अप्रमाण सर्व कांहीं ॥ १ ॥ सर्व कांहीं धर्म आणि कर्माकर्म। चुकलियां वर्म व्यर्थ जाती ॥ २ ॥ व्यर्थ जाती जन्म ज्ञानावांचूनियां। केले कष्ट वायां निरर्थक ॥ ३ ॥ निरर्थक जन्म पशूचिया परी। जंव तें अंतरीं ज्ञान नव्हे ॥ ४ ॥ ज्ञान नव्हे सोपें तें आधीं पहावें। शाश्वत शोधावें दास म्हणे ॥ ५ ॥

२५० आई[2]आधीं पुरुष हेंचि विचारावें। आपुलें करावें समाधान ॥१॥ समाधान होय देव देखिलिया। देवाविण वायां शिणों नये ॥ २ ॥ शिणों नये देव असोनि सर्वत्र। हें तों देहयंत्र नाशिवंत ॥ ३ ॥ नाशिवंत देहो नाहीं त्या संदेहो। दास म्हणे पाहा हो परब्रह्म ॥ ४ ॥

२५१ ज्याचें नाम घेसी तेंचि तूं आहेसी । पाहें आपणासि शोधोनियां ॥ १ ॥ शोधितां शोधितां मीपणाचि नाहीं। मीपणाचें पाहीं मूळ बरें ॥ २ ॥ मूळ बरें पाहीं न रानीं[3] या राहा । आहां तैसे आहां सर्वगत ॥३॥ सर्वगत आत्मा तोचि तूं परमात्मा। दास अहमात्मा सांगतसे ॥४॥

१ समाधानसुख, रीझ (रिझणें). २ आई, मूळमाया. ३ संसार-अरण्यांत.

२५२ सर्वांहूनि थोर देव निराकार। मग हा विस्तार विस्तारला ॥१॥ विस्तारिला जन त्वां नानापरींचा। निर्गुण पूर्वींचा देव आहे ॥ २ ॥ देव आहे सत्य येर हें असत्य। जाणितल्या नित्य विचारणा ॥ ३ ॥ विचारणा करीं धुंडीं नानापरी। दास म्हणे तरी तरसील ॥ ४ ॥

२५३ पतित म्हणिजे वेगळा पडिला। पावन तो जाला एकरूप ॥ १ ॥ एकरूप देव अरूप ठाईचा। तेथें दुजा कैंचा कोण आहे ॥ २ ॥ कोण आहे दुजा स्वरूपीं पहातां। विचारें राहतां सुख आहे ॥ ३ ॥ सुख आहे मूळ आपुलें शोधितां। मनासि बोधितां रामदास ॥ ४ ॥

२५४ तुकाई यमाई नमूं चंडाबाई। जाखाई जोखाई सटवाई ते ॥ १ ॥ सटवाई जगदंबा आदिशक्ति अंबा। तुम्हीं त्या स्वयंभा[1] दाखवावें ॥ २ ॥ दाखवावें तुम्हीं सर्वपैलीकडे[2]। देखतांचि घडे मोक्षपद ॥ ३ ॥ मोक्षपद घडे मोक्षासि पाहतां। तद्रूपचि होतां दास म्हणे ॥ ४ ॥

२५५ नमूं रामकृष्णा आदिनारायणा। तुम्हीं त्या निर्गुणा दाखवावें ॥ १ ॥ दाखवावें निजस्वरूप आपुलें। दिसेनासें जालें काय करूं ॥ २ ॥ काय करूं आतां देवा नरहरी। पुढारी माझारी पांडुरंगा ॥ ३ ॥ पांडुरंगा देवा अगा महादेवा। तुम्हीं मज द्यावा ठाव ब्रह्मीं ॥ ४ ॥ ब्रह्मीं ब्रह्मरूप तें मज करावें। रामदास भावें प्रार्थितसे ॥ ५ ॥

२५६ सूर्यनारायणा देवा नमस्कार। तुवां निराकार दाखवावें ॥ १ ॥ दाखवून द्यावें निजें[3] जीववावें। चंद्रा तुज भावें प्रार्थितसें ॥ २ ॥ प्रार्थितसें मही आणि अंतरिक्षा। आम्हां त्या अलक्षा लक्षवावें ॥ ३ ॥ लक्षवावें मज आपोनारायणें। ब्रह्मप्राप्ति जेणें तें करावें ॥ ४ ॥ करावें सनाथ आजि प्रभंजनें[4]। नक्षत्रें वरुणें[5] दास म्हणे ॥ ५ ॥

२५७ तुम्हीं सर्व देवीं मिळोनी पावावें। मज वेगीं न्यावें परब्रह्मीं ॥ १ ॥ परब्रह्मीं न्यावें संतअनुभवें। मज या वैभवें चाड नाहीं ॥ २ ॥ चाड नाहीं एका निर्गुणावांचुनी। माझे ध्यानीं मनीं निरंजन ॥ ३ ॥ निरंजन माझा मज भेटवावा। तेणें होय जीवा समाधान ॥ ४ ॥ समाधान माझें करा गा सर्वहो। तुम्हांसि देहें हो विसरेना ॥ ५ ॥ विसरेना देहो चालतो तंवरी। बाह्य अभ्यंतरीं दास म्हणे ॥ ६ ॥

२५८ तूं काय झालासि अगा निरंजना। आम्हां भक्तजनां सांभाळावें ॥ १ ॥ सांभाळावें सदा सबाह्याभ्यंतरीं। आम्हां क्षणभरी सोडूं नको ॥ २ ॥ सोडूं नको वायां गुप्त कां झालासी। देवा देखलासि संत-

---

१ स्वयंभू स्वरूप. २ सर्वांपलीकडील वस्तु. ३ आपल्या भक्तास. ४ वायूनें. ५ उदकदेवानें.

संगें ॥ ३ ॥ संतसंगें गुप्त होऊनि पाहिला । संगत्याग जाला दर्शनेंचि ॥ ४ ॥ दर्शन जाहलें तेंचि तें जाणलें । नसोनि असलें कल्पकोडी ॥ ५ ॥ कल्पकोडी जोडी झाली निर्गुणाची । दास म्हणे कैंची देहबुद्धी ॥ ६ ॥

२५९ देवेंविण आतां मज कंठवेना । कृपाळु तो नाना ठाईं वसे ॥ १ ॥ नाना ठाईं देव आहे जेथें तेथें । तयाविण रितें स्थळ नाहीं ॥ २ ॥ स्थळ नाहीं रितें ब्रह्म तें पुरतें । जेथें जावें तेथें मागें पुढें ॥ ३ ॥ मागें पुढें ब्रह्म सर्वत्र व्यापक । दास तो निःशंक तेणें गुणें ॥ ४ ॥

२६० देव निर्विकार त्या नाहीं आकार । तरी हा विस्तार कोणें केला ॥ १ ॥ कोणें केला ऐसा शोधुनी पाहावें । पाहोनी रहावें समाधानें ॥२॥ समाधान घडे विचार पाहतां । बुझोनी राहतां सर्वकाळ ॥ ३ ॥ सर्वकाळ पूर्वपक्ष हो सिद्धांत । वेदांत धादांत सप्रचीती ॥ ४ ॥ सप्रचीती तरी विकारीं विकार । देव निर्विकार जैसा तैसा ॥ ५ ॥ जैसा तैसा आहे विवेक पहावा । पडों नये गोंवा[1] दास म्हणे ॥ ६ ॥

२६१ नमूं वेदमाता जे कां सर्वसत्ता । ब्रह्मज्ञान आतां बोलूं कांहीं ॥ १ ॥ बोलूं कांहीं ब्रह्म जेणें तुटे भ्रम । आणि सुखें वर्म ठायीं पडे ॥ २ ॥ ठायीं पडे देव आणि भावाभाव । प्रकृतिस्वभाव सर्व कांहीं ॥ ३ ॥ सर्व कांहीं कळे संदेह मावळे । अंतर निवळे साधकाचें ॥ ४ ॥ साधकाचें हित होय निरूपणें । श्रवणमननें दास म्हणे ॥ ५ ॥

२६२ श्रवण करावें जें तें ब्रह्मज्ञान । ज्ञानेंविण शीण कामा नये ॥ १ ॥ कामा नये येथें सारासार नाहीं । कथेच्या प्रवाहीं कोण साध्य ॥ २ ॥ साध्य तेंचि घ्यावें येर तें सोडावें । विचाराचे नांवें जेथें शून्य ॥ ३ ॥ जेथें शून्य ज्ञान सर्व अनुमान । अनुमानें धन्य होइजेना ॥ ४ ॥ होइजेना धन्य निरंजनेंविण । रामदास खुण सांगतसे ॥ ५ ॥

२६३ राम कैसा आहे हें आधीं पाहावें । मग सुखेनैव दास्य करूं ॥ १ ॥ दास्य करूं जन देव वोळखोन । देवासि चुकोन दास्य कैसें ॥ २ ॥ दास्य कैसें घडे देवासि नेणतां । वाउगें श्रमतां शीण उरे ॥ ३ ॥ शीण उरे साध्य तें कांहीं साधेना । अंतरीं वसेना समाधान ॥ ४ ॥ समाधान देव पाहतां घडेल । येर विघडेल रामदास्य ॥ ५ ॥

२६४ शोधुनी पाहावें देवऋषिमूळ । निर्माण सकळ कोठुनीयां ॥ १ ॥ कोठुनीयां जाली सर्व ही उपाधी । वरी घ्यावी शुद्धी शाश्वताची ॥ २ ॥ शाश्वताची शुद्धी घेतां दृढ बुद्धी । होवोनि समाधी हातीं चढे

---

१ गोंधळ, गुंता.

॥ ३ ॥ हातीं चढे सर्व वेदशास्त्रबीज । मुख्य गुह्य गुज योगियांचें ॥ ४ ॥ योगियांचें गुज सहजींसहज । दास म्हणे निज ठायीं पडे ॥ ५ ॥

२६५ देव तो कळेना राहिला चुकोनी । संसारा येउनी काय केलें ॥ १ ॥ काय केलें बापा आपुलें अनहित । देखतदेखत चुकलासी ॥ २ ॥ चुकलासी धनी या भूमंडळींचा । सर्वही देवांचा मुख्य देव ॥ ३ ॥ मुख्य देव आहे तो तुज कळेना । शाहाणा आपणा म्हणविसी ॥ ४ ॥ म्हणविसी परी दसऱ्याचें सोनें । उणें कोटिगुणें दास म्हणे ॥ ५ ॥

२६६ शाहणे दिसतां ब्रह्मज्ञानेंविण । संसाराचा शीण करोनियां ॥१॥ करोनि संसार रात्रंदिवस धंदा । कैसे हो गोविंदा चुकलेती ॥ २ ॥ चुकलेती वायां तुम्ही कां बंधे हो । अंतरीं संदेहो जन्मवरी ॥ ३ ॥ जन्मवरी वोझें वाहिलें वाउगें । व्यर्थ कामरंगें रंगोनियां ॥ ४ ॥ रंगोनियां कामीं अंतरावें रामीं । दास म्हणे ऊर्मी कामा न ये ॥ ५ ॥

२६७ नवस पुरवी तो देव पूजिला । लोभालागीं जाला कासाविस ॥ १ ॥ कासाविस जाला प्रपंचाकरितां । सर्वकाळ चिंता प्रपंचाची ॥२॥ प्रपंचाची चिंता करिताचि मेला । तो काय देवाला उपकार ॥ ३ ॥ उपकार केला पूर्वजांलागुनी । ते गेले मरोनी पाहतसे ॥ ४ ॥ पाहतसे पुढें आपणाचि मेला । देवासि चुकला दास म्हणे ॥ ५ ॥

२६८ लोभ नवसांचा तो देव बद्धाचा । आणि मुमुक्षूचा गुरु देव ॥१॥ गुरु देव जाण तया मुमुक्षचा । देव साधकाचा निरंजन ॥ २ ॥ निरंजन देव साधकाचे मनीं । सिद्ध समाधानी देवरूप ॥ ३ ॥ देवरूप जाला संदेह तुटला । तोचि एक भला भूमंडळीं ॥ ४ ॥ भूमंडळीं रामदास धन्य आहे । अनन्यता पाहे शोधोनियां ॥ ५ ॥

२६९ तुजला तूं थोर मजला मी थोर । तूं थोर मी थोर कामा न ये ॥ १ ॥ कामा नये कोणालागीं मीतूंपण । पहा थोरपण ईश्वराचें ॥ २ ॥ ईश्वराचें रूप पहातां निवावें । मीतूंपणा जावें सांडूनियां ॥ ३ ॥ सांडूनियां जाय तें काय आपणा । शाश्वताच्या खुणा पाहें बापा ॥ ४ ॥ पाहें बापा देव कोण निरावेव । दास म्हणे भाव तेथें ठेवीं ॥ ५ ॥

२७० भाविला न जाये तेथें भाव ठेवीं । परि हो गोसावी सांगतसों ॥१॥ सांगतसों परि न ये अनुमाना । हें कांहीं कळेना आम्हांलागीं ॥२॥ आम्हांलागीं कळे तें कांहीं सांगा हो । गोसावी आहां हो भले तुम्ही ॥ ३ ॥ भले तुम्ही आहां मज उमजावें । उकलुनी द्यावें सर्व कांहीं ॥ ४ ॥ सर्व कांहीं कळे सद्गुरु करितां । दास म्हणे आतां गुरु करीं ॥ ५ ॥

२७१ गुरूविण प्राणी त्या होय जाचणी। सत्य माझी वाणी मिथ्या नव्हे ॥ १ ॥ मिथ्या नव्हे सत्य सांगतों तुम्हांला। अंतीं यमघाला चुकेना कीं ॥ २ ॥ चुकेना कीं यमयातना या जना। वेगीं निरंजना ठायीं पाडा ॥ ३ ॥ ठायीं पाडा वेगीं देव निरंजन। लावा तनमन सद्गुरूसी ॥ ४ ॥ सद्गुरूसी नाहीं जयाला वोळखी। तया झोकाझोकी यातनेची ॥ ५ ॥ यातनेची चिंता तुटे एकसरीं। वेगीं गुरु करीं दास म्हणे ॥ ६ ॥

२७२ ज्याचेनि जितोसि[1] त्यासी चुकलासी। व्यर्थचि झालासि भूमिभार ॥ १ ॥ भूमिभार जिणें तुझें गुरूविणें। वचनें प्रमाणें जाण बापा ॥२॥ जाणें तूं हे गती गुरूविण नाहीं। पडसी प्रवाहीं मायाजाळीं ॥ ३ ॥ मायाजाळीं वायां गुंतलासि मूढा। जन्मवरी वोढा तडातोडी ॥ ४ ॥ कांहीं तडातोडी कांहीं देव जोडी। आयुष्याची घडी ऐसी वेंचीं ॥ ५ ॥ ऐसी वेंची बापा आपुली वयसा। दास म्हणे ऐशा काळीं घाली ॥ ६ ॥

२७३ सर्व काळ गेला संसार करितां। तरी सार्थकता कैसी होय ॥ १ ॥ कैसी घडे मुक्ति कैसी घडे भक्ती। म्हणोनियां चित्तीं गोष्टी धरीं ॥ २ ॥ गोष्टी धरीं मनीं स्वहितालागुनी। बैसा देवध्यानीं क्षण एक ॥३॥ क्षण एक गेला सुखाचा बोलतां। तेणें कांहीं चिंता वोसरेल[2] ॥ ४ ॥ वोसरल चिंता संसाराची माया। भजा रामराया दास म्हणे ॥ ५ ॥

२७४ प्रपंचीं असोनि परमार्थ करावा। बरा विवरावा निरंजन ॥१॥ निरंजन देव प्रगटे अंतरीं। मग भरोवरी[3] करीना कां ॥ २ ॥ करीना कां परि संसार बाधीना। परि तो साधेना काय करूं ॥ ३ ॥ काय करूं देवा लौकिका उपाय। धरवेना सोय शाश्वताची ॥ ४ ॥ शाश्वताची सोय समाधान होय। मोक्षाचा उपाय सद्गुरुचि ॥ ५ ॥ सद्गुरूची गती चुके अधोगती। दास म्हणे मती पालटावी ॥ ६ ॥

२७५ संसार करावा सुखें यथासांग। परि संतसंग मनीं धरा ॥ १ ॥ मनीं धरा संतसंगति-विचार। येणें पैलपार पाविजेतो ॥ २ ॥ पाविजेतो याची प्रचीती पाहावी। निरूपणीं व्हावी अतिप्रीती ॥ ३ ॥ अतिप्रीती तुम्ही निरूपणीं धरा। संसारीं उद्धरा असोनियां ॥ ४ ॥ असोनियां नाहीं हे माया सर्वही। विवंचूनि पाहीं दास म्हणे ॥ ५ ॥

२७६ करूनि अकर्ते होऊनियां गेले। तेणें पंथें चाले तोचि धन्य ॥ १ ॥ तोचि धन्य जनीं पूर्ण समाधानी। जनीं आणि वनीं सारिखाचि ॥ २ ॥ सारिखाचि जेथें तेथें पालटेना। न ये अनुमाना कोणी एका

१ जगला आहेस. २ कमी होईल. ३ श्रम, खटपट.

॥ ३ ॥ कोणीएक लोक देहासि पाहाती । अंतरींची गती कोण जाणे ॥ ४ ॥ कोण जाणे काय पर[1]ावे मनींचें । जनास जनींचें कळतसे ॥ ५ ॥ कळतसे परी अंतरीं शोधावें । मनासि बोधावें दास म्हणे ॥ ६ ॥

२७७ समाधान व्हावें विवेकें पाहावें । वायूच्या स्वभावें सर्व कांहीं ॥ १ ॥ सर्व कांहीं घडे वायूचकरितां । वायु पाहों जातां आढळेना ॥ २ ॥ आढळेना वायु आकाशीं विराला । कर्ता काय जाला अंतरींचा ॥ ३ ॥ अंतरींचा सर्व विवेकें पाहतां । ब्रह्मरूप आतां सहजचि ॥ ४ ॥ सहजचि जालें विचारानें केलें । माणूस पाहिलें शोधुनियां ॥ ५ ॥ शोधुनियां जीतें[2] माणुस पाहावें । वर्म पडे ठावें दास म्हणे ॥ ६ ॥

२७८ शरीराचीं तत्वें तत्वांचें शरीर । पाहावा विस्तार विस्तारूनि ॥ १ ॥ विस्तारुनी गुंती तत्वांची मांडणी । सिद्धांतें जाणोनी आरंभावी ॥ २ ॥ आरंभितां तत्वें तत्व वेगळालें । मीपण गळालें विवेकानें ॥ ३ ॥ विवेकें पाहतां कोणीच नाढळे । समजतां कळे सर्व कांहीं ॥ ४ ॥ सर्व कांहीं लाभ होतो निरूपणें । श्रवणमननें दास म्हणे ॥ ५ ॥

२७९ माणसाचें ब्रह्म शोधितां होईल । प्रचीत येईल रोकडीच ॥ १ ॥ रोकडी प्रचिती होती गुरुमुखें । फुका सर्व सुखें हाता येती ॥ २ ॥ हाता येती बीजें सज्जनाच्या गुजें । प्रचितीच्या भोजें[3] आनंदला ॥ ३ ॥ आनंदला प्राणी सद्गुरु सेवितां । क्षुधार्थी जेवितां जेविं तृप्त ॥ ४ ॥ तृप्त जाली बुद्धि निर्गुणाची शुद्धी[4] । लागली समाधी रामदासा ॥ ५ ॥

२८० आतां कांहीं बोलों धालों तृप्त जालों । विवेकें राहिलों परब्रह्मीं ॥ १ ॥ परब्रह्मीं जातां ब्रह्मचि तत्वता । विचारें पाहतां आपणचि ॥ २ ॥ आपणचि असे कोणीहि न दिसे । संसाराचें पिसें वाव जालें[5] ॥ ३ ॥ वाव जालें भय सर्व संसारींचें । लाधलें हरीचें निजधाम ॥ ४ ॥ निजधाम बोधें विवेकें पाहावें । दास जीवेंभावें सांगतसे ॥ ५ ॥

२८१ आकाराचें सुख निराकारा न ये । निराकारीं काये पाहसील ॥ १ ॥ पाहसील सुख सुखामागें दुःख । शोक अवश्यक अंगीं वाजे ॥ २ ॥ अंगीं वाजे[6] शोक एखादिये वेळीं । सुख सर्वकाळीं सगुणाचें ॥ ३ ॥ सगुणाचें सुख नासोनि जाईल । सगुण होईल नाहीं ऐसें ॥ ४ ॥ नाहीं ऐसें एक निर्गुण दिसतें । रोकडेंचि तेथें कांहीं नाहीं ॥ ५ ॥ कांहीं नाहीं कैसें आहे घनदाट । सर्वांचें सेवट परब्रह्म ॥ ६ ॥ परब्रह्म परि पाहतां दिसेना । न ये अनुमाना कांहीं केल्या ॥ ७ ॥ कांहीं केल्या नोहे पाषा-

---

१ दुसऱ्याचे. २ जिवंत. ३ उल्हासानें. ४ शोधामुळें. ५ वेड व्यर्थ गेलें. ६ लागे.

णाचें सोनें । तैसें हें अज्ञानें जाणिजेना ॥ ८ ॥ जाणिजेना जनीं निज परब्रह्म । तंव कैंचा श्रम जाऊं पाहे ॥ ९ ॥ जाऊं पाहे मन ब्रह्मासि पहाया । तंव तेथें माया दिसताहे ॥ १० ॥ दिसताहे माया तंव निरूपासी । येरवीं मायेसी ठाव कैंचा ॥ ११ ॥ कैंचा ठाव तया मायांज्ञानियासी[1] । रामीरामदासी संतसंग ॥ १२ ॥

२८२ ऐसा कोण आहे मुकियाचा जाण । कळे वोळखण न सांगतां ॥ १ ॥ न सांगतां जाणे अंतरींचा हेत । पुरवी आरंत[2] सर्व कांहीं ॥ २ ॥ सर्व कांहीं जाणे चतुराचा राणा । धन्य नारायणा लीला तुझी ॥ ३ ॥ लीला तुझी जाणे ऐसा कोण आहे । विरंची[3] तो राहे चाकटला[4] ॥ ४ ॥ चाकटला मनु देवासि पाहतां । दास म्हणे आतां हद्द जाली ॥ ५ ॥

२८३ स्वप्नीं देखिलें तें स्वप्नावरी गेलें । जागृतीनें केलें तेंचि खरें ॥१॥ तेंचि खरें होतें येर सर्व जातें । तैसें ज्ञानियातें संसारिक ॥ २ ॥ संसारमायेचा होईल विलय । वायां चिंता काय दास म्हणे ॥ ३ ॥

२८४ चिंता काय आतां स्वप्नींचे सुखाची । सर्व चाले तोंचि ब्रह्म दिसे ॥ १ ॥ बरें दिसे तरी ज्ञाते न मानिती । दास म्हणे चित्तीं पालटेना ॥२॥

२८५ देव निराकार त्या नाहीं आकार । आकारसंहार होत आहे ॥ १ ॥ होत आहे जें जें सर्वहि जाणारें । जाणारें होणारें सर्व माया ॥ २ ॥ सर्व माया दिसे हें पंचभूतिक । आत्मा आहे एक निरंजन ॥ ३ ॥ निरंजनीं जन वन कांहिं नसे । दृश्यभास भासे कल्पनेसी ॥ ४ ॥ कल्पनेसि भासे तें सर्व कल्पित । कल्पनेरहित परब्रह्म ॥ ५ ॥ परब्रह्म नाहीं ऐसा ठाव कैंचा । धन्य तो दैवाचा आत्मज्ञानी ॥ ६ ॥ आत्मज्ञानी नर पाहे सारासार । पुढें तदाकार होत आहे ॥ ७ ॥ होत आहे जन्म सार्थक तयाचा । जेथें सज्जनाचा अनुग्रह ॥ ८ ॥ अनुग्रह घडे बहुतां सुकृतें । साक्षात्कार जेथें रोकडाचि ॥ ९ ॥ रोकडाचि मोक्ष साधूचे संगती । चुके अधोगती आत्मज्ञानें ॥ १० ॥ आत्मज्ञानें होतें आत्मनिवेदन । भक्तीचें लक्षण नवविधा ॥ ११ ॥ नवविधा भक्ति श्रवण करावी । धारणा धरावी श्रवणाची ॥१२॥ श्रवणाची स्थिति ब्रह्मनिरूपण । श्रवण मनन निजध्यास ॥ १३ ॥ निजध्यास निजवस्तूचा धरावा । विचार करावा आपुलाहि ॥ १४ ॥ आपुलाहि ठाव ज्ञानें होतो वाव । जाणते उपाव श्रवणाचे ॥ १५ ॥ श्रवणाचे भाव जाणते जाणती । तिनींची प्रचिती ऐक्यभाव ॥ १६ ॥ ऐक्यभाव देवभक्त नामांकित । अनन्य अनंत

---

१ मायेला जाणणाऱ्यास. २ इच्छा. ३ ब्रह्मदेव. ४ चमत्कारला.

जैसा तैसा ॥ १७ ॥ तैसा आहे लाभ श्रवणभक्तीचा । तेथें विभक्तीचा ठाव नाहीं ॥ १८ ॥ ठाव नाहीं ऐसें श्रवणें जाणावें । कीर्तन करावें हेंचि आतां ॥ १९ ॥ हेंचि हें कीर्तन नित्य निरंतर । ग्रंथाचें अंतर विवरावें ॥ २० ॥ विवरावें जेणें तोचि तो जाहला । रंक तो पावला राज्यपद ॥ २१ ॥ पदीं पद प्राप्त जालें संतसंगें । सद्भय अंतरंगें समाधान ॥ २२ ॥ समाधान जालें श्रवणकीर्तनें । रामाच्या स्मरणें चित्तशुद्धी ॥ २३ ॥ चित्तशुद्धी जाली तेणें तें धरावें । सेवन करावें सद्गुरूचें ॥ २४ ॥ सद्गुरु करावा तें पादसेवन । सद्गुरूनें ज्ञान होत आहे ॥ २५ ॥ होत आहे ज्ञान सद्गुरु करितां । होय सार्थकता गुरूचेनी ॥ २६ ॥ गुरूचेनि पदें लोक ठाईं पडे । सार तें निवडे प्रत्ययासी ॥ २७ ॥ प्रत्ययासी बोले तेंचि तें बोलणें । अर्चन करणें गुरुदेवा ॥ २८ ॥ गुरुदेवालागीं कीजे नमस्कार । साहावा विचार भक्ति ऐसी ॥ २९ ॥ सर्वदास्य कीजे ते भक्ति सातवी । सख्य ते आठवी भक्ति जाणा ॥ ३० ॥ नववीचें लक्षण आत्मनिवेदन । सर्वदा अभिन्न परब्रह्मीं ॥ ३१ ॥ परब्रह्म स्वयें आपणचि होणें । ऐसीं हीं लक्षणें सार्थकाचीं ॥३२॥ सार्थक भजन आत्मनिवेदन । विवेकें अभिन्न देवभक्त ॥ ३३ ॥ देव भक्त ऐसे हे आधीं पाहावे । स्थितीनें राहावें सर्वकाळ ॥ ३४ ॥ सर्वकाळ वस्तु आहे जैसी तैसी । देह प्रारब्धासि समर्पिला ॥ ३५ ॥ समर्पिला त्यासि होणार होईल । जाणार जाईल पंचभूत ॥ ३६ ॥ पंचभूत माया मायिक दिसते । होते आणि जाते स्वप्नाकार ॥ ३७ ॥ स्वप्नाकार माया आपण वेगळा । असोनि निराळा सर्वांमध्यें ॥३८॥ सर्वांमध्यें परि सर्वांबाह्य आहे । आहे तैसें आहे सदोदित ॥ ३९ ॥ सदोदित वस्तु तेंचि तें आपण । रामदास खुण सांगतसे ॥ ४० ॥

२८६ मृत्तिकेचा ऐसा करी नानापरी । मागुता टकारी नर्क तेथें ॥१॥ नर्क तेथें आहे कैसा हा काढावा । व्यर्थ वाढवावा लोकाचार ॥ २ ॥ लोकाचार केला लौकिकीं देखतां । अंतरीं शुद्धता आढळेना ॥ ३ ॥ आढळेना ज्ञान पूर्ण समाधान । सर्वदा बंधन संदेहाचें ॥ ४ ॥ संदेहाचें पाप जाला वज्रलेप । विचार निष्पाप रामदासीं ॥ ५ ॥

२८७ प्रपंचीं तें भाग्य परमार्थीं वैराग्य । दोनी यथासांग दोहींकडे ॥ १ ॥ दोहींकडे सांग होतां तो समर्थ । नाहीं तरी व्यर्थ तारंबळी ॥ २ ॥ तारंबळी होती विचार नसतां । दास म्हणे आतां सावधान ॥ ३ ॥

२८८ बंधाचा मुमुक्षें प्रबोध करावा । मग उद्धरावा ज्ञानमार्गें ॥ १ ॥ ज्ञानमार्गें द्यावें सत्य समाधान । तरी मग जन पाठीं लागे ॥ २ ॥ पाठीं लागे त्याचें अंतर जाणावें । आपुलें म्हणावें दास म्हणे ॥ ३ ॥

२८९ पतित हे जन करावें पावन । तेथें अनुमान करूं नये ॥ १ ॥ करूं नये गुणदोष-उठाठेवी । विवेकें लावावी बुद्धि जना ॥ २ ॥ बुद्धि सांगे जना त्या नांव सज्जन पतितपावन दास म्हणे ॥ ३ ॥

२९० महापापी लोक पूर्वींच आहेती । तेचि पालटती जयाचेनि ॥१॥ जयाचेनि योगें होतसे उपाय । तुटती अपाय नानाविध ॥ २ ॥ नानाविध जन सुबुद्धचि होती । साधूचे संगती दास म्हणे ॥ ३ ॥

२९१ लोखंडाचें सोनें परिसाचे योगें । साधूचेनि संगें बद्ध सिद्ध ॥१॥ बद्ध सिद्ध होती देखतदेखतां । होय सार्थकता तत्काळचि ॥२॥ तत्काळचि जाला वाला तो वाल्मीक । दास पुण्यश्लोक रामनामीं ॥ ३ ॥

२९२ पावन असतां पतित जालासि । सोय चुकलासि पावनाची ॥१॥ पावनाची सोय धरितां अंतरीं । स्वरूप विवरीं समाधान ॥ २ ॥ समाधान जालें केलें पावनानें । आत्मनिवेदनें दास म्हणे ॥ ३ ॥

२९३ आत्मनिवेदन नववें भजन । येणें संतजन समाधानी ॥ १ ॥ समाधानी संत आत्मनिवेदनें । मीतूंपण ज्ञानें सांडवलें ॥ २ ॥ सांडवलें सर्व माईक संगासी । रामीरामदासीं निःसंगता ॥ ३ ॥ निःसंगता जाली विवेकानें केली । मुक्ति ही लाधली सायुज्यता ॥ ४ ॥

२९४ आतांचि हे मुक्ति देहीं पाविजेना । तरी कां सज्जना शरण जावें ॥ १ ॥ शरण जातां भावें सज्जनचि व्हावें । शीघ्र उद्धरावें निरूपणें ॥ २ ॥ निरूपणें निजवस्तु ते सांपडे । गुज ठायीं पडे अकस्मात ॥३॥ अकस्मात ठाव न दिसे आपुला । निरंजनीं जाला निरंजन ॥ ४ ॥ निरंजन जाला ये जनीं असोनी । उन्मनीगिन्मनी[1] नाढळती ॥ ५ ॥ नाढळती तेथें कांहीं देहभाव । तत्वज्ञान वाव देहबुद्धी ॥ ६ ॥ देहबुद्धी गेली देखत देखतां । मी कोण हें आतां सांपडेना ॥ ७ ॥ सांपडेना शुद्धी मीपणें पाहतां । तें मीपण जातां वस्तुरूप ॥ ८ ॥ वस्तुरूप बोधें अरूप होईजे । विवेकाची कीजे विचारणा ॥ ९ ॥ विचारणा जाली रामीरामदासीं । आतां या जन्मासी ठाव नाहीं ॥ ९ ॥ ठाव नाहीं ऐसें राघवाचें देणें । थोराहुनि होणें थोर स्वयें ॥ १० ॥

२९५ माझें थोरपण देव वाखाणिती । ऐसी हे प्रचिती सिद्ध आतां ॥ १ ॥ सिद्ध आतां बोध देखतदेखतां । होय सार्थकता शीघ्रकाळें ॥२॥ शीघ्रकाळें काळ सर्व संहारिला । अनुभव आला रोकडाचि ॥ ३ ॥ रोकडाचि आतां तुम्हीं तरी पाहा । विवेकानें आहां काय नेणों ॥ ४ ॥

---

१ उन्मनी वगैरे अवस्था.

नेणों महिमान विवेकी जनाचें । होय सज्जनाचें मूळस्थान ॥ ५ ॥ मूळ-स्थान मूळ होईजे केवळ । कोण रे चांडाळ मिथ्या बोले ॥ ६ ॥ मिथ्या बोलवेना पाहा विवंचना । सिद्ध अनुमाना कैसी येते ॥ ७ ॥ कैसी येते आत्मप्रचीती आपण । मी तूं ऐसें कोण सांग बापा ॥ ८ ॥ सांग बापा मनीं बरें विचारुनी । तत्वाची झाडणी करुनीयां ॥ ९ ॥ करुनीयां पंची-करण विवरण । पुढें मीतूंपण कोठें आहे ॥ १० ॥ आहे तैसें आहे प्रत्यक्ष जाणावें । कोणासि म्हणावें काय आतां ॥ ११ ॥ काय आतां होतें बहु बोलोनियां । घेतलेंसे[१] जायां सर्व कांहीं ॥ १२ ॥ सर्व कांहीं ऐसें दृश्य जाईजणें । माझें मीच जाणें कोणा सांगों ॥ १३ ॥ कोणा सांगों आतां हें कोण घेईल । वायांचि जाईल अभिमानें ॥ १४ ॥ अभिमानें सत्य राम कोपताहे । सिद्धाचि न लाहे आत्मरूप ॥ १५ ॥ आत्मरूप स्वयें आपण नव्हिजे । तरि वायां कीजे रामदास्य ॥ १६ ॥

२९६ कदाकाळीं राम दासा उपेक्षीना । राम उपासना ऐसी आहे ॥ १ ॥ ऐसी आहे सार राघोबाची भक्ति । भक्तीची विभक्ति जेथें नाहीं ॥ २ ॥ जेथें नाहीं कांहीं वाउगें मायिक । रामउपासक दास म्हणे ॥ ३ ॥

२९७ मायिकाची भक्ति उधाराची मुक्ती । तैसी नाहीं स्थिति राघ-वाची ॥ १ ॥ राघवाची कृपा सध्या[२] मोक्षफळ । तुटे तळमळ चमत्कारें ॥ २ ॥ चमत्कार आतां जो कोणी पाहीना । त्याचा पंथ उणा कोटी-गुणें ॥ ३ ॥ कोटीगुणें उणें जिणें त्या नराचें । तेथें विचाराचें वोस घर ॥ ४ ॥ वोस घरीं कोण कासयासि धांवें । व्यर्थचि शिणावें कामाविण ॥ ५ ॥ कामाविण काम राहे आत्माराम । तेथेंचि विश्राम पाविजेल ॥ ६ ॥ पाविजेल परि विवरीत जावें । सर्वांहि सांडावें वोळखोनी ॥ ७ ॥ वोळखतां त्याग सर्वांचा घडेल । मार्ग सांपडेल योगियांचा ॥ ८ ॥ योगि-यांचा पंथ योगीच जाणती । तिन्हींची[३] प्रचिती एक जेथें ॥ ९ ॥ एक जेथें आत्माशास्त्रगुरुवाक्य । पाहें महावाक्य विवरुनी ॥ १० ॥ विवरुनी ब्रह्मीं ब्रह्म अहमस्मि । राम आहे रामीरामदास ॥ ११ ॥

२९८ सप्रचित वल्ली मिथ्या कोण करी । धन्य तो विवरी विवेकानें ॥ १ ॥ विवेकानें जन भेटतां संकट । त्याची खटपट सुखरूप ॥ २ ॥ सुखरूप संत सत्या साभिमानी । तयांसिच मनीं[४] येरां नाहीं ॥ ३ ॥ येरां नाहीं गति सत्यावांचुनियां । असत्याचे पायां कोण पडे ॥ ४ ॥ कोण पडे आतां संदेहाच्या डोहीं । कोणाविण नाहीं चाड आम्हां ॥ ५ ॥

१ जाण्यासाठीं. २ सद्यः, तात्काळ. ३ स्वतः, शास्त्र व गुरु यांची प्रचिती. ४ मान.

आम्हां नाहीं चाड ते कोणाएकाची। दृढ राघवाची कास धरूं ॥ ६ ॥ कास धरूं जेणें पावन हो केलें। तेथें जालें माझें समाधान ॥ ७ ॥ समाधान जालें प्रत्ययासि आलें। धन्य तीं पाउलें राघवाचीं ॥ ८ ॥ राघवाचीं पदें मानसीं धरीन। विश्व उद्धरीन हेळामात्रें[1] ॥ ९ ॥ हेळामात्रें मुक्त करीन हा जन। तरिच पावन राघवाचा ॥ १० ॥ राघवाचा दास मी जालों पावन। पतीत तें कोण उरों शके ॥ ११ ॥ उरों शके ऐसें कल्पांतीं घडेना। जो कोणी पुसेना त्यासि उणें ॥ १२ ॥ उणें न सांगतां माझ्या सूर्यवंशा। कोणाची दुराशा नाहीं आम्हां ॥ १३ ॥ नाहीं आम्हां उणें राघवाच्या गुणें। ब्रीदचि राखणें पावनाचें ॥ १४ ॥ पावनाचें बीज आम्हां प्राप्त जालें। प्रचीतीस आलें कांहींएक ॥ १५ ॥ तात्काळचि मोक्ष हें ब्रीद रामाचें। होत आहे साचें येणें काळें ॥ १६ ॥ कितीएक जन ज्ञानें उद्धरिले। कृतकृत्य जाले तात्काळचि ॥ १७ ॥ येणें काळें मोक्ष जरि मी देईन। दास म्हणवीन राघवाचा ॥ १८ ॥ राघवाचा वर पावलों सत्वर। जनाचा उद्धार करावया ॥ १९ ॥ कराया समर्थ राम सूर्यवंशी। मज कासयासी रोग आतां ॥ २० ॥ रोग जातां राग येईल समर्था। हे तों कांहीं सत्ता माझी एक ॥ २१ ॥ माझी सर्व सत्ता जानकीजीवना। आतां मी लेखीना ब्रह्मादिकां ॥ २२ ॥ ब्रह्मादिक मायें[2] जनकापासुनी। तयांसी व्यापुनी राम आहे ॥ २३ ॥ राम आहे जनीं राम आहे वनीं। राम निरंजनीं सारिखाचि ॥ २४ ॥ सारिखाचि राम सृष्टीं पाहों जातां। तोचि पाहा आतां निरंजन ॥ २५ ॥ निरंजन राम कां हो अंतरतां। मोहुनीयां जातां एकीकडे ॥ २६ ॥ एकीकडे जातां तेथें तोही राम। सांडोनियां काम बरें पाहा ॥ २७ ॥ बरें पाहा तुम्ही आतांचि पावाल। पावनचि व्हाल रामरूपें ॥ २८ ॥ रामरूपें सर्व रूपें निवारिलीं। असताचि जालीं नाहीं ऐसीं ॥ २९ ॥ नाहीं ऐसीं रूपें भिंती चित्राकार। तैसा हा आकार स्वप्न जैसा ॥ ३० ॥ स्वप्नींचा आकार कल्पनेसि भासे। रामरूप ऐसें निर्विकल्प ॥ ३१ ॥ निर्विकल्प राम कल्पितां होईजे। मिळोनी जाईजे रामरूपीं ॥ ३२ ॥ रामरूपीं सर्व साधन जाहलें। पावनचि केलें पावनानें ॥ ३३ ॥ पावन हो राम जो कोणी पावेल। रामचि होईल निजध्यासें ॥ ३४ ॥ निजध्यास निजवस्तूचा धरावा। श्रवण करावा साक्षात्कार ॥ ३५ ॥ साक्षात्कार होतां सत्य निर्गुणाचा। मग या गुणाचा पांग नाहीं ॥ ३६ ॥ पांग नाहीं ऐसें नेमस्त जाणावें। शीघ्रचि सुटावें संवसारीं ॥ ३७ ॥ संसारीं सुटिजे

१ लीळामात्रें. २ जगाचे मायबाप गणेशशारदा, शिवशक्ति.

संसार करितां । सर्वहि भोगितां भोगातीत ॥ ३८ ॥ भोगातीत जैसा श्रीकृष्ण दुर्वासा । आत्मज्ञानी ऐसा सर्वकाळ ॥ ३९ ॥ सर्वकाळ देहीं असतां विदेही । रामदासीं नाहीं जन्ममृत्यु ॥ ४० ॥

१९९ जाणे सुख दुःख राम माझा एक । येरें तीं मायिक वैभवाचीं ॥ १ ॥ वैभवाचीं सखीं वोरंगोनि[1] जाती । आत्माराम अंतीं जिवलग ॥२॥ जिवलग नाहीं श्रीरामावांचुनी । हाचि माझे मनीं दृढभाव ॥ ३ ॥ भाव अनन्याचा आहे वरपंगाचा[2] । रामेंविण कैंचा अंतरंग ॥ ४ ॥ अंतरींची व्यथा श्रीराम सर्वथा । जाणवल्या चिंता दूर करी ॥ ५ ॥ करितो प्रतिपाळ शरण आलियाचा । राम त्रैलोक्याचा मायबाप ॥ ६ ॥ माय बाप बंधु सज्जन सोयरा । एका रघुवीराविण नाहीं ॥ ७ ॥ नाहीं मज कोणी श्रीराम असतां । सत्वर बाहतां उडी घाली ॥ ८ ॥ उडी घाली मज अनाथाकारणें । राम सर्व जाणे अंतरींचें ॥ ९ ॥ अंतरींचें गुज राम सर्व बीज । रामदासीं निज प्रकटलें ॥ १० ॥

३०० छत्रसिंहासनीं अयोध्येचा राजा । नांदतसे माझा मायबाप ॥ १ ॥ माझा मायबाप त्रैलोक्यीं समर्थ । सर्व मनोरथ पूर्ण करी ॥ २ ॥ पूर्ण प्रतापाचा कैवारी देवाचा । नाथ अनाथाचा स्वामी माझा ॥ ३ ॥ स्वामी माझा राम योगियां विश्राम । सांपडलें वर्म थोर भाग्यें ॥ ४ ॥ थोर भाग्य त्याचें राम ज्याचे कुळीं । संकटीं सांभाळीं भावबळें ॥ ५ ॥ भावबळें जिहीं धरिला अंतरीं । तयां क्षणभरीं विसंबेना ॥ ६ ॥ विसंबेना कदा आपुल्या दासासी । रामीरामदासीं कुळस्वामी ॥ ७ ॥

३०१ सोडवी जो देव तोचि देवराव । येर सर्व नांव नाथिलेंचि[3] ॥ १ ॥ नाथिलेंचि नांव लोकांमध्यें पाहे । ठेविजेत आहे प्रतापाचें ॥ २ ॥ प्रतापाचें नांव एका राघवासी । रामीरामदासीं देवराव ॥ ३ ॥

३०२ पुण्याचें माहेर साधकाचें घर । बहुतांचें छत्र स्वामी माझा ॥ १ ॥ स्वामी माझा राम रायांचें मंडण । संसार खंडन महाभय ॥ २ ॥ महाभय कैंसें अभेदभक्तासी । रामीरामदासीं धन्य बोला ॥ ३ ॥

३०३ धन्य सूर्यवंश पुण्यपरायण । सर्वही सगुण समुदाय ॥ १ ॥ समुदाय काय सांगूं या रामाचा । अंतरीं कामाचा लेश नाहीं ॥ २ ॥ लेश नाहीं मनीं तया भरतासी । सर्वही राज्यासी त्यागियेलें ॥ ३ ॥ त्यागियेलें अन्न केलें उपोषण । धन्य लक्ष्मुमण ब्रह्मचारी ॥ ४ ॥ धन्य ब्रह्मचारी मारुती सेवक । श्रीरामीं सार्थक धन्य केलें ॥ ५ ॥ धन्य केला

---

१ टाकून. २ वरवर. ३ खोटें, मिथ्यां.

जन्म वाल्मीकि ऋषीनें । धन्य तीं वचनें भविष्याचीं ॥ ६ ॥ भविष्य पाहात धन्य बिभीषण । राघवीं शरण सर्वभावें ॥ ७ ॥ सर्वभावें रामीं सर्वही वानर । शरण अवतार विबुधांचे ॥ ८ ॥ विबुधमंडळीं[1] राम सर्व-गुण । अनन्यशरण रामदास ॥ ९ ॥

३०४ मनुष्याची आशा तेचि पैं निराशा । एका जगदीशा वांचूनीयां ॥ १ ॥ वांचूनीयां राम सर्वही विराम[2] । नव्हे पूर्ण काम रामेंविण ॥ २ ॥ रामेंविण नव्हे हे कोणी कोणाचे । सर्वही मायेचें जाइजणें[3] ॥ ३ ॥ जाइ-जणें ऐसें कोणासि नेणवे । वेळेसि जाणवे संकटींच्या ॥ ४ ॥ संकटाचे वेळे निजाचा[4] सांगाती । राम आदि अंतीं रामदासीं ॥ ५ ॥

३०५ काय ते करावे संपत्तीचे लोक । जानकीनायक जेथें नाहीं ॥१॥ जेथें नाहीं माझा श्रीराम समर्थ । त्याचें जिणें व्यर्थ कोटीगुणें ॥ २ ॥ कोटीगुणें उणें जिणें त्या नराचें । जानकीवराचें नाम नाहीं ॥ ३ ॥ नाम नाहीं मनीं नाहीं जो कीर्तनीं । तया कां जननी प्रसवली ॥ ४ ॥ प्रस-वली जरि जाला भूमिभार । दुस्तर संसार उल्लंघेना ॥ ५ ॥ उल्लंघेना एका रामनामावीण । रामदासीं खूण प्रेमभावें ॥ ६ ॥

३०६ दासाची संपत्ति राम सीतापती । जीवाचा सांगाती राम एक ॥ १ ॥ राम एक माता राम एक पिता । राम एक भ्राता सहोदर ॥ २ ॥ सहोदर विद्या वैभव कांचन । सर्वही स्वजन राम एक ॥ ३ ॥ राम एक स्वामी रामचि कैवारी । लाभ तो संसारीं राम एक ॥ ४ ॥ राम एक ज्ञान राम एक ध्यान । राम समाधान रामदासीं ॥ ५ ॥

३०७ अनाथांचा नाथ देव तो कैवारी । सिंहासनावरी शोभतसे ॥१॥ शोभतसे राम प्रतापी आगळा । दिसे सौम्य लीळा सत्वगुणी ॥ २ ॥ सत्वगुणी होय सात्विकांकारणें । कोपें संहारणें दुर्जनांसी ॥ ३ ॥ दुर्जना संहार सज्जना आधार । भाविकासी पार पाववितो ॥ ४ ॥ पाववितो पार या भवसिंधूचा । राघव दीनाचा दीनानाथ ॥ ५ ॥ दीनानाथ नाम पतितपावन । योगियां जीवन योगलीळा ॥ ६ ॥ लीळावेषधारी भक्तांचें माहेर । ध्यानीं गौरीहर चिंतीतसे ॥ ७ ॥ चिंतीतसे नाम राम पूर्णकाम पावला विश्राम रामनामें ॥ ८ ॥ रामनामीं हरु विश्रांती पावला । हें तों समस्तांला श्रुत आहे ॥ ९ ॥ श्रुत आहे व्योमयोगाचें मंडण । संसार-खंडण महाभय ॥ १० ॥ महाभय कैंचें रामासी भजतां । हें जाण अन्यथा वाक्य नोहे ॥ ११ ॥ नोहे सोडवण रामनामाविण । रामदास खुण सांगतसे ॥ १२ ॥

१ देवाच्या समुदायांत. २ शून्य. ३ जाणारें, नाशवंत. ४ स्वभक्तांचा.

३०८ रामाचें चरित्र सांगतां अपार । जाहला विस्तार तिहीं लोकीं ॥ १ ॥ तिहीं लोकीं हेंच वाहूनी[1] दिधलें । तें आम्हां लाधलें कांहींएक ॥ २ ॥ कांहींएक पुण्य होतें पूर्वजांचें । पापियासी कैंचें राम नाम ॥ ३ ॥ रामनामें कोटी कुळें उद्धरती । संशय धरिती तेचि पापी ॥ ४ ॥ पापियांचें पाप जाय एकसरी । जरि मनीं धरी राम नाम ॥ ५ ॥ राम नाम काशी शिव उपदेशी । आधार सर्वांसी सर्व जाणे ॥ ६ ॥ सर्व जाणे अंतीं रामनामें गती । आणि वेदश्रुती गर्जताती ॥ ७ ॥ गर्जती पुराणें आणि संतजन । करावें भजन राघवाचें ॥ ८ ॥ राघवाचें ध्यान आवडे कीर्तन । तोचि तो पावन लोकांमाजी ॥ ९ ॥ लोकांमाजी तरे आणि जना तारी । धन्य तो संसारीं दास म्हणे ॥ १० ॥

३०९ क्षण एक चित्तीं राम आठविती । तेणें उद्धरती कोटी कुळें ॥१॥ कोटी कुळें वाट पाहाती तयाची । आवडी जयाची रामनामीं ॥ २ ॥ रामनामें तुटे कुळाचें बंधन । पुत्र तो निधान हरिभक्त ॥ ३ ॥ हरिभक्त एक जन्मला प्रल्हाद । जयाचा गोविंद कइवारी ॥ ४ ॥ कइवारी हरी राखे नानापरी । ऐसा भाव धरीं आलिया रे ॥ ५ ॥ आलिया रे हित विचारीं आपुलें । सर्व नाथियेलें[2] मायाजाळ ॥ ६ ॥ मायाजाळ दिसे दृष्टीचें बंधन । जाणती सज्ञान अनुभवी ॥ ७ ॥ अनुभवी संत सज्जन देखसी । तेथें राघवासी ठाईं पाडी[3] ॥ ८ ॥ ठाईं पाडी राम जीवाचा विश्राम । जेणें सर्व काम पूर्ण होती ॥ ९ ॥ पूर्ण होती तुझे मनोरथ सर्व । राघवाचा भाव मनीं धरीं ॥ १० ॥ मनीं धरी सर्व देवाचा कैवारी । ध्यातसे अंतरीं महादेव ॥ ११ ॥ महादेव सर्वजनां उपदेसी । रामीरामदासीं दृढभाव ॥ १२ ॥

३१० सोपें सुगम हें नाम राघोबाचें । सर्वकाळ वाचे येऊं द्यावें ॥ १ ॥ क्षण एक राम हृदयीं धरिजे । तेणें तें पाविजे निजसुख ॥ २ ॥ येऊं द्यावें वाचे नाम निरंतर । तेणें हा संसार तरिजेल ॥ ३ ॥ तरिजेल रामीरामदास म्हणे । सावधान होणें रामनामीं ॥ ४ ॥

३११ प्रातःकाळ जाला राम आठवावा । हृदयीं धरावा क्षणएक ॥ १ ॥ क्षणएक राम हृदयीं धरिजे । संसारीं तरिजे हेळामात्रें ॥ २ ॥ हेळामात्रें रामनामें होय गती । भाग्यवंत घेती सर्वकाळ ॥ ३ ॥ सर्वकाळ राम मानसीं धरावा । वाचे उच्चारावा नामघोष ॥ ४ ॥ नामघोष वाचे श्रवण कीर्तन । चरणीं गमन देवालयीं ॥ ५ ॥ देवालयां जातां सार्थक जाहलें ।

---

१ बोलावून. २ मिथ्या. ३ आपलासा करून घे, ओळखून घे.

कारणीं लागलें कलेवर ॥ ६ ॥ कलेवर त्वचा जोडुनी हस्तक । ठेवावें मस्तक रामपायीं ॥ ७ ॥ रामपायीं शिळा जाली दिव्य बाळा । तैसाचि सोहळा मानवांसी ॥ ८ ॥ मानवांसी अंतीं रामनामें गती । सांगे उमापती महादेव ॥ ९ ॥ महादेव सांगे जप पार्वतीस । तोचि तो विश्वास रामदासीं ॥ १० ॥

३१२ विश्वासिला जेथें कैलासींचा राव । तेथें एक भाव दृढ धरीं ॥ १ ॥ दृढ धरीं भाव वाल्मीकाचे परी । सर्व ऋषीश्वरीं जाणिजेती ॥२॥ जाणिजे वाल्मीकऋषिरामायण । तारिले पाषाण रामनामें ॥ ३ ॥ रामनामें उद्धरिली ती गणिका । नेली दिव्यलोका येचि देहीं ॥ ४ ॥ येचि देहीं गती पावली कुंटणी । रामनाम वाणी उच्चारितां ॥ ५ ॥ उच्चारितां राम पूर्ण सर्व काम । संसारींचा श्रम दुरी जाय ॥ ६ ॥ दुरी जाय श्रम आनंद मानसीं । रामीरामदासीं दृढभाव ॥ ७ ॥

३१३ हरिभक्ती करी धन्य तो संसारीं । जयाचा कैवारी देवराणा ॥ १ ॥ देवराणा सदा सर्वदा मस्तकीं । तयासी या लोकीं चाॅड[1] नाहीं ॥ २ ॥ चाड नाहीं जनीं राघवाचा दास । सार्थक वेयस[2] रामदासीं ॥ ३ ॥

३१४ धन्य त्याचें कुळ धन्य त्याचा वंश । जे कुळीं हरिदास अवतरे ॥ १ ॥ धन्य ते जननी धन्य तेचि कुशी । जे हरिप्रियासी प्रसवली ॥ २ ॥ धन्य ते संबंधी संताचे सोयिरे । सत्संगें उद्धरे कुळ त्याचें ॥ ३ ॥ धन्य पैं तो ग्राम धन्य पैं तो देश । जेथें रहिवास वैष्णवाचा ॥ ४ ॥ धन्य त्याचें सख्य वैष्णवीं सर्वदा । ते संगें गोविंदा जिवलग ॥ ५ ॥ धन्य ते भाविक वंदिती हरिदासा । तया हृषिकेशा वंदितसे ॥ ६ ॥ धन्य ते निंदक निंदिती सज्जन । येणें भावें ध्यान घडे त्यांसी ॥ ७ ॥ धन्य दासी दास सज्जनसेवेसी । ते सुरवरांसी वंद्य होती ॥ ८ ॥ धन्य पशु श्वान वैष्णवांघरींचें । कळिकाळ त्यांचे पाय वंदी ॥ ९ ॥ रामदास म्हणे तरी धन्य होणें । जरि संग लाधणें वैष्णवांचा ॥ १० ॥

३१५ हरिभक्तीविण जाऊं नये क्षण । या नांव लक्षण सार्थकाचें ॥१॥ सार्थकाचें जिणें कथा निरूपणें । श्रवण मननें काळ गेला ॥ २ ॥ काळ गेला हरिभक्तीचेनि योगें । साधूचेनि संगें दास म्हणे ॥ ३ ॥

३१६ सुपुत्र संसारीं कुळाचें मंडण । वंश उद्धरण हरिभक्त ॥ १ ॥ भक्तीं तरतातीं बेचाळीस कुळें । भक्तीचेनि गुणें जगोद्धार ॥ २ ॥ जगोद्धार करी सुपुत्र संसारीं । येर अनाचारी पापरूप ॥ ३ ॥ पापरूपी नर

१ इच्छा, पर्वा. २ आयुष्य.

अभक्त जाणावे । तयांसी नेणवे देवराणा ॥ ४ ॥ देवराणा वळे देखो-
नियां भाव । दास म्हणे माव कामा नये ॥ ५ ॥

३१७ धाकुटाचि ध्रुरु तो नव्हे लेंकरूं । जया सर्वेश्वरू प्रगटला ॥ १ ॥
प्रगटला देव तया उपमन्या । भावार्थअनन्या[1] क्षीरसिंधू ॥ २ ॥ क्षीर-
सिंधुवासी स्वयें नारायण । प्रल्हाद रक्षण करितसे ॥ ३ ॥ करितो रक्षण
दासांसी संकटीं । त्याचें नाम कंठीं असों द्यावें ॥ ४ ॥ असों द्यावें सदा
देवाचें चिंतन । गजेंद्र पावन नामघोषें ॥ ५ ॥

३१८ आलिया देवासी वाट चुकलासी । म्हणोनि आळसी संवसारीं
॥ १ ॥ संसाराचे दुःखें करिसी रुदन । चुकलें भजन राघवाचें ॥ २ ॥ राघ-
वाची भक्ती नेणतां वित्पत्ती । तुज अधोगती जन्म जाला ॥ ३ ॥ जन्म
जाला परि वेगें सोय धरी । सत्वर संसारीं मोकळिक ॥ ४ ॥ मोकळिक
होय भक्तिपंथें जातां । वाक्य हें तत्वतां दास म्हणे ॥ ५ ॥

३१९ विषयरुदन[2] सोडुनियां द्यावें । नित्य नित्य जावें संतसंगें ॥ १ ॥
संतसंगें बापा होई रे निश्चळ । मग तळमळ विसरसी ॥ २ ॥ विसरसीं
दुःख संतांचे संगती । चुके अधोगती गर्भवास ॥ ३ ॥ गर्भवास आतां
चुकवीं आपुले । धरावीं पाउलें राघवाचीं ॥ ४ ॥ राघवाचे भक्त राघवीं
मिळती । भेटे सीतापती दास म्हणे ॥ ५ ॥

३२० माता पिता जन स्वजन कांचन । प्रिया पुत्रीं मन गोवूं नयें
॥ १ ॥ गोवूं नको मन राघवावांचुनी । लोकलाज जनीं लागलीसे ॥ २ ॥
लागलीसे परि तुवां न धरावी । स्वहितें करावी रामभक्ति ॥ ३ ॥ राम-
भक्तीविण होसील हिंपुटी[3] । येकलें सेवटीं जाणें लागे ॥ ४ ॥ जाणें लागे
आतां बाळा सुलक्षणा । ध्यायीं रामराणा दास म्हणे ॥ ५ ॥

३२१ माझे मनीं सर्व सुख व्हावें तुज । म्हणोनियां गुज सांगतसें ॥ १ ॥
सांगतसें हित तें जिवीं धरावें । भजन करावें राघोबाचें ॥ २ ॥ राघो-
बाचें प्रेम तें करी विश्राम । येर सर्व श्रम जाण बापा ॥ ३ ॥ जाण बापा
वचन हें माझें प्रमाण । वाहतसें आण राघवाची ॥ ४ ॥ राघवाची भक्ती
ते माझी विश्रांती । असों द्यावी चित्तीं दास म्हणे ॥ ५ ॥

३२२ राघवाचें नाम राखसील जरी । तुज राखे तरी रामराणा ॥ १ ॥
रामराणा माझे जिवींचें जीवन । आवडीनें खूण सांगतसे ॥ २ ॥ सांग-
तसें खूण माझे अंतरींची । सर्वही सुखाची सुखमूर्ती ॥ ३ ॥ सुखमूर्ती

---

१ अनन्य आहे भावार्थ ज्याचा, अशा उपमन्यूस. २ विषयसेवनाचें रडगाणें. ३ कष्टी.

राम सांडूं नको कदा । तुज तो आपदा लागों नेदी ॥ ४ ॥ लागों नेदी कष्ट आपुल्या दासासी । रामीरामदासीं साहाकारी[1] ॥ ५ ॥

३२३ रानीं मनीं वनीं राम असों द्यावा । करील कुडावा सेवकाचा ॥ १ ॥ सेवकाचा भार घेतसे साचार । म्हणोनि अंतर पडों नेदी ॥ २ ॥ पडों नेदी शब्द माझा भूमीवरी । दृढ चित्तीं धरी देवराणा ॥ ३ ॥ देवराणा सर्व देवां सोडविता । लागलीसे चिंता त्यास तुझी ॥ ४ ॥ तुझी चिंता करी राजा अयोध्येचा । कृपाळु दीनाचा दास म्हणे ॥ ५ ॥

३२४ कोणाचें हें घर कोणाचा संसार । सांडुनी शरीर जाणें लागे ॥ १ ॥ जाणें लागे अंतीं एकलें एकटें । व्यर्थ खटपटें जन्मवरी ॥ २ ॥ जन्मवरी देह संसारीं गोविलें । नाहीं कांहीं केलें आत्महित ॥ ३ ॥ आत्महित गेलें संसाराचे वोडी । अंतीं कोण सोडी रामाविण ॥ ४ ॥ रामाविण कोणी सोडवीना अंतीं । वायांचि रडती जिवलगें ॥ ५ ॥ जिवलग राम दूरि दुरावला । विचार आपुला जाणवेना ॥ ६ ॥ जाणवेना पूर्व सुकृतावांचुनी । पापियाचे मनीं राम कैंचा ॥ ७ ॥ राम कैंचा जया लौकिकाची चाड । पुरविती कोडें[3] संसाराचें ॥ ८ ॥ संसाराचें कोड तेंचि वाटे गोड । जया नाहीं चाड अनुतापीं ॥ ९ ॥ अनुतापें जाले संसारीं सुटले । राजे राज्य गेले सांडोनियां ॥ १० ॥ सांडोनियां गेले वैभवसंपत्ति । पुढें यातायातीचेनि भेणें[4] ॥ ११ ॥ भेणें ते शरण निघाले देवासी । गेले वैकुंठासी भक्तराज ॥ १२ ॥ भक्तराज भावें भेटले देवासी । रामीरामदासीं धन्य वेळ ॥ १३ ॥

३२५ आपुलीं पारखीं सर्व पारखिलीं[5] । नाहीं कामा आलीं रामाविणें ॥ १ ॥ रामाविणे जाण सर्वहि पिशुणें[6] । मायेचे कारणें नाथिलेंचि ॥ २ ॥ नाथिलेंचि आहे जनाचें सांजणें । तृणाचें तापणें तयापरी ॥ ३ ॥ तयापरी ऐसा निश्चय जाणावा । सतीचा बोलावा लोक आहे ॥ ४ ॥ लोक बहु रंग जाणुनी वोरंग । रामदासें संग सांडियेला ॥ ५ ॥

३२६ सुखाचे संगती सर्वही मिळती । दुःख होतां जाती निघोनियां ॥ १ ॥ निघोनियां जाती संकटाचे वेळे । सुख होतां मिळे समुदाय ॥ २ ॥ समुदाय सर्व देहाचे संबंधीं । तुटली उपाधी रामदासीं ॥ ३ ॥

३२७ मूर्ख तो संसारीं माझें माझें करी । मृत्यु बरोबरी हिंडतसे ॥ १ ॥ हिंडतसे काळ सांगाती सरिसा । मनीं भरंवसा नेणोनियां ॥ २ ॥ नेणो-

१ साह्यकर्ता. २ रक्षण. ३ चोज, कौतिक. ४ भयानें. ५ परीक्षून सोडलीं. ६ पिशुन दुर्जन. ७ सख्य.

नियां प्राणी संसारासी आला । आला तैसा गेला दैन्यवाणा ॥ ३ ॥ दैन्यवाणा गेला सर्वही सांडुनी । ठेविलें जोडुनी जनांलागीं ॥ ४ ॥ लागही[1] लागले दोषचि सुटेना । अभक्ति तुटेना अंतरींची ॥ ५ ॥ अंतरींची मूर्ति अंतरली द्वारीं । कदा काळीं हरी आठवीना ॥ ६ ॥ आठवीना अंतकाळीं रामाविण । धन्य तें मरण दास म्हणे ॥ ७ ॥

३२८ काया हे काळाची घेवोनि जाणार । तुजेनि होणार काय बापा ॥ १ ॥ काय बापा ऐसें जाणोनि नेणसी । मी मी म्हणतोसि वायांविणें[2] ॥ २ ॥ वायांविण शीण केला जन्मवरी । केली लोकाचारीं नागवण[3] ॥ ३ ॥ नागवण आली परलोका जातां । स्वहिताची चिंता केली नाहीं ॥ ४ ॥ केली नाहीं चिंता नामीं कानकोंडें[4] । अंतीं कोण्या तोंडें जात असे ॥ ५ ॥ जात असे सर्व सांडोनि करंटा । जन्मवरी ताठा धरूनियां ॥६॥ धरूनियां ताठा कासया मरावें । भजन करावें दास म्हणे ॥७॥

३२९ चंद्रासि उद्वेग सर्वकाळ मनीं । माझें पद कोणी घेईना[5] कीं ॥१॥ घेईना कीं कोणी बळिया दानव । घालीन कीं देव कारागृहीं ॥ २ ॥ कारागृह देवादिकांचें चुकेना । तेथें काय जना चुकवेल ॥ ३ ॥ चुकवेल भोग हे कांहीं घडावें । लागेल भोगावें केलें कर्म ॥ ४ ॥ केलें कर्म सुटे जरी भ्रांति फिटे । दास म्हणे भेटें संतजना ॥ ५ ॥

३३० रावणासारिखी कोणाची संपत्ति । तोहि गेला अंतीं एकलाचि ॥ १ ॥ एकलाचि गेला वाळी तो वानर । कपि थोर थोर तेहि गेले ॥२॥ गेले चक्रवर्ती थोरा वैभवाचे । फार आयुष्याचे ऋषेश्वर ॥ ३ ॥ ऋषेश्वर गेले मार्कंडासारिखे । इतरांचे लेखे[6] कोण करी ॥ ४ ॥ कोण करी सर्व शाश्वत आपुलें । सव राज्य गेलें कौरवांचें ॥ ५ ॥ कौरव निमाले पांडव गळाले । यादवहि गेले एकसरें ॥ ६ ॥ एकसरें गेले राजे थोर थोर । आणिक श्रीधर[7] भाग्यवंत ॥ ७ ॥ भाग्यवंत गेले एकामागें एक । हरिश्चंद्रादिक पुण्यशीळ ॥ ८ ॥ पुण्यशीळ गेले कीर्ति ठेवूनियां । पापी गेले वायां अधोगती ॥ ९ ॥ अधोगती गेले देवां न भजतां । संसारीं म्हणतां माझें माझें ॥ १० ॥ माझें माझें करी साचाचियेपरी[8] । अंतीं दुराचारी एकलाचि ॥ ११ ॥ एकलाचि येतां येकलाचि जातां । मध्येंचि दुश्चिता मायाजाळ ॥ १२ ॥ मायाजाळीं पापी जन गुंडाळले । पुण्यशीळ गेले

१ बंधन. २ व्यर्थ. ३ लौकिकानें बुडविलें. ४ कुचर. ५ घेईल कीं काय ? ६ गणना. ७ लक्ष्मीपति. ८ खऱ्यासारखें मानून.

सुटोनियां ॥ १३ ॥ सुटोनियां गेले सायुज्यपदासी । रामीरामदासी चिरंजीव ॥ १४ ॥

३३१ स्वप्न हा संसार मायिक वेव्हार । म्हणोनि साचार मानूं नये ॥ १ ॥ मानूं नये सर्व जायाचें[1] आपुलें । त्याचें त्याणें नेलें दुःख काय ॥ २ ॥ दुःख काय आतां स्वप्नसुख जातां । साच तें तत्वतां दृढ धरा ॥ ३ ॥ दृढ धरा मनीं जानकीजीवन । तेणें समाधान पावशील ॥ ४ ॥ पावशील सुख स्वरूप आपुलें । जरि तें घडलें रामदास्य ॥५॥ रामदास्य घडे बहुतां सुकृतें । कांहीं पुण्य होतें पूर्वजांचें ॥ ६ ॥

३३२ स्वप्नींच्या सुखानें सुखावला प्राणी । थोर झाली हाणी जागृतीसी ॥ १ ॥ जागृतीस नाहीं स्वप्नींचें तें सुख । तेणें जालें दुःख बहुसाल ॥ २ ॥ बहुसाल खेद मानिला अंतरीं । वायां झडकरी जागा जाला ॥३॥ जागा जाला म्हणे वायां अवचिता । निजोनि मागुता सुख पावे ॥ ४ ॥ सुख पाहे पुन्हा स्वप्नीं तें ना दिसे । भयानक दिसे प्राणियासी ॥ ५ ॥ प्राणियासी दुःख जाहलें मागुतें । जागा जालिया तें सर्व मिथ्या ॥ ६ ॥ मिथ्या सुख दुःख स्वप्नींचा वेव्हार । तैसा हा संसार नाथिलाचि ॥ ७ ॥ नाथिलाचि जाय क्षण आनंदाचा । सर्वचि दुःखाचा क्षण आहे ॥ ८ ॥ क्षण एक मन राघवीं सावध । तेणें नव्हे खेद दास म्हणे ॥ ९ ॥

३३३ सुख पाहों जातां कांहींचि ना दिसे । संसार हा असे दुःखमूळ ॥ १ ॥ दुःखमूळ जन्म नर आणि नारी । पाहातां संसारीं सुख नाहीं ॥२॥ सुख नाहीं कदा शाश्वतावांचोनी । जाणतील ज्ञानी दास म्हणे ॥३॥

३३४ स्त्रियांचें हो जिणें पराधीन जालें । पुरुषें विकिलें आपणासी ॥ १ ॥ आपणा विंकिलें या पोटाकारणें । पराधीन जिणें सहजचि ॥२॥ सहजचि जालें सर्व पराधीन । सत्यचि वचन दास म्हणे ॥ ३ ॥

३३५ वासनेची झाडी कुबुद्धि वांकुडी । वाजे हुडहुडी ममतेची ॥१॥ वैराग्याचा वन्ही विझोनियां गेला । संचित खायाला पुण्य नाहीं ॥ २ ॥ भक्ति पांघरुण तें माझें सांडलें । मज वोसंडिलें संतजनीं ॥ ३ ॥ नामसंजीवनी मुखीं नाहीं पाणी । निंद्रेची पोहेणी[2] प्रबळेचि ॥ ४ ॥ रामदास म्हणे ऐसियाचें जिणें । सदा दैन्यवाणें रामेंविण ॥ ५ ॥

३३६ लोभाचें वैराडीं[3] कामीं घाली उडी । वायांचि वेंगडी[4] वेळतसे[5]

---

१ जाणारें. २ पोहो, पहू पोहणी म्ह० राशी, ढीग, ( एक० भाग० अ. २६–२०३ ). ३ हपापलेले, भुकाळू. ४ गति, वेग. ५ खुंटते, गति खुंटते. ‘ वळे विवेकाची वेंगडी ’ ( दा० १–५–१० ).

॥ १ ॥ सदा भक्तीविण जालें उपोषण । झड घाली अन्न खावयासी ॥२॥ मायाजाळें आगी सुटली अंतरीं । परा घरीं चोरी करीतसे ॥ ३ ॥ अंगही चोरितां अंगही सुजलें । नाहीं झिजविलें रामालागीं ॥ ४ ॥ रामदास म्हणे प्राणी भक्तिउणें । तयालागीं सुणें आतळेना ॥ ५ ॥

३३७ दुर्बल हा जन्म विषय नरदेह । याहीवरी सोय राघवाची ॥ १ ॥ राघवाची सोय सद्भावें भजन । आणि संतजन समागमीं ॥ २ ॥ समागमीं संत श्रवणीं निवांत । अनंताचा अंत ठाईं पडे ॥ ३ ॥ ठाईं पडे देव संतसमागमें । आपल्या स्वधर्में पुण्यशीळ ॥ ४ ॥ पुण्यशीळ देह ज्ञानी निःसंदेहें । सर्वकाळ राहे स्वस्वरूपीं ॥ ५ ॥ स्वस्वरूपीं मन गेलिया उन्मन । मग मिथ्या भान आढळेना ॥ ६ ॥ आढळेना कदा मिथ्या मायाजाळ । तोचि तो केवळ समाधानी ॥ ७ ॥ समाधानी साधु तेथें ज्ञानबोधु । रामदासीं वेधू निर्गुणाचा ॥ ८ ॥

३३८ विचारें संसार होतो देशधडी । सोनियाची घडी जात आहे ॥ १ ॥ डावा तास गेला मोक्षपंथें जातां । विवेक तत्वता याचि नांव ॥२॥ सदा श्रीरामाचें भजन करितां । दास म्हणे चिंता दूर होय ॥ ३ ॥

३३९ त्याचे पाय हो नमावे । त्याचें कीर्तन हो ऐकावें ॥ १ ॥ दुजीयासी सांगे कथा । आपण वर्ते त्याची पथा ॥ २ ॥ कीर्तनाचें न करी मोल । जैसे अमृताचे बोल ॥ ३ ॥ सन्मानीतां नाहीं सुख । अपमानितां नाहीं दुःख ॥ ४ ॥ किंचित् दिलें दातयानें । तेंही घेत आनंदानें ॥ ५ ॥ ऐसा असे हरिदास । लटकें न वदे रामदास ॥ ६ ॥

३४० वाणी शुद्ध करी नामीं । चित्त शुद्ध होय प्रेमीं ॥ १ ॥ नित्य शुद्ध होय नामीं । वसतांही कामीं धामीं ॥ २ ॥ कण शुद्ध करी कीर्तन । प्राण शुद्ध करी सुमन ॥ ३ ॥ त्वचा शुद्ध करी शुद्ध रंज[1] । मस्तक नमितां पदांबुज ॥ ४ ॥ करशुद्धी राम पूजितां । पादशुद्धी देउळीं जातां ॥ ५ ॥ नेमें लिंग करी शुद्ध । अंतर निर्मळ करी शुद्द ॥ ६ ॥ रामपायीं रहातां बुद्धी । रामदासा सकळ शुद्धी ॥ ७ ॥

३४१ माझें सर्व जावें देवानें रहावें । देवासी पहावें भक्तपणें ॥ १ ॥ भक्तपणें मज देवची जोडला । अभ्यास मोडला सर्व कांहीं ॥ २ ॥ सर्व कांहीं जो वा एक देव राहो । माझा आर्तभावो ऐसा आहे ॥ ३ ॥ जो हेत अंतरीं देव तैसा जाला । हा दीन पाहिला कोणी एक ॥ ४ ॥ कोणी एक पुण्य जें होतें संचलें । दास म्हणे जालें समाधान ॥ ५ ॥

---

१ पायधूळ.

३४२ दीनाचा दयाळु कीर्ति ऐकियेली । म्हणूनी पाहिली वाट तुझी ॥ १ ॥ अनाथाचा नाथ होशील कैवारी । म्हणोनियां हरी बोभाईलें ॥ २ ॥ तुजविण कोण जाणे हें अंतर । कोणासी जोजार घालूं माझा ॥ ३ ॥ दास म्हणे आम्ही दीनाहुनी दीन । करावें पालन दुर्बळाचें ॥ ४ ॥

३४३ आम्हां पतितांची सांड केली जरी । आमचा कैवारी कोण आहे ॥ १ ॥ आम्हीं भरंवसा कवणाचा धरावा । सांगावें केशवा दयानिधे ॥ २ ॥ तुजविण आम्हां नाहीं त्रिभुवनीं । धांवें चक्रपाणी दीनबंधो ॥ ३ ॥ पतितपावन ब्रीद हें बांधीलें । तारावें वहिलें दासालागीं ॥ ४ ॥

३४४ पळशी तूं तरी नाम कोठें नेशी । आम्ही अहर्निशीं नाम घोकूं ॥ १ ॥ आम्हांपासोनियां जातां नये तुज । तें हें वर्मबीज नाम जपूं ॥ २ ॥ देतां आम्हां तूझें नाम हो पाहिजे । मग भेटी सहजें देणें लागे ॥ ३ ॥ भोळे भक्त आम्ही चुकलोंचि कर्म । सांपडलें वर्म रामदासा ॥ ४ ॥

३४५ गजेंद्र सावज पडला पानवडी[1] । रामें तेथें उडी टाकियेली ॥ १ ॥ प्रल्हाद गांजीतां कोण साहाकारी । स्वयेंची मुरारी प्रगटला ॥ २ ॥ क्षत्रियें[2] ब्राह्मण गांजिलीं बापडीं । रामें तेथें उडी घातीयेली ॥ ३ ॥ तेहतीस कोडी देव पडीले बांदोडी[3] । रामें तेथें उडी टाकियेली ॥ ४ ॥ दासापायीं पडली देहबुद्धी बेडी । रामें तेथें उडी टाकियेली ॥ ५ ॥ रामदास म्हणे नका करूं शीण । रामें भक्त कोण उपेक्षीले ॥ ६ ॥

३४६ तुजविण रामा मज कोणी नाहीं । माझी चिंता कांहीं असों द्यावी ॥ १ ॥ वैराग्यें कनिष्ठ अभावें वरिष्ठ । माझें मनीं नष्ट संदेहता ॥ २ ॥ विवेकें सांडिलें ज्ञानें ओसंडीलें । चित्त हें लागलें तुझे पायीं ॥ ३ ॥ तुझें नाम वाचे उच्चारीत असें । अंतरीं विश्वासें धरीयेला ॥ ४ ॥ रामदास म्हणे मी तुझें अज्ञान । माझें समाधान करीं देवा ॥ ५ ॥

३४७ श्वानाचिया पुत्रें कल्होळ मांडिला । कलहो लागला एकसरां ॥ १ ॥ भुंकितां गुरगुरी वासितोंचि तोंड । वरती थोबाड करूनियां ॥ २ ॥ एक ते भुंकती एक ते रडती । दास म्हण गती निंदकांची ॥ ३ ॥

३४८ मेरुचीया माथां ठेवुनीयां पाव । जात असे राव कैलासींचा ॥ १ ॥ कैलासींचा राव एक देव क्षोभला । देशधडी केला लंकानाथ ॥ २ ॥ लंकेच्या चोहटीं मांडियेला खेळ । अग्नीचा कल्होळ घरोघरीं ॥ ३ ॥ जाळीयेलीं घरें सुंदर मंदिरें । पावला कैवारें जानकीच्या ॥ ४ ॥ जानकीचा शोक दुरी दुराविला । यशवंत जाला रामदास ॥ ५ ॥

---

१ पाण्याच्या ( मोठ्या ) डबक्यांत. २ परशुरामानें. ३ बंदिखान्यांत.

३४९ जाणावा तो नर देवची साचार । वाचे निरंतर राम राम ॥ १ ॥ सगुणीं सद्भाव नाहीं ज्ञानवर्गे । तयालागीं सर्व सारीखेची ॥ २ ॥ निंदकां वंदकां सगट सांभाळी । मन सर्व काळीं पालटेना ॥ ३ ॥ पालटेना मन परस्त्रीकांचनीं । निववी वचनीं पुढिल्यासी ॥ ४ ॥ पुढिल्यासि तोचि सुख देत आहे । उपकारीं देह लावीतसे ॥ ५ ॥ लावीतसे देह रामभजनास । रामीं रामदास हरिभक्त ॥ ६ ॥

३५० भक्तपणें रामनामाचा अव्हेरु । करी तो गव्हारु[1] मुक्त नव्हे ॥१॥ मुक्त नव्हे काय स्वयें शूळपाणी । रामनाम वाणी उच्चारीतो ॥ २ ॥ राम म्हणे शीव तेथें किती देव । बापुडे मानव देहधारी ॥ ३ ॥ देहधारी नर धन्य ते संसारीं । वाचे निरंतरीं रामनाम ॥ ४ ॥ रामनाम वाचे स्वरूप अभ्यंतरीं । धन्य तो संसारीं दास म्हणे ॥ ५ ॥

३५१ मी खरा पतित तूं खरा पावन । आतां अनमान करूं नको ॥१॥ आतां कांहीं मज चिंता तीही नसे । तुझें नाम कैसें वाचे येई ॥ २ ॥ समर्थें घेतला नामासाठीं भार । मज उपकार कासयाचा ॥३॥ रामदास म्हणे तुझें तूज उणें । सोयरीं पिशुनें[2] हांसतील ॥ ४ ॥

३५२ पतितपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥१॥ मिथ्या शब्दज्ञानें तुज अंतरलों । संदेहीं पडलों मीपणाच्या ॥ २ ॥ सदा खळवळ निर्गुणाची घडे । सगुण नातुडे ज्ञानी गर्वे ॥ ३ ॥ रामदास म्हणे ऐसा मी पतित । मीपणें अनंत आतुडेना ॥ ४ ॥

३५३ रामभक्तीवीण आन नाहीं सार । साराचें हें सार राम एक ॥१॥ कल्पनाविस्तारू होतसे सत्वरू । आम्हां कल्पतरू चाड नाहीं ॥ २ ॥ कामनेलागोन विटलेंसे मन । तेथें चाड कोण कामधेनू ॥ ३ ॥ चिंता नाहीं मनीं राम गातां गुणीं । तेथें चिंतामणी कोण पुसे ॥ ४ ॥ कदा नाहीं नाश स्वरूप सुंदर । तेथें आम्हां हिरे चाड नाहीं ॥ ५ ॥ रामदास म्हणे रामभक्तीवीण । जाणावें तें उणें सर्व कांहीं ॥ ६ ॥

३५४ आम्हीं देखिला विठोबा । आनंदें विठेवरी उभा ॥ १ ॥ तेथें दृश्याची जे दाटी । तेचि रुक्मिणी गोमटी ॥ २ ॥ रामीं रामदास म्हणे । जो ओळखे तोचि धन्य ॥ ३ ॥

३५५ लांचावोनी भक्तिलोभा असे वाळवंटीं उभा । पदकीं इंद्रनील शोभा प्रभे शोभा उजळती ॥ १ ॥ भक्त पुंडलिकें गोंविला जाऊं नेदी भांबाविला । विटे नीट असे ठाकला भीमातीर वाळुवंटीं ॥ २ ॥ भाग्य

---

१ मूर्ख. २ दुर्जन.

पुंडलिकाचें उभें दैवत त्रिलोकींचें । कीं जें तारूं भवसागरीं भीमातीरीं विनटलें ॥ ३ ॥ एके पुंडलिकें करूनी जोडी आम्हांसी दिधली कल्पकोडी । तुटलीं संसारसांकडीं रामदास म्हणतसे ॥ ४ ॥

३५६ जीवन्मुक्त प्राणी होऊनियां गेले । तेणें पंथें चाले तोचि धन्य ॥ १ ॥ जाणावा तो ज्ञानी पूर्ण समाधानी । निःसंदेह मनीं सर्वकाळ ॥ २ ॥ मिथ्या देहभान प्रारब्धअधीन । राखे पूर्णपण समाधानीं ॥ ३ ॥ आवडीनें करी कर्म उपासना । सर्व काळध्यानारूढ मन ॥ ४ ॥ पदार्थाची हाणी होता नये कोणी । जयाची करणी बोलाऐसी ॥ ५ ॥ धन्य पैं ते दास संसारीं उदास । तयां रामदास नमस्कारी ॥ ६ ॥

३५७ संसार देखीला तरी पाहें सार । वायां येरझार पाडूं नको ॥ १ ॥ पाडूं नको दुःखसागरीं आपणा म्हणे नारायणा ओळखावें ॥ २ ॥ ओळखावें वेगीं आपआपणाशीं । संसारीं सुटशी दास म्हणे ॥ ३ ॥

३५८ प्रपंच केला तडातोडी । पडली परमार्थआवडी ॥ १ ॥ सावधान व्हावें जीवा । त्याग केलाचि करावा ॥ २ ॥ काम क्रोध राग द्वेष । अंगीं जडले विशेष ॥ ३ ॥ रामदासें बरें केलें । अवघें जाणुनी त्यागिलें ॥ ४ ॥

३५९ नको ओळखीचे जन । अंगीं वाजे अभिमान ॥ १ ॥ आतां तेथें जावें मना । जेथें कोणी ओळखेना ॥ २ ॥ लोक म्हणती कोण काय । पुसतांही सांगों नये ॥ ३ ॥ रामदास म्हणे पाहीं । जेथें कांहीं चिंता नाहीं ॥ ४ ॥

३६० तुम्हां आम्हां मुळीं जाली नाहीं तुटी । तुटीवीण भेटी इच्छितसां ॥ १ ॥ इच्छितसां योग नसतां वियोग । तुम्हां आम्हां योग सर्वकाळ ॥ २ ॥ सर्वकाळ तुम्ही आम्ही एके स्थळीं । वायां मृगजळीं बुडों नको ॥ ३ ॥ बुडों नको आतां सावध असावें । रूप ओळखावें जवळीच ॥ ४ ॥ जवळीच आहे नको धरूं दुरी । बाह्य अभ्यंतरीं असोनियां ॥ ५ ॥ असोनि सन्निध वियोगाचा खेद । नसोनियां भेद लावू नये ॥ ६ ॥ लावूं नये भेद मायिक संबंधीं । रामदासा बोधीं भेटी जाली ॥ ७ ॥

३६१ शहाणे म्हणवितां ब्रह्मज्ञानेंवीण । संसाराचा शीण करोनियां ॥ १ ॥ करोनि संसार रात्रंदिवस धंदा । कैसे हो गोविंदा चुकलेती ॥ २ ॥ चुकलेति वायां तुम्ही कां अंध हो । अंतरीं संदेहो जन्मवरी ॥ ३ ॥ जन्मवरी वोझें वाहिलें वाउगें । व्यर्थ कामरंगें रंगोनियां ॥ ४ ॥ रंगोनियां कामीं अंतरावें रामीं । दास म्हणे उर्मी कामा न ये ॥ ५ ॥

३६२ ज्ञान जालें भक्तजना । सांडूं नये उपासना ॥ १ ॥ ऐका साराचेंहि सार । मुख्य सांगतों विचार ॥ २ ॥ हेंचि सर्वांचें कल्याण । मानूं नये अप्रमाण ॥ ३ ॥ दास म्हणे अनुभवलें । भजन भगवंताचें भलें ॥ ४ ॥

३६३ मन हें विवेकें विशाळ करावें । मग आठवावें परब्रह्म ॥ १ ॥ परब्रह्म मनीं तरीच निवळे । जरी बोधें गळे अहंकार ॥ २ ॥ अहंकार गळे संतांचे संगतीं । मग आदि अंतीं समाधान ॥ ३ ॥ समाधान घडे स्वरूपीं राहातां । विवेक पाहातां निःसंगाचा ॥ ४ ॥ निःसंगाचा संग दृढ तो धरावा । संसार तरावा दास म्हणे ॥ ५ ॥

३६४ आम्हीं सावधान गावें । तुम्हीं सावध्र ऐकावें ॥ १ ॥ सकळ सृष्टीचा गोसावी । त्याची ओळख पुसावी ॥ २ ॥ स्वयें बोलिला सर्वज्ञु । ज्ञानेंविण अवघे पशु ॥३॥ दास म्हणे नाहीं ज्ञान । तया नरकीं पतन ॥४॥

३६५ जेणें ज्ञान हें नेणवे । पशु तयासि म्हणावें ॥ १ ॥ जेणें केलें चराचर । कोण विश्वासि आधार ॥ २ ॥ ब्रह्मादिकांचा निर्मिता । कोण आहे त्यापरता ॥ ३ ॥ अनंत ब्रह्मांडांच्या माळा । विचित्र भगवंताची कळा ॥ ४ ॥ रामदासाचा विवेक । सर्वां घटीं देव एक ॥ ५ ॥

३६६ देह आरोग्य चालतें । भाग्य नाहीं त्यापरतें ॥ १ ॥ लाहो घ्यावा हरिभक्तीचा । नाहीं भरंवसा देहाचा ॥ २ ॥ देह आहे क्षणभंगुर । तुम्ही जाणतां विचार ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे । अकस्मात लागे जाणें ॥ ४ ॥

३६७ काय करितें हें मन । साक्ष आपुला आपण ॥ १ ॥ काय वासना म्हणते । आपणास साक्ष येते ॥ २ ॥ मन असे हें बरळ । केल्या होतसे निवळ ॥ ३ ॥ सोडीना हें संसारिक । कांहीं पाहणें विवेक ॥ ४ ॥ दास म्हणे सावधान । पदरीं बांधलें मरण ॥ ५ ॥

३६८ करुनी अकर्ते होउनियां गेले । तेणें पंथें चाले तोचि धन्य ॥ १ ॥ तोचि धन्य जनीं पूर्ण समाधानी । जनीं आणि वनीं सारिखाचि ॥ २ ॥ सारिखाचि जेथें तेथें पालटेना । न ये अनुमाना कोणी एका ॥ ३ ॥ कोणी एक लोक देहासी पाहाती । अंतरींची गती कोण जाणे ॥ ४ ॥ कोण जाणे काय सांगतां मनींचें । जनासि जनींचें कळतसे ॥ ५ ॥ कळत असे परि अंतर शोधाव । मनासि बोधावें दास म्हणे ॥ ६ ॥

३६९ तुम्ही आम्ही करूं देवाचा निश्चय । जया नाहीं लय तोचि देव ॥ १ ॥ देव हा अमर नित्य निरंतर । व्यापुनि अंतर देव आहे ॥ २ ॥ ज्ञान देहीं वस तया देव दिसे । अंतरीं प्रकाशे ज्ञानदृष्टी ॥ ३ ॥ ज्ञान देहीं होतां पाविजे अनंता । हा शब्द तत्वता दास म्हणे ॥ ४ ॥

३७० गेलों वस्तूसी भेटाया। तिकडे ब्रह्म इकडे माया ॥ १ ॥ दोहीं-मध्यें सांपडलों। मीच ब्रह्म ऐसें बोलों ॥ २ ॥ वस्तु निर्मळ निश्चळ। माया चंचळ चपळ ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे। अवघें मनाचें करणें ॥४॥

३७१ शिरीं आहे रामराज। औषधाचें कोण काज ॥ १ ॥ जो जो प्रयत्न रामावीण। तो तो दुःखासी कारण ॥ २ ॥ शंकराचें हळाहळ। जेणें केलें सुशीतळ ॥ ३ ॥ आम्हां तोचि तो रक्षिता। रामदासीं नाहीं चिंता ॥ ४ ॥

३७२ अंतरीं गुरुवचन। बाह्य नापिका वपन ॥ १ ॥ अंतर्बाह्य शुद्ध जालों। रामदर्शनें निवालों ॥ २ ॥ मन मुंडिल्या उन्मन जालें। शिर मुंडिल्या काय गेलें॥३॥ दासें तीर्थविधि केला। रामीं पिंड समर्पिला ॥४॥

३७३ माझे मनीं सर्व सुख व्हावें तुज। म्हणोनियां गुज सांगतसें ॥१॥ सांगतसें हित त्वां जीवीं धरावें। भजन करावें राघवाचें ॥ २ ॥ राघवाचें प्रेम तें करी विश्राम। येर सर्व श्रम जाण बापा ॥ ३ ॥ जाण बा वचन हें माझें प्रमाण। वाहतसें आण राघवाची ॥ ४ ॥ राघवाची भक्ती ते माझी विश्रांती। असों द्यावी चित्तीं दास म्हणे ॥ ५ ॥

३७४ जो कां भगवंताचा दास। तेणें असावें उदास ॥ १ ॥ काय देतिल तेंचि घ्यावें। कोणा कांहीं न मागावें ॥ २ ॥ आशा कोणाची न करावी। बुद्धि भगवंतीं लावावी ॥ ३ ॥ सदा श्रवणमननें। आणि इंद्रिय-दमनें ॥ ४ ॥ नानापरी बोधुनि जीवां। आपुला परमार्थ साधावा ॥ ५ ॥ रामदासीं पूर्ण काम। बुद्धि दिली हे श्रीरामें ॥ ६ ॥

३७५ बोलवेना तें बोलावें। चालवेना तेथें जावें ॥ १ ॥ नवल स्वरू-पाच्या योगें। जीवपणाचे वियोगें ॥ २ ॥ वाट नाहीं तेथें जावें। जाण-वेना तें जाणावें ॥ ३ ॥ नसोनियां भेटी घ्यावी। तुटी असोनि पाडावी ॥ ४ ॥ रामदासीं दृढबुद्धी। होतां सहजसमाधी ॥ ५ ॥

३७६ एक घाय दोन खंड। ऐसें बोलावें रोकड ॥ १ ॥ जेणें उठती संशय। तें बोलणें कामा न ये ॥ २ ॥ बहुविध जालें ठावें। सत्य कोणीं-ही जाणावें ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे। एक निश्चयें बोलणें ॥ ४ ॥

३७७ सदां आनंदभरित। रंगसहित्यसंगीत ॥ १ ॥ जगन्माता जगदी-श्वरी। जगज्जननी जगदुद्धारी ॥ २ ॥ त्रिभुवनींच्या वनिता। बाळ तारुण्य समस्त ॥ ३ ॥ वसे आकाशीं पाताळीं। सर्वकाळ तिन्ही काळीं ॥ ४ ॥ जिच्या वैभवाचे लोक। हरिहर ब्रह्मादिक ॥ ५ ॥ सर्व देहा हाल-

वीतें। चालवीतें बोलवीतें ॥ ६ ॥ मूळमाया विस्तारली । सिद्ध साधकाची बोली ॥ ७ ॥ भक्ति मुक्ति योगस्थिती। आदि मुक्ती सहजस्थिती ॥ ८ ॥ मुळीं राम वरदायिनी। रामदास ध्यातो ध्यानीं ॥ ९ ॥

३७८ राम कृपाकर विठ्ठल साकार। दोघे निराकार एकरूपें ॥ १ ॥ आमुचिये घरीं वस्ती निरंतरीं। हृदयीं एकाकार राहियेलें ॥ २ ॥ रामदास म्हणे धरा भक्तिभाव। कृपाळू राघव पांडुरंग ॥ ३ ॥

३७९ समचरणाचा हाचि भावो। भक्तां दावावया ठावो। उभें राहाया अभिप्रावो। भक्त खांद्या घ्यावया ॥ १ ॥ विठोबा हे आमुची जननी। भीमातीरनिवासीनी। भक्त पुंडलिकालागुनी। वैकुंठींहुनि पातली ॥२॥ श्रीवत्साची हे खूण। तें भक्ताचें कृपादान। आजानबाहू यालागून। भक्तां आलिंगन द्याया ॥ ३ ॥ शोभे सुहास्यवदन। 'ना भी ना भी' हें वचन। पूर्ण आकर्णनयन। साधुजन पहाया ॥४॥ मुकुटीं मयूरपत्रें त्रिवळी। विटे नीट असे ठाकली। रामदासाची माउली। भक्तालागीं उभी असे॥५॥

३८० आदिनारायण सद्गुरु आमुचा। शिष्य जाला त्याचा महाविष्णू ॥ १ ॥ तयाचा जो शिष्यू तो जाणावा हंस। तेणें ब्रह्मयास उपदेशिलें ॥ २ ॥ उपदेश केला त्यावरी वसिष्ठा। तेथें धरा निष्ठा शुद्ध भावो ॥३॥ वसिष्ठ उपदेशी श्रीरामरायासी। रामें रामदासीं उपदेशिलें॥४॥

३८१ उपदेश देवोनि दिधला मारुती। स्वयें रघुपती नीरवीता ॥ १ ॥ निरवितां तेणें जालों रामदास। संसारीं उदास म्हणउनी ॥ २ ॥ म्हणोनी आमुचे कुळीं कुळदैवत। राम हनूमंत आत्मरूपीं ॥ ३ ॥ आत्मरूपीं जाला रामीं रामदास। केला उपदेश दीनोद्धारा ॥ ४ ॥

३८२ भाविका भजना गुरुपरंपरा। सदा जप करा राममंत्र ॥ १ ॥ राममंत्र जाणा त्रयोदशाक्षरी। सर्व वेदशास्त्रीं प्रगटची ॥ २ ॥ प्रगटचि राममंत्र हा प्रसिद्ध। तारीतसे बद्ध जडजीवां ॥ ३ ॥ जडजीवां तारी सकळ चराचरीं। देह काशीपुरीं येणें मंत्रें ॥ ४ ॥ येणें मंत्रें जाणा बद्ध तो मुमुक्षु। साधक प्रसिद्ध सिद्ध होय ॥ ५ ॥ सिद्ध होय रामतारक जपतां। मुक्ति सायुज्यता रामदासीं ॥ ६ ॥

३८३ बाप माझा ब्रह्मचारी। मातेपरी अवघ्या नारी ॥ १ ॥ उपजतां बाळपणीं। गिळूं पाहे वासरमणी[1] ॥ २ ॥ अंगीं सिंदुराची उटी। जया सोन्याची कासोटी ॥३॥ रामकृपेची साउली। रामदासाची माउली ॥४॥

---

[1] सूर्य.

३८४ देव जवळी अंतरीं । भेटि नाहीं जन्मवरी ॥ १ ॥ मूर्ती त्रैलोकीं संचली । दृष्टी विश्वाची चूकली ॥ २ ॥ भाग्यें आले संतजन । जालें देवाचें दर्शन ॥ ३ ॥ रामदासीं योग जाला । देहीं देही देव प्रगटला ॥४॥

३८५ करीं घेतां नये टाकितां न जाये । ऐसें रूप आहे राघवाचें ॥१॥ राघवाचें रूप पाहतां न दिसे । डोळां भरलेंसे सर्वकाळ ॥ २ ॥ सर्वकाळ भेटी कदा नाहीं तूटी । रामदासीं लूटी स्वरूपाची ॥ ३ ॥

३८६ स्वानुभवाचे पालवें[1] । शून्य गाळीलें आघवें ॥ १ ॥ सघनीं हरिलें गगन । सहज गगन सघन ॥ २ ॥ शुद्धरूप स्वप्रकाश । अवकाशावीण आकाश ॥ ३ ॥ रामीं रामदास म्हणे । स्वानुभवाचीये खुणे ॥ ४ ॥

३८७ पांचां लक्षणीं पूरता । धन्य धन्य तोच ज्ञाता ॥ १ ॥ विवेकवैराग्य सोडिना । कर्ममर्यादा सांडिना ॥ २ ॥ बाह्य बोले शब्दज्ञान । अंतर्यामीं समाधान ॥३॥ रामीं रामदास कवी । न्यायनीतीनें शिकवी ॥४॥

३८८ सगुणाकरितां निर्गुण पाविजे । भक्तिविण दूजें सार नाहीं ॥१॥ साराचें हें सार ज्ञानाचा निर्धार । पाविजे साचार भक्तियोगें ॥ २ ॥ वेदशास्त्रीं अर्थ शोधोनि पाहिला । त्यांहीं निर्धारिला भक्तिभाव ॥ ३ ॥ रामीं रामदासीं भक्तिच मानली । मनें वस्ती केली रामपायीं ॥ ४ ॥

---

१ पदरानें.



# पदसंग्रह.

१

रंगीं नाचे देवा मोरया। अंदु वांकि पाईं घागरिया ॥ ध्रु० ॥ शरीर भारी चपळ भारी। नाटक भारी रंगलीळा ॥ १ ॥ आनंदवेळा सुख-सोहळा। दास म्हणे गायनकळा ॥ २ ॥

२

नमीन मी गायका। गायका वरदायका ॥ ध्रु० ॥ वीणापुस्तकधा-रिणी। अघें दूरी हारणी। त्रिभुवन तारणी ॥ १ ॥ चत्वार वाचा बोलवी। सकळजन चालवी। त्रिभुवन हालवी। निरंजन पालवी ॥ २ ॥ दास म्हणे अंतरीं। अंतरीं जगदंतरीं। निगमगुज विवरी आपुलें हित तें करी ॥ ३ ॥

३

पाहतां सकळ लोक। रामाचे उपासक। देखतां परमसुख। वाटे रे ॥ ध्रु० ॥ प्रीती लागली मना। गुंतली वासना। आणीक वसेना। रामेवीण रे ॥ १ ॥ जैसें तें गंगाजळ। तैसे गुण निर्मळ। ऐकतां विव्हळ। मन माझें रे ॥ २ ॥ रामीं रामदास म्हणे। मन घेतें धरणें। तयासी करणें। आतां काय रे ॥ ३ ॥

४

भक्तीनें जगज्जीवन। भक्तासी देतो ज्ञान। आणीक साधन। नाहीं नाहीं रे ॥ ध्रु० ॥ न लभे दानपुण्यें। नातुडे तीर्थाटणें। ज्ञान हें भजने-विण नाहीं रे ॥ १ ॥ न होतां विमळ ज्ञान। साधन तें बंधन। नाहीं समाधान। ज्ञानेंविण रे ॥ २ ॥ रामीं रामदास म्हणे। सज्जन बाणती खुणें। येर ते शाहाणे। बोलोनियां रे ॥ ३ ॥

५

होतें वैकुंठींचे कोनीं। शिरलें अयोध्याभुवनीं। लागे कौसल्येचे स्तनीं। तेंचि भूत गे माय ॥ १ ॥ जातां कौशिकराउळीं। अवलोकितां भयंकाळी। ताटिका ते छळोनि मेली। तेंचि भूत० ॥ २ ॥ मार्गीं जातां वनांतरीं। पाय पडला दगडावरी। पाषाणाची जाली नारी। तेंचि भूत० ॥ ३ ॥ जनकाचे अंगणीं गेलें। शिवाचें धनु भंगिलें। वैदेहीअंगीं

संचरलें[1]। तेंचि भूत० ॥ ४ ॥ जेणें सहस्त्रार्जुन वधिला। तो हा तत्काळचि भ्याला। धनु देऊनि देह रक्षिला। तेंचि भूत० ॥ ५ ॥ पितयाचे भाकेशीं। कैकेयीचे वचनासी। मानुनि गेलें अरण्यासी। तेंचि भूत० ॥ ६ ॥ चौदा संवत्सर तापसी। अखंड हिंडे वनवासी। सांगातें भुजंग[2] पोसी। तेंचि भूत० ॥ ७ ॥ सुग्रीवाचें पालन। वाळीचें निर्दालन। तारी पाण्यावरी पाषाण। तेंचि भूत० ॥ ८ ॥ रक्षी मरणीं बिभीषण। मारी रावण कुंभकर्ण। तोडी अमरांचें बंधन। तेंचि भूत० ॥ ९ ॥ वामांगीं स्त्रियेला धरिलें। धांवुनि शरयूतीरा आलें। तेथें भरतासी भेटलें। तेंचि भूत० ॥ ॥ १० ॥ सर्वां भूतांचें हृदय। नाम त्याचें रामराय। रामदास नित्य गाय। तेंचि भूत० ॥ ११ ॥

६

लो लो लागला लो। आदिशक्तिचा लागला लो। अंतरिं लो बाहिर लो। जिकडे तिकडे लागला लो ॥ १ ॥ अंडज लो जारज लो। स्वेदज लो उद्भिज लो। देवा लो दानवा लो। सिद्ध साधका लागला लो ॥ २ ॥ दास म्हणे तोचि जाणे। सद्गुरुवचनीं। सुख बाणे ॥ ३ ॥

७

श्रीगुरुचें चरणकंज[3] हृदयीं स्मरावें ॥ ध्रु० ॥ निगम निखिल साधारण सुलभाहूनी सुलभ बहू। इतर योगयाग विषमपंथिं[4] का शिरावें ॥ १ ॥ नरतनुदृढनावेसी बुडवूनि अति मूढपणें। दुष्ट नष्ट कुकर सूकरतनु[5] कां फिरावें ॥ २ ॥ रामदास विनवी तुज अझुनि तरी समज उमज। विषयवीष पेउनीयां फुकट कां मरावें। श्रीगुरु ॥ ३ ॥

८

येईं हो रामाबाई। माझे येईं रामाबाई ॥ ध्रु० ॥ अनंतरूपें व्यापें दानवदप पूर्णप्रतापें। तत्व नामें कळिकाळ कांपे ॥ १ ॥ तुझा छंद लागलागे माये निशिदिनिं या जीवासी। तुजविण मी परदेसी ॥ २ ॥ रामीं रामदासीं आराम करणें हेंचि तुला उचित। झणी उपेक्षिसी काय आतां उरला माझा अंत ॥ ३ ॥

९

दंडडमरूमंडित पिनाकपाणी ॥ ध्रु० ॥ पांच मुखें पंधरा डोळे। गळां साजूक सीसाळें ॥ दंड० ॥ १ ॥ हिमालयाचा जामात। हातीं शोभे

---

१ निर्धनासि धन जेंवि. २ लक्ष्मण हा शेषाचा अवतार हा संदर्भ. ३ पादकमल. ४ वांकड्या मार्गांत. ५ डुकराचें शरीर.

सरळ गात ॥ दंड० ॥ २ ॥ मस्तकिं वाहे गंगाजळ । कंठीं शोभे हळाहळ ॥ दंड० ॥ ३ ॥ माथां मोठा जटाभार । अंगीं फुंपती वीखार ॥ दंड० ॥ ४ ॥ रामीं रामदास स्वामी चिंतीतसे अंतर्यामीं ॥ दंड० ॥ ५ ॥

१०

प्रगट निरंजन प्रगट निरंजन प्रगट निरंजन आहे । आगमनिगम संतसमागम सद्गुरुवचनें पाहे ॥ ध्रु० ॥ आत्मविचारें शास्त्रविचारें गुरुविचारें बोध । मीपण तूंपण शोधुनि पाहतां आपण आपणा शोध । प्रगट० ॥ १ ॥ जडाशि चंचळ चालविताहे चंचल स्थीर न राहे । प्रचीत आहे शोधुनि पाहें निश्चळ होऊन राहे ॥ २ ॥ भजनीं भजन आत्मनिवेदन श्रवणमनन साधा । दास म्हणे निजगुज शोधितां होत नसे भवबाधा ॥ ३ ॥

११

निदान पाहाशी किती । दयाळा निदान पाहासी किती । रामराया निदान० ॥ ध्रु० ॥ धांव धांवगा सीतापती । तुजवेगळी नाहीं गती । नानाशास्त्रें मौनावती । नाम तारक वेद बोलती ॥ १ ॥ जळीं पाषाण तारिले जड । मी काय तुज त्याहूनि जड । आतां पुरवीं जीवींचें कोड । मनीं घेतला विषयीं मोड ॥ २ ॥ तुझ्या भेटीचें आरत[1] मोठें । मज न गमे कांहीं केल्या कोठें । तुजवांचोनि सर्वही खोटें । दीन बालक तुझें धाकुटें ॥ ३ ॥ वृत्ती जडली पायांपाशीं । जेवीं गुळाशीं गुंतली माशी । देहीं असोनि गुप्त कां होशी । दास उदास देहभावाशीं ॥ ४ ॥

१२

अनाथ मी हीन दीन दरिद्री भजन नेणें कांहीं । तुजाविण मज या जगीं पाहतां कोणीच नाहीं ॥ १ ॥ ज्ञान कळेना ध्यान कळेना मन वळेना देवा । विद्या नाहीं वैभव नाहीं ऐसा पूर्वींच ठेवा ॥ २ ॥ युक्ति असेना बुद्धि असेना शांति वसेना अंगीं । रामदास म्हणे दयाळा ऐसा मी भवरोगी ॥ ३ ॥

१३

रघुराजके दरवार घमडी गाजतुहै ॥ ध्रु० ॥ तथैथैथै पकवाज वाजतुहै । सुरवर मुनिवर देखण आवतु है ॥ १ ॥ नारद तुंबर किन्नर सुरवर गावतु है । शंख भेरी सुनके रोम थरकतु है ॥ २ ॥ लाल धुसर तवके उडावतु हैं । रामदास तहां बलि ज्यावतु है ॥ ३ ॥ रघु० ॥

---

१ इच्छा.

## १४

मारुती सख्या बलभीमा रे ॥ ध्रु० ॥ अंजनीचें वचनांजन लेऊनि। दाखविशी बलसीमा रे ॥ १ ॥ व्रजतनु बलभीमपराक्रम । संगीतगायन-सीमा रे ॥ मा० ॥ २ ॥ दास म्हणे हो रक्षीं आम्हां । त्रिभुवनपालन-सीमा रे ॥ मा० ॥ ३ ॥

## १५

कृपाळू रघुवीरें खादलीं भिलटीबोरें[1] । उच्छिट आदरें अंगिकारी रे ॥ ध्रु० ॥ वैभवीं नाहीं चाड । देवातें भावचि गोड । पुरवितो कोड अनन्याचें रे ॥ १ ॥ दुर्लभ ब्रह्मादिकांसी । सुलभ वानरांसी । काय तयापासीं भावेंविण रे ॥ २ ॥ रामीं रामदास म्हणे । देव हा दयाळूपणें । उठावि तोरणें वानरांचीं रे ॥ ३ ॥

## १६

जन्मलाचि नाहीं तो मरेल काई । जीणें मरणें दोन्ही नाहीं रे ॥ ध्रु० ॥ जनीं जीवन्मुक्त वर्ततात हरिभक्त । सद्गुरुबोधें ते अच्युत रे ॥ १ ॥ जिणें आणि मरणें येणें आणि जाणें । साधु तो अचळ पूर्णपणें रे ॥२॥ सेवितां साधूचे चरण बाधीना दक्षिणायन[2] । रामीं रामदासीं निजखुण रे ॥ ३ ॥

## १७

रघुवीर सुरवरदानी । भक्तांचा अभिमानी । योगी मुनिजन ध्यानीं । राहाती समाधानीं ॥ ध्रु० ॥ भूषण मंडित माळा । तेजाचा उमाळा । सुंदर सुमनमाळा । भोंवता मधुकरपाळा ॥ १ ॥ पीतवसन घन साजे । मुरडींव वाक वाजे । वर तोडरी ब्रिद गाजे । कीर्ति विशाळचि भाजे ॥ २ ॥ अभिनव कार्मुकपाणीं । निगम गाति पुराणीं । विगळित होते वाणी । समजतसे शूळपाणी ॥ ३ ॥ राम सकळ जन पाळी । भक्तांला सांभाळी । जन्ममरण दुःख टाळी । अगणित सौख्य नव्हाळी ॥ ४ ॥ दास म्हणे मज हित । माझें कुळदैवत । जे जन होती रत । ते सकळही तरत ॥ ५ ॥

## १८

समर्थाचा गाभा । भीम भयानक उभा । पाहतां सुंदर शोभा । लांचावे मन लोभा ॥ ध्रु० ॥ हुंकारे भुभुःकारे । काळ म्हणे अरे बा रे ।

---

१ भिल्लीणीचीं बोरें. २ दक्षिणायनांत मृत्यु आला असतां मोक्षप्राप्ति होत नाहीं, असें योग्याचें मत.

विघ्न तगेनां थारे । धन्य हनुमंता रे ॥ १ ॥ दास म्हणे वीर गाढा । घर्षित घनसर दाढा । अभिनव हाचि पवाडा । पाहतां दिसे जोडा ॥ २ ॥

१९

रावण सीता दडवी । भीम निशाचर बडवी । अघटित तें घडवी। वर रजनीचर ते रडवी ॥ ध्रु० ॥ जाउनि सीता शोधी । सकळांचा विरोधी । वानर मोठा क्रोधी । त्रिकुटीं जन रोधी ॥ १ ॥ मोठी आली धाडी । पुच्छानें पछाडी । होती ताडातोडी । कंठीं झोडाझोडी ॥ २ ॥ दैत्यीं केलें चाळे । सुरवर बंदीशाळे । त्या रागें उफाळे । वन्हीचे उबाळे ॥ ३ ॥ बनीं बनें कडकावी । कळकट शिक्षा लावी । भुजाबळें भडकावी । लंकेतें धडकावी ॥ ४ ॥ सीता शोधून गेला । हलकल्लोळ केला । भेटे राघवाला । दास्यत्वें निवाला ॥ ५ ॥

२०

एकतालपंचक ॥ वेद लागला रामाचा । सुरवर विश्रामाचा ॥ ध्रु० ॥ तेथें सुरवर नर किन्नर विद्याधर गंधर्वांचा मेळा ॥ तेथें न्यूनें कोकिळा मंजुळकिळा । झुळकी रम्य रसाळा ॥ तेथें गायनकळा रंग आगळा । वाहे अमृतवेळा । तो सुखसोहळा देखुन डोळां । लांचावो मनमेळा ॥१॥ एकताल मृदंगें श्रुतिउपांगें । गाती नवरसरंगें ॥ एकरंग सुरंगें दाविती संगें । सप्तस्वरांचि आंगें ॥ एक अनेक रागें आलापयोगें । विकट ताल सुधांगें ॥ एक झकिट किटकिट थरिक थरिक । वाजती चपळांगें ॥ २ ॥ तेथें खणखणखणखण टाळ वाजती । झणझणझणझण यंत्रें ॥ दणदण-दणदण मृदंग मंजुळ । तालबद्ध परतंत्रें ॥ तेथें चणचणचणचण शब्द बोलती । वाणी चपळ सत्पात्रें ॥ तेथें घणघणघणघण घंटा वाजती । अनुदाते शूळमंत्रें ॥ ३ ॥ तेथें झगझगझगझग झळकति रत्नें । खचित बैसे शोभा ॥ तेथें धगधगधगधग तेज आगळें । लावण्याचा गाभा ॥ तेथें घमघमघमघम सुगंध परिमळ । षट्पद येति लोभा ॥ पवनतनुज दासाचें मंडण । निकट राहिला उभा ॥ ४ ॥

२१

रामा चालरे झडकरी । त्रिभुवन हरुषे भारी ॥ ध्रु० ॥ शरयूनदीतिरीं अयोध्यापुरी । रमणीय रचिली भारी ॥ तीसीं प्रतिमल्ल सरी ऐसीच दुसरी । नाहीं पृथ्वीवरी ॥ ते वैकुंठमंदिरीं गमन सुंदरी । सत्यामधें थोरी ॥ ऐसें जाणोनी श्रीकौसल्योदरीं । आनंद सचराचरीं ॥ १ ॥ तेथें ऋषि-कुळ सकळ नांदति निर्मळ । उत्साहाचेनि उसळे ॥ तेथें धोत्रें सोज्वळें

झेलिती करतळें। विभूतीचे गोळे ॥ ते ध्यानीं नाकळे मना नाढळे। तें रूप पाहती डोळे ॥ आणि क्रूर विशाळें वधिलीं ढिसाळें। पावानि यज्ञ फळे ॥ २ ॥ तेथें ब्रह्मनंदिनी आपबंधिनी। असतां निजपतिवचनीं ॥ ते रामागमनी ऐकतक्षणीं। हरुषत अंतःकरणीं ॥ म्हणे त्या श्रीचरणीं ॥ होतां मिळणी। पालटेन पाषाणी। ऐसें चिंतुनि दिवसरजनी। पंथा पाहतां लोचनीं ॥ ३ ॥ तेथें सुरवर नाचति वाद्यें वाजती पुष्पें जमुनी वरुषति ॥ तेथें गंध वातगती नेत दिगंतीं घ्राणा होतसे तृप्ती। तेथें दिशा झळकती सफळ वनस्पती। पद शुभ बोलती ॥ आला म्हणती राम सीतापती जयजयकारें गर्जती ॥ ४ ॥ तेथें दशरथमानसीं रामश्रवणशशी। तुंबळ सुखसिंधुसी ॥ तेथें जनकसरितेसि मिळणी कैसी। होताहे गजरेंसी ॥ तेथें भक्तचकोरासी आनंद अहर्निशीं। पाहताती उदयासी ॥ ऐसें देखुनि भक्ती नवमीसी। प्रगट रामदासीं ॥ ५ ॥

२२

फरफरफरफर वोढिती कुंजर। धनुष्य आणिलें भूपें ॥ हरहरहरहर अति पण दुष्कर। सुंदर रघुपति रूपें ॥ वरवरवरवर रघुपति वोढित। दशमुख संतापे ॥ करकरकरकर शर करारे। थरथरथरथर भू कंप ॥ १ ॥ रामें सज्जीलें वितंड परम चंड। रामें उचलिलें त्र्यंबक। कौशिकऋषि पुलकांक ॥ रामें ओढिलें शिवधनु सीतेचें तनुमनु। रामें भंगिलें भवचाप असुरां सुटला कंप ॥ २ ॥ कडकडकडकड भग्न कडाडे। तडतडतडक फुटे ॥ गडगडगडगड गगन कडाडी धडधडधड धडक उठे ॥ भडभडभडभड रविरथ चुके। घडघडीत अव्हाटे ॥ खडखडखडखड खचित दिग्गज। चळितकुळाचळ कुटे ॥ ३ ॥ दुमदुमदुमदुमदुमित भुगोलें। स्वर्ग मृत्यु पाताळे। धुमधुमधुमधुम धुकट कर्णीं। विधीस बैसलें टाळे ॥ हळहळहळहळ अतिकोल्हाळ हळ। हरसी पंचक डोलें ॥ खळखळखळखळ उचंबळत। जळसिंधूसी मोहो आंदोळे ॥ ४ ॥ धकधकधकधक धकीत धरणी। धराबधिर झाले नयन ॥ चकचकचकचक चकीत निशाचर। करविले दीर्घशयन ॥ थकथकथकथक थकीत सुरवर। वरुषतीं पुष्पें तसे ॥ लखलखलखलख रत्नमालिका। जनयकालिक लग्न ॥ ५ ॥ जयजयजयजय जयति रघुराजवीरा गर्जती जयकारें। धिमधिमधिमधिम नृपदेवदुंदुभि। गगन गर्जलें गजरें। तरतरतरतरमंगळतुरें विविध वाद्यें सुंदरें। समरसरसरस दासा मानसीं रामसीता वधूवरें ॥ ६ ॥

१ मोठालीं. २ ब्रह्मदेवाची कन्या; सरस्वती. ३ वाट. ४ वायुवेगानें. ५ शंकराचें धनुष्य. ६ मृत्यु. ७ राजे व देव यांचे नगारे.

## २३

रंगीं नाचतो त्रिपुरारी लीलानाटकधारी। मंदरजांवर[1] त्रिपुरसुंदर अर्धनारी नटेश्वर। नाचे शंकर सकळ कळाकर। विश्वासी आधार ॥ ध्रु० ॥ झुळझुळझुळझुळ शीरीं गंगाजळ। झळझळ मुगुटीं किळ। ललललललळ ललित कुंडलें। भाळीं इंदुज्वाळ। सळसळसळसळ सळकती रसना। वळवळवळिती व्याळ। हळहळहळहळ कंठीं हळाहळ। गायनस्वर मंजुळ ॥ १ ॥ थबथबथबथब गळती सद्योरुंडमाळिका कंठीं। चपचपचपचप हस्तक लवती। दस्तक धरी धूर्जटी। खडखडखडखडखड व्याघ्रांबर गजचर्म परवंटी। भडभडभडभडभड धूसर[2] उधळत। चिताभस्म निजउटी ॥ २ ॥ किणिकिणिकिणिकिणि वाजति किंकिणि। घणघणघण खणाणी। झणझणझणझण वाकी चरणीं। दणदणदण धरणी। खणखणखणखण टाळ उमाळे। रुणझुण वेत्रें पाणी। गुणगुणगुणगुण वर्णिती वाणी। खुणखुणखुण निर्वाणीं ॥ ३ ॥ टिमिटिमिटिमिटिमि मृदंग गंभीर। डिमिडिमिडिमिडिमिडिमि डिमर। धिमिधिमिधिमिधिमि दुंदुभि गर्जे। झिमिझिमिझिमिझिमि झल्लर। घुमघुमघुम येवज गमकत। दुमदुमदुम अंबर। ततथै ततथै धिकिटधिकिट। म्हणती विद्याधर ॥ ४ ॥ थरथरथरथर कंपित गमके। गरगरगरगर भ्रमर। सरसरसर कंपित चमके। धुरधुरधुरधुर गंभीर। परपरपर म्हणती सुरवर। हरहर हरहर शंकर। वरवरवरवर दासा दिधला। तरतरतर दस्तुर ॥ ५ ॥

## २४

आठवे मनीं आठवे मनीं। आठवे मनीं सदा राम चिंतनीं ॥ ध्रु० ॥ मुगुटी किरीटी। वक्रभ्रुकुटी। रम्य गोमटीं। नयनांबुजें ॥ १ ॥ मकरकुंडलें। ठाण दंडलें। तेज खंडलें। मेघदामिनीं ॥ २ ॥ बाणली उटी। कास गोमटी। किंकिणी कटी। क्षुद्र घंटिका ॥ ३ ॥ पदकमेखळा[3]। फांकती किळा। रूळती गळा। मुक्तमाळिका ॥ ४ ॥ ते सुलक्षणें। रत्नभूषणें। वीरकंकणें। शोभती करीं ॥ ५ ॥ रम्य रंगलें। चाप चांगलें। सैन्य भंगलें। त्रीकुटाचळीं ॥ ६ ॥ आंदु नेपुरें। वांकी गजरे। तीं मनोहरें। पाउलें बरीं ॥ ७ ॥ हृदय कवंळी[4]। मूर्ती सांवळी। दास न्याहळी। कूळदैवत ॥ ८ ॥

---

१ पार्वतीपति; शंकर. २ धूळ. ३ सांकळ्या. ४ आलिंगितें.

२५

नवमि करा नवमि करा । नवमि करा भक्ति नवमी करा ॥ ध्रु० ॥ अष्टमी परी नवमी बरी । तये दुसरी न पवे सरी ॥ १ ॥ राम प्रगटे भेद हा तुटे । अभेद ऊमटे तेचि नवमी ॥ २ ॥ शीघ्र नवमी येतसे ऊर्मी । रामदास मी अर्पिली रामीं ॥ ३ ॥

२६

दीनबंधु रे दीनबंधु रे दीनबंधु रे । राम दयासिंधु रे ॥ ध्रु० ॥ भिलटीफळें भक्तवत्सलें । सर्व सेविलीं दासप्रेमळें ॥ १ ॥ चरणीं उद्धरी दिव्य सुंदरी । चापबंधनें मुक्त जो करी ॥ २ ॥ वेदगर्भ जो शिव चिंतिता । वानरां रिसां गुज सांगतो ॥ ३ ॥ राघवीबिजे रावणानुजे । करुनि पावला निजराज्य जें ॥ ४ ॥ पंकजाननें दैत्यभंजनें । दास पाळिले विश्वमोहनें ॥ ५ ॥

२७

मांबुजाननं मांबुजाननं मांबुजाननं मांबु देहि मे ॥ ध्रु० ॥ योगिरंजनं चापभंजनं । जनकजापतिं विश्वमोहनं ॥ १ ॥ विबुधकारणं शोकहारणं । अरिकुळांतकं भयनिवारणं ॥ २ ॥ जय कृपालयं दासपालयं । चरणपंकजं देहि मे लयं ॥ ३ ॥

२८

ऐसें ध्यान समान न दिसे राम निरुपमलीला । सांवळें सुंदर रूप मनोहर शोभती सुमनमाळा ॥ ध्रु० ॥ मुकुटकिरीटीं कुंडलें मंडित गंडस्थळावरि शोभा । केयूरदंड उदंड विभूषण लावण्याचा गाभा ॥ १ ॥ सरळ कुरळ नयन कमळदळश्याम सकोमळ साजे । झळके इंद्रनीळ तळपे रत्नकिळ मुनिजनध्यानीं विराजे ॥ २ ॥ भाळ विशाळ रसाळ विलेपन परिमळ अनिळविलासी । मृगमद केशर धूसर आंगीं हसितवदन सुखरासी ॥ ३ ॥ कटितट वेंकट कासे पीतपट मिरवत उटी सुगंधें । रुळत कल्लोळ सुढाळ माळिका डोलती तेणें छंदें ॥ ४ ॥ जडितपदक वीरकंकण किंकिणी आंदु नेपुर वाजे । सकळ रिपुकुळ निर्मळ ऐसे वांकी तोडर ब्रीद गाजे ॥ ५ ॥ करिं शरचाप विलाप दानवां काळरूप मनिं भासे । दास म्हणे रणकर्कश रामें अंतक तोही त्रासे ॥ ६ ॥

२९

मिरासीचा ठाव मिरासीचा ठाव मिरासीचा ठाव धरा रे । जेथुनि आले तिथेंचि जाउनि मागुती वास करा रे ॥ ध्रु० ॥ अज्ञानदारिद्र्य निर-

सलें ज्ञानलक्ष्मीतें कोण पुसे। आपणचि सर्वही अहंकारगोत्रज घात घेता तेथ नेतसे। एकपद तेथें विदट नाहीं सर्वहि सिद्धी विलसे। ऐसी हे मिरासी टाकियेली थोर मस्तकीं अभिमानपिसें ॥ १ ॥ संतसनकादिक नारद तुंबर वृत्ती तेही लक्षिली। नागवे उघडे आपदा भोगुनि जीवेसीं सदृढ धरिली। वडिलांची जन्ममृत्युभूमी तेही सर्वकाळ यत्न केली। धिगीधिगी तें जिणें पूर्वजांची वृत्ती असोनि हातींची गेली ॥२॥ एकला एकला मी रामदास वृत्तीलागीं होय पिसा। तनु मनु धनु सर्वही अर्पुनि सोडिली जीवित्वआशा। निष्कामता कोणी पाठीसी नाडले एकचि थोर कोंवसा। हे वृत्ती रक्षील माझा राम त्याचा मज भरंवसा ॥३॥

३०

आलिया अंगेंचि होयिजे देव। कोंदाटला ब्रह्मकटाव ॥ ध्रु० ॥ भवसिंधुचें जळ आटलें। संसाराचें मूळ तुटलें ॥ १ ॥ निजधनाची लाधली ठेवी। रंक पावले राजपदवी ॥ २ ॥ अरेकाळाची वेळ चुकली। आनंदाची लुटी फावली ॥ ३ ॥ जे मायेनें जन्म दाविला। ते मायेचा ठाव पुसिला ॥ ४ ॥ रामदासासि राम भेटला। थोर संदेह हा तूटला ॥ ५ ॥

३१

वेडिया स्वामीच होउनि राहें। हे उपाधी तुज न साहे ॥ ध्रु० ॥ अरे तुझाचि तूं सकळ। तरी वायांचि कां तळमळ ॥ १ ॥ स्वामी सेवकपण हें वाव। अभिमानासी कैचा ठाव ॥ २ ॥ अमंगळें जाणसी साचें। काय भूषण सांगसी त्याचें ॥ ३ ॥ मीपणाचें मूळ तुटावें। आनंदाचें सुख लुटावें ॥ ४ ॥ रामदासचि नांव हें फोल। तेथें कायसे लागती बोल ॥५॥

३२

देवाची करणी ऐसी ही ॥ ध्रु० ॥ पहा दशगुणें [1]आवरणोदकीं। तारियेली धरणी ॥ १ ॥ सुरवरपन्नग निर्मुनियां जग। नांदवी लोक तिन्ही ॥ २ ॥ अंडज जारज स्वेदज उद्भिज। निवडिलीया खाणी ॥ ३ ॥ रात्रीं [2]सुधाकर तारा उगवती। दिवसा तो [3]तरणी ॥ ४ ॥ सत्तासूत्रें वर्षत [4]जळधर। पीक पिके धरणीं ॥ ५ ॥ आपण तरी स्त्रिये निज निर्गुण। दासा हृदय भुवनीं ॥ ६ ॥

३३

भावबळें तरले मानव ॥ ध्रु० ॥ सारासारविचार विलोकुनि। भव हा निस्तरले ॥ १ ॥ रामनाम निरंतर वाचे। निजपदीं स्थिरले ॥ २ ॥ दास म्हणे सुखसागरडोहीं। ऐक्यपणें विराले ॥ ३ ॥

---

१ आच्छादन करून असणाऱ्या उदकांत. २ चंद्र. ३ सूर्य. ४ पर्जन्य, मेघ.

## ३४

देह दंडिसी मुंड मुंडिसी । भंड दाविसी नग्न उघडा ॥ ध्रु० ॥ भस्मलेपन तृण आसनें । माळभूषणें सोंग हें मूढा ॥ १ ॥ अन्नत्याग रे हृदययोग रे । फुकट कायरे हिंडसी वनीं ॥ २ ॥ ऐक सांगतों रामदासतो । ज्ञानयोग रे साधितां बरें ॥ ३ ॥

## ३५

हें काय तें काय । योग काय भोग काय ॥ ध्रु० ॥ बाहेर जटाभार काय । अंतरीं संसार काय ॥ १ ॥ बाहेर काषाय वेड काय । आंत अवघें भंड काय ॥ २ ॥ बाहेर सात्विक ध्यान काय । आंत मद्यपान काय ॥३॥ रामदास म्हणे पाहे । व्यर्थ भगल करून काय ॥ ४ ॥

## ३६

पळापळा ब्रह्मपिसा येतो जवळी । रामनामें हाक देउनी बांई कांडोळी ॥ ध्रु० ॥ वृत्तिसेंडी बंधनेंविण सदा मोकळी । संसाराची धुळी करुनि आंगीं उधळी ॥ १ ॥ प्रपंचउकरड्यावरी बैसणें ज्याचें । भोंता पाळा फिरोनि पाहे जन हे अविद्येचे ॥ २ ॥ धाउनि बैसे उठोनि पळे दृश्य वाटतें । अदृश्याचें राहणें घेतां नचले कवणाचें ॥ ३ ॥ आउट हात गज नवां ठाईं उतळले । दहावा ठाव म्हणऊन तेथें ठिगळ दिधलें ॥ ४ ॥ ऐसें मन हें चंचळ निवृत्तीसी गुंतलें । परतुनियां आलें म्हणउनि जीवेंचि मारिलें ॥ ५ ॥ मीपणाचें शहाणपण जळालें माझें । कोण वाहे देहबुद्धी वस्त्रांचें ओझें ॥ ६ ॥ नलगे आम्हां मानअपमानाचें ओझें । तुझी शुद्धी घेतां गेलें मीपण माझें ॥ ७ ॥ आम्ही जन धन देखुनि विचार करितों । आपण ऐसे पिसे म्हणउनि उमज धरितों ॥ ८ ॥ अर्थे भेटों येती त्यांस वेड लावितों । रामीं रामदास ऐसें अबद्ध बोलतो ॥ ९ ॥

## ३७

कल्याणधामा । रामा कल्याणधामा ॥ ध्रु० ॥ दुःखनिवारण नामक सुखाये । सुखमूर्ति गुणग्रामा । रामा० ॥ १ ॥ दास उदास करी तव कृपा । अभिनव नामगरिमा । रामा० ॥ २ ॥

## ३८

तूं येरे रामा । काय वर्णू महिमा ॥ ध्रु० ॥ सोडविले देव तेतीस कोटी । तेवीं सोडवीं आम्हां ॥ १ ॥ राम लक्षुमण भरत शत्रुघन । पुढें उभा हनुमान ॥ २ ॥ दास म्हणे भवबंध निवारीं । राम गुणधामा ॥ ३ ॥

३९

हे राघवा देईं तुझें भजन ॥ ध्रु० ॥ अनुताप[1] त्यावरी भक्तियो
मानिती हे सज्जन ॥ १ ॥ कीर्तन करावें नामें उद्धरावें । अंतरीं ला
ध्यान ॥ २ ॥ दास म्हणे मन आत्मनिवेदन । सगुण समाधान ॥ ३ ॥

४०

नाम मंगळधाम हरीच हो । संतसज्जना विश्राम ॥ ध्रु० ॥ सक
सकळ धर्म अचळ । अर्थकाम स्मरणें स्वानंदाभिराम ॥ १ ॥ गरळेजा[2]
शम शिव मनोरम । दास उदास पूर्णकाम ॥ २ ॥

४१

संगत साधूची मज जाहली । अक्षय पदवी आली ॥ ध्रु० ॥ सर्व
सर्वात्मा ऐसी । अंतरीं दृढमती जाली । जागृतीसहित अवस्था तुय
स्वरूपीं समूळ विराली ॥ १ ॥ बहुजन्मांची जपतपसंपत्ती । विम
फळेंसि जाली । मी माझें हे सरली ममता । समुळीं भ्रांति निमाली ॥
रामीं अभिन्न दास ऐसी हे । जाणीव समूळही गेली । नचळे न ढ
अचळ कृपा हे । श्रीगुरुरायें केली ॥ ३ ॥

४२

अणुपासुनि जगदाकार । ठाणठकार रघुवीर ॥ ध्रु० ॥ रामाक
जाहली वृत्ती । दृश्या दृश्य न ये हातीं ॥ १ ॥ रामीं हारपलें जग । दा
म्हणे कैंचें मग ॥ २ ॥

४३

दशशतकरवंशीं अवतरणा । दशमुखकुळसंहरणा । दशशतवदनाग्र
रूप मदना । दशरथनृपनंदन गुणसदना ॥ ध्रु० ॥ कौसल्यात्मज नि
सुखकरणा । कौशिकमखपालन शिवस्मरणा । राजीवलोचन जानक
रमणा । भवचिंताहरणा ॥ १ ॥ निजचरणीं अहल्याउद्धरणा । भार्ग
वीरक्षितिपाळाहरमर्दना । वालीकार्मुकधरणा । अंजनिसुतसेवित त
चरणा ॥ २ ॥ दशदिशाव्यापकगुणसगुणा । आत्माराम समस्ताभरणा
जीवकदंबकपोतसंस्मरणा । रामदास वंदित तव चरणा ॥ ३ ॥

४४

रामा विसरावें मग कासया जियावें[3] । स्वहित दुरी तेव्हां दुःख पालव
घ्यावें । रौरव कुंभपाक अहोरात्र भोगावे । तेधवां कोण सोडी धर्म
पडे ठावें ॥ ध्रु० ॥ भजनीं कानकोंडें राम न म्हणे तोंडें । आदळे दुः

---

१ पश्चात्ताप. २ विषाचा दाह शमविणारें. ३ जिवंत रहावें.

आंगीं भोगितां रडे । कर्तृत्व आपुलेंचि कैसें नाठवे एवडें । देवासी बोल ठेवी केवीं स्वसुख जोडे ॥ १ ॥ विषयीं चित्त गोवी हृदयस्थ नाठवी । कामक्रोधलोभसंगें त्रास नुपजे जीवीं । ममता दुःख परी आपणातें वाहवी । विनवी रामदास भवसागर तरवीं ॥ २ ॥

## ४५

साजिरें हो । रामरूप साजिरें हो ॥ ध्रु० ॥ रूप प्रगटलें लावण्य लाजिलें मानसीं बैसलें ॥ १ ॥ सर्वांगें सुंदर ठाव मनोहर । दासाचा आधार ॥ २ ॥

## ४६

देखिला हो राघव देखिला ॥ ध्रु० ॥ रूप रामाचें लावण्य साचें । ध्यान विश्रामाचें ॥ १ ॥ चंचळ मानस पाहे वास । रामीं रामदास ॥२॥

## ४७

शरण मी राघवा हो ॥ ध्रु० ॥ अंतरध्याना गुणनिधाना । मज पहा हो ॥ १ ॥ भजन कांहीं घडत नाहीं । हें साहा हो ॥ २ ॥ रामदास धरून कास । एक भावो ॥ ३ ॥

## ४८

रे मानवा उगीच आमुची जिणी । आम्हां ध्यानीं भेटिची सिराणी ॥ ध्रु० ॥ नरापरीस वानर भले । जिहीं डोळां राम देखियेले । ज्यासी रघुराज हितगुज बोले । कोण्या भाग्यें भगवंत भेटले ॥ १ ॥ रामीं मिनले ते असो नीचयाती । त्यांच्या चरणाची वंदीन माती । नित्य नव्हाळी गाऊनि करूं किती । तेणें रघुनाथीं उपजेल प्रीती ॥ २ ॥ रामीं रामदास म्हणे ऐका करूं । थोर आम्ही तैसाचि भाव धरू । भक्तिप्रेमाचा दाऊं निर्धारू । तेणें आम्हां भेटेल रघुवीरू ॥ ३ ॥

## ४९

कैंचें घर कैंचें दार । मिथ्या सकळही व्यापार । अंतीं सोइरा रघुवीर । कां भुललासी ॥ १ ॥ कोणी नव्हेति रे कोणाचीं । सकळही सांगातीं दैवाचीं । धरीं सोई त्या रामाची । कां भुल० ॥ २ ॥ बहु अवघड आहे घाट[१] । कैसी नकळे उरकेल वाट । होईं रघुवीरजीचा भाट[३] । कां भुल० ॥ ३ ॥ फिर माघारां परतोन पाहें । एकधर्माचि होउनि राहें । धन जोडिलें न राहे । कां भुल० ॥ ४ ॥ ऐसी करावी वा जोडा । राहे एथें तेथें गोडी[२] । सोडी मिथ्या प्रपंचवोडी । कां भुल० ॥ ५ ॥ केव्हां

---

१ वाट. २ गोडी. ३ स्तुतिपाठ करणारा.

जाईल न कळे श्वास। राहे तें घर पडेल वोस। ये कुडीया उपजे त्रास। कां भुल० ॥ ६ ॥ सावध होईरे बा ऐसा। वोढीं जळते घरिं वासा। स्मर माझ्या रमाधीशा। कां भुल० ॥ ७ ॥ संसार पाण्या बुड्बुडा। याचा नको करूं ओढा[1]। तूं समजेसी ना मूढा। कां भुल ॥ ८ ॥ करीं सीताराम मैत्र। होईल देह तुझा पवित्र। वरकड भिंत वरील चित्र। कां भुल० ॥ ९ ॥ कां रे बैसलास निश्चळ। करिशि अनर्थास मूळ। सांडुनी विश्रांतींचें स्थळ। कां भुल० ॥ १० ॥ मुख असूं द्यावी दया। नाहीं तर सर्वही जाईल वांयां। मिठी घालीं रा पायां। कां भुल० ॥ ११ ॥ करिशील डोळयांचा अंधार। पाहे जनार निर्वैर। सांडीं धनसंपत्तीचें वारें। कां भुल० ॥ १२ ॥ अंगीं धनसंपत्ती वारें। खाया मिळतील भुतें पोरें। कामा नयेत रे निर्धारें। कां भुल ॥ १३ ॥ रामदासाचें जीवन। तूं कां न करिसी साधन। तोडिल भव बंधन। कां भुललासी ॥ १४ ॥

## ५०

चातुर चातुरसे चटका ॥ ध्रु० ॥ एकएकगुणपरवाडी डारूं। तन मेरं तोरीगये तटका ॥ १ ॥ सुनत देखत गुण प्रगट लोकनमें। आजब ला चटका ॥ २ ॥ रामदास साही सब घटव्यापक। आनंदकी घटका ॥ ३ ॥

## ५१

बाई मी हो मी हो जाहली खरी। खरी गुरुदास। अखिल पदार्थ उदास ॥ ध्रु० ॥ इह पर नश्वर जाणुनि हृदयीं। आलासे बहु त्रास ॥ १ ॥ नित्यानित्यविवेक विचारुनि। सेवितो ब्रह्मरसास ॥ २ ॥ तुर्या उल्लंघुनि उन्मनि सेउनी। स्वस्वरूपीं निजवास ॥ ३ ॥ निजवृत्तीसी देउनि वृत्ती केला अनुभवग्रास ॥ ४ ॥ रामदास प्रभु नित्य उदास। सच्चरणीं[2] विश्वास ॥ ५ ॥

## ५२

आवडतो प्रिय परी गवसेना ॥ ध्रु० ॥ स्वजनाहुनि प्रिय देह आपुला। तोहि विटे परि आपण विटेना ॥ १ ॥ ज्यावरी धांवती इंद्रियमनही। सर्वही दाउनि आपण दिसेना ॥ २ ॥ श्रीगुरुदास्य अनन्य घडे जरी। अनुभवतंतु कधीं तुटेना ॥ ३ ॥

## ५३

कोण मी मज कळतची नाहीं। सारासारविचार शोधुनी पाहीं ॥ १ ॥

---

१ संसाराची ओढ. 'प्रचंड ओढी' असा पाठ. २ साधूंच्या चरणावर.

नारी म्हणों तरी नरची भासे । नर म्हणों तरी समूळ निवासे ॥ २ ॥ दास म्हणों तरि रामचि आहे । राम म्हणों तरि नाम न साहे ॥ ३ ॥

५४

आतां तरि जाय जाय जाय । धरिं सद्गुरुचे पाय ॥ ध्रु० ॥ संकल्प विकल्प सोडुनी राहें । दृढ धरुनी पाय पाय पाय ॥ १ ॥ नामस्मरण ज्या मुखीं नाहीं । त्याणें वांचूनी काय काय काय ॥ २ ॥ मानवतनु ही नये मागुतीं । बरें विचारुनि पाहें पाहें पाहें ॥ ३ ॥ आत्मानात्मविचार न करितां । व्यर्थ प्रसवली माय माय माय ॥ ४ ॥ सहस्त्र अन्याय जरी त्वां केले । कृपा करील गुरु माय माय माय ॥ ५ ॥ रामदास म्हणे नामस्मरणें । भिक्षा मागुनिं खाय खाय खाय ॥ ६ ॥

५५

अरे नर सारविचार कसा ॥ ध्रु० ॥ क्षीर नीर एक हंस निवडिता । काय कळे वायसा[1] ॥ १ ॥ माया ब्रह्म एक संत जाणती । सारांश घेती तसा ॥ २ ॥ दास म्हणे वंद्य निंद्य वेगळें । कर्मानुसार[2] ठसा ॥ ३ ॥

५६

अरे मन पावन देव धरीं । अनहित न करीं ॥ ध्रु० ॥ नित्यानित्यविवेक करावा । बहुजनां उद्धरीं ॥ १ ॥ आत्मा कोण अनात्मा कसा[3] । परपार उतरीं ॥२॥ दास म्हणे तुझा तूंचि सखा रे । हित तुझें तूं करीं ॥३॥

५७

अरे नर सारविचार करीं । मन बरें विवरीं ॥ ध्रु० ॥ सारासारविचार न येतां । वाहसी भवपूरीं ॥ १ ॥ सकळ चराचर कांठुनि जालें । कांठें निमालें तरी ॥ २ ॥ दास म्हणे जरी समजसी तरी । मुठींची सोय धरीं ॥ ३ ॥

५८

भूतकाळीं कर्म केलें वर्तमानीं आलें । त्याचें सुख मानूनियां भोगितां आपुलें ॥ ध्रु० ॥ सुखदुःखभोग जाला तोचि मागिल ठेवा । आतां दुःख मानूं नको करीं राम सेवा ॥ १ ॥ बाईल मेली पोर मेलें द्रव्य नाहीं गाठीं । तळमळ लागली जीवीं कोर होसी कष्टी ॥ २ ॥ जें जें दुःख होतें जिवा तेंचि मागिल कर्म । आतां त्याचें सुख मानी स्मर रामनाम ॥ ३ ॥ नामा विण राहूं नको असा फजित होशी । पुन्हा घडि नये बापा

[1] कावळ्याला. [2] कर्माप्रमाणें. [3] देहात्मविचार.

नरकामध्यें जाशी ॥ ४ ॥ भविष्याचा घोका तुझे हातामध्यें आहे। पळभर विसरूं नको नाहीं कोणी साह्य ॥ ५ ॥ सावध होईं सावध होईं किती सांगूं तुजला। परिणाम कठिण मोठा शरण जाईं गुरुला ॥ ६ ॥ दास म्हणे जालें तें तरी होउनियां गेलें। नको नको म्हणतांहि भोगवितें केलें ॥ ७ ॥ भूतकाळीं० ॥

## ५९

एकला जगदंतर जाहला। आणीक कोणीच नाहीं तयाला ॥ १ ॥ चारी खाणी चारी वाणी। हालवी बोलवी चालवी त्याला ॥ २ ॥ एक धरी एक त्यागीत आहे। आपणा आपण भोगवीत आहे ॥ ३ ॥ दास म्हणे हा बहुविध तमासा। पाहिल तो मग होईल तैसा ॥ ४ ॥

## ६०

ज्या ज्या वेळे जें जें होईल तें तें भोगावें। विवेकाला विसरुनि आपण कष्टी कां व्हावें ॥ ध्रु० ॥ एकदां एक वेळ बहु सुखाची गेली। एकदां एक वेळ जिवा बहु पीडा जाली ॥ १ ॥ एकदां मागूं जातां मिळती षड्रस पक्वान्न। एकदां मागूं जातां न मिळे भाजीचें पान ॥ २ ॥ सुकृत दुष्कृत दोन्ही पूर्वदत्तांचें[1] फळ। ऐसें प्राणी जाणेना तो मूर्खचि केवळ ॥ ३ ॥ देह दुःखास मूळ ऐसें बरवें जाणोन। सुखदुःखाविरहित रामदास आपण ॥ ४ ॥ ज्या ज्या० ॥

## ६१

गणपति गणराज धुंडिराज महाराज। चिंतामणि मोरेश्वर याविण नाहीं काज ॥ ध्रु० ॥ अकार उकार मकार तुझी शुंडा अनिवार। ब्रह्मविष्णु महेश हे तारि तुझेच अवतार ॥ १ ॥ गणेशा त्रिगुण तूं गुणातीत नामरूपाविरहित। पुरुषनाम प्रकृतींत अंत नाहीं हा ॥ २ ॥ सच्चिदानंद देवा आदि अंत तुलाच ठावा। दास म्हणे वरद भावा कृपादृष्टीं हा ॥ ३ ॥

## ६२

घटका गेलीं पळें गेलीं तास वाजे झणाणा। आयुष्याचा नाश होतो राम कां रे म्हणाना ॥ १ ॥ एक प्रहर दोन प्रहर तीन प्रहर गेले। विषयाच्या संगामुळें चारी प्रहर गेले ॥ २ ॥ रात्र कांहीं झोंप कांहीं स्त्रीसंगें गेली। ऐशी आठां प्रहरांची वासलाद[3] जाली ॥ ३ ॥ दास म्हणे तास वाजे सकळां स्मरण देतो। वेळोवेळां राम म्हणा म्हणोनि झणंकारितो ॥ ४ ॥

---

१ पूर्वकर्माचें २ पहा. ३ व्यवस्था.

## ६३

पाहा पाहा या जगांत राम आहे । राम आहे राम आहे राम आहे ॥ ध्रु० ॥ जग हें अवघें रामच सारा । अंतरिं पाहें करीं विचारा ॥ १ ॥ एक सुवर्णीं बहु अळंकारा । तद्वत पाहीं सर्व पसारा ॥ २ ॥ विना कैच्छु नाहीं थारा । रामच रामही घे घे सारा ॥ ३ ॥ दास म्हणे हा रामच भरला । भरला उरला बोलच खुंटला ॥ ४ ॥

## ६४

गुरुदातारें दातारें । अभिनव कैसें केलें ॥ ध्रु० ॥ एकचि वचनें न बोलत बोलुनीमानस विलया नेलें ॥ १ ॥ भूतसंघैकृत नश्वर ओझें । निजबोधें उतरिलें ॥ २ ॥ दास म्हणे मज मीपणविरहित । निजपदीं नांदविलें ॥ ३ ॥

## ६५

मिश्रित सारासार । अरे निवडी तोची चतुर ॥ ध्रु० ॥ ब्रह्म निरंजन अद्वय सत्य । माया जनपर द्वैत अनित्य ॥ १ ॥ पारखीविण खरें निवडेना । मूढ कसें जनहित कळेना ॥ २ ॥ मेळविलें जळ अमृत दोनी । हंस जसें पय घे निवडोनी ॥ ३ ॥ दास म्हणे निज कौतुक मोठें । अनुभव बोलतां शाब्दिक खोटें ॥ ४ ॥

## ६६

ब्रह्मकुमारी शारदा ते वरदा । ब्रह्मकुमारी शारदा ॥ ध्रु० ॥ साधकाचे अभ्यंतरीं । चतुर्विद्या वागेश्वरी ॥ १ ॥ स्फूर्तिरूपें प्रकाशली । वाचारूपें अनुवादली ॥ २ ॥ रामदासी कार्यसिद्धी । चित्तीं सहज समाधी ॥ ३ ॥

## ६७

कथाकथनीं वंदिली सरस्वती । कथाकथना वंदिली ॥ ध्रु० ॥ हंसवहनी वेदमाता । चतुराननाची दुहिता ॥ १ ॥ शब्द ब्रह्माची निजलता । कल्पतरू वाग्देवता ॥ २ ॥ ब्रह्मविद्येची निजखाणी । रामदासाची जननी ॥ ३ ॥

## ६८

पंकजीं मन मुरे । सद्गुरुपादपंकजीं मन मुरे ॥ ध्रु० ॥ मनीं मनपण सर्वेहि आपण । तेण गुणें हांव पुरे ॥ १ ॥ परब्रह्मीं थार होतां अगोचर । तेणें गुणें माया विरे ॥ २ ॥ निजपदीं मन जडतां अभिन्न । निखळ सुख उरे ॥ ३ ॥ हेंचि हें साधन आत्मनिवेदन । मीपण तेंहि नुरे ॥ ४ ॥ रामदासीं रामरूप निजधाम । पावतां निःसंगरे ॥ ५ ॥

---

१ कांहीं. २ पंचमहाभूतांनीं बनलेला देह.

६९

पतीतपावन रे नाम तुझें । पतीत पावन रे ॥ ध्रु० ॥ नाना पंथ नाना मतें । भूमंडळीं असंख्यातें ॥ १ ॥ नाना भाषा देशाचार । कुळाचार वृद्धाचार सार ॥ २ ॥ रामदास ध्यातो मनीं । नामसार त्रिभुवनीं ॥ ३ ॥

७०

रामा रामा रामा रामा । अहो जय रामा रामा रामा रामा रामा ॥ ध्रु० ॥ पतीतपावन दीनबंधु । अहो जय भक्तभूषण दयासिंधु ॥ १ ॥ देवां मंडण देवराया । अहो जय अनाथबंधु कुढावया ॥ २ ॥ रामीं-रामदास म्हणे देवा । अहो जय तुझें भजन पूर्वठेवा ॥ ३ ॥

७१

रामा हो जय रामा हो । पतीतपावना पूर्णकामा हो ॥ ध्रु० ॥ नाथा हो दीनानाथा हो । तुमचे चरणीं राहो माथा हो ॥ १ ॥ बंधु हो दीन-बंधु हो । रामदास म्हणे दयासिंधु हो ॥ २ ॥

७२

टाळ धरूं कथा करूं रामालागीं हाका मारूं ॥ १ ॥ रामा रामा रामा रामा येंरे रामा ॥ ध्रु० ॥ तुजवीण गाये कोण सोडी उठी मीं तूं पण ॥ २ ॥ रामदास पाहे वास भेटी देई सावकाश ॥ ३ ॥ तुझा मज ध्यास कां उदास रे रामा ॥ ४ ॥

७३

तंवरी रे तंवरी वैराग्याचें ठाण । जंव कामिनी कटाक्ष बाण भेदले नाहीं ॥ १ ॥ तंवरीरे तंवरी सदृढता भक्तीची । जंव चाली त्या विक-ल्पाची जाली नाहीं ॥ २ ॥ तंवरी रे तंवरी शब्दज्ञानबोध । जंव तो नर क्रोध पातला नाहीं ॥ ३ ॥ तंवरीं रे तंवरी हें सकळहि बाधक जंव तो रघुनायक न करी कृपा ॥ ४ ॥ रामीरामदास भेटल्या सद्गुरुराव । सक-ळहि भवभाव सुखरूप जाले ॥ ५ ॥

७४

तंवरी रे तंवरी परमार्थ स्वयंभ । जंव पोटागीवरी लोभ आला नाहीं ॥ १ ॥ तंवरी रे तंवरी अत्यंत सद्भाव । जंव तें निःशेष वैभव गेलें नाहीं ॥ २ ॥ तंवरी रे तंवरी धीरत्वाची मात । जंव प्रपंचीं आघात जाला नाहीं ॥ ३ ॥ तंवरी रे तंवरी डगमगीना कदा । जंव देहासी आपदा जाल्या नाहीं ॥ ४ ॥ तंवरी रे तंवरी निराभिमान । जंव देहासी अपमान

जाला नाहीं ॥ ५ ॥ रामदास म्हणे अवघी बुचबंगोळी । ऐसा थोडा बळी जो देहे बुद्धी सोडी ॥ ६ ॥

## ७५

जातो रे काळ जातो रे ॥ ध्रु० ॥ बोलत चालत सेवट आला । कोण राहातो रे ॥ १ ॥ पळघडी दीसमास वरुषें । क्षीणचि होतो रे ॥ २ ॥ दास म्हणे तो येकला जातो लोक पाहतो रे ॥ ३ ॥

## ७६

वेधु लागो रे छंदु लागो रे । भजन तुझें मन मागो रे ॥ ध्रु० ॥ वय थोडें रे बहु झोडे रे । संसार सांकडें थोर कोडें रे ॥ १ ॥ भक्तिभावें रे उद्धरावें रे । संसाराचें दुःख विसरावें सरावें रे ॥ २ ॥ तुझ्या गुणें रे । काय उणें रे । भजन घडावें पूर्व पुण्यें रे ॥ ३ ॥

## ७७

वोळला रे रंग वोळला रे । ताळमृदांगें भव्य कल्लोळला रे ॥ ध्रु० ॥ नाहीं बेतालाचा लेश । ताळबंधें सुंदर वेष ॥ १ ॥ कथेमध्यें तो जगदीश । भक्तालागीं तिष्ठतु ॥ २ ॥ कीर्तीप्रतापाचें गाणें भक्तालागीं श्लाघ्यवाणें । नाना संमती पुराणें । वाग्विलास होतसे ॥ ३ ॥ जेथें कथानिरूपण । तेंचि उत्तम लक्षण । रामदास सांगे खूण । गावे गुण विचारें ॥ ४

## ७८

वदन सुहास्य रसाळ राघव । सर्वांगें तनु सुनीळ ॥ १ ॥ साजिरी वैजयंती हो राघव । पाईं तोडर गर्जती ॥ २ ॥ मृगनाभीं रेखीला टिळा हो राघव । मस्तकीं सुमनमाळा ॥ ३ ॥ सुंदर लावण्य खाणी । राघव उभा कोदंडपाणी ॥ ४ ॥ सकळ जीवांचें जीवन राघव । रामदासीं प्रसन्न राघव ॥ ५ ॥

## ७९

या वैभवाचा वीट कां येना । न ये त्याची सुटिका होयेना ॥ ध्रु० ॥ सकळ गोपिका हरि विरहित सुंदरी । वियोग न कंठे दुःख भारी । कृष्णगोपींचें वियोग दुःख हारी । ऐसा तोहि गेला लाज धरी ॥ १ ॥ वैभव जालिया सुख गेलिया परम शोक । हित नेणें दुःखी होय रंक । तया वोसंडुनी गेला हा विवेक । वय गेलें अंतीं कुंभपाक ॥ २ ॥ वैभव गेलियां जनीं न पुसे तयाला कोण्हीं । अव्हेरिला स्वजन पिशुनीं । वृहखंगतां जाणवेल निर्वाणी । अपंगीना वीण चापपाणी ॥ ३ ॥ विषय

वोरंग करीं स्वहित मनीं धरीं। गुंतों नको प्रपंचविचारीं। वाया कासया शिणसी संसारीं। रामीं रामदास्य दृढधरी ॥ ४ ॥

८०

राजीवनयना रामा। रामा रामा रामा रामा ॥ ध्रु० ॥ धीर उदार सुंदरा। सगुणा गुणगंभीरा। चाल रे करुणाकरा। वाट पाहातो दातारा ॥ १ ॥ देव सोडविले त्रिदश। मजलागी कां उदास। नको कठीण मानस। वाट पाहे रामदास ॥ २ ॥

८१

हरिविण काय रे उद्धवा ॥ ध्रु० ॥ ज्ञान न माने। ध्यान न माने। आणिक व्यर्थ उपाय ॥ १ ॥ नित्य निरंजन ध्याती मुनिजन। मानस तेथ न जाय ॥ २ ॥ निर्गुण ते खुण अंतर जाणें। दास सदा गुण गाय ॥ ३ ॥

८२

दीनदयाळा राघवा पाव रे वेगीं ॥ ध्रु० ॥ दीन अनाथ पतीत अगुणी भजन नेणे कांहीं। तुजवीण मज जनीं पाहतां रे कोण्हीच येथें नाहीं रे ॥ १ ॥ युक्ति कळेना बुद्धि कळेना मन वळेना देवा। विद्या नाहीं वैभव नाहीं ऐसा पूर्व ठेवा रे ॥ २ ॥ भक्ति असेना भाव असेना शांति वसेना अंगीं। रामदास म्हणे दयाळा ऐसा मी भवरोगी ॥ ३ ॥

८३

या राघवाचें भजन सौख्यकारी। दुःख शोकापहारी ॥ ध्रु० ॥ भक्ताभिमानी देव सोडवितो जीव। नाना चिंता निवारी निवारी ॥ १ ॥ नित्य निरंतर जाणतो अंतर। मनासारिखें करी ॥ २ ॥ दुर्जना संहार सज्जना आधार। तो हा कोदंडधारी ॥ ३ ॥ अंतरीं हव्यास पुरते भडस। सत्ता समस्तांवरी ॥ ४ ॥ अनन्य शरण चिंतितो चरण। रामदास भिकारी ॥ ५ ॥

८४

सुरस मधुर वेणु। वाजवितो रुणुं झुणुं। विकळ होताहे प्राणु। भेटीकारणें ॥ ध्रु० ॥ रूप मनीं आठवे। आवडी घेतली जीवें। यदुवीरा पाहावें। सर्व सांडूनी ॥ १ ॥ अखंड लागलें ध्यान। स्वरूपीं गुंतलें मन। सकळ पाहतां जन। आठवे हरीं ॥ २ ॥ सकळ सांडुनी आस। तयालागीं उदास। फिरे रामीं रामदास। वेधु लागला ॥ ३ ॥

८५

सकळ कळांचा हरी। भेटवा वो झडकरीं। तयावीण देहा उरी। नाहीं साजणी ॥ १ ॥ डोलत डोलत चाले। श्रवणीं कुंडल हाले। भेदीक वचन बोले। चित्त चोरटा ॥ ध्रु० ॥ चपळ नयन बाणीं। भेदिले वो साजणी। पाहातां न पुरे धणी। या डोळयांची ॥ २ ॥ ऐसा हरी लाघवी। मुनिजनां वेधु लावी। रामीं रामदास कवी। सावडा म्हणे॥३॥

८६

रामा तूं येरे सखया रामा तूं येरे। तुजवीण मज कोण्ही नाहीं येऊनी भेटीं तूं दे रे ॥ ध्रु० ॥ संसारें गांजिलों सुखदुःखें पोळलों । पराधीन जिणें माझें तुज शरण आलों ॥ १ ॥ वैभवें हीण जाल्या आंपगी कोण। जीवलगें तें पिशुनें ऐसीं जालीं कठीण ॥ २ ॥ प्रपंचीं रंगलों तुझ्या पाईं वोरंगलों । केलें मायेनें चेटक तुझा मार्ग चुकलों ॥ ३ ॥ भेटों येतां तुजला विवेक सांडुनी गेला। तयावीण मी परदेसी बहु सीण वाटला ॥ ४ ॥ वैभवा भजतों गेल्यां निंदक होतों । वृत्ती वैभवीं गुंतली तुझा मार्ग पाहतों ॥ ५ ॥ वरपंग राहिला तुजलागीं प्राण फुटला। माझें अंतर जाणावें। जीव उदास जाला ॥ ६ ॥ दोष आपुले डोळां देखोनी आला कंटाळा। रामदास मुक्त करीं देवा! परम दयाळा ॥ ७ ॥

८७

प्रारब्ध पडिलें तें उणें । काय करील शाहाणें । लौकीक राखिला नवजाय होय लाजिरवाणें ॥ ध्रु० ॥ काय करावें तें कळेना। केला प्रेत्न फळेना। होणार तेंहि न पालटे कर्म रेखा टळेना ॥ १ ॥ अंतरीं विवेक आठवें। परी कांहीं न फावें। पराधीन नाहीं सुटिका तेणें शोक दुणावे ॥ २ ॥ केलियां नव्हे पाठांतर। पडे सर्व विसर। निरूपण सदा ऐकिजे परी नाहीं विचार ॥ ३ ॥ अभ्यास तो सर्व मोडला। परबोध बुडाला। मना ऐसें कांहीं न घडे तेणें संताप आला ॥ ४ ॥ दास म्हणे रघुनायका आतां काय करावें। भक्त म्हणे परी नेणता। मज हातीं धरावें ॥ ५ ॥

८८

देव पावलारे देव पावलारे ॥ ध्रु० ॥ धांवा केला भक्तजनीं। आली देवाची धांवणी ॥ १ ॥ देव घातले बांदोडीं। तेथें राम घाली उडी ॥ २ ॥ रामींरामदासी भेटी। जाली संसाराची तुटी ॥ ३ ॥

८९

हरि पदपंकजीं मानस मधुकरें। विसांवा घेतला गाजतसे झुंकारें ॥ ध्रु० ॥ गाई चारितसे यमुने पावळी। वेणु वाजवी सुस्वर वनमाळी। जळें थोकली यमुना तयेकाळीं। व्रजनायक पिटिती करताळी ॥ १ ॥ उभा देहुडां पाउलीं जगजेठी। आंगीं बाणली वो चंदनाची उटी। बाहुभूषणीं वो केयुरांची थाटी। काखे टेकुनी वो सुंदर वेताटी ॥ २ ॥ वेणु वाजवितो सर्वांगें सुंदरू। कासे कासिला रुळतो पीतांबरु। वांकी चरणीं वो ब्रीदांचा तोडरू। रामदासां स्वामी हा मनोहरु ॥ ३ ॥

९०

चेंडू वायूनें ज़ाला। आकाशें झेलुनी गेला। गोपीकेनें कव घातली। कवटाळीला ॥ १ ॥ कृष्ण चेंडु पाहों गेला। पाहातां गटकावीला। वेणूचा मधुर ऐकिला। स्वर गोपाळीं ॥ २ ॥ रामदास दाताराचें। चरित्र नेणवे साचें। कृष्णें तया चेंडुवाचें। प्राशन केलें ॥ ३ ॥

९१

देखिला नयनीं हो राघव ॥ ध्रु० ॥ ठकाराचें ठाण करीं चापबाण। कोटी मदन वदनीं ॥ १ ॥ पंचक्रोशीवरी दास कृष्णातिरीं। चिंतिताहे मनीं ॥ २ ॥

९२

येरे यादवा येरे माधवा। हृदय निवासा देवा ॥ ध्रु० ॥ काम विराम अंतरीं राम। सर्वकाळ प्रगटावा ॥ १ ॥ उभा राहत वाट पाहत। दास प्राकृत गात ॥ २ ॥

९३

माझे मनीचे मनोरथ पुरेल वो साजणी। घननीळतनु चापपाणी देखोनी ॥ ध्रु० ॥ स्वप्नीं देखिलें तें साचची जालें। तेणें गुणें मन हें निवालें ॥ १ ॥ कल्पिलें तैसेंचि जालें। चिंतिलें फळासी आलें। अंतरीं बिंबलें ध्यान राघवाचें ॥ २ ॥ सगुणें निर्गुण केलें निजरूप लाधलें। रामदास म्हणे भलें नरदेहें ॥ ३ ॥

९४

राघव पुण्यपरायण रे ॥ ध्रु० ॥ दुष्ट संव्हारुनी धर्म स्थापिला। आनंद केला उदंड ॥ १ ॥ धर्मपरायण धार्मिक राजा। सकळहि नीति न्याय ॥ २ ॥ रामराज्य सुखरूप भुमंडळ। दुःख शोक दुरि जाय ॥ ३ ॥

९५

आळस खोटा रे बापा आळस खोटा रे ॥ ध्रु० ॥ घट्टपुष्ट धाटा मोठा । व्यर्थचि ताठा रे बापा ॥ १ ॥ आळस मोठा तोचि करंटा । जाईल कोणा वाटा ॥ २ ॥ दास म्हणे रे यत्न उचाटा । वैभव सर्व लुटा रे ॥ ३ ॥

९६

त्रिविधतापहारक हे गुरुपाय । भवसिंधूसी तारक हे गुरुपाय ॥ १ ॥ स्वात्मसुखाचें बीज हे० । ज्ञानाचें निजगुण हे गुरुपाय ॥ २ ॥ भक्तिपंथासी लाविती हे० । नयनीं श्रीराम दाविते हे० ॥ ३ ॥ सहजशांतीचे आगर हे गु० । पूर्णकृपेचे सागर हे० ॥ ४ ॥ रामदासाचें जीवन हे० । सकळ जीवांसी पावन हे गुरुपाय ॥ ५ ॥

९७

कान्हो सावळा हरि गोवर्धनोद्धारी । रक्षितसे नानापरी । वेणु मंजुळ गे माय वृंदावनीं वो । तेणें नादें मन मोहितो पाहीं ॥ धृ० ॥ ऐकोनि मुरलीसीं तल्लीन जाली कैसी । पशुपक्षी जाहालीं पिसीं ॥ १ ॥ दासां सुख देतुसे तोहा गोपाळ वेषें । आसनीं शयनीं कृष्ण भासे ॥ २ ॥

९८

तोचि येक पुण्यवंत । जया अंतरीं भगवंत ॥ काया वाचा जीवें प्राणें । जगदीशाचा शरणागत ॥ धृ० ॥ नवविधा भजन करी । चितांवरें विवरी ॥ सारासार विचारणा । संग साधूचा धरी ॥ १ ॥ हरिकथा निरूपणें । काळसार्थक करणें ॥ जया नाहीं येणें जाणें । गर्भवास भोगणें ॥ २ ॥ कर्मकांड उपासना । अधिकार त्या ज्ञाना ॥ उदासीन दंभ नाहीं । भ्रष्टाकार करीना ॥ ३ ॥ प्रत्ययाचें समाधान । कांहीं नाहीं अनुमान ॥ निरंजनी निरंजन । दास म्हणे तो पावन ॥ ४ ॥

९९

आजि आनंदु आनंदु आनंदु रे ॥ धृ० ॥ नवमी सुदिन आला राम प्रगटला । नित्य नवा ब्रह्मानंदु रे ॥ १ ॥ निशाचरीं गांजिलें देव आनंदलें । अवतारी स्वानंद कदुरें ॥ २ ॥ वैकुंठींहुनि येणें जालें दीनानाथा । आम्हां सोडविता करुणासिंधुरे ॥ ३ ॥ ऋषिसंत सज्जन उदंड मिळाला मेळा । चर्चा करिती शास्त्र वेदुरे ॥ ४ ॥ हरिदास गजरें गर्जति जय जयकारें वाजविती ताळ मंदमंदुरे ॥ ५ ॥ बहु थाट दाटले भाट वाखाणिती । चपळ बोलती वाणी शुद्धरे ॥ ६ ॥ नाना वाद्यध्वनी उमटती

गगनीं। सकळां लागला समुवेधुरे ॥ ७ ॥ अबीर गुलालाचें धुरार दाटलें। परिमळ येतसे सुगंधुरे ॥ ८ ॥ नायके कव्हाचें कोण्हीं जाली अति दाटणी। ठेविती येकमेकां स्कंधु रे ॥ ९ ॥ पाहतां चापपाणी पुरेना लोचनीं धणी। खणोखणी उभीं वनितां वृंदुरे ॥ १० ॥ श्रवण मनन निजध्यासें समाधान। रामीं रामदासीं निज बोधुरे ॥ ११ ॥

१००

राघवाचा धर्म जागो। किर्ति अद्भुत माजो । ठाईं ठाईं देवाळयें। भक्तमंडळीं साजो ॥ ध्रु० ॥ शक्ति आहें तोंचि फावे। दोन्हि लोक साधावे। इहलोक परलोक। शत्रु सर्व रोधावे ॥ १ ॥ संसारीचें दुःख मोठें। हें मी कोणाला सांगों । जन्म गेला तुजविणें । आणिका काय मी सांगो ॥ २ ॥ मागता समर्थाचा । तेणें कोणां मागावें । रामेविण कोण दाता। कोणा मागें लागावें ॥ ३ ॥ रामदास म्हणे देवा। आतां पुरे संसार। असंख्य देणें तुझें। काय देतिल नर ॥ ४ ॥

१०१

संसार हा दो दिसाचा। याचा भरवसा कैंचा । चालतें तोंचिवरी। पुढें कोण कोणाचा ॥ ध्रु० ॥ कितियेक आले गेले। लोकीं लोक देखिले। येक ते संपन्न जालें। येक भीके लागलें ॥ १ ॥ स्वप्न हें खरें वाटें। जागें होय तंवरी चेईल्या कळों लागे। आपे आप अंतरीं ॥२॥ रामदास म्हणे देवा। तुझी घडावी सेवा। सत्संग सद्वासना। हा तों पूर्वीचा ठेवा ॥३॥

१०२

खरें खोटें परीक्षावें। खोटें जाणोनि त्यागावें। खरें तें शुद्ध घ्यावें। समाधान पावावें ॥ ध्रु० ॥ असत्याचा संग खोटा। घात होतसे मोठा। म्हणोनि तें त्यागावें। जावें सत्याच्या वाटा ॥ १ ॥ सारासार विचारणा। येथें असावी धारणा। कार्य तें सांडोनियां। आधी धुंडावें कारण ॥ २ ॥ रामदास म्हणे नर- । देह दुर्लभ आहे । लागवेग करुनियां । हित आपुलें पाहें ॥ ३ ॥

१०३

संसार संगदोषें। मी गुंतलों कामा। धांवरे धांव आतां । दीन-वत्सला रामा ॥ ध्रु० ॥ मानव देहधारी माझा कि तुला केवा। जाणीव जाणपणें । तुज चुकलों देवा ॥ १ ॥ विषय भोगितां रे। वय वंचलें माझें। स्वहित आठवेना। ध्यान चुकलों तुझें ॥ २ ॥ तारुण्य अभिमानें। देहीं भरला ताठा। वैभव संपत्तीचा। मज फुटला फांटा ॥ ३ ॥ विषयी

मानवती । संपत्ती तंवरी । लक्ष्मी ओसरतां । सर्व राहिलीं दुरीं ॥ ४ ॥ वैभवें मोकलिलों । तुज शरण आलों । धांवरे सोडी आतां । दास डिंगर जालो ॥ ५ ॥

## १०४

सांगावें कोणें कोणा । चिंता आपली आपणा । दुःखें या संसाराच्या । शरण जावें नारायणा ॥ ध्रु० ॥ आत्महित करीना जो । तरि तो आत्मघातकी । पुण्यमार्ग आचरेना । तरि तो पूर्ण पातकी ॥ १ ॥ आपली वर्तणूक । मन आपुलें जाणें । पेरिलें उगवतें । लोक जाणती शाहाणे ॥ २ ॥ सुखदुःख सर्व चिंता । आपली आपण करावी । दास म्हणे शोधुनियां । वाट सुखाची धरावी ॥ ३ ॥

## १०५

भेटी दे रे राम भेटी दे रे ॥ ध्रु० ॥ प्रीती खोटी खंती मोठी । वाटते रे ॥ १ ॥ विवेक येना विसरवेना । काय करावें रे ॥ २ ॥ तुझिया वियोगें घटिका युगें । जातसेरे ॥ ३ ॥ स्वरूप वेधु परम खेदु । वाटतोरे ॥ ४ ॥ भुवनपाळा दीनदयाळा दास हे रे ॥ ५ ॥

## १०६

रामा ये रामराया ये रे ॥ ध्रु० ॥ शरीराचा पांग आता नको रे रामा । देहबुद्धि बेडी तोडी नेई निजधामा ॥ १ ॥ इच्छेचें बंधन माझें तोडुनि टाकावें । मन हें प्रपंचीं रामा गुंतोंचि नेदावें ॥ २ ॥ प्रपंचाचा रंग माझा विरंगोनि गेला । मानसीं सखया ! तुझा वेधु लागला ॥ ३ ॥ सवें त्वां लाविली आतां सांडी कां रे केली । वृत्ति हें निघेना तुझे स्वरूपीं गुंतली ॥ ४ ॥ तुझिया वियोगें जिणें नलगे आम्हांसी । लागलीसे सवें तुझी रामी रामदासीं ॥ ५ ॥

## १०७

रामा रामा रामा रामा रामाहो रामाहो । तारीं तारीं तारीं तारीं आम्हां हो ॥ १ ॥ तोडीं तोडीं तोडीं भवपाश रे पाश रे । अनन्य शरण रामदास रे ॥ २ ॥

## १०८

रामा हो जय जय रामा हो ॥ ध्रु० ॥ श्रापिली अहिल्या सती । हृदईं चिंतित होती ॥ १ ॥ वाइली विमानावरी । गणिका चिंतन करीं ॥ २ ॥ राघवीं बैसली बुद्धी । रामदासीं कार्यसिद्धी ॥ ३ ॥

# (२५) संप्रदायिक पद्धति.

## नित्यनैमित्तिक.

प्रभातकाळीं चतुर्थप्रहरीं उठून हस्तपाद प्रक्षाळण करून, देवदेवतांचें, कुलस्वामीचें, गाय, तुळशी, अश्वत्थ यांचें वंदन करूनः—

प्रातःकाळीं प्रातःस्नान । घडे केलिया स्मरण । महादोषांचें दहन । महिमा गहन पुराणीं ॥ ध्रु० ॥ गंगा यमुना सरस्वती । कृष्णा वेण्या भागीरथी । पूर्णा फल्गु भोगावती । रेवा गौतमी वैतरणी ॥ १ ॥ कुंदा वरदा माहेश्वरी । तुंगभद्रा आणि कावेरी । गणिका तप्ती मलापहारी । दुरितें हरी जान्हवी ॥ २ ॥ काळी कालिंदी किंकिणी । कपिलायणी इंद्रायणी । नलिनी अर्चिनी धर्मिणी । ताम्रपर्णी नर्मदा ॥ ३ ॥ मणिकर्णिका भोगावती । ककुद्मती हेमावती । सीता प्रयाग मालती । हरिद्रुती गंडिका ॥ ४ ॥ भीमा वरदा मंदाकिनी । महापगा पुनःपुनी । वज्रा वैष्णवी कुमुदिनी । अरुणा वरुणा नारदी ॥ ५ ॥ शरयू गायत्री समुद्रा । कुरुक्षेत्र सुवर्णभद्रा । दास म्हणे पुण्यक्षेत्रा । नाना नद्या गोविंदीं ॥ ६ ॥

## भूपाळी रामाची.

राम आकाशीं पाताळीं । राम नांदे भूमंडळीं । राम योगियांचे मेळीं । सर्वकाळीं तिष्ठत ॥ १ ॥ राम नित्य निरंतरीं । राम सबाह्य अभ्यंतरीं । राम विवेकाचे घरीं । भक्तीवरी सांपडे ॥ २ ॥ राम भावें ठायीं पडे । राम भक्तीशीं आतुडे । राम ऐक्यरूपीं जोडे । मौन पडे श्रुतीसी ॥ ३ ॥ राम योग्याचें मंडन । राम भक्तांचें भूषण । राम आनंदाचा घन । करी रक्षण दासाचें ॥ ४ ॥

उठीं उठीं बा रघुनाथा । विनवी कौसल्या माता । प्रभात झालीसे समस्तां । दाखवी आतां श्रीमुख ॥ १ ॥ कनकताटीं आरतिया । घेवोनि क्षमा शांति दया । आली जनकाची तनया । वोवाळाया तुजलागीं ॥ २ ॥ जीव शिव दोघे जण । भरत आणि तो शत्रुघ्न । भाऊ आला लक्ष्मण । मन उन्मन होऊनियां ॥ ३ ॥ विवेक वशिष्ठ सद्गुरु । संत महंत मुनीश्वरू । करिती नामाचा गजरू । हर्षनिर्भर होउनियां ॥ ४ ॥ सुमंत सात्विक प्रधान । घेवोनि नगरवासिजन । आला वायूचा नंदन । श्रीचरण वंदावया ॥ ५ ॥ माझा जिवींचा जिव्हाळा । दीनबंधु दीनदयाळा । भक्तजनाचिया वत्सला । देईं दयाळा दर्शन ॥ ६ ॥ तंव तो राजीवलोचन । राम जगत्रजीवन । स्वानंदरूप होवोन । दासां दर्शन दीधलें ॥ ७ ॥

उठोनियां प्रातःकाळीं मूर्ती चिंतावी सावळी। योगियांचे मेळीं। हृदयकमळीं साजिरी ॥ ध्रु० ॥ राम सर्वांगी सांवळा । हेम अलंकार पीवळा। नाना रत्नाचेया किळा । अलंकार सोभती ॥ १ ॥ पिवळा मुकूट कीरिटी। पिवळें केशर ललाटीं । पिवळया कुंडलांच्या थाटी। पिवळया कंठीं माळिका ॥ २ ॥ पिवळें पदक करभूषणें। बाहुवटीं वरि-कंकणें। पिवळया मुद्रिकांचें लेणें। पिवळें करीं शरचाप ॥ ३ ॥ पिवळा कासे पीतांबर। पिवळया ब्रीदाचा तोडर । पिवळया घंटांचा गज्जर। पिवळया वांकी वाजती ॥ ४ ॥ पिवळा मंडप विस्तीर्ण । मध्यें पिवळें सिंहासन। श्रीराम सीता लक्ष्मण। दास गुण गातसे ॥ ५ ॥

## भूपाळी शंकराची.

धवळे भोळे चक्रवर्ती । धवळे अलंकार शोभती । धवळें धाम उमापती । सदा चित्तीं स्मरावें ॥ १ ॥ धवळया जटा गंगाजळ। धवळा[1] मयंक निर्मळ । धवळे कुंडलाचा लोळ । शंखपाळ लोंबती ॥ २ ॥ धवली स्फटिकांची माळ। धवळे गळां उलथे व्याळ[2]। धवळें हातीं नरकपाळ । धवळा त्रिशूळ । शोभतसे ॥ ३ ॥ धवळा सर्वांगें आपण। धवळें विभूतीचें लेपन । धवळें गात्र धवळें वसन। धवळें वहन नंदीचें ॥ ४ ॥ धवळें कैलासभुवन। धवळें मध्यें सिंहासन। धवळें शंकराचें ध्यान। दास चिंतन करीतसे ॥ ५ ॥

( नंतर तुपांत भिजविलेल्या कांकड्यानें काकड आरती करावी. )

काकड आरती करावी परमात्मया श्रीरघुपती। जिवीं जिवा वोवाळीन निजीं निज आत्मज्योती ॥ १ ॥ त्रिगुणकांकडा द्वैतघृतें तिंबिला। उजळिली आत्मज्योती तेणें प्रकाश जाला ॥ २ ॥ काजळी ना मैस[3] अवघें तेज डळमळा। अवनी ना अंबर अवघें निघोट[4] निश्चळ ॥ ३ ॥ उदय ना अस्त जेथें बोध प्रातःकाळीं । रामीं रामदास सहजीं सहज ओंवाळीं ॥ ४ ॥

' प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ' हे मनोबोधांतील १० श्लोक रोज प्रभातीं म्हणावेत. करुणाष्टकें आळीपाळीनें रोज म्हणावींत.

## प्रार्थना.

कोमळ वाचा दे रे राम। विमळ करणी दे रे राम। प्रसंगवोळखी दे रे राम। धूर्तकळा मज दे रे०। हितकारक मज दे रे०। जनसुखकारक०। अंतरपारख०। बहुजनमैत्री०। विद्यावैभव०। उदासीनता०। मागों नेणे

---

१ पांढरा चंद्र. २ सर्प. ३ मसी, मस. ४ एकमय.

तें० । मज न कळे तें० । तुझी आवडी० । दास म्हणे मज० ॥ १ ॥ संगीत गायन देरे राम । आलापगोडी० । धातमात मज० । अनेकधाटी० । रसाळ मुद्रा० । जाड कथा० । दस्तकताळी० । नृत्यकळा० । प्रबंधसरळी० । शब्द मनोहर० । सावधपण मज० । बहुत पाठांतर० । दास म्हणे मज० । जयजय० ॥ २ ॥ पावन भिक्षा० । दीनदया मज० । अभेदभक्ती० । आत्मनिवेदन० । तद्रूपता मज० । अर्थारोहण० । सज्जनसंगती० । अलिप्तपण मज० । ब्रह्मानुभव० । अनन्यसेवा० । मजविणें तूं मज० । दास म्हणे० ॥ ३ ॥ जयजय रघुवीर समर्थ ॥

( पुढील सगुण–निर्गुण ध्यानें व मानसपूजा यांचा अधिकारपरत्वें अभ्यास ठेवावा. )

## १ ध्यानाचे पूर्वीचा विचार.

श्रीराम समर्थ ॥ सकळ जीवां चैतन्य । सकळिकां समान । त्रैलोक्याचें महिमान । उदकापाशीं ॥ १ ॥ नदीचें उदक वाहात गेलें । तों निरर्थक चालिलें । जरी बांधोनि काढिलें । नाना तीरीं कालवे ॥ २ ॥ उदक निगेनें वर्तविलें । नानाजिनसीं पीक काढिलें । पुढें उदकाचि जालें । पीक सुवर्ण ॥ ३ ॥ तैसें हें आपुलें वय । विवेकेंविण व्यर्थ जाय । विवेकी ते यथान्वय[1] । स्वहित साधिती ॥ ४ ॥ नाना उंच आम्रफळें । अंजीर ऊंस द्राक्षें केळें । नाना पिकें यत्नजळें । निर्माण जालीं ॥ ५ ॥ तैसें आयुष्य आपुलें । विवेकें सार्थक केलें । कां जें शोधूनि पाहिलें । सारासार ॥ ६ ॥ गयाळीपणें मूर्खपणें । संसारांत दिसे उणें । विवेकी जनें याकारणें । स्वहित करावें ॥ ७ ॥ इहलोक परलोक । उभयलोकीं सार्थक । शुद्धज्ञान शुद्धविवेक । यासि म्हणावें ॥ ८ ॥ लोकीं संसार करावा । नाना यत्नें आटोपावा । लोकांमध्यें मिरवावा । पुरुषार्थ आपुला ॥ ९ ॥ कन्या पुत्र योग्य जाले । समर्थ सोयरे पाहिले । ब्राह्मण्यविधि[2]युक्त जाले । स्वाहास्वधा ॥ १० ॥ लोक म्हणती भला भला । यानें इहलोक साधिला । परलोकहि आणिला । पाहिजे मना ॥ ११ ॥ जेणें सकळ निर्माण केलें । त्यासि पाहिजे ओळखिलें । मुख्य देवास चुकले । त्यांस परलोक कैंचा ? ॥ १२ ॥ मागील जन्म आठवेना । पुढील काय तें कळेना । उगाच प्राणी अनुमाना- । मध्यें पडला ॥ १३ ॥ तो अनुमान कामा न ये । अनुमानें कैंचा जये । पिंडब्रह्मांड ग्रंथान्वयें[3] । विवेकें शोधावें ॥ १४ ॥ वेदशास्त्र पंचीकरण । तेथें घालावें अंतःकरण । बरें

१ योग्य मार्गानें. २ ब्राह्मणधर्मानुरूप. ३ ग्रंथश्रवणाच्या मार्गानें.

करावें विवरण । प्रत्ययाचें ॥ १५ ॥ विधीनें सकळ निर्मिलें । विधीस कोणीं निर्मिलें । विष्णूनें सकळांस पाळिलें । विष्णूस पाळिता कोण ॥ १६ ॥ रुद्र सकळां संहारी । त्यास कोण संहारी । ऐसा विचार अंतरीं । बरा शोधांवा ॥ १७ ॥ कर्ता देव बहु म्हणती । त्याची कैंची स्वरूपस्थिती । सगुणनिर्गुण आदिअंतीं । कैसा म्हणावा ॥ १८ ॥ निर्गुणीं नाहीं कर्तृत्वहेत । सगुण तरी नाशिवंत । या कारणें सिद्धांत । विवेकें पहावा ॥ १९ ॥ पुनर्जन्म नाहीं चुकलें । जन्मास येवोनि काय केलें । पुढें लिगांड लांबलें । जन्ममृत्यूचें ॥ २० ॥ अवचटें नरदेह जोडला । पूर्वपुण्यें प्राणियाला । विचार पाहिजे केला । उत्तम गती ॥ २१ ॥ मागें केलें व्यर्थ गेलें । पुढें नाहीं अनुमानलें । येणेंकरितां[२] मूळ जालें । जन्ममृत्यूचें ॥ २२ ॥ ऐसें जालें न पाहिजे । कोणें एकें स्वहित कीजे । परमेश्वरास पाविजे । म्हणजे बरें ॥ २३ ॥ देवाचे सृष्टींत राहावें देवें । निर्मिलें तें पाहावें । नाना वैभव भोगावें । देवाकारितां ॥ २४ ॥ त्या देवास चुकावें । तेणें सर्वस्वास मुकावें । ऐसें न करावें तुकावें । कर्तृत्व आपुलें ॥ २५ ॥ धूकटी उदकाचें लवण । पृथ्वी अंतरिक्षीं धरणें । हें मनुष्याचें करणें । नव्हे सर्वथा ॥ २६ ॥ सामर्थ्य कळों येतें मना । देव पहातां दिसेना । परतु याची विवेचना । पाहिली पाहिजे ॥ २७ ॥

## २ सगुणध्यान.

श्रीराम समर्थ ॥ आतां वंदीन कुलदैवता । लीलाविग्रही भगवंता । जो संकटीं सांभाळिता । आहे निजदासा ॥ १ ॥ एकवचनी एक बाण । एकु पत्नी अभंग ठाण । अजिंक्य राक्षसां निर्वाण । कर्ता समर्थ एकु ॥ २ ॥ धार्मिक पुण्यपरायण । शांत लावण्य सुलक्षण । जेणें त्र्यंबक[३] परम कठीण । भग्न केलें ॥ ३ ॥ जो लावण्याचा जनक । जो सौंदर्याचा नायक । जो मार्तंडकुळदीपक । चातुर्यनिधी ॥ ४ ॥ ऐसा राम राजीवनयन । साधुजनांचें भूषण । त्या प्रभूचें ध्यान । वर्णीन हळुहळू ॥ ५ ॥ टवटवीत रसाळ । निमासुर[४] वदन वेल्हाळ । लावण्य साजिरें केवळ । आनंदाचें ओतिलें ॥ ६ ॥ सुरेख भ्रूलता वेंकटे[५] । सरळ सतेज नासापुट । नीट नेपाळलें[६] ललाट । तेथें त्रिवळी ॥ ७ ॥ केशर ऊर्ध्वपुंड्र ललाटीं । वरी कस्तुरी दुबोटी । सुरंग अक्षता त्रिपुटी । शोभायमान ॥ ८ ॥ रत्नजडित मनोहरें । कुंडलें मकराकारें । श्रवण कोमळ भारें । लंबित जाले

१ यातायात. २ कारण. ३ शिवचाप. ४ सुंदर. ५ वक्र भुवया. ६ नेपाळांत होणाऱ्या कस्तुरीनें भरलें.

॥ ९ ॥ सुरंग लावण्य विचित्र । कोमळ तीक्ष्ण पद्मपत्र[1] । तैसे आकर्ण विशाळ नेत्र । अर्धोन्मीलित ॥ १० ॥ अनर्घ्य रत्नें शुद्ध हेमीं । रत्नखचित फांकती रश्मी[2] । मघवा[3] जैसा वर्षतां व्योमीं । प्रगटे विद्युल्लता ॥ ॥ ११ ॥ तैसेंच किरीट तेजाळ । पीत रक्त फांकती कीळें । विलेपनसाहित्यें भाळ । प्रकाशलें ॥ १२ ॥ अभ्यंग केला चंपकतैलें । कुरळीं गुंफिलीं फुलें । तेणें परिमळें लोधलें । मानस मधुकराचें ॥ १३ ॥ तया कुसुमाचेनि वेधें । रुंजी कारिताती षट्पदें[4] । अंतराळीं झुंकार शब्दें । प्रीतीनें पांगुळती ॥ १४ ॥ दिव्यांबराचा चेपून पट्टा । मस्तकीं वेष्टिला लपेटा । वरी नक्षत्रांऐसा गोमटा । घोंस मुक्ताफळांचा ॥ १५ ॥ नाना सुमनांचिया माळा । मुगुटा वेष्टित घातला पाळा । विविध परिमळ आगळा । नेतसे सुवायो ॥ १६ ॥ सर्वकाळ आनंदवदन । मंदहास्यें झमकती दशनें[5] । कृपादृष्टी अवलोकन । करी निजदासा ॥ १७ ॥ प्रवाळवल्ली परम कठीण । सुरंगचि परि पाषाण । कोमल अधर दृष्टांतहीन । बोलोंचि नये ॥ १८ ॥ कोटीमदन मयंक[6] । उपमे न ये श्रीमुख । पूर्णत्वाचें पूर्ण बिक[7] । लावण्यशोभा ॥ १९ ॥ चुबुकसाजिरी हनुवटी । मुक्तमाळा डोलती कंठीं । मुर्डिव दोर्दंड बाहुवटीं । रत्नकिळा फांकती ॥ २० ॥ शोभे विशाळ वक्षस्थळ । उदरीं त्रिवळी सरळ । तेथें नाभी जन्ममूळ । चतुराननाचें ॥ २१ ॥ रत्नखचित पदक गळां । शोभती पुष्पांचिया माळा । कटीप्रदेशीं मेखळा । जंघन सिंहाकृती ॥ २२ ॥ पीतांबरू मालगंठी । कास काशिली गोमटी । क्षुद्रघंटांची दाटी । गर्जती झणत्कारें ॥ २३ ॥ नाना सुगंध परिमळ । सर्वांगीं उटी पातळ । रुळे वैजयंती माळ । आपादपर्यंत ॥ २४ ॥ करपल्लवीं रत्नभूषणें । आजानुबाहु वीरकंकणें । कीर्तिमुखें सुलक्षणें । केयूरें दंडीं ॥ २५ ॥ आपादपर्यंत पीतांबरू । न कळे जानुजंघाचा विचारू । चरणीं ब्रीदाचा तोडरू । दैत्यपुतळे रूळती ॥ २६ ॥ गुंल्फ[8] वर्तुळ घोटीव[9] निळी । मुर्डीव वांकी खळाळी । अंदुलैंग[10] रत्नें झळाळी । प्रभा तयांची ॥ २७ ॥ पातळ पाउलें कोमळें पदपल्लवीं दशांगुळें । नखतेजेंचि उजळलें । ब्रह्मांड नेणों ॥ २८ ॥ कीं उगवल्या चंद्ररेखा[11] । तैसी शोभा दिसे नखा । सुरंग वर्तुळ टांचा । अरुणोदयासारिख्या ॥ २९ ॥ तळवे सुरंग सतेज । ऊर्ध्वरेखा आणि ध्वज । वज्र अंकुश तेजःपुंज । पद्म झळाळी ॥ ३० ॥ ज्ञानमुद्रा सव्यहस्तीं । पाऊल मांडीवरी येक क्षिती । तेथें पावली उत्तम गती । आहिल्या शिळा

१ कमळ. २ किरण. ३ इंद्र. ४ भ्रमर. ५ दांत. ६ चंद्र. ७ बळ, तेज. ८ घागऱ्यांची. ९ घोटे. १० सांखळीला लाविलेली. ११ नक्षत्रें.

॥ ३१ ॥ ऐशी सर्वांगीं सुंदर । सांवळी मूर्ती मनोहर । राजवेष अतिसुकुमार । शोभे सिंहासनीं ॥ ३२ ॥ परिमळ द्रव्य उधळलें । तेणें श्रीमुख रजवटलें । सतेज किरीटीचें जाळें । करी चित्ततेज मंद[1] ॥ ३३ ॥ सकळ वनितांचें मंडण । परम लावण्य सुलक्षण । जे कां अवनीगर्भरत्न । विश्वमाता ॥ ३४ ॥ ते जानकी जनकतनया । वामांगीं शोभे मूळमाया । दक्षिणे निकट सुबाह्या । उभा लक्ष्मणू ॥ ३५ ॥ भरत शत्रुघ्न लावण्यखाणी । तैसाचि शोभे गदापाणी । हास्यमुखें सुरळीत वाणी । बोलती परस्परें ॥ ३६ ॥ पित्यापरीस अधिकगती । जयावरी रघुनाथाची प्रीती । पुढें सन्मुख मारुती । उभा कर जोडुनी ॥ ३७ ॥ भगवद्दासाचें मंडण । कपिकुळाचें भूषण । सकळ वानरांचे प्राण । रक्षिले जेणें ॥ ३८ ॥ परमप्रतापें आगळा । दिसे जैसा पर्वत निळा । सिंधु उडोनि अवलीळा । जानकी शोधिली ॥ ३९ ॥ स्वयंभ सुवर्णकासोटी । उभा उदितें जगजेठी । आदरें सन्मुख दृष्टी । रघुनाथपादांबुजीं ॥ ४० ॥ रत्नजडित मनोहर । दिव्य सिंहासन सुंदर । वरी आरूढला पवित्र । राजा अयोध्येचा ॥ ४१ ॥ मेघडंबरें छत्रें चामरें । देव ढाळिती अपारें । येक करीं शेसपात्रें । संन्निध उभे ॥ ४२ ॥ येक सुगंध चर्चिती । येक विंझणें जाणविती । उदकपात्रें येका हस्तीं । एक तांबूलधारी ॥ ४३ ॥ खचिंत[3] पादुका येका करीं । येक सुरंग वेत्रधारी[4] । उभे राहिले उभय[5] हारीं । आज्ञा इच्छिती ॥ ४४ ॥ ऐसे अपार सेवकजन । आपुलाले कामीं सावधान । धूर्त तार्किक गुणसंपन्न । कार्यकर्ते ॥ ४५ ॥ खचित मंडप विशाळ । नीळ गोमेद पाच प्रवाळ । नाना रत्नें पुंजाळ । फांकती राजांगणीं ॥ ४६ ॥ चांदवे बांधले विशेष । मुक्ताफळांचे घोंस । जैसें तारांगणीं आकाश । लगडलें दिसे ॥ ४७ ॥ सुवर्णपोटरे स्वयंभ । उभारिले मंडपस्तंभ । रचना पहातां सुलभ । अमरावतीची ॥ ४८ ॥ महाविस्तीर्ण मंडप । खणोखणीं रत्नदीप । किरणें फांकती अमूप । बालसूर्याऐशीं ॥ ४९ ॥ तया मंडपाभीतरीं । दिव्य सिंहासनावरी । बैसला शोभे कैवारी । सुरवरांचा ॥ ५० ॥ वेष्टित ऋषींचा पाळा । वेदाध्ययनघोष आगळा । संतसज्जनांचा मेळा । ठायींठायीं ॥ ५१ ॥ गण गंधर्व विद्याधर । सनकादिक नारद तुंबर । भक्त मिळाले अपार । जयजयकारीं गर्जती ॥ ५२ ॥ ब्रह्मचारी विरक्त तापसी । ज्ञाते दिगंबर संन्यासी । सिद्ध योगेश्वर साधनासी । बैसले ठायीं ॥ ५३ ॥ बैसले पंडित पुराणिक । बैसले कवीश्वर अनेक । बैसले प्रेमळ सात्विक । साधुजन ॥ ५४ ॥ बैसलीं ब्रह्मवृंदें

१ चांचल्य मंद करी. २ समोर. ३ रत्नखचित. ४ भालदार चोपदार. ५ दोन्हींबाजूंस.

निर्मळें। स्नानसंध्याआचारशीळें। धोत्रें पवित्रें सोज्वळें। लंबायमान ॥ ५५ ॥ योगपटे[1] टिळे माळा। नाभीपर्यंत रुळती गळा। भाविक सात्विक लीळा। परम धार्मिक ॥ ५६ ॥ नाना उपकर्णें देवतार्चनें। चंबू गडवे दर्भासनें। नाममुद्रा गोपीचंदनें। साहित्यशोभा ॥ ५७ ॥ येक देवतार्चनें करिती। घंटा घणघणा वाजविती। पुढें मांडून ध्यानमूर्ती। ध्यानस्थ जाले ॥ ५८ ॥ येकीं अंतरीं गरुडध्वजा। सांग मांडिली मानसपूजा। येक लाविती सहजा। अनुसंधान ॥ ५९ ॥ येकां मुखीं नामोच्चार। प्रदक्षणा नमस्कार। नित्य नेम निरंतर। करिती येक ॥ ६० ॥ येक येकांतासी गेले। तेथें ध्यानस्थ बैसले। एक योगाभ्यासी भले। अभ्यास करिती ॥ ६१ ॥ मुद्रा साधिती आसनें। येक मंत्र आवर्तनें। येक स्तोत्रें स्तुतिस्तवनें। अध्ययनें करिती ॥ ६२ ॥ येकीं त्यागिलें अन्न। येक करिती पयःपान[3]। येक ते पर्णें[4] सेवून। राहिले योगी ॥ ६३ ॥ पुरश्चरणी येक तपी। महा साधनें साक्षपी। येक ते लावण्यरूपी। योगाभ्यासें ॥ ६४ ॥ येक निरूपणीं बैसले। ब्रह्मज्ञानी महा भले। श्रोते वक्ते आनंदले। आत्मबोधें ॥ ६५ ॥ अद्वैतनिरूपणें डुल्लती। उपनिषदें वेदश्रुती। पदें फोडूनि वाखाणिती। महानुभाव ॥ ६६ ॥ येक ऐकती पुराणें। सगुणमूर्तींची विंदाणें[5]। येक गाती अभिन्नपणें। गुण सर्वोत्तमाचे ॥ ६७ ॥ वेदशास्त्रसंपन्न। बैसले करिती व्याख्यान। श्रवण करितां श्रोतेजन। संतुष्ट होती ॥ ६८ ॥ येक साधु ब्रह्मनिष्ठ। सर्वसाक्षित्वें वरिष्ठ। येक ते मानसीं तुष्ट। संदेह नाहीं ॥ ६९ ॥ अन्वय आणि व्यतिरेक। येक देहीं जाहले मुक्त। येक मानिती अयुक्त। सर्व चर्चा ॥ ७० ॥ येक तत्वविशोधन। करिती महाविचक्षण। चतुष्टयदेहविलक्षण। म्हणती आत्मा ॥ ७१ ॥ येक पिंडज्ञानबळें। शोधिती अष्टदळ कमळें। येक ध्वनीचेनि[6] मेळें। मिळोनि जाती ॥ ७२ ॥ येक दृश्यातें म्हणती देव। येकीं देवचि केला वाव। येक म्हणती भाव। भंगवंतीं असावा ॥ ७३ ॥ येक म्हणती मिथ्या माया। येक म्हणती पाहिजे क्रिया। येक म्हणती भक्ति केलिया। पाविजे देव ॥ ७४ ॥ येक म्हणती कर्म करावें। येक म्हणती वैराग्य धरावें। येक म्हणती नाम ध्यावें। सर्वकाळ ॥ ७५ ॥ जे जे जेथें विश्वासले। ते ते तेथेंचि राहिले। अनुभव वेगळाले। सिद्धांत येक! ॥ ७६ ॥ ऐसे अपार साधुजन। केलें अष्टविधा भजन। आत्मारामीं सावधान। भक्ती नवविध पावले ॥ ७७ ॥ नवमी

१ श्रेष्ठप्रकारचे भोग. २ ध्यान, एकाग्र चिंतन. ३ उदकपान. ४ वृक्षाचीं पानें. ५ लक्षणें. ६ अनाहतध्वनींत, अजपाजपांत.

आत्मनिवेदन । सायुज्यमुक्तीचें साधन । एके स्थळीं समाधान । पावती सर्व ॥ ७८ ॥ असो ऐसा समुदाव । महामंडपीं बैसले सर्व । सिंहासनीं देवराव । शोभतसे ॥ ७९ ॥ सुधापानें संतृप्त जाले । तैसे सर्व मिळाले । तंव ते हरिदास आले । सर्वोत्तमाचे ॥ ८० ॥ देवापुढें सावडे भक्त । गाती नाचती लज्जारहित । देहभाव विसरोनि चित्त । सर्वोत्तमीं मिळालें ॥ ८१ ॥ कुशळ गायक किन्नर । नृत्य करिती अपार । तेणें वेढिलें[1] राजद्वार । पुढें रीघ न फावे ॥ ८२ ॥ टाळघोळ मृदंग । ब्रह्मविणे वाजती उपांग । हरिदास मिळाले रंग । तुंबळ लागले ॥ ८३ ॥ गर्जती मृदंगकाहळें । आनंदें गाती उसाळें । क्षणोक्षणीं घूसर उसळे । रक्त श्वेत सुगंध ॥ ८४ ॥ साहित्य मृदंग टाळी । सर्वत्र वाजविती करताळी । क्षणोक्षणां नाम कल्लोळीं । गर्जती सर्व ॥ ८५ ॥ रुळती सकळांचिया गळां । जाईजुईचंपकमाळा । नाना सुगंध परिमळा[1] । कर्दम जहाला ॥ ८६ ॥ पताका गरुडटके अपार । तेणें आच्छादिलें[2] अंबर । मेघडंबरें मनोहर । थडकती ठायीं ठायीं ॥ ८७ ॥ पूर्ण चंद्राकार छत्रें । त्राहाटलीं[3] चित्रविचित्रें । गरगरां फिरती अपारें । नाना वर्णें[4] ॥ ८८ ॥ माही निशाणें तळपती । दाढा विक्राळ झळकती । डौल पहातां थरकती । रोमांच अंगीं ॥ ८९ ॥ बहु दाटती सूर्यपानें[5] । फटफट वाजती निशाणें । वाद्यें गर्जती त्राणें दीर्घस्वरें ॥ ९० ॥ टाळ मृदंग शंख भेरी । वाद्यें वाजती अंबरीं । नाना वाद्यांची भरोवरी । गर्जती डंके ॥ ९१ ॥ ध्वज फडकती प्रचंड । वाद्यें वाजती उदंड । तेणें घोष ब्रह्मांड । संपूर्ण जालें ॥ ९२ ॥ नाना रत्नांची फांकली प्रभा । तेणें डावरली[5] सकळ सभा । लावण्य लाजली शोभा । देखोनि ते काळीं ॥ ९३ ॥ जाली अत्यंत दाटणी । तेणें होतसे मंडपघसणी । उभे वारिती वेत्रपाणी[6] । सभा घनवटली[7] ॥ ९४ ॥ सर्वही टकमकां पाहती । पडली देहाची भ्रांती । सकळिकांच्या मनोवृत्ति । वेधल्या रामचंद्रीं ॥ ९५ ॥ वदती वक्ते अनुभवाचे । मस्तक डोलती श्रोत्यांचे । तल्लीन सादर सर्वांगाचे । श्रोत्र केले ॥ ९६ ॥ दिव्य सिंहासनीं रामचंद्र । परम प्रतापी नरेंद्र । सन्मुख उभा भीम कपींद्र । वज्रदेही ॥ ९७ ॥ देवास आरती आरंभिली । सकळ सभा गडबडली । असंभाव्य वाद्यें लागलीं । मर्यादेवेगळीं ॥ ९८ ॥ रत्नदीप हेमताटीं । निरांजनें लक्षकोटी । थाटें चाललीं दाटी । असंभाव्य जाली ॥ ९९ ॥ दीप लागले अपार । बंबाळ जळती कर्पूर । स्थळोस्थळीं मनोहर । रंग-

१ उल्हासानें. २ सिद्ध केलीं. ३ उंच छत्री. ४ अबदागिरी. ५ थक्क झाली. ६ चोपदार. ७ गच्च भरली.

माळा शोभती ॥ १०० ॥ चंद्रज्योतींचे उमाळे । तेणें दिशाचक्र ढवळे[1]
पूर्णचंद्र तये वेळे । राहाटले जैसे ॥ १ ॥ धूसर उठवले अपार । ते
ढवळलें अंबर । मुखें तेजवटलीं थोर । उत्साह जाला ॥ २ ॥ सक
वाद्यें येक वेळा । नामघोषगजर आगळा । आच्छादिलें भूमंडळा
धूसरें तेणें ॥ ३ ॥ रत्नकीळा भूमंडळीं । मुक्तें झळकती अंतराळी
सप्तरंग सभामंडळीं उमटते जाले ॥ ४ ॥ रामाचेनि स्वामीपणें । र
ब्रह्मांड मानीं ठेंगणें । त्रैलोक्यही वाटे उणें । महिमा वर्णितां ॥ ५
राम सर्वांगें सुंदर । राम करुणेचा सागर । दीनअनाथांचा उद्धार
श्रीराम कर्ता ॥ ६ ॥ राम जीवींचा जिव्हाळा । राम मनींचा कोंवळा
राम जाणे अंतर्कळा । निजदासांची ॥ ७ ॥ राम पुण्यपरायण । रा
त्रैलोक्याचा प्राण । रामें दास बिभीषण । चिरंजीव केला ॥ ८ ॥ राक्ष
केले देशघडी । देव सोडिले तेहतीस कोडी । राज्यीं स्थापिलें आवडी
शरणांगत ॥ ९ ॥ राम सुरवरां कोंवसा । राम मंडण सूर्यवंशा । रा
जप भवानीशा । सप्रचिती रामनामें ॥ १० ॥ नामें तरले पाषाण । ना
पतित पावन । नामें मुक्त विश्वजन । शिवाचे उपदेशें ॥ ११ ॥ शुकमि
रामवाणी । म्हणतां पावन कुंटिणी । अंतकाळीं सकळप्राणी । रामना
उद्धरती ॥ १२ ॥ हो कां ज्ञाते विरक्त भक्त । हो कां साधु जीवन्मुक्त
हो कां भाविक साबडे भक्त । नामेंविण वृथा ॥ १३ ॥ सकळांमध्यें थोर
तो नाम जपे शंकर । तेथें मानव किंकर । बापुडें किती ॥ १४ ॥ ना
होय चित्तशुद्धी । नामें तुटे देहबुद्धी । नामें होय कार्यसिद्धी । निजध्या
॥ १५ ॥ नामें स्वहित फावे[3] । नामें निश्चयो दृढावे । नामस्मरणें शी
पावे । देवाधिदेव ॥१६॥ ऐसें हें रामनाम । परम गुह्य विश्रामधाम । मंथू
काढिलें वर्म । शतकोटीचें[4] ॥ १७ ॥ सावध ऐका श्रोतेजन । परम गु
महा गहन । नाममात्रें होत दहन । पापराशी ॥ १८ ॥ यदर्थीं जो संश
धरी । तो महापापी दुराचारी । त्यासि प्राप्त दुराचारी । विकल्पें हो
॥ १९ ॥ इति सगुणध्यानं समाप्तम् ॥

## ३ निर्गुणध्यान.

श्रीराम समर्थ ॥ जेथूनि निर्माण विद्या । तेथें विद्या ना अविद्या
ऐक्यरूपें तया आद्या[5] । नमन भावें ॥ १ ॥ जे निराकारीं जन्मली । जन्म
मूळा प्रसवली । इच्छा द्रुमा धांवली । उभय भागीं ॥ २ ॥ जेथें भंगप

१ स्वच्छ, धवल झाले. २ कैवारी. ३ साधतें. ४ शतकोटी रामायणाचें. ५ मूळपुरुषा

हेत । तें माया नसतां निवांत । तया निवांताचा प्रांत[1] । सद्गुरु स्वामी ॥ ३ ॥ तया सर्वांगें नमन । तैसेच संत सज्जन । आतां आठवूं ध्यान । सर्वोत्तमाचें ॥ ४ ॥ असंगासी घडे संग । आकाशीं उमटे तरंग । तरी अभंगासि भंग । वर्णूं शके ॥ ५ ॥ अघटितही साक्षेपें । घडे स्वामीचे प्रतापें । जैसा अयोध्येचे नृपें । सिंधु पालाणिला[2] ॥ ६ ॥ तैसी सद्गुरुकृपा ओल । तेथें मुकेपणाचे बोल । खुणे बुझतां सखोल । अर्थ लाभे ॥ ७ ॥ तया लाभाचेनि गुणें । जालें ब्रह्मांड ठेंगणें । सद्गुरुकृपास्फुरणें । वाचा वदों लागे ॥ ८ ॥ सहजस्थिती न मोडे । जोडलेंचि मागुतें जोडे । रिघत ठायीं पवाडे । निःशब्दशब्दु[3] ॥ ९ ॥ तये विद्येचें रत्न । न जोडे केलिया प्रयत्न । तें श्रवणें जोडे यत्न । केला पाहिजे ॥ १० ॥ जें पुरुष ना प्रकृती । जें मूर्ती ना अमूर्ती । जेथें श्रुतिस्मृती । निवांत जाल्या ॥ ११ ॥ दृश्य[4]-कुळातें पाळित । म्हणोनि नामें कुळदैवत । दृश्यावेगळें स्वतंत्र । आपण आहे ॥ १२ ॥ तो हा जाणिजे आत्माराम । सगुणनिर्गुण पूर्णकाम । जयाच्या स्वरूपाचा नेम । नकळे सर्वथा ॥ १३ ॥ जैसे कर्पूराचे बंबाळ । नेमून सांगणें बाष्कळ । ज्ञातेपणाची पुष्पावळ । आत्माराम वर्णिती ॥ १४ ॥ परंतु याचे कृपेस्तव । मीपणाचा पुसे ठाव । न वदोन वक्तृत्व-भाव । सहजचि आहे ॥ १५ ॥ बोलत असतां न बोलणें । हे खूण जयांसी बाणे । तेचि श्रोते वक्ते शहाणे । स्वहितविषयीं ॥ १६ ॥ आतां वर्णीन रामराव । जो शंकराचा अंतर्भाव । त्याच्या स्वरूपाकडे धांव । घेतली मनें ॥ १७ ॥ रत्नखचित पादुका । जेथें खुंटती आशंका । जया-पासोनि विवेका । पुढें रीघ नाहीं[5] ॥ १८ ॥ पादुकामध्यें विवेकबळ । करी असंभाव्य तुंबळ । जैसें उष्णामध्यें जळ । हेलावूं लागे ॥ १९ ॥ तैसें द्वैत आहे तोंवरी । विवेक नाना युक्ती करी । अपार तर्क नानापरी । आणून दावीं ॥ २० ॥ मीनाचें चाळकपण[6] । जंव तें जळ आहे संपूर्ण । जळ सोडितां आपण । मृत्यु पावे ॥२१॥ तैसी द्वैतापलीकडे । विवेकाची हांव मोडे । मीनासारिखें मुरडे । अक्षोभ जळीं ॥ २२ ॥ पद प्राप्त जाल्यावरी । विवेकाची कैशी उरी । निर्बुजोनियाँ[7] माघारी । वृत्ति मुरडे ॥ २३ ॥ निजपदीं विवेकासी । मार्ग फुटेना जावयासी । पदपादुका संधीसी । आनंद पावे ॥ २४ ॥ जेथें मीपण सोडिती । सज्जन पुढें पवाडती । जाणीव सोडूनियां श्रुती । गौप्य[8] जाल्या ॥ २५ ॥ जेथें अत्यंत सांकडी । मन संगती सोडी । तर्क जाणीव बापुडी । उभीच विरे ॥ २६ ॥ वेदें

१ शेवट. २ सेतूनें आच्छादिला. ३ निःशब्द अशा ब्रह्मासंबंधीं भाषा. ४ दृश्य संघातास. ५ ज्या पादुकांपुढें विवेक पांगुळतो. ६ चंचळपण. ७ लाजून. ८ मुक्या झाल्या.

जाणोनि मौन्य धरिलें । तें अनुभवा आलें । अनुभवासि अनुभविलें । अनुभवेंविण ॥ २७ ॥ जो मार्ग परम कठीण । न चले भोयाळेवीण । स्वामीविरहित कोण । पावों शके ॥ २८ ॥ जेथें नांव रूप हें झटे । आनंद आनंदीं बुडे । जेथें निःशेष फुंज मोडे । निजसुखाचा ॥ २९ ॥ जेथें विषयसुख आटे । आनंद प्रगटोनि तुटे । जैसा कर्पूरदीप झडे । उजळोनि मुरे ॥ ३० ॥ पदा ऐलीकडील गोष्टी । जेथें पडली विवेकदृष्टी । विवेकबळें तर्क वेष्टी । सीमा पादुकांची ॥ ३१ ॥ रामनिजपदीं दृष्टी पडतां । कैंचा उरेल वर्णिता । जयास वर्णावें तत्वता । तोचि आपण ॥ ३२ ॥ निवांत विश्रांतिस्थळ । उभा विराला ब्रह्मगोळ । निर्मळ स्वरूप निखळ । कोंदाटलें ॥ ३३ ॥ अवघें तेंचि उदंड । वाटे बुडालें ब्रह्मांड । अंधार तुटला निबिड । रामरूप प्रगटलें ॥ ३४ ॥ वर्णितां रघुनाथचरण । अद्भुत भासलें निरूपण । वाटे परंतु परम हीण । पदीं[1] न साहे ॥ ३५ ॥ पदापासोनि साकार । सृष्टी जाली चराचर । तेंचि ध्यान मनोहर । वर्णीन आतां ॥ ३६ ॥ निजपदीं नाम ठेविलें । तीं साजिरीं दोनी पाउलें । जेथें मुनी रंगले । अनुभवें ॥ ३७ ॥ मोक्षध्वज ऊर्ध्वरेखा । ते सायुज्यमुक्ती देखा । वज्र तें अंकुर सुखा । अंकुश शोभे ॥ ३८ ॥ निजसुखाची नवाळी । तो पदीं पद्म झळाळी । दिव्य चक्षूची न्याहाळी[2] । दिपोनि ठेली ॥ ३९ ॥ ज्ञानसूर्य बालप्रभा । ते टांचांची दिव्यशोभा । गुल्फ[3] नीळ तेणें नभा । नीळिमा आली ॥ ४० ॥ पदीं पद महानुभाव । ते पदाचे पदपल्लव । साजिरे शोभती लाघव । युक्तीचें राहिलें ॥ ४१ ॥ शून्यत्व नखाग्रें फेडिलीं । सजीव सतेजें उरलीं । पाहों जातां दिसे बिंबली । स्वरूपस्थिति ॥ ४२ ॥ निजपदापे[4] निवृत्तिगंगा । निघाली भवतापभंगा । श्रवणें निववी जगा । सज्जनसंगें ॥ ४३ ॥ विशाळ ओघ प्रगटला । तिहीं लोकीं प्रगटला । मुमुक्षु-उपेगा आला । ओंकार भगीरथ ॥ ४४ ॥ तये गंगेसी भावार्थी । मननें स्नानें करिती । ते सायुज्यता पावती । निजध्यासें ॥ ४५ ॥ तये गंगेतिरीं स्वानंदें । मिळालीं ब्रह्मवृंदें । स्नानें अद्वैतबोधें । बुड्या देती ॥ ४६ ॥ अनंत जन्माचा मळ । क्रिया पालटे तत्काळ । ऐसें पवित्र गंगाजळ । कर्णद्वारें सेविती ॥ ४७ ॥ जया प्रत्यहीं स्नान घडे । दिवसेंदिवस मळ झडे । अभ्यंतरीं कैवल्यपद जोडे । मननेंकरोनि ॥ ४८ ॥ वासनावस्त्र मळीण जालें । प्रपंचसंग स्नेह लागलें । तें असंजळें धुतलें । शुद्धता पावे ॥ ४९ ॥ ब्रह्मनिष्ठतेचीं वस्त्रें । प्रत्यहीं क्षाळिती धोत्रें । म्हणोनि तीं परम पवित्रें । सर्वकाळ ॥ ५० ॥

१ हें निरूपण तेथें फिकें पडतें. २ पाहणेपण. ३ घोटे. ४ निजपदापासून.

जरी जाला थोर ब्राह्मण । केलें पाहिजे क्षाळण । क्षाळण न करितां मळिण । अमंगळ ॥ ५१ ॥ अहंतेचे डाग पडले । बहुतांचे निघोनि गेले । प्राणी शुद्धत्वें पावले । अक्षय पद ॥ ५२ ॥ येक स्नान करिती । परि मळ ठेविती । ऐशा स्नानें फळश्रुती । होणार नाहीं ॥ ५३ ॥ जे संसार उष्णें पोळले । ते गंगाजळें निवाले । परम विश्रांती पावले । सत्संगें शीतळ ॥ ५४ ॥ जे असंतप्त संसारीं । ते मळीण बैसले भीतरीं । हुडहुडी अंगावरी । महामोहाची ॥ ५५ ॥ भाविक गंगेंत पडले । ते वाहताचि उगमा गेले । गंगेसहित प्रवेशले । श्रीरामपदीं ॥ ५६ ॥ उगमाहुनि गंगा पडे । तेथोनि पांवे उगमाकडे । मागें जावोनि पडे । जेथील तेथें ॥ ५७ ॥ गंगे पुढें आणि मागें । अवघा उगम निजांगें । उगमेंचि व्यापिलें गंगे । सबाह्य उगम ॥ ५८ ॥ जे जे उगमासि गेले[1] । ते उगम होवोनि राहिले । सदा सर्वांगीं निवाले । आनंदरूप ॥ ५९ ॥ गंगोदक कर्णीं भरलें । तें सुखें उचंबळलें । पुन्हा उपेगा आलें । भाविकासी ॥ ६० ॥ महिमा गोदावरीचा । मार्ग दाखवी मोक्षाचा । श्रीरामपदांबुजाचा । अगाध महिमा ॥ ६१ ॥ आतां असो ही खुण । मागें राहिलें निरूपण । ध्यान रामाचें श्रवण । श्रोतीं करावें ॥ ६२ ॥ स्वरूपीं मुरडे वृत्ती । तैशा वांकी खळाळिती । मुरडल्या परी असती । जेथील तेथें ॥ ६३ ॥ कामक्रोधादि निशाचर । त्यांचा करोनियां संहार । तोचि निजपदीं तोडर । गर्जे प्रतापें ॥ ६४ ॥ जानूपर्यंत पीतांबर । नकळे जानुजंघा विचार । जैसा आकार निराकार । आच्छादिला ॥ ६५ ॥ बुद्धीताम्रपर्णीचे जळें । स्वरूपसागरीं मिळाले । तया संगमीं मुक्ताफळें । मुक्तपणें होती ॥ ६६ ॥ देहबुद्धीचे शिंपले । ज्ञानदृष्टी विकासले । जीवन पडतां बुडाले । कठीणपणें ॥ ६७ ॥ तया शिंपल्यांकरितां । आली कठिणता । जीवना परी ऐक्यता । तुटोनी गेली ॥ ६८ ॥ उकलोनि पाहिलें । जीवन निःशेष गेलें । तें पाषाणरू जालें । संगगुणें ॥६९॥ जें दुर्लभ जगासी । परंतु जालें येकदेशी । ऐक्यरूपें जीवनासी । मिळों नेणे ॥ ७० ॥ मुक्तपण अंगीं जडलें । तेव्हांचि वेगळें पडलें । अभिन्नत्व विघडलें । वेगळेपणें ॥ ७१ ॥ सगुणपल्लवीं जडतां । त्यासि होय सार्थकता । सगुणीं जडलें नसतां । व्यर्थचि गेलें ॥ ७२ ॥ जें सगुणपल्लवीं जडे । तें सर्वथा भिन्न न पडे । ऐसीं मुक्तें अपाडें । तळपती पल्लवाग्रीं ॥ ७३ ॥ प्रबोधसिंह विवेकबळें । भवगजाचीं गंडस्थळें । विदारित संसारसळें । महाबळी ॥ ७४ ॥ तया सिंहाचें मुख्य मान । तैसें शोभे सान जघन । जेथें असे गुह्य स्थान । जें बोलतांचि न ये ॥ ७५ ॥

१ येथें दासबोधांतील 'चंचळनदी'चा समास समग्र पहावा. २ पुष्कळ.

जें गुरूचें निजगुह्य । कळल्याहि बोलों नये । तेथील सुख जानकीगुह्य[1]
सज्जनविचारीं ॥ ७६ ॥ असो ऐसें गुह्यस्थान । आच्छादूनियां वसन
वेष्टित शोभे जघन । कशिला जेणें ॥ ७७ ॥ तयावरी कटिसूत्र मेखळा
क्षुद्रघंटिका सोज्वळा । जैशा बोधसूर्याच्या कळा । फांकती रश्मी ॥ ७८
क्षुद्रदृष्टीचा वाटा । म्हणोनि नामें क्षुद्रघंटा । त्या अधोमुखें दृष्टा । म्ह
णोनी आहेती ॥ ७९ ॥ भ्रम हा निःशेष उडे । तेचि शोभती पवाडे
समाधानीं प्रीति जडे । तैशा जडती किंकिण्या ॥ ८० ॥ निरावलंबीं जं
अवलंबिली । नसोन इच्छा उभारिली । तेचि नलिनी प्रगटली । मूळ
माया ॥ ८१ ॥ जें निर्मळ स्वानंद जळ । आदिअंतीं एकचि निखळ
तेथें इच्छारूप कमळ । प्रगटलें बळें ॥ ८२ ॥ तयापासून कमळा । पूर्व
होता संकोचला । तो गुणक्षोभें विकासला । रहस्यरूपें ॥ ८३ ॥ तय
अभ्यंतरीं पत्रें । सकुमारें चित्रें विचित्रें । सुरंग रंगाचीं अपारें । नान
वर्णें ॥ ८४ ॥ तेंचि साजिरें नाभिकमळ । जें ब्रह्मदेवाचें जन्ममूळ । तय
कमळाचा तळ । त्याचा अंत न लागे ॥ ८५ ॥ विधि जन्मे नाभिकमळा
मनीं आवेश आगळा । पाहीन म्हणे जन्ममूळा । तर्कनळाचे बळें ॥८६॥
त्या मूळा शोध न करी । तो लागे दुरिचा दुरी । निबुंजोनियां माघारीं
वृत्ती मुरडे ॥ ८७ ॥ तेथोनि निघाला । आपुले स्थानासी आला । कांहं
न स्मरे बुडाला । शून्यत्वडोहीं ॥ ८८ ॥ तेथें मन निबुंजिलें । स्वामीचं
स्तवन केलें । सद्भाव देखोनि संभाळिलें । सद्गुरुराजें ॥ ८९ ॥ प्रगटल
स्वामीरावो । हंसरूपें देवदेवो । ज्ञान देवोनियां ठावो । फेडी अज्ञानाच
॥ ९० ॥ म्हणोनियां जन्ममूळाचा ठाव । मीपणें घेईन हें वाव । निबुं
जला ब्रह्मदेव । इतर ते किती ॥ ९१ ॥ शोध घ्याया हांव जेथें । मीपण
लपोनी बैसे तेथें । मीपण योगियासी पंथें । मार्ग न चले ॥ ९२ ॥ सं
सोडीना मीपण । म्हणोनी परमार्थ कठीण । मीपण सोडितां खूण
बाणे अनुभवाची ॥ ९३ ॥ जंव जंव कमळ वाढे । तंव तंव कठिणत
चढे । कठिणपणें नातुडे । जन्ममूळा ॥ ९४ ॥ जीवनापासोनि जालें
जीवनासी अंतरलें । जीवनीं परी स्पर्शिलें । नाहीं जीवनासी ॥ ९५ ।
या नांव स्वानंदजळ । तें ऐलीकडे सकळ । सांडूनियां गेला नळ
भूमीच्या पाठीं ॥ ९६ ॥ जीवन आणि नलिनी । मिळोनियां कमळिणी
कमळणी चाळक धणी । त्या स्वामित्व नलगे ॥ ९७ ॥ मूळमायेचें पिसें
आलें घरपणाचे मिसें । पिसेपणीं आपैसें । पूर्णत्वपण ॥ ९८ ॥ पूर्ण
अपूर्णपणाचा कळंक । अपूर्णपणें लाविती लोक । अपूर्णा पूर्ण विवेक

१ मूळमायारहस्य.

कमळकोशीं ॥ ९९ ॥ विवेकाचा परिमळ । घेती संत षट्पदकुळ । गुणगुणिती सकळ । लोधले विवेका ॥ १०० ॥ परिमळ घेऊन निघाला । तयास विवेक पावला । विवेकेंसी अडकला । तयास बंधन ॥ १ ॥ यापरी नाभिकमळ । उदरीं ब्रह्मांडगोळ । मायोपाधी सकळ । होत जात ॥ २ ॥ सत् चित् आणि आनंद । हे त्रिपुटी जिवें मंद । तेचि सुखानंद दोंद । शोभे उत्तमाकृती ॥ ३ ॥ शिवशक्ती ऐक्य दिसे । देखणें स्वयंभ असे । विशाळ वक्षस्थळ तैसें । शोभे दों अंगीं ॥ ४ ॥ वामांग ती मायाशक्ति । दक्षिण ते पुरुषव्यक्ती । दोनी मिळोनि आदि अंतीं । येकचि अंग ॥ ५ ॥ विदेहीपणाचें कोदंड[1] । भग्न केलें महाप्रचंड । तेचि मूर्डीव दोर्दंड । ज्ञानशक्ती ॥ ६ ॥ तया कोदंडाचे बळें । रजोगुण क्षत्रियमुळें छेदोनी ब्रह्मकुळें । सुखी केलीं ॥ ७ ॥ ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण केवळ । विधियुक्त आचारशीळ । विवेकसंयुक्त निर्मळ । भ्रांतीवेगळे ॥ ८ ॥ सत्वगुणाचे आधारें । भजती हर्षें थोरें । तैसीं नसती पामरें । रजोगुणी ॥ ९ ॥ रजोगुणी क्षत्रिय जाले । ब्राह्मण राज्यभ्रष्ट केले । अवघे आपणचि जाले । अधर्मी दुरात्मे ॥ १० ॥ माझें माझें करीत धांवती । सात्विक पळोनी जाती । सावकाश राज्य करिती । रजोगुणें क्षत्रिय ॥ ११ ॥ म्हणोनि षष्ठावतार[2] । महाप्रतापी विचार । तेणें रजोगुणसंहार । बळें केला ॥ १२ ॥ राज्य दिलें ब्राह्मणांसी । आनंद जाला सात्विकांसी । पुनः पुन्हा क्षत्रियांसी । देशधडी केलें ॥ १३ ॥ जगीं क्षत्रिय महाक्रूर । परम प्रतापी अनावर । तयां निर्दाळूनि विचार । आनंद मानी ॥ १४ ॥ तया विचाराचें ज्ञातेपण । तें कोदंड महा कठीण । अभंग जाणोनि पण । विदेहें केला ॥ १५ ॥ सकळ पृथ्वीचे ठायीं । कोदंड भंगीसा नाहीं । परम प्रतापी तेही । साशंक जाले ॥ १६ ॥ रामीं शरण अनन्यभावें । तेंही स्वयें रामचि व्हावें । राम जालिया स्वभावें । भंगे धनुष्य ॥ १७ ॥ परंतु हें महाप्रचंड । भंगलें न जाय कोदंड । कठीण ज्ञातेपणाचें बंड । भंगणार नाहीं ॥ १८ ॥ ऐसें जें कां अनावर । गुणीं लाऊन केलें चूर । तेंचि दोर्दंड अपार । ज्ञानशक्ती जेथें ॥ १९ ॥ तये शक्तीचेनि बळें । रणा आलीं महा ढिसाळें । क्रूर तामसें विखाळें । विकाळवाणी ॥ २० ॥ गुणीं लावूनियां शर । कुबुद्धि ताटिकाशिर । तोडूनियां ऋषीश्वर । सुखी केले ॥ २१ ॥ जे कुपात्रामाजी भूषण । निर्दाळिले खर दूषण । कपटरूपें ये हरिण । तोही पिटिला ॥ २२ ॥ मकरध्वज[3] महाबळी । देवा आणि दानवां बळी । जेणें घातिलें पायांतळीं । महानुभाव ॥ २३ ॥

[1] धनुष्य. [2] परशुराम. [3] मदन, श्लेषार्थानें वालि.

आजकपणाचे माजें । अभिलाषिलें[1] अनुजभाजे । देहाभिमानफुंजें । बंधु दवडिला ॥ २४ ॥ ऐसा जो परम प्रतापी । बळिया वितंडरूपी । तोही निर्दाळिला कपी । दोर्दंडबळें ॥ १२५ ॥ वर्णावया दोर्दंडशक्ती । इतुकी मज कैंची मती । आदिकरोनि सुरपती । अमर मुक्त केले ॥ २६ ॥ निजशक्ती वानितां हरिखें । सज्जन संतोषती सुखें । तेंचि शोभती कीर्तिमुखें । वेद वाखाणिती ॥ २७ ॥ दोर्दंड वेष्टित बाहुवटे । साहित्यप्रतापें गोमटें । जेथें शत्रुकुळ आटे । अहंकारादि ॥ २८ ॥ दुस्तर जे महाबळी । त्यांचा करोनि रेंवंदळी[2] । शोधूनि रणमंडळी । निर्मूळ केलें ॥ २९ ॥ दुष्ट वीरांची संपली उठी[3] । तेंचि वीरकंकणें गोमटीं । रत्नजडित मणगटीं । प्रतापकिरणें ॥ ३० ॥ सुख पाविजे अभयकरें । रत्नभूषणें मनोहरें । नवविधा भजनद्वारें । फांकती किरण ॥ ३१ ॥ जेथें आटती सर्व रंग । तेंचि साजिरें सर्वांग । अति सकुमार संगं[4] । सुमनाचा न साहे ॥ ३२ ॥ सगुण निर्गुण नकळे । शुद्ध भावार्थें आकळे । लावण्यरूप सांवळें । सुनीळ शोभा ॥ ३३ ॥ सत्वचंदनाचा गाळ । लाविली उटी पातळ । शांती वैजयंतीमाळ । आपादपर्यंत ॥ ३४ ॥ मूळतंतु जो ओंकार । मातृका सुमनहार । नाना पुष्पांचे अपार । रुळती गळां ॥ ३५ ॥ नित्यमुक्त मुक्ताफळें । स्वप्रकाशें तीं सोज्वळें । मुक्तपणाचे विटाळें । स्पर्शलीं नाहींत ॥ ३६ ॥ ऐसी मुक्तमाळा साजिरी । अखंड हृदयावरी । अति आदरें धरी । देवाधिदेव ॥ ३७ ॥ तया मुक्तांच्या निजवृत्ती । किरणासारिख्या फांकती । ऐक्यरूपें मिळोनि जाती । निजपदकीं ॥ ३८ ॥ आकाशीच चंद्रमंडळ । केवळ पूर्णपणें वर्तुळ । परम लावण्य शीतळ । अमृतमय जें ॥ ३९ ॥ तयासारिखें वदन । तें मंडळ[5] कळाहीन । तयासि अपूर्णपण । कलंक लागला ॥ ४० ॥ मागां वर्णिलें शरीर । त्या शरीराचें निजसार । तेंचि वदन मनोहर । आनंदमय ॥ ४१ ॥ कीं आनंदाचें ओतिलें । कीं तें स्वरूप मुसावलें । लावण्यासी लावण्य आलें । ज्याचेनि ॥ ४२ ॥ शब्द निघतां हास्यवदन । शरणांगतां आश्वासन । तेणें झमकती दशन । डाळिंबबीजा ऐसे ॥ ४३ ॥ येकीं अनेक ऐक्य आलें । तें तांबूल मिश्रित जालें । येकपणें रंगोनि गेलें । अभिन्नत्वें ॥ ४४ ॥ अधर प्रवाळवल्ली । मी म्हणतां ऐक्य आली । तेणें मिठी पडली । निवांत शब्दीं ॥ ४५ ॥ अंत न कळे शब्दाचा । तेथें उत्पन्न चारी वाचा । वेदशास्त्रपुराणांचा । विस्तार जाला ॥ ४६ ॥ निजशब्दाचें अंतर । शब्दीं तयाचा विचार । लब्ध होय निजसार । स्वानुभवें ॥ ४७ ॥ वक्तृत्वें

१ सुग्रीवाचे स्त्रीस. २ नाश. ३ उठाव, बंडें. ४ स्पर्शेही. ५ चंद्रबिंब.

त्रिपुटी आटे। तेंचि श्रीमुख गोमटें। हनुवटी चुबुक प्रगटे। मंद मंद श्मश्रू ॥ ४८ ॥ समता भ्रुकुटीचा प्रकार। सरळ नासिक मनोहर। जेथें स्वयंमेव बिढार[1]। विश्रांती घेत ॥ ४९ ॥ मागें वर्णिलें पद्मपत्र तेथील देखणें विचित्र। लावण्य विशाळ नेत्र। लक्षिले न वचती ॥ १५० ॥ द्रष्टेपणाची त्रिपुटी। लक्ष अलक्ष मूळ तुटी। तेणें गुणें प्रकाशदाटी। प्रकाशाविज ॥ ५१ ॥ चक्षूचें देखणें सरे। ज्ञानदृष्टी पाहोनी विरे। देखणेपणेंविण उरे। सर्वांगदेखणा ॥ ५२ ॥ अखंड चक्षु अर्धोन्मीलित। सकळ देखण्याचा प्रांत। जेथें अगोचरीसहित। मुद्रा आटती ॥ ५३ ॥ श्रवण मनन निजध्यास। साक्षात्कारें जडे विश्वास। परमानंद सावकाश। होइजे स्वयें ॥ ५४ ॥ मुमुक्षु साधक सिद्ध जाले। तेही येणेंचि मार्गें गेले। निखळ सुखें सुखावले। महानुभाव ॥ ५५ ॥ योगी वीतरागी उदास। चतुर्थाश्रम जो संन्यास। दिगंबर नाना तापस। येणेंचि मार्गें ॥ ५६ ॥ जोगी जंगम आणि सोपी। फकीर कलंदर नानारूपी। येणेंचि मार्गें स्वरूपीं। पावती सकळ ॥ ५७ ॥ ऋषि मुनी आणि सुरवर। आदि करूनियां हरिहर। येणेंचि मार्गें पैलपार। पावती सकळ ॥ ५८ ॥ असो ऐका श्रवण पुढें। श्रोतव्यत्रिपुटी[2] आटे। परम गुह्य प्रगटे। अनिर्वाच्य ॥ ५९ ॥ तेचि कुंडलें मनोहरें। रत्नजडित मकराकारें। तळपती श्रोत्र भारें। लंबित जाले ॥ ६० ॥ शुद्ध स्वरूपीं शुद्ध ज्ञान। आहेचि तैसें विलेपन। मृगमदमिश्रित[3] चंदन। नाना परिमळ ॥ ६१ ॥ मनोमृगातें मारुनी। काढिली कस्तुरी उन्मनी। हेतुरूपें विलेपनीं। ऐक्यता जाली ॥ ६२ ॥ शुद्ध स्वानुभवाचीं फुलें। तीं मस्तकीं चर्चिलीं तैलें। तेंही मस्तकीं जिरालें। ऐक्यरूपें ॥ ६३ ॥ तेणें बळें चांचर कुरळ। बाहेर आले प्रबळ। जेथें बद्धपणाचा मळ। निःशेष नाहीं ॥ ६४ ॥ अतिसूक्ष्मीं सूक्ष्मदृष्टी। तेचि साजिरी वीरगुंठी[4]। पाहातां तर्ककला मोठी। मागें राहिली ॥ ६५ ॥ जेथें तर्कजाणीव गळाली। तीच किरीटीं झळाळी। जेथोनि फांकती कपाळीं। रम्य किळा ॥ ६६ ॥ जें इतुक्यांचा शेवट। तोचि मस्तकीं मुगुट। तेथोनि सर्वही खटपट। निवांत जाली ॥ ६७ ॥ ऐशी सर्वांभूतीं भूषित। स्वयंभ मूर्ती आदिअंत। सृष्टिरचना होत जात। द्वारां तयाच्या ॥ ६८ ॥ राम लक्ष्मण सीता। भरत शत्रुघ्न हनुमंता। सकळिकां भक्तांसी ऐक्यता। भेटी जाली ॥ ६९ ॥ मागां जाहाले आतां होती। होऊनि नाहीं पुनरावृत्ति। ऐसी अभंग

१ विश्रांतीनें विश्रांति घेतली. २ श्रोता, श्राव्य विषय, व श्रवण करणें हीं तीन. ३ कस्तुरीयुक्त. ४ बद्धकेश.

ऐक्यस्थिति । वर्तल्यासहित ॥ ७० ॥ सकळ भक्त मिळाले । हरिहर-ब्रह्मादि आले । ऐक्यरूपें राम जाले । रामेंसहित ॥ ७१ ॥ जितुकें दृश्य साकार । आहे अनमेय अपार । तेंचि उसळलें धूसर । रक्त श्वेत सुगंध ॥ ७२ ॥ पंचभूतीं कर्पूरगोळ । ज्ञानरूपें जाला प्रबळ । ओवाळूनियां सकळ । निवांत जाले ॥ ७३ ॥ गेला कर्पूर जळोनी । राहिला अनुहत ध्वनी । ऐक्यरूपें समाधानी । सकळ राहिले ॥ ७४ ॥ चार देहांची कुर-वंडी । दास ओवाळूनि सांडी । श्रोते वक्ते आवडी । ओवाळिले ॥ ७५ ॥

॥ निर्गुणध्यान संपूर्ण ॥

---

## ४ मानसपूजा.

१

श्रीराम समर्थ ॥ संगीत स्थळें पवित्रें । तिकट्या वोळंबे सूत्रें । निवती विस्तीर्ण स्वतंत्रें । उपसाहित्याचीं ॥ १ ॥ तुळसीवनें वृंदावनें । सुंदर सडे संमार्जनें । ओटे रंगमाळा आसनें । ठाईं ठाईं ॥ २ ॥ गवाक्षें दिंड्या खिडक्या मोऱ्या । बंक[1]दर्वार पाहिऱ्या । सोपे माड्या ओहऱ्या । ठाईं ठाईं ॥ ३ ॥ ध्वज गोपुरें शिखरें । भुयारें तळघरें विवरें । मंडप राजांगणें गोपुरें । दारवंटे ढाळजा ॥ ४ ॥ देवालयें रंगशिळा । चित्रविचित्र दीप-माळा पोहिया पादुका निर्मळा । आड बावी पुष्कर्णी ॥ ५ ॥ विशाळ तळीं सरोवरें । मध्यें तळपती जळचरें । ब्रह्मकमळें मनोहरें । नाना रंगें विकासती ॥ ६ ॥ गोमुखें पाट कालवे । साधूनि बांधूनि आणावे । स्थळो-स्थळीं खेळवावे । नळ टाकीं कारंजीं ॥ ७ ॥ पुष्पवाटिका वृक्ष बनें । नाना-प्रकारचीं धनें । पक्षी श्वापदें गोधनें । ठाईं ठाईं ॥ ८ ॥ सभामंडप चित्र-शाळा । स्वयंपाकगृहें भोजनशाळा । सामग्रीगृहें धर्मशाळा । मठ मठ्या नेटक्या ॥ ९ ॥ एकांतगृहें नाट्यशाळा । देवगृहें होमशाळा । नाना गृहें नाना शाळा । नानाप्रकारीं ॥ १० ॥ ऐसीं स्थळें परोपरी । नाना युक्ती कळाकुसरी । निःकामबुद्धी जो करी । धन्य तो साधु ॥ ११ ॥ इति श्री-मानसपूजा । मनें पूजावें वैकुंठराजा । साधकें अगत्य आत्म[2]काजा । करीत जावी ॥ १ ॥

२

श्रीराम समर्थ ॥ आतां पारिपत्य[3] ऐकावे । उत्तम गुणाचे आघवे । जयांस देखतां मानवे । विश्वलोक ॥ १ ॥ धीर उदार सुंदर । दक्ष व्युत्पन्न

---

१ बंक=चौकी. २ आत्महितार्थ. ३ समाचार, व्यवस्था.

चतुर । सकळ प्रयत्नीं तत्पर । अत्यादरें ॥ २ ॥ दूरदृष्टी दीर्घप्रयत्नी । समय प्रसंग जाणे चिन्हीं । नासला फड नेटका वचनीं । बोलोन करिती ॥ ३ ॥ जाणती दुसऱ्याचें अंतर । सावधानता निरंतर । नेमस्त न्यायाचें उत्तर । बाष्कळ नाहीं ॥ ४ ॥ पवित्र वासनेचे उदास । केवळ भगवंताचे दास । सारासारविचारें वास । हृदयीं केला ॥ ५ ॥ अगाध अव्यग्र[1] धारणा । मिळोनि जाती राजकारणा । कार्यभागाची विचारणा । यथायोग्य योजिती ॥ ६ ॥ न्याय नीति मर्यादेचा । स्नान संध्या पवित्रतेचा । सत्यवादी बहुतांचा । अन्याय क्षमित ॥ ७ ॥ चुकणें विसरणें असेना । मत्सर पैशुन्य[2] दिसेना । कोप क्षणिक असेना । निरंतर ॥ ८ ॥ हरिकथानिरूपण । तेथें प्रेमळ अंतःकरण । पाहों जातां उत्तम लक्षण । सकळ असे ॥ ९ ॥ ऐशा प्रकारचे पारिपत्य । करूं जाणती सकळ कृत्य । धन्य धन्य कृतकृत्य । निःकामतेनें ॥ १० ॥ ऐसे भले परमार्थी । श्रवण मनन अर्थाअर्थी । जे परलोकींचे स्वार्थी । परोपकारी ॥ ११ ॥ इति श्रीमानसपूजा । मनें० ॥ २ ॥

३

श्रीराम समर्थ ॥ आतां ऐका स्वयंपाकिणी । बहु नेटक्या सुगरिणी । अचूक जयांची करणी । नेमस्त दीक्षा ॥ १ ॥ शुचिष्मंत बाह्य निर्मळ । सौक्षेपणी[3] बहु चंचळ । नेमक निष्टंक केवळ । उमा रमा ॥ २ ॥ ज्यांची भगवंतीं आवडी । श्रीहरिभजनाची गोडी । मनापासोनि आवडी । कथाकीर्तनाची ॥ ३ ॥ शक्ति युक्ति बुद्धि विशेष । नाहीं आळसाचा लेश । कार्यभागाचा संतोष । अतिशयेंसी ॥ ४ ॥ कदा न आवडे अनर्गळें[4] । वस्त्रें पात्रें झळफळ । नेमकें[5] करणें ढेसाळ[6] । यथातथ्य ॥ ५ ॥ गोड स्वादिष्ट रुचिकर । येक हृदयतत्पर । न्यूनपूर्णाचा विचार । कदापि न घडे ॥ ६ ॥ रोगी अत्यंत खंगलें । तेणें अन्न भक्षिलें । भोजनरुचीनें गेलें । दुखणें तयाचें ॥ ७ ॥ तेथें उत्तमचि आघवें । काय घ्यावें काय सांडावें । जेवीत जेवीत जेवावें । ऐसें वाटे ॥ ८ ॥ उत्तम अन्नें निर्माण केलीं । नेणों अमृतें घोळिलीं । अगत्य पाहिजेत भक्षिलीं । ब्रह्मादिकीं ॥ ९ ॥ सुवासेंचि निवती प्राण । तृप्त चक्षु आणि घ्राण । कोठून आणिलें गोडपण । कांहीं कळेना ॥ १० ॥ भव्य स्वयंपाक उत्तम । भोजनकर्ते सर्वोत्तम । दास म्हणे भोक्ता राम । जगदंतरें ॥ ११ ॥ इति श्रीमानसपूजा । मनें पूजावें वैकुंठराजा । साधकें० ॥ ३ ॥

---

१ एकचित्त. २ दुर्जनता. ३ उद्योगी. ४ स्वैर वर्तन. ५ नित्य नेमानें. ६ पुष्कळ, मोठें काम.

४

श्रीराम समर्थ ॥ लोणचीं रायतीं वळवटें । वडे पापड मेतकुटें । मिरकुटें डांगरकुटें । मिरे घाटे सांडगे ॥ १ ॥ नाना प्रकारच्या काचऱ्या ।[1] सांड्या कुरवड्या उसऱ्या । कोशिंबिरीच्या सामोग्र्या । नानाजिनसी ॥ २ ॥ सुरण नेटके पचविले । आंबे[2] आंवळे[3] घातले । आलें लिंबें आणिले । घोंस मिऱ्यांचे ॥ ३ ॥ कुईऱ्या वेलें माईनमुळें । भोकरें नेपत्ती सारफळें । कळकें कांकडी सेवगमुळें । सेंदण्या वांगीं गाजरें ॥ ४ ॥ मेथी चाकवत पोकळा । माठ शेपू बसळा । चवळी चवळा वेळवेळा । चिवळ घोळी चिमकुरा ॥ ५ ॥ वांगीं शेंगा पडवळीं । दोडके कारलीं तोंडलीं । केळीं भोपळे कोहाळीं । गंगाफळें काशीफळें ॥ ६ ॥ कणकी सोजी सांजे सपिठें । नाना डाळी धुतलीं मिठें । रवे कण्या पिठें । शुभ्रवर्णें ॥ ७ ॥ बारीक तांदूळ परिमळिक । नानाजिनसींचे अनेक । गूळ साखर राब पाक । तूप तेल मध राब ॥ ८ ॥ दूध दहीं दाट साय । ताक लोणी कोण खाय । नाना सिखरिणीचे उपाय । आरंभिले ॥ ९ ॥ हिंग जिरें मिरें सुंठी । कोथिंबीर आंवळकाठी । पिकलीं लिंबें सदेठीं । मेथ्या मोहऱ्या हळदी ॥ १० ॥ द्रोण पानें पत्रावळी । ताटें दुरड्या वरोळी । सुपें हारे विचित्र पाळीं । नाना उपसामग्री ॥ ११ ॥ इति श्रीमानस० ॥४॥

५

श्रीराम समर्थ ॥ रांजण मांदण डेरे घागरी । कुंडालें मडकीं तोवरी । तवल्या दुधाणीं अडघरीं । मोघे गाडगीं करोळे ॥ १ ॥ ऐसीं नानाजिनसीं मडकीं । कामा न येती थोडकीं । लहान थोर अनेकीं । येकचि नांव ॥ २ ॥ हंडे चरव्या तपेलीं पाळीं । काथवट्या ताम्हणें दामुळीं । तांबे गंधाळें वेळण्या पाळीं । झाऱ्या चंबू पंचपात्र्या ॥ ३ ॥ धातुकळशा बहुगुणी । पूर्वीं खेळविलें पाणी । गुंडग्या झांकण्या कासरणीं । बहुविधा ॥ ४ ॥ विळ्या पळ्या पाटे वरोटे । कांहिला तवे मोठे मोठे । थावर[4] तेलतवे कढई मोठें । सामोग्रीचे ॥ ५ ॥ चुली भाणस आंवील[5] । तिसऱ्या थाळी ओतळ । शुभा काष्टें बहुसाल । पाट चाटू खोरणीं ॥ ६ ॥ पोळपाट आटणी घाटणी । परळ वेळण्या दिवेलावणीं । खंदीलरोवणी दिवेलावणीं । सरक्या वाती काकडे ॥ ७ ॥ स्वयंपाकगृहें बोललीं । सडा संमार्जनें केलीं । सोंवळीं वाळूं घातलीं । आणिलीं अग्रोदकें ॥ ८ ॥ इकडे सामुग्र्या सिद्ध केल्या । तिकडे चुली पेटविल्या । अंगें धुऊनी बैसल्या ।

---

१ नानाप्रकारच्या. २ मोरांबे. ३ मोरावळे. ४ मोठे पळे. ५ वैल.

स्वयंपाकिणी ॥ ९ ॥ पात्रें धुऊन पाहिलीं । पुन्हा धुतलीं धुवविलीं । उदकें गाळूनि घेतलीं । सोंवळयामध्यें ॥ १० ॥ पुढें आरंभ स्वयंपाकाचा । समुदाव स्वयंपाकिणीचा । नैवेद्य मांडला देवाचा । सावकाश ॥ ११ ॥ इति श्रीमानसपूजा । मनें० ॥ ५ ॥

६

श्रीराम समर्थ । इकडे स्वयंपाक चाली लाविले । पारपत्य[1] स्नान करोनि आले । देवदर्शन घेवोनि समर्पिले । खाद्य नैवेद्य ॥ १ ॥ तोचि प्रसाद घेवोनि आले । पारपत्य फराळा बैसले । कित्येक ब्राह्मणही मिळाले । निराश्रयी ॥ २ ॥ इकडे धर्मशाळा असती । तेथें घातल्या पंगती । न्यायनीतीनें वाढती । दीर्घपात्रीं ॥ ३ ॥ लवण शाखा कोशिंबिरी । सांडगे पापड मिरकुटें हारी । मेतकुटें नेलचटें परोपरी । नाना काचऱ्या ॥ ४ ॥ फेण्या फुग्या गुरवळ्या वडे । घारगे गुळवे दहींवडे । लाडू तिळवे मुगवडे । कोडबोळीं अनारसे ॥ ५ ॥ उदड दुधें आणविलीं । तक्रें रुचिकरें करविलीं । दाट दह्यें सिद्ध केलीं । पात्रें भरूनी ॥ ६ ॥ ओळी द्रोणाच्या ठेविल्या । नाना रसीं पूर्ण केल्या । साई शर्करा घातल्या । नाना सोजा ॥ ७ ॥ थिजलीं आणि विघुरलीं । घृतें उदंड रिचविलीं । उदकें भरोनि ठेविलीं । निर्मळ शीतळ सुवासें ॥ ८ ॥ सुंठ भाजली हिंग तळिला । कोथिंबिरी वांटूनि गोळा केला । दधींतक्रीं कालविला । लवणेंसहित ॥ ९ ॥ बारीक परिमळिक पोहे कुट्टा । उत्तम लाह्यांचा सुंदर कुट्टा । उत्तम दधी घालून चोखटा । मुदा केल्या ॥ १० ॥ यथासाहित्य फलाहार केले । चूळ भरून विडे घेतले । पुन्हा मागुते प्रवर्तले । कार्यभागासी ॥ ११ ॥ इति श्रीमानस० ॥ ६ ॥

७

श्रीराम समर्थ ॥ सकळ शाखा सिद्ध केल्या । निसल्या धुतल्या सांभाळिल्या । पात्रीं भरोनी ठेविल्या । चुलीवरी ॥ १ ॥ पुरणाचे हंडे चढविले । कणिक ढीग भिजविले । सांजे उकडोनी सिद्ध केले । भक्षायाकारणें ॥ २ ॥ कणिक धबधबा कांडिती । शुभ्र लवण मिश्रित करिती । कित्येक पूर्णें वांटिती । चमत्कारें ॥ ३ ॥ तवे तेलतवे चढविले । एक तेलें एक तुपें भरिले । तप्त होतां सणसणले । असंभाव्य ॥ ४ ॥ एक भक्षें लाटिती । एक वरणें घाटिती । एक कणिक मळिती । मांडेपुऱ्याची ॥ ५ ॥ मांडे रांजणा घातले । तवे तेलतवे भरले । कडकडूं ते लागले । सणसणाटें ॥ ६ ॥ वडे तेलवऱ्या सांजवऱ्या । घारगे मांडे गुळवऱ्या

१ व्यवस्था चोख ठेवणारे. स्वयंसेवक.

पुऱ्या । पोळ्या पुरणपोळ्या । झारोळ्या नानापरी ॥ ७ ॥ उखऱ्या रोट्या कानवले । धिरडीं वेडण्या पानवले । पात्या आइते खांडव्या केले । दिवे ढोकळे उंबरे ॥ ८ ॥ कण्या कोथिंबिरी घातल्या । फोडण्या नेमस्त दिधल्या । शाखा शिजल्या उतरल्या । तेलातुपाच्या ॥ ९ ॥ नाना क्षिरी सिद्ध केल्या । उदंड दुधें आळिल्या । नाना शर्करा आणिल्या । शोधूनि पात्रीं ॥ १० ॥ शुभ्र ओदनें सुवासें । सुगंध उठला नाना रसें । रुचिर कथिका सावकाशें । स्वयंपाक जाला ॥ ११ ॥ इति०

८

श्रीराम समर्थ ॥ दुधें तुपें आणविलीं । दध्यें तक्रें आणविलीं । लोणचीं रायतीं काढिलीं । मेतकुटें ॥ १ ॥ नाना काचऱ्या तळिल्या । कोंशिंबिरी सिद्ध केल्या । नाना शिखरिणी ज़ाल्या । द्रोण पानें पत्रावळी ॥ २ ॥ ब्राह्मण स्नान करोनि आले । येक देवार्चना बैसले । येक ते करूं लागले । वेदघोष ॥ ३ ॥ चित्रविचित्र सोंवळीं । सुरंग नेसले प्रावर्णें केलीं । कित्येकीं देवार्चनें मांडलीं । ठाई ठाईं ॥ ४ ॥ येक ध्यानस्थ बैसले । येकीं जप आरंभिले । येक करिते जाले । प्रदक्षणा नमस्कार ॥ ५ ॥ पंचामृतें सांग पूजा । ब्राह्मणीं आरंभिली ओजा । राम त्रैलोक्याचा राजा । अर्चिते जाले ॥ ६ ॥ नाना सुगंधिक तेलें । मंगळस्नान आरंभिलें । अंग पुसोनि नेसविलें । पीत वस्त्र ॥ ७ ॥ नाना वस्त्रें अलंकार । गंधाक्षता कुंकुम केशर । उटी देवोनि माळाहार । उदंड घातले ॥ ८ ॥ उदंड उधळिलीं धूसरें । वाद्यें वाजती मनोहरें । गर्जतीं जयजयकारें । करताळी नामघोष ॥ ९ ॥ धूप आरती आरंभिली । उदंड निरांजनें चालिलीं । भक्तजनें सुखी केलीं । दानपात्रें ॥ १० ॥ जितुकीं अन्नें सिद्ध केलीं । तितुकीं देवापुढें ठेविलीं । उदकें ठेवोनि सोडिलीं । पट्टकुळें ॥ ११ ॥ इति श्रीमानसपूजा । मनें पूजावें वैकुंठ० ॥ ८ ॥

९

श्रीराम समर्थ ॥ देव वासाचा भोक्ता । सुवासें होय तृप्तता । येरवीं त्या समर्था । काय द्यावें ॥ १ ॥ विडे होते सिद्ध केले । अवघे देवापुढें ठेविले । कित्येक ढीग जाले । उत्तम फळांचे ॥ २ ॥ द्रव्य ओवाळून टाकिलें । नानाप्रकारें दान केलें । मंत्रपुष्प समर्पिलें । भक्तजनीं ॥ ३ ॥ देवें केलें सुखासन । आतां ब्राह्मणभोजन । पारपत्य स्नान करोन । सिद्ध होती ॥ ४ ॥ बैसविल्या ब्राह्मणांच्या ओळी । द्रोण पानें पत्रावळी । पात्रें प्रोक्षून सकळीं । वाढिते जाले ॥ ५ ॥ तिकडे वाढण चालतें । हिकडे

होती गंधाक्षतें । ब्राह्मणांचीं घेवोनि तीर्थें । पुढें पूजन आरंभिलें ॥ ६ ॥ गंधाक्षता चालविती । एक सुगंध चर्चिती । येक धूसर टाकिती । घालिती माळा ॥ ७ ॥ येक आरती धूपारती । पूजा यथासांग करिती । ब्राह्मणा सांग घालिती । नमस्कार ॥ ८ ॥ उत्तम पानें साग्र सरळीं । लांब रुंद आणि कोंवळीं । शाखा लवण मोठ्या ओळी । तेथें दाटल्या ॥ ९ ॥ लवण मेतकुटें कोशिंबिरी । डांगर रायत्याच्या परी । सांडगे कुरवड्या हारी । चटण्या असती ॥ १० ॥ ऐसीं सर्व भक्ष्यें केलीं । तितुकीं यथान्वयें वाढिलीं । शुभ्र ओदनें शोभलीं । मध्यभागीं ॥ ११ ॥ इति श्रीमानसपूजा । मनें पूजावें० ॥ ९ ॥

## १०

श्रीराम समर्थ ॥ वाढिलीं नाना परमान्नें । सुवासें शोभती वरान्नें । दूध दहीं द्रोण । भरून ठेविलें ॥ १ ॥ नाना शिखरिणी वाढिल्या । उदंड शर्करा घातिल्या । ऊन कथिका ओतिल्या । आणि वडे ॥ २ ॥ रुचिकर वडे वाढिले । तुपें द्रोण भरिले । पुढें भक्त उभे राहिले । संकल्प सांगती ॥ ३ ॥ मग संकल्प सोडिला । तेणें मोठा आनंद जाला । नामस्मरणें घोष केला । भोजन आरंभिलें ॥ ४ ॥ आपोशनें केलीं समस्तीं । मग घेती प्राणाहुति । शिखा सोडोनी वामहस्तीं । नेत्रस्पर्श करिती ॥ ५ ॥ उदंड अन्नें वाढोनि गेले । आवडीसारिखे जेवूं लागले । पुन्हा पुन्हा वाढिते जाले । सद्यं[1] घृतें ॥ ६ ॥ भक्ष्यें मोडितां गुट्ठुल्या होती । तुपामध्यें बुडविती । वरपवरपों जेविती । कितीयेक ॥ ७ ॥ आंबट तिखट खारट तुरटें । शाखा सांबारीं नेलचटें । तोंडीं लाविती यथेष्टें । यथान्वयें ॥ ८ ॥ पात्रामध्यें वाढिती । होतां सर्वेचि वाढिती । कित्येक आग्रह करिती । परस्परें ॥ ९ ॥ उदकें शीतळ सुवासें । घेवूं लागले सावकाशें । कितीएक पुन्हा भक्ष्यें । जेऊं लागले ॥ १० ॥ किती जेविती परमान्नें । किती टाकिती अन्नें । पुन्हा घेती अन्नें । उदंड वाढिती ॥ ११ ॥ इति श्रीमानसपूजा । मनें पूजावें० ॥ १० ॥

## ११

श्रीराम समर्थ ॥ शिखरिणी वरपिती सरारां । कढी वरपिती फरारां । ढेकर देती डरारां । सावकाशें ॥ १ ॥ येक ते गुचक्या देती । उदकें मागुती सेविती । हात टेकोनि जेविती । कित्येक ॥ २ ॥ भोजनें कंठमर्याद जालीं । मग दध्योदनें आणविलीं । तक्रें ओगरून घेतलीं । द्रोणा-

---

१ ताजीं तुपें.

मध्यें ॥ ३ ॥ गद्यपद्यप्रबंध श्लोक । नामस्मरणें जेविती लोक । ब्राह्मण मुखें जगन्नायक । संतुष्ट जाला ॥ ४ ॥ येकीं ठाव शुद्ध केले । येक अ अन्न जेविले । येक ते विसरोनि गेले । पदार्थ ठाईंचे ॥ ५ ॥ समस्तांचे भोजनें जालीं । उत्तरापोशनें घेतलीं । सवेंचि उदकें दीधलीं । आंच वाया ॥ ६ ॥ तांबूलभाग बहुत । पानें सुपारी चुना कात । पत्री लवं कर्दळीसुत । वेळा कंकोळ जायफळें ॥ ७ ॥ विडे दक्षणा पावल्या मंत्राक्षता दीधल्या । ब्राह्मणमंडळ्या चालल्या । मंडपामध्यें ॥ ८ ॥ नान दानांचिया राशी । उदंड दिधल्या ब्राह्मणांसी । पशु वस्त्रें द्रव्यासी ने नाहीं ॥ ९ ॥ ऐशा उदंड पंक्ती जाल्या । पारपत्य स्वयंपाकिणी जेविल्या मग पंक्ती आरंभिल्या । इतर लोकांच्या ॥ १० ॥ सकळ लोक तृप्त जाले समस्तांसि विडे दिल्हे । अस्तमानही जाले । मंडपीं दीप लागती ॥ ११ । इति श्रीमानसपूजा । मनें पूजावें० ॥ ११ ॥

१२

श्रीराम समर्थ ॥ नाना बैठका सिद्ध केल्या । नाना समया पाज ळल्या । नाना पदार्थीं ठेविल्या । ठाईं ठाईं ॥ १ ॥ खंदीलरोवण्या लांबण दिवे । दिवट्या हिलालांचे थवे । देवद्वारीं चालिले आघवे । सायंकाळ ॥ २ ॥ पारपत्यमंडळी आली । सायंकाळपूजा मांडली । ब्राह्मणांची दाटी जाली । उदंड तेथें ॥ ३ ॥ पारपत्य वेत्रधारी । उभे राहिले उभय हारी नाना वाद्यें वाजंत्रीं । वाजविती ॥ ४ ॥ जाई जुई सेवंती । बटमोगरे मा लती । इत्यादि पुष्पजाती । सिद्ध केल्या ॥ ५ ॥ हारमाळा कळेमाळा नानारंग जिनसमाळा । नाना तुरे दीर्घ माळा । आपादपर्यंत ॥ ६ ॥ झेलें झपके मोकळीं फुलें । ब्राह्मणीं सांग पूजन केलें । मग मंत्रपुष्प वाहिलें पुष्पांजुळी ॥ ७ ॥ पूजा करोनि बाहेर आले । पडदे येकीकडे केले नाना घोषें गजर जाले । साष्टांग नमस्कार ॥ ८ ॥ देव सिंहासनीं शोभे दुरस्ता लोक राहिले उभे । पुण्यपुरुषासी लाभे । कांहींयेक ॥ ९ ॥ धुपा रतीची वेळ आली । अवघी सभा गजबजली । मर्यादेवेगळीं लागलीं नीरांजनें ॥ १० ॥ समस्त हरिदास मिळाले । तुरेमाळेंनीं पूजिले । धूस ठाकोनि केले । नमस्कार ॥ ११ ॥ इति श्रीमानसपूजा । मनें पूजावें० ॥ १२ ॥

१३

श्रीराम समर्थ ॥ टाळ घोळ मृदंग । नाना वाद्यें वाजती चांग । यवज हुडुक उपांग । टिपऱ्या टाळ्या चिपोळ्या ॥ १ ॥ हरिदास गाती मानें तालबद्ध रागज्ञानें । आनंद पाहातां मनें । कल्पवेना ॥ २ ॥ साहित्य

संगीत गायनकळा। चपळांगें वाद्यकळा। नट नाट्य नृत्यकळा। धाटी मुद्रा प्रबंध ॥ ३ ॥ अर्थ जाड दृष्टांत वाड । रंग झुळक अत्यंत गोड। नाना नवरसिक पवाड। भक्ति ज्ञान वैराग्य ॥ ४ ॥ छत्र्या छत्रें मेघडंबरें। माही निशाणें चामरें। विंझुणे कुंचे मनोहरें । सूर्यपानें थरकती ॥ ५ ॥ नाना यानें सुखासनें । दिंड्या पताका निशाणें । ढाला ध्वजा गुढ्या तोरणें। रवि शशी कीर्तिमुखें ॥ ६ ॥ चवघडे दमामे नगारे। कर्णे बंके तुरारे। गगनामध्यें भरण भरे । नानाध्वनी व्यंकटा ॥ ७ ॥ शंख भृंगे काहाळ भेरी । ढोल डफडे पावे मोहरी । खालू बुरंग वाजंत्री। बहुविध ॥ ८ ॥ दिवट्या हिलाल चंद्रज्योती । बाण हवया झळकती। नळे चिचुंद्र्या धांवती। चंचळत्वें ॥ ९ ॥ फुलबाजा बंदुका खजिने। पट्टे दांड भेदिती बाणें । अभिनव कीर्ती वाखाणे । भाट गर्जती ॥ १० ॥ झेंडके चोंडके डौरकर। नागसर नफेदार । किनऱ्या दंड्या येकतार। रबाब कमाच सारंग्या ॥ ११ ॥ अवघी रात्र सरों आली । पुढें देवें विश्रांती केली । भक्तमंडळी चालली । स्वस्थानासी ॥ १२ ॥ ऐशी मानसपूजा करावी। मूर्ति अंतरीं धरावी। दास म्हणे विवरावी। उपासना ॥१३॥ इति श्रीमानसपूजा। मनें पूजावें वैकुंठराजा। सा० ॥ १३ ॥

---

## ५ निरनिराळ्या वारीं म्हणावयाचीं गीतें, आरत्या वगैरे.

### रविवार.

अभंग ॥ धन्य सूर्यवंश पुण्यपरायण। सर्वेही सगुण समुदाव ॥ १ ॥ समुदाव काय सांगूं श्रीरामाचा । अंतरीं कामाचा लेश नाहीं ॥ २ ॥ लेश नाहीं तया बंधू भरतासी । सर्वही राज्यासी त्यागियेलें ॥ ३ ॥ त्यागियेलें अन्न केलें उपोषण। धन्य लक्ष्मण ब्रह्मचारी ॥ ४ ॥ ब्रह्मचारी धन्य मारुती सेवक। श्रीरामीं सार्थक जन्म केला ॥ ५ ॥ जन्म केला धन्य वाल्मीक ऋषीनें। धन्य तीं वचनें भविष्याचीं ॥६॥ भविष्य पाहतां धन्य बिभीषण । राघवीं शरण सर्व भावें ॥ ७ ॥ सर्व भावें सर्व शरण वानर। धन्य ते अवतार विबुधांचे ॥ ८ ॥ विबुधमंडण राम सर्वगुण। अनन्य शरण रामदास ॥ ९ ॥ भजन ॥ रामा रामा हो रामा ॥

अभंग ॥ दासाची संपत्ती राम सीतापती । जिवाचा सांगाती राम येक ॥ १ ॥ राम येक माता राम येक पिता । राम येक भ्राता सहोदर ॥ २ ॥ सहोदर विद्या वैभव कांचन । सर्वही स्वजन राम येक ॥ ३ ॥ राम एक स्वामी राम हा कैवारी । लाभ या संसारीं राम एक ॥ ४ ॥

राम एक ज्ञान राम एक ध्यान । राम समाधान रामदासीं ॥५॥ भजन ॥ तूं माय मी लेकरूं । राघवा नको वीसरूं रे नको वीसरूं ॥

## आरती रामाची.

किरीटकुंडलें माला वीराजे । झळझळ गंडस्थळ घननिळ तनु साजे ॥ घंटा किंकिणी अंबर अभिनव गति साजे । अंदू बांकी तोडर नूपुर ब्रिद गाजे ॥ जयदेव जयदेव जय रघुवर ईशा । आरती निर्जरवरईशा जगदीशा । जय० ॥ १ ॥ राजिवलोचन मोचनसुरवर नरनारी । परतरपर अभयंकर शंकरवरधारी । भूषणमंडित ऊभा त्रिदशकैवारी । दासा मंडण खंडण भवभय अपहारी ॥ २ ॥ जयदेव० ॥

## आरती बहिरोबाची.

दक्षिण देशामाजी भैरव तो देव । क्षेत्रपाळ वंदी लोकत्रयभाव ॥ भक्तासी देखूनी चरणीं दे ठाव । देवाचा तारक भैरव देव ॥ जयदेव जयदेव जय भैरवदेवा । सद्भावें आरती करितों मी देवा ॥ जय० ॥ १ ॥ वामांगीं जोगेश्वरि शोभे सुंदर । कासे पीतांबर वाद्यांचा गजर ॥ भक्तासि देखोनि हरि कृपाकर । रामदास चरणीं त्या मागे थार ॥ जयदेव० ॥ २ ॥

## आरती खंडोबाची.

पंचानन हयवाहन सुरभूषण लीळा । खंडा मंडित दंडित दानव अवलीळा ॥ मणिमल्ल मर्दूनी धूसर जो पिंवळा । करिं कंकण बाशिंगें सुमनांच्या माळा ॥ जयदेव जयदेव जय जय मल्हारी । वारी दुर्जन वारी निंदक अपहारी ॥ जय० ॥ १ ॥ सुरवैरीसंहारा मजलागीं देवा । नाना नामें गाइन घडो तुझी सेवा ॥ अगणित गुण गावया वाटतसे हेवा । फणिवर शिणला जेथें नर पामर केवा ॥ जय० ॥ २ ॥ रघुविरस्मरणें शंकर हृदयीं नीवाला । तो हा मदनांतक अवतार जाला ॥ यालागीं आवडीं भावें वर्णिला । रामीरामदासा जिवलग भेटला ॥ जयदेव० ॥ ३ ॥

## आरती कृष्णाची.

करुणाकर गुणसागर गिरिवरधर देवें । लीला नाटकवेष धरिला स्वभावें ॥ अगणितगुणलाघव हें कवणातें ठावें । व्रजनायक सुखदायक काय वर्णावें ॥ जयदेव जयदेव जय रमारमणा । आरती ओवाळूं तुज नारायणा ॥ ध्रु० ॥ जय० ॥ १ ॥ वृंदावन हरिभुवनीं नूतनतनु शोभे ।

वक्रांगें श्रीरंगें यमुनातटिं शोभे ॥ मुनिजनमानसहारी जगजीवन ऊभे । रविकुळटिळकदास पदरज त्या लाभे ॥ २ ॥

## आरती केदाराची.

जयदेव जयदेव जय जय केदारा । दारासंकट वारा भवभय अपहारा ॥ ध्रु० ॥ भागीरथीमूळ सीतळ हिमाचळवासी । नलगत पळ दुर्जन खळ संहारी त्यासी ॥ तो हा हिमकेदार करवीरापाशीं । रत्नागिरीवरि शोभे कैवल्यराशी ॥ १ ॥ जयदेव० ॥ उत्तरेचा देव दक्षिणे आला । दक्षिण केदारसें नाम पावला ॥ रत्नासुर मर्दुनी भक्तां पावला । दास म्हणे थोरा दैवें धांवला ॥ २ ॥ जयदेव० ॥

## सोमवार.

अभंग ॥ दंडडमरूमंडित पिनाकपाणी ॥ ध्रु० ॥ पांच मुखें पंधरा डोळे । गळां साजूक सीसाळें[1] ॥ दंड० ॥ १ ॥ हिमालयाचा जामात । हातीं शोभे सरळ गात ॥ दंड० ॥ २ ॥ मस्तकिं वाहे गंगाजळ । कंठीं शोभे हळाहळ ॥ दंड० ॥ ३ ॥ माथां मोठा जटाभार । अंगीं फुंपती वीखार[2] ॥ दंड० ॥ ४ ॥ रामीरामदास स्वामी । चिंतीतसे अंतर्यामीं ॥ दंड० ॥ ५ ॥ शिव हर सांब शिव हर सांब । शिव हर शंकर शिव शिव सांब ॥

## आरती सांबाची.

लवथवती विक्राळा ब्रह्मांडमाळा । वीषें कंठ काळा त्रिनेत्रीं ज्वाळा । लावण्यसुंदर मस्तकीं बाळा । तेथुनियां जळ निर्मळ वाहे झुळझुळां ॥ जयदेव जयदेव जय श्रीशंकरा । आरती ओवाळूं तुज विश्वंभरा ॥ जयदेव० ॥ १ ॥ व्याघ्रांबर फणिवरधर सुंदर मदनारी । पंचानन मुनिजनमनमोहन सुखकारी ॥ शतकोटींचें बीज वाचे उच्चारी । रविकुळटिळक रामदासा अंतरीं ॥ जयदे० ॥ २ ॥

## मंगळवार.

सदा आनंदभरीत । रंगसाहित्यसंगीत ॥ १ ॥ जगन्माता जगदीश्वरी । जगज्जननी जगदुद्धारी ॥ २ ॥ त्रिभुवनींच्या वनिता । बाळ तारुण्य समस्तां ॥ ३ ॥ वसे आकाशीं पाताळीं । सर्वकाळ तिन्ही काळीं ॥ ४ ॥ जिच्या वैभवाचे लोक । हरिहर ब्रह्मादिक ॥ ५ ॥ सर्व देहा हालविते । चालविते बोलविते ॥ ६ ॥ मूळमाया विस्तारली । सिद्ध साधकाची बोली ॥ ७ ॥ भक्ति मुक्ति योग स्थिती । आदि मुक्ती सहज स्थिती ॥ ८ ॥ मुळीं रामवरदायिनी । रामदास ध्याती ध्यानीं ॥ ९ ॥

---

१ शीर्ष, सीस, मस्तक. २ बिषारी सर्प.

पद ॥ सुंदर रामाबाई । सबराभरीत सर्वाठायीं हो । निगमा पार नाहीं । ते म्यां वर्णावी ते काई हो । सुंदर रामाबाई ॥ ध्रु० ॥ शरयूतीर-वासिनी वेधक मुनिमानसमोहिनी हो । सुरवरसंजीवनी कैसी शोभत पद्मासनीं हो ॥ उदार येकवचनी दुर्लभ तापसीं तपसाधनीं हो । दशरथ-नृपनंदिनी प्रगटे ऋषिवचनालागुनी हो ॥ सुंदर० ॥ १ ॥ निजमस्तकीं वीरजगुंठी त्रिपुंड्र रेखिला ललाटीं हो । सुरेख सदटा भृकुटी तेणें सतेज नासापुटी हो ॥ नव वानर गोमटी श्रवणीं कुंडलांची थाटी हो । लावण्याची पेटी उपमे न पुरे मन्मथकोटी हो ॥ सुंदर० ॥ २ ॥ कटितटि सोनसळामाजी सौदामिनींचा मेळा हो । सुवास नाभिकमळा तेणें पडे मधुकरपाळा हो ॥ वामे धरणीबाळा वनिता मंडित ते वेल्हाळा हो । चरणस्पर्शें शिळा अहिल्या उद्धारिली अवलीळा हो ॥ सुंदर० ॥ ३ ॥ विशाळ वक्षस्थळीं विराजित उटी चंदन पातळी हो । कंठीं एकावळी-माजी कौस्तुभमणी झळफळी हो ॥ अधरीं प्रवाळपाळीमध्यें शोभे दंता-वळी हो । रसना रसकल्लोळीं वाचा बोलत मंजुळी हो ॥ सुंदर० ॥ ४ ॥ आजानुबाहू सरळ सुनीळ गगनाहुनी कोमळ हो । सुपाणि रम्य स्थळ देखुनी रवितेज सोज्वळ हो ॥ मुद्रिका फांकती कीळ तेणें सतेज गृह-मंडळ हो । शरकार्मुकसह मेळे शोधित असुरतरूंचीं मुळें हो ॥ ५ ॥ चिद्गगनाचा गाभा तैसी सुनीळ अंगप्रभा हो । देखोनि चिद्धनशोभा जैसी कांती चढली नभा हो ॥ रतिनायक वल्लभा देखुनि नागर सांडि दंभा हो । प्रथमारंभ स्तंभाभरणें भूषित शामल शोभा हो ॥ सुंदर० ॥ ६ ॥ भरत बिभीषण पृष्ठीं सविता गुण मानित उत्कंठी हो । जोडोनि कर-संपुष्टी ध्यानीं मारुती गानवेष्टी हो ॥ देखुनियां सुखपुष्टी जाली प्रेम-रसाची वृष्टी हो । सुखसंतुष्टें हर्षें परमेष्ठी कोंदे कमळा सृष्टी हो ॥ ७ ॥ नव पंकजलोचनी विस्मित करुणामृतसिंचनीं हो । शिव संकटमोचनी दुर्धर रजनीचरभंजनी हो ॥ भवभयसंकोचनी भक्तां निर्भयपदसूचनी हो । रघुकुळउल्हासिनी भोजें विलसत चंद्राननी हो ॥ ८ ॥ अव्यक्तपार जीवा विचार खुंटे साहाअठरांचा हो । सुकाळ स्वानंदाचा यावा अंत-रला दुःखाचा हो ॥ जगदुद्धार मातेचा उत्तीर्ण नव्हें मी हे वाचा हो । रामदासीं भेदतरंग तुटोनि गेला साचा हो ॥ ९ ॥

पद ॥ चाल भुत्याची ॥ ब्रह्मीं माया उदो । त्रिगुण काया उदो । तत्व-च्छाया उदो । चारी खाणी उदो ॥ १ ॥ चारी वाणी उदो । अनंत योगी

१ सबाह्याभ्यंतरित, व्यापक. २ मोठी, विशाळ. ३ एकेरी हारांत. ४ उदय, भाग्य.

उदो । विद्या बुद्धी उदो । नाना विधी उदो ॥ १ ॥ कारण सिद्धी उदो । आगम निगम उदो । साधन सुगम उदो । ज्ञानसंगम उदो ॥ ३ ॥ देवा भक्तां उदो । योगी मुक्तां उदो । अनंत सिद्धां उदो । उदो दासा उदो ॥४॥

आरती ॥ अजरामर पन्नगधर वैश्वानर भाळीं । रसाळ वदनें विशाळ नयनांजन भाळीं ॥ शूळी वेष्टित सुरवर किन्नर ते काळीं । हाटक करुणाटक करुणा कल्लोळीं ॥ जयदेवी जयदेवी जय वेदमाते । आरती ओवाळूं तुळजे गुणसरिते ॥ जय० ॥ १ ॥ हंसासन जगज्जीवन मनमोहन माता । पवनाशन चतुरानन थक्कित गुण गातां ॥ अमृतसंजीवनी अंतरसुखरिता । दासा पालन करितां त्वरिता गुणभरिता ॥ जय० ॥ २ ॥ रामाबाई माझे आई । करुणा तुला येऊं दे ॥

## बुधवार.

अभंग ॥ येथें उभा कां श्रीरामा । मनमोहन मेघश्यामा ॥ ध्रु० ॥ काय केली सीताबाई । येथें राही रखुमाई ॥ १ ॥ काय केली अयोध्यापुरी । येथें वसविली पंढरी ॥ २ ॥ काय केली शरयू गंगा । येथें आणिली चंद्रभागा ॥ ३ ॥ धनुष्य बाण काय केले । कर कटावरि ठेविले ॥ ४ ॥ काय केलें वानरदळ । येथें मिळविले गोपाळ ॥ ५ ॥ रामीरामदासीं भाव । तैसा होय पंढरिराव ॥ ६ ॥

अभंग ॥ राम कृपाकर विठ्ठल साकार । दोघे निराकार एकरूपें ॥ १ ॥ आमुचिये घरीं वस्ती निरंतर । हृदयीं एकाकार राहियेले ॥ २ ॥ रामदास म्हणे धरा भक्तिभाव । कृपाळू राघव पांडुरंग ॥ ३ ॥ जयजय पांडु० ॥

अभंग ॥ समचरणाचा हाचि भावो । भक्तां दावावया ठावो । उभें राहाया अभिप्रावो । भक्त खांद्या घ्यावया ॥ १ ॥ विठोबा हे आमुची जननी । भीमातीरनिवासिनी । भक्त पुंडलिकालागुनी । वैकुंठींहुनि पातली ॥ २ ॥ श्रीवत्साची हे खूण । तें भक्ताचें कृपादान । आजानुबाहु यालागून । भक्तां आलिंगन द्याया ॥ ३ ॥ शोभे सुहास्यवदन । ना भी ना भी हें वचन । पूर्ण आकर्णनयन । साधुजन पहाया ॥ मुकुटीं मयूरपत्रें त्रिवळी । विटे निट असे ठाकली । रामदासाची माउली । भक्तालागीं उभी असे ॥ ५ ॥

## आरती पांडुरंगाची.

निर्जरवर स्मरहरधर भीमातिरवासी । पीतांबर जघनीं कर दुस्तर भव नाशी ॥ शरणांगतवत्सल पालक भक्तांसी । चाळक गोपीजनमनमोहन सुखराशी ॥ जयदेव जयदेव जय पांडुरंगा । निरसी मम संगा

निःसंगा भवभंगा ॥ जय० ॥ १ ॥ अणिमा लघिमा गरिमा नेणति तव महिमा । नीलोत्पलदलविमल घननिलतनु शामा ॥ कंटकभंजन साधूरंजन विश्रामा । राघवदासा विगलितकामा निःकामा ॥ जय० ॥ २ ॥

## गुरुवार.

अभंग ॥ आदिनारायण सद्गुरु आमुचा । शिष्य जाला त्याचा महाविष्णु ॥ १ ॥ तयाचा जो शिष्य तो जाणावा हंस । तेणें ब्रह्मयास उपदेशिलें ॥ २ ॥ ब्रह्मदेवें केला उपदेश वसिष्ठा । तेथें धरा निष्ठा शुद्ध भावो ॥ ३ ॥ वसिष्ठ उपदेशी श्रीरामरायासी । रामें रामदासीं उपदेशिलें ॥ ४ ॥

अभंग ॥ उपदेश देवोनि दिधला मारुती । स्वयें रघुपती निरवीत ॥ ॥ १ ॥ निरवितां तेणें जालों रामदास । संसारीं उदास म्हणोनियां ॥२॥ म्हणोनी आमुचे कुळीं कुळदैवत । राम हनूमंत आत्मरूपी ॥ ३ ॥ आत्मरूपी चाला रामीरामदास । केला उपदेश दीनोद्धारा ॥ ४ ॥

अभंग ॥ भाविक भजना गुरुपरंपरा । सदा जप करा राममंत्र ॥ १ ॥ राममंत्र जाणा त्रयोदशाक्षरी । सर्व वेदशास्त्रीं प्रगटचि ॥ २ ॥ प्रगटचि राममंत्र हा प्रसिद्ध । तारीतसे बद्ध जडजीवां ॥ ३ ॥ जडजीवां तारी सकळ चराचरीं । देह काशीपुरी येणें मंत्रें ॥ ४ ॥ येणें मंत्रें जाणा बद्ध तो मुमुक्षु । साधक प्रसिद्ध सिद्ध होय ॥ ५ ॥ सिद्ध होय रामतारक जपतां । मुक्ति सायुज्यता रामदासीं ॥ ६ ॥ भजन ॥ नारायण विधी वसिष्ठ राम । रामदास कल्याणधाम ॥

पद ॥ श्रीगुरुचे चरणकंज हृदयीं स्मरावें ॥ ध्रु० ॥ निगम निखिल साधारण सुलभाहुनी सुलभ बहू । इतर योगयाग विषमपंथ कां शिरावें ॥ १ ॥ नरतनुद्दढनावेसी बुडवूनि अति मूढपणें । दुष्ट नष्ट कुकर सूकरतनु कां फिरावें ॥ २ ॥ रामदास विनवी तुज अझुनि तरी समज उमज । विषयवीष पीउनीयां फुकट कां मरावें ॥ श्री० ॥ ३ ॥

## शुक्रवार.

अभंग ॥ कांहो राममाये दुरी धरियेलें । कठीण कैसें जालें चित्त तुझें ॥ १ ॥ देऊनि आलिंगन प्रीतिपडीभरें । मुख पीतांबरें पुसशील ॥२॥ घेउनि कडिये धरुनि हनुवटी । कई गुजगोष्टी सांगशील ॥ ३ ॥ रामदास म्हणे केव्हां संबोखीसी । प्रेमपान्हा देशी जननिये ॥ ४ ॥ भजन ॥ येई धांवत रामाबाई । दासासी दर्शन देई ॥

पद ॥ येईं हो रामाबाई । माझे येईं हो रामाबाई ॥ ध्रु० ॥ अनंतरूपें व्यापें दानवदर्पें पूर्णप्रतापें । तव नामें कळिकाळ कांपे ॥ १ ॥ तुझा छंद

लागला गे माये निशिदिनीं या जीवासी। तुजविण मी परदेसी ॥ २ ॥ रामीरामदासीं आराम करणें हेंचि तुला उचित। झणी उपेक्षिसी काय आतां उरला माझा अंत ॥ ३ ॥

पद ॥ लो लो लागला लो[1]। आदिशक्तिचा लागला लो। अंतरिं लो बाहिर लो। जिकडे तिकडे लागला लो ॥ १ ॥ अंडज लो जारज लो। स्वेदज लो उद्भिज लो। देवा लो दानवा लो। सिद्ध साधका लागला लो ॥ २ ॥ दास म्हणे तोचि जाणे। सद्गुरुवचनीं सुख बाणे ॥ ३ ॥

## आरती व्यंकटेशाची.

अघहरणी पुष्करणी अगणितगुणखाणी। अगाध महिमा स्तवितां न बोलवे वाणी ॥ अखंड तीर्थावळी अचपळ सुखदानी। अभिनव रचना पाहतां तन्मयता नयनीं ॥ जयदेव जयदेव जयव्यंकटेशा। आरती ओंवाळूं स्वामी जगदीशा ॥ जय० ॥ १ ॥ अति कुसुमालय देवालय आलय मोक्षाचें। नानानाटकरचना हाटकवर्णाचें ॥ थक्कित मानस पाहतां स्थळ भगवंताचें। तुळणा नाहीं तें हें भूवैकुंठ साचें ॥ जय० ॥ ॥ २ ॥ दिव्यांबरधर सुंदरतनु कोमल नीला। नानारत्नें नाना सुमनांच्या माळा ॥ नानाभूषणमंडित वामांगीं बाळा। नाना वाद्यें मिनला दासांचा मेळा ॥ जय० ॥ ३ ॥

## आरती कृष्णेची.



सुखसरिते गुणभरिते दुरितें नीवारी। निःसंगा भवभंगा चिद्गगा तारी ॥ श्रीकृष्णे अवतार जलवेषधारी। जलमय देहें निर्मल साक्षात हरी ॥ जयदेवी जयदेवी जय माये कृष्णे। आलों तुझिया उदरा निरसी मम तृष्णे ॥ जय० ॥ १ ॥ हरिहर सुंदर ओघ ऐक्यासी आले। प्रेमानंदें बोधें मिळणी मीळाले। ऐशिया संगमीं मिसळोनि गेले। रामदास त्याचीं वंदी पाउलें ॥ ज० ॥ २ ॥

---

१ छंद, वेड.

## शनिवार.

अभंग ॥ बाप माझा ब्रह्मचारी । मातेसरी अवघ्या नारी ॥१॥ उपजतां बाळपणीं । गिळूं पाहे वासरमणी ॥ २ ॥ अंगीं सिंदुराची उटी । जया सोन्याची कासोटी ॥ ३ ॥ रामकृपेची साउली । रामदासाची माउली ॥ ४ ॥ भजन ॥ सीताशोकविनाशन चंद्रा । जय बलभीमा महारुद्रा ॥

पद मारुतीचें ॥ मारुती सख्या बलभीमा हो ॥ ध्रु० ॥ अंजनीचें वचनांजन लेऊनि । दाखविशी बलसीमा रे ॥ १ ॥ वज्रतनु बलभीम पराक्रम । संगीतगायनसीमा रे ॥ मा० ॥ २ ॥ दास म्हणे हो रक्षीं आम्हां । त्रिभुवनपालनसीमा रे ॥ मा० ॥ ३ ॥ भजन ॥ मारुतिराया बलभीमा । शरण आलों मज द्या प्रेमा ॥

पद ॥ सामर्थ्याचा गाभा । आहे भीम भयानक उभा । पाहातां सुंदर शोभा । लांचावे मन लोभा ॥ १ ॥ हुंकारे भुभुःकारे । काळ म्हणे अरे बा रे । विघ्न तगेना थारे । धन्य हनुमंता रे ॥ २ ॥ दास म्हणे वीर गाढा । घसरित घनसर दाढा । अभिनव हाचि पवाडा । न दिसे जोडा ॥ ३ ॥

पद ॥ कैपक्षी भीमराया । निगमांतर विवराया । ब्रह्मानंद वराया । चंचळ मन आवराया ॥ १ ॥ संकट विघ्न हराया । मार कुमार कराया । गुरुपदरेणु धराया । भाविकजन उद्धराया ॥ २ ॥ रघुपतिचा कैवारी । संकट विघ्न निवारी । भजन पूजन मंदवारीं । कल्याण जनहितकारी ॥ ॥ ३ ॥ भजन ॥ राम लक्ष्मुमन जानकी । जय बोलो हनुमानकी ॥

## आरती मारुतीची.




जयदेव जयदेव जय महारुद्रा । आरत[1] भेटीचें दीजे कपींद्रा । जय० ॥ ध्रु० ॥ भीम भयानक रूप अद्भुत । वज्रदेही दिसे जैसा पर्वत ॥ टौकारूनि नेत्रें रोम थरथरित । स्थिरता नाहीं चंचळ जाला उदीत ॥ जय०

१ इच्छा.

॥ १ ॥ हुंकारूनी बळें गगनीं उसळला । अकस्मात जानकीसी भेटला । वन विध्वंसूनि अखया मारीला । तत्क्षणें लंकेवरी चौताळिला ॥ जय० ॥ २ ॥ आटोपेना वानर हटवादी धीट । प्रज्वाळीला जाळूं पाहे त्रीकूट । मिळोनि रजनीचर करती बोभाट । धडाडीला वन्ही शिखा तांबट । जय० ॥ ३ ॥ कडकडित ज्वाला भडका विशाळ । भुभुःकारेंकरुनी भोंवडि लांगूळ । थोर हलकल्लोळ पळती सकळ । वोढवला वाटे प्रळय काळ । जय० ॥ ४ ॥ तृतीय भाग लंका होळी पैं केली । जानकीची शुद्धी श्रीरामा नेली । देखोनी आनंदें सेना गजबजली । रामीं रामदासा निजभेटी जाली ॥ जय० ॥ ५ ॥

( ही आरती भजनाच्या आधीं किंवा धुपारतीनंतर म्हणावी. )

---

## धांवा.

धांव रे रामराया किती अंत पाहाशी । धांव रे रामराया० ॥ ध्रु० ॥ प्राणांत मांडिलासे नये करुणा कैसी । पाहीन धणिवरी चरण झाडीन केशीं । नयन शीणले बा आतां केधवां येशी । धांव रे० ॥ १ ॥ मीपण अहंकारें अंगीं भरला ताठा । विषयकर्दमांत लाज नाहीं लोळतां । चिळस उपजली ऐसें जालें बा आतां । धांव रे० ॥ २ ॥ मारुतीस्कंध-भागीं शीघ्र बैसोनि यावें । राघवें वैद्यराजें कृपा औषध द्यावें । दयेचे पद्महस्त माझे शिरीं ठेवावे । धांव रे० ॥ ३ ॥ या भवीं रामदास थोर पावतो व्यथा । कौतुक पाहातोसी काय जानकीकांता । दयाळा दीन-बंधु भक्तवत्सला आतां । धांव रे० ॥ ४ ॥

## भजनें.

१. रघुपति राघव राजाराम । पतीतपावन सीताराम ॥ १ ॥
२. रामा रामा हो रामा ॥ १ ॥
३. तूं माय मी लेंकरूं । राघवा नको विसरूं रे नको विसरूं ॥ १ ॥
४. नारायण विधि वसिष्ठ राम । रामदासकल्याणधाम ॥ १ ॥
५. येंई धांवत रामाबाई । दासासी दर्शन देईं ॥ १ ॥
६. सीताशोकविनाशन चंद्रा । जय बलभीमा महारुद्रा ॥ १ ॥
७. राम लक्ष्मुमण जानकी । जय बोलो हनुमानकी ॥ १ ॥
८. राम राम राम जप सीताभिराम सीताभिराम । राम राम राम जप सीताभिराम ॥ १ ॥

९. रामाबाई माझे आई । करुणा तुला येऊं दे ॥ १ ॥
१०. शिवहर सांब शिवहर सांब । शिवहर शंकर शिवशिव सांब ॥१॥
११. मारुतिराया बलभीमा । शरण आलों मज द्या प्रेमा ॥ १ ॥
१२. सज्जनगडनिवासी माझे रामदास माये रामदास माये ॥ १ ॥
१३. राम राम राम राम । सिताराम सिताराम ॥ १ ॥

---

## ६ आणखी कांहीं आरत्या.

१. सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची । नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची । सर्वांगीं सुंदर उटि सेंदुराची । कंठीं झळके माळ मुक्ताफळांची । जयदेव० ॥ १ ॥ लंबोधर पीतांबर फणिवरबंधना । सरळशुंड वक्रतुंड त्रिनयना । दास रामाचा वाट पाहे सदना । संकटीं पावावें निर्वाणीं रक्षावें सुरवरवंदना । जयदेव जयदेव जयमंगळमूर्ति । दर्शनमात्रें मनकामना पूर्ति ॥ २ ॥ *

२. साफल्या निजवल्ल्या कौसल्या माता । भूकन्या[1] अनन्या मुनिमान्या सीता । खेचर वनचर फणिवर भरता निजभ्राता । दशरथ नृपनायक धन्य तो पीता ॥ जयदेव जयदेव जय रघुकुळटिळका । आरती ओवाळूं त्रिभुवननायका ॥ जयदेव जयदेव ॥ १ ॥ आचार्या गुरुवर्या कार्याचें फळ । रविकुळमंडण खंडण संसारमूळ । सुरवर मुनिवर किन्नर ध्याती सकळ । धन्य तो निजदास भक्त प्रेमळ । जयदेव० ॥२॥

३. सत्राणें उड्डाणें हुंकार वदनीं । करि डळमळ भूमंडळ सिंधूजळ गगनीं । कडाडिलें ब्रह्मांड धोका त्रिभुवनीं । सुरवर नर नीशाचर त्यां जाल्या पळणी । जयदेव जयदेव जयजय हनुमंता । तुमचेनि प्रतापें न भियें कृतांता । जयदे० ॥ १ ॥ दुमदुमिलें पाताळ उठला पडशब्द । धगधगिला धरणीधर मानीला खेद । कडाडिले पर्वत उडुगण उच्छेद । रामीं रामदासा शक्तीचा शोध । जयदे० ॥ २ ॥

४. सुखसहिता दुखरहिता निर्मळ एकांता । कलिमलदहना गहना स्वामी समर्था । नकळे ब्रह्मादिकां अंत अनंता । तो तूं आम्हां सुलभ जय कृपावंता । जयदेव जयदेव जय करुणाकरा । आरती ओवाळूं सद्गुरु

---

* या आरतींत दुसरा चरण सांप्रदायामध्यें येणेंप्रमाणें आहेः—' रत्नखचितवरा तुज गौरी कुमरा । चंदनाची उटी कुंकुमकेशरा ॥ हिरेजडित मुगुट शोभे तो बरा । रुणझुणती नेपूरें चरणीं घागरिया ॥ २ ॥ [1] भूमीची मुलगी, सीता. [2] यमाला.

माहेरा । जय० ॥ १ ॥ मायेविण माहेर विश्रांती ठाव । शब्दीं अर्थलाभ बोलणीं वाव[1] । सद्गुरुप्रसादें सुलभ उपाव । रामीं रामदासा फळला सद्भाव । जय० ॥ २ ॥

५. जयदेव जयदेव आत्मया रामा । निगमागम शोधितां न कळे गुणसीमा ॥ जय० ॥ १ ॥ नानादेहीं देव एक विराजे । नाना नाटकलीला सुंदर रुप साजे । नानातीर्थीं क्षेत्रीं अभिनव गति माजे । अगाध महिमा पिंडब्रह्मांडीं गाजे ॥ ध्रु० ॥ २ ॥ बहुरूपी बहुगूणी बहुता काळाचा । हरिहर ब्रह्मादिक देव सकळांचा । युगानुयुगीं आत्माराम आमुचा । दास म्हणे महिमा न बोलवे वाचा ॥ जय० ॥ ३ ॥

६. बाळा मुग्धा यौवना प्रौढा सुंदरी । आरत्या घेवोनियां करीं आल्या त्या नारी ॥ १ ॥ श्यामसुंदर रामाचे चरणकमळीं । ओवाळूं आरती कनकगंगाळीं ॥ २ ॥ चौघी म्हणती शेजे चला मंदिरा । नवत्या इच्छिती सेवा श्यामसुंदरा ॥ ३ ॥ दास म्हणे सुमनशेजे[2] चला श्रीहरी । क्षण एक विश्रांती घ्या हो अंतरीं ॥ ४ ॥

७. आर्तीं आरत ऐक्यभावें ओवाळूं । प्रकाश स्वयंज्योती निजतेजें बंबाळू ॥ ध्रु० ॥ परमात्मा श्रीराम महामाया जानकी । विश्रांति पावली गजर[3] न किजे सेवकीं ॥ १ ॥ स्नेह ना भाजन नाहीं वाती पावक । सबाह्यांतरीं[4] अवघा निघोट दीपक ॥ २ ॥ ऐक्याचे सुमनशेजे आत्मा रघुपती । राजाराम रघुपती । वाचा परुषली शब्द न बोलवे पुढती ॥ ३ ॥ राम आणि दास चैतन्य पहुंडलें[5] रामीं । हेंही बोलावया दुजा नुरे धामीं ॥ ४ ॥

८. रामा रामा रामा रामा रघुनंदना रघुनंदना । रामा रामा रामा रामा कुळभूषणा ॥ १ ॥ रामा रामा रामा रामा जानकीपते जानकीपते । रामा रामा रामा रामा विमळमते ॥ २ ॥ रामा रामा रामा रामा दीनवत्सला भक्तवत्सला । रामदास म्हणे तुझी अगम्य लीला ॥ ३ ॥ रामा रामा रामा रामा रामा हो रामा हो । तारी तारी तारी तारी तारी आम्हां हो ॥ ४ ॥ तोडीं तोडीं तोडीं तोडीं भवपाश भवपाश । अनन्यशरण रामीं रामदास ॥ ५ ॥

९. विडा घ्याहो रामराया । महाराज राजया ॥ ध्रु० ॥ रत्नजडित घानदान । आली जानकी घेवोन । विडा देती करोनियां । दीनबंधू रामराया । विडा घ्या० ॥ १ ॥ सुंगध गंगेरी पानें । मुक्त मोतियांचा चूना ।

---

१ व्यर्थ. २ फुलांच्या शेजेवर; पक्षीं उत्तम मनांत. ३ गलबला. ४ आंतबाहेर. ५ झोंपलें.

सुपारी कातगोळ्या । भक्तिभावें मेळविल्या । विडा घ्या० ॥ २ ॥ जायपत्री जायफळ । विडा जाहला सुफळ । सीता रामालागीं देत । केशरकस्तुरीयुक्त । विडा घ्या० ॥ ३ ॥ सीता राम विडा घेतां । ऐक्यभावें एकात्मता । रंगली ऐक्यरंगीं । रामदास पायांलागीं । विडा घ्या० ॥ ४ ॥

---

## ७ उपसंहार.

आज्ञेप्रमाणें परमार्थ । केला जाण म्यां यथार्थ ॥ १ ॥ आतां देहाचा कंटाळा । आला असे जी दयाळा ॥ २ ॥ आतां एकचि मागणें । कृपा करूनियां देणें ॥ ३ ॥ ज्याची दर्शनाची आशा । पुरवावी त्याची इच्छा ॥ ४ ॥ ऐक सखया वचन । त्याशीं देईन दर्शन ॥ ५ ॥ तेरा अक्षरी मंत्राचा । जप करील जो साचा ॥ ६ ॥ गणना होतां तेरा कोटी । त्यासि भेटेल[1] जगजेठी ॥ ७ ॥ भय न धरावें मनीं । बहू बोलिलों म्हणुनी ॥ ८ ॥ नलगे आसनीं बैसावें । नलगे अन्नही त्यागावें ॥ ९ ॥ येतां जातां धंदा करितां । जप संख्या मात्र होतां ॥ १० ॥ तेरा कोटी गणना तेची । पापें निरसती जन्मांतरिंचीं ॥ ११ ॥ त्याशीं देईन दर्शन । तत्काळचि मुक्त होणें ॥ १२ ॥ ऐसा वर होतां जाण । दास जाला सुखसंपन्न ॥ १३ ॥

अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरिं । श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥ १ ॥ हरे राम हरे राम राम राम हरे हरे । हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥ २ ॥ पुंडलीकवरद हरिविठ्ठल । पार्वतीपते हरहर महादेव । सीताकांतस्मरण जयजय राम ॥

दुःखानळें[2] मी संतप्त देहीं । तुजवीण रामा विश्रांति नाहीं । आधार तूझा बहु मी विदेशी । श्रीरामराया कधिं भेट देशी ॥ १ ॥ प्रारब्ध खोटें अभिमान आला । स्वामी समर्थासि वियोग जाला । तेणें बहू खेद वाटे जिवासी । श्रीरामराया० ॥ २ ॥ तुझिया वियोगें बहु वेदना रे । विवेक नाहीं आम्हां दिनां रे । पडिला समंधू[3] या दुर्जनासी । श्रीरामराया० ॥ ३ ॥ संसारचिंता मज वाटती रे । रामा प्रपंचीं मन जातसे रे । संसर्ग आहे इतरां जनांसी । श्रीरामराया० ॥ ४ ॥

हिनाहूनि मी हीन जैसें भिकारी । दिनाहूनि मी दीन नानाविकारी । पतीतासि रे आजि[4] हातीं धरावें । समर्था तुझें काय उत्तीर्ण[5] व्हावें ॥ १ ॥

---

१ 'भेटेन' असा पाठ. २ दुःखाच्या तापानें. ३ संबंध. ४ 'आणि' असा पाठ. ५ उतराई.

समर्थें दिलें सौख्य नानापरीचें । सदा सर्वदा जाणसी अंतरींचें । लळे पाळिले त्वां कृपाळुस्वभावें । समर्था तुझें काय० ॥ २ ॥ जनीं भक्ति नाहीं मनीं भाव नाहीं । मला युक्ती ना बुद्धि कांहींच नाहीं । कृपाळू-पणें राज्य रंकासि द्यावें । समर्था तुझें काय० ॥ ३ ॥ बहूसाल अन्याय कोटीनकोटी । रघूनायकें घातले सर्व पोटीं । किती काय गूणासि म्यां आठवावें । समर्था तुझें काय० ॥ ४ ॥ दिनानाथ हें ब्रीद त्वां साच केलें । म्हणे दास भक्तांसि रे उद्धरीलें । सुखें सांडणें या देहाचें करावें । समर्था तुझें काय० ॥ ५ ॥

ओवी । हनुमंत आमुची कुळवली[1] । राममंडपीं वेला गेली । श्रीराम-भजनें फळली । रामदास बोले ॥ १ ॥ आमुचे कुळीं हनुमंत । हनुमंत आ-मुचें दैवत । तयावीण आमुचा परमार्थ । सिद्धीतें न पावे कीं ॥ २ ॥ साह्य आम्हांसी हनुमंत । आराध्यदैवत श्रीरघुनाथ । गुरु श्रीराम समर्थ । उणें काय दासासी ॥ ३ ॥ दाता एक रघुनंदन । वरकड लंडी देई कोण । हें त्यागोन आम्ही जन । कोणाप्रती मागावें ॥ ४ ॥ म्हणोनि आम्ही राम-दास । रामचरणीं विश्वास । कोसळोनि पडो हें आकाश । आणीकाची वास न पाहूं ॥ ५ ॥ स्वरूपसंप्रदाय अयोध्या मठ । जानकी देवी रघुनाथ दैवत । मारुती उपासना नेमस्त । वाढविला परमार्थ रामदासीं ॥ ६ ॥

---

## ८ सवया.

### ( १ )

वंदिला गजवदन । मुख सुखाचें सदन ।
  जेणें जाळिला मदन । त्याचें अंतर धरा ॥
अहो रामऱ्राम । जनसज्जनविश्राम ।
  साधकांचें निजधाम । हित आपुलें करा ॥
अखंडीत निजध्यास । धरा अंतरीं अभ्यास ।
  बोले भागवत व्यास । हरिभजनें तरा ॥
धीर उदार सुंदर । कीर्ती जाणतसे हर ।
  सोडविले सुरवर । वरदायक खरा ॥ १ ॥
म्हणावा जयजयराम ॥

---

[1] कुळरूपी वेल.

( २ )

तुझा भाट मी वर्णितों रामराया। सदासर्वदा गाय ब्रीदें सवाया॥
महाराज दे अंगिचें वस्त्र आतां। बहू जीर्ण जाली देहबुद्धिकंथा॥१॥
सवाई ॥ १ ॥ रामदूत वायुसूत भीमगर्भ जुत्पती। जो नरांत वानरांत भक्ति प्रेम वित्पती॥ दासदक्ष स्वामिपक्ष नीजकाजसारथी। वीरजोर शीरजोर धक्कधिंग मारुती॥ म्हणावा जयजयराम॥

( ३ ) जब हनुमंत.

जनक दुहिता शुद्ध लेनेकू गभार दौर दौर आये है। तब कंठ गुरगुरगुरीत नेत्र गरगरगरीत रोम थरथरथरीत पुच्छझारे॥ तबलक घरघरघरीत बनमो दरदरदरीत सीताशोक हरत झरझरझरीत बन उफारे॥ तव कंठ कुचकुचकुचीत इंद्रजीत चकचकचकीत रावण थकथकथकीत कर नगर ज्यार ज्यार मखमखमखीत दास लियो जयतु राम मिले तब कपि भुभुःकारे॥ १ ॥ म्हणावा जयजयराम॥

( ४ )

नयनीं पहातां हनूमंत। ज्यासी वर्णिती महंत। ज्याचा महिमा अनंत। मुख्य प्राण रामाचा॥ स्वामी रामाचें वहन। केलें लंकेचें दहन। त्याची कीर्ती गहन। बलभीम नामाचा॥ सदा बांधुनिया माज। करी रामाचें निजकाज। ज्याचे शिरीं रघुराज। सेवक पूर्ण कामाचा॥ सर्व देवांचा वरिष्ठ। वारी दासाच अरिष्ट। रामदास एकनिष्ठ। मारुती हा नेमाचा॥ म्हणावा जयजयराम॥

( ५ )

परमसुंदररूप शामल। इंद्रनीलकीलकांतिकोमल। भयनिवारण भक्तवत्सल। वरपराक्रम कीर्तिविमल। भुवनकंटकदैत्यमारक। अमरमोचक दैन्यहारक। दुरितनाशक पुण्यकारक। हरितसंकट दासतारक। विकटविषमतालछेदक। वरनवर दैत्यभेदक। दशमुखादिकशिरच्छेदक। ऋषिजनमुनिचित्तवेधक। अमरभूषण उत्तमोत्तम। भुवनपालक हा रघूत्तम। वीरवीरांतक हा वीरोत्तम। असुरांतक हा सुरोत्तम। बहुतपीडकदैत्यभंजन। ऋषिमुनिजनयोगिरंजन। दुरितदानवदुष्टभंजन। अतुलकीर्तिव्यक्तव्यंजन। जयजय मार्तंडवंशावतंस। जयजय कैवल्यधाम। जयभरताग्रज। जयजय सीतारमण। जयजय सिंहासनाधीश्वर। जयजय सुरराजविराजितपद। नमस्ते नमस्ते॥

## ( ६ ) शुक्रवार.

जय जगदंब सौख्यदानी । लक्ष्मी माय जगज्जननी । जय करवीर-निवासिनी । नारायणी भगवती । मूळमाया वैष्णवी । अनंतब्रह्मांडें नाचवीं । नानानाटकें लाघवी । परब्रह्मशक्ति ॥ शास्त्रपुराणें वेदस्मृति । अखंड जियेचें स्तवन करिती । जे अव्यक्तपुरुषाची व्यक्ति । चिद्रूपिणी ॥ विस्तारें वाढली इच्छाशक्ति । चराचरीं जियेची व्याप्ति । जगन्माता ॥ रामदासाचा किंकर । सदा झाडी महाद्वार रामनाम अलंकार । कंठीं हर्षें नाचतो ॥ म्हणावा० ॥

## ( ७ ) शनिवार.

हरिगिरिपरि ठाण । बळें चालविलें फुराण । वरी घेतलें किराण । अंतराळ जातसे ॥ कपि लागवेग भावें । मागें लांगूल हेलावें । वैरसंबंध आठवें । वज्रदाढा खातसे ॥ मनोवेगें झपावला । द्रोणागिरीस पावला । हात घाली औषधीला । आटाआटी होतसे ॥ गिरिउत्पाटिला बळें । सळें बांधिला लांगूळें । मागें फिरे अंतराळें । लंकेवरी येतसे ॥ म्हणावा० ॥

## ( ८ ) रविवार.

नाम जजुरीगड सुंदर । तेथें नांदे ह्माळसावर । संगें भैरवगण अपार । पूर्ण अवतार शिवाचा ॥ पीत अश्वावरी स्वार । हातीं घेउनि तलवार । करी मणिमल्लसंहार । करी उद्धार जगाचा ॥ चंपाषष्ठीचा उत्सव थोर । यात्रा मिळती अपार । येळकोटनामाचा गजर । भक्त आनंदें करिताती ॥ दास म्हणे रामराव । राम तोचि खंडेराव । जेथें भाव तेथें देव । लक्ष पायीं जडलिया ॥ म्हणावा० ॥

## ( ९ ) सोमवार.

धन्य कैलासभुवन । शुभ्र शंकराचें ध्यान । पुढें नाचे गजानन । सिंहासनीं बैसला ॥ वाचे उच्चारितां हर । त्यासि देता महा वर । करी पातकांचा संहार । अंकीं गिरिजा शोभला ॥ कृष्णा गोदा भागीरथी । ज्याचे जटेंतून निघती । पावन त्या त्रिजगती । स्नानपाना लाधल्या ॥ भैरवादि समुदाय । रामनाम नित्य गाय । भवभ्रम सर्व जाय । लक्ष पायीं ठेविला ॥ म्हणा० ॥

## ( १० ) मंगळवार.

धन्य तुळजापुर सुंदर । माता नांदे घरोघर । तेत्तिसकोटि सुरवर । उभे असती त्या ठाया ॥ यात्रा येतसे अपार । उदो बोलाचा गजर ।

गोंधळ पोत निरंतर । चमत्कार पावती ॥ तेथें येतां रामदास । श्रीरामचरणीं दृढ विश्वास । अंतरीं धरोनि आस । रामध्यान करीतसें ॥ रामरूपी देवी जाली । शिवशक्ति आकारिली । नामें अंतरीं निवाली । लक्ष पायीं ठेविला ॥ म्हणावा० ॥

## (११) बुधवार.

नाम विठ्ठल सुंदर । ब्रह्मा विष्णु आणि हर । गुणातीत निर्विकार । शुकादिकीं गायिला ॥ चंद्रभागा रम्यतीर । तेथें उभा कटिकर । दिंड्या पताका अपार । यात्राघोष जाहला ॥ तेथें येतां रामदास । दृढ श्रीरामीं विश्वास । रूप पालटोनि त्यास । रामरूपीं भेटला ॥ पुन्हां विठ्ठलस्वरूप । राम विठ्ठल एकरूप । पूर्वपुण्य हें अमूप । लक्ष पायीं ठेविला ॥ म्हणावा० ॥

## (१२)

जय रघुनंदन पूर्ण कृपाघन वामांकीं सति शोभतसे । सव्य लक्षुमण भरत शत्रुघन सन्मुख मारुती तो विलसे । अंगद सुग्रीव भक्त बिभीषण जांबुवंत गुज गर्जतसे । नाम विशेष पट्टाधीश रामदास गुण गर्जतसे ॥ ॥ म्हणावा जय जय राम ॥

## (१३)

प्रतापार्क रघुराज । घेतां तापसाचा साज । साधावया सुरकाज । सुवेळाचळा पातला ॥ संगें रीस कपीभार । सेना दाटली अपार । करितातीं भुभुःकार । त्रिकूटाचळ घेतला ॥ कुंभकर्ण इंद्रजित । रणीं कदापि न जीत । बाण हा तुझा गांजीत । ऐसा राम कोपला ॥ रणीं मारुनिया रावण । लंकापति बिभीषण । ऐसा रामें केला पण । अंगदाहि बोलविला ॥ म्हणावा० ॥

## (१४)

नाम श्रीरामसुंदर । ध्याती उमामहेश्वर । सिंहासनीं रघुवीर । अंकीं सीता शोभला ॥ लक्ष्मण महावीर । भरत शत्रुघ्न धीर । हनूमंत जोडी कर । देव-ऋषीं गायिला ॥ ज्याचे ध्यानीं रामदास । तेंच ध्यान कल्याणास । बंधु दत्तात्रेयास । रामप्रेमा लाधला ॥ वर्णूं राघवाचें यश । श्रीगुरुचा नामघोष । पूर्वपुण्य हें विशेष । लक्ष पायीं ठेविला ॥ म्हणावा० ॥

---

## ९ श्रीरामनवमीची उत्साहपद्धति.



॥ श्री ॥

( १ ) पूर्वदिवशीं सर्व तयारी करावी. ( २ ) पाहांटेस भूपाळ्या झाल्यावर द्वार उघडावें, तिलकधारण, कांकडआरती, सुवासिनींकडून पंचारती करावी. ( ३ ) पूजेचे आरंभीं ध्वज लावणें व उत्साहमूर्ती मारुतीची आणणें व गांवांत नऊ दिवस अक्षत देणें; नैवेद्याचें सामान दररोज रुजू करणें, रांगोळी गालीचा काढणें. ( ४ ) नित्यपूजा रामायणसंहिता वाचणें, आरती, छबिना गांवच्या मारुतीस नेणें व प्रदक्षिणा तेरा करणें; त्या करते वेळीं आरत्या १३ म्हणाव्या. त्या १ गणपतीची, २ वेदमातेची, ३ सद्गुरुची, ४ श्रीरामाची, ५ मारुतीची, ६ शंकराची, ७ राधारमणाची, ८ नारायणाची, ९ विठोबाची, १० कृष्णेची, ११ विश्वंभरितेची, १२ व्यंकटेशाची, १३ मारुतीची; याप्रमाणें आरत्या करणें. नंतर तीर्थ व पुराण, वसंतपूजा, महानैवेद्य, ब्राह्मणभोजन. ( ५ ) सायंकालीं करुणाष्टकें. पंचपदी, सवाया, आरती, छबीना, कौल, मनाचे श्लोक ११, व दासबोध दशक चवथा यांतील एक समास क्रमानें वाचणें. कीर्तन झाल्यानंतर प्रसाद वांटणें, व पुढें मानाचे विडे प्रत्येक दिवशीं वाटणें. ( ६ ) जन्मदिवशीं पुराण, पुराण झाल्यानंतर कीर्तनाचा जन्म करावा. ( ७ ) दशमीस आरतीच्या पूर्वीं भिक्षा करावी. ( ८ ) एकादशीस सूर्योदयीं रथोत्साह, नंतर ललित, राज्याभिषेक वर्णन करणें, तीर्थप्रसाद उभें राहून घ्यावा. ( ९ ) हनुमानजयंतीस सूर्योदयीं जन्म व पूजा; नैवेद्य गूळ, फुटाणे यांचा व महानैवेद्य दहीं व वडे यांचा.

## ( रा ) कौल.

श्लोक ॥ दिली भेटि भर्तासि उत्साह गाजे । रघूराज राज्याभिषेकीं विराजे । पहाया सुखें लोक भूपाळ आले । रघूराज आज्ञे महीपाळ गेले ॥ १ ॥ नमस्कार केला सुरेंद्रें महेन्द्रा । प्रभूनें अनुज्ञा दिली देव-इंद्रा । पुजामान पावूनी संतुष्ट जाले । सवें देव तेत्तीस कोटी मिळाले ॥२॥ तया रावणाचे भयें लोक गेले । सुवर्णाचळाचे दरीं वास केले । पथीं देखिलें दैन्यवाणें प्रजांशीं । उभा राहिला इंद्र सांगे तयांशीं ॥ ३ ॥ प्रजाही पळाल्या जयाच्या भयानें । तया रावणा मारिलें राघवानें । सुरांच्या बळें फोडिल्या बंदिशाळा । गुढी रामराज्यीं जना सौख्यवेळा ॥ ४ ॥ पटीं बैसला राम कल्याणराजा । दुराही फिरे रे गरीबा नवाजा । अरे लोकहो जाहली एक छत्री । रघूराज राजा विराजे धरत्रीं ॥५॥ जनाची पिडा पाप संताप गेला । प्रभू राम हा भाग्यसूर्यो उदेला । खडांणा[1] गऊ जाहल्या कामधेनू । वनीं वेली कल्पतरू काय वानूं ॥६॥ खडे सर्व चिंतामणी तेचि गोटे । मला देखतां थोर आश्चर्य वाटे । प्रजा हो तुम्हीं शीघ्र आतांचि जावें । समस्तांसि कल्याण राजा पाहावें ॥ ७ ॥ तुम्हीं भोगिले कष्ट आरण्यवासीं । तयाचीं फळें प्राप्त जालीं त्वरेशीं । अपेक्षेहुनी आगळें सर्व जें जें । सुखें रामराज्यीं जना सामराजें ॥ ८ ॥ महोत्साह उत्साह पाहोनि आलों । अयोध्यापुराहूनि आतां निघालों । समस्तां जनां थोर आनंद जाला । सुरीं मानवीं जयजयोकार केला ॥ ९ ॥ अरे लोक हो क्लेश सांडूनि द्यारे । रघूराजपादांबुजीं जा पहारे । स्थळा आपुल्या इंद्र सांगोनि गेला । गुरें वासरें लोक सैरा निघाला ॥ १० ॥ प्रजा कष्टल्या चालिल्या शीण सांगों । अयोध्याधिशा राघवा कौल मागों । गुरें वासरें लेंकरें गज जाला । अयोध्या समीप बहू लोक आला ॥ ११ ॥ रघूनाथजी सांगती दूतवार्ता । प्रजालोक बाहेर आले समर्था । रघूनायकें सर्वही आणवीले । सभामंडपीं ते असंभाव्य गेले ॥ १२ ॥ प्रभू देखिला जयजयोकार केला । नमस्कार साष्टांग घालूं निघाला । कृपासागरें पाहिलें त्या प्रजांशीं । उठा रे उठा राम बोले तयासीं ॥ १३ ॥ रघूराज सिंहासनीं सौख्यदाता । प्रजा कौल मागावया त्या उदीतां[2] । प्रभू बोलिला रे अपेक्षीत मागा । नका हेत ठेवूं समस्तांसि सांगा ॥१४॥ बहू कष्टलों पावलों जी स्वदेशा । प्रजा बोलती कौल दे राघवेशा । भुमीनें कदा पीक सांडू नये रे । वदे राम लक्ष्मणा हें लिही रे ॥ १५ ॥

---

१ दूध न देणाऱ्या गाई. २ निर्भयतेचें वचन मागण्यास उत्सुक.

मनासारिखी मेघवृष्टी न व्हावी । जया पाहिजे ते प्रसंगीं पडावी । समर्था प्रभू रोगराई नको रे । वदे रामलक्ष्मणा हें लिही रे ॥ १६ ॥ पिकें देखतां सर्व चिंता निवाली । असावीं गृहीं संग्रहीं पेंवपालीं । बिजें बीज कोणाशि मागूं नये रे । वदे राम लक्ष्मू० ॥ १७ ॥ मनाची अपेक्षा गुरें बैल गाडे । घरीं दूभती कामधेनूच पाडे । रघूनाथजी भाग्य यथेष्ट दे रे । वदे राम लक्ष्मू० ॥ १८ ॥ मनासारिखीं पुत्रकन्याकलत्रें । अभीवृद्धि वाढो पवित्रें विचित्रें । सखीं पारखीं सोयिरीं प्रीति दे रे । वदे राम लक्ष्मू० ॥ १९ ॥ कुरूपी विरूपी कदांही नसावे । नको वृद्ध काया तरूणी असावें । दिनानाथजी सर्व सौख्यास दे रे । वदे । राम लक्ष्मू० ॥ २० ॥ नको दुःख आम्हां नको शोक आम्हां । तुझें राज्य तों मृत्यु नकोचि आम्हां । रघूनाथजी शक्ति ऊदंड दे रे । वदे राम लक्ष्मू० ॥ २१ ॥ ग्रह सर्व राशीं शुभाईक व्हावे । सखे मित्र तैसेचि तेही असावे । दिनानाथजी विघ्नवार्ता नको रे । वदे राम लक्ष्मू० ॥ २२ ॥ सदा वासना धर्मपंथीं असावी । दयाशीळ चातुर्यता श्रेष्ठ द्यावी । समर्था प्रभू पापबुद्धी नको रे । वदे राम लक्ष्मू० ॥ २३ ॥ प्रितीनें प्रजा पाळि रे रामराया । नको दैन्यवाणें करीं दिव्य काया । शरीरीं कदा रोगराई नको रे । वदे राम लक्ष्मू० ॥ २४ ॥ कुडें खोडि कापट्य कांहीं नसावें । सबाह्य शुचिष्मंत तैसें असावें । तुझ्या दर्शना आडकाठी नको रे । वदे राम लक्ष्मू० ॥ ३५ ॥ प्रभू क्लेश घेऊनि विश्रांति द्यावी । देहे तोंवरी भक्ति तूझी घडावी । विणी स्वामिणी कौल ऐसाचि दे रे । वदे राम लक्ष्मणा हें लिही रे ॥ २६ ॥

## ( म ) न्हाणी.

१. न्हाणी न्हाणी रामातें अरुंधती[1] । ऋषिपत्न्या पाहुनि संतोषती । रामलीला सर्वत्र मुनी गाती । स्नान उदक यमुना सरस्वती ॥१॥ ज्याच्या चरणीं कावेरी कृष्णा वेणी । ज्याच्या स्नेहें कपिलादि ऋषी मुनी । त्या रामातें न्हाणिलें प्रीतीकरूनी ॥ २ ॥ ज्याच्या नामें उपदेश विश्वजना । ज्याच्या स्मरणें काळादि करिती करुणा । ज्याच्या प्राप्तीस्तव करिती अनुष्ठाना । त्या रामातें न्हाणूनी फुंकी कर्णा ॥ ३ ॥ रमती योगी स्वरूपीं आत्माराम । निशिदिनीं चरणीं असावा नित्यनेम । त्या रामाचा पाळख विश्वधाम । दास म्हणे भक्तीचें देई प्रेम ॥ ४ ॥ न्हाणी न्हाणी० ॥

---

१ वसिष्ठ गुरूची पत्नी.

## ( ज ) पाळणा.

हळूहळू गाई निजरे बाळा । मोठा जटाधारी गोसावी आला । खर-चरभूजा जारे फकीरा । निजला माझा पालखीं हीरा । हळूहळू गा० ॥ १ ॥ नको येउं रे बागुलबावा । निजला माझा पालखीं रावा । सगुणा गुणाचें बाळक माझें । कोणी दावा हो यासम ये दूजें । हळूहळू गा० ॥ २ ॥ लागली दृष्टी कोण्या पापिणीची । उतरे प्रभा मुखचंद्राची । हालवी कौसल्या प्रेमपान्हा । दास म्हणे आला वैकुंठराणा । हळूहळू गा० ॥ ३ ॥

जोजो जोजो रे श्रीरामा । निजसुख[1]गुणविश्रामा । जोजो० ॥ ध्रु० ॥ ध्याती मुनि योगी तुजलागीं । कौसल्या वोसंगीं[2] ॥ १ ॥ जो जो० ॥ वेदशास्त्रींची मति जाण । स्वरूपीं जाली लीन ॥ २ ॥ जो जो० ॥ चारी मुक्तींचा विचार । चरणीं पाहाती थोर[3] ॥ ३ ॥ जो जो० ॥ भोळा शंकर निशिदिनीं । तुजला जपतो मनीं ॥ ४ ॥ जो जो० ॥ दास गातसे पाळणा । राम लक्ष्मणा ॥ ५ ॥ जो जो० ॥

## ( य ) ललित.

### पदें.

रामा तुज कल्याण मागणें । रामा तुज कल्याण मागणें ॥ ध्रु० ॥ तूं जगजीवन तूं मनमोहन । कोण आहे तुजविणें । रामा० ॥ १ ॥ आम्ही हरिजन तूं जगपावन । बोलती वेदपुराणें । रामा० ॥ २ ॥ देवही जाले भक्त मिळाले । आनंदे तुझे गुणें । रामा० ॥ ३ ॥ भक्त सुखी ऋषि सुखी । दास म्हणे तुझें देणें । रामा ॥ ४ ॥

जय हो महाराज गरीब नवाज बंदकमीना कहना के तूं साहेब तेरीही लाज । हो महाराज० ॥ १ ॥ मैं सेवक बहु सेवा मागूं । इतना है सब काज । हो महाराज० ॥ २ ॥ छत्रपती तुम शेकदार सिब । इतना हमारा अर्ज । महाराज० ॥ ३ ॥

कपि सकळही प्रयाणकाळीं । प्रेमें वोसंडती दोहीं डोळीं । नित्य आठवे सुखाची नव्हाळी । म्हणती रामा तुझी सवे लागली । रामा० ॥ १ ॥ जो तूं अगोचर ब्रह्मादिकां । ध्यानीं नातुडसी[4] पंचमुखा[5] । तो तूं आम्हां जालासी निजसखा । प्रेम दिधलें वायुसुता । रामा० ॥ २ ॥

---

१ आत्मसुख व त्रिगुण यांचें विश्रांति स्थल. २ मांडीवर. ३ जागा. ४ सांपडत नाहींस. ५ शंकराला.

तुझ्या वोळगे सुरांसी न लगे हो ठावो । आम्ही वानरें निकट उभीं राहों । न्याहार धरूनि वदन तुझें पाहों हो । परि धाला नाहीं आमुचा भावो ॥ रामा० ॥ ३ ॥

रामा कृपा बहुत असों देणें । आम्ही धन्य जाहालों तुझे गुणें ॥ ध्रु० ॥ रामा गोड लागती तुझ्या गोष्टी । हर्षे गुदगुल्या होताती पोटीं । जणुं सांपडली चणिसाचि मुठी । वाटे धरावी तुझी हनुवटी । रामा० ॥ १ ॥ राम आलिंगोनि सप्रेमें बोले । तुम्हीं मजलागिं हे कष्ट केले । सुखी करोनि सर्व गौरविलें । रामदासीं हनुमंत ठेले । रामा० ॥ २ ॥

## ( रा ) दिवटा.

हुशार भाई हुशार । [१]अवघीं असावें खबरदार । काळोखें पडतें फार । एकाशीं एक दिसेना ॥ १ ॥ चोराचे कळप फिरति । अवचित दगा करिती । निजों नका जागविंति । मी दिवट्या साहेबाचा ॥ २ ॥ मी हराम नव्हे साहेबाचा । नफर इतबाराचा । मज रातीं जागावयाचा हुद्दा दिधला ॥ ३ ॥ मी सारे रात जागतों । [२]अठरा महालाची खबर घेतों । [३]साही नजरेंत राखतों । मनीं धरितों [४]चहूंचे गुण ॥ ४ ॥ मी सकळिकांचें करितों बरें । परि मज मानिति अहंकारें । घोरों लागती झोपेच्या घोरें । ते समूळ नागविती ॥ ५ ॥ जे मजला मानिंति । माझ्या विचारें वर्तीत । तरि हरगीस्त झोला न पवती । ते नाडेनात जी ॥ ६ ॥ जे जे झोपेनें पिडले । ते ते अवघेचि नाडले । यमयातनेशी जुडले । पाहुणेरें द्यावयाकारणें ॥ ७ ॥ जे मदभरें जडले । जन्ममरणा राहाटीं जोडले । सुटिका नव्हती पाडिले । बांधोनियां जी ॥ ८ ॥ अरे जागा स्वरूपीं जागा । मुक्तीचा सोहोळा भोगा । कर्म आपलें अंगा । लागोच नेदावें ॥ ९ ॥ अरे हुशार भाई हुशार । झोपेनें नाडले थोरथोर । म्यां जे जे केले खबरदार । ते कडेशीं पडिलेजी ॥ १० ॥ महादेव निजेनें भ्रमला । विषे तळमळों लागला । मग म्यां खबरदार केला । तो वांचला दों अक्षरीं ॥ ११ ॥ स्वामी कार्तिक निजेनें भ्रमला । बळेंचि परस्त्री भोगूं लागला । मातृगमन पडावें त्याला । तो म्यां खबरदार केला ॥ १२ ॥ विष्णु निजेनें भ्रमला । परस्त्रीचे मोहें जोगी जाला । तो म्यां खबरदार केला । मोहो दवडीला शक्तीचा ॥ १३ ॥ [५]ब्रह्मा निजेनें भ्रमला । चोरानीं समूळ नागविला ! सकळ धर्म बुडविला । दुकाळ पडला मोठा जी ॥ १४ ॥ मग

---

१ सर्व लोकांनीं. २ पुराणांची. ३ शास्त्रें. ४ वेदांचे. ५ शंखासुरानें वेद चोरले असतां विष्णूनें मत्स्यावतार धरून ते परत आणले हा संदर्भ.

म्यां खबरदार केला। तो बावातें स्मरला। तेणें जाउनि चोर गारविला। लेंकाचें वित्त दिधलें ॥ १५ ॥ नारद निजेनें भ्रमला । बायको होउनि साठ लेंक व्याला। तो म्यां खबरदार केला । मग पावला पहिला वेष ॥ १६ ॥ इंद्रें मानिलें नाहीं मजला। सहस्र भोकें पडलीं त्याला । शुक्रें डोळा फोडोनि घेतला। न मानी मजला म्हणवूनि ॥ १७ ॥ चंद्रें नाहीं मानिलें मजला। अभिमानें सुखें निजला । तो क्षयरोगी जाहला। नाडला आपले करणीनें ॥ १८ ॥ दक्ष निजेनें भ्रमला । मानिलें नाहीं मजला। पूर्वशिराशी मुकला। जाहला तो बोकडमुखी ॥ १९ ॥ गुरूनें नाहीं मानिलें मजला। बाइल गमवुनि बैसला। यम निजेनें व्यापिला। जाला केवळ दासीपुत्र ॥ २० ॥ रावण निजेनें भ्रमला। कुलक्षय करूनि शोकीं पडला। मम म्यां खबरदार केला। मग जाला रामरूपीं ॥ २१ ॥ ऐसे ऐकोनि दृष्टांत । सावध करोनि करा स्वहित । तरि आपुलें फल भोगा समस्त। मी सांगतों जी ॥ २२ ॥ मी सांगतों उतराई। कोणापाशीं कांहीं मागत नाहीं। परोपकारास्तवपाहीं। हुशार करितों ॥ २३ ॥ ऐसे दिवटा जाय बोलोनि। घिरटी घाली हाक देवुनि। दास म्हणे दिवट्या मानी। तोचि तरला मोहरातीं ॥ २४ ॥

## ( म ) पिंगळा.

वीर हनुमंतासी दुवा। अहंमायेसी दुवा। संतांचें सभेसी दुवा। धर्माचे सभेशी दुवा। राजमुद्रा देवमुद्रा। ज्ञानमुद्रा ते धुरेशी दुवा हो। वेदांत सिद्धांत दुवा। धादांत तें मज पिंळयाचें बोलणें। गाय रायनहो ॥ १ ॥ ऐसें सर्वही सरेल। परि अविनाशी वस्तु एक उरेल। तें सज्ञान जाणतील। गाय रायनहो ॥ २ ॥ या पृथ्वीस प्रळय होईल। महाकाळ पडेल। सकळ जीवन आटेल। हा मी पिंगळा बोलुनि जातों। गाय० ॥ ३ ॥ शत वरुषें पाऊस जाईल। तेणें जीवसृष्टी मरेल। सूर्यो बारा कळीं तपेल। तेणें पर्वतासहित पृथ्वी जळेल । गाय० ॥ ४ ॥ पोळति शेषाचिया फडा। तो विष वमी भडभडा। पाताळ जळती धडधडा। ऐशी ब्रह्मांडींची राखोंडी होईल। गाय रायनहो ॥ ५ ॥ पाऊस पडेल शुंडाधारीं। तेणें बुडेल धरित्री। अग्नि प्रगटेल अंबरीं। तो करिल बोहरी। तया पाणियाची तेथें सुटेल वावधान। तेणें विझेल तो अग्न। वारियासी गिळितां गगन। गगनासी राहे खावून। तो तामस अहंकार। गाय रायनहो ॥ ६ ॥ राजस बुडविल तामस अहंकारास। सात्विक बुडवील। राजस गिळील तामस सात्विक गिळील अहंकारास। गुण–

माया गिळील गुणास । अहंमाया करील । गाय रायनहो ॥ ७ ॥ गुणक्षोभिणी माये पोटीं । माया मूळमाया पोटीं । मूळमाया स्वरूपा पोटीं । लीन हो । गाय रायनहो ॥ ८ ॥ विघ्न मोठें गायरायनहो । कांहीं शांति करा हो । कांहीं त्याग कराहो । उत्तम पाहा राजा गाय रायनहो ॥ ९ ॥ धुरेची रासी कोण । बापाची राशी कोण । म्यांख[1] व्ररेखोब[2] मिथुन कर्क सिंह कन्या तूळ वृश्चिक धन मकर कुंभ मीन ॥ १० ॥ मीनाचा मीरोग बरा लाभ आहे । थोरल्या पुस्तकाचा शकुन पाहें । मज पिंगळ्याचें हातेंन । गाय० ॥ ११ ॥ बुद्धि कांडि खोविला वरी । निघाली रंकाशीं राज्यपदवी । तुझी हरपली सांपडेल ठेवी । तरी मज पिंगळ्याला विसरोन । रामीं रामदास सर्वदा भाकून गेला निजपदा । त्याचिया नेमाची शब्दा जतन करा । गाय रायनहो ॥ १२ ॥

## ( ज ) जोगी.

काळ बहिरी ससाणा । बंधु तुळज्याचा जाणा । काळ पिळियेला घाणा । बहिरि हूर्मुजी नाणा । बहिरी जोग बोलणी बोलती ॥ १ ॥ निळया घोड्याचा रावुत । हातीं त्रिशूळ रंगीत । कांवे घेतो लखलखित । उंच कास तखतखीत । ताघडोबेडसाति ॥ २ ॥ तेथें बहिरिचि प्रचिति । नागखंडें झोंबाति । तेथें बहिरीचि प्रचिति । नागखंडें झोंबति । तेथें बहिरीचि प्रचिति ॥ ३ ॥

पहिला देव तो बद्धाचा । दुसरा देव तो मुमुक्षूचा । तिसरा देव तो साधकाचा । चवथा देव तो वेगळा । अगम्य त्याची लीळा ॥ १ ॥ पहिला गुण महेशाचा । दुसरा गुण तो ब्रह्मयाचा । तिसरा गुण तो विष्णूचा । चौथा गुण तो वेगळा । अगम्य त्याची लीळा ॥ २ ॥ पहिला भक्त तो कायेचा । दुसरा भक्त तो वाचेचा । तिसरा भक्त तो मनाचा । चौथा भक्त वेगळा । अगम्य त्याचि लीळा ॥ ३ ॥

## ( य ) कानफाट्या.

आलेख जागे । आलेख आलेख सब कोहुं[3] कहे । आलेख आले सो न्यारा । जैसी कीणीही वैसी रहणी । सोई नाथका प्यारा ॥ १ ॥ आलेख जागे । साई आलेख जागे । आलेख पाया कहणी आया उसकी बात झुटी ॥ २ ॥ गोरख गोरख कोहु कहे । गोरख नबुजे कोहे । जोगींद्रकु जो कोउ रखे सोई गोरखहोय ॥ ३ ॥ नवाकके नव तुकरे ज्योरो प्राण

१ मेष. २ वृषभ हे दोन्ही अपभ्रष्ट शब्द आहेत. ३ कोणी.

लियो हे गाथा । कंथा छोड कंठ लगाय जोगी रहता नंगा ॥ ४ ॥ जनमो सिंगी मनमो त्यागी मनमो बद्धा जनमो मुक्ता । कथनी कहते लोक टफावे सोहि ज्ञानका अंधा ॥ ५ ॥ जोगी भीतर मडिया पैटे करवे भीतर बाई । जीवनमें जी देखन गया जोगीकी सुरत[1] पायी ॥ ६ ॥ फेरी करते घरघर फीरे कीनरी बज्याई तारा । कंथा आवे कंथा जावे जोगी रहता न्यारा ॥ ७ ॥ सिंगी वाजे बावगाजे माईर संडी बाडे । नाथ न बुझे गुतगुतमेर नाथ बुझे सो छुटे ॥ ८ ॥ मुद्रा फारी कानमो डारी आपसे नफारी कोये । आपसे फेरमुद्रा पैटी सोई गोरख होय ॥ ९ ॥ जोगे न जानु जुगुत न जानु न जानु आसन ध्यान । रामकि कृपा दास न पाई आलख हुवा परिपूर्ण[2] ॥ १० ॥

## ( जय ) भुत्या.

ब्रह्मीं माया उदो । त्रिगुण काया उदो । तत्वच्छाया उदो । चारी खाणी उदो ॥ १ ॥ चारी वाणी उदो । अनंत योगी उदो । विद्या बुद्धी उदो । तीनी विधी उदो ॥ २ ॥ कारण सिद्धी उदो । आगम निगम उदो । साधन सुगम उदो । ज्ञान संगम उदो ॥ ३ ॥ देवां भक्तां उदो । योगी मुक्तां उदो । अनंत सिद्धां उदो । उदो दासा उदो ॥ ४ ॥

## ( राम ) उपसंहार.

जनीं जाहली पूर्ण हे रामनवमी । कृपें तोषला स्वामि हा नित्यनेमीं । यशस्वी दयानंद कल्याणमस्तु । तथास्तु तथास्तु तथास्तु तथास्तु ॥ १ ॥ घडो सर्वदा भक्ति या राघवाची । जळो कामना दुःख चिंता भवाची । यशस्वी दयानंद कल्याणमस्तु । तथास्तु० ॥ २ ॥ सदा सर्वदा चिंतितां देव पावो । सदा वृत्ति हे शुद्ध निःसंग राहो । यशस्वी दयानंद कल्याणमस्तु । तथास्तु० ॥ ३ ॥ विकल्पाचिया मंदिरीं दीप नाहीं । सदा शुद्धसंकल्प देहात्मगेहीं । यशस्वी दयानंद कल्याणमस्तु० ॥ ४ ॥

---

१ वेष. २ मिळविला.

## १० राममंत्राचे श्लोक.

१. नको शास्त्रअभ्यास वित्पत्ति मोठी । जडे गर्व ताठा अभीमान पोटीं ॥ कसा कोणता नेणवे आजपा रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

२. नको कंठ शोषूं बहू वेदपाठीं । नको तूं पडूं साधनाचे कपाटीं ॥ घडे कर्म खोटें बहू तो दगा रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

३. तुला ही तनू मानवी प्राप्त जाली । बहूजन्मपुण्यें फळालागिं आली ॥ तिला तूं कसा गोंविसी विषयीं रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

४. जरी ही तनू रक्षिसी पुष्ट कांहीं । तरी भोग तो रोग होईल देहीं ॥ विपत्ती पुढें ते न ये बोलतां रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

५. खुळे हस्तपादादि हे भग्न होती । दिठी मंद होऊनियां कर्ण जाती ॥ तनू कंप सर्वांगिं होती कळा रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

६. कफें कंठ हा रुद्ध होईल जेव्हां । अकस्मात तो प्राण जाईल तेव्हां ॥ तुला कोण तेथें सखे सोयरे रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

७. तुझें बाळतारुण्य गेलें निघोनी । कळेना कसे लोक जाती मरोनी ॥ करीसी मुलाची स्वहस्तें क्रिया रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

८. दुराशा नको रे परस्त्रीधनाची । नको तूं करूं नीच सेवा जनाची ॥ पराधीन कैसा मला दीससी रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

९. मदें डोलसी बोलसी साधुवृंदा । कसें हीत तूं नेणसी बुद्धिमंदा ॥ रिकामाचि तूं गुंतशी वाउगा रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

१०. बहू व्यापसंताप तो मूळपापा । गतायुष्य द्रव्यें न ये कोटि बापा ॥ कळेना तुला कोणता तो नफा रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

११. तुझे आप्त द्रव्यार्थि नुस्तेचि होती । तनू हे चितेमाजि कीं बोळवीती ॥ असें जाणुनी हीत कांहीं करा रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

१२. कुटुंबीं स्त्रिया पुत्र ते दासदासी । बहू पोषिसी सोसुनी दुःखरासी ॥ त्यजीं भार काबाड ओझें किती रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

१३. बहू इच्छिसी कीर्ति सन्मान कांहीं । सुखाचा तुला अंतरीं लेश नाहीं । फुकाचें मुखीं नाम तें कां न ये रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

१४. रवीसूत ते दूत विक्राळ येती। तुझ्या लिंगदेहासि ओढूनि नेती॥ तुला खंडिती मुंडिती दंडिती रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

१५. नको वीषयीं फारसा मस्त होऊं। नको मानदंभामधें चित्त गोवूं॥ नको भस्म लावूं जटाभार कां रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

१६. नको फार मंत्राग्निच्या मंत्रदीक्षा। नको जारणामारणादी अपेक्षा॥ कळायुक्त चातुर्यता वीकळा रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

१७. नको योग अष्टांग तो रोध प्राणा। नको कृच्छ्रचांद्रायणीं हट्ट जाणा॥ अपभ्रंश हा मार्ग कीं वोखटा रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

१८. कदापी घडेना व्रतें यज्ञदानें। नसे द्रव्यगांठीं करावें जयानें॥ घडे ना घडे यद्यपी कां फुका रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

१९. नसे सत्य कांहीं दिसे दों दिसांचें। तुला लूटिती चोरटे लोक साचे॥ स्त्रिया पुत्र कामा न येती तुला रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

२०. नको तूं कदापी करूं तीर्थयात्रा। तनूदंडणीं क्षीणता सर्व गात्रां॥ करी ग्रस्त आयुष्य तूं कोणसारे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

२१. तुला येम पाशीं करी बद्ध जेव्हां। सखा कोणता सोडवी सांग तेव्हां॥ यमाला कदापी दया ते न ये रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

२२. तपस्वी मनस्वी भले पार गेले। दुजी सृष्टि कर्ते असे थोर मेले॥ चिरंजीव कल्पायु गेले किती रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

२३. बहू कामधंद्यांमधें धांव घेसी। किती नांवरूपा जगीं मीरवीसी॥ कशाला तुला उंट घोडे नगारे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

२४. म्हणे देश माझे भुमी गांव वाडे। शिबीकासनीं बैससी उंच लोडें॥ कसा उंच तूं मंचकीं लोळसी रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

२५. दशग्रीव लंकापुरीं मस्त जाला। अकस्मात गेला पुरीमाजि घाला॥ चिरंजीव दे राज्य बीभीषणा रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

२६. अधोमूख विष्टेमधें मायपोटीं। पचे पिंड हा सोसुनी दुःखकोटी॥ स्मरेना कशी लाज नाहीं तुला रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

२७. असे भोगुनी पंचचत्वारि मासीं। पुढें दैवयोगें सख्या जन्मलासी॥ कसा वीसरे ध्यान सोहं पुढें रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

२८. कळे वायुचा स्पर्श होतांचि जेव्हां। रडे बाळ कोहं म्हणे जीव तेव्हां॥ पुढें खेळ नानापरी खेळसी रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

२९. दिसंदीस माता पिता बंधु जाणे। परी रोग नाना करी तेथ ठाणें॥ जरी दैवयोगें पुढें वांचला रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

३०. करी लग्न मुंजी पितामाय त्याचें। करी शाहणा मारुनी रूप साचें॥ करी पोटधंदा भला चांगला रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

३१. बहू पाळिलें पोषिलें मायबापीं। निघे भिन्न निंदूनियां पापरूपी॥ स्त्रियेचेमुळें शेवटीं दुर्गती रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

३२. शतायू नव्हे पूर्ण आयुष्य कांहीं। असें हीत आहीत तें आद्य पाहीं॥ अशाहीमध्यें बाळतारुण्य सारें। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

३३. करीशील धर्माश्रमा अस्त जेव्हां। बहु घातपाती घरीं होय तेव्हां॥ भरीं पोट पोषीं कुटुंबा बरा रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

३४. रवीऊदयोअस्त तों पोटधंदा। स्तवी आर्जवी तो करी येरमिंदा॥ कळेना पुढें काय होणार तें रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

३५. बहू ढीग मागें पुढें मोहरांचे। मदोन्मत्त होऊनियां तेथ नाचे॥ असे गर्व त्यालागिं नर्कासि थारे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

३६. अलंकारमानीं तनू सज्जवीतो। मना दर्पणीं पाहूनी रंजवीतो॥ कळेना जळे सर्पणीं रूप तें रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

३७. बहू द्रव्य गांठीं पुन्हां मेळवीसी। गुरु विप्र बंधू कसे चाळवीसी॥ दुराशा कशाला मशाला पुढें रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

३८. जरी क्षीणदेहो परी वृद्धकाळीं। करीती स्त्रिया सूत नातू ढवाळी॥ धना ऊचकी लागतां गूचकी रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

३९. रवी जे घडी हाणितो काळ जेव्हां। श्रुती शब्द हे गर्जती तास तेव्हां। म्हणे क्षीण आयुष्य गेलें तुझें रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

४०. कसी जन्मुनी माय त्वां वांझ केली। कसी लाज वंशा कुळा लावियेली॥ भुमीभार धोंडा पशु हा खरा रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

४१. कसा कोणता काळ येईल केव्हां। दिनासारिखा काळ नेईल तेव्हां॥ तुझें वित्त तारुण्य लोपेल सारें। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

४२. तुला दंडिती खुंडिती कुंभपाकीं। तुला खंडुनी अग्निकुंडांत टाकी॥ तुला ओढिती सांडसें तोडिती रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

४३. असा उंच भोगूनियां कल्पकोटी। पुन्हा जन्म घे लक्षचौऱ्यांशि कोटी॥ महासंकटीं हिंपुटी जीव सारे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥

४४. नको सोंग छंदें करूं ढोंग कांहीं । नको शिष्यशाखा मठीं सूख नाहीं ॥ महंतीमुळें नाश होतो तपा रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

४५. नको चाउटी वाउगी या जनांसी । हरीचिंतनीं ध्यास लावीं मनासी ॥ अमोलीक हा काळ जातो वृथा रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

४६. महाघोर हा थोर संसार मोठा । कळे संतसंगें समूळींच खोटा ॥ कळे भुक्ति मुक्ती विरक्तीच गा रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

४७. त्यजा दुष्टसंगा पहा रे भल्यांसी । करा हीत येऊं नका गर्भवासीं ॥ जसें अंतिचें दुःख होतें जिवा रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

४८. बहू भोगितां पूढती नर्क आहे । असें जाणुनी त्या सुखामाजि राहे । प्रपंचीं उगा मारिसी कां गपा रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

४९. कलीं साधनें याविणें सर्व निंदीं । हरे राम हा मंत्र जो त्यासि वंदीं ॥ हरे राम हे माळिका साध का रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥

इति रामदासकृत राममंत्राचे श्लोक संपूर्ण.

---

॥ श्री ॥

## धावा श्रीसमर्थांचा

धांव रे रामदासा । गुरुवर्या सर्वेशा ।
पडलों भवडोहीं । काढीं आपुल्या दासा ॥ ध्रु० ॥
नरदेहीं येउनीयां । नाहीं केलें सार्थक ।
भुललों विषयांमाजी । कैंचा होईल विवेक ।
कृपाळुवा दिनानाथा । तारक चि तूं येक ॥ १ ॥ धांव रे० ॥
चौऱ्यांसी फिरतां बा । बहु श्रम पावलों ।
विश्रांतीचा लेश नाहीं । दुःखार्णवीं लोटलों ।
सुखकर्ता संकटहर्ता । बहु शिणलों भागलों ॥ २ ॥ धांव रे० ॥
सद्गुरु श्रीस्वामीराया । कल्याणरूपा अद्वया ।
जगज्जीवनप्रभो स्वामी । तारीं तारीं सखया ।
जन्ममृत्यु दूर करीं । निजपदठाया ॥ ३ ॥ धांव रे० ॥

---

॥ श्री ॥

## आरती श्रीदासबोधाची

वेदांतसंमतीचा काव्यसिंधु भरला ।
श्रुति शास्त्रग्रंथ गीता साक्ष संगम केला ।
महानुभाव संतजनीं अनुभव चाखीला ।
अज्ञान जड जीवां मार्ग सुगम जाला ॥ १ ॥
जय देवा दासबोधा ग्रंथराज प्रसिद्धा ।
आरति वोवाळीन विमळज्ञान बाळबोधा ॥ ध्रु० ॥
नवविधा भक्तिपंथें रामरूप अनुभवी ।
चातुर्यनिधी मोठा मायाचक्र उगवी ।
हरिहरहृदयींचें गुह्य प्रगट दावी ।
बद्धचि सिद्ध जाले असंख्यात मानवी ॥ २ ॥
वीस हि दशकींचा अनुभव जो पाहे ।
नित्यनेमें विवरितां स्वयें ब्रह्म चि होये ।
अपार पुण्य गांठीं तरी श्रवण लाहे ।
कल्याणलेखकाचे भावगर्भ हृदई ॥ ३ ॥

---

## आरती श्रीसमर्थांची

आरती रामदासा । सद्गुरु सर्वेशा ।
कायावाचामनोभावें । वोवाळूं परेशा ॥ १ ॥
रामदास मूर्तिमंत । रामचंद्रअवतार ।
कलियुगीं अवतरोनी । केला भक्तांचा उद्धार ॥ २ ॥
वैराग्य भक्ति ज्ञान । शांति क्षमा विरक्ती ।
विवेक सालंकृत । क्षमा दया सर्व भूतीं ॥ ३ ॥
सच्चिदानंदघन । रामदास केवळ ।
दिनकरकृपायोगें । रामचंद्र निर्मळ ॥ ४ ॥






